श्रीः

# अथ भाषाविवृत्तिसहिता

# श्रीमद्भगवद्गीता

# प्रारभ्यते.



श्रीगणेशाय नमः॥ ॥ अथ मंगलाचरणम्॥ ॥ आत्मतत्त्वं स्वप्रकाशं सद्विचार्य पुनः पुनः॥ कुर्वेहं भाषया व्याख्यां गीतायाः कृष्णतुष्टये ॥१॥ येषां संस्कृतभाषाया मभ्यासो नास्त्यथापि च॥ छंदोबद्धेषु ग्रंथेषु भाषया रचितेष्वपि ॥२॥ तेषां गीतार्थबोधाय भाषयातिविस्तृतः॥ स्पष्टार्थः सुखबोधश्च दीपोयं क्रियते मया ॥३॥ शास्त्रिणा रघुनाथेन रामचंद्रात्मजेन वै॥ अनेन प्रीयतां देवो भगवान् श्रीपतिः स्वराट्॥४॥ अखंडं सच्चिदानंदं परिच्छेदविवर्जितं॥ श्रीकृष्णाख्यं परं धाम तदहं प्राप्नुयामिति॥५॥ भगवद्ध्यानमेवात्र विपदां भंजनं स्मृतं॥ शत्रूणां नाशनं चैव नान्यदस्ति विमर्शितं॥६॥ तथात्मोद्धारं येन तद्भयकृद्भयनाशनः॥ अतश्चितस्य संशांत्यै प्रयासोयं मया कृतः॥७॥ अत्र न्यूनाधिको वार्थो विरुद्धो वा भवेद्यदि॥ संशोध्यः पंडितैरेव मह्यं प्रांजलिरर्थये ॥८॥ मीमांसान्यायपंचास्य राघवाचार्यसूरिणाम्॥ शिष्यस्यैषा कृतिर्भूयाद्रघुनाथस्य सन्मुदे॥९॥ ॥

आत्मा, स्वभावें करून सच्चिदानंदरूप आणि देशकालवस्तूंचे जें परिच्छेद-त्यांहीं करून रहित अद्वितीय आणि असंगस्वरूप असा असतां ही अघटित घटना करणारी जी परमात्मशक्तिरूप माया तिचे योगानें ईश्वर, देव, तिर्यक् आणि मनुष्य-एतद्रूप अनंत जीवांचे स्वरूपानें भेदाप्रत पावून उपास्योपासकभावाप्रतही पावून या प्रपंचांत नटतो. या सर्व नटण्यास मायाच कारण आहे, ती माया सत् किंवा असत् यांतून कोणत्याही स्वरूपानें वर्णन करण्यास शक्य नाहीं. अशी जरी ती अनिर्वचनीय आहे आणि इंद्रियांस गोचर नाहीं तथापि जशी वन्हीवरील दाहस्फोटांस उत्पन्न करणारी शक्ति वन्हीपेक्षां पृथक् प्रत्यक्ष दिसत नसतां दाहस्फोटादिक जीं कार्यें होतात त्यांवरून ती होती असें अनुमान होतें. या प्रमाणें [illegible] रचना कशी होते असें मनांत येण्यास दुर्घट आहे, असें जें जगद्रूप कार्य प्रत्यक्ष दिसतें त्यावरून मा-

स उत्पन्न करणारी अशी मूल कारण भूत ब्रह्माची शक्ति आहे असें अनुमान होतें, यावरून ही माया सिद्ध होते; परंतु तिचें स्वरूप पाहिलें असतां परब्रह्म स्वरूपाहून निराळें नाहीं, परब्रह्माचेच सत्तेनें ही आहे – भासते – अशा व्यवहारास योग्य होते. या माया शक्तीनें जीव आणि ईश्वर यांस निरनिराळें भासविलें आहे. तें असें – ही माया सत्व, रज, तमोगुणानीं युक्त अशी त्रिगुणात्मक एकच आहे तथापि माया आणि अविद्या या भेदानें दोन प्रकारची आहे, विशुद्ध सत्त्व ह्मणजे रज आणि तम यागुणानीं मलिन न झालेला सत्त्वगुण त्याचे प्राधान्यानें तीस माया ह्मणतात, आणि मलिन - सत्त्व ह्मणजे रज आणि तम यागुणांनीं मलिन झालेला सत्त्वगुण त्याचे प्राधान्यानें तिस अविद्या ह्मणतात. अविद्येसच अज्ञान असें ह्मणतात. मायेचे ठायीं झालेला जो सच्चिदानंदरूप परब्रह्माचा प्रतिबिंब त्यास ईश्वर असें ह्मणतात. आणि अविद्येचे ठायीं झालेला जो परब्रह्माचा प्रतिबिंब त्यास जीव असें ह्मणतात. येथें बिंबप्रति बिंब भाव जसा दर्पणांत मुखाचें प्रतिबिंब होतें त्या प्रमाणें समजूं नये. माया रूप उपाधीचे संबंधानें मायेवरील जे जगत्कर्तृत्वादिक धर्म त्यांचें परब्रह्माचे ठायीं भासणें आणि परब्रह्माचे सत्तेनें मायेवर भासणें. तसेंच अविद्या किंवा तिचें कार्य जें अंतःकरण बुद्ध्यादिक जीवाचे उपाधी त्यांवरील जे काम – संकल्प – कर्तृत्व भोक्तृत्वादिक धर्म त्यांचें परमात्म्याचे ठायीं भासणें हें परमात्म्याचे सत्तेनें आहे – भासते – असें अविद्या अंतःकरण इत्यादिकांवर सत्तादिकाचें भासणें – असा बिंब प्रतिबिंब भाव येथें समजावा. माया प्रतिबिंब जो ईश्वर तो आपले उपाधिभूत मायेस आपले स्वाधीन ठेविता, मायेचे स्वाधीन आपण होत नाहीं. ह्मणजे मायेनें केलेलें जें – आपले स्वरूपाचें आवरण तेणें करून युक्त न होतां तो सर्वज्ञ – सर्व जगाचा कर्ता – नियंता असा राहिला आहे. अविद्या प्रतिबिंब जो जीव तो अविद्येचे स्वाधीन झाला आहे. ह्मणजे अविद्येचे आवरणामुळें आपलें सच्चिदानंद, अद्वय आणि असंग अशा रूपाचे अज्ञानानें युक्त झाला आहे. यास्तव तो अल्पज्ञ – परिच्छिन्न कर्ता, भोक्ता, संसारी, सुखी, दुःखी असा झाला आहे. आणि सत्त्व गुणाच्या मालिन्याचे तारतम्यानें म्हणजे अधिक, न्यून पणानें तारतम्या प्रत पावलेली जी अविद्या तद्रूप उपाधीचे योगानें देव मनुष्य तिर्यगादि भेदानें प्रतिशरीरांत भिन्न भिन्न झाला आहे, अशी जी जीवेश्वरांची प्रक्रिया आहे ही विषयीं – जीव आणि ईश यां प्रत आभासें करून करते आणि आपण माया आणि अविद्या होते. अशा अर्थाची श्रुति प्रमाण आहे. तो परमेश्वर जीवानें केलेले शुभाशुभ कर्माचें जें सुखदुःखानुभव रूप फल तें जीवास प्राप्त होण्या साठीं आकाशादिक पंचभूतें आणि त्यांचीं जीं देहेंद्रियादिक कार्यें यांची उत्पत्ति करून यासृष्टींत आपले सद्रूपानें किंवा आपला जो अंश जीव त्याचे स्वरूपानें प्रवेश करिता जीव नर मायेनें [illegible] आवरणामुळें आपले सच्चिदानंद अद्वय आणि असंग अ-

शा स्वरूपाचे विस्मृतीनें अविद्या आणि तिचें कार्य जें अंतःकरण बुध्यादिक त्याचे ठायीं तादात्म्याच्या अभिमानानें त्यांवरील कर्तृत्व भोक्तृत्वादिक धर्म आपणावर - मानून शुभाशुभ कर्मानुष्ठान करून त्याचे फलोपभोगासाठीं कर्मानुसार देव, मनुष्य तिर्यगादिक योनींचे ठायीं जन्मास यावें व मरण पावावें अशा संसार चक्राच्या प्रवाहांत पडून सुखदुःखानुभव रूप कर्म फलें भोगितो. या प्रमाणें संसार चक्रांत भ्रमण करीत असतां त्यास कधीं ही विश्रांति प्राप्त होत नाहीं. हा संसार जो जीवास झाला आहे हा वास्तविक नसून जसा जीव जागृदवस्थेंतील आपले मनुष्यादिक स्वरूपाचे अज्ञानामुळें पाहिलेले व ऐकिलेले जे पदार्थ त्यां विषयींचे मनावरील जे संस्कार त्यांचे योगानें मी इंद्र, राजा, गज, अश्व व खर झालों असे अनेक प्रकारचें प्रसिद्ध स्वप्न निद्रेंत पाहातो त्या प्रमाणेंच आपलें सच्चिदानंद अद्वय आणि असंग-अशा स्वरूपाचे अज्ञानामुळें मी उत्पन्न झालों हा माझा जनक, ही माझी माता, हें माझें गृह क्षेत्रादिक, ही माझी स्त्री, हे माझे पुत्रादिक, हें माझें कुल, हे माझे शत्रु, हे माझे मित्र, हें माझें धन, ही माझी विद्या, हे माझे सुहृद्, हे माझे बांधव असें स्वप्न अविद्या रूप निद्रेंत पाहतो - आणि संसार चक्रांत भ्रमतो या सर्व अनर्थांस मूळ अविद्याच आहे, जीस स्वरूपाचें अज्ञान असें ह्मणतात. प्रसिद्ध स्वप्नाची निवृत्ति जशी जागृत होऊन आपले मनुष्यादिक स्वरूपाचे यथार्थ ज्ञाना शिवाय होत नाहीं तशी या अविद्यारूप निद्रेंत जीवास जो संसार भ्रमणरूप स्वप्न झाला आहे त्याची निवृत्ति - आपलें जें वास्तविक सच्चिदानंद अद्वय आणि असंग असें स्वरूप त्याचे बोधाशिवाय होत नाहीं. यास्तव परमेश्वराचे उद्देशानें केलेलें जें स्वकर्मानुष्ठान तेणें करून चित्त शुद्धि होऊन तद्द्वारा आत्मस्वरूपाचे यथार्थ ज्ञाना विषयीं इच्छा होऊन गुरूस शरण होऊन गुरू पासून महावाक्याच्या उपदेशें करून ब्रह्मात्म तत्त्व साक्षात्कार झाल्या नंतर अविद्येची निवृत्ति होऊन आपलें जें सच्चिदानंद अद्वय आणि असंग असें स्वरूप तेणें करून स्थिती होणें - असा जो धर्मार्थकाम मोक्षरूप चतुर्विध पुरुषार्थांमध्यें मुख्य मोक्षरूप पुरुषार्थ - त्याची प्राप्ति होऊन जीवानें कृतकृत्य व्हावें या साठीं कर्म उपासना आणि ज्ञान एतद्रूप सर्व त्रिकांड वेद प्रवृत्त झाले आहेत. त्यांत कर्मकांडांत जीं कर्में सांगितलीं आहेत त्यांचें परमेश्वराचे उद्देशानें अनुष्ठान करून चित्त शुद्ध झालें ह्मणजे परमेश्वराचे प्रसादानें या लोकचें आणि स्वर्गादिक लोकचें जें विषयसुख तें सर्व नाशवंत आहे व आत्मस्वरूप सुखच नित्य आहे आणि तें सच्चिदानंद रूप आहे. त्यासच मोक्षसुख ह्मणतात. असा नित्यानित्य वस्तु विवेक उत्पन्न होऊन या लोकांतील आणि ब्रह्म लोका पर्यंत जे स्वर्गादिक लोक त्यांतील सुखाचे भोगाविषयीं विराग ह्मणजे वैराग्य उत्पन्न होतें. नंतर शमदमादिक जीं साधनें - तीं उत्पन्न होऊन सच्चिदानंद ब्रह्मस्वरूप जो स्वात्मा त्यानें अपरोक्ष ह्मणजे प्रत्यक्ष

ज्ञान व्हावें अशी इच्छा उत्पन्न होते. त्या इच्छेसच विविदिषा असें ह्मणतात. ती उत्पन्न झाल्यावर ब्रह्मात्म तत्त्वज्ञान होण्या साठीं वेद वेदांत वेत्ता जो गुरु त्यास शरण जाऊन गुरूपासून वेदांत श्रवण करावें. वेदांताच्या आदिमध्यांतांचा चांगला विचार केला ह्मणजे सर्व वेदांताचें अद्वितीय आणि सच्चिदानंदासंग ब्रह्मस्वरूप जो आत्मा त्याचें प्रतिपादन करणें याविषयींच मुख्य तात्पर्य आहे असा जो निश्चय त्यास उत्पन्न करणारी जी मनाची विचाररूप क्रिया तीस वेदांत श्रवण ह्मणतात. अशा प्रकारचें गुरूपासून श्रवण झालें ह्मणजे कर्मकांडांत शाखा भेदानें किंवा काम्य फळ भेदानें जसा कर्म स्वरूपाचा भेद सांगितला आहे, तो असा— हौत्र, ऋकू शाखी यांनीं करावें. आध्वर्यव, यजुः शाखी यांनीं करावें, औद्गात्र, सामवेदी यांनीं करावें. असा कर्मभेद शाखा भेदानें आहे. पुत्रकामानीं पुत्रेष्टी करावी, वृष्टीची इच्छा ज्यांस आहे त्यांनीं कारीरी नामक इष्टी करावी. ज्यांस इंद्रियांची इच्छा आहे त्यांनीं दधिरूप द्रव्यानें अग्निहोत्र होम करावा. असा फलभेदानें कर्मभेद आहे. त्या प्रमाणें वेदांत प्रतिपाद्य वस्तूचा भेद नाहीं. सर्व वेदांताचें तात्पर्य एकच अद्वितीय ब्रह्मात्म तत्त्व प्रतिपादन करण्याचें आहे असा सांगितलेला निश्चय वेदांत श्रवणानें होतो. हें श्रवण जीव प्रधान ह्मणजे प्रकृति आणि ब्रह्म यांतून कोणतें कोणत्या वाक्याचें प्रतिपाद्य आहे असा संशय होण्या जोगीं जीं वेदांतांतील वाक्यें तीं विचारांत घेऊन त्यां विषयीं संशय पूर्वपक्ष आणि सिद्धांत हीं दाखवून व्यासांनीं ब्रह्मसूत्राचे प्रथमाध्यायांत सविस्तर निरूपिलें आहे. या प्रथमाध्यायास समन्वयाध्याय असें ह्मणतात. सांगितलेले प्रकारचे वेदांत श्रवणानें अद्वितीयासंग सच्चिदानंद परब्रह्म स्वरूपात्म तत्त्व च सर्व वेदांत प्रतिपाद्य आहे. असा जरी निश्चय झाला तरी मी कर्ता, भोक्ता, संसारी, सुखी व दुःखी अशा कर्तृत्व भोक्तृत्वादिक धर्मांनीं युक्त असें आत्मस्वरूप प्रतीतीस येतें. तें आत्मस्वरूप अकर्तृ अभोक्तृ असंग अद्वितीय असें कसें होईल. अशी त्या श्रवण केलेले अर्थावर असंभावना होते. यामुळें श्रवणापासून झालेला जो अद्वितीय ब्रह्मात्म बोध तो दृढ होत नाहीं. यास्तव श्रुतार्थावरील असंभावना दूर होऊन त्याविषयींचा निश्चय दृढ होण्या साठीं त्याचें मनन करावें असा वेदांतांत श्रवणानंतर मननाचा उपदेश केला आहे. मनन ह्मणजे श्रुतार्थाचें युक्तींहीं करून अनुचिंतन करणें तें केलें ह्मणजे पूर्वोक्त असंभावना निवृत्त होते. ती अशी— जरी मी कर्ता, भोक्ता असें कर्तृत्व भोक्तृत्वादिक धर्म आत्म्यावर प्रतीतीस येतात तथापि ते वास्तविक आत्म्यावर नाहींत. कर्ता भोक्ता हें आत्म्याचें वास्तविक स्वरूप नाहीं. कर्तृत्व भोक्तृत्वादिक मनाचे वृत्तिरूप धर्म आहेत. असें श्रुतींत सांगितलें आहे. आणि जेव्हां मन आहे तेव्हांच हें भासतात. सुषुप्तिकाळीं मनाचा लय झाला ह्मणजे हे प्रतीतीस येत नाहींत. आत्मास्वरूप तर सर्व अवस्थेंत प्रतीतीस येतें यास्तव अविवेकामुळें जी

त्यास जो मनाचे ठायीं तादात्म्य भ्रम झाला आहे त्यामुळें मन, बुद्धि इत्यादिकां वरील जे कर्तृत्वादिक धर्म ते तो आपले ठायीं मानितो आणि मी कर्ता, भोक्ता असा व्यवहार करतो. जसा तप्त लोहाचा गोळा आणि वन्हि यांचे अभेद ज्ञानानें लोहच जाळतें असा दग्धत्व व्यवहार लोहावर होतो किंवा जलावर गंध नसतांही गंधयुक्त जे पृथ्वीचे अवयव त्यांचे संबंधानें जलावर हें सुगंधि आहे असा व्यवहार होतो तसाच हा वरचा व्यवहार होतो. विवेकें करून मी मन, बुद्धि इत्यादिकांपेक्षां भिन्न आहें असें ज्ञान झालें ह्मणजे आपलें स्वरूप कर्तृ, भोक्तृ नाहीं. अकर्तृ, अभोक्तृ आणि सच्चिदानंदासंग ब्रह्मस्वरूपच आहे असा दृढनिश्चय होऊन पूर्वोक्त असंभावना नाहींशी होते. या प्रकारचें मनन व्यासानी ब्रह्मसूत्रांतील द्वितीया ध्यायांत सविस्तर निरूपिलें आहे. या अध्यायास अविरोधाध्याय असें ह्मणतात. या प्रकारचे मननानें श्रवण केलेल्या अद्वितीय ब्रह्मतत्वाविषयींची असंभावना जरी निवृत्त झाली तरी कोट्यावधि जन्मांचे ठायीं झालेली जी मन देहादिकांवरील मी मनुष्य, गोर, ब्राह्मण मी कर्ता, भोक्ता इत्यादिक विपरीत भावनात्मक बुद्धि ती त्या दृढ अभ्यासाचे संस्कारामुळें देह मन इत्यादिकांवरील आत्मत्व बुद्धि आणि आत्म्या वरील कर्तृत्वादि विषयींची बुद्धि निवृत्त होत नाहीं. ती पुनः पुनः मागील संस्कारानें उत्पन्न होते. यास्तव ती विपरीत बुद्धि न होण्यासाठीं मनना नंतर निदिध्यासन करावें असा वेदांतांत उपदेश केला आहे. ध्येयाकार जी अंतःकरण वृत्ति तीमध्यें अन्य विषया कार वृत्तींचा समावेश न होतां जो परमात्मा कार वृत्तीचा निरंतर प्रवाह त्यास निदिध्यासन ह्मणावें. यासच ध्यान असें ह्मणतात. हें निदिध्यासन चित्तशुद्धि होऊन मनाची एकाग्रता झाल्या शिवाय होत नाहीं. यास्तव कर्मकरून चित्तशुद्धि झाल्यावर सगुण परमेश्वराचें ध्यान करण्या विषयीं उपदेश केला आहे. त्या ध्यानासच उपासना असें ह्मणतात. त्या सगुण परमेश्वराचे उपासनेनें परमेश्वर रूप ध्येय वस्तूकडे मनाची एकाग्रता करण्याचा अभ्यास झाला ह्मणजे ध्यान रूप जें निदिध्यासन तें साध्य होतें. तें निदिध्यासन सांगितलेलें श्रवण आणि मनन ज्यांनीं केलें नाहीं त्यांस उपनिषदांत ज्या सगुण ब्रह्माच्या उपासना सांगितल्या आहेत त्यांच्या अभ्यासानें प्राप्त होतें. ज्यानीं सगुण ब्रह्मोपासन केलें नाहीं त्यांस श्रवण मनना नंतर केलेल्या ब्रह्माभ्यासानें प्राप्त होतें. ज्या अद्वितीय सच्चिदानंदासंग ब्रह्मात्म तत्वाचें गुरूपासून श्रवण केलें आहे त्याचें परस्पर एकमेकांस वाद कथारूप संवादानें कथन करणें आणि त्याचेंच निरंतर चिंतन करणें किंवा त्या तत्वाचा दुसऱ्यास उपदेश करणें आणि आत्मतत्वा शिवाय दुसरे विषयाचें मनांत चिंतन न करणें किंवा त्या विषयींचे शब्द न बोलणें आणि निरंतर आत्मतत्वा विषयींचेंच चिंतन करणें किंवा शब्द बोलणें यास ब्रह्माभ्यास असें ह्मणतात. हें निदिध्यासन व्यासानीं ब्रह्मसूत्रांचे तृतीया ध्यायांत सविस्तर निरूपिलें आहे. अशा प्रकारच्या निदिध्यासनानें दे

हार्दिकांवरील जी आत्मत्वबुद्धिरूप विपरीत भावना तिची निवृत्ति झाल्यानंतर गुरूपदिष्ट महावाक्यापासून सच्चिदानंद अद्वितीय आणि असंग जें ब्रह्म तें मीच आहें असा अनुभवात्मक साक्षात्कार होऊन त्याचे योगानें सर्व अनर्थास मूळ कारण जी अविद्या तिची निवृत्ति झाल्यानंतर आपले सच्चिदानंदात्मक असंग ब्रह्मस्वरूपानें स्थितिरूप मोक्ष जीवास प्राप्त होऊन तो कृतकृत्य होतो. हाच मुख्यार्थ सर्व वेदांतांत सांगितला आहे. त्याचेंच सविस्तर प्रतिपादन वेदव्यासानीं ब्रह्मसूत्रांत चार अध्यायांनीं केलें आहे. हा अर्थ सर्व वेदांताची उत्तम विचाररूप जी मीमांसा तीणें करून साध्य आहे. परंतु त्यांस मीमांसा समजण्यास साधनभूत जीं तर्क सांख्य आणि योग इत्यादि शास्त्रें त्यांचें अध्ययन नाहीं त्यांस तो समजणें दुर्घट आहे आणि जे मंदमति आहेत त्यांसही समजणें दुर्घट आहे, यामुळें त्यांस तत्वज्ञान होऊन मोक्ष होणार नाहीं. यास्तव वेदव्यासानीं महाभारतांत श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचा संवादरूप जें अष्टादशाध्यायात्मक गीताशास्त्र त्यांत सुलभ रीतीनें अर्जुनानें प्रश्न करावा. आणि भगवंतानीं त्याचें उत्तर सांगावें अशा प्रकारानें तो अर्थ सर्व निरूपिला आहे. या गीताशास्त्रांत त्रिकांड वेद प्रतिपाद्य जीं कर्म, उपासना आणि ज्ञान हीं तिन्ही यथार्थ समजावीं यासाठीं तीं प्रथमाध्याया पासून सहा अध्याय पर्यंत कर्म, सहाव्या अध्याया पासून बारा अध्यायां पर्यंत भगवद्भक्तिरूप उपासना आणि बाराव्या अध्याया पासून अठरा अध्यायां पर्यंत ज्ञान. अशीं प्रश्नोत्तररूपानें भगवंतांचे बोलण्यांत त्यांचीं निरनिराळीं स्वरूपें आणि त्यांचीं निरनिराळीं साधनें आणि त्यांचीं निरनिराळीं फळें सांगून निरूपिलीं आहेत. कर्म आणि ज्ञान यांचा समुच्चय म्हणजे अनुष्ठान तें एक काळीं संभवत नाहीं यास्तव प्रथमचे आणि शेवटचे अध्याय षट्कांत त्यांचें निरूपण केलें आहे. भगवद्भक्तीचें कर्मकाळीं आणि ज्ञानकाळीं अनुष्ठान संभवतें यास्तव दोहोंच्यामध्यें मध्यम षट्कांत तिचें निरूपण केलें आहे. ती भगवद्भक्ति कर्ममिश्र, ज्ञानमिश्र आणि शुद्ध अशी तीन प्रकारची आहे. त्यांत प्रथमषट्कांत कर्म आणि कर्मत्याग यांच्या निरूपणानें महावाक्यांतील त्वंपदाचा शुद्धात्मरूप अर्थ निरूपिला आहे आणि त्याची उपपत्तिही सांगितली आहे. द्वितीय षट्कांत भगवद्भक्तीचे निरूपणानें तत्पदार्थ जो परमानंद भगवान् त्याचे स्वरूपाचें निरूपण केलें आहे. तिसरे षट्कांत त्वंपदार्थ आणि तत्पदार्थ यांचें ऐक्यरूप महावाक्यार्थाचें निरूपण केलें आहे. या प्रमाणें तीन षट्कांचा परस्पर संबंध आहे. प्रत्येक अध्यायाचा संबंध तेथें तेथें सांगूं या प्रमाणें त्रिकांड वेदाचा सर्व अर्थ यांत सांगितला आहे. यास्तव हें गीताशास्त्र सर्व उपनिषदात्मकच आहे आणि उपनिषदा प्रमाणेंच साक्षात् परमेश्वर जो कृष्ण त्याचे मुखांतून निघालें आहे. यास प्रमाण— गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रविस्तरैः ॥ या स्वयं पद्म-

नाभस्य मुखपद्माद्विनिःसृता॥ असें पुराण वाक्य आहे. या गीताशास्त्राचे- पठनाचें फळ॥ अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवाद मावयोः॥ ज्ञानयज्ञेन तेनाहमि- ष्टस्यामिति मे मतिः॥ येणें करून अठराव्या अध्यायांत परमेश्वरानेंच सांगितलें आहे. या गीताशास्त्राचें पठन करण्याचा पुष्कळ संप्रदाय सर्व देशांत चालला आ- हे. परंतु गीताशास्त्रांत जो सर्व उपनिषदांतील रहस्यार्थ सांगितला आहे त्याचें जर यथार्थ ज्ञान नाहीं तर गीताशास्त्राचें मुख्य प्रयोजन जें जीवास आत्मतत्त्व ज्ञा- न होऊन मुक्त होणें तें केवळ पठनानें होणार नाहीं ह्मणून रहस्यार्थ ज्ञान अवश्य पाहिजे. गीताशास्त्रांतील रहस्यार्थ समजावा या साठीं त्यावर श्रीमच्छंकराचार्यां- नीं भाष्य केलें आहे आणि चतुर्धर, मधुसूदन सरस्वती, श्रीधर स्वामी प्रभृतींनीं अ- द्वैत मताचे अनुरोधानें व्याख्या केल्या आहेत. परंतु त्या सर्वही संस्कृत भाषेंत- असून वादविवाद रूप आहेत. आणि न्यायमीमांसादिक जीं शास्त्रें त्यांच्या ज्या प- रिभाषा त्यानीं भरलेल्या आहेत. यामुळें त्या समजण्यास संस्कृत भाषेचा चांगला अ- भ्यास असून न्याय, मीमांसा, सांख्य, योग इत्यादि शास्त्रांचें अध्ययन पाहिजे. सां- प्रत तर तर्कादिक शास्त्रांचे अभ्यासानें फार मानसिकच आहे यामुळें कांहीं दिव- सांनीं तीं शास्त्रें सांगणार व पढविणार दुर्मिळच होणार तेव्हां त्या शास्त्रांचे सहा- य्यानें गीतार्थ त्या टीकांवरून समजणें दुर्घट होईल. आतां या गीताशास्त्रावर या- मनादिक पंडितांनीं ज्या समश्लोकी व्याख्या प्राकृत भाषेंत केल्या आहेत त्यांत क- विता हाच मुख्य गुण आहे. त्यांत श्लोकांतील तात्पर्य किंवा पूर्वश्लोकाचा दुसरे श्लो- काशीं किंवा पूर्वाध्यायाचा दुसरे अध्यायाशीं संबंध सांगितला नाहीं. तसाच को- ठें कोठें श्लोकाचा अर्थ विरुद्ध दिसतो किंवा कोठें कोठें पूर्वापर विरोध दिसतो तो उ- घड करून त्या विरोधाचा परिहार केला नाहीं. याप्रमाणेंच दुसऱ्या कितीएक कविता रूप टीका झाल्या आहेत. त्यांतही प्रतिश्लोकांतील निरनिराळ्या पदाचा अर्थ करू- न मागचा पुढचा संबंध स्पष्ट सांगितला नाहीं. आणि पूर्वापर विरोधाचा परिहार- ज्या रीतीनें संस्कृत टीकांत करतात त्या रीतीनें केला नाहीं. यामुळें पदच्छेद करावा, अन्वय दाखवावा, समस्त पदांचा विग्रह करून दाखवावा. आक्षेप घेऊन त्याचा प- रिहार करावा. असें जें व्याख्यानाचें ह्मणजे टीकेचें लक्षण सांगितलें आहे तें त्यांत- र नाहीं. यास्तव वरती सांगितल्या संस्कृत टीकांत ज्या प्रमाणें गीताशास्त्राचा अर्थ- वर्णिला आहे आणि ज्या प्रमाणें पद पदार्थ केला आहे आणि ज्याप्रमाणें पूर्वापर श्लो- कांची किंवा पूर्वापराध्यायांची संगति सांगितली आहे आणि ज्या प्रमाणें विरोधाचें उ- द्घाटन करून त्याचा परिहार केला आहे. त्या प्रमाणें गीताशास्त्र पठन करणारांस त्या- चे अर्थाचें यथार्थ ज्ञान व्हावें. आणि कर्म उपासना आणि ज्ञान यांचें वास्तविक स्व- रूप समजावें आणि ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन त्यांची या जन्म मरणांतून मुक्त व्हा-

वें या हेतूनें आणि या गीताशास्त्रावरील संस्कृत आणि प्राकृत टीका आहेत त्यां-हीं करून गीता शास्त्रार्थाचें ज्ञान सर्वांस जरी होईल तरी ॥ यइदंपरमंगुह्यंम-द्भक्तेष्वभिधास्यति ॥ भक्तिं मयिपरांकृत्वा मामेवैष्यत्यसंशयः॥ यावाक्यें करून या गु-ह्यतम गीता शास्त्रार्थाचें निरूपण माझे भक्तांस जो करील त्यास माझी भक्ति प्राप्त-होऊन ज्ञान द्वारा माझी प्राप्ति होईल. असें भगवंतांनीं जें फळ सांगितलें आहे त्याप्र-माणें प्रत्येक भगवद्भक्तांस गीता शास्त्रार्थाचें निरूपण माझ्यानें होणार नाहीं याक-रितां प्राकृत भाषेंत व्याख्यान केलें असतां तें व्याख्यान जे अधिकारी पाहतील त्यां-स मीच गीता शास्त्राचे अर्थाचें कथन केलें असें होऊन त्या योगानें परमेश्वर भक्ति मला प्राप्त होईल. आणि मी ज्या दुःख प्रवाहांत पडलों आहें त्यापासून परमेश्वर मा-झा उद्धार करून मला जीवन्मुक्त करील यास्तव याँसाठीं आणि माझी शब्द शुद्ध वाणी या व्याख्येचे संबंधानें अति पवित्र जें भगवदुक्त गीता शास्त्र त्यास संगत झा-ल्यामुळें जसें गांवांतील स्वल्प उदकाचे ओहोळ गंगेस मिळाले तर अति पवित्र जें गंगाजल तद्रूपच पवित्र होतात. त्याप्रमाणें माझी वाणी पवित्र होईल या साठीं मी पर्वतें त्युप नामक रामचंद्रपुत्र रघुनाथ शास्त्री यानें ही भाषाविवृत्ति या नांवाची-गीताशास्त्राची व्याख्या केली आहे. ही व्याख्या ज्यांस गीताशास्त्र पठन करण्या-चा अधिकार आहे असे जे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्यरूप तीन वर्ण त्यांस स्वतः वाचू-न अर्थ समजण्या जोगी झाली आहे आणि शूद्रांस गीताशास्त्र पठन करण्याचा-अधिकार नाहीं त्यांस ब्राह्मण पुरोभागीं करून त्याचे उद्देशानें चारही वर्णांस भा-रतादिकाचें श्रवण करवावें. असें श्रावयेच्चतुरोवर्णान् कृत्वाब्राह्मणमग्रतः॥ इ-त्यादिकें करून पुराणांत सांगितलें आहे त्याप्रमाणें ब्राह्मणाचे मुखानें अर्थ ऐकू-न समजावया जोगी होईल असें परमेश्वरानें करावें. आतां लोकांत या व्याख्येचा पाहण्याचा प्रचार होऊन यांतील जीं अशुद्धें असतील तीं काढून टाकून न्यून असेल तें पूर्ण करून तिचा लोकांस फार उपयोग व्हावा अशी मी परमेश्वरास आ-णि त्याचे जे भक्त दयालु निर्मत्सर पंडित यांस साष्टांग पूर्वक प्रार्थना करून या-भाषा विवृत्ति नामक व्याख्येचा आरंभ करितों. ॥ उपोद्घात समाप्त.

अनादि जी अविद्या तिच्या योगानें झालेला जो संसाररूप द्वैतभ्रम त्या-चे तापानें संतप्त झालेले जे शरणागत भक्तजन त्यांची जी अविद्यारूप निद्रा तिचे-नाशा विषयीं बद्ध परिकर आणि शोभायमान ज्या नखांच्या कांति त्यांहीं करून कि-र्मीर वर्ण ज्याचे स्वस्थ आसन झालें आहे असा आणि रसातळीं गेलेली जी पृथ्वी ति-चा स्वतातूनीं उद्धार करते समयीं ज्याचे शरीरास मोठे मोठे पर्वतांचें घर्षण झालें आ-हे असा आणि वराहरूपानें पृथिवीचें उद्धरण करते समयीं ज्याचे दंष्ट्रेचे अग्रभागीं सकल पर्वत समूह स्थित झाला आहे असा आणि आपले पराक्रमानें ज्यानें त्रैलोक्या-

नें आक्रमण केलें आहे असा आणि प्रबल बाहूं करून उचललेला जो गोवर्धन पर्वत तद्रूप छत्रानें, इंद्रानें अकालीं करविलेली जी प्रलय काला साररव्या मेघांकडून वृष्टि, तिचें निवारण ज्यानें केलें आहे असा आणि त्या वृष्टीनें त्रास पावलेलें जें सर्व गोकूल त्यानें संरक्षण केल्याचे योगानें सर्व जगास ज्यानें विस्मय युक्त केलें आहे असा आणि त्रास पावलेला जो हिरण्य कशिपु नामक दैत्य त्याचे ह्रदय स्थलाचें विदारण करण्या विषयीं अकुंठित अशीं जीं नखें तीं ज्यांस आहेत असे जे हस्त त्यांच्या अंजलि पुटांतून पडलेला जो रक्त प्रवाह तद्रूप समुद्रांत त्रैलोक्य ही ज्यानें मग्न केलें आहे असा आणि त्रिभुवनाचे शत्रु जे मधुकैटभ नामक दैत्य त्यांच्या दृढ ज्या अस्थि त्यांचे पर्वतप्राय समुदायावर ज्याचा प्रभाव व्यक्त झाला आहे असें जें सुदर्शन त्याचा प्रकाश ज्याचे भुजांवर आहे असा आणि चंद्रमौलि जो महादेव त्यास मोठा प्रिय आणि अति प्रबल बाहुदंडानें भ्रमविलेला जो मंदराद्रिपर्वत तेणें करून क्षुब्ध झालेला जो क्षीरसमुद्र त्या पासून उत्पन्न झालेली जी लक्ष्मी तिच्या आलिंगनें करून तिचे स्तनावरची जी पत्रावली म्हणजे वेलबुटी ती ज्याचे विशाल वक्षस्थलावर उठली आहे असा आणि मोठ मोठ्या मुक्ता फलांचा जो हार त्याच्या प्रभेनें देदीप्यमान आहे कंठ ज्याचा असा आणि आपल्या भक्तांचा जो संसारमोह त्यानें आपल्या स्वरूपाचे तत्वावबोधानें नाश करणारा असा आणि लीलेनें ज्यानें अवतार घेतले आहेत असा जो श्रीकृष्ण परमात्मा त्यानें आत्म स्वरूपाचे अज्ञानामुळें प्रवृत्त झालेले जे शोक आणि मोह त्यांमुळें युद्धरूप स्वकीय धर्म टाकावयास उद्युक्त झालेला जो अर्जुन त्यास धर्म आणि आत्मतत्व यांचा जो उपदेश तद्रूप नौकेनें शोक मोहरूप जो समुद्र त्या पासून तारिलें. श्रीकृष्ण भगवंतानें स्वभक्त जो अर्जुन त्यास सांगितलेला जो तत्वार्थ तो सर्वज्ञ वेदव्यासानें सातशें श्लोकांनीं महाभारतीं भीष्म पर्वांत श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचे प्रश्नोत्तर रूप संभाषणानें लिहिला आहे. श्रीकृष्ण भगवंताचा अतिप्रिय सकल विद्या पारंगत आणि ज्ञानी जो अर्जुन तो युद्धांतील सर्व गुणदोष जाणून आणि युद्ध हा आपला धर्म आहे असें समजून प्रवृत्त झाल्यावर स्वधर्म त्याग करण्यास उद्युक्त झाला असें संभवत नाहीं. शत्रूंस मारल्यावर राज्यप्राप्ति होईल परंतु आपले बंध्वादिक मारावे लागतील अशा प्रकारचे युद्धांतील सर्व गुणदोष अर्जुनास माहित होते असें भारताचे उद्योग पर्वांतील कथा संदर्भानें स्पष्ट आहे. तें असें — उद्योगपर्वीं जेव्हां श्रीकृष्ण मध्यस्थी करण्यास कौरवांकडे चालले तेव्हां पांडवांनी मनांत युद्ध आणि साम यांतून कोणतें करावें असें आहे, हें समजण्या करितां त्यानीं प्रत्येकास विचारल्या वरून प्रत्येकानें आप आपला अभिप्राय सांगितला. त्यावेळेस अर्जुनानें जो आपला अभिप्राय सांगितला त्यांत युद्धांतील सर्व गुण आणि सर्वदोष यांचें चांगलें कथन करून युद्धांत भीष्मादिक मारावे लागतील म्हणून सामच करावें असा-

आपला अभिप्राय सांगून नंतर सर्वज्ञ आणि आमचा हितकर्ता तूंच आहेस, तुला यो-ग्य दिसेल तें कर असें सांगितलें नंतर भगवान् परत आल्यावर साम होत नाहीं, असें स्प-ष्ट समजल्यावर सर्व गुणदोष माहीत असतां युद्ध हा आपला धर्म आहे असें मानून यु-द्धाविषयीं प्रवृत्त झाला असें असतां मग मी युद्ध करीन नाहीं असें अर्जुन कसें बोलला? यास्तव त्याचें तात्पर्य निराळें आहे असें कोणी वर्णितात. तें असें— वेदव्यास सर्व वेदांती-ल अर्थ भारतांत लिहिण्यास प्रवृत्त होऊन त्यांनीं सर्व उपनिषदांचा अर्थ या गीताशास्त्रां-त वर्णिला आहे. अर्जुन जेव्हां युद्धसमयीं मोह पावून स्वधर्मत्यागविषयीं उद्युक्त झा-ला तेव्हां या शास्त्राचा उपदेश साक्षात् भगवान् कृष्णानें अर्जुनास केला आणि तेणें करून अर्जुनाचे शोक, मोह जाऊन अर्जुन कृतार्थ झाला. अशा प्रकारची या गीताशा-स्त्राची प्रशंसा करण्यासाठीं महाभारतांत युद्धप्रसंगाचे प्रस्तावनेंत हा संवाद व्यासां-नीं वर्णिला आहे. असे पुष्कळ संवाद विद्यांचे स्तुत्यर्थ आहेत. उपनिषदांत जनक आ-णि याज्ञवल्क्य यांचा संवाद असाच आहे. तो खरोखरीं झाला आहे असें नाहीं. तो के-वळ ग्रंथाचे स्तुत्यर्थ आहे. तसाच हाही संवाद गीताशास्त्राचे स्तुत्यर्थ आहे, असो. क-सेंहि तात्पर्य कोणी वर्णो परंतु गीताशास्त्र हें अतिपवित्र जीं सर्व उपनिषदें त्यांचें रहस्य आहे. यास्तव त्याचें पठनपूर्वक अर्थश्रवण मुमुक्षूनीं केलें असतां सर्व संसाराची मू-ळभूत जी अविद्या तिची निवृत्ति करणारें जें ब्रह्मात्मतत्त्वज्ञान तें होऊन मोक्षफळ भगव-ताचे प्रसादानें होईल यांत संशय नाहीं.

मंगलाचरण समाप्त.

---



अध्याय १ ला.

धृतराष्ट्र उवाच ॥ ॥ धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ॥ मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

आतां गीताशास्त्रांत श्रीकृष्ण आणि अर्जुन यांचा संवाद जो झाला त्याचा प्रस्ताव करण्या करतां प्रथम कथा सांगतात. धृतराष्ट्र बोलतो/ हे संजया, धर्मक्षेत्र ह्मणजे यज्ञादिक कर्मे झाल्यामुळें पुण्यास उत्पन्न करणारें असें जें, जेथें मरण समयीं तारक ब्रह्मोपदेश करून महादेव जीवांस ब्रह्मप्राप्तिरूप मोक्ष देतात त्यास अविमुक्त कुरुक्षेत्र आणि ब्रह्मसदन असें ह्मणतात. असें जें वेदप्रतिपाद्य कुरुक्षेत्र त्याहून निराळें जें कर्मकांडांत यज्ञभूमि ह्मणून सांगितलेलें कुरुदेशांतील कुरुक्षेत्र तेथें एकत्र मिळालेले आणि युद्ध करण्याची ज्यांची इच्छा आहे असे मामक ह्मणजे माझे पुत्र दुर्योधनादिक आणि पांडव ह्मणजे पंडूचे पुत्र हे काय करते झाले. पूर्वी युद्धेच्छु होते तथापि भीष्मार्जुनादिक वीरपुरुष निमित्तक दृष्ट भयानें किंवा पुण्यक्षेत्राचें माहात्म्यानें त्यांस वैराग्य होऊन त्यांत हिंसा पुष्कळ अशा युद्धापासून निवृत्त झाले किंवा युद्धच करते झाले असें प्रश्नाचें तात्पर्य. संजय या संबोधनानें रागद्वेषादिकांचा उत्तम जय करणारा तूं आहेस यास्तव निष्कपट सांग असें सूचविलें. ॥ १ ॥

संजय उवाच ॥ ॥ दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ॥ आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

मूळचा अंध आणि कृपा लोकव्यवहार या नेत्रांनीं ही हीन यामुळें मोठा अंध आणि पुत्रस्नेहांत मग्न असा जो धृतराष्ट्र त्याचे प्रश्नाचें तात्पर्य समजून मोठा धार्मिक संजय उत्तर सांगतो असें वैशंपायन जन्मेजयास सांगतात. पांडवांस दृष्टभयाची शंकाच नाहीं. अर्जुनास मात्र अदृष्टभय उत्पन्न झालें, त्याचें भगवंतानें निवारण केलें, यासाठीं आपले पुत्र पांडवांस राज्य परत देतील ह्मणून खिन्न होऊं नको. असें राजास संतुष्ट करण्या करतां प्रथम दुर्योधनाचे दुष्टत्वाचेंच वर्णन करीत संजय बोलतो. राजा दुर्योधन त्या वेळेस व्यूहरचनेनें उभें राहिलेल्या पांडवांच्या सैन्यास पाहून धनुर्विद्या संप्रदाय प्रवर्तक जो द्रोणाचार्य त्याजवळ जाऊन ज्यांत भर्थ बहुत आहेत असें असून संक्षिप्त किंवा गूढ अशा वचनानें बोलता झाला. येणें

करून पांडव सैन्य पाहून दुर्योधन भय पावला असें सूचविलें. ॥ २॥

पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ॥ व्यूढां
द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३॥ ॥

अहो द्रोणाचार्य अथवा अहो पंडुपुत्रांचे आचार्य, बुद्धिमान् जो तुमचा शिष्य द्रुपदाचा पुत्र धृष्टद्युम्न, यानें व्यूहरचनेनें अधिष्ठिलेली अशी जी पांडवांची मोठी सेना ती पहा. द्रुपदपुत्र येणें करून पूर्वींचें वैराचें स्मरण दिलें, तुझा शिष्य येणें करून तुझे वधार्थ उत्पन्न झाला असतां ही तूं त्यास धनुर्विद्या शिकविली हें तुझें अज्ञान माझे अनर्थास कारण झालें असें सूचविलें. शत्रू पासून ही विद्या संपादिली हें त्याचें मोठें बुद्धिमत्व असें धीमता येणें करून सूचविलें. असे तुह्मीं अज्ञानी आहां आणि पांडवांचे आचार्य आहां, यामुळें त्यांचे सेनेस पाहून तुह्मांस आनंद होईल यास्तव तुह्माला ही सेना दाखवितों, असा मनांतील द्रोणाचार्यावरचा आपला द्वेष व्यक्त केला. अशीज्याची धर्मक्षेत्रीं जाऊन ही गुरूवर दुष्ट बुद्धि त्यास ताप कोठून असा भाव. ॥ ३॥

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ॥ युयु
धानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४॥ ॥

या पांडवांचे सेनेंत ज्यांचीं धनुष्यें मोठीं आहेत असे आणि युद्धा विषयीं अति प्रसिद्ध जे भीम आणि अर्जुन यां सारखे असे शूर आहेत ते कोणते ह्मणशील तर युयुधान, विराट आणि महारथ द्रुपद येणें करून एकटे द्रुपद पुत्रानें अधिष्ठिलेली सेना आमच्यांतील कोणी तरी एकादा जिंकील, तूं कां भितोस अशा शंकचें निवारण केलें.

धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ॥ पु
रुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५॥ ॥

तसाच धृष्टकेतु, चेकितान, बलवान् काशिराज, पुरुजित्, कुंतिभोज, आणि नरांमध्यें श्रेष्ठ असा शैब्य. ॥ ५॥

युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ॥
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६॥ ॥

पराक्रमी युधामन्यु, बलवान् उत्तमौजा, सुभद्रेचा पुत्र अभिमन्यु, आणि द्रौपदीचे पुत्र पांच, हे सर्व महारथी आहेत. च या शब्दानें याशिवाय पांडव घटोत्कचादिक ही महारथी आहेत असें सूचविलें. धर्मराजा पासून झालेला प्रतिविंध्य,

भीमसेना पासून झालेला सुतसोम, २ अर्जुना पासून झालेला श्रुतकीर्ति, ३ नकुला पासून झालेला शतानीक, ४ सहदेवा पासून झालेला श्रुतकर्मा, ५ हे द्रौपदीचे पांच पुत्र जाणावे. धनुष्य धारण करणाऱ्या अकरा हजार योद्ध्यां बरोबर जो एकटा युद्ध करील आणि शस्त्रास्त्रांत जो प्रवीण असेल त्याला महारथ असें ह्मणतात. असंख्य योध्यां बरोबर जो युद्ध करील त्यास अतिरथी असें ह्मणतात. एका बरोबर जो युद्ध करील त्यास रथी ह्मणतात. रथी पेक्षां जो न्यून त्यास अर्धरथी ह्मणतात. ॥ ६

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ॥
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान् ब्रवीमिते ॥ ७ ॥

हे ब्राह्मणश्रेष्ठा, द्रोणाचार्या, आमचे सेनेंत जे मोठे मोठे सेनेचे नायक ह्मणजे सरदार आहेत ते संज्ञार्थ ह्मणजे शत्रूंकडील प्रबल योद्धे पाहून तुमचा उत्साह भंग न व्हावा या साठीं आमचे ही सेनेंत मोठे मोठे महारथी योद्धे आहेत असें चांगलें समजण्या साठीं तुह्माला सांगतों. तें ऐका– येणें करून जर शत्रूंचें सैन्य पाहून भ्यालास तर त्यां बरोबर सामकर. युद्ध कां करतोस या शंकेचें निराकरण केलें आणि प्रिय शिष्य जे पांडव त्यांची सेना पाहून हर्षामुळें आपले कडील वीरांची तुला विस्मृति न व्हावी या साठीं मी बोलतों असें सूचविलें. ॥ ७ ॥

भवान् भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ॥
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैवच ॥ ८ ॥

तुह्मीं, भीष्म, कर्ण, तसाच युद्धांत जय पावणारा कृपाचार्य, अश्वत्थामा, माझा भ्राता विकर्ण, आणि तसाच सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा. आपले युद्ध कार्या विषयीं प्रवृत्ति व्हावी ह्मणून हे ब्राह्मण श्रेष्ठा अशी स्तुति केली. दोह्य पक्षीं तूं जरी पांडवांचे स्नेहानें युद्ध चांगलें केलें नाहीं किंवा ब्राह्मण तास्तव भिऊन पळालास तरी आमचेकडे भीष्मादिक क्षत्रिय मोठे मोठे योद्धे आहेत यास्तव मला भय नाहीं असें सूचविलें. ॥ ८ ॥

अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ॥ नाना-
शस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥

आणि माझे साठीं ज्यांनीं आपले प्राण टाकिले आहेत असे आणि नाना-प्रकारचीं शस्त्रें ह्मणजे छेद करणारीं खड्गादिक आणि प्रहरणें ह्मणजे केवळ प्रहार करणारीं गदादिक ज्यां पाशीं आहेत असे दुसरे ही शल्य कृतवर्मादिक पुष्कळ शूर आहेत. ते सर्व ही युद्ध करण्यांत कुशल आहेत. माझे साठीं ज्यांनीं प्राण टाकिले आहेत

येणें करून त्यांचा आपले ठायीं स्नेहातिशय, त्यांचें शौर्य व युद्धभक्ति आणि आ-
लें सैन्य पुष्कळ हीं सूचविलीं. ॥९॥

## अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ॥ प-
## र्याप्तंत्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥१०॥ ॥

भीष्म दोघांकडील पक्षपाती आहे यास्तव भीष्मानें रक्षिलेलें आमचें सै-
न्य, पांडवांचे सैन्यास जिंकण्या जोगें दिसत नाहीं. भीम पांडवांचाच पक्षपाती आहे
यास्तव भीमानें रक्षिलेलें पांडवांचें सैन्य आमचे सैन्यास जिंकण्या जोगें दिसतें. अ-
थवा आमचें सैन्य अकरा अक्षौहिणी आहे आणि ज्याचा महिमा प्रसिद्ध आहे अ-
शा भीष्मानें रक्षिलेलें आहे यास्तव तें पांडवांचे सैन्यानें वेढा घालावया जोगें नाहीं.
पांडवांचें सैन्य सात अक्षौहिणी आहे. आणि अति चंचल बुद्धि जो भीम. त्यानें रक्षि-
लेलें आहे यास्तव तें आमच्या सैन्यानें वेढा घालावया जोगें आहे अथवा ज्याचे ना-
शा साठीं पराक्रमी भीष्मानें रक्षण आह्मीं केलें तें पांडवांचें सैन्य आमचे जयार्थ अ-
समर्थ आहे आणि ज्याचे नाशा साठीं अति दुर्बल भीमानें रक्षण पांडवांनीं केलें तें आ-
मचें सैन्य पांडवांचे जयार्थ समर्थ आहे. ह्मणजे आमचाच जय आहे असा भाव. ॥१०॥

## अयनेषुचसर्वेषु यथाभागमवस्थिताः ॥ भीष्म
## मेवाभिरक्षंतु भवंतः सर्वएवहि ॥ ११॥

तुह्मी सर्वही व्यूह रचनेनें उभे राहिलेले सैन्यांत प्रवेश करावयाचे सर्व मार्गीं
आप आपले नेमलेले भागांत आपली जागा न सोडतां उभे राहून भीष्माचें रक्षण क-
रा. सेनापति चंचल झाला तर सर्व सेना व्याकुळ होईल. आणि तो स्थिर असला तर ती
स्थिर राहील. यास्तव सेनापतीचें रक्षण करा असा भाव. ॥११॥

## तस्य संजनयन् हर्षं कुरुवृद्धः पितामहः ॥ सिंह-
## नादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥ १२॥ ॥

पांडव सैन्य पाहून भय पावलेला आणि आचार्यास कपट बुद्धीनें शरण गे-
लेला जो दुर्योधन त्याची आतां ही आपणाशीं प्रतारणा आहे अशा बुद्धीनें द्रोणा-
चार्यांनीं त्याचा अनादर केला असें पाहून आणि आपलें बहुमानाचें वाक्य ऐकून
कुरूमध्यें वृद्ध आणि प्रतापी असा पितामह ह्मणजे भीष्म पूर्वीं विराट नगरींत -
ज्यांचा प्रताप पाहिला होता अशा पांडवांस पाहून दुर्योधनास भय न व्हावें या सा-
ठीं दुर्योधनास युद्धा विषयीं हर्ष उत्पन्न करीत मोठ्यानें सिंहनाद करून शंख वाज-
विता झाला. कुरुवृद्ध येणें करून आचार्य आणि दुर्योधन यांचे अभिप्रायानें ज्ञान

पितामह येणें करून उपेक्षा न करणें आणि प्रतापवान् येणें करून निर्भयता हीं सूचविलीं. ॥१२॥

**ततः शंखाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ॥ सहसैवाभ्यहन्यंत सशब्दस्तुमुलोऽभवत् ॥१३॥ ॥**

सेनापतीचा उत्साह पाहून शंख, भेरी म्हणजे नगारे, पणव, आनक आणि गोमुख या नांवांचीं वाद्यें सर्व सैन्यांत अकस्मात् वाजविलीं तेव्हां तो शब्द मोठा झाला. १३

**ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यंदने स्थितौ ॥ माधवः पांडवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥१४॥ ॥**

तदनंतर पांढरे घोडे जोडले आहेत अशा मोठे रथांत बसलेले लक्ष्मीपति श्रीकृष्ण आणि पंडूचा पुत्र अर्जुन हे दोघे दिव्य शंखांतें वाजविते झाले, येणें करून हे दोघे अग्नीनें दिलेले विजय रथांत बसले होते तेव्हां हे सर्वथा अजेय असें सूचविलें. १४

**पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ॥ पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥१५॥ ॥**

इंद्रियांचा प्रेरक कृष्ण, पांचजन्य या नांवाच्या शंखातें वाजविता झाला. शत्रूंचे धनास जिंकणारा अर्जुन देवदत्त या नांवाच्या शंखातें वाजविता झाला. हिडिंबादिक मारण्या सारखें भयंकर ज्याचें कर्म आहे असा भीमसेन पौंड्र या नांवाच्या मोठ्या शंखातें वाजविता झाला. ॥१५॥

**अनंतविजयं राजा कुंतीपुत्रो युधिष्ठिरः ॥ नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥१६॥ ॥**

कुंतीचा पुत्र युधिष्ठिर राजा अनंतविजय या नांवाच्या शंखातें वाजविता झाला. नकुल सुघोष या नांवाच्या शंखातें आणि सहदेव मणिपुष्पक या नांवाच्या शंखातें वाजविते झाले. शंखांचीं नांवें सांगितलीं येणें करून तुझे पुत्रांचे सैन्यांत अशा विख्यात नांवाचा एकही शंख नाहीं यास्तव पांडवांचा उत्कर्ष आहे असें सूचविलें. धनंजय या पदानें राजसूय यज्ञांत सर्व राजांस जिंकून अर्जुनानें धन आणिलें तेव्हां तो सर्वांस अजेय आहे असें सूचविलें, वृकोदर येणें करून भीमसेन पुष्कळ अन्नाचें पचन करणारा मोठा बलिष्ठ आहे असें सूचविलें, कुंतीपुत्र येणें करून धर्मराजा कुंतीनें मोठे तपानें यमधर्म राजाचें आराधन केल्यामुळें तीस प्राप्त झाला आहे आणि युधिष्ठिर येणें करून स्वतः राज-

स्तब्ध केल्यामुळें सुरव्यराजा असें रूचविलें. ॥१६॥

**काश्यश्च परमेष्वासः शिखंडीच महारथः ॥ धृ-
ष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥१७**

मोठें ज्याचें धनुष्य आहे असा काश्यराजा तसाच महारथी शिखंडी तसाच धृष्टद्युम्न, विराट आणि पराजय न पावलेला सात्यकि. ॥१७॥

**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ॥ सौभ-
द्रश्च महाबाहुः शंखान् दध्मुः पृथक् पृथक् ॥१८**

द्रुपद आणि द्रौपदीचे पांच पुत्र, प्रतिविंध्यादिक आणि मोठे ज्यांचे बाहू आहेत असा सुभद्रेचा पुत्र अभिमन्यु हे सर्वही, हे पृथ्वीपते धृतराष्ट्रा, निरनिराळ्या शंखांनें वाजविते झाले. ॥१८॥

**सघोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ॥ न-
भश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९॥**

कौरवांचे सैन्यांत झालेला शंखध्वनि मोठा असतां ही पांडवांस भय करणारा झाला नाहीं. पांडवांचे सैन्यांत झालेला जो शंखांचा मोठा नाद तो मात्र आकाश आणि पृथ्वी यांनें नादयुक्त करीत धृतराष्ट्राचे पुत्रांच्या हृदयांनें दुभागता झाला. ॥१९॥

**अथ व्यवस्थितान् दृष्ट्वा धार्तराष्ट्रान् कपिध्वजः ॥
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥२०॥**

कौरवांस भय झालें असें सांगून पांडवांस तें झालें नाहीं असें सांगतो. तदनंतर हनूमान् ज्याच्या ध्वजावर आहे असा पांडव म्हणजे अर्जुन उभे राहिले त्या धृतराष्ट्राच्या पुत्रांतें पाहून शस्त्रांस्त्रें टाकण्याचा समय प्राप्त झाला त्या समयीं धनुष्य उचलून. ॥२०॥

**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ॥ ॥अ-
र्जुनउवाच ॥ ॥ सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थाप
य मेऽच्युत ॥ २१॥**

हे महीपते धृतराष्ट्रा, सर्वांची अंतःकरण वृत्ति जाणणारा जो कृष्ण त्यास त्या समयीं वक्ष्यमाण वाक्य बोलता झाला. कृष्णाचा विचार घेतल्याशिवाय अर्जु-

नानें त्यानः कांहीं केलें नाहीं येणें करून त्याची नीति आणि धर्म यांविषयीं कौशल्य सांगून तूं विचार केल्यावांचून पांडवांचें राज्य घेतलें यामुळें तुझे गांठीं नीति आणि धर्म हे नाहींत याकारणामुळें तुला जय नाहीं. असें महीपते यासंबोधनानें सूचविलें. राजास धर्म आणि नीति अवश्य पाहिजेत, अर्जुन बोलतो हे अच्युता, दोन्हीं सेनांचे मध्यें माझा रथ उभाकर. सर्वेश्वर भगवंतास अर्जुन अशी आज्ञा करतो येणेंकरून-भगवद्भक्तांस काय दुर्लभ आहे, भगवान ही त्यांचे आज्ञेंत राहतो यास्तव पांडवांचा-जय निश्चित आहे असें सूचविलें. आणि अच्युत या संबोधनानें निर्विकार जो तूं यास शत्रु मारतील असें भयच नाहीं असें सूचविलें. ॥२१॥

**यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ॥**
**कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥**

या युद्ध प्रसंगीं युद्ध करण्याचे इच्छेनें उभे राहिलेल्यां मध्यें माझे बरोबर कोणी युद्ध करावें आणि मी कोणाबरोबर युद्ध करावें असें जों पर्यंत मी पाहतों तों पर्यंत रथ उभाकर असा पूर्वश्लोकाशीं संबंध. ॥२२॥

**योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ॥ धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रिय चिकीर्षवः ॥ २३ ॥ ॥**

मी, दुष्टबुद्धि असा जो धृतराष्ट्राचा पुत्र दुर्योधन याचें हित करावें असें इच्छिणारे आणि सामन करतां युद्धच करावें अशी ज्यांची इच्छा आहे असे जे-भीष्मादिक योद्धे यास्थलीं आले आहेत त्यांस पाहतों. ॥२३॥

**संजयउवाच ॥ ॥ एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ॥ सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥ भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ॥ उवाच पार्थ पश्यैतान समवेतान् कुरूनिति ॥ २५ ॥**

या प्रमाणें अर्जुनानें सांगितल्यावर भगवान् अहिंसा धर्माचा आश्रय करून अर्जुनाकडून युद्ध करविणार नाहीं असा धृतराष्ट्रास भ्रम नव्हावा याविषयीं संजय बोलतो. हे भरतकुलोत्पन्ना धृतराष्ट्रा, निद्रेचा नाश करणारा यामुळें सर्वदा सावध जो अर्जुन त्याणें ज्यास सांगितलें आहे असा जो कृष्ण तो दोन्ही सेनांच्या मध्यभागीं आणि भीष्म द्रोणांचे आणि सर्व राजांचे सम्मुख अग्निदत्त आणि आप-

ण भगवान् त्याजवर सारथी असा श्रेष्ठ रथ उभाकरून हे पार्था ह्मणजे अर्जुना, एकत्र मिळालेल्या कुरूंनें पहा असें बोलता झाला. भरत या संबोधनानें भरत वंशाचे मर्यादे कडे पाहून ज्ञानीचा द्रोह करूंनको असें सूचविलें. ॥ २४ – २५ ॥

**तत्रापश्यत् स्थितान् पार्थः पितॄनथ पितामहान् ॥ आचार्यान् मातुलान् भ्रातॄन् पुत्रान् पौत्रान् सखींस्तथा ॥ २६ ॥**

पृथा जी कुंती तिचा पुत्र अर्जुन त्या संग्रामांत दोन्ही सैन्यांत उभे राहिलेले पिते ह्मणजे भूरिश्रवादिकचुलते, पितामह ह्मणजे भीष्मादिक, आचार्य ह्मणजे द्रोण कृपादिक गुरु, मातुल ह्मणजे शल्यादिक, भ्राते ह्मणजे दुर्योधनादिक, पुत्र ह्मणजे लक्ष्मणादिक, पौत्र ह्मणजे लक्ष्मणादिकांचे पुत्र, सखे ह्मणजे अश्वत्थामादिक, मित्र, यांनें पाहता झाला. ॥ २६ ॥

**श्वशुरान् सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ॥ तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान् बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥**

तसेच दोन्ही सैन्यांत उभे राहिलेले श्वशुर ह्मणजे पांड्यादिक, सुहृद् ह्मणजे आपणावर उपकार केलेले कृतवर्मादिक, यांनें पाहता झाला. युद्धांत हिंसा करणं हा क्षत्रियांचा धर्म आहे अशा ज्ञानाचा प्रतिबंध करणारी जी हिंसा, मोठा अधर्म अशी विपरीत बुद्धि जीस मोह ह्मणतात तिणें करून झालेला जो ममता लक्षण स्नेह तत्कृत चित्ताची विकलता होणें एतद्रूप जो शोक तेणें करून ज्यानें विवेक ज्ञान नष्ट झालें आहे अशा अर्जुनास पूर्वी आरंभिलेले युद्धरूप स्वधर्मा पासून उपरम व्हावा अशी मोठा अनर्थ करणारी इच्छा झाली आणि तशीच त्याची प्रवृत्ति झाली असें दाखवितात. तो कुंतीचा पुत्र अर्जुन उभे राहिलेल्या त्या सर्व बंधूंतें पाहून. ॥ २७ ॥

**कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ॥ ॥ अर्जुन उवाच ॥ ॥ दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥**

मोठ्या कृपेनें ह्मणजे स्वजनांहि कथं हत्वा – येणें करून दाखविला जो स्नेह – तेणंकरून व्याप्त होऊन आणि खेद पावून हें बोलता झाला. अर्जुन बोलतो हे कृष्णा, युद्धाचे इच्छेनें उभा राहिलेल्या या स्वजनांनें पाहून. ॥ २८ ॥

**सीदंति मम गात्राणि मुखंच परिशुष्यति ॥ वेप-**

शुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥ ॥

माझीं हस्त पादादिक गात्रें सीदंति- ह्मणजे निश्चेष्ट होतात किंवा व्यथा पावतात, मुख शुष्क होतें, माझ्या शरीरास कंप सुटतो. आणि रोमांच उभे राहतात. ॥२९

गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ॥ न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥

हातांतून गांडीव धनुष्य गळतें, त्वचेचा दाह होतो, या मुळें बसण्यास-किंवा उभा राहण्यास मी समर्थ नाहीं. आणि माझें मन भ्रमण पावल्या प्रमाणें होत आहे, गांडीव गळण्यानें अधैर्य रूप दुर्बलत्व आणि त्वचेचे दाहानें अंतः संताप हीं सूचविलीं. ॥३०॥

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ॥ न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजन माहवे ॥ ३१ ॥

आणि हे केशवा, पुढें लोकक्षय रूप अशुभ होणार आहे असें सूचविणारीं निमित्तें ह्मणजे भूमिकंपादिक अपशकुन यांनं मी पाहतों आणि युद्धांत स्वजनांस मारून कल्याण होईल असें मला वाटत नाहीं. क ह्मणजे ब्रह्मा, ईश ह्मणजे रुद्र यांप्रत दया करण्यास हे पात्र आहेत असें पाहणारा असा केशव पदाचा अर्थ आहे यामुळें माझ्या शोकाचा परिहार करण्यास तुला सामर्थ्य आहे असें केशव पदानें सूचविलें. ॥३१॥

न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ॥ -
किंनो राज्येन गोविंद किं भोगै र्जीवितेन वा ॥ ३२ ॥

हे कृष्णा, मी जयाची इच्छा करीत नाहीं तशीच राज्याची आणि सुखाचीही इच्छा करीत नाहीं. हे गोविंदा, राज्य करून अथवा भोग करून अथवा जगून आह्मांस काय करावयाचें आहे, स्वजन दर्शन तुला आणि मला तुल्य असलें तरीं मी आत्मवेत्ता नाहीं यामुळें शोका पासून होणाऱ्या दुःखातें मी अनुभवितों. तूं सदानंद रूप आहेस यामुळें तुला शोक संबंधच नाहीं असें कृष्ण पदें करून सूचविलें. सकळ इंद्रियांचा अधिष्ठाता असा गोविंद शब्दाचा अर्थ आहे. यामुळें मला ऐहिक राज्यादिका विषयीं विरक्ति आहे किंवा नाहीं हें तूं जाणतो सच आहेस असें-गोविंद पदानें सूचविलें. ॥३२॥

येषामर्थे कांक्षितंनो राज्यं भोगाः सुखानिच ॥
न इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानिच ॥ ३३

ज्यां साठीं आह्मांस राज्यसुख आणि भोग पाहिजेत ते हे प्राण आणि धन यांचा त्याग करून युद्धास उभे आहेत. ॥ ३३ ॥

आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ॥
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४

ते कोण ह्मणाल तर आचार्य ह्मणजे गुरु, पिते ह्मणजे चुलते, पुत्र ह्मणजे दुर्योधनादिकांचे पुत्र नसेच पितामह ह्मणजे भीष्मादिक, मातुल म्हणजे शल्यादिक, श्वशुर ह्मणजे पांड्यादिक सासरे, नातु म्हणजे दुर्योधन पुत्रांचे पुत्र, मेहुणे आणि तसेच इतर संबंधी. ॥ ३४ ॥

एतान्नहंतुमिच्छामि घ्नतोपि मधुसूदन ॥ अपि
त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किंनु महीकृते ॥ ३५ ॥ ॥

हे मधुदैत्यास मारणाऱ्या कृष्णा, आह्मांस मारणारे जे हे यांस त्रैलोक्याचे राज्याचे हेतूनें मारण्यास मी इच्छित नाहीं. मग पृथ्वीचे राज्या करितां मारण्यास कोठून इच्छीन, मारण्यास इच्छीत ही नाहीं येणें करून मारणें दूरच राहिलें असें सूचविलें. ॥ ३५ ॥

निहत्य धार्तराष्ट्रान्नः काप्रीतिः स्याज्जनार्दन ॥
पापमेवाश्रयेदस्मान् हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥

आचार्यादिकांस न मारतां तुह्मांस ज्यांनीं फार दुःख दिलें आहे अशा दुर्योधनादिकांस मार, त्यांचे मरणानें तुला सुख होईल. असें जर कृष्ण ह्मणेल तर त्या विषयीं बोलतो. हे जनार्दना, धृतराष्ट्राचे पुत्रांस मारून आह्मांस काय सुख होईल. क्षणिक सुखलोभानें चिरकाल नरकप्रद जो बंधुवध तो आह्मांस अयोग्य आहे असा भाव. अग्नीनें आपणास जाळणारा, १ आपणास विषदेणारा. २ आपणास मारण्याकरितां हातीं शस्त्र घेऊन आलेला, ३ आपले द्रव्याचें हरण करणारा, ४ आणि आपलें क्षेत्र ह्मणजे शेत घर इत्यादिक यांचें हरण करणारा. ५ आणि बायकोचें हरण करणारा, ६ या साहांस आततायी ह्मणावें. आततायी जरी वेदांतपारग असला तरी विचार न करतां त्यास मारावें असें शास्त्रांत सांगितलें आहे. तेव्हां याचा वध करणें हें योग्यच आहे. कारण सांगितलेलीं आततायीचीं सर्वही लक्षणें यांचे ठायीं आहेत.

असें नर कृष्णा ह्मणशील नर आततायीस मारावें हें अर्थशास्त्र आहे आणि गुर्वादिकांस मारूं नये हें धर्मशास्त्र आहे आणि अर्थशास्त्रापेक्षां धर्मशास्त्र प्रबल आहे, असें शास्त्रांत याज्ञवल्क्यादिकांनीं सांगितलें आहे. यास्तव जरी हे आततायी आहेत तथापि यांस मारून आह्मांस पापच लागेल. ॥ ३६ ॥

**तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान् स्वबांधवान् ॥**
**स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम मांधव ॥ ३७ ॥**

या कारणास्तव आपले बांधव जे धृतराष्ट्राचे पुत्र यांस मारण्याविषयीं आह्मीं योग्य नाहीं. हे माधवा, स्वजनांस मारून आह्मी कसे बरें सुखी होऊं? ॥ ३७

**यद्यप्येते न पश्यंति लोभोपहत चेतसः ॥ कुल**
**क्षय कृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥ ॥**

राज्य लोभामुळें ज्यांचें चित्त विवेकरहित झालें आहे असे हे जरी कुलक्षय झाल्यामुळें होणार जो दोष याचें आणि मित्रद्रोहामुळें होणार जें पातक याचें पाहत नाहींत. ॥ ३८ ॥

**कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ॥**
**कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥ ॥**

युद्धार्थ किंवा द्यूतार्थ कोणी बोलाविलें असतां त्यापासून क्षत्रियांनीं निवृत्त होऊं नये. क्षत्रियांचा विजित ह्मणजे शत्रूस मारून जयमिळवणें हा धर्म आहे. अशा अर्थाच्या स्मृती वरून क्षत्रियांनीं युद्धापासून निवृत्त नहोतां विजयासाठीं शत्रूंची हिंसा करण्यास प्रवृत्त व्हावें असें विहित असतां युद्धापासून निवृत्ति विषयीं तूं इच्छा कशी करतोस असें ह्मणेल तर त्याविषयीं बोलतो. तथापि हे जनार्दना, कुलक्षयामुळें होणाऱ्या दोषानें पाहणारे असे जे आह्मी यांनीं या पापापासून निवृत्त होण्यास कसें न जाणावें. तात्पर्य— ज्याप्रमाणें यज्ञ प्रकरणीं उदुंबराची शाखा वस्त्रानें सर्व आच्छादून सामगान करावें अशी स्मृति आहे ती तें वस्त्र शंवर्दी ऋत्विजांस मिळावयाचें या लोभामुळें आहे आणि यास्तव ती, उदुंबर शाखेस स्पर्श करून सामगान करावें अशा दुसरे विरुद्ध स्मृतीनें बाधित होते. त्याप्रमाणें सांगितलेल्या स्मृति लोभमूलक आहेत. यामुळें त्याचा कुलक्षय केल्यानंतर पाप होतें इत्यादिक ज्या विरुद्ध स्मृति आहेत त्यांहीं करून बाधित होतात. केवळ श्रुति स्मृतींत विधि आहेत इतक्याकरतांच अनुष्ठान करावें असें नाहीं. ज्या विधीचें अनुष्ठान केलें असतां नरकप्रद पाप होत नाहीं त्याविधीनेंच अनुष्ठान केलें पाहिजे. नाहींतर जारण मारणादिक ज्याम ह्मण-

तात अशा श्येन यागादिक व्यभिचार कर्मांचेहि विधि वेदांत आहेत ह्मणून त्यांचें ही सर्वांनीं अनुष्ठान करावें असें होईल. उदुंबर शाखेचें वस्त्रानें वेष्टन करावें तर तीचा स्पर्श संभवत नाहीं. स्पर्श करावा तर तीचें सर्व वेष्टन संभवत नाहीं. असा त्यांचा विरोध आहे त्याप्रमाणें येथें ही विरोध आहे. ॥ ३९ ॥

**कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः ॥ धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥**

कुलक्षय झाला असतां धर्म सांगणारे वृद्ध नसल्यामुळें अनादि परंपरेनें चालत आलेले कुलधर्म नाश पावतात. धर्म नाश पावले असतां अवशिष्ट राहिलेले बालादिरूप सर्व कुलास अधर्म व्यापतो.

**अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ॥ स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥**

हे कृष्णा, अधर्माच्या व्याप्तीनें कुलस्त्रिया व्यभिचारादि दोषानें युक्त होतात. हे यादवकुलोत्पन्ना कृष्णा, स्त्रिया दोषयुक्त झाल्या असतां ह्मणजे अपत्यार्थ दुसरे वर्णाशीं मैथुनार्थ गेल्या असतां वर्ण संकर होतो. ४१

**संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ॥ पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥**

आणि तो वर्णसंकर, कुलक्षय करणाऱ्यांच्या कुलास नरककारक खचित होतो. असें आहे तर परशुरामानें सर्व क्षत्रिय मारल्यानंतर त्यांच्या स्त्रियांनीं ब्राह्मणापासून पुनः पुनः पुत्र उत्पन्न करून घेऊन आपली वंशवृद्धि केली आणि धृतराष्ट्रादिक ही पुत्र असेच उत्पन्न करून वंश वृद्धि केली आहे, असें पुराणांत लिहिलें आहे तें कसें असें ह्मणाल तर त्याविषयीं बोलतो. कारण कुलक्षय झाल्यानें पितरांस श्राद्ध तर्पणादिक न मिळाल्यामुळें ते पतन पावतात. तात्पर्य— अन्यायानें उत्पन्न झालेलें अपत्य आपलें नव्हे. अन्योदर्य आपला पुत्र असें मनांत ही आणूंनये, असें यास्कादिकांनीं सांगितलें आहे. आणि अशीं वेदांत पुष्कळ उदाहरणें आहेत. यास्तव जो बीजप्रद पिता त्यासच पिंड तर्पणादिक मिळतें. क्षेत्रज पुत्राविषयींची स्मृति इहलोकीं वंशवृद्धि व्हावी या प्रयोजनाविषयींची आहे, परलोकीं श्राद्ध तर्पणादिक मिळतें याविषयींची नाहीं. ४२

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ॥ उत्सा-**

घ्नंतेजातिधर्माः कुलधर्माश्चशाश्वताः॥ ४३॥ ॥

वर्ण संकर करणारे असे जे सांगितलेले कुलक्षय करणारांचे दोष त्यापासून अनादि परंपरेनें चालत आलेले जे वर्णधर्म तसेंच कुलधर्म आणि आश्रमधर्म ते उच्छेदाने पावतात. ॥४३॥

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ॥ नरकेनियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥४४॥ ॥

हे जनार्दना, ज्यांचे वर्ण, आश्रम आणि कुल यांचे धर्म उच्छिन्न झाले आहेत त्या मनुष्यांस प्रेतत्वनिवृत्तीस कारण जें श्राद्ध तर्पणादिक तें नसल्यामुळें निरंतर नरकवास होतो. असें आम्हीं ऐकतों. ॥४४॥

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ॥ यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः॥ ४५ ॥ ॥

राज्यसुखाचे लोभानें आपल्या संबंध्यांला मारण्यास आम्हीं तयार झालों हें आम्ही शिव! शिव! केवढें हो मोठें पाप करण्यास सिद्ध झालों! बंधुवध करावा या उद्देशानें युद्धाचा उद्योग करणें हें ही पापजनक आहे, मग युद्ध पापजनक आहे हें काय सांगावें! मी मोठ्या आवेशानें युद्ध करण्यास आलों हें मी अविचारानें औद्धत्य (उद्धटपणा) केलें असें तात्पर्य. ॥४५॥

यदिमामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ॥ धार्तराष्ट्रारणेहन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६॥ ॥

शस्त्रें ज्यांचे हातांत आहेत असे हे धृतराष्ट्राचे पुत्र, शस्त्र ज्या पाशीं नाहीं आणि दुसऱ्याचे शस्त्राचें निवारण न करणारा असा जो मी यानें जर युद्धांत मारतील तर तें मला कल्याण कारक होईल. प्राण्यांची हिंसा न करणें हा धर्म स्वप्राणरक्षणा पेक्षां श्रेष्ठ आहे. यास्तव बंधुवधा विषयीं मी निश्चय केल्यामुळें जें पाप मला झालें असेल त्यास दुसरें प्रायश्चित्त नाहीं. यास्तव मरणांतच मला प्रायश्चित्त श्रेयस्कर आहे असें तात्पर्य. ॥ ४६॥

संजयउवाच॥ ॥ एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ॥ विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः॥ ४७॥ ॥ओंतत्सदिति श्रीमद्भग

वद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे - श्रीकृष्णार्जुन संवादे अर्जुनविषादयोगोनाम प्रथमोध्यायः ॥१॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥

संजय बोलतो - शोकामुळें ज्याचें अंतःकरण उद्विग्न झालें आहे असा अर्जुन, असें बोलून युद्धांमध्यें बाणांसह धनुष्य टाकून रथाचे मध्यभागीं बसता-झाला. ॥४७॥ ॥इतिश्रीमद्भगवद्गीतायाः पर्वते इत्युप नामक रघुनाथ शास्त्रिकृत भाषाविवृत्तौ प्रथमो ध्यायः ॥१॥

अध्याय २रा.

संजयउवाच॥ ॥तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम्॥ विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः॥१॥

अर्जुन युद्धापासून निरत्न झाला तेव्हां माझे पुत्र आतां निष्कंटक राज्यानुभव येतील अशी धृतराष्ट्रास आशा न व्हावी या हेतूनें संजय बोलतो. कृपेंकरून म्हणजे स्नेहें करून व्याप्त झालेला आणि अश्रूनीं ज्याचे डोळे भरून आले आहेतआणि खेद करीत आहे अशा अर्जुनानें मधुसूदन ह्मणजे कृष्ण हें पुढील वाक्य बोलता झाला. मधुसूदन पदानें दुष्ट दैत्य मारणारा भगवान् अर्जुनास निमित्त मात्र करून तुझ्या दुष्टपुत्रांस मारील, तूं त्यांस राज्य मिळण्याची आशा व्यर्थ करूंनको असें सूचविलें.॥१॥

श्रीभगवानुवाच॥ ॥कुतस्त्वा कश्मलमिदं विषमेसमुपस्थितम्॥ अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन॥२॥ ॥ ॥ ॥ ॥

श्रीकृष्ण भगवान् बोलतात. हे अर्जुना, नीच जनांनीं आचरिलेलें नसेंच स्वर्ग न देणारें आणि अकीर्ति करणारें असें बुद्धिमालिन्य अथवा मोह तुला संग्रामाविषयीं कोठून प्राप्त झाला. ॥२॥

क्लैब्यं मा स्म गमःपार्थ नैतत्त्वय्युपपद्यते॥क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठपरंतप॥३॥ ॥

हे पार्था अर्जुना, तूं नपुंसकत्वातें किंवा मी वसण्यास समर्थ नाहीं अशा निर्वीर्यत्वातें पावूं नको. हें नपुंसकत्व महादेवा बरोबर युद्ध करणारा जो तूं या तुला योग्य -

नाहीं. हे शत्रूस तापदेणाऱ्या अर्जुना, हलकें असें हें मनाचें दुर्बलत्व ह्मणजे भीति ईस टाकून युद्धास उभा रहा. ॥३॥

**अर्जुनउवाच ॥ ॥ कथं भीष्ममहं संख्ये द्रोणंच मधुसूदन ॥ इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरि सूदन ॥ ४ ॥**

अर्जुन बोलतो. हे शत्रूस मारणाऱ्या मधुसूदना कृष्णा, पूजा करण्यास योग्य अशा भीष्माशीं आणि द्रोणाशीं बाणानीं मी कसें युद्ध करूं, युद्ध करीन असें नुसतें वाणीनें बोलणें हीं अयोग्य आहे मग बाणांनीं युद्ध कसें करूं असा भावं. ॥४॥

**गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्य मपीह लोके ॥ हत्वाऽर्थकामांस्तु गुरूनिहैव भुंजीय भोगान् रुधिरप्रदिग्धान् ॥ ५॥ ॥**

मोठा ज्यांचा प्रभाव आहे असे अथवा हि हें पद निराळें न करून हि मह ह्मणजे शैत्याचें किंवा त्याच्याचें निवारण करणार अग्नि किंवा सूर्य त्याचें प्रमाणें अनुभाव ह्मणजे प्रभाव ज्यांचा आहे असे किंवा श्रुत, अध्ययन, तप, आचार आणि ज्ञान यामुळें पापाचा संबंध आपणास होऊं नये असा प्रभाव ज्यांचा आहे असे. येणेंकरून अन्याय मार्गानें ज्यांनीं राज्य घेतलें त्यांचा अनुसार यानीं केला या दोषानें त्यांचा त्याग करावा. अशा शंकेचें निवारण केलें. जे द्रोणादिक गुरू त्यांस न मारतां या लोकीं भिक्षेनें जें मिळेल त्याचा भोग करण्यांत ही कल्याण आहे आणि अर्थाची इच्छा त्यांस आहे अशा द्रोणादिक गुरूंस मारलें तर रक्तानें भिजलेल्या प्रमाणें निंदित जे भोग म्हणजे विषय त्यांस इहलोकींच मी भोगीन. ॥५॥

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ॥ यानेव हत्वा न जिजीविषाम स्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥ ॥**

आतां पूजार्ह गुरूंस न मारतां दुर्योधनादिकांसच जर मारावें तर गुरू अर्थकाम आहेत, ते अर्थासाठीं दुर्योधना विषयीं युद्ध करतील; तेव्हां दुर्योधनास मारणें तर त्यांस पूर्वी मारलें पाहिजे यास्तव गुरूंस मारावें किंवा न मारावें या दोहों गोष्टी मध्ये कोणतें चांगलें आहे हें आम्हांस समजत नाहीं. आणि इहलोकीं राज्यादिकांचा उपभोग करण्यांतच सुख आहे असें मानून गुरूंस मारणें या अधर्माचा अंगीकार करून अथवा भिक्षाशन क्षत्रियांस निषिद्ध आहे, युद्ध करणें हाच क्षत्रियांचा धर्म आहे,

असें मानून यां बरोबर युद्ध जरी केलें तरी आह्मीं यांस जिंकूं अथवा हे आम्हास जिंकितील, हें ही आह्मास समजत नाहीं आणि ज्यांस मारून आह्मीं जगण्याची इच्छा करीत नाहीं तेच धृतराष्ट्राचे पुत्र समोर उभे आहेत तेव्हां त्यांस मारून जरी आह्मास जय मिळाला तरी आमचा मनोरथ सिद्ध होत नाहीं. ॥ ६॥

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ॥ यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७॥ ॥**

यांस मारून आम्ही कशी जगण्याची इच्छा करूं अशी कृपणता आणि कुलक्षया मुळें होणार जो दोष तो, या दोहों मुळें ज्याचा शौर्यादि लक्षण क्षत्रिय स्वभाव नाश पावला आहे असा आणि युद्धाचा त्याग करून भिक्षाटन करणें हा क्षत्रियांचा धर्म आहे किंवा अधर्म आहे या विषयीं संशय युक्त आहे चित्त ज्याचें असा मी तुला पुसतों. जें माझें कल्याण करणारें असेल तें संशय न होण्या जोगें बोल ह्मणजे सांग. मी तुझा शिष्य आहें तुला शरण आलेला जो मी यातें शिक्षा कर म्हणजे धर्म तत्त्वाचा उपदेश कर. येणेंकरून द्रोण भीष्मादिकांस मारण्या पेक्षां भिक्षाटनन्न श्रेयस्कर आहे. असें अर्जुनाच्या बोलण्यानें पूर्वोक्त साधन संपत्ति झाल्यावर विविदिषा संन्यास करावा असें सूचवून नंतर आत्म ज्ञानार्थ ब्रह्मवेत्ता जो गुरु त्यास शरण जावें अशी जी श्रुतीनें गुरुरूपसत्ति सांगितली आहे ती सूचविली. ॥ ७॥

**न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ॥ अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८॥ ॥**

तूंचे आपले मनांत विचार करून जें योग्य वाटेल तें कर. अथवा हृदय दौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप येणें करून युद्धच तुला कल्याण कारक आहे, असें तुला मी सांगितलेंच आहे. आतां कां पुनः पुनः पुसतोस असें जर कृष्ण ह्मणेल तर अर्जुन बोलतो. त्यांत शत्रू नाहींत आणि संपत्तीनें भरलेलें असें पृथ्वीचे ठायीं जें राज्य तें मिळालें तरी तसेंच देवांचेंहि आधिपत्य मिळालें तरी इंद्रियांस शुष्क करणारा असा माझा शोक तो नाहींसा करील असें वस्तु कोणतेंही मला दिसत नाहीं. तात्पर्य— बंधूंचे नाशानें होणारा जो शोक तो राज्य लाभ किंवा स्वर्गाचे आधिपत्याचा लाभ झाला तरी त्यानें निवृत्त होणार नाहीं यास्तव युद्धाशिवाय दुसरा निवृत्ति मार्गांतील उपाय असेल तो सांग. असा अर्जुनाचे बोलण्याचा भाव. या अर्जुनाचे बोलण्या वरून ब्रह्मविद्येचा अधिकार प्राप्त होण्यास भिक्षावृत्ति आणि या लोकचे किंवा स्वर्गलोकचे भोगांवि-

यीं वैराग्य हीं पाहिजेत असें सूचविलें. पूर्वींच्या ग्रंथांत ही ॥ नचश्रेयो नुपश्यामि॥ येणें करून मोक्षच श्रेय इतर श्रेय नव्हे असें सांगून तेणें करून नित्यानित्य वस्तु विवेक – नकांक्षे विजयं कृष्ण – येणें करून ऐहिक भोगाविषयीं वैराग्य –अपि त्रैलोक्य राज्यस्य – येणें करून आमुष्मिक भोगाविषयीं वैराग्य – नरके नियतं वासः – येणें करून आत्मा स्थूल देहाहून भिन्न आहे, किंनो राज्येन गोविंद- येणें करून शम – किं भोगैः – येणें करून दम, यद्धणेन नपश्यंति – येणें करून निर्लोभत्व, – न मे क्षेम तरं भवेत – येणें करून तितिक्षा हीं साधनें सूचविलीं आहेत. ॥८॥

संजय उवाच ॥ ॥ एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ॥ न योत्स्य इति गोविंद मुक्त्वा तूष्णीं बभूवह ॥ ९॥

संजय बोलतो, हे शत्रूंस संताप देणाऱ्या धृतराष्ट्रा, निद्रेचा जय करणारा अर्जुन, इंद्रियांचा प्रेरक जो गोविंद म्हणजे कृष्ण, त्यास असें बोलून आणि मी युद्ध करीत नाहीं असें बोलून उगाच राहिला. ॥९॥

तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ॥ सेनयो रुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १०॥ ॥

या प्रमाणें अर्जुनानें युद्धाची उपेक्षा केली तेव्हां भगवंतानें ही उपेक्षा केली असेल असें कदाचित धृतराष्ट्रास वाटेल म्हणून त्याची निवृत्ति करण्या करतां संजय बोलतो. हे भारता धृतराष्ट्रा, हृषीकेश म्हणजे कृष्ण दोन्हीं सेनांच्या मध्यभागीं खेद पावणार जो अर्जुन त्यास प्रहसन् म्हणजे प्रसन्न वदन होऊन अथवा हा मूढ असतां ही ज्ञान्या सारखा बोलतो म्हणून हसत या पुढील वाक्यानें बोलता झाला. ॥१०॥

श्रीभगवानुवाच ॥ ॥ अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ॥ गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥११॥

देह असंग, अद्वितीय आणि सच्चिदानंद स्वरूप अशा आत्म्याहून भिन्न आहे असें विवेक ज्ञान यास नाहीं आणि युद्ध हा स्वधर्म असतां ही त्यांत हिंसा पुष्कळ आहे यामुळें हा अधर्म आहे असा भ्रम होऊन हा शोक मोहानें पावला आहे म्हणून यास विवेक आणि धर्म हे सांगावे. या अभिप्रायानें श्रीकृष्ण भगवान बोलतात. तूं शोक करण्यास अयोग्य जे भीष्मादिक त्यांचा शोक करतोस. तात्पर्य– भीष्माला मीं कसा मारूं असा जो तूं शोक करतोस हा शोक ज्या शरीरास भीष्म असें नांव आहे.

त्या विषयीं करतोस किंवा त्या शरीरांत माझें हें शरीर असा अभिमान धरून जो सुख दुःखानुभव करतो आणि देहनाशानें ज्याचा नाश होत नाहीं असा जो आत्मा त्या विषयीं करतोस. शरीराचा त्याग करून आत्मा परलोकस्थ झाला ह्मणजे शरीराचा तात्काळ दाह करतात किंवा भूमीत पुरतात तेव्हां शरीरावर कोणाचीच ममता नाहीं यास्तव शरीर शोक करण्यास पात्र नाहीं. आत्म्याचा तर नाश होतच नाहीं असें पुढें स्पष्ट सांगणार यावरून आत्माही देह मरण पावल्यामुळें होणार जो शोक त्यास पात्र नाहीं. हें तुला न समजून शोक करतोस असें ह्मणावें तर देहाहून निराळा आत्मा परलोकीं जाणारा आहे अशा ज्ञानवंता सारख्या—पतंति पितरो ह्येषां—नरके नियतं वासो—इत्यादि गोष्टी बोलतोस तेव्हां यावरून तुला देहात्म विवेकरूप ज्ञान नाहीं असें उघड दिसतें. कारण ज्ञानी ह्मणजे विवेकी आहेत ते गतप्राण ह्मणजे मरण पावलेले अथवा जिवंत असे जे बांधवादिकांचे देह यांचा शोक, वर तात्पर्यात लिहिलेल्या कारणानें करीत नाहींत. समाधिकालीं ज्ञान्यास देहादिकांचा अनुभवच नाहीं व्युत्थान कालीं अनुभव असला तरी ते मिथ्याच आहेत असा निश्चय झाल्यामुळें जसा स्वप्नांतील बांधव मिथ्या अशा निश्चयानें त्यांचा नाश झाला असतां शोक करीत नाहींत तसा बांधव नाशानें शोक करीत नाहींत. ॥११॥

## न त्वेवाहं जातु नासं न त्वं नमे जनाधिपाः॥ न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम्॥१२॥ ॥

शोक नकरण्यास कारण सांगतात. मी परमेश्वर यापूर्वी कधीं नाहीं असें नाहीं म्हणजे लीलेनें धारण केलेलीं जीं अवतार रूपी राम कृष्णादि शरीरें तीं प्रगट झाल्यामुळें अथवा गुप्त झाल्यामुळें मी पूर्वी कधीं नाहीं असें नाहीं. मी सच्चिदानंद रूप अनादि स्वरूपानें पूर्वी आहेच. तसाच तूंही पूर्वी कधीं नाहींस असें नाहीं. तसेंच हे सर्व राजे पूर्वी कधीं नाहींत असें नाहीं. आत्मा अनादि आणि नाश रहित आहे या कारणानें पूर्वी मी आणि सर्व तुह्मी आहांत आणि आपण सर्व यानंतर राहणार नाहीं असें ही नाहीं. आत्म्यास जन्म मरण नाहीं असाच राहूंच देणें करून कालत्रयीं आत्म्यास नित्यत्व सांगितलें आहे. ॥१२॥

## देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा॥ तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र नमुह्यति॥१३॥ ॥

तूं ईश्वर आहेस, तुला जन्ममरण नाहीं हें खरें आहे परंतु आह्मा जीवांस जन्म मरण प्रसिद्ध आहे आणि देहाहून निराळा जर आत्मा आहे आणि देह आत्मा नाहीं तर देहाचे पीडेनें यास दुःख कसें होतें असें जर अर्जुना ह्मणशील तर सांगतो.

देहाभिमान ज्यास आहे अशा आत्म्यानें ज्यावर हें माझें किंवा हेंच मी असा अभिमान ठेविला आहे त्या देहास बालत्व, तरुणत्व, वृद्धत्व या अवस्था एका एका अवस्थेचा नाश करून जशा प्राप्त होतात त्या प्रमाणें आत्म्यास एक देह नाश पावला म्हणजे दुसरा देह प्राप्त होतो तो नाश पावला ह्मणजे तिसरा देह प्राप्त होतो यासच जन्म मरण ह्मणतात हें जन्म मरण देहाचा धर्म आहे आत्म्याचा धर्म नाहीं यामुळें देहादिकांहून आत्मा वेगळा आहे असें ह्मटलें पाहिजे. पिशाच जेव्हां दुसऱ्याचे शरीरांत प्रवेश करतें तेव्हां त्या शरीरास पीडा झाली तरी त्या देहाचे स्वामीस त्या वेळेस त्या देहावर हा माझा देह असा अभिमान नसल्या मुळें देह स्वामीस ह्मणजे आत्म्यास दुःख होत नाहीं. हें शरीर माझें आहे असा त्या पिशाचास अभिमान आहे म्हणून जसें पिशाचास दुःख होतें तसें या लोकांतील अनुभवा प्रमाणें देहाहून निराळा जरी आत्मा आहे तरी अज्ञानानें हा देह मीच आहें असा जीवास अभिमान आहे याकारणानें देहास पीडा झाली ह्मणजे जीवास दुःख होतें देहाहून आत्मा भिन्नच आहे, देह नाशवंत आहे तो आत्मा नव्हे जर देहच आत्मा आहे तर बाल्यावस्थेंतील देहाचा नाश होऊन वृद्धावस्थेंतील दुसरा देह झाला तरी ज्या मी बालपणीं पितरांचा अनुभव घेतला तो मी वृद्धपणीं त्यांस स्मरतों असें जें स्मरण सर्वांस होतें तें अनुभव घेणाऱ्या देह रूप आत्म्याचा नाश झाल्या मुळें होणार नाहीं या वरून दोनी अवस्थेंतील शरीराहून आत्मा भिन्न आहे असें सिद्ध होतें. असा देहात्म विवेक ज्यास झाला आहे असा जो धीर ह्मणजे ज्ञानी तो आत्मा उत्पन्न झाला. आत्मा मरण पावला असें मानीत नाहीं. ॥ १३ ॥

## मात्रा स्पर्शास्तु कौंतेय शीतोष्ण सुखदुःखदाः॥ आगमापायिनो नित्यास्तांस्तितिक्षस्व भारत॥ १४

आत्मा जरी नाश पावत नाहीं तथापि माझे इष्ट जे भीष्मादिकांचे देह त्यांचा वियोग मला होईल. यामुळें मी शोक करतों असें जर प्रति शरीरीं आत्मभेद मानून ह्मणेल तर सांगतात. हे कुंतीपुत्रा अर्जुना, मात्रा स्पर्श ह्मणजे वृत्तिद्वारा इंद्रियादिकांचे आणि विषयांचे संबंध ते शीत आणि उष्ण तसेंच सुख आणि दुःख यांप्रत देणारे होतात. ते संबंध येणारे जाणारे आहेत. यामुळें ते नाशवंत आहेत, नित्य नाहींत. यास्तव हे भरत कुलोत्पन्ना अर्जुना त्यांचें तूं सहन कर. जसे जल आणि तेज यांचे संबंध त्या त्या काळीं आपले स्वभावा प्रमाणें शीत किंवा उष्ण यांप्रत देतात. तसेच इष्ट संयोग, इष्ट वियोग हे ही सुख दुःखें देतात, ते स्थिर नाहींत यामुळें त्यांचें सहन करणें तुजसारखे धीर पुरुषांस योग्य आहे, या मुळें हर्ष विषाद करणें योग्य नाहीं. इंद्रिय द्वारा विषय संबंधानें मनासच सुख दुःख होतें मनाचे भेदानेंच आत्मा-

भेद आहे, तो वास्तविक नाहीं; परंतु मनाचे ठायीं जो तादात्म्याभिमान आहेतो सुख-दुःखास कारण होतो, तो तूं करूंनको असें तात्पर्य. ॥१४॥

**यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ॥ समदुः खसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते॥ १५॥ ॥**

त्यांचें सहन करण्यांत मोठें फळ आहे, यामुळें ही त्यांचें सहन करणें उचित-आहे असें सांगतात. हे पुरुषश्रेष्ठा अर्जुना, ज्यास सुख किंवा दुःख समान आहे अ-शा ज्या धीर पुरुषास हे मात्रा स्पर्श म्हणजे विषयांचे संयोग व्यथा करीत नाहींत-तो मोक्षास जाण्याला योग्य होतो. ॥१५॥

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ॥ उभयोरपिदृष्टोंतस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥१६॥**

शीत किंवा उष्ण तसेंच सुख किंवा दुःख हें सहन करण्यास फार अशक्य आहे, त्यांचें फार सहन केलेंतर कदाचित् आत्मनाश ही होईल, असें मनांत आणूं न-को. कारण तत्त्वविचारें करून तें सर्व सहन करण्यास शक्य आहे असें सांगतात. शी-तोष्ण सुखदुःख हे देहमन आदिकजे अनात्मे त्यांचे धर्म आहेत. निर्विकार आत्म्या-चे धर्म नाहींत. रज्जूचे अज्ञानानें रज्जूवर भ्रांतीनें सर्प भासला तरी तो मिथ्याच आहे, त्याची सत्ता रज्जूवरनाहीं या प्रमाणें आत्मस्वरूपाचे अज्ञानानें आत्म्यावर देहादिक भासून त्यांचे धर्म सुखदुःखादिक आत्म्यावर भासले तरी ते मिथ्याच आहे-त. त्यांची सत्ता आत्म्याचे ठायीं नाहीं. तसाच त्रिकाळ ज्याची सत्ता आहे अशा आत्म स्वरूपाचा नाश नाहीं. या प्रमाणें सत् आणि असत् यांचा निर्णय तत्ववेत्त्यांनीं पाहि-ला आहे या विवेकानें तूं ही सहन कर. ॥१६॥

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ॥ वि नाशमव्ययस्यास्य न कश्चित् कर्तुमर्हसि ॥१७॥**

आत्म्याचा नाश नाहीं असें सामान्यें करून सांगितलें तेंच विशेषें करून सां-गतात. ज्या आत्म्याचे कारणरूप सद्रूप स्वरूपानें हें सर्वजग व्यापलें आहे तें आत्म-स्वरूप नाशरहित आहे असें जाण. नाशरहित जें आत्मस्वरूप त्याचा नाश करण्यास-कोणी ही समर्थ नाहीं. ॥१७॥

**अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ॥ अ-नाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥१८**

जो परिच्छेदत्रय रहित अपरिच्छिन्न आणि नित्यस्वरूप ह्मणजे अमुक देशीं आहे, अमुक देशीं नाहीं, असा जो देश परिच्छेद, तसाच अमुक कालीं आहे अमुक कालीं नाहीं. असा जो काल परिच्छेद, तसाच आत्मसत्ता भिन्नभिन्न किंवा आत्मसत्तेहून अनात्मसत्ता भिन्न असा वस्तु परिच्छेद हे त्रिविध देश काल वस्तु परिच्छेद ज्यास नाहींत आणि अनाशी ह्मणजे सर्वदा प्रकाशमान आणि अप्रमेय ह्मणजे इंद्रियादिकांस अगोचर असा जो देहावर अभिमान ठेवणारा आत्मा त्याचे हे देह नाशवंत आहेत. आत्म्याचा नाश नाहीं आणि आत्म्यास सुख दुःखादिकांचा संबंध नाहीं यास्तव हे भारता अर्जुना, युद्ध कर. आपला स्वधर्म टाकूं नको. ॥१८॥

# य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम्॥ उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते॥ १९॥ ॥

या प्रमाणें भीष्मादिकांच्या मरणामुळें जो शोक तो अयोग्य आहे असें सांगून भीष्मादिकांला मारण्यास मी इच्छीत नाहीं. मला पाप लागेल. असें आपले ठिकाणीं हंतृत्व मानून जें दुःख झालें तें ही अयोग्य असें सांगतात. जो तार्किकादिक आत्म्यास कर्तृत्व मानून हा मारणारा आहे असें मानितो तसाच जो चार्वाकादिक देहासच आत्मा मानून हा आत्मा मरण्यानें नाश पावतो असें मानितो त्या दोघांस ही समजत नाहीं. कारण आत्मा कोणास मारीत नाहीं आणि कोणापासून मरण ही पावत नाहीं. तात्पर्य — आत्म्यास कर्तृत्व नाहीं. जागृत स्वप्न कालीं अंतःकरण संबंधानें कर्तृत्व भासतें, सुषुप्ति मूर्च्छा कालीं अंतःकरण लय झाला ह्मणजे तें भासत नाहीं यावरून कर्तृत्व हा मनाचा धर्म असतांही जसें तापलेले लोहावर वन्हि संबंधानेंच दाह कर्तृत्व आहे. स्वतः नाहीं तसें आत्म्यास कर्तृभूत अंतःकरण संबंधानेंच कर्तृत्व भासतें स्वतः नाहीं. देहतर आत्मा नव्हे असें पूर्वींच सांगितलें आहे. ॥१९॥

# न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः॥ अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे॥ २०॥ ॥

आत्मा मरत नाहीं असें जें सांगितलें तेंच आत्मा निर्विकार आहे यास नाश पावणार जें वस्तु त्याचे विकार नाहींत या कारणानें स्पष्ट करून दाखवितात. हा आत्मा उत्पन्न होत नाहीं येणें करून जन्मास येणें हा विकार आत्म्यास नाहीं असें सांगितलें. हा आत्मा कधीं ही मरण पावत नाहीं. येणें करून विनाशरूप विकार आत्म्यास नाहीं असें दर्शविलें. हा आत्मा पुनः पुनः उत्पन्न होऊन सत्ते प्रत पावतो असें नाहीं. पूर्वींच सद्रूप आहे. येणें करून जन्मांतर होणें आणि तेणें करून सत्तेस पाव-

णें या विकाराचा आत्म्यास संभव नाहीं असें दर्शविलें. कारण हा अज ह्मणजे उत्पत्तिरहित आहे. हा आत्मा नित्य आहे ह्मणजे सर्वकाळीं एकाच सत्तेनें युक्त आहे. येणें करून वृद्धि स्वरूप विकाराचा आत्म्यास संभव नाहीं असें सांगितलें. हा आत्मा शाश्वत आहे. येणें करून क्षयिता रूप विकार आत्म्यास नाहीं असें सांगितलें, आत्मा निरवयव आहे यास क्षीणता नाहीं, हा आत्मा पुराण आहे ह्मणजे नवीन परिणामयास नाहीं. येणें करून परिणाम रूप विकार आत्म्यास नाहीं असें सांगितलें हा आत्मा मरण पावणारें जें शरीर त्यामध्यें मरण पावत नाहीं. ॥ २० ॥

वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम्॥ कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंति कम्॥ २१॥ ॥

सांगितले कारणानें आत्म्यास हंतृत्व नाहीं असें सांगतात. हे पार्था, अर्जुना, जो पुरुष, हा आत्मा अविनाशी आहे, नित्य ह्मणजे वृद्धिशून्य आहे तसाच उत्पत्तिरहित आणि क्षीणता रहित आहे असें जाणतो तो पुरुष कोणास कसा मारील, कारण अशा आत्म्याच्या मारण्यास साधनच नाहीं. तसाच तो पुरुष आपण सहाय होऊन कोणास कोणाचे हातून कसा मारवील. येणें करून कृष्णा मजकडून भीष्मादिकांस मारवितो अशी माझे ठायीं दोष दृष्टि करूं नको असें सूचविलें. ॥ २१ ॥

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि॥ तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही॥ २२॥ ॥

आत्म्याचा नाश नाहीं तथापि भीष्मादिकांचीं शरीरें छिन्नभिन्न होऊन पडतील. ह्मणून मी शोक करतों असें जर ह्मणेल तर सांगतात. मनुष्य जुन्या वस्त्राचा त्याग करून जशीं दुसरीं चांगलीं नवीं वस्त्रें घेतो. तसा देहाभिमानी आत्मा जीर्ण झाले त्या शरीराचा त्याग करून दुसरे नवीन शरीरांत गमन करतो. कर्मवशें करून पूर्व पूर्व देह सोडून नवीन नवीन देह घेणें हें अवश्य होणारें आहे यास्तव जीर्ण देहाचे नाशामुळें शोक करणें अनुचित आहे. भीष्मादिक यावज्जीव पर्यंत धर्मानुष्ठानानें क्लेश पावून अजर झाले त्या या जीर्ण शरीराचा त्याग केल्या शिवाय कर्म फलाचा उत्तमभोग करण्यास असमर्थ आहेत. तें जर धर्मयुद्धानें स्वर्ग सुखार्थ ज्या दिव्य देहाची अपेक्षा आहे त्यास प्रति बंधक अशा या जीर्ण देहाचा पात करून दिव्य देह संपादन योग्य तूं करशील तर त्यांवर तुझा मोठा उपकारच होईल. यास्तव मोठा उपकार करणाऱ्या युद्धावर अपकार कर्तृत्व भ्रम करूं नको. असें अपराणि–संयाति या पदांनीं सूचविलें. संयाति ह्मणजे दुसरे दिव्य देहांत गर्भवासादि क्लेशाशिवाय उत्तम प्रकारानें या देहाचा त्याग

करून भीष्मादिक गमन करतील असा अर्थ. असें कोणी तात्पर्य वर्णन करतात. ॥२२॥

**नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः॥ नचैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः॥ २३॥**

आत्म्याला मारण्यास साधन नाहीं असें जें सांगितलें तेंच स्पष्ट करून दाखवितात. तीक्ष्ण शस्त्रें ह्या आत्म्यास तोडीत नाहींत, प्रदीप्त अग्नि या आत्म्यास जाळीत नाहीं, उदक या आत्म्यास मृदु किंवा आर्द्र करून शिथिल करीत नाहीं, वायु या आत्म्यास शुष्क करीत नाहीं. ॥२३॥

**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च॥ नित्यः सर्वगतःस्थाणुरचलोऽयं सनातनः॥२४॥**

याविषयीं कारणें सांगतात. आत्म्यास अवयव नसल्यामुळें त्याचे दोन तुकडे करणें असा जो छेद तो करतां येत नाहीं तसेंच त्याला जाळण्यास, भिजवून शिथिल करण्यास आणि शुष्क करण्यास ही येत नाहीं. यामुळें हा आत्मा नाशरहित, व्यापक, स्थिर स्वभावाचा आणि पूर्वरूपाचा परित्याग न करणारा अथवा क्रियारहित आणि अनादि असा आहे. ॥२४॥

**अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते॥ तस्मादेवं विदित्वेनं नानुशोचितुमर्हसि॥२५॥**

मुंजा ह्मणजे मोळ या नांवाच्या तृणाचे गर्भांत जें कोंवळें तृण असतें तें जसें त्या तृणावरील मोठीं मोठीं पानें युक्तीनें निरनिराळीं करून त्या मुंजेंतून बाहेर काढितात. त्या प्रमाणें ब्रह्मचर्यादिक साधन संपन्न जे धीर म्हणजे अधिकारी मुमुक्षु त्यांनीं अन्वय व्यतिरेक रूप युक्तीनें स्थूल, सूक्ष्म आणि कारण एतत्स्वरूप जीं तीन शरीरें यांपासून पार्थक्यें करून जाणलेला आत्मा पर ब्रह्मच होतो. आत्मवेत्ता शोकापार तरतो, ब्रह्मवेत्ता ब्रह्मच होतो, देव ह्मणजे प्रकाश मान किंवा द्योतमान आत्म्यापर्त अध्यात्म शास्त्राचे श्रवणादिकें करून जाणून शोक आणि हर्ष यांपार टाकितो. अशा अर्थाच्या श्रुतींत स्थूलादिक शरीरांहून भिन्नपणें आत्मस्वरूपाचे ज्ञाना पासून शोक निवृत्ति सांगितली आहे. यास्तव तशा आत्म्याचें अर्जुनास ज्ञान होऊन स्थूलादिक शरीरांवर आत्मत्व भ्रमामुळें त्यांचे विनाशा साठीं जो शोक झाला आहे तो जावा या हेतूनें आत्म्याचा स्थूलादि शरीर त्रितया हून भेद सांगतात. हा आत्मा अव्यक्त आहे, व्यक्त म्हणजे प्रत्यक्ष जें स्थूल शरीर त्याहून भिन्न आहे, स्वप्नांत अन्नमय स्थूल देहाचें भान नसलें तरी स्वप्न साक्षि त्वें करून ह्मणजे स्वप्नास जाणणाऱ्याचे स्वरूपा

तें आत्म्यानें भान ह्मणजे प्रतीति असते असा आत्म्याचा अन्वय ह्मणजे स्वप्नकालीं अनुवृत्ति, तसाच स्वप्नकालीं आत्म्याची स्फूर्ति असतांही स्थूल देहाची स्फूर्ति नाहीं असा स्थूल देहाचा व्यतिरेक म्हणजे व्यावृत्ति हे अनुभव सिद्ध आहेत. या अन्वय व्यतिरेकांवरून स्थूलदेह आत्मा नव्हे असें जाणावें. याप्रमाणेंच श्रोत्र, त्वक्, चक्षु, रसना, आणि घ्राण अशीं पांच ज्ञानेंद्रियें. वाक्, पाणि, पाद, पायु आणि उपस्थ अशीं पांच कर्मेंद्रियें पंच प्राण आणि मन आणि बुद्धि या सप्तदश १७ पदार्थांस लिंगशरीर किंवा सूक्ष्म शरीर ह्मणतात. यालिंग किंवा सूक्ष्म शरीरांहून आत्मा भिन्न आहे, असें सांगतात. हा आत्मा अचिंत्य आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध यांचें जें ज्ञान होतें त्यास उत्पन्न करणारें कोणी साधन म्हणजे करण आहे. तसेंच घेणें, बोलणें आणि चालणें इत्यादि क्रियारूप जें कार्य होतें त्यास उत्पन्न करणारें कोणी साधन ह्मणजे करण आहे. तसेंच संकल्पविकल्पात्मक जें ज्ञान होतें त्यास उत्पन्न करणारें साधन ह्मणजे करण आहे. तसेंच जें ज्ञान होतें त्यास उत्पन्न करणारें साधन म्हणजे करण आहे. तसेंच प्राणा पानादिकांचे जे व्यापार होतात त्यांस उत्पन्न करणारें साधन ह्मणजे करण आहे. कारण जें कार्य होतें तें करणा शिवाय होत नाहीं, या अनुमानानेंच जें आहे अशी चिंता करण्यास म्हणजे जाणण्यास योग्य पूर्वोक्त सप्तदश पदार्थस्वरूप सूक्ष्मशरीर तें चिंत्य त्याहून आत्मा निराळा आहे, या सूक्ष्म शरीराचें सुषुप्ति कालीं जरी भान नसलें तरी सुषुप्ति साक्षित्वें करून म्हणजे सुषुप्तीचे अनुभवात्मक प्रकाश रूपानें भान आहे, हें भान सुषुप्ती पासून उठलेले पुरुषास मी सुखें करून निजलों होतों असें जें स्मरण होतें तें स्मरण अनुभवा वांचून होणार नाहीं या अनुमानात्मक प्रमाणा वरून सिद्ध आहे. असा सुषुप्तींत आत्म्याचा अन्वय म्हणजे अनुवृत्ति आणि सुषुप्ति कालीं सूक्ष्मशरीराची प्रतीति नसली तरीं आत्म्याची पूर्वोक्त प्रतीति आहे, हा सूक्ष्म देहाचा किंवा शरीराचा व्यतिरेक म्हणजे व्यावृत्ति, असे हे अन्वय व्यतिरेक अनुभव सिद्ध आहेत. यावरून आत्मा सूक्ष्मशरीराहून निराळा आहे असें जाणावें. या प्रमाणें आत्मस्वरूपावर सूक्ष्म शरीराचा विवेक झाला म्हणजे सूक्ष्म शरीरांतील पांच कर्मेंद्रियें आणि पांच प्राण एतद्दश पदार्थ रूप जो प्राणमय कोश आणि पांच ज्ञानेंद्रियें आणि संशयवृत्ति रूप मन एतत् षट् पदार्थ रूप जो मनोमय कोश आणि पांच ज्ञानेंद्रियें आणि निश्चयात्मक वृत्तिरूप जी बुद्धि एतत् षट् पदार्थ रूप जो विज्ञान मय कोश याचा विवेक होतो. कारण हे कोश लिंग शरीरांतच सत्त्व आणि रज या गुणांच्या प्राणा पानादिक पांच प्राण वृत्ति, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, संकल्पविकल्पात्मक मनोवृत्ति, निश्चयात्मक मनोवृत्ति एतद्रूपज्या अवस्था ह्मणजे परिणाम यांचे भेदानेंच निरनिराळे केले आहेत. या प्रमाणेंच स्थूल आणि सूक्ष्म शरीरास बीजभूत जें सुषुप्तींतील मूलाज्ञान त्यास कारण शरीर ह्मणतात. त्याहून ही आत्मा भिन्न आहे.

असें सांगतात. हा आत्मा अविकार्य आहे म्हणजे सूक्ष्म कार्यरूप जो विकार त्याचे स्वरूपानें स्थिति पावण्यास जें योग्य तें विकार्य म्हणजे त्रिगुणात्मक मूळाज्ञानरूप कारण शरीर त्याहून भिन्न आहे. समाधि काळीं किंवा ध्यान काळीं सुषुप्तींतील कारण शरीर रूप अज्ञानाची प्रतीति नसली तरी समाधी पासून किंवा ध्याना पासून उठल्या नंतर - एतावत् पर्यंत मी समाधिस्थ होतों, ईश्वर ध्यानच करीत होतों. असें स्मरण होतें त्यावरून समाधि ध्यान साक्षिलें करून आत्म्याचें स्फुरण आहे. हा आत्म्याचा त्याकाळीं अन्वय म्हणजे अनुवृत्ति आणि त्या काळीं आत्म्याचें स्फुरण असून अज्ञानाचें स्फुरण नाहीं हा अज्ञानाचा व्यतिरेक म्हणजे व्यावृत्ति हे अनुभवसिद्ध आहेत. यावरून आत्मा कारण शरीर जें अज्ञान त्याहून भिन्न आहे असें जाणावें. या त्रिगुणात्मक अज्ञानांत जो मलिन म्हणजे रज आणि तम या दोन गुणानीं कलुष केलेला सत्त्वगुण तो निद्रारूप सुषुप्तीचे अव्यवहित पूर्वक्षणीं उत्पन्न झालेल्या प्रिय, मोद आणि प्रमोद या तीन वृत्तींनीं युक्त झाला म्हणजे त्यासच आनंदमय कोश असें म्हणतात. इष्ट वस्तूचे दर्शना पासून जी मनाची सुखाकार वृत्ति होते तीस प्रिय म्हणावें. इष्ट वस्तूचा लाभ झाल्यानें जी मनाची सुखाकार वृत्ति होते तीस मोद म्हणावें. इष्ट वस्तूचे उपभोगानें जी मनाची सुखाकार वृत्ति होते तीस प्रमोद म्हणावें. कारण शरीराहून आत्मा भिन्न आहे असा विवेक झाला म्हणजे आनंदमय कोशाचाही आत्म्याशीं विवेक होतो म्हणजे आनंदमय कोशाहून आत्मा भिन्न आहे असें समजतें. कोशकार या नांवाचा एक कीट आहे तो आपणास आवरण करणारा कोश उत्पन्न करून त्यांत बंधन पावून जसा क्लेश पावतो त्याप्रमाणें अन्नमयादिक जे सांगितलेले पांच कोश त्यावर अन्नमय स्थूल देहादिक जे कोश ते मीच आहें असा आत्मस्वरूपाचे अज्ञानानें युक्त जीव अभिमान ठेवून त्यांचे संबंधानें सांसारिक क्लेश पावतो, या कारणानें अन्नमय आत्म्याहून प्राणमय आत्मा भिन्न आहे, प्राणमय आत्म्याहून मनोमय आत्मा भिन्न आहे, मनोमय आत्म्याहून विज्ञानमय आत्मा भिन्न आहे, विज्ञानमय आत्म्याहून आनंदमय आत्मा भिन्न आहे, असा अन्नमयादि कोशांवर आत्मा आत्मा या प्रमाणें सर्वत्र तैत्तिरीयादिक उपनिषदांत आत्म शब्दाचा प्रयोग केला आहे, परंतु तो मुख्य आत्मा नव्हे. कारण त्याच उपनिषदांत आत्मभूत सर्वांतर ब्रह्मज्ञाना पासून ब्रह्म प्राप्तिरूप मुक्ति आरंभीं सांगून तें ब्रह्म कोणतें तें समजाया साठीं मूढ लोकांनीं आत्मत्वें करून मानिलेले जे एका एका पेक्षां आंतर आंतर स्थूल देहादिक पंचकोश त्यांवरील आत्मत्व बुद्धि जाऊन पंचकोशांहून सर्वांचा आंतर सच्चिदानंद ब्रह्मरूप आत्मा भिन्न आहे असें क्रमानें ज्ञान होण्या साठीं हा आत्मा नव्हे, हा आत्मा नव्हे असें सांगून आनंदमय कोशाहून ही निराळा पांच कोशांचा अंतरात्मा पुच्छा प्रमाणें सर्व कोशांस प्रतिष्ठा म्हणजे अधिष्ठान भूत पुच्छ ब्रह्मरूप सांगू-

न प्रकरण समाप्ति केली. या वरून तेंच मुमुक्षूंनीं आत्मत्वें करून जाणावयास यो-ग्य असें ब्रह्म आत्मा आहे असें जाणावें. ज्या कारणास्तव स्थूल सूक्ष्म आणि कारण एतद्रूप तीन शरीरांहून आत्मा भिन्न आहे त्या कारणास्तव अशा आत्म्यानें तूं जाणून बंधादिकांच्या नाशामुळें शोक करूंनको किंवा शोक करण्यास योग्य नाहींस.॥२५

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम्॥ तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि॥२६॥**

या प्रमाणें तत्व ज्ञानाचे दृष्टीनें बंधुनाश निमित्तक शोक योग्य नाहीं असें सांगून आतां देहादिकांसच आत्मा मानणारे जे प्राकृत लोक त्यांचे दृष्टीनें ही शोक योग्य नाहीं असें सांगण्याच्या मिषानें मुमुक्षूंस महा वाक्यांतील त्वंपदाचा जो विवक्षित वास्तविक जीवात्म स्वरूप अर्थ त्याचे बोधाचें दृढत्व होण्या साठीं आणि सच्चिदानंदात्मक शरीर त्रितय भिन्न जें आत्मस्वरूप तेंच त्वंपदाचा विवक्षित अर्थ आहे, मूढ ज्यास आत्मा मानितात तो त्या पदाचा अर्थ नाहीं असें ज्ञान होण्या साठीं आणि मूढांचे मतावर सत्यत्व बुद्धि न व्हावी या साठीं त्यांचे मताचा अभ्युपेत्य वादानें ह्मणजे असें ही जर म्हणशील अशा अर्धांगीकारानें अनुवाद करून बोलतात. आत्मा उत्पत्ति नाश रहित आणि सच्चिदानंदरूप असा असतां ही तो नित्यजात ह्मणजे नित्य उत्पन्न होणारा आहे अथवा नित्यमृत म्हणजे नित्य मरणशील आहे असें जरी तूं मानशील, नित्यजात आणि नित्य मृत या पदांनीं आत्मा उत्पन्न होऊन मरण पावणारा आहे असें मानणारे जे लोकायतादिक नास्तिक आणि आत्मा नित्य असतां ही ह्मणजे उत्पत्ति रहित आणि नाश रहित असतां ही उत्पन्न होणाऱ्या शरीराचे संबंधानें उत्पन्न आणि मरण पावणाऱ्या शरीराचे संबंधानें मृत अशा गौण व्यवहारास योग्य होतो. असें बोलणारे जे तार्किकादिक आस्तिक यांचे पक्ष सूचविले. या पक्षांचें कंटकोद्धार न्यायानें ह्मणजे कांट्यानें कांटा काढावा या न्यायानें निराकरण होऊन मुख्य वेदांत पक्षानें त्वंपदार्थ जें आत्म ज्ञान तें निश्चयात्मक होण्या साठीं सर्व नास्तिक पक्षांच्या आणि आस्तिक पक्षांच्या परस्पर विप्रतिपत्ति ह्मणजे विवाद संक्षेपानें येथें लिहितों. मी स्थूल आहें, मी कृश झालों, मी गमन करतों, मी ब्राह्मण, मी मनुष्य, अशी या अन्नमय स्थूल देहावर आत्मत्व बुद्धि प्रत्यक्ष रूप होते या वरून हा स्थूल देहच आत्मा आहे हा स्थूल देह पृथिव्यादिक भूतांचा जो एकत्र मिळालेला समुदाय तद्रूपच आहे. प्रत्येक पृथिव्यादि भूतांस जरी चैतन्य नाहीं तथापि चूर्ण ह्मणजे चुना आणि हरिद्रा तसीच पूगीफल, नागवेलीचीं पानें, चूर्ण आणि कात इत्यादिक पदार्थांवर जरि रक्तिमा नाहीं तरी त्यांचें एकत्र मेळन झालें ह्मणजे रक्तिमा जसा उत्पन्न होतो तसा पृथिव्यादिकांचा विलक्षण देहरूप संधान ह्मणजे मेळन झालें म्हणजे

देहावर चैतन्य उत्पन्न होतें असें चार्वाकांतील कोणी लोकायत ह्मणतात आणि त्यांचे-मतीं प्रत्यक्षाहून दुसरें अनुमान शब्दादिक प्रमाण नाहीं तरी आपला पक्ष खरा आहे. असा वेदास प्रमाण मानणारे जे आस्तिक त्यांचा निश्चय होण्या साठीं अन्नमय ह्मणजे शुक्र शोणित रूप परिणाम द्वारानें अन्ना पासून उत्पन्न झालेला जो स्थूल देह तो आत्मा आहे असें श्रुतींत सांगितलें आहे असें वेदाचें प्रमाण आपल्या पक्षास दाखवितात. या देहांतून जीवात्मा निघून गेला ह्मणजे चैतन्य जाऊन हा देह मरण पावतो. यास्तव देहाहून इंद्रिय रूप आत्मा निराळा आहे. मी बोलतों, मी पहातों, मी ऐकतों, मी अंध किंवा बधिर आहें अशी इंद्रियांवर प्रत्यक्षरूप बुद्धि सर्वांस होते. हें प्रत्यक्षच इंद्रियें-आत्मा आहे याविषयीं प्रमाण आहे, असें दुसरे लोकायत बोलतात. आणि यां पक्षावर वैदिकांची श्रद्धा बसण्या साठीं वागादिक इंद्रियें मी मोठें मी मोठें. असा परस्पर कलह करून मोठा कोण याच्या निर्णया साठीं सर्व प्रजापति पाशीं गेलीं. असें श्रुतींत सांगितलें आहे, या कलहा वरून इंद्रियांस चैतन्य आहे आणि चैतन्या मुळें त्यांस आत्मत्व आहे असें श्रुतीचें प्रमाण दाखवितात. चक्षुरादिक इंद्रियांचा नाश झाला तरी जर शरीरांत प्राण आहे तर शरीरास चैतन्य असतें आणि शरीर जगतें. यावरून इंद्रियांहून निराळा प्राणच आत्मा आहे असें हिरण्य गर्भाचे उपासक त्यांस हैरण्य गर्भ असें ह्मणतात ते बोलतात. आणि जेव्हां मनुष्य सुषुप्ती प्रत पावतो तेव्हां सर्व चक्षुरादिक इंद्रियें आपला दर्शनादिक व्यापार ह्मणजे पाहणें ऐकणें इत्यादिक व्यापार न करतां लीन झालीं तरी प्राण आपला व्यापार करीत जागृत राहतो. यास्तव प्राणच सर्व इंद्रियां मध्यें श्रेष्ठ आहे असें श्रुतींत सांगितलें आहे. यावरून आणि अन्नमय कोशाहून निराळा जो प्राणमय कोश तोच आत्मा असेंही श्रुतींत सांगितलें आहे यावरून प्राणच आत्मा असें ह्मणण्यास श्रुति ही प्रमाण आहे असें दाखवितात. कर्ता, भोक्ता, हें आत्म्याचें स्वरूप आहे, जों पर्यंत मन आहे तों पर्यंतच कर्तृत्व, भोक्तृत्व अनुभवास येतें. सुषुप्तींत प्राण असतांही मनाचा लय होतो यामुळें कर्तृत्व, भोक्तृत्व अनुभवास येत नाहीं आणि प्राणमय कोशाहून निराळा मनोमय कोशच आत्मा आहे असें श्रुतींत सांगितलें आहे, या श्रुति प्रमाणा वरून-आणि विषया सक्त झालेलें मनच बंधास कारण आहे. निर्विषय झालेलें मनच मोक्षास कारण आहे अशा अर्थाची श्रुति आहे तीचे प्रमाणावरून मनच आत्मा आहे असें कोणी ह्मणतात. अहं ह्मणजे मी अशी अहमा कार वृत्ति, इदं ह्मणजे हें अशी इदमा कार वृत्ति अशा वृत्तींचे दोन भेदांनीं अंतःकरण दोन प्रकारचें आहे. अहमा कार वृत्तीस विज्ञान असें ह्मणावें. इदमा कार वृत्तीस मन असें ह्मणावें. अहमाकार वृत्ति झाल्यानंतर ती पासून इदमाकार वृत्ति उत्पन्न होते. यास्तव मनाला उत्पन्न करणारें अहमा कार वृत्ति रूप विज्ञानच आत्मा आहे आणि ही वृत्ति प्रतिक्षणीं उत्पन्न-

होऊन नाश पावते. असा अनुभव आहे यावरून आत्मा क्षणिकच आहे आणि त्या-चा दुसऱ्याने प्रकाश न होतां तो स्वप्रकाश स्वरूपच आहे असें बौद्ध ह्मणतात. आणि आपले पक्षास मनोमय कोशाहून भिन्न विज्ञानमय कोशच आत्मा आहे. असें श्रुतींत-सांगितलें आहे तें श्रुतीचें प्रमाण दाखवितात. सृष्टीचे पूर्वी हें जग असतच होतें असें श्रुतींतील प्रमाण दाखवून शून्यच आत्मा ह्मणजे आत्म्यास स्वरूपच नाहीं. हें ज्ञान ज्ञेय एतद्रूप सर्वजग भ्रांतीनेंच भासतें असें ही कोणी बौद्धांतील बोलतात. हे सर्व पक्ष नि-त्यजात आणि नित्यमृत या पदानीं सूचविले. ते असे — नित्य जात ह्मणजे नियमानें उत्प-न्न होणारा देहेंद्रिय प्राण मन बुद्धि रूप आत्मा तसाच नित्य मृत ह्मणजे सर्वदा मृत ह्मण-जे कधीं ही जो नाहीं. येणें करून शून्य वादि पक्ष सूचविला. सृष्टि पूर्व कालीं हें जग अस-तच होतें असें कोणी ह्मणतात. असा अनुवाद करून हे सौम्या असें कसें संभवेल अ-सता पासून ह्मणजे शून्या पासून हें जग कसें उत्पन्न होईल. यास्तव जगाला कारण सद्रू-पात्म वस्तू मानलें पाहिजे, जो स्वात्मरूप ब्रह्म नाहीं असें मानितो तोच आत्म्याचा अप-लाप केल्यामुळें असत म्हणजे नाहीं असें म्हणणें प्राप्त होईल अशी शून्यवादी मताची निंदा करून सद्रूप आत्मा आहे असें श्रुतींतच सांगितलें आहे आणि अधिष्ठाना वांचून भ्रांति होत नाहीं भ्रम होण्यास कांहीं अधिष्ठान पाहिजे, जसें रौप्य भ्रमास शुक्ति, स-र्प भ्रमास रज्जू, आणि शून्य ह्मणजे कांहीं नाहीं हें ज्यास समजतें तोच समजणारा आ-त्मा होईल. नाहींतर जर समजणाराच नाहीं तर शून्य आहे हें कशावरून सिद्ध होईल. यास्तव आत्म्याची सत्ता आहे आणि शून्य होतें असें जें तूं बोलतोस ही सत्ता कोणती शून्यास तर सत्ताच नाहीं जर सत्ता आहे तर सत्ता हेंच सद्रूप आत्म्याचें स्वरूप शून्य हें नांव मात्र तूं ठेविलेंस आणि क्षणिक विज्ञान मय कोशाहून भिन्न आनंदमय कोश आ-त्मा आहे तो सद्रूपानेंच ह्मणजे त्रिकाळ ज्याची सत्ता आहे अशा स्वरूपानेंच पाहावा. ह्मणजे आत्म्यास आनंदमयता येण्यास उपाधि भूत जो सांगितलेला आनंदमय कोश-त्याहून भिन्न आहे असा जाणावा. अशा श्रुति प्रमाणा वरून नित्य आत्मा आहे असें वे-दास प्रमाण मानणारे वैदिक बोलतात. पंच कोशांहून आत्म्याचें स्वरूप निराळें आहे-असें मानणारांत ही कोणी आत्मा अणु परिमाण आहे असें बोलतात. आणि रोम ह्मण-जे केशाचा सहस्त्रावा भाग त्या प्रमाणें सूक्ष्म ज्या शरीरांतील नाडी त्यांत आत्मा संचार करतो हा आत्मा अणु पेक्षां ही अणु आहे. आत्म स्वरूप सूक्ष्मा पेक्षांही सूक्ष्मतर ह्मण-जे फार सूक्ष्म आहे, केशांच्या अग्राचा जो शंभरावा भाग त्याचा जो हजारावा भाग तितके परिमाणाचा जीव आहे असें जाणावें. अशा अर्थाच्या अनेक श्रुति आत्म्याचे-अणु परिमाणा विषयीं प्रमाण आहेत, असें सांगतात. कोणी हा आत्मा नखाग्रा पासू-न केशाग्र पर्यंत या शरीरांत प्रविष्ट आहे अशा अर्थाच्या श्रुति प्रमाणावरून आणि आ-त्मा जर अणु आहे तर आपाद मस्तक पर्यंत सर्व शरीरांत एककाळींच सुख दुःख संवेद-

न रूप चैतन्याची प्रतीति होते असा सर्वांस अनुभव आहे तो कसा होईल. आत्मा जर अणु आहे तर ज्या प्रदेशीं आत्मा आहे तितक्यात प्रदेशांत चैतन्य प्रतीति होईल. सर्व शरीरांत एककालींच प्रतीति होणार नाहीं या युक्तीचे प्रमाणावरून जितकें परिमाण ज्या देहाचें आहे तितकेच परिमाणाचा आत्मा त्या देहांत आहे त्या आत्म्याचे सूक्ष्म अवयव आहेत ते सूक्ष्म नाडींत प्रवेश करितात. यावरून आत्मा सूक्ष्म आहे तो सूक्ष्म नाडींत प्रवेश करतो. असें श्रुतींत सांगितलें आहे, जसे देहाचे अवयव जे हस्त त्यांचा कंचुकांत ह्मणजे आंगरख्यांत प्रवेश झाला ह्मणजे देहाचा कंचुकांत प्रवेश झाला. असा व्यवहार लोक करतात. त्या प्रमाणें तो श्रुतींतील व्यवहार गौणच आहे. कर्मवशें करून आत्म्याचे अवयव न्यून झाले ह्मणजे आत्मा न्यूनपरिमाणाचे पिपीलिकादिकांचे देहांत तितके परिमाणाचा होऊन प्रवेश करतो आणि अवयव कर्मवशें करून अधिक झाले म्हणजे अधिक परिमाणाचा होऊन अधिक परिमाणाचे गजादिकांचे देहांत प्रवेश करतो. यास्तव आत्मा देहाचे परिमाणाचा असून देहाहून निराळा आहे असें बोलतात. या पक्षास दिगंबर सिद्धांत असें ह्मणतात. आत्म्यास जर अवयव मानले तर त्यास अंश म्हणजे अवयव आहेत त्यांचा अंश नाशानें किंवा दुसरे कारणानें नाश लोकांत पाहिला आहे. त्याप्रमाणें आत्म्याचा ही नाश होईल. आत्म्याचा नाश मानला तर परलोकगामी आत्मा नाश पावल्यामुळें नाहींसा झाला या कारणानें आत्म्यानें केलेले शुभाशुभ कर्मांचा फलोपभोग वांचून नाश होईल आणि उत्पन्न होणारा जो आत्मा तो उत्पन्न होण्या पूर्वी मुळींच नव्हता यामुळें त्याणें पूर्वी न केलेले कर्मांचा फलोपभोग त्यास होतो असें होईल. हें तर वेदशास्त्र विरुद्ध आणि युक्तीस विरुद्ध आहे यास्तव आत्मा आकाशा प्रमाणें नित्य आणि महान् म्हणजे विभु परम महत्परिमाणाचा आहे आणि निरंश आहे अशा अर्थाच्या श्रुती वरून आत्मा नित्य आणि विभु आहे असें मानून तसा ही आत्मा अचिद्रूप ह्मणजे जड आहे. ज्ञान, इच्छा, कृति, द्वेष, धर्म, अधर्म, सुख, दुःख भावनाख्य संस्कार हे गुण आत्म्याचे आहेत. त्यांच्या योगानें तो द्रव्य आणि चेतन आहे. अदृष्ट म्हणजे पुण्य पाप यांचे निमित्तानें मनाचा आणि आत्म्याचा संयोग झाला ह्मणजे पूर्वी सांगितलेले ज्ञानेच्छादिक गुण त्यांस किंवा त्यांवर उत्पन्न होतात आणि अदृष्ट नाश पावलें म्हणजे सुषुप्तींत लय पावतात. हा आत्मा पुण्याचा आणि पापाचा कर्ता आणि त्यांचीं जीं सुखदुःखरूप फलें त्यांचा भोक्ता आहे यामुळें ईश्वराहून तो भिन्न आहे, आत्मा विभु आहे यामुळें त्यावर क्रिया नसली तरी कर्मवशें करून कर्मफलोपभोगा साठीं स्वर्गादिक लोकीं त्यास शरीर संबंध झाला ह्मणजे तो लोकांतरीं गेला असें ह्मणतात. आणि या लोकीं शरीर संबंध झाला ह्मणजे या लोकांत आला असें ह्मणतात. या विषयीं सर्व कर्मकांड वेद प्रमाण आहे असें तार्किक आणि प्राभाकर म्हणतात. सुषुप्ती पासून उठल्यास मी जड होऊन सुखानें निजलों होतों. कांहीं

जाणत नव्हतों. अशा स्मृती वरून स्मृतीस कारण अनुभव रूप गूढ चैतन्य सुषुप्ति काळीं कल्पून आत्मा जड आणि बोधात्मक आहे असें भाट्ट बोलतात आणि त्यांचे मतीं-द्रष्टा जो आत्मा त्याचें स्वरूप भूत दृष्टीचा म्हणजे चैतन्याचा सुषुप्ति काळीं लोप म्हणजे नाश नाहीं. कारण आत्मस्वरूप नाश रहित आहे अशा अर्थाची श्रुति आणि सुषुप्ति काळीं ज्ञान नाहीं असें जे म्हणतात, त्यास ही तो ज्ञानाभाव आहे असें समजणारें कोणी प्रकाश मान वस्तु मानिलेंच पाहिजे. नाहींतर तो ज्ञानाभाव कशावरून निश्चित होईल अशी युक्ति हीं प्रमाणें सुषुप्ति काळीं आत्मा गूढ चैतन्य रूप आणि जड म्हणजे खद्योता प्रमाणें प्रकाश आणि अप्रकाश यांहीं करून युक्त आहे, याविषयीं-सांगतात. जो निरंश आहे त्यास प्रकाश आणि अप्रकाश असें उभय स्वरूपत्व कधीं-ही कसें ही संभवत नाहीं. यास्तव आत्मा चिद्रूपच आहे, मी जड मूढ होऊन निजलों होतों अशी जाड्य स्मृति होते तीत जड हें प्रकृतीचें सत्व रज तमोगुणात्मक रूप भासतें हें आत्म्याचें स्वरूप नाहीं असंग आणि चिद्रूप अशा आत्म्यास भोग आणि मोक्ष होण्या साठीं ती जड प्रकृति प्रवृत्त होते, त्या प्रकृतीवर तादात्म्याभिमानामुळें पुरुषास संसाररूप बंध होतो. प्रकृती पासून आपलें स्वरूप असंग आणि चिद्रूप आहे. अशा विवेक ज्ञानानें पुरुषास मोक्ष होतो. याविषयीं विस्तर तेराव्या अध्यायांत लिहूं. आत्मा एकच सर्व शरीरांत मानला तर कोणी सुखी, कोणी दुःखी, कोणी बद्ध, कोणी मुक्त, अशी व्यवस्था होणार नाहीं. या साठीं तार्किकादिकांनीं प्रति शरीरीं आत्मा भिन्न भिन्न आहे असें मानिलें आहे, त्याच प्रमाणें पुरुष प्रति शरीरीं असंग आणि चिद्रूप असा भिन्न भिन्नच आहे असें प्रकृति आणि पुरुष यांचा विवेक म्हणजे भेद सांगणारे सांख्य बोलतात. आणि महत्तत्त्व म्हणजे मन किंवा बुद्धि यांहून अव्यक्त पर म्हणजे महत्तत्त्वाचें कारण अव्यक्त आहे या अर्थाच्या श्रुतींत अव्यक्त शब्दानें जड प्रकृति आणि हा पुरुष असंग आहे या अर्थाच्या श्रुतींत असंग पुरुष सांगितला आहे असें प्रकृति आणि पुरुष यांचे सांगितले प्रमाणें स्वरूपाविषयीं श्रुति प्रमाण दाखवितात. असे हे तार्किक, प्राभाकर, भाट्ट आणि सांख्य यांचे पक्ष ही नित्यजात आणि नित्यमृत या पदानीं नित्य-असतां ही उत्पन्न होणाऱ्या देहादिकांच्या संबंधानें उत्पन्न होतो, तसाच नित्य असतांही देहादिकांच्या मरणानें मरण पावतो. अशा त्या परांच्या अर्थाच्या विवक्षेनें सूचविलें आणि मन्यसे म्हणजे असें जरी तूं मानशील येणें करून ते पक्ष वास्तवीक नव्हेत. कारण या सर्व पक्षांत आत्मा प्रति शरीरीं भिन्न भिन्न आहे आणि जग सत्य आहे असें आहे हें सर्व वेद विरुद्ध आहे कारण सर्व वेदांतील महा वाक्यें जीव आणि ब्रह्म यांचें ऐक्यच आहे भेद नाहीं असें सांगतात यावरून आत्मा एकच आहे, आत्म्याचा भेद नाहीं जो भेद भासतो तो आत्मस्वरूपाचे अज्ञानामुळें भासतो, रज्जूवर सर्प भासतो परंतु सर्पाची सत्ता रज्जू पेक्षां निराळी जशी नाहीं तसें सर्व जग मायेनें आ-

त्या स्वरूपाचे ठायीं भासविलें आहे तें आत्मसत्तेनेंच आहे, अशा सत्तेचें व्यवहारा स येतें परंतु त्या जगाची आत्मसत्ते पेक्षां सत्ता निराळी नाहीं. जसा सूर्य एकच असतां त्याचा मलिन जलांत मलिन प्रतिबिंब होतो, स्वच्छ जलांत स्वच्छ प्रतिबिंब होतो आणि हा स्वच्छ सूर्य, हा मलिन सूर्य असा उपाधि संबंधानें व्यवहार होतो तसा आत्मा नित्यमुक्त एकच असतां ही मायेचे किंवा मायाकार्य मन बुद्धिरूप उपाधीचे भेदानें त्यांचे संबंधामुळें हा बद्ध, हा मुक्त, हा सुखी, हा दुःखी, असा व्यवहार स्वप्नांतील एकाच आत्म्यावर हा राजा, हा देव, हा मनुष्य, हा ईश्वर, हा जीव, अशा व्यवहारा प्रमाणें होतो, परमार्थतः आत्मस्वरूपाचा विचार केला म्हणजे आत्म्यास उत्पत्ति नाहीं, नाश नाहीं, आत्मा बद्ध होत नाहीं, मुक्त होत नाहीं, आत्मा साधक नाहीं, आत्मा मुमुक्षु नाहीं, हे सर्व धर्म अंतःकरणावरील असून मायेचे योगानें अंतःकरणाचे तादात्म्याचे भ्रमानें आत्म्यावर भासतात असें श्रुतींत सांगितलें आहे. मायेचे योगानें सर्व व्यावहारिक व्यवस्था होते. बंधमोक्ष व्यवस्थे करतां आत्मभेद मानला तर अद्वैत श्रुतीशीं विरोध येईल. जो भेद भासतो तो मायेचे योगानेंच भासतो. जीव, ईश्वर, जग असें सर्व द्वैत मायेनेंच कल्पिलेलें आहे, तें अज्ञानावस्थेत भासतें. द्वैताचा अनुवाद जीवेश्वरादिकांचे द्वैत प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींनीं केला आहे तो हें द्वैत, जें भासतें तें भ्रमानें भासतें, पारमार्थिक अद्वैतच आहे असें महावाक्यानें सांगाव या साठीं केला आहे, सूर्य मेरूस प्रदक्षिणा करीत असतां ही समुद्रतीरवासी लोकांस तो उदयकालीं पूर्व समुद्रा पासून निघतो आणि अस्तसमयीं पश्चिम समुद्रांत जातो अशा भ्रमाचा अनुवाद जसा श्रुतींत केला आहे त्या प्रमाणें लोकांचे भ्रमाचा हा अनुवाद केला आहे, त्याविषयीं तात्पर्य नाहीं. कारण सर्व महावाक्यांत आत्म्याचें अद्वैत सांगितलें आहे त्याची अन्यथा उपपत्ति होणार नाहीं, अद्वैताविषयीं भ्रम नाहीं यास्तव त्याचा अनुवाद पारमार्थिक भेद सांगावयासाठीं केला असें संभवत नाहीं. असो हा विचार अद्वैत शास्त्रांत समुद्राप्रमाणेंच आहे यास्तव महावाक्यांचा मात्र अर्थ येथें संक्षेपानें लिहितों. चक्षुरिंद्रियाचे द्वारा रूपादि बाह्यविषया प्रत जाऊन घट रूपाद्याकार झालेलें अंतःकरण वृत्तीनें युक्त होऊन जें चैतन्य घटरूपादिका प्रत पाहतें, तसेंच श्रोत्रेंद्रियाचे द्वारा बाहेर जाऊन शब्दाकार झालेलें अंतःकरण वृत्तीनें युक्त होऊन जें चैतन्य शब्दाचें श्रवण करतें तसेंच घ्राणेंद्रियाचे द्वारा बाहेर जाऊन गंधाकार झालेले अंतःकरण वृत्तीनें युक्त होऊन जें चैतन्य गंधाचें आघ्राण करतें, तसेंच वागिंद्रियाचे ठायीं स्थित जें अंतःकरण तेणेंकरून युक्त जें चैतन्य शब्दाचें उच्चारण करतें तसेंच रसनेंद्रियाचे द्वारा बाहेर जाऊन रसाकार झालेले अंतःकरण वृत्तीनें युक्त होऊन जें चैतन्य हें स्वादु, हें अस्वादु असें जाणतें तें त्या वृत्तीनीं उपलक्षित म्हणजे त्या वृत्तींला सोडून राहिलेलें शुद्ध चैतन्य प्रज्ञान शब्दाचा अर्थ

उत्तम जे चतुर्मुखादि देव, मध्यम जे मनुष्यादिक, अधम जे देहधारी गजाश्वादिक. आणि आकाशादिक जीं भूतें त्यांचे ठायीं जगाचे उत्पत्ति स्थिति लयांत कारण भूत जें एक चैतन्य आहे तें ब्रह्म शब्दाचा अर्थ असें अवांतर वाक्यांनीं सांगून आणि हें चैतन्यच ब्रह्म हेंच इंद्र इत्यादिक ही सांगून ज्या कारणास्तव सर्वत्र राहिलेलें प्रज्ञान म्हणजे चैतन्य ब्रह्मच आहे याकारणास्तव माझे ठायीं राहिलेलें प्रज्ञान म्हणजे जें आत्म रूप चैतन्य तेंही ब्रह्मच आहे असें ऋग्वेदांतील ऐतरेयोपनिषदांत प्रज्ञानब्रह्म आहे अशा अर्थाच्या महावाक्यानें सांगितलें आहे, तसेंच स्वभावतः म्हणजे निरुपाधिक स्वरूपानें या देशांत आहे, या देशांत नाहीं असा जो देशपरिच्छेद याकालीं आहे, याकालीं नाहीं असा जो काल परिच्छेद हा आत्मा निराळा किंवा आत्मा निराळा आणि जग निराळें असा जो वस्तुपरिच्छेद या तीन परिच्छेदांनीं रहित असा जो परमात्मा मायेनें कल्पिलेले या जगांतील शमादि साधन संपन्न आणि ब्रह्म विद्याधिकारी जें श्रवण मननादिक अनुष्ठान त्यातें करणारें अशाया शरीरांत अंतःकरण बुद्ध्यादिकांचे साक्षित्वें करून अविकार स्वरूपानें राहून जागृदादिक अवस्थांत स्फुरण म्हणजे प्रकाश पावतो तो देह, मन बुद्ध्यादिक उपाधीं करून रहित असा शुद्ध आत्मा अहं या शब्दाचा तात्पर्य विषय म्हणजे विवक्षित अर्थ तसाच पूर्वोक्त देशकाल वस्तु परिच्छेदांहीं रहित परमात्मा ब्रह्म शब्दाचा विवक्षित अर्थ असें सांगून अहं म्हणजे मी ब्रह्मच आहें किंवा होईन, असें मी ब्रह्म आहें अशा अर्थाच्या यजुःशाखेतील बृहदारण्यकोपनिषदांतील महावाक्यांत सांगितलें आहे तसेंच सृष्टीचे पूर्वकालीं सजातीय भेद, विजातीय भेद आणि स्वगत भेद यांहीं करून शून्य आणि नामरूपांहीं करून रहित असें जें सद्रूप अद्वितीय वस्तु सांगितलें आणि जें सृष्टिकालींहि विचार दृष्टीनें पाहिलें - म्हणजे तसेंच आहे असें जें अद्वितीय सद्रूप वस्तु तें तत्पदाचा विवक्षित अर्थ श्रवण-मननादिकांचे अनुष्ठानें करून महा वाक्यार्थ प्रत जाणणाऱ्याचे जे देहेंद्रियादिक त्याचे साक्षित्वें करून राहिलेलें आणि स्थूल, सूक्ष्म आणि कारण या शरीरांहून निराळें - असें जें देहेंद्रियादिक उपाधींनीं रहित शुद्ध आत्मस्वरूप सद्वस्तु तें त्वंपदाचा विवक्षित अर्थ, असें अवांतर वाक्यांनीं सांगून तें सद्वस्तु तूंच आहेस असें, तें तूंच आहेस, - अशा अर्थाच्या सामवेदांतील छांदोग्योपनिषदांतील महावाक्यांत सांगितलें आहे, तसेंच स्वप्रकाश आणि नित्य अपरोक्ष म्हणजे कधींही जो परोक्ष नव्हे असा आणि अहंकार, प्राण, मन, इंद्रियें, देह यांच्या समुदायाचा साक्षी म्हणजे प्रकाशक आणि अधिष्ठान असाजो त्या समुदाय रूप उपाधीनीं रहित शुद्ध अंतरात्मा तो अयं आणि आत्मा या पदांचा विवक्षितार्थ, आणि दृश्य जें मिथ्या जग याचें अधिष्ठान भूत, उपाधि रहित शुद्ध सच्चिदानंदात्मक जें स्वरूप तें ब्रह्म शब्दाचा विवक्षित अर्थ, असें अवांतर वाक्यांनीं सांगून तें ब्रह्म हा स्वप्रकाश आत्माच आहे असें, तो हा आत्मा ब्रह्म या अर्थाच्या अ-

थर्वण वेदांतील महा वाक्यांत सांगितलें आहे, विचार दृष्टीनें पाहतां पूर्वोक्त प्रकारांत सांगितल्या प्रमाणें आत्म्याचें स्वरूप, असंग, अद्वितीय, नित्यमुक्त, परब्रह्म रूप, असतां ही पूर्वी लोकायतां पासून सांख्य पर्यंत जे वादी सांगितले त्यांचे अभिमानिक मतां प्रमाणें देहात्मवा पक्षीं देह प्रत्यक्ष उत्पन्न विनाशी आहे यावरून आत्मा देहेंद्रियादिक रूप असून आपल्या स्वरूपानेंच उत्पन्न होतो किंवा नाश पावतो. अथवा आत्मा देहादिकांहून भिन्न आहे यापक्षीं देह उत्पन्न झाला असतां त्याबरोबर आत्मा ही उत्पन्न होतो, देह मरण पावला असतां त्याबरोबर आत्मा ही मरण पावतो, ज्या पाप पुण्या पासून जन्म मरणें देहास होतात तीं पाप पुण्यें आत्म्या बरोबर जाणारीं येणारीं आहेत, यावरून देहादिकांहून आत्मा निराळा असतां ही तो देहाचे उत्पत्तीनें उत्पन्न होतो आणि देह मरणानें मरण पावतो. असें जरी तूं मानशील तथापि हे मोठे भुजाच्या अर्जुना, या आत्म्याचा शोक करण्यास तूं योग्य नाहींस. ॥२६॥

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ॥ तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७॥**

कारण पाप किंवा पुण्य एतद्रूप ज्या कर्मांनीं जो देह किंवा आत्मा उत्पन्न झाला त्यास त्या उत्पन्न करणाऱ्या कर्मांचा सुख किंवा दुःखरूप फलाच्या उपभोगानें नाश झाला असतां मृत्यु निश्चित आहे, आणि जो देह किंवा आत्मा मरण पावला त्या देहादिकानें केलेले कर्मांच्या फलाचा उपभोग करण्या साठीं त्याग जन्म हें निश्चित आहे, यास्तव उत्पन्न झालेल्यास मरण होणें, मरण पावलेल्यास जन्म होणें हें कांहीं केलें तरीं चुकण्या जोगें नाहीं म्हणून तूं त्या विषयीं शोक करण्यास योग्य नाहींस. ॥२७॥

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ॥ अव्यक्त निधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥**

आणि या देहादिकांच्या जन्ममरणाचे निमित्तानें आत्म्यास मानिलेलें-जें जन्म मरण त्याविषयीं शोक करणें हें देहादिकांचे स्वभावाचा विचार केला असतां अगदीं अनुचित आहे असें सांगतात. रज्जूवर भासमान सर्पाचें कारण जें रज्जूचें अज्ञान तें जसें रज्जू प्रमाणें किंवा सर्प प्रमाणें व्यक्त दिसत नाहीं आणि विचार केलावर दृष्टिगोचर ही होत नाहीं आणि त्या अव्यक्त अज्ञाना पासून उत्पन्न झालेला सर्प ही रज्जू असें अधिष्ठान ज्ञानानें त्या अज्ञानांतच लीन होतो. त्या प्रमाणें देहेंद्रियादिक जीं भूतें दिसतात यांचें पूर्वीचें रूप अव्यक्त म्हणजे जी दिसत नाहीं जीचें कार्य मात्र दिसतें अशी अघटित रचना करणारी जी परमेश्वर शक्ति स्वरूप-

मायाचीच आहे आणि या देहेंद्रियादिक भूतांचा शेवट ह्मणजे नाश किंवा लय - त्या अव्यक्त मायेंतच आहे. जन्म होणें आणि मरण पावणें या दोहोंची जी स्थिति त-ल्लक्षण जो देहादिकांचा मध्यभाग तो मात्र रज्जु सर्पा प्रमाणें व्यक्त ह्मणजे प्रत्यक्ष दि-सणारा आहे. अशा शरीरादिकांचा नाश झाल्यामुळें शोक करणें योग्य नाहीं. तात्प र्य - संदेश न्यायानें जें पूर्वी दिसत नाहीं आणि शेवटीं ही दिसत नाहीं, तें मध्यव-र्ती अवस्थेंत जरी भासलें तरी तें मिथ्याच आहे. जसें स्वप्नांत जे बंधु आदिक स्थूल पदार्थ दिसतात ते पूर्वी दिसत नाहींत आणि जागृत झाल्यानंतर ही दिसत नाहीं-त स्वप्नकालीं मात्र दिसतात ते मिथ्याच आहेत. यामुळें त्यांचा नाश झाला तरी जो-जागृत झाला तो त्यास मिथ्या असें मानून त्यांविषयीं शोक करीत नाहीं. या प्रमाणें-देहेंद्रियादिक पूर्वी दिसत नाहींत आणि लय ह्मणजे नाश झाल्यावर ही दिसत नाहीं त मध्यवर्ती अवस्थेंत मात्र दिसतात ते जरी मध्यावस्थेंत दिसले तरी ते स्वप्नांतील पदार्थां प्रमाणें मिथ्या आहेत यास्तव हे भारत ह्मणजे अर्जुना, त्यांच्या नाशामुळें काय शोक, विलाप करावयाचा आहे, शोक, विलाप करणें अगदीं उचित नाहीं असें ता-त्पर्य. ॥ २८॥

**आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति - तथैव चान्यः॥ आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति - श्रुत्वाप्येनं वेदना चैव कश्चित् ॥२९॥ ॥**

असें जर आहे तर जे विद्वान् म्हणून लोकांत प्रसिद्ध आहेत तेही बंधा-दिकांच्या नाशा मुळें का शोक करतात असें म्हणेल तर आत्म स्वरूपाचें वास्तविक ज्ञान त्यांस नाहीं या मुळें ते शोक करतात असें सांगतात. कोणी एक पुरुष आत्मा स-र्व व्यापक आहे त्यास कर्तृत्व, भोक्तृत्व नाहीं तो असंग सच्चिदानंद आणि अद्वय-असा आहे असें शास्त्राचे आणि गुरूचे उपदेशें करून परोक्षत्वानें समजून ही अनेक जन्माचे ठायीं झालेली जी आत्मा कर्ता भोक्ता आणि संसारादिकांचा संगी-आहे इत्यादिक विपरीत बुद्धि तिच्या संस्काराच्या दृढत्वा मुळें शास्त्रा चार्यांनीं उप-देशिलेले आत्म स्वरूपाचा अनुभव न होतां असें असंभावित आत्म्याचें स्वरूप - शास्त्रादिकांनीं कसें सांगितलें अशा विस्मयानें समजतो. तसाच दुसरा पूर्वींच्या प्रमाणें समजून असंभावना बुद्धि मुळें विस्मय करून अनुभवास विरुद्ध असें-आत्म स्वरूप शास्त्रादिकांनीं कसें सांगितलें असें आश्चर्ययुक्त दुसऱ्याशीं बोल-तो. कोणी आश्चर्य मानूनच श्रवण करतो. कोणी श्रवण करून ही बुद्धीचे मंदत्वा-मुळें आणि विपरीत बुद्धीचे दृढत्वामुळें पूर्वोक्त आत्म स्वरूप समजतच नाहीं. त-

स्मात् आत्मतत्त्व समजणें मोठें दुर्घट आहे अथवा प्रत्यक्षादिक सर्व प्रबल प्रमाणांनीं जो अनुभवास येतो आणि ज्या पासून सर्व प्रापंचिक अर्थक्रिया ह्मणजे कार्यें होतात असें असतां हा देहेंद्रियादिक किंवा आकाशादिक प्रपंच रज्जु सर्पासारखा मायिक अत्यंत तुच्छ किंवा मिथ्या असें कसें ह्मणतां अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात. कोणी अद्वैत आत्मतत्त्ववेत्ता ज्ञानी पूर्वश्लोकीं जो सांगितलेला देहेंद्रियादिक रूप प्रपंच तो प्रत्यक्ष प्रमाणादिकांनीं भासत असला तरी त्यापेक्षां स्वप्नांत पाहिलेले जे पदार्थ किंवा इंद्रजाल विद्येनें दाखविलेले जे पदार्थ त्या प्रमाणें हे मुळींच नसतां कसे हे भासतात अशा आश्चर्यानें पाहतो. तसा दुसरा कोणी हा प्रपंच जर सत्य आहे तर हा प्रपंच कालत्रयीं ही आत्मस्वरूपाचे ठायीं नाहीं. जसा सर्प रज्जूवर कालत्रयीं ही नाहीं असा श्रुतींत याचा निषेध केला आहे तो संभवणार नाहीं आणि यास सत्यता आहे असें ह्मणतां ही येत नाहीं. कारण जर हे देहेंद्रियादिक पदार्थ सत्य असते तर यांची उत्पत्ति कशी झाली, कोणा पासून झाली. हे उत्पत्ति पूर्वीं कोठें होते, असें निरूपण करतां येतें, निरूपण तर करवत नाहीं, पाहा हे देहेंद्रियादिक भाव म्हणजे पदार्थ कोठून उत्पन्न झाले आणि यांवर चैतन्य कसें आलें, हे वीर्या पासून उत्पन्न झाले असें ह्मणावें तर वीर्यावर यांचें कारणत्व प्रत्यक्ष दिसत नसतां तें आहे असें कशावरून समजावें. जर वीर्य आहे तर हे उत्पन्न होतात नाहींतर उत्पन्न होत नाहींत अशा अन्वयानें आणि व्यतिरेकानें त्यांची वीर्यावर कारणता आहे असें समजावें तर वंध्येचे ठायीं वीर्य व्यर्थ होतें या वरून हे अन्वय व्यतिरेक व्यभिचरित होतात. ह्मणजे वीर्य असलें ह्मणजे देहेंद्रियादिक खचित उत्पन्न होतात असा निश्चय करून देण्यास असमर्थ होतात. आणि वीर्य अचेतन असतां त्यावर चैतन्य कोठून येतें, पृथिव्यादिक भूतांचे विलक्षण संबंधानें उत्पन्न होतें तर मृत देहावर तो संघात रूप संबंध असतां ही तेथें चैतन्य कां नाहीं. या प्रमाणेंच वटादि वृक्ष बीजांतून कसा उत्पन्न होतो. बीज केवढें वृक्ष केवढा हा कोठें होतो. यास शाखा पल्लव कसे आले असा विचार करून पाहिलें म्हणजे हें कसें होतें तें सजत नाहीं दिसतें तर खरें यास्तव ही ऐंद्रजालिका प्रमाणें केवळ मायाच आहे असाच शेवटीं निश्चय होतो. यास प्रमाण-एतस्मात्किमिवेंद्रजालमपरं यद्गर्भवासस्थितं रेतश्चेतति हस्तमस्तकपदप्रोद्भूतनानांकुरं ॥ पर्यायेण शिशुत्व यौवन जरा वेषै रनेकैर्वृतं पश्यत्यत्ति शृणोति जिघ्रति तथा गच्छत्यथा गच्छति.॥ असें वाक्य आहे. जर हा देहेंद्रियादिक रूप प्रपंच असत् ह्मणजे शशशृंग, वंध्यापुत्र, इत्यादिकां प्रमाणें ह्मणावा तर याची प्रतीति होणार नाहीं. प्रतीति तर होते तस्मात् हा अनिर्वचनीय म्हणजे मिथ्या आहे, मिथ्या असतां ही सर्व व्यवहारास हा आस्पद होऊन त्या पासून खऱ्या सारखे सर्व व्यवहार होतात अशा आश्चर्यानें बोलतो.

तसेंच कोणी अनाम खं करून ह्मणजे आत्मभिन्न स्वरूपानें प्रत्यक्षादि प्रमाणांनीं-दिसत असतांही हें लोक हे देव इत्यादि जें कांहीं जगदिसतें तें सर्व आत्माच आहे असें जें वेदांत अद्वैत सांगितलें आहे त्याचें हें प्रत्यक्ष विरुद्ध आहे अशा शंकेच्या आश्चर्यानें श्रवणमात्र करतो. परंतु त्यास विरुद्ध वाटून अश्रद्धेनें त्या विषयीं मननादिक करीत नाहीं. कोणी श्रद्धावान् अद्वितीयात्मतत्त्वाचें वेदांतापासून श्रवण आणि स्वप्नादिक दृष्टांतावरून भासमान प्रपंच मिथ्याच आहे यामुळें अद्वैतच आत्मा आहे अशी जी उपपत्ति तद्रूप मनन, तसेंच निदिध्यासन हीं करून अद्वैतात्म तत्त्व प्रतिबंधकामुळें ह्मणजे देहादिकांवरील आत्मत्व बुद्धिरूप विक्षेपामुळें अपरोक्षत्वें करून जाणत नाहीं. अथवा कोणी कर्तृत्व, भोक्तृत्व, सुखित्व, दुःखित्व, इत्यादि धर्मांहीं करून युक्त आत्मस्वरूप प्रसिद्ध असतां ही वेदांतांतील महावाक्यापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्माकार अंतःकरण वृत्तीनें आत्मा अकर्ता, अभोक्ता, असंग, अद्वितीय आणि सच्चिदानंद रूप असा पाहतो ह्मणजे साक्षात्कारात्मक ज्ञानानें आश्चर्या प्रमाणें अनुभवितो अथवा ती वृत्ति मनापासून झाली असतांही जसें कतकरज ह्मणजे निवळी उदकांतील दुसऱ्या मळासकट्टां नाहींशी होऊन उदकास स्वच्छ करते त्याप्रमाणें ती वृत्ति आपणासकट्टां अज्ञान अंतःकरणादिकांचा नाश करून आत्म्यास अद्वितीय रूपानें दाखविते, असें जें होतें तें आश्चर्या प्रमाणें आहे आणि वाणीला आणि मनाला अगोचर जो आत्मा त्याप्रत वाणीनें जें बोलतो तें ही आश्चर्या प्रमाणें आहे. प्रतिबंधक कर्मयोगानें या आत्मतत्त्वाचें श्रवण ही कोणास होत नाहीं या अर्थाच्या श्रुती वरून जो कोणी श्रवण करणारा तो आश्चर्यवत् ह्मणजे दुर्लभ आहे, बहुत श्रवण करणारे ही या आत्म्यास तत्त्वें करून ह्मणजे अपरोक्षत्वें करून जाणत नाहींत. अशा अर्थाच्या श्रुती वरून कोणी या आत्म्याचें श्रवण करून ही अपरोक्षत्वें करून जाणत नाहींत. तस्मात् आत्मतत्त्व दुर्ज्ञेय आहे यास्तव त्यानें ज्ञानार्थ यत्नकर असें तात्पर्य. ॥२९॥

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ॥ तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥ ॥**

या प्रमाणें आत्मतत्त्व समजणें फार कठीण आहे असें सांगून त्या आत्म्या विषयीं शोक करणें अयोग्य आहे असें पूर्वीं सांगावयास जो आरंभ केला त्याची समाप्ति करतात. देह संबंध ज्यास आहे असा आत्मा या देहांचेठायीं कधीं ही वध करून घेण्या जोगा नाहीं. या कारणास्तव हे भारता अर्जुना, हे दीन आहेत यास मी बलवंतानें कसें मारावें, यांचे पुत्रादिक यांवांचून कसे जगतील. मीहि भीष्म द्रोणादिकांवांचून कसा जगेन या प्रकारचा सर्व प्राण्यांचा शोक करण्यास तूं योग्य नाहींस. ३०

**स्वधर्ममपिचावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ॥ ध-र्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत् क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१॥**

वेपथुश्च शरीरेमे रोमहर्षश्च जायते॥ म्हणजे माझ्या शरीरास कांप सुटला आहे, शरीरावर रोमांच उभा राहिला आहे. इत्यादिक जें अर्जुन पूर्वी बोलला तेंही योग्य नव्हे असें सांगतात. अथवा देहादिक अनात्म्यावरील अर्जुनाच्या आत्मत्व भ्रमाचें आत्मतत्वोपदेशानें निवारण करून स्वधर्म जें युद्ध त्यावर झालेली जी त्याची अधर्मबुद्धि तिचें निवारण करतात. युद्धापासून क्षत्रियांनीं पराङ्मुख होऊं नये अशा धर्मशास्त्रोक्त आपले क्षत्रिय धर्माकडे पाहिलें तरी तूं कंपित होण्यास योग्य नाहींस. ॥नच श्रेयोनुपश्यामि हत्वा स्वजन माहवे॥ ह्मणजे युद्धांत आपले स्वजनास मारून कल्याण होईल असें पाहात नाहीं. असें जें अर्जुन पूर्वी बोलला. त्याविषयीं सांगतात. धर्मानें प्राप्त झालेले युद्धाहून क्षत्रियांस दुसरें कल्याण कारक कांहीं नाहीं. आपले बरोबरीचे किंवा आपले पेक्षां मोठे किंवा लहान यांनीं युद्धार्थ बोलाविलें असतां पराङ्मुख होऊं नये. आपल्या क्षत्रिय धर्माचें स्मरण करून त्यांशीं युद्ध करावें आणि प्रजांचें पालन करावें, संग्रामापासून पराङ्मुख न होणें, प्रजांचें पालन करणें, ब्राह्मण शुश्रुषा करणें हा राजांचा ह्मणजे क्षत्रियांचा श्रेयस्कर धर्म आहे. असें मनु पराशरादिकांचे स्मृतींत सांगितलें आहे, यावरून युद्ध द्वारा राज्य मिळवून ब्राह्मणांचें संरक्षण करावें हेंच क्षत्रियांस कल्याण कारक आहे असा भाव. ॥ ३१॥

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ॥ सुखि-नः क्षत्रियाः पार्थ लभंते युद्धमीदृशम् ॥ ३२॥ ॥**

मोठें कल्याण कारक युद्ध आपो आप प्राप्त झालें असतां कां कांपतोस असें सांगतात. हे अर्जुना, जे सभाग्य क्षत्रिय आहेत ते प्रार्थनें वांचून प्राप्त झालेलें आणि स्वर्गास जाण्यास जसें काय उघडलेलें द्वार अशा प्रकारचे युद्धा प्रत पावतात. अथवा अशा युद्धा प्रत जे पावतात तेंच क्षत्रिय सुखी ह्मणावे. येणें करून ॥ स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव॥ ह्मणजे स्वजनांस मारून आह्मीं कसे सुखी होऊं असें जें पूर्वी अर्जुन बोलला त्याचें हीं उत्तर झालें. ॥ ३२॥

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ॥ ततः स्वधर्मं कीर्तिंच हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३॥**

युद्ध न केलें तर दोष आहे असें सांगतात. जर तूं हिंसादि दोष ज्ञानता-

होंत अशा क्षत्रिय धर्मानें प्राप्त झालेले युद्धापन न करशील तर स्वधर्मापन आणि महादेवा बरोबर ही तूं युद्ध केलेंस अशी जी तुझी कीर्ति आहे त्या कीर्तिपन टाकून म्हणजे मुकून शास्त्र विहित युद्धाचा त्याग केल्या मुळें आणि युद्धा पासून क्षत्रियांनीं परतूं नये. अशा निषेधानें आचरणा मुळें पापापन पावशील. ॥ ३३ ॥

अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् ॥
संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥

आणि जिचा नाश नाहीं अशा दीर्घ काल राहणाऱ्या तुझ्या अकीर्तीपन लोक बोलतील. प्रतिष्ठितास अकीर्ति मरणा पेक्षां ही अधिक आहे. येणें करून सामें करून, दानें करून, किंवा भेदें करून म्हणजे शत्रूंचे सैन्यांत फितूर करून शत्रूंचे जया विषयीं चा प्रयत्न करावा. युद्धांत विजय कोणाचा होईल याचा निश्चय नाहीं यास्तव युद्ध सहसा करूं नये. पूर्वोक्त तीन उपायांनीं जर शत्रु वश होत नाहीं तर मग युद्ध करावें आणि तें तरी सामर्थ्य असेल तर करावें. असें भारतीं शांतिपर्वांत सांगितलें आहे, यास्तव युद्धांत मरण प्राप्त होईल अशी ज्यास भीति आहे त्यानें अकीर्तिचें ही सहन करावें या शंकेचें निराकरण केलें. शांति पर्वांत सांगितलें आहे तें अर्थशास्त्र आहे आणि युद्ध करावें हें धर्मशास्त्र आहे. तेव्हां हें त्यापेक्षां प्रबल आहे असें तात्पर्य. ॥ ३४ ॥

भयाद्रणादुपरतं मंस्यंते त्वां महारथाः ॥ येषां
च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥

जे महारथी आहेत ते तूं भयामुळें रण सोडिलें असें मानितील आणि तूं मोठा मान्य असून त्या महारथ्यां मध्यें सांपन लघुत्वा पन येशील.

अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यंति तवाहिताः ॥ निं-
दंतस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥

आणि अर्जुनाच्या सामर्थ्याला धिक्कार असो अशी तुझ्या सामर्थ्याची निंदा करणारे तुझे शत्रु भीष्मादिकांस पाहून अर्जुन पळाला अर्जुन भित्रा, षंढ आहे, असें जें तुला बोलण्यास अयोग्य शब्द त्यांपन पुष्कळ बोलतील मग यापेक्षां मोठें-दुःख तें कोणतें आहे. ॥ ३६ ॥

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीं ॥
तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥

नचैतद्विद्मः कतरन्नोगरीयो यद्वाजयेम यदिवा नोजयेयुः॥ म्हणजे युद्ध करण्यांत किंवा न करण्यांत आमचें कल्याण आहे, तसेंच आम्हीं त्यांस जिंकूं किंवा ते आम्हांस जिंकतील हें आम्हीं जाणत नाहीं, असें जें अर्जुन पूर्वी बोलला त्या विषयीं सांगतात. युद्धांत मरण पावलास तर स्वर्गास जाशील आणि जर शत्रूंस जिंकलें तर पृथ्वी पत भोगशील. दोहीं पक्षीं तुझें कल्याणच आहे. या कारणास्तव हे अर्जुना, युद्धाविषयीं निश्चय करून ऊठ. ॥ ३७॥

## सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ॥
## ततोयुद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि॥ ३८॥

स्वधर्म जें युद्ध तें न केलें तर धर्म आणि कीर्ति यांचा नाश होईल. आणि पाप लागेल. असें जरी – अथचेत्व मिमं धर्म्यं – या श्लोकानें भगवंतांनीं सांगितलें आहे तथापि युद्ध हा धर्म काम्य आहे नित्य नाहीं असें मानून राज्यसुखाचे लोभानें आम्ही स्वजनांस मारण्यास उद्युक्त झालों हें केवढें पाप करण्यास आम्हीं प्रवृत्त झालों असें जें – अहोबत महत्पापं – या श्लोकांत अर्जुन बोलला त्यावरून हें काम्यरूप युद्ध केल्यानें बंधुनाशा पासून पाप लागेल असें अर्जुनाच्या मनांत येऊन यांपत मारून – आम्हांस पापच लागेल. असें जें तो बोलला त्याविषयीं सांगतात. सुख आणि दुःख – यांचें कारण लाभ आणि अलाभ आणि त्यांचें कारण जय आणि पराजय यांपत समान मानून नंतर युद्धास तयार हो. असें केलेंस तर तुला पाप लागणार नाहीं. तात्पर्य— सुख्यादिकांचा अभिलाष न धरितां स्व धर्म बुद्धीनें युद्ध करशील तर तुला पाप लागणार नाहीं. जर राज्य लोभानें बंधुवध करशील तर पाप लागेल असें जर आहे तर – जर युद्धांत मरण पावलास तर स्वर्गास जाशील असें स्वर्ग फल कसें सांगितलें अशी शंका करूं नये. नित्य धर्मानें आचरण स्वधर्म बुद्धीनें फलेच्छे वांचून केलें तरी तेणें करून आनुषंगिक फल होतें. आम्रवृक्ष केवळ फलार्थ जरी लाविला तरी त्या पासून छाया आणि गंध हे अनुषंगानें येतात. असें आपस्तंब ऋषीनें सांगितलें आहे यावरून – स्वधर्म बुद्धीनें फलेच्छा न धरितां युद्ध केलें तरी त्यांस मरण आलें तर त्यांना स्वर्गफल होईल हें उघड आहे. ॥ ३८॥

## एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ॥
## बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि॥ ३९

देहच आत्मा आहे त्याचे नाशानें आत्म्याचा नाश होतो. आणि युद्ध हा स्वधर्म असतां ही हा अधर्म आहे असे जे दोन अर्जुनास मोह झाले होते त्यांचें निराकरण केलें त्या निराकरण प्रसंगानें आत्मा कोणास मारीत नाहीं आणि कोणा पासून

मारवीन ही नाहीं असा आत्म्याचे ठायीं कर्तृत्वादिकांचा असंभव सांगितला आणि ततो युद्धाय युज्यस्व ॥ येणें करून युद्धा विषयीं अर्जुनास नियोग केला. हें कर्तृत्व आणि अकर्तृत्व परस्पर विरुद्ध आहे हें आत्म्यास कसें संभवेल अशी शंका येईल तर तिचा परिहार अधिकारिभेदानें ह्मणजे ज्ञानावस्थेंत अकर्तृत्व आणि अज्ञानावस्थेंत कर्तृत्व अशा व्यवस्थेनें करण्या विषयीं एथ पर्यंत अर्जुनास ज्ञान योगाचा जो उपदेश केला त्याची समाप्ति करून ज्ञान योग होण्यास साधन भूत जो कर्म योग त्याची प्रस्तावना करतात. प्रथम सांख्य शास्त्राचा विग्रह करून दाखवितों सम्यक् ह्मणजे उत्तम प्रकारें करून म्हणजे अपरोक्षत्वें करून ख्यायते म्हणजे प्रकाशित होतें. सच्चिदानंद, अद्वितीय आणि असंग एतत्स्वरूप आत्मवस्तु जीणें करून तीस संख्या-ह्मणजे उपनिषत् किंवा अपरोक्ष ज्ञान ह्मणावें तिचे ठायीं किंवा तिणें करून प्रकाशित होणारें जें त्यास संख्य म्हणावें. जें संख्य त्यासच सांख्य ह्मणावें त्याविषयीं म्हणजे उपनिषदांतील आत्म तत्त्वाविषयीं ही तुला बुद्धि सांगितली. मनाचे अशुद्धिने मुळें मी सांगितलेल्या अद्वैत आत्म तत्त्वाचें अपरोक्ष ज्ञान तुला जर होत नसेल तर अंतःकरण शुद्धीचे द्वारा आत्मतत्त्वाच्या साक्षात्कारास साधन जो कर्म योग-त्याचेंच तुला अनुष्ठान केलें पाहिजे, त्या कर्मयोगा विषयीं - सुखदुःखे समे कृत्वा-येणें करून संक्षेपानें सांगितलेली जी फलाभिसंधि त्यागरूप कर्मा विषयींची बुद्धि ती विस्तारें करून तुला सांगतों ती ऐक. ज्या कर्माच्या ज्ञानानें युक्त होऊन केलेले कर्माचे निष्काम बुद्धीनें ईश्वरास अर्पण केलें तर शुद्धांतःकरण होऊन ईश्वराचे प्रसादानें कर्म स्वरूप जो जन्ममरण देणारा बंध त्याप्रत सोडशील ह्मणजे त्यापासून मुक्त होशील अथवा धर्मानें पापाचा नाश होतो या अर्थाच्या श्रुति प्रमाणा वरून कर्मरूप जो ज्ञान होण्यास प्रतिबंध त्याप्रत टाकशील म्हणजे ज्ञाना विषयीं कर्माचरणानेंच पुनः तुला प्रतिबंध होणार नाहीं. ॥३९॥

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ॥ स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥**

कृष्यादिक कर्माचा आरंभ केला असतां कदाचित् अवृष्ट्यादिरूप प्रतिबंध झाला तर त्या विघ्नानें तें कर्म जसें निष्फळ होतें तसाच या कर्माचा आरंभ केल्यावर मध्येंजर विघ्न होईल तर या कर्माचा आरंभ ही निष्फळ होईल आणि या कर्माचे अनुष्ठानांत मंत्रादिक अंगांचें वैगुण्य झालें तर पापही लागेल मग असें कर्मयोगानें मी बंधा पासून कसा मुक्त होईन आणि आत्म ज्ञानें करूनच कर्माचा किंवा कर्म बंधाचा-क्षय श्रुतींत सांगितला आहे. जंतु, कर्मे करून बंध पावतो असा कर्मा पासून बंधन सांगितला आहे असें असून येथें- कर्मबंधं प्रहास्यसि - असें कर्मे करून कर्म

बंधा पासून मुक्त होशील. असें कसें सांगितलें असें जर अर्जुन ह्मणेल तर त्याविषयीं सांगतात. जो आतां तुला मी निष्काम कर्मयोग सांगतों त्याचा प्रारंभ केला असतां त्याचा नाश नाहीं ह्मणजे त्यास निष्फलत्व नाहीं आणि मंत्रादिक अंगाचे वैगुण्यामुळें पापही लागणार नाहीं. तात्पर्य - कर्म करते वेळेस ईश्वराचा उद्देश केला ह्मणजे कर्मांत विघ्न किंवा वैगुण्य होतच नाहीं जर कदाचित् होईल तर त्याविषयीं सांगतात. केवळ ईश्वरोद्देशें करून निष्काम कर्मांचा केवळ आरंभ केला तरी तो आरंभच मोठें भया पासून तारतो. तात्पर्य - ईश्वरानेंच या सर्व जगाचें स्तंभन केलें आहे यास्तव कोणीही स्वेच्छें करून कांहीं ही करण्यास समर्थ होत नाहीं यास्तव सर्वत्र ममता शून्य होऊन कर्तृत्व भोक्तृत्वादिकां विषयींचा अभिमान सोडून भोगांचा उपभोग कर आणि यावज्जीव कर्में करीत राहण्याची इच्छा कर. असें तूं केलेंसतर तुला कर्मांचा लेश ह्मणजे कर्मबंध होणार नाहीं. या वांचून दुसरा मार्ग नाहीं. असें श्रुतींतच सांगितलें आहे. यावरून जी निवळी स्वतः मलरूप असतां ही आपलें रूढ्यां दुसऱ्या मलास दूर करून उदकास स्वच्छ करते. तसें कर्तृत्वाभिमान फलेच्छा इत्यादिक सोडून केलेलें ईश्वराधनार्थ निष्काम कर्म, कर्म बंधा पासून जीवास चित्तशुद्धीचे द्वारानें आत्मज्ञानाची प्राप्ति करवून मुक्त करतें. अंग वैगुण्य झालें तर काम्य कर्म निष्फळ होतें. काम्य कर्मा प्रमाणें निष्काम कर्मा विषयीं सर्व अंगें झालींच पाहिजेत असा निर्बंध नाहीं जितकी शक्ति करणाराची असेल तितकेंच अंगाचें अनुष्ठान झालें तरी पुरतें. ॥५०॥

## व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ॥ बहुशाखाह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१॥ ॥

हें कशावरून असें कोणी ह्मणेल तर त्या विषयीं निष्काम कर्म आणि सकाम कर्म या दोहोंचें वैलक्षण्य ह्मणजे भेद सांगतात. हे कुरुनंदन म्हणजे अर्जुना, ईश्वराराधन स्वरूप जो निष्काम कर्मयोग त्याचे ठायीं परमेश्वर भक्ति करूनच मी निश्चयें करून तरेन अशी निश्चयात्मक एकच बुद्धि होते. अव्यवसायी ह्मणजे बहिर्मुख असून नानाविध फलांची इच्छा करणारे त्यांच्या अनंत फलां विषयींच्या अनंत इच्छा आहेत. यामुळें अनंत बुद्धि होतात. अनंत बुद्धीचे ही कर्मांचीं स्वरूपें आणि त्यांचीं फलें आणि त्यांच्या देवता यांचे प्रकार बहुत आहेत. यामुळें अवांतर भेद अनंत होतात. ईश्वरोद्देशें करून जें निष्काम कर्म करावयाचें तें जशी शक्ति असेल त्या प्रमाणें करावें असाच त्याचा विधि आहे. यास्तव त्यांत अंगाचें वैगुण्य झालें तरी तें निष्फळ होत नाहीं. काम्य कर्म तसें नाहीं, यास्तव निष्काम व काम्य या कर्मांचा मोठा भेद आहे. अथवा जर सांख्य आणि कर्म योग यांस भयापासून त्राणक-

त्त्व आहे तर मग सांख्य आणि योग यांचा विशेष काय अशी शंका येईल तर त्या- विषयीं सांगतात. व्यवसाय ह्मणजे मी ब्रह्म आहें अशी आत्मतत्त्व निश्चयात्मक बु- द्धि ह्मणजे ब्रह्मसाक्षात्काररूप ज्ञान एकच आहे ह्मणजे एकवार तसा साक्षात्कार झाला ह्मणजे अज्ञान नाश होऊन जीवन्मुक्ति प्राप्त होते आणि कृतकृत्य होऊन कां- हीं कर्तव्य राहत नाहीं. जे अव्यवसायी ह्मणजे अज्ञानी कर्मयोगी आहेत त्यांचा हें कर्म कल्याणकारक आहे किंवा अकल्याण कारक आहे असा संशय असल्या मुळें- कर्मांविषयींच्या त्यांच्या बुद्धि अनंत आहेत आणि त्यांचे अवांतर भेदही पुष्कळ आ- हेत यास्तव त्यांस जें कर्म कल्याण कारक नव्हे त्यांवर हें कल्याण कारक आहे अशी त्यांची कदाचित् बुद्धि झाली तर त्यांचे पतनाची शंका आहे. यास्तव सांख्य आणि योग यांचें मोठें वैलक्षण्य ह्मणजे भेद आहे. ॥४१॥

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः ॥ वेदवा दरताः पार्थ नान्यदस्तीतिवादिनः ॥ ४२॥ कामा- त्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ॥ क्रियावि- शेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३॥ भोगै- श्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ॥ व्यवसा यात्मिका बुद्धिः समाधौ नविधीयते ॥ ४४ ॥ ॥**

असें जर आहे तर सकाम जन फलाची इच्छा सोडून व्यवसायात्मक बुद्धि- त कां करीत नाहींत. असें ह्मणालतर त्याविषयीं तीन श्लोकांनीं सांगतात. हे पार्थ, म्हणजे अर्जुना, चातुर्मास्यें करून यजन करणाऱ्यास अक्षय पुण्य होतें. सोमया- गांत सोमपान करणाऱ्यांस अमरत्व प्राप्त होतें इत्यादिक त्यात्या कर्मांचे स्तव कर- णारे जे वेदांतील अर्थवाद आहेत त्यांतच रत ह्मणजे मग्न झालेले आणि त्या त्या कर्मां शिवाय दुसरें प्राप्त होण्याजोगें आत्मतत्त्व नाहीं. असें त्या अर्थ वरांवरून- बोलणारे आणि नेहेमी मनोरथांत बुडालेले आणि स्वर्ग सुखादिक विषयच पर- म पुरुषार्थ आहे अशा बुद्धीनें त्यांचे भोग करण्याविषयीं ज्यांचें मन व्याकुळ - आहे असे जे आत्मज्ञान शून्य मूढ ते मर्त्यलोकीं जन्म होऊन तेथें कर्म आणि त्यां- चीं फळें यांमत देणारी ह्मणजे त्यांचें प्रतिपादन करणारी आणि अमृत, उर्वशी- विहार पारिजातादि कल्पवृक्षांच्या पुष्पांचा गंध - एतन्निमित्तक जो भोग आणि- ऐश्वर्य यांची प्राप्ति होण्यास साधनभूत जे कर्मांचे भेद ते पुष्कळ जींत सांगितले आहेत अशी आणि पुष्पित जी विषवल्ली तिचे प्रमाणें विचार केला नाहीं तों पर्य- तमात्र सुंदर दिसणारी अशी जी स्वर्गादि फलश्रुति रूप वाणी ती प्रत बोलतात. -

त्या वार्णीनें काम्य कर्माकडेच ज्यांचें चित्त ओढून घेतलें आहे आणि भोग आणि ऐश्वर्य यां विषयीं जे आसक्त झाले त्यांस निष्काम बुद्धीनें केवल ईश्वर प्रीत्यर्थच कर्म करावें. ईश्वरच आपणास तारील. अशी जी चित्ताची समाधि ह्मणजे ईश्वराकडे एकाग्रता ती विषयीं निश्चयात्मक बुद्धि उत्पन्न होत नाहीं. अथवा फलासक्तीनें बुद्धि व्यग्र होऊन समाधिच नाहींसा होतो. यामुळें समाधींत शुद्ध ब्रह्माकार वृत्तिरूप बुद्धि होत नाहीं अथवा समाधि ह्मणजे अंतःकरण तें व्यग्र असल्यामुळें त्यांचे ठायीं सांगितलेली व्यवसायात्मक बुद्धि होत नाहीं. ॥४२॥४३॥४४

## त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ॥ निर्द्वंद्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५

असें जर आहे तर स्वर्गप्राप्ति होण्यासाठीं ज्योतिष्टोमादिक कर्में करावीं असें वेदांत विधि कां सांगितले अशी शंका येईल तर त्याविषयीं सांगतात. किंवा ती बुद्धि समाधीचे ठायीं कोणास होते या विषयीं सांगतात. त्रिगुणात्मक ह्मणजे सकाम जे आहेत त्यांनीं स्वर्ग प्राप्ति होण्यासाठीं ज्योतिष्टोमादिक कर्में करावीं असें वेद सांगतात. हे अर्जुना, तूं निष्काम हो आणि नित्यसत्त्वस्थ ह्मणजे धैर्ययुक्त होऊन शीत उष्ण, सुख दुःख, क्षुधा तृषा, हीं जीं द्वंद्वें ह्मणजे युगुळें तद्रहित हो. ह्मणजे त्या द्वंद्वांचें सहन कर. आणि न मिळालेलें मिळवावें यास योग ह्मणतात. आणि मिळविल्याचें संरक्षण करणें यास क्षेम ह्मणतात. या योगक्षेमानीं रहित हो. आणि आत्मवान् ह्मणजे अप्रमत्त ह्मणजे आपल्या कल्याणा विषयीं सावधान हो. द्वंद्वानीं जो व्याकुळ आहे आणि योगक्षेमा विषयीं जो यत्न करणारा आहे त्यास निष्कामता होत नाहीं असें तात्पर्य.— अथवा ऊर्ध्वं गच्छंति सत्त्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः — या श्लोकांत ऊर्ध्वलोकीं, मनुष्य लोकीं आणि अधो लोकीं जें गमनागमनरूप कर्मफल तत्स्वरूप जें तीन गुणांचें कार्य तेंच कर्म कांडानें जें प्रकाशित करतात म्हणजे अमुक कर्मानें अमुक फल होतें. असें सांगतात. ते त्रैगुण्य विषय वेद आहेत, तूं निस्त्रैगुण्य हो ह्मणजे स्वर्गादिक जे ऊर्ध्वलोक त्यांतील सुखाविषयीं ही विरक्त हो - म्हणजे तुझी पूर्वोक्त समाधीचे ठायीं व्यवसायात्मक बुद्धि होईल. ॥ ४५ ॥

## यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ॥ तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥ ॥

वेदांत सांगितलेल्या स्वर्गादिक नाना फलांचा त्याग करून निष्काम होऊन ईश्वराराधना विषयीं निश्चयात्मक बुद्धि करण्यांत काय फळ आहे अशी शंका येईल तर त्या विषयीं सांगतात. ज्यांत स्वल्प उदक आहे असें जें उदपान ह्मणजे विहीर, त-

ळें इत्यादिक त्यांचे ठायीं अल्प उदकामुळें एके विहिरींत किंवा तळ्यांत स्नानपानादिक सर्व व्यवहार होण्याच्या असंभवामुळें त्यासर्वांकडे जाऊन जितकें स्नानपानादिक कार्य होतें तितकें ही सर्व ज्यांत चहूंकडून उदक परिपूर्ण भरलें आहे अशा एकाच मोठ्या डोहाकडे गेलें असतां जसें होतें त्या प्रमाणें सर्व वेदांत सांगितलेलीं जीं स्वर्ग सुखादिक नाना फलें देणारीं अनेक कर्में त्या सर्व कर्मांचें सर्वफल व्यवसायात्मक बुद्धियुक्त जो ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण त्यास प्राप्त होतें. प्रत्येक कर्म करणारास मात्र सर्व प्राप्त होत नाहीं, प्रत्येक कर्माचें जें फल तें मात्र त्यास प्राप्त होतें. ज्यांची व्यवसायात्मक बुद्धि आहे त्यांस मात्र सर्व कर्मांचें फल प्राप्त होतें. ॥ तात्पर्य — सर्व कर्मांचीं जीं प्रत्येक स्वर्ग सुखादिक फलें त्यांचा ब्रह्मानंदांत समावेश आहे. म्हणून पूर्णानंद स्वरूप जें ब्रह्म तें स्वात्मत्वें करून ज्यांनीं अनुभविलें त्यांस ब्रह्मानंदांत सर्व कर्मांच्या सर्व सुखरूप फलांचा ब्रह्मानंद स्वरूपानें अनुभव होतो अथवा चित्तशुद्धि झाली तर आत्मतत्त्व ज्ञान होतें, चित्तशुद्धि तर वेदोक्त कर्मानुष्ठाना वांचून होत नाहीं. तेव्हां वेदोक्त कर्में अवश्य केलीं पाहिजेत. मग निस्त्रैगुण्य होंउ सांगितलें तें कसें व्हावें अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात. मोठें जलाशयांत पुरुषाचें स्नान पानादिक सर्व कार्य घट परिमित जलानें ही जसें होतें आणि त्या साठीं त्या जलाशयांतील सर्व उदकाचा व्यय करण्याची जशी गरज नाहीं त्याप्रमाणें एके जन्मांत सर्व वेदोक्त कर्माचें अनुष्ठान तर संभवत नाहीं, या जन्मींचें किंवा जन्मांतरीचें जपादि कर्मे करून मुमुक्षु जो ब्राह्मण त्याची चित्तशुद्धि होऊन वेदांतील एक देश रूप जीं उपनिषदें त्यांच्या श्रवणादिकें करून ही ज्ञान द्वारा त्यास मोक्षरूप प्रयोजन सिद्ध होतें. यास्तव त्या प्रयोजना साठीं सर्व वेदोक्त कर्मानुष्ठान करण्याची त्यास गरज नाहीं. या रीतीनें निस्त्रैगुण्य संभवतें. ॥ ४६ ॥

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ॥ मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥ ॥**

असें आहे तर तत्त्वज्ञाना पासूनच सर्व कर्मांचीं फलें प्राप्त होतील. मग तत्त्व ज्ञानार्थी जो मी यास शमच योग्य आहे कर्म कशास केलें पाहिजे असें जर अर्जुन म्हणेल तर त्या विषयीं सांगतात. तत्त्व ज्ञानेच्छु जो तूं याची चित्तशुद्धि होण्या साठीं कर्मा विषयींच अधिकार म्हणजे इच्छा असो आणि बंधास कारण जीं त्यांचीं फलें त्यां विषयीं इच्छा नसो. भोजन केलें असतां तृप्तिरूप फल जसें होतें तसेंच कर्म केलें असतां त्याचें फल अवश्य होईलच मग त्या विषयीं इच्छा नसो असें कसें होईल. असें जर म्हणेल तर त्याविषयीं सांगतात. कर्म फलाचे इच्छेनें कर्म करण्यास प्रवृत्त होऊं नको. कर्माविषयीं प्रवृत्त करणारा जो वेदांतील विधि त्यावरून स्वर्गा-

दि फलेच्छा करून जे कर्म करतात त्यांनेंच स्वर्गादिक फल आहे फलाची इच्छा न धरतां केलेले कर्मानें फल स्वर्गादिक नाहीं असें त्यानें तात्पर्य आहे, यास्तव कर्म बंधक होईल या कारणानें कर्म न करण्या विषयीं तुझी निष्ठा नसो. ॥ ४७ ॥

योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ॥ सिद्ध्य सिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८

सर्वदां ईश्वर परायण होणें असा जो योग त्याचे ठायीं स्थित होऊन आणि कर्माचा कर्ता मी केलेलीं कर्मे माझीं आहेत असा संग ह्मणजे अभिमान सोडून आणि चित्त शुद्धीचे द्वारा ज्ञान प्राप्तिरूप जी कर्म फलाची सिद्धि किंवा ज्ञानप्राप्ति रूप जी असिद्धि या विषयीं समान बुद्धि होऊन हे धनंजया ह्मणजे अर्जुना, तूं कर्मे कर. सांगितलेली समान बुद्धि चित्तानें समाधान करणारी आहे यामुळें तीसच विद्वान योग असें ह्मणतात. ॥ ४८ ॥

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ॥ बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥

आतां काम्यकर्म फार हलकें आहे असें सांगतात. सांगितलेले व्यवसायात्मक बुद्धीनें केलेला जो निष्काम कर्मरूप योग अथवा चित्तशुद्धि द्वारा ज्ञानास साधन जो निष्काम कर्मरूप योग त्यास बुद्धियोग असें ह्मणतात त्याहून काम्यकर्म फार निकृष्ट आहे यास्तव हे धनंजया अर्जुना, बुद्धि म्हणजे कर्मयोग रूप किंवा त्याचें फल सांख्य तद्रूप ज्ञान त्याचे प्राप्ती विषयीं शरण म्हणजे आश्रय करण्यास योग्य जो कर्मयोग त्याचें अनुष्ठान कर. किंवा त्या बुद्धीचे प्राप्ती विषयीं शरण ह्मणजे सर्वांचा रक्षण करणारा जो परमेश्वर त्याप्रत अन्विच्छ ह्मणजे प्रार्थना कर म्हणजे ईश्वर प्रीत्यर्थ कर्मे कर. फलेच्छा करणारे जे मनुष्य ते कृपण ह्मणजे दीन आहेत. तात्पर्य- मोठे यत्नानें धन संपादन करणारे किंवा त्याचे दान भोग न करतां रक्षण मात्र करणारे कृपण जन, यत्किंचित दृष्ट फल अशा धनलोभानें दाना पासून होणार जें मोठें स्वर्गादिक सुख त्याचें संपादन न करतां आपणास फसवून घेतात त्या प्रमाणें महत्फल भूत जें मोक्ष सुख तदर्थ निष्काम कर्म ईश्वरो द्देशें करून न करून क्षुद्र जें स्वर्गादिक फल तदर्थ मोठे दुःखानें सकाम कर्म करणारे आपणास फसवून घेतात यास्तव ते कृपण म्हणजे दीनच आहेत. ॥ ४९ ॥

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ॥ तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५०

जो बुद्धियोगानें युक्त आहे तो श्रेष्ठ आहे असें सांगतात. बुद्धियोगयुक्त जो पुरुष तो स्वर्गादि फल देणारें पुण्य तसेंच नरक देणारें पाप या दोहोंपासून याचजन्मीं परमेश्वर प्रसादानें टाकितो. येथें धर्मानें पापाचा नाश होतो. अशा श्रुति वरून निष्काम कर्मयोगानें पापाचा नाश सिद्ध आहे; परंतु निष्काम कर्म हें पुण्य आहे, तेव्हां पुण्यानें पुण्य कसें नाश पावतें अशी शंका होते; परंतु येथें फलाचा त्याग होतो तो निष्काम कर्मानें चित्त शुद्धि होऊन ज्ञान झालें म्हणजे ज्ञानाग्नि सर्व कर्मांचा दाह करतो या शास्त्रा वरून होतो. अथवा असें पापफल मोक्षास प्रतिबंधक आहे तसें पुण्यफलही मोक्षास प्रतिबंधक आहे तेव्हां पुण्यकर्माचे फलाचा जो त्याग कर्मयोगी करतो तोच येथें फलाचा फलद्वारा त्याग सांगितला, फलत्याग केला म्हणजे फल उत्पन्न न होऊन मोक्षास तें फल प्रतिबंध करीत नाहीं यामुळें तें फल त्यक्त्या प्रमाणेंच होतें असें तात्पर्य, म्हणून निष्काम कर्मयोगरूप जो बुद्धियोग तो करायाला तयार हो. बंधक कर्में ही ईश्वरास समर्पून त्यांस मोक्ष साधनत्व आणण्याचें जें चातुर्य त्यासच योग असें म्हणावें. ॥५०॥

## कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः॥
## जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥५१

कर्मास मोक्षसाधनत्वाचा प्रकार सांगतात बुद्धियुक्त म्हणजे समत्व बुद्धियुक्त असे जे केवल ईश्वर प्रीत्यर्थ कर्म करणारे आहेत ते मनीषी म्हणजे मनोनिग्रह समर्थ होऊन कर्म फलाचा त्याग करून ईश्वर प्रसादानें आत्मतत्व ज्ञानी आणि जन्ममरण रूप जो बंध त्या पासून मुक्त असे होऊन निरुपद्रव अशा मोक्षपदास जातात. ॥५१॥

## यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति॥ तदा
## गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥५२॥ ॥

त्या मोक्ष पदास मी कधीं जाईन किंवा मनीषी केव्हां होईन असें अर्जुन म्हणेल तर त्याविषयीं दोन श्लोकांनीं सांगतात. केवल ईश्वर प्रीत्यर्थ केलेलें निष्काम कर्म योगानें ईश्वर प्रसाद होऊन तुझी बुद्धि जेव्हां देहादिकावर आत्मबुद्धिरूप जो मोह आणि तन्मूलक जो इष्ट प्राप्तीनें सुख होतें. इष्टयोगानें दुःख होतें इत्यादिक मोह तद्रूप जें कलिल म्हणजे गहन अरण्य किंवा कलुषता म्हणजे मलिनता ती पार तरून जाईल किंवा प्रसन्न होईल तेव्हां अमुक कर्म केलें असतां अमुक स्त्री पुत्र स्वर्गादिक फल होतें. असा फलश्रुतीचे वाक्यानें ऐकावयाचा किंवा ऐकिलेला जो स्त्रीपुत्र स्वर्गादिक रूप अर्थ त्याविषयीं वैराग्य पावशील

म्हणजे स्वावर अज्ञानमल बुद्धीनें तो मला प्राप्त व्हावा अशी इच्छा करणार नाहींस. अथवा बुद्धि प्रसन्न झाली म्हणजे श्रोतव्य ह्मणजे श्रवण करावयाचा आणि श्रुत ह्मणजे श्रवण केलेला जो शास्त्रभाग त्याविषयीं वैराग्य पावेल. तात्पर्य:- जर बुद्धि मलिन आहे तर वारंवार ऐकलेल्या ही शास्त्रार्थानें स्फुरण किंवा अनुभवात्मक ज्ञान होत नाहीं. यास्तव श्रोतव्य आणि श्रुत हीं व्यर्थच आहेत. जर बुद्धि शुद्ध आहे तर एकवार महावाक्यार्थ श्रवण केल्यानें सकल शास्त्रार्थ भूत अद्वैतात्म साक्षात्कार होतो. या मुळें श्रोतव्य आणि श्रुत हे शास्त्रभाग व्यर्थच आहेत. या दोन्ही पक्षीं ही त्याविषयीं वैराग्यच योग्य आहे. प्रसन्न झालेली बुद्धि निग्रह करण्यास योग्य होते यास्तव एकवार श्रवणानें अद्वैत ब्रह्मात्म ज्ञान झालें ह्मणजे मग निरर्थक जें श्रवण त्याचा त्याग करून जीवन्मुक्ति स्वसामाठीं किंवा ज्ञानाचे दृढत्वासाठीं ध्याननिष्ठच व्हावें ध्याननिष्ठासच मर्नीषी ह्मणतात. ॥ ५२॥

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ॥ समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३॥**

नाना विध फलें देणारीं जीं नानाविध कर्में त्यांचें प्रतिपादन करणाऱ्या आणि त्या त्या कर्मांची प्रशंसा करणाऱ्या आणि जीवेश्वर भेदरूप द्वैत प्रतिपादन करणाऱ्या- तशाच अन्नमय देहादिकांस आत्मत्व प्रतिपादन करणाऱ्या अशा ज्या विधि आणि अर्थ वाद रूप आणि आत्मस्वरूप प्रतिपादन करणाऱ्या अनेक श्रुति त्यांच्या श्रवणें करून हें करावें, हें न करावें, आत्मा कर्ता, आत्मा अकर्ता, द्वैत, अद्वैत, अशा विवादानीं ग्रस्त झालेली तुझी बुद्धि जेव्हां उत्तम प्रकारें करून समाधान पावेल. चित्त ज्याचे ठायीं असा जो समाधि ह्मणजे ईश्वर किंवा ब्रह्मात्माद्वैत त्याचे ठायीं विषयांतराकडे न जातां परमेश्वरच निष्काम कर्म समर्पण केल्यानें संसारापासून तारील किंवा ब्रम्हात्माद्वैतच सर्व श्रुतींच्या तात्पर्याचा विषय आहे अशा निश्चयानें विपरीत भ्रमरूप जो विक्षेप तेणें करून रहित अशी स्थिर होईल. तेव्हां योग ह्मणजे योगानें फल जें तत्त्व- ज्ञान त्या प्रत पावशील. ॥ ५३॥

**अर्जुनउवाच ॥ ॥ स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ॥ स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥ ॥**

कर्मजं बुद्धि युक्ताहि ॥ या श्लोकांत सांगितलेला जो आत्मतत्त्व ज्ञानी ज्यास स्थितप्रज्ञ किंवा लब्ध समाधि म्हणतात त्याचें लक्षण कोणतें तें समजण्याची इच्छा धरून अर्जुन बोलतो. हे केशवा कृष्णा, बाह्य विषयांपासून मनाच्या वृत्ति काढून-

स्वात्मा जो परमेश्वर त्याच्या ठायीं त्याचा निरोध करणें असा जो समाधि त्याचे ठायीं जो राहिलेला आणि याच कारणानें आत्मतत्वाचे ठायीं मी ब्रह्म आहें अशी बुद्धि स्थिर झाली आहे असा जो स्थितप्रज्ञ त्यास कोणत्या लक्षणानें स्थितप्रज्ञ असें ह्मणावें अथवा स्थितप्रज्ञ आहे असें कोणत्या लक्षणानें समजावें आणि समाधी पासून व्युत्थित जो स्थितप्रज्ञ त्याचें या जगांत भाषण राहणें आणि विषय भोगणें हें कसें असावें. ॥ ५४॥

**श्रीभगवानुवाच॥ ॥प्रजहाति यदाकामान् - सर्वान् पार्थ मनोगतान् ॥ आत्मन्येवात्मना - तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते॥ ५५॥ ॥**

येथून अध्याय समाप्ती पर्यंत स्थितप्रज्ञ जो सिद्ध त्याचीं जीं स्वाभाविक लक्षणें तींच साधकास ज्ञान प्राप्ति होण्यास अंतरंग साधनें आहेत आणि तीं साधकास प्रयत्नानीं साध्य आहेत. जो सिद्ध झाला त्यास तीं स्वाभाविक होतात. असें समजण्या करितां अर्जुनाचे प्रश्नाचीं उत्तरें श्रीकृष्ण भगवान् सांगतात. त्यांत दोन श्लोकांनीं प्रथम प्रश्नाचें उत्तर सांगतात. हे पार्थ (अर्जुना), संकल्प विकल्पात्मक मनाचे ठायीं स्थितजे सर्वकाम (विषय) त्यांप्रत जेव्हां सोडतो. तात्पर्य— स्थूल शरीरानें भोग करण्यास योग्य, सूक्ष्म शरीरानें भोग करण्यास योग्य आणि कारण शरीरानें भोग करण्यास योग्य असे तीन प्रकारचे काम ह्मणजे विषय आहेत. त्यांतील स्थूल शरीरानें भोगावयाच्या कामांचा एकांत स्थलाचे सेवनानें त्याग होतो. स्वप्नकालीं चक्षुरादिक विषय घेणारीं बाह्येंद्रियें सर्व लीन झालीं असतां जागृत कालीं अनुभविलेले विषयांच्या वासनाहीं करून जे विषय मनानें भासतात त्यांचा सर्वदा भगवच्चिंतनाचे अभ्यासें करून त्याग होतो. सर्व इंद्रियें आणि मन यांचा बाह्य विषयां पासून निग्रह करून ध्येयपरमेश्वराकारच जो अंतःकरण वृत्तींचा प्रवाह ज्यांत ज्ञाता, ज्ञेय, आणि ज्ञान या त्रिपुटीचें मात्र मी या रूपास ध्यातों असें भान आहे. असा जो संप्रज्ञात समाधि त्याचे ठायीं संकल्पानें उत्पन्न होणार जे दिव्य विषय, योग शास्त्र प्रसिद्ध आहेत आणि जे मोक्षास प्रतिबंधक होतात त्यांचा - ज्यांत त्रिपुटीचें ही भान नाहीं असाजो पूर्वोक्त समाधि त्यास असंप्रज्ञात समाधि म्हणतात त्याचे ठायीं त्याग होतो. याप्रमाणें त्रिविध कामाचा त्याग करून जेव्हां अद्वितीय, सच्चिदानंद, स्वात्मरूप, अखंड एकरस अशा ब्रह्माचे ठायीं आत्मना ह्मणजे - स्वात्मरूप आनंदानेंच संतोष पावून बाह्य विषया विषयीं निरपेक्ष होतो तेव्हां त्यास स्थितप्रज्ञ असें म्हणावें. ॥ ५५॥

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः॥ वी-**

**तरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

आणि दुःखें प्राप्त झालीं असतां ही ज्याचें मन उद्विग्न होत नाहीं म्हणजे चंचल होत नाहीं. आणि जो प्राप्त झालेले विषय सुखां विषयीं ही अंतःकरण वृत्ति रहित झाल्यामुळें निरिच्छ आहे आणि विषया वरील प्रीति नसून प्राप्त झालेलें विषय सुख नाश पावेल असें भय. तसाच आपले विषय सुखांदिकांस कोणी विघात केल्यामुळें त्यावर होतो जो क्रोध यांचा त्या समाधीचे अवस्थेंत असंभवामुळें ते ज्याचे गेले आहेत असा जो मननशील म्हणजे समाधिस्थ ज्ञानी त्यास स्थितप्रज्ञ असें म्हणावें. ॥ ५६ ॥

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ॥**
**नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७**

आतां स्थितप्रज्ञानें कसें भाषण करावें या प्रश्नाचें उत्तर सांगतात. जो-सर्वत्र म्हणजे स्त्रीपुत्रादिकांचे ठायीं स्नेहरहित असा होऊन स्त्रीपुत्रादिक परिपूर्ण-असले म्हणजे मी परिपूर्ण आहें, ते विकल असले म्हणजे मी विकल आहें असें स्नेह निमित्तक भाषण करीत नाहीं आणि आपणास कोणतेंही शुभ म्हणजे अनुकूल किंवा इष्ट तें प्राप्तझालें असतां हें फार चांगलें झालें अशी आपलें इष्ट करणाऱ्याची किंवा इष्टाची तोंडानें प्रशंसा करीत नाहीं आणि अशुभ म्हणजे प्रतिकूल किंवा अनिष्ट प्राप्त झालें असतां हें वाईट मला कां प्राप्त झालें असा प्रतिकूल करणाराचा किंवा प्रतिकूलाचा द्वेष करीत नाहीं तर केवळ उदासीन होऊनच भाषण करतो. त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित म्हणजे स्थिर झाली असें म्हणावें किंवा समजावें. ॥ ५७ ॥

**यदा संहरते चायं कूर्मोंगानीव सर्वशः ॥ इंद्रि-**
**याणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८**

आतां स्थित प्रज्ञानें कसें राहावें याचें उत्तर सांगतात. कांसव जशीं-आपलीं हस्तपादादिक अंगें स्वभावें करूनच पोटाशीं आंखडून धरतो त्याप्रमाणें श्रोत्रादिक इंद्रियांचे जे शब्दादिक विषय त्यां पासून आपलें श्रोत्रादिक इंद्रियांप्रत अनायासें करून काढून घेतो म्हणजे प्रारब्ध कर्मवशें करून समाधी-पासून जरी व्युत्थित झाला तरी द्वैत दर्शनानें उद्विग्न होऊन मनोनिरोध रूप समाधि करण्याचा संस्कार प्रबल असल्यामुळें पुनः समाधीचेंच अनुष्ठान करतो तेव्हां त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित म्हणजे स्थिर झाली असें म्हणावें किंवा समजावें. ॥ ५८ ॥

विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः ॥ रस-
वर्जं रसोप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥ ॥

इंद्रियांची विषयांचे ठायीं प्रवृत्ति न होणें असें जें स्थित प्रज्ञाचें लक्षण सांगितलें तें संभवत नाहीं कारण; फलांचे इच्छेनें उपवासादिक काम्यव्रत करणारे जे अज्ञानी किंवा रोगी त्यांची ही विषयांचे ठायीं प्रवृत्ति होत नाहीं अशी शंका होईल तर त्या विषयीं सांगतात. आहाराचा त्याग करणारा जो देहाभिमानी अज्ञ त्या त्या शक्तीच्या क्षीणत्वादिक कारणामुळें विषय म्हणजे इंद्रियांहीं करून ज्ञात यांचें जें विषय सुखानुभव ते नाहींसे होतात. परंतु मनांतील विषय सुखाची वासना नाहींशी होत नाहीं. जो स्थितप्रज्ञ आहे त्यास नित्यानंद स्वरूप जो परमात्मा त्याचा स्वात्मत्वें करून साक्षात्कार झाल्यामुळें त्याची विषयसुखाची वासना ही नाहींशी होते. ५९.

यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ॥ इंद्रि
याणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः ॥ ६० ॥ ॥

इंद्रियांचा निग्रह केल्यावांचून स्थितप्रज्ञ होत नाहीं. यासाठीं साधकावस्थेंत त्याविषयीं मोठा यत्न करावा असें दोन श्लोकांनीं सांगतात. हे कौंतेय म्हणजे अर्जुना, समाधीचे द्वारानें अपरोक्ष ज्ञान झाल्यावर मोक्षाविषयीं यत्न करणारा - जो विपश्चित म्हणजे शास्त्राचार्यांचे उपदेशानें परोक्ष आत्मज्ञान ज्यास झालें आहे - असा मुमुक्षु त्याचीं ही विषय दर्शनें करून मनास क्षोभ करणारीं श्रोत्रादिक इंद्रियें आत्म्याचे स्वरूपाचे ठायीं स्थिर केलेले मनाप्रत बलात्कारानें आप आपले विषयां कडे मार्गांत एके पुरुषास लुटणाऱ्या अनेक चोरां प्रमाणें ओढून घेतात. ॥ ६०

तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ॥
वशेहि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१

या साठीं युक्त म्हणजे साधक जो आहे त्यानें त्या सर्व इंद्रियांचा निग्रह करून सर्वांचा आत्मा असा जो मी ईश्वर तोच आहें पर म्हणजे उत्कृष्ट प्रियतम ज्यास असें व्हावें ज्यांचीं इंद्रियें स्वाधीन आहेत त्यांची प्रज्ञा म्हणजे आत्म तत्त्वा विषयींची बुद्धि स्थिर झाली असें जाणावें येणें करून स्थितप्रज्ञानें कसें रहावें या प्रश्नाचें उत्तर सांगितलें. ॥ ६१ ॥

ध्यायतो विषयान् पुंसः संगस्तेषूपजायते ॥
संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ६२

बाह्येंद्रियांचा निग्रह नसल्यामुळें जो दोष तो सांगून आतां मनाचा निग्रह नसल्यास दोष आहे, असें दोन श्लोकांनी सांगतात. मनानें विषयांचें चिंतन करणारा जो पुरुष त्यास चिंतित विषय कदाचित् इंद्रियगोचर होतात. म्हणजे बाह्य विषयां पासून निग्रह केलेलीं इंद्रियें मनाचे दोषानें पुनः बाह्य विषय घेतात. विषय इंद्रिय गोचर झाले म्हणजे त्यां पासून त्या विषयांचा उपभोग आपणास असावा अशी त्यास इच्छा उत्पन्न होते त्या इच्छेनें त्या विषयांचें संपादन करण्यास प्रयत्न करीत असतां प्रयत्न सिद्धीस न गेला अथवा कोणी त्यास प्रतिबंध केला तर त्यामुळें क्रोध उत्पन्न होतो. ६२

## क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः॥ स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥६३॥

क्रोध अनिवार झाला ह्मणजे कोणतें करावें, कोणतें न करावें असा विवेक नाहींसा होतो. विवेक नाशामुळें शास्त्रार्थाचें अनुसंधान न राहून मी कोण आहें मी काय करतों अशी स्मृति राहत नाहीं. स्मृति गेल्यामुळें निश्चित शास्त्रार्थाचें आच्छादन होऊन आपलें हित कशांत आणि अहित कशांत अशी जी बुद्धि ती नष्ट होते. बुद्धि नष्ट झाली ह्मणजे आपण नाश पावतो म्हणजे पुरुषार्थाचे प्राप्ती विषयीं अयोग्य होऊन मृततुल्य होतो किंवा एखादें वाईट कर्म घडून नाश पावतो. ६३

## रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन्॥ आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति॥६४॥

विषयांचें ध्यान केलें तरी समाधी पासून उठलेला जो योगी त्यास विषयाकडे जावें हा इंद्रियांचा स्वभावच असल्यामुळें त्याचा निरोध होणें अशक्य आहे यास्तव त्या योग्याच्या ही पूर्वोक्त नाशाची संभावना आहे या मुळें स्थितप्रज्ञ लक्षणें दुर्घट आहेत. अशी शंका झाल्यास त्या विषयीं दोन श्लोकांनीं सांगतात. विधेयात्मा म्हणजे ज्यानें मन स्वाधीन केलें आहे असा जो योगी तो विषयांचे प्राप्ती मुळें जी प्रीति आणि अप्राप्ती मुळें जो द्वेष त्यांहीं करून रहित आणि मनाचे स्वाधीन झालेलीं अशीं जीं इंद्रियें तीहीं करून विषयांचा भोग करीत असतां ही मन स्वाधीन झाल्यामुळें विषयांचे ठायीं इच्छा उत्पन्न होत नाहीं या कारणानें प्रसाद म्हणजे शांतीप्रत म्हणजे विषय संकल्प गेल्यामुळें मनाचे स्वच्छते प्रत पावतो. येणें करून स्थितप्रज्ञानें भोगणें कसें असावें या प्रश्नाचें उत्तर सांगितलें. ॥६४॥

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ॥ प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥**

प्रसाद म्हणजे मनाची स्वच्छता ती प्राप्त झालीतर काय होतें तें सांगतात. प्रसाद प्राप्त झाला असतां विषय कामना जाऊन त्याचे सर्व सांसारिक दुःखाचा नाश होतो. ज्याचे चित्तास प्रसाद म्हणजे शांति प्राप्त झाली त्याची बुद्धि म्हणजे आत्मतत्वाचें ज्ञान तें लौकर प्रतिष्ठित म्हणजे दृढ होतें. ॥ ६५ ॥

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ॥ न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम् ६६**

मना कडून इंद्रियांचा निग्रह नसला तर दोष सांगून आतां बुद्धीची प्रतिष्ठा न झाली तर दोष आहे असें सांगतात. अयुक्त म्हणजे श्रवण मनना दिकां विषयीं जो आसक्त नाहीं त्यास बुद्धि म्हणजे ब्रह्मात्म साक्षात्कार रूप निश्चय तशा ब्रह्मस्वरूपा विषयीं प्रमाणाची आणि तशा ब्रह्मरूप ज्ञेय विषयाची असंभावना न गेल्यामुळें होत नाहीं आणि असा जो अयुक्त त्यास ब्रह्मात्म निश्चय न झाल्यामुळें मनाची स्थिरता न होऊन ब्रह्मात्माकार मनोवृत्ति प्रवाह रूप भावना म्हणजे निदिध्यासन किंवा निर्विकल्पक समाधि होत नाहीं. ज्यास पूर्वोक्त भावना नाहीं त्यास सर्वदुःखनाश रूप शांति नाहीं ज्यास शांति नाहीं त्यास सुख म्हणजे मोक्षानंद कोठून. ॥ ६६ ॥

**इंद्रियाणांहि चरतां यन्मनोऽनुविधीयते ॥ तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥ ॥**

ज्यास इंद्रियांचा निग्रह नाहीं त्याला आत्मतत्व ज्ञान होत नाहीं असें जें पूर्वी सांगितलें त्या विषयीं कारण सांगतात. स्वाधीन न केलेलीं अशीं इंद्रियें आपले स्वभावा प्रमाणें विषयांकडे जात असतां त्यांबरोबर स्वाधीन केलेलें मन हीं जेव्हां गमन करतें तेव्हां तें एकटें मनही पुरुषाच्या आत्मतत्व विषयींच्या बुद्धीस विषयांकडे ओढून घेतें. मग बहुत इंद्रियें ओढून नेतील म्हणून काय सांगावें. यास दृष्टांत सांगतात. ज्या नौकेचा नावाडी प्रमत्त झाला त्या नौकेस समुद्रामध्यें वायू जसा इकडे तिकडे भ्रमवितो त्या प्रमाणें. ॥ ६७ ॥

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ॥ इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८**

इंद्रियांचा निग्रह हें स्थित प्रज्ञाचें लक्षण आणि स्थित प्रज्ञता होण्याचें सा-

धन असें जें सांगितलें त्याची समाप्ति करतात. या कारणास्तव हे महाबाहो अर्जुना, ज्याचीं मनासुद्धां सर्व इंद्रियें सर्व प्रकारें सर्व विषयां पासून निगृहीत म्हणजे ओढून घेतलेलीं आहेत. त्याची प्रज्ञा म्हणजे बुद्धि प्रतिष्ठित म्हणजे दृढ आहे असें जाणावें. ॥ ६८ ॥

**यानिशासर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी॥**
**यस्यां जाग्रति भूतानि सानिशा पश्यतो मुनेः ६९**

सर्व प्रकारें सर्व विषयां पासून सर्व इंद्रियांचें आकर्षण करून निजल्या प्रमाणें पाहणें ऐकणें इत्यादिक व्यापार रहित झालेला असा कोणीही लोकांत आढळत नाहीं तेव्हां स्थितप्रज्ञाचें हें लक्षण असंभावित दिसतें अशी शंका जर होईल तर त्याविषयीं सांगतात. सर्व प्राण्यांस आत्म्याचें जें अज्ञान तत्स्वरूप अंधकारानें व्यापल्या मुळें जी मध्यें दर्शनादि व्यवहार होत नाहीं अशी जी रात्रि ती सारखी जी स्वात्मत्वें करून ब्रह्म साक्षात्कार रूप आत्मनिष्ठा ती मध्यें संयमी म्हणजे इंद्रियांचा निग्रह करणारा स्थितप्रज्ञ जागृत राहतो म्हणजे प्रबोध रूप ब्रम्हात्मतत्त्व ज्ञानानें अविद्यारूप निद्रे पासून उठून मी ब्रह्मच असा दर्शनादि व्यवहार करतो. अज्ञानावस्थेंतील द्वैत दर्शनरूप ज्या विषय निष्ठेंत सर्व प्राणी जागृत राहतात. म्हणजे आपला व्यवहार करतात. किंवा अज्ञानरूप निद्रेंत असतां ही स्वप्ना प्रमाणें सर्व द्वैत दर्शन रूप व्यवहार करतात. ती अद्वितीय ब्रह्मास स्वात्मत्वें करून पाहणारा जो मुनी म्हणजे ज्ञानी त्यास रात्री प्रमाणें आहे म्हणजे तीचे ठायीं तो अज्ञान्या प्रमाणें दर्शनादि व्यवहार करीत नाहीं तात्पर्य— रात्री मध्यें प्राणी जसे अंधकारानें व्यापल्यामुळें कांहीं पाहात नाहींत परंतु ज्यांपाशीं दीपादिक प्रकाश करण्याचें साधन आहे ते पाहतात. तसे अज्ञानी जीव आपलें ब्रह्मस्वरूप अवस्थेंला अज्ञानाचे आवरणा मुळें पहात नाहींत. इंद्रिय निग्रह पूर्वक वेदांत विचार रूप साधन ज्यास आहे तो ब्रह्मात्म साक्षात्कार रूप प्रकाशानें आपले ब्रह्मस्वरूपा प्रत पाहतो. अज्ञानावस्था जीवांस दिवसा प्रमाणें आहे. कारण त्या अवस्थेंत सुख दुःख कर्तृत्वाभिमान रूपसर्व द्वैत प्रपंच प्रत्यक्ष दिसतो यामुळें दिवसा प्रमाणें त्या अवस्थेंत अज्ञानी जीव व्यवहार करतात. परंतु ज्यांस अद्वैत ब्रह्मसाक्षात्कार आहे त्यांस द्वैत प्रपंच मिथ्या आहे असा निश्चय झाल्यामुळें नदिसल्या सारखा आहे म्हणून. त्यास ती अज्ञानावस्था रात्री प्रमाणें आहे यावरून ज्याचीं ज्ञानरूप चक्षु उघडलीं आहेत असा जो ब्रह्मनिष्ठ त्याची दृष्टि ब्रह्माचेच ठायीं असते विषयांचे ठायीं नसते. यास्तव सांगितलेलें स्थितप्रज्ञाचें लक्षण असंभावित नाहीं. ॥ ६९॥

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ॥ तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥७०॥ ॥**

विषयांचे ठायीं ज्ञान्याची दृष्टी नाहीं तर त्यास विषय भोग कसा होतो. अशी शंका होईल तर त्या विषयीं सांगतात. अनंत नद्यांनीं पूर्ण झाला तरी ज्याची मर्यादा चंचल होत नाहीं अशा समुद्रांत दुसरीं उदकें जशी प्रवेश करितात तसें अंतर्दृष्टी जो ज्ञानी त्याप्रत प्रारब्ध कर्मानें अवश्य प्राप्त होणारे सर्व काम म्हणजे सर्व विषय किंवा त्यांचे भोग किंवा त्यां विषयींच्या इच्छा त्या प्राप्त होतात. तो ज्ञानी समुद्र जसा नद्यादिकांचे दुसरे उदकानें चंचल न होतां पूर्वींची अवस्था सोडीत नाहीं तसा प्रारब्ध कर्मानें विषय भोग करीत असतां ही ब्रह्मनिष्ठे पासून चंचल न होतां प्रारब्ध कर्म भोग देऊन समाप्त झाल्या नंतर शांतीप्रत म्हणजे विदेह कैवल्या प्रत पावतो. विषयांची इच्छा करणारा शांति पावत नाहीं. ॥ ७० ॥

**विहाय कामान् यः सर्वान्पुमांश्चरति निस्पृहः ॥ निर्ममो निरहंकारः स शांतिमधि गच्छति ॥ ७१**

जर स्थित प्रज्ञ जो ज्ञानी त्यानें सर्व कामांचा प्रवेश म्हणजे सर्व काम भोगांचा स्वीकार केला तर चित्ताच्या संचार करण्याच्या भूमि ह्मणजे स्थानें असे जे विषय त्यांचे ठायीं जो राग म्हणजे प्रीति तो राग अबोधाचें म्हणजे अज्ञानाचें लिंग म्हणजे चिन्ह आहे. ज्या वृक्षाचे कोल्यांत अग्नि आहे त्यास कोंवळी पालवी कोठून येईल. या अर्थाच्या श्रुतींत तत्त्ववेत्ता जो ज्ञानी त्यास विषय भोगाचा निषेध सांगितला आहे त्याशीं विरोध येईल आणि विषयभोग रूप लिंगानें सांगितलेल्या श्रुती वरून तो अज्ञानी असें त्याला लोक समजतील. हा स्थितप्रज्ञ असें समजणार नाहींत. तेव्हां स्थित प्रज्ञाचीं लक्षणें अर्जुनानें पुसलीं त्यांचे उत्तरांत – कामा यं प्रविशंति सर्वे सशांतिमाप्नोति ॥ असें उत्तर सांगणें विरुद्ध दिसतें. अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात. जो पुरुष प्रारब्ध वशें करून प्राप्त झालेले सर्व काम म्हणजे विषय किंवा त्यांचे भोग यांतें टाकून म्हणजे त्यांवरील सत्यत्व बुद्धि टाकून आणि निरहंकार म्हणजे यांचा भोक्ता किंवा संपादन कर्ता मी अशा अभिमानानें रहित आणि भोग किंवा भोगाचीं साधनें जीं स्रक् चंदन वधू वस्त्रादिक त्यां विषयीं निस्पृह म्हणजे तीं आपणास असावीं अशा इच्छेनें रहित आणि सांगितलेल्या विषयांमध्यें कोठें ही हें माझें अशी ज्याची ममता नाहीं असा होऊनच चरति म्हणजे प्रारब्ध कर्मवशें करूनच विषय भोगांप्रत अनुभवितो. किंवा कोठें गमनादिक व्यापार करतो तो शांति म्हणजे पूर्वोक्त विदेह कैवल्य त्याप्रत पावतो. ता-

त्पर्य- असंग, अद्वितीय आणि सच्चिदानंद एतत्स्वरूप जें स्वरूप त्याचे अज्ञानानें झालेल्या आवरणामुळें देहेंद्रियादिक मीच असा देहेंद्रिय मनोबुद्धी वरील झालेला-जो तादात्म्याभिमान तेणें करून उत्पन्न झालेले जे मुमुक्षु जीवांचे अंतःकरणांतील काम म्हणजे विषयेच्छादिक ते जेव्हां सच्चिदानंद, असंग, निर्विकार आणि अद्वितीय असें जें ब्रह्मस्वरूप तेंच मी आहें अशा आत्मतत्वज्ञानें करून अज्ञान नाश होऊन अज्ञानानें केलेला जो पूर्वोक्त तादात्म्याभिमान त्याचा नाश होऊन नाश पावतात तेव्हांच मर्त्य म्हणजे पूर्वोक्त देहादिकांवरील तादात्म्याभिमानामुळें देहमरणानें मरणशील जो जीव तो अमृत म्हणजे पूर्वोक्त मरणशीलता प्राप्त होण्यास कारण जो पूर्वोक्त देहादिकांवरील तादात्म्याध्यास तो तत्त्वज्ञानानें गेल्यामुळें मरणरहित होतो. कारण तो तत्त्वज्ञानी याच देहाचे ठायीं सच्चिदानंद स्वरूप जें ब्रह्म त्याप्रत समश्नुते म्हणजे पावतो म्हणजे तद्रूपच होतो. या अर्थाची श्रुति आहे. आणि त्याश्रुतींतील काम शब्दाचा अर्थ कोणता हें सांगण्यासाठीं जेव्हां सर्व हृदय ग्रंथि भिन्न होतात. अशा अर्थाची श्रुति पुढें आहे. यावरून अहंकार हें उपलक्षण करून मन इत्यादिकांवरील जो पूर्वोक्त तादात्म्याभिमान रूप अविवेक त्यामुळें होणारे जे, हें मला असावें इत्यादि इच्छादिक तेंच तत्त्वज्ञान्याचे नाश पावतात. पूर्वोक्त तादात्म्याभिमानरूप जो अविवेक तो अंतःकरण देहेंद्रियादिक माझें स्वरूप नाहीं मी असंग, सच्चिदानंद अद्वय आणि निर्विकार जें ब्रह्म तेंच आहें अशा तत्त्वज्ञानानें त्याचा गेला त्यास केवळ प्रारब्धवशें करून होणारे जें दग्धबीजाप्रमाणें कार्याक्षम काम ते तत्त्वज्ञान्यास जरी झाले तरी ते अज्ञान्यास झालेले जे अविवेकमूलक काम त्यांप्रमाणें संसार-दुःखप्रद नाहींत. यास्तव रागादिक जें अज्ञानाचें लिंग म्हणून सांगितलें तें पूर्वोक्त-तादात्म्याध्यासरूप जो अविवेक त्यापासून झालेले जे रागादिक म्हणजे विषय भोगेच्छादिक तेंच अज्ञानाचें लिंग. तत्त्वज्ञानें अविवेकनाश पावून प्रारब्धवशें करून जे ज्ञान्यास विषयेच्छादिक होतात तें अज्ञानाचें लिंग नव्हे. अशा श्रुतींचें तात्पर्यातें आहे. अतएव पूर्वोक्त तत्त्वज्ञानें करून शास्त्रार्थ म्हणजे वेदांत श्रवणादिकांचें प्रयोजन जी अज्ञान निवृत्ति ती झाल्यामुळें तत्वज्ञानें करूनच मुक्ति सिद्ध आहे तत्त्वज्ञान्यास रागादिक म्हणजे विषयेच्छादिक यथेष्ट असोत ते असल्यामुळें तत्त्वज्ञानाचा त्याशीं विरोध नाहीं म्हणजे तत्त्वज्ञान किंवा त्याचें फल मोक्ष याची हानि नाहीं अशा अर्थाची दुसरी श्रुति ही तत्वज्ञान्यास विषयेच्छादिक असोत असें जें सांगते तें प्रारब्धवशें करून तत्त्वज्ञान्यास इच्छादिक झाले तरी तें अविवेकमूलक अज्ञान्याचे इच्छे प्रमाणें दृढ नाहीं. असेंच त्या श्रुतीचें तात्पर्य आहे. या सर्व तात्पर्यावरून देह, मन इत्यादिकांवरील चिदात्म्याचा जो विवेक म्हणजे भेद त्याप्रत पाहून पूर्वोक्त तादात्म्याभिमान सोडून प्रारब्धवशें करून कोट्यावधि वस्तूंची जरी तत्ववेत्ता इच्छा करील.

तरी त्यांचा पूर्वोक्त विवेकरूप ग्रंथिभेद झाल्यामुळें तत्त्वज्ञानास बाध नाहीं अशा-अभिप्रायानें- तद्वत्कामायं प्रविशंति सर्वे ॥ असें सांगितलें.जरी प्रारब्ध कर्माचे प्राबल्यामुळें तत्त्वज्ञान्यास विषयेच्छा झाली तरी ती अज्ञान्या प्रमाणें विषय सत्यत्व बुद्धि-पूर्वक आणि आपणास हे विषय अवश्य असावे, हे असल्यानें मी सुरवी, कृतकृत्य-होईन अशी जी दृढ आस्था तत्पूर्वक नाहीं आणि ही इच्छा अज्ञान्यास जशी अविवेकामुळें जन्ममरण प्रवाहरूप संसारांत पाववणारी आहे त्या प्रमाणें ज्ञान्यास नाहीं. अशा अभिप्रायानें -विहाय कामान्यः सर्वान् ॥ इत्यादिक सांगितलें यांचें तात्पर्य असें आहे कीं, पूर्वोक्त तादात्म्याध्यासें करून युक्त जो अज्ञानी त्यास त्या अध्यासानें म्हणजे अभिमानानें स्रक्, चंदन, वधू वस्त्र इत्यादिक विषय मला प्राप्त होवोत. आणि यां पासून मला भोग प्राप्त होवो आणि प्राप्त झालेला भोग माझा कधीं ही नाश न पावो या भोगाची उत्तरोत्तर वृद्धि असो. या भोगास कधींही विघ्नामुळें प्रतिबंध न होवो या-भोगां हीं करून मी धन्य आहें, कृतकृत्य आहें अशा ज्या इच्छा आणि तन्मूलक भ्रम-होतात त्यां प्रमाणें संकल्प सिद्धीस न गेल्यामुळें किंवा भोग नश्वरच आहेत यामुळें त्याचा नाश झाल्यामुळें त्यास फार व्यसन म्हणजे दुःख होतें. ऐंद्रजालिकानें निर्माण केलेलें गंधर्व नगर किंवा त्यांतील विषय हे पाहत असतां ही हें इंद्रजाल आहे. असें जो जाणतो तो त्याची हे आपणास असावें अशी इच्छा करीत नाहीं. प्रत्युत कायहो ही माया असें आश्चर्य मानून हसत असतां त्याचा त्याग करण्याची इच्छा करतो. त्याप्रमाणें तत्त्व ज्ञानी दिसण्यास मात्र रमणीय असे जे प्रापंचिक स्रक्, चंदन, वधू, वस्त्रादिक विषय हे सर्व मायेनें कल्पिलेले मिथ्याच आहेत. असा विचार करून आणि-या विषयांचें संपादन करण्यांत क्लेशच आहे आणि मिळाले तर त्यांचें रक्षण करण्या-विषयीं ही क्लेशच आहे यांचा नाश झालातर किंवा व्यय झालातर क्लेशच आहे यास्तव क्लेश देणाऱ्या अशा विषयांस धिक्कार असो. आणि शिरा, अस्थि, मांस इत्यादिक अशुद्ध पदार्थांनीं निर्माण केलेल्या स्त्री इत्यादिकांच्या शरीरास काय सुंदरत्व आहे, पृथक् पृथक् अवयव करून पाहिलें असतां केवळ बीभत्सच आहे. इत्यादिक शास्त्रांत सांगितलेले दोष दृष्टीनें त्या विषयांचा त्याग करण्या विषयींचीच इच्छा करतो. आणि प्रारब्ध कर्माचे बलानें अशा ही विषयांच्या भोगा विषयीं इच्छा झाली तर राज सेवकांनीं कारागृहांत वेष्टिलेला कारागृह स्थित पुरुष जसा दुःखानें भोजनादिक करतो त्याप्रमाणें विषय भोग करित असतां हि अद्यापि आमचें हें कर्म कां क्षीण होत नाहीं; असा-क्लेश पावूनच भोग करितो. हा क्लेश सांसारिक तापच व्हे. अज्ञानानें झाली जी भ्रांति-तिणें करून जो क्लेश होतो तोच सांसारिक ताप. हा क्लेश विवेकानें झाल्यामुळें यास विरक्तता असें म्हणावें. विवेकानें क्लेश पावत असतां विषय भोग करतांनां ही तो ज्ञानी अल्प भोगानें ही तृप्त होतो. विवेक नसल्यास कितीही भोग प्राप्त झाले तरीं तृप्ति होत नाहीं.

त्यास प्रमाण— विषय भोगाची इच्छा विषय भोगें करून शांत होत नाहीं. अग्नींत घृतादिक हवि घातलें असतां जसा अग्नि वृद्धि पावतो तशी विषय भोगांनीं विषयेच्छा वृद्धिच पावते अशा अर्थाचें स्मृतिवाक्य आहे. पूर्वोक्त विषयांचे दोषें करून युक्त जे विषय त्यांचें सदोष स्वरूप जाणून जर त्या विवेक ज्ञानानें विषयांचा भोग केला तर तो तृप्तीसच कारण होतो. यास दृष्टांत:— जसा हा चोर आहे असें समजून जर त्याशीं सहवास केला तर तो चोर सहवास करणाराचा मित्रच होतो. त्याचे द्रव्याचें हरण करणाऱ्या चोरा प्रमाणें त्यास होत नाहीं. विषयांच्या भोगेच्छा करण्याचा स्वभाव मनाचा असला तरी वैराग्यें करून अथवा योगाभ्यासानें अथवा विचार रूप विवेकानें निग्रह केलेलें मन प्रारब्ध वशें करून झालेला जो स्वल्प भोग त्यासच सांगितले-प्रमाणें विषय भोगावर दोष दृष्टीचे योगानें बहुत मानून त्याची वृद्धि व्हावी अशी इच्छा करीत नाहीं. यास दृष्टांत:— शत्रूनीं पृथिवीपति राजाचे सर्वस्वाचें हरण करून त्यास कारागृहांत ठेवून त्यास कारागृहांतून मुक्त केलें तर तो एका ग्रामानें संतोषपावतो. आणि शत्रूचे स्वाधीन न झालेला स्वतंत्र राजा सर्व राष्ट्रासही हें पुष्कळ आहे असें मानून संतोष पावत नाहीं. याप्रमाणें ज्याच्या मनाचा निग्रह नाहीं अशा अज्ञान्यास कितीही भोग प्राप्त झाले तरी त्याविषयीं त्यास अलं बुद्धि म्हणजे पुरे असें न होऊन अधिक अधिक विषय भोग असावे अशी इच्छा होऊन झालेल्या भोगांनीं त्याचे मनाचा संतोष होत नाहीं आणि ज्याचे मनाचा सांगितले कारणानें निग्रह झाला आहे अशा ज्ञान्यास प्रारब्ध वशें करून जितका भोग होतो तितक्यानेंच अधिक भोगा विषयीं इच्छा न होतां संतोष होतो. ज्ञानी आणि अज्ञानी यांच्या देहेंद्रिय मनाची विषयांचे ठायीं प्रवृत्ति किंवा त्यांपासून निवृत्ति होणें याविषयीं जरी त्यांचें स्वतः वैलक्षण्य नाहीं तथापि ज्यास वेदाध्ययन नाहीं असा जो व्रात्य ब्राह्मण आणि ज्यास वेदाध्ययन आहे असा जो श्रोत्रिय ब्राह्मण यांचें भोजन करणें, निद्रा करणें, चालणें, बोलणें, इत्यादिक जे व्यापार त्यांहीं करून जरी वैलक्षण्य नाहीं तथापि व्रात्यास वेदाध्ययन नाहीं, श्रोत्रिय ब्राह्मणास वेदाध्ययन आहे या दोन धर्मांनीं जसें व्रात्य श्रोत्रियांचें वैलक्षण्य आहे त्या प्रमाणें ज्ञान्याच्या देहेंद्रियाची विषयाकडे प्रवृत्ति अविवेक मूलक नसून केवळ प्रारब्धाधीनच असते आणि अज्ञान्याच्या देहेंद्रियादिकांची विषयांकडे प्रवृत्ति अविवेकमूलक असते. इतकेंच ज्ञानी आणि अज्ञानी यांचें वैलक्षण्य आहे. ज्ञान्याची ही विषयांकडे प्रवृत्ति होते तर जडभरतादिक ज्ञानी विषयांकडे प्रवृत्त न होतां त्यांचीं शरीरेंद्रियें निर्व्यापार म्हणजे व्यापार रहित पाषाणादिकां प्रमाणें स्थित होतीं असें भागवतादि पुराणांत सांगितलें आहे तें कसें— असें जर म्हणाल तर पुराणाचें असें तात्पर्य नाहीं आणि भरतादिक आहार विहार सोडून पाषाणा प्रमाणें राहिले होते असेंही नाहीं. परंतु ज्यास संग आहे तो ज्याचा संग केला त्याचे वियोगानें किंवा त्याचे दुःखानें दुःख-

पावतो आणि लोक ही संग करणाऱ्यास उपद्रव देतात. यास्तव ज्यास निरंतर सुखाची इच्छा आहे त्यानें संग सोडावा. असें शास्त्रांत बहुत ठिकाणीं सांगितलें आहे त्यावरून भरतादिक लोकांशीं संग करण्यास भय पावून उदासीनच राहत होते असें पुराणाचें तात्पर्य आहे. हें तात्पर्य पुराणास मूळभूत जी श्रुति तीवरून कल्पावें हें योग्य आहे मूळभूत श्रुतीशीं विरुद्ध असें पुराणाचें तात्पर्य कल्पूनये श्रुतींत जडभरतासारखे ज्ञान्याचे स्थितीचें वर्णन केलें आहे, तेथें तो ज्ञानी भक्षण करीत असतां, स्त्रियांशीं क्रीडा करीत असतां ज्ञानी किंवा वयस्य म्हणजे आपले समान वयस्क सखे यां बरोबर रममाण असतां किंवा क्रीडा करीत असतां ही स्त्री वयस्यादिक जे जन त्यांचे समीप राहिलेल्या शरीराचें हें माझें शरीर ह्या व्यापार करतें असें स्मरण न करिता झाला. असें वर्णन केलें आहे. या श्रुतीचे अर्थावरून ज्ञानी भोजनादिक जे सांगितलेले व्यापार त्या विषयीं शरीरादिक प्रवृत्त असतां ही त्यांचें अनुसंधान न करतां उदासीनच राहतो. पाषाणा प्रमाणें प्रवृत्तिरहित, निश्चेष्ट राहतो असें नाहीं हें स्पष्ट आहे, विषयांचे ठायीं सांगितलेले जे दोष त्यांचें जें ज्ञान तद्रूप विवेक विषयांचे इच्छेला विरोधी आहे तेव्हां ज्याचा तो विवेक जागृत आहे असा जो ज्ञानी त्यास प्रारब्ध कर्माचे बलानें भोग विषयीं इच्छा होऊन त्याची त्यांकडे प्रवृत्ति कशी होईल अशी शंका करूंनये. कारण इच्छा प्रारब्ध, अनिच्छा प्रारब्ध आणि परेच्छा प्रारब्ध अशा भेदानें प्रारब्ध तीन प्रकारचें आहे. इच्छा प्रारब्धाचें स्वरूप असें आहे. जे चोर आहेत किंवा रोगी आहेत किंवा राजस्त्रीशीं गमन करणारे आहेत ते चौर्य कर्मानें किंवा अपथ्य सेवनानें किंवा राज स्त्रियांशीं संग करण्यानें आपला नाश आहे असें जाणत असतां ही त्यांस त्या कर्मा विषयींची प्रारब्ध कर्माचें बळानें इच्छा होऊन त्या कर्मा विषयीं प्रवृत्त होतात. यास इच्छा प्रारब्ध म्हणावें. हें इच्छा प्रारब्ध अनिवार्य आहे याची निवृत्ति करण्यास ईश्वरही समर्थ नाहीं. यास प्रमाण:— सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ॥ प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किंकरिष्यति ॥ असें गीता वाक्यच आहे. याचा अर्थ या श्लोकाचे व्याख्यानांत लिहिला आहेत म्हणून येथें लिहीत नाहीं. आणि प्रारब्ध कर्मबलानें अवश्य होणारे जे भाव म्हणजे सुखंदुःखादिक त्यांचा जर प्रतीकार म्हणजे परिहार होईल तर नल, राम, युधिष्ठिर, हे दुःखानें लिप्त न होते अशा अर्थानें— अवश्यंभावि भावानां प्रतीकारो भवेद्यदि ॥ तदा दुःखैर्न बाधेरन् नलराम युधिष्ठिराः ॥ असें ही वाक्य प्रमाण आहे. या प्रारब्ध कर्माचा परिहार करण्यास जर ईश्वर ही समर्थ नाहीं तर ईश्वराचें ईश्वरत्व येणें करून जाईल. असें नाहीं कारण ईश्वरानेंच या प्रारब्धकर्माचे ठायीं अवश्य आपलें फल देण्याची शक्ति निर्मिली आहे अनिच्छा पूर्वक प्रारब्धाचें स्वरूप— अथ केन प्रयुक्तोयं पापं चरति पूरुषः ॥ अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ काम एषः क्रोध एष रजो गुण समुद्भवः ॥ महाशनो महापाप्मा विद्ध्येन

मिह वैरिणं ॥ स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ॥ कर्तुं नेच्छसि यन्मोहात् करिष्यस्यवशोपि तत् ॥ या अर्जुन आणि कृष्ण यांच्या प्रश्नोत्तरां हीं करून सांगितलें आहे ह्या प्रश्नोत्तर श्लोकांचा अर्थ त्यांचे व्याख्यानांत लिहिला आहे. आतां परेच्छा प्रारब्धाचें स्वरूप सांगतो. इच्छित नाहीं असें ही नाहीं आणि आपले भोगार्थ इच्छा करतात असें ही नाहीं; परंतु दुसऱ्याचे दाक्षिण्यानें म्हणजे दुसऱ्याचे प्रयोजनासाठीं व दुसऱ्याचे प्रेरणेनें, प्रवृत्त होऊन सुख किंवा दुःख अनुभवतात. अथवा दुसऱ्यावर हा प्रामाणिक आहे अशा बुद्धीनें दुसरा आपली वंचना करतो असें न जाणून दुसऱ्याचे प्रयोजनासाठीं दुसऱ्याचे प्रेरणेनें प्रवृत्त होऊन दुःखादिक अनुभवितात. हें परेच्छा प्रारब्धाचें स्वरूप जाणावें. हें स्वानुभव सिद्ध आहे. त्या त्रिविध प्रारब्धानीं विवेक ज्ञान असलें तरी ज्ञान्यास ही भोगेच्छा उत्पन्न होते तथापि ती इच्छा तत्वज्ञानानें आपलें कार्यरूप्यां मूलाज्ञान नाश पावल्यामुळें दग्धबीजाप्रमाणें राहिलेलें जें प्रारब्ध त्यापासून झालेली दग्धबीजाप्रमाणेंच आहे. जशीं भर्जित म्हणजे भाजलेलीं बीजें म्हणजे लाजा इत्यादिक बीजें तीं पुढें अंकुरादिक कार्य करण्यास समर्थ नसतांही भक्षणादिकें करून अल्पतृप्तिरूप कार्य करणारीं होतात. तशीं ज्ञान्यास प्रारब्ध कर्मे करून झालेली जी इच्छा ती अल्पभोगें करून निवृत्त होते इच्छे पासून दुसरी इच्छा ती पासून तिसरी इच्छा अशा परंपरेनें विषयासक्ति करून अज्ञान्याप्रमाणें व्यसनास म्हणजे दुःखास उत्पन्न करीत नाहीं. भोगें करून प्रारब्ध कर्म क्षीण झालें म्हणजे ज्ञान्यास विदेह कैवल्य प्राप्त होतें. भोगप्रद विषयांवर सत्यत्व बुद्धीनें त्या विषयांच्या इच्छांचा उपरम न होतां अज्ञान्यास जन्ममरण रूप दुःख प्राप्त होतें. विषयांस किंवा त्यांचे भोगांस मिथ्या जाणून त्यांवरील आसक्ति गेल्यामुळें विषयभोग प्रारब्धवशें करून करीत असतां ही तो भोग अधिक असावा असा संकल्प ज्ञानी करीत नाहीं या कारणानें ज्ञान्यास तें व्यसन प्राप्त होत नाहीं. तत्वज्ञानें करून सर्व प्रपंचावर मिथ्यात्व ज्ञान होऊन विषयावरील सत्यत्व बुद्धि जरी गेली तरी त्या विषयां पासून प्रारब्ध योगानें भोग होण्यास बाधक नाहीं, कारण भोग होण्यास विषयांवर सत्यत्व बुद्धिच पाहिजे असें नाहीं. स्वप्नांतील मिथ्या जे पदार्थ तसेंच इंद्रजाल विद्येनें ऐंद्रजालिकानें दाखविलेले जे गंधर्व नगरादिक पदार्थ त्यां पासून भोग आणि विनोद चमत्कार हे पदार्थ मिथ्या आहेत. असें जाणणारास ही होतात. विषय सत्य आहेत असें जाणून जर प्रारब्ध विषयभोग करवील तर त्याचा आणि तत्वज्ञानाचा विरोध येईल. तत्वज्ञानाचा आग्रह प्रपंचाचें स्वरूप जें दिसतें त्याचा अपलाप न करतां केवळ तो मिथ्या आहे असें जाणविण्याचा आहे आणि प्रारब्धाचा आग्रह योग्य पदार्थांवर सत्यत्वबुद्धि झाल्या शिवाय ही जीवास सुखाचा किंवा दुःखाचा अनुभव करवावा या विषयींचा आहे या मुळें त्यांचा परस्परविरोध नाहीं. जर तत्वविद्या प्रपंचाचे स्वरूपाचा अपलाप करून त्यावर मिथ्यात्व

जाणवील आणि प्रारब्ध जर विषयांवर सत्यत्व बुद्धि उत्पन्न करून भोग करवील तर तत्त्वविद्या आणि प्रारब्ध यांचा परस्पर विरोध येईल परंतु तसें नाहीं हें पूर्वींच सांगितलें यास्तव तत्त्ववेत्त्यांस ही प्रारब्ध कर्मवशेंकरून विषय भोग होण्यास बाधक नाहीं असें सिद्ध झालें. देहेंद्रियादिकांवरील स्वस्वरूपाचे अज्ञानामुळें जो तादात्म्यभ्रम तद्रूप जो चिदचिद् ग्रंथि त्याचें स्वस्वरूप ब्रह्मात्मा परोक्ष ज्यांस झालें आहे असे जे ज्ञानी ते मनांतील संकल्पानीं रहित असून प्रारब्धवशेंकरून बाह्य विषय भोगादिक व्यवहार करीत असतां त्यालिंगें करून हे अज्ञानीच आहेत आणि संसारी आहेत, असें जे लोक ह्मणतात ते शास्त्राचें तात्पर्य न समजून ह्मणतात. शास्त्राचें तात्पर्य असें आहे कीं, वैराग्य, बोध आणि उपरति हे पदार्थ यांचीं उत्पन्न करणारीं कारणें, यांचीं स्वरूपें आणि यांचीं कार्यें हीं भिन्न भिन्न आहेत यामुळें परस्पर भिन्न भिन्न असून प्रायशः एकत्र राहतात. कदाचित् कोठें परस्परांचा त्याग करून राहतात. विषयांचे ठायीं दोषदृष्टि हें वैराग्याचें कारण आहे, विषय सोडण्याची इच्छा हें वैराग्याचें स्वरूप आहे आणि विषयभोग न झाल्यामुळें दीन न होणें हें वैराग्याचें कार्य आहे. वेदांताचें श्रवण, मनन, निदिध्यासन, हीं बोधाचीं म्हणजे ज्ञानाचीं कारणें आहेत. ब्रह्मच सत्य आहे, प्रपंच सर्व मिथ्या आहे, असें विवेचन बोधाचें स्वरूप आहे आणि ज्ञानाचे नाशामुळें पुनः देहेंद्रियादिकांवर तादात्म्यभ्रम न होणें हें बोधाचें कार्य आहे. यमनियमादिक हें उपरतीचें कारण आहेत, चित्तवृत्तीचा निरोध करणें एतद्रूप जो योग हें उपरतीचें स्वरूप आहे आणि बाह्यांतर सर्व व्यवहाराचा क्षय होणें हें उपरतीचें कार्य आहे. या वैराग्यबोधोपरतींमध्यें बोध हा साक्षात् मुक्तीस कारण आहे यामुळें तो मुख्य आहे आणि वैराग्य आणि उपरति हे बोधास साधन आहेत, हे तिन्ही ज्याचे परिपक्व झाले त्याचें तें मोठ्या तपाचें फल असें जाणावें. प्रतिबंधक पापामुळें यांतील एकाचा किंवा दोघांचा कोठें कोणे पुरुषाचे ठायीं प्रतिबंध होतो म्हणजे ते नसतात. ज्यास वैराग्य आणि उपरति परिपूर्ण आहेत परंतु बोध नाहीं त्यास मोक्ष होत नाहीं, परंतु तपोबलें करून पुण्य फल जें सुख तत्कारक उत्तम लोक प्राप्त होतात. ज्यास बोध परिपूर्ण आहे आणि वैराग्य आणि उपरम नाहींत त्यास मोक्ष निश्चितच आहे परंतु वैराग्य उपरम नसल्यामुळें दृष्ट दुःख म्हणजे शरीरेंद्रियादिकांचे संबंधामुळें होणारें जें दुःख तें नाहींसें होत नाहीं. ब्रह्मलोकाचे प्राप्तीस ही तृणा प्रमाणें मानणें हा वैराग्याचा अवधि म्हणजे सीमा आहे. देहेंद्रियादिकांवर जशी आत्मत्व बुद्धि दृढ आहे त्याप्रमाणें मी ब्रह्म आहें अशी जी अपरोक्ष ब्रह्मात्म बुद्धि तिची दृढता झाली म्हणजे बोध परिपूर्ण होतो हीच त्याची सीमा. सुषुप्तींत जसें सर्व बाह्याभ्यंतर पदार्थांचें विस्मरण होतें त्याप्रमाणें सर्वदां जागृदाद्यवस्थेंत ही विस्मरण होणें ही उपरतीची सीमा आहे. असें हें शास्त्र तात्प-

यें जाणून प्रारब्ध कर्माचे अनेक प्रकारांनीं ज्ञान्याची ही अनेक प्रकारची प्रवृत्ति झाली तरी सांगितलेले दृष्ट दुःखादिकांचे तारतम्यानें त्यांचें तारतम्य असलें तरीं बोधाविषयीं किंवा प्रारब्ध कर्माचा भोग होऊन प्रारब्ध कर्म क्षीण झाल्यानंतर विदेह कैवल्या विषयीं त्यांचें तारतम्य नाहीं त्यांचा बोध आणि बोधापासून अज्ञाननाश होऊन आपले पारमार्थिक सच्चिदानंद आणि अद्वय अशा स्वरूपानें स्थितिरूप मुक्ति ही समानच आहेत अशा शास्त्राच्या तात्पर्या विषयीं पंडितांनीं मोह पावूं नये. ॥७१॥

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनं प्राप्य विमुह्यति ॥ स्थित्वास्यामंतकालेऽपि ब्रह्म निर्वाणमृच्छति ॥ ७२॥ ॥ ओं तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः २

चित्त शुद्धि द्वारा कर्मयोगें करून प्राप्त होणाऱ्या सांगितलेल्या ज्ञाननिष्ठेचें फल कथनानें स्तुति करून तिची समाप्ति करतात. हे अर्जुना, या प्रकारची स्थितप्रज्ञाचे लक्षण कथन प्रसंगानें ब्रह्म म्हणजे ब्रह्मरूप जो ब्रह्मवेत्ता त्याची आपले स्वस्वरूप सच्चिदानंद रूपानें ज्ञानापासून होणारी जी स्थिति ती तुला सांगितली. परमेश्वराचें निष्काम कर्म करून आराधन केल्यानें शुद्धांतःकरण होऊन या ब्रह्मनिष्ठेप्रत पावून पुरुष पुनः संसार मोहाप्रत पावत नाहीं कारण मरण समयीं या ब्रह्मनिष्ठेच्या ठायीं क्षणमात्र राहून ही जें प्राप्त झालें असतां जेथून जन्म मरण प्रवाहांत पुनः येणें होत नाहीं अशा ब्रह्म प्राप्तिरूप मोक्षाप्रत पावतो मग निरंतर राहिला तर मोक्षाप्रत पावेल म्हणोन काय सांगावें. तात्पर्य:- जन्ममरण प्रवाहरूप संसार देहादिकांवर अज्ञानानें झालेल्या आत्मतत्व भ्रांतीनें होतो शमदमादि संपन्न जो अधिकारी त्यास गुरूपासून वेदांत श्रवणादिकानें महावाक्यापासून एकवार जरीं ब्रह्मापरोक्ष ज्ञान झालें तरी तेणें करून ती भ्रांति नाश पावली म्हणजे पुनः ती उत्पन्न होत नाहीं आणि सर्व प्रमाणांपेक्षां प्रबल जें वेदांत रूप प्रमाण त्यापासून उत्पन्न झाली जी भ्रांति तिचा नाश करणारी ब्रह्मविद्या ती मरण कालीं ही नाश पावत नाहीं. त्यास दृष्टांत:- दरदिवसास स्वप्नांत किंवा सुषुप्तींत अध्ययनाचें विस्मरण जरी झालें तरी दुसरे दिवशीं अध्येता जसा अनधीत होत नाहीं त्याप्रमाणे यास्तव एकवार तत्वज्ञानानें ही मोक्ष होतो. ॥७२॥

इतिश्रीमद्भगवद्गीतायां रघुनाथशास्त्रीकृत भाषाविवृतौ द्वितीयोध्यायः ॥२॥

अध्याय ३ रा.

**अर्जुन उवाच ॥ ॥ ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ॥ तत् किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥ ॥ ॥ ॥**

या प्रमाणें ॥ अशोच्यानन्वशोचस्त्वं ॥ इत्यादिकें करून प्रथम मोक्षास साधन देहाहून आत्मा भिन्न आहे असें देहात्मविवेक ज्ञान सांगितलें तदनंतर ॥ एषा ते भिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ॥ येणें करून कर्मयोग सांगितला परंतु कर्मयोग ज्ञानास साधन आहे म्हणून तो अंग आहे आणि ज्ञान मोक्षास कारण आहे-या मुळें तें प्रधान आहे असा ज्ञान आणि कर्मयोग यांचा प्रधान भाव व गौण भाव स्पष्ट सांगितला नाहीं यावरून दोन्ही मार्ग मोक्षास जाण्याविषयीं समान आणि परस्पर निरपेक्ष आहेत असें दिसतें तथापि ॥ एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ ॥ येणें करून ब्रह्मज्ञान निष्ठेची प्रशंसा करून प्रकरण समाप्ति केली यावरून ज्ञान आणि कर्म या दोहों मध्यें ज्ञानच श्रेष्ठ आहे असा भगवंताचा अभिप्राय मनांत आणून अर्जुन प्रश्न करितो हे जनार्दना कृष्णा, कर्मापेक्षां मोक्षास अंतरंग म्हणजे जवळचें साधन जें ज्ञान तें श्रेष्ठ आहे असें जर तुला संमत आहे तर ॥ तस्माद्युध्यस्व ॥ तस्मादुत्तिष्ठ कौंतेय ॥ असें वारंवार बोलून ज्यांत बंधुवधादिक हिंसा होते अशा युद्धरूप घोर कर्मांत गायीं, मोक्षवृत्तीनें संतोष पावणारा मी असून मला कां योजितोस. ॥ १ ॥

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ॥ तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥ ॥**

ज्ञानच श्रेष्ठ म्हणावें तर ॥ धर्म्याद्धि युद्धात् ॥ येणें करून क्षत्रियांस युद्धकरणें हें श्रेष्ठ आहे असें कर्मालाही पूर्वी श्रेष्ठत्व सांगितलें आहे तेव्हा यांतून कोणतें श्रेष्ठ समजावें अशी शंका घेऊन अर्जुन बोलतो. कोठें ज्ञान प्रशंसा आणि कोठें कर्म प्रशंसा अशा संदेह उत्पन्न करणाऱ्या मिश्र वाक्यानें माझे बुद्धीस हें श्रेष्ठ किंवा हें श्रेष्ठ-याविषयीं भ्रमांत पाडल्या सारखें करतोस, मला झालेला जो मोह त्याचे निवृत्ति साठीं प्रवृत्त झालेला जो करुणासागर तूं त्याचे गायीं मला किंवा दुसऱ्यास भ्रमांत घालणें हें संभवत नाहीं. तथापि भ्रमांत पाडतोस असें मला वाटतें कारण उठणें आणि बसणें या दोहोंचें अनुष्ठान एककाळीं संभवत नाहीं त्याप्रमाणें ज्ञान आणि कर्म या दोहोंचें अनुष्ठान एक काळीं संभवत नाहीं या साठीं जेणें करून मी कल्याण पावेन तें एक निश्चय करून सांग. ॥ २ ॥

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयाऽनघ ॥ ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥ ॥**

परस्परांची अपेक्षा न करतां स्वतंत्र पणानें कर्मनिष्ठा आणि ज्ञान निष्ठा ही मोक्षास साधनें आहेत. अशा दोन निष्ठा आह्मी जर सांगितल्या असतील तर त्या दोहोंतून कल्याण कारक असेल ती मला सांग असा तुझा प्रश्न संभवेल परंतु तसें कांहीं आह्मीं सांगितलें नाहीं. ज्ञान आणि चित्तशुद्धीचे द्वारानें ज्ञानास साधन कर्म या दोहीं करून मोक्ष परायण असणें अशी जी ब्रह्मनिष्ठा ती एकच आह्मीं सांगितली आहे. असें श्रीकृष्ण भगवान् उत्तर बोलतात. हे अनघ ( निष्पापा ) अर्जुना, शुद्धांतःकरण आणि अशुद्धांतःकरण या भेदानें दोन प्रकारचा जो अधिकारी जन त्याचे ठायीं अधिकार भेदानें दोन प्रकारची निष्ठा म्हणजे मोक्षपरायणता ती मी पूर्वाध्यायीं तुला सांगितली. दोन प्रकार कोणते ते सांगतात. अंतःकरण शुद्ध होऊन आत्मानात्मविवेक रूप किंवा प्रकृति आणि पुरुष यांचा जो विवेक म्हणजे भेदज्ञान तद्रूप ज्ञानभूमिकेवर चढले आहेत असे जे सांख्य त्यांस ज्ञानाचा परिपाक म्हणजे स्वात्मत्वें करून ब्रह्म साक्षात्कार दृढ होणें यासाठीं ज्ञान योगें करून म्हणजे ज्ञानास साधन जें वेदांत श्रवण, मनन, निदिध्यासनादि तेणें करून मोक्षपरायण असणें अशी ब्रह्मनिष्ठा ॥ तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ॥ इत्यादिकें करून सांगितली. सांख्य भूमिकेवर आरोहण करावें अशी इच्छा आहे परंतु चित्त शुद्धि नाहीं असे जे कर्माधिकारी त्यांस अंतःकरण शुद्धीचे द्वारा सांख्य भूमिकेवर आरोहण होण्यास वेदांत श्रवणात्मक जो विचार तद्द्वारा मोक्ष साधन भूत आणि सांख्य भूमीस साधन जो कर्मयोग तेणें करून मोक्षपरायण असणें अशी जी ब्रह्मनिष्ठा ती सांगितली. एकच ब्रह्मनिष्ठेचे अधिकार भेदानें दोन प्रकार पूर्वाध्यायीं सांगितले. एकासच ब्रह्म प्राप्ति विषयीं परस्पर निरपेक्ष असे दोन मार्ग सांगितले नाहींत ते दोन प्रकार सांगतात. प्रकृति आणि पुरुष यांस भिन्नत्वें करून जाणणारे जे सांख्य ते ज्ञान योग म्हणजे ब्रह्मात्मत्व साक्षात्कारात्मक ज्ञानास साधन भूत जो वेदांत श्रवण, मनन, निदिध्यासन रूप योग तेणें करून ब्रह्मनिष्ठेप्रत पावतात. यासच सांख्यमार्ग ह्मणतात. आणि ॥ सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ येणें करून सांगितलेल्या लक्षणानें युक्त जे योगी ते संध्योपासनादिक निर्विकल्प समाध्यंतानुष्ठान लक्षण जो कर्मयोग तेणें करून ब्रह्मनिष्ठेप्रत पावतात. यासच योगमार्ग म्हणतात. तात्पर्य—या जन्मीं किंवा जन्मांतरीं ईश्वर प्रीत्यर्थ केलेल्या कर्मानें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे असा आणि विवेक-

वैराग्य, शम आणि दम इत्यादि साधन संपन्न जो मुमुक्षु त्याचा देहेंद्रिय बुद्ध्यादिक जे जड पदार्थ त्यांहून निराळा जो शुद्धात्मा त्याचेच ठायीं चित्ताचे वृत्तीचा प्रवाह असून जर तो वेदांताचें श्रवण आणि मनन करील तर तितक्यानेंच त्यास ब्रह्मात्मत्व साक्षात्कार होऊन तो कृतकृत्य होतो. त्यास निदिध्यासनाची अपेक्षा नाहीं. जर श्रवण मननाचे अगोदर, पूर्वी सांगितल्या प्रमाणें शुद्धात्म स्वरूपाचे ठायीं त्याच्या चित्ताच्या वृत्तीचा प्रवाह नसेल तर त्यास श्रवण मनना नंतर निदिध्यासनाची अपेक्षा आहे, हा सांख्य मार्ग. तसाच परम गुरू जो परमेश्वर त्यास सर्वकर्मांचें निष्काम बुद्धीनें समर्पण करून श्रवण मनना वांचून ही केवळ आस्तिक्य बुद्धिरूप जी श्रद्धा तीणें करून गुरु वाक्या पासून अद्वितीय सच्चिदानंदात्मक ब्रह्म स्वात्माच आहे. असा निश्चय होऊन असंभावनादि दोषरहित होत्साता गुरू पासून निर्गुण ब्रह्मोपासना करण्याचा प्रकार समजून घेऊन ज्या काळीं कर्म करण्याचें नसतें त्यास कर्मछिद्र म्हणतात. त्या काळीं समाधीच्या अभ्यासें करून पूर्वोक्त शुद्धात्म स्वरूप ब्रह्म साक्षात्कार युक्त होतो. हा योगमार्ग या प्रकारचे हे एकेच ब्रह्मनिष्ठेचे दोन मार्ग आहेत. ब्रह्मनिष्ठा दोन मार्गांनीं दोन नाहींत. असेंच वसिष्ठानीं रामचंद्रास सांगितलें आहे, तें असें– द्वौ क्रमौ चित्तनाशस्य योगो ज्ञानंच राघव ॥ योगो वृत्ति निरोधोहि ज्ञानं सम्य गवेक्षणं ॥ असाध्यः कस्यचिद्योगः कस्य चित्तत्त्व निश्चयः ॥ प्रकारौ द्वौ ततोदेवो जगाद परमः शिवः ॥ याचा अर्थ– चित्त नाशा वरून उपलक्षित ( बोधित ) जो ब्रह्मसाक्षात्कार तो होण्यास दोन क्रम म्हणजे मार्ग आहेत. ते असे– चित्तादिकांस मिथ्यात्व आहे अशा पक्षीं जसें रज्जूवर भासलेल्या सर्पाचे नाशा विषयीं हा रज्जू असें यथार्थ ज्ञान साधन आहे तसें आत्म्यावर भासलेलें मनाचे नाशा विषयीं यथार्थ ब्रह्मज्ञानच साधन आहे. चित्तास सत्यत्व पक्षीं जसा सत्य सर्प मंत्रादिकांनीं गतीचा निरोध झाल्यानें स्वतःच नाश पावतो त्या प्रमाणें योगाभ्यासानें निरोध केलेलें चित्त ही स्वतः नाश पावतें हा योग मार्ग. यांत कोणास ज्ञान साध्य होत नाहीं. कोणास योग साध्य होत नाहीं. या प्रमाणें परम कारुणिक शिवांनीं सांगितलें आहे असें ही येथें कोणी व्याख्यान केलें आहे. ॥ ३ ॥

## न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ॥ न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥ ॥

या साठीं चांगली चित्तशुद्धि होऊन आत्मानात्म विचारानें ज्ञान उत्पन्न होई तों पावेतों वर्णाश्रमोचित कर्में करावीं. न केलीं तर चित्ताची शुद्धि न झाल्या मुळें किंवा नसल्या मुळें ज्ञान होणार नाहीं असें सांगतात. कर्मांचें अनुष्ठान न केल्यास पुरुषास ज्ञान प्राप्त होत नाहीं. संन्यास करून श्रवण करावें. संन्याशास प्राप्त होणारा जो लोक म्हणजे ब्रह्म त्याप्रत इच्छा करणारे प्रव्रज्या म्हणजे संन्यास करतात. संसार निःसारच आहे.

असें पाहून सार पाहण्याचे इच्छेनें मोठ्या वैराग्यानें युक्त होत्साते विवाह न करतां संन्यास करतात. अशा अर्थाच्या अनेक श्रुति स्मृतींत वेदांत श्रवण आणि त्या पासून होणार जें ज्ञान त्याचे द्वारानें संन्यासासच मोक्ष साधनत्व सांगितलें आहे. यावरून मोक्षा साठीं संन्यासच करावा. कर्म कशास केलें पाहिजे अशी शंका होईल तर त्या विषयीं सांगतात. चित्त शुद्धि नसल्या मुळें आत्मानात्मविचार न होऊन ज्ञान न झालें तर संन्यास केला इतक्यानेंच मोक्षाप्रत पावत नाहींत. तात्पर्य— संन्यास करून श्रवण करावें अशा अर्थाच्या श्रुती मनास विक्षेप करणारीं जीं काम्य कर्मे त्यांचा त्याग करून संन्यासा विषयींच्या आहेत. आणि दुसऱ्या ज्या प्रव्रजा विषयींच्या श्रुति परमात्म स्वरूपाचा आत्मत्वें करून साक्षात्कार झाल्यानंतर ब्रह्म वेत्ते पुत्रैषणा, वित्तैषणा, दारैषणादिक टाकून भिक्षा चर्या करतात. अशा अर्थाच्या श्रुतींत ज्ञान परिपाका साठीं किंवा जीवन्मुक्ति सुखा साठीं सांगितलेला जो ज्ञाना नंतर संन्यास ज्यास विद्वत्संन्यास म्हणतात त्या विषयींच्या आहेत. ज्ञानार्थ संन्यासच केला पाहिजे तर गार्गी, वसिष्ठ व्याधादिकांस ज्ञान होऊन ते ब्रह्मवेत्ते होते असें जें श्रुति पुराणादिकांत सांगितलें आहे तें कसें संभवेल तस्मात् चित्तशुद्धि साठीं कर्म केलें पाहिजे. ॥ ४ ॥

न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्य कर्मकृत् ॥
कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥

कर्माचे ठायीं आसक्ति न सणें म्हणजे मी कर्म कर्ता असा अभिमान आणि या पासून हें फल मला असावें अशी इच्छा न सणें हाच कर्माचा संन्यास स्वरूपतः अगदीं कर्म न करणें हा कर्म संन्यास नव्हे कारण तसा संन्यास अशक्य आहे असें सांगतात. ज्ञानी किंवा अज्ञानी कोणीही कोणतेही अवस्थेंत क्षणभर ही कर्म न करतां राहत नाहीं. तात्पर्य— संन्यास करून नित्य नैमित्तिक किंवा स्मार्त श्रौताग्नीं वर होणारीं जीं कर्मे तीं सोडलीं तरी आहार, भिक्षा, स्नान, शौच, पाहणें, बोलणें, इत्यादिक कर्मे देहेंद्रियादिकें करून होतानां राहत नाहींत. या विषयीं कारण सांगतात. पूर्व कर्म संस्कार रूप जी प्रकृति म्हणजे स्वभाव तिचे राग द्वेषादिक जे गुण त्यांचे प्रेरणेनें सर्व लोक स्वतंत्र न होतां कर्माचे ठायीं प्रवृत्त होतात. ॥ ५ ॥

कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ॥
इंद्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥

संन्यास करून, ध्यानें करून चित्त शुद्धीचें संपादन करीन असें मनांत येऊं नये या कारणास्तव ज्याची चित्त शुद्धि नाहीं आणि कर्म त्याग करणारा असा जो अज्ञानी त्याची निंदा करतात. जो अज्ञानी सांगितलेलीं कर्मे करणारीं जीं इंद्रियें सां-

त्या निग्रह करून शब्द,स्पर्श,रूप,रस,गंधादिक जे इंद्रियांचे विषय त्यांप्रत मनानें स्मरण करीत ह्मणजे ह्मणाला ओंकारास हा योगनिष्ठ आहे असें समजण्या करितां ध्यान करीत राहतो त्यास दांभिकाचार करणारा असें ह्मणतात.॥६॥

यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ॥
कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥

जो श्रोत्रादिक ज्ञानेंद्रियांस मनाकडुन ईश्वर परायण करून चित्त शुद्धीस साधन अशा कर्म योगाप्रत कर्मेंद्रियांनीं करतो तो विशिष्यते ह्मणजे चित्त शुद्धीचे द्वारा ज्ञानवान होतो किंवा पहिले दांभिकाचाऱ्यापेक्षां अधिक होतो.॥ ७॥

नियतं कुरु कर्म त्वं कर्मज्यायो ह्यकर्मणः ॥ शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥ ॥

या कारणास्तव तूं संध्या वंदनादिक जें नित्यकर्म तसेंच ग्रहणादिक निमित्त प्राप्त झालें असतां स्नानादिक करणें असें जें नैमित्तिक कर्म त्यांप्रत कर. कारण सर्व कर्मेंद्रियांचा निग्रह करून कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें श्रेष्ठ आहे आणि भोजनादिक सर्व कर्म सोडून तुझ्या शरीराचा निर्वाह ह्मणजे जीवन ही होणार नाहीं. तात्पर्य – ब्राह्मणांनीं पुत्रादिकांच्या इषणा (कामना) सोडून भैक्ष्यचर्या ह्मणजे संन्यास करावा. ब्रह्मचर्यादिक चार आश्रम ब्राह्मणास आहेत. तीन क्षत्रियांस आहेत. दोन वैश्यांस आहेत. संन्यास करणें हा धर्म मुख्य ह्मणजे ब्राह्मण यांचाच आहे. क्षत्रिय वैश्यांचा नाहीं अशा अर्थाच्या अनेक श्रुति स्मृतींत संन्यास करण्यास भिक्षावृत्तीनें उपजीवन करण्यास ब्राह्मणासच अधिकार आहे. क्षत्रियादिकांस नाहीं. तेव्हां तुझी चित्त शुद्धि जरी असली तरी तूं क्षत्रिय आहेस यास्तव तूं कर्मत्याग केलासतर भिक्षाचर्य करण्यास तुला अधिकार नाहीं यामुळें तुझे देहाचा निर्वाह होणार नाहीं यास्तव तुला कर्मच केलें पाहिजे.॥८॥

यज्ञार्थात् कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ॥
तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचर ॥ ९ ॥ ॥

कोणी सांख्यादिक ह्मणतात कीं, सर्वही कर्म बंध करणारें आहे यास्तव कोणानें ही कर्म करूंनये त्याचें निराकरण करून सांगतात. यज्ञ जो भगवान् विष्णु त्याचे आराधना साठीं जीं निष्काम कर्मे करतात त्यांहून दुसरीं निषिद्ध जीं काम्य कर्मे तींहीं करून हा जीव समुदाय जन्ममरण रूप बंधाप्रत पावतो. ईश्वराराधनार्थ केलेल्या निष्काम कर्मांनीं बंध पावत नाहीं. यास्तव हे कौंतेया, तूं निष्काम आणि हें क-

र्म मी केलें इत्यादिक अभिमान रहित होऊन ईश्वर प्रीत्यर्थ निष्काम कर्म कर. ॥ ९॥

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ॥ अ-
नेन प्रसविष्यध्वमेषवोस्त्विष्टकामधुक् ॥१०॥ ॥

प्रजापतीच्या बोलण्यावरून ही कर्म करणेंच श्रेष्ठ आहे असें सांगतात. य ज्ञासहवर्तमान ज्या राहतात म्हणजे यज्ञ करण्यास ज्यांस अधिकार आहे अशा ज्या ब्राह्मणादिक प्रजा यांप्रत किंवा यज्ञासह्रां प्रजांप्रत सृष्टीचे आरंभीं उत्पन्न करून ब्रह्मदेव असें बोलला. कीं, यज्ञें करून तुम्हीं उत्तरोत्तर अभिवृद्धीप्रत पावा. हा यज्ञ तुम्हांस इच्छित भोग देणारा असो. येथें यज्ञ शब्द उपलक्षण आहे म्हणून तेणें करून अवश्य कर्तव्य जीं नित्यनैमित्तिक कर्में तीं हीं घ्यावीं. या प्रकरणांत काम्यकर्म जें यज्ञादिक त्याची प्रशंसा करणें जरी संगत नाहीं तथापि कर्म न करण्यापेक्षां कर्म करणें श्रेष्ठ आहे असें सांगण्या विषयींचें तात्पर्यानें ती प्रशंसा केली असें जाणावें. ॥१०॥

देवान् भावयताऽनेन ते देवा भावयंतु वः ॥ पर-
स्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥ ॥

इच्छित भोग देणारा यज्ञ कसा होईल तें सांगतात. तुह्मीं या यज्ञानें हविर्भाग देऊन देवांची वृद्धि करा आणि ते देव तुमची वृद्धि करोत. याप्रमाणें परस्पर परस्परांची वृद्धि करणारे तुह्मीं उत्कृष्ट कल्याणाप्रत पावाल. ॥११॥

इष्टान् भोगान् हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः ॥
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥१२॥

हेंच स्पष्ट करून कर्म न केलें असतां दोष सांगतात. यज्ञांहीं करून वृद्धीप्रत पावविलेले देव वृष्ट्यादिकांचे द्वारानें तुम्हांप्रत अन्नादिक इष्टभोग देतील. देवांनीं दिलेलीं जीं अन्नें त्यांप्रत पंचमहायज्ञादिकें करून देवांस न देतां जो भक्षितो तो चोरच आहे असें जाणावें. ॥१२॥

यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः ॥
भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ॥१३॥

यास्तव पंचमहायज्ञादिक करणारेच श्रेष्ठ आहेत, असें सांगतात. वैश्वदेवादिक करून अवशिष्ट राहिलेलें जें अन्न त्याचें भोजन जे करतात ते कंडणी ( कांडण्यानें होणारी ) पेषणी ( दळण्यानें किंवा वाटण्यानें होणारी ) चुल्ली ( चुलीच्या संबंधानें होणारी ) उदकुंभी ( उदकाचे योगानें होणारी ) मार्जनी ( झाडण्या सार-

विण्यानें होणारी ) या पंचसूना गृहस्थांस हिंसादि दोष उत्पन्न करणाऱ्या आहेत. या मुळें गृहस्थांस स्वर्गास गमन होत नाहीं असें स्मृतींत पंचसूना मुळें प्रमादानें होणारे दोष सांगितले आहेत त्यां पासून मुक्त होतात. जे वैश्वदेवादिकार्थ पाक न करतां आपले भोजना साठींच केवळ पाक करतात. ते दुराचारी पापाचेंच भोजन करतात. १३

**अन्नाद्भवंति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ॥ यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥ ॥**

या जगाचे चक्राचे प्रवृत्तीस कर्म साधन आहे, या कारणानें हीं कर्म करावें असें सांगतात. शुक्र शोणित रूप जो परिणाम त्याचे द्वारानें अन्ना पासून सर्व भूतें उत्पन्न होतात. अन्नाची उत्पत्ति पर्जन्य वृष्टि पासून होते, पर्जन्य वृष्टि यज्ञा पासून होते आणि यज्ञ हविः प्रक्षेप करणें इत्यादिक जें यजमानाचें व्यापार रूप कर्म त्या पासून निष्पन्न होतो. ॥१४॥

**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ॥ तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥ ॥**

यजमानादिकाचें व्यापाररूप जें कर्म तें असें करावें असा जो विधि त्याचे द्वारानें वेदा पासून उत्पन्न झालें आहे असें जाण. तात्पर्य– हें पुण्य, हें पाप, इत्यादिकां विषयीं वेदच प्रमाण आहेत. पाखंडांचे धर्मानें प्रतिपादन करणारे आगम प्रमाण नाहींत यास्तव पुण्य पाप रूप कर्म वेदा पासूनच उत्पन्न आहे आणि वेदरूप जें शब्दब्रह्म तें, अक्षर जें परब्रह्म त्या पासून उत्पन्न झालें आहे. तात्पर्य– वेद हे सर्वज्ञ आणि आप्त म्हणजे यथार्थ वक्ता असा जो परमेश्वर त्या पासून उत्पन्न झाले आहेत. आणि परमेश्वराचे ठायीं भ्रांति किंवा प्रतारणा करणें हें संभवत नाहीं यास्तव वेदोक्त जे धर्माधर्म तेच पुण्य पापरूप आहेत. पाखंडागम कर्ते जीव आहेत. त्यांचे ठायीं भ्रांति किंवा प्रतारणा संभवते यास्तव त्यांनीं सांगितलेले स्वरूपाचे धर्माधर्म नव्हेत. अक्षर परब्रह्मा पासून यज्ञाची प्रवृत्ति होऊन तो यज्ञ परब्रह्मास फार प्रिय या कारणास्तव परब्रह्म जरी सर्वव्यापक आहे तथापि निरंतर यज्ञाचे ठायीं प्रतिष्ठित आहे म्हणजे यज्ञरूप साधनानें प्राप्त होणारें आहे. जसा– उद्यमस्था लक्ष्मीः– या वाक्याचा उद्यमानें राहणारी म्हणजे उद्यमानें प्राप्त होणारी लक्ष्मी आहे, असा अर्थ– तसा– यज्ञे प्रतिष्ठितं म्हणजे यज्ञांत राहणारें याचा अर्थ जाणावा. १५

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ॥ अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥ ॥**

परमेश्वराच्या मुखांतून निघालेला जो वाक्य समुदाय रूप वेद त्या पासून कर्म स्वरूपाचें ज्ञान होऊन पुरुषाची कर्माचे ठायीं प्रवृत्ति होते ती पासून कर्माची निष्पत्ति होते, ती पासून पर्जन्य होतो, त्या पासून अन्न होतें त्या पासून भूतें होतात. त्यांची पुनः कर्मा विषयीं प्रवृत्ति होते या प्रमाणें जगाचे स्थितीस कारण कर्मादिकांचें चक्र परमेश्वरानें पुरुषार्थ सिद्धि साठीं प्रवर्तिलें आहे. त्या कर्मांपैत जो करीत नाहीं. त्याचें आयुष्य पापरूपी आहे आणि हे पार्था अर्जुना, ज्या कारणास्तव तो इंद्रियादिकें करून विषयाचे ठायींच रममाण होतो आणि ईश्वराराधना साठीं कर्माचे ठायीं रममाण होत नाहीं. यास्तव तो व्यर्थ जीवन पावतो तो मेला तर बरा. ॥१६॥

## यस्त्वात्मरतिरेवस्यादात्मतृप्तश्च मानवः॥ आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते॥१७॥ ॥

या प्रमाणें ॥ नकर्मणा मनारंभात्॥ इत्यादिकें करून जो अज्ञानी आहे त्यानें चित्तशुद्धि होण्या साठीं आणि अकरणीं मोठा प्रत्यवाय म्हणजे पाप उत्पन्न होतें त्याचे परिहारा साठीं कर्मे करावीं असें सांगून जो ज्ञानी आहे त्यानें तीं कर्मे न केलीं तर त्यासही अज्ञान्या प्रमाणें अकरणीं मोठा प्रत्यवाय होईल अशी शंका होईल ती न व्हावी यास्तव ज्ञान्यास कर्म करण्याची अपेक्षा नाहीं असें दोन श्लोकांनीं सांगतात. परमेश्वराराधनार्थ नित्य नैमित्तिक कर्माचे अनुष्ठानानें चित्त शुद्धि होऊन नंतर आत्मस्वरूपाचे जिज्ञासेनें सद्गुरूस शरण जाऊन गुरूपासून वेदांत श्रवणादिक आत्म विचार करून श्रुति युक्ति आणि अनुभव यांहीं करून आत्मा जड आणि दुःखादिक स्वरूप जें देहेंद्रियादिक त्याहून निराळा आनंदात्मक ब्रह्मस्वरूपच आहे अशी अनुभूति झाल्यामुळें आनंद स्वरूप आत्म्याचेच ठायीं ज्याची रति म्हणजे निरतिशय प्रीति आहे त्यास कांहीं कर्तव्य नाहीं असा अन्वय आहे. पूर्वोक्त ज्ञान्यास श्रुति प्रमाणावरून आत्मा आनंदरूप आहे असा निश्चय कसा होतो त्याविषयीं संक्षेपानें लिहितो. तैत्तिरीयोपनिषदाचे विचारा वरून आत्मा आनंद रूप आहे असा निर्णय होतो तो असा:- भृगु नामक वरुणाचा पुत्र आपणास ब्रह्मात्म ज्ञान व्हावें या इच्छेनें आपला पिता जो वरुण त्यास शरण जाऊन मला ब्रह्मोपदेश करा असें ह्मणाला. तेव्हां त्यानें त्यास ज्या पासून हीं भूतें उत्पन्न होतात आणि उत्पन्न झालेलीं भूतें ज्याचे सत्तेनें स्थिति प्रत म्हणजे अस्ति- भाति या व्यवहाराप्रत पावतात आणि ज्याचे ठायीं लय पावतात तें ब्रह्म, असें ब्रह्म लक्षण सांगून अत्यंत दुर्ज्ञेय आणि सर्वांतर असें आत्मस्वरूप प्रथमच सांगितलें तर त्याचा बोध होणार नाहीं म्हणून क्रमानें आत्म बोध व्हावा या हेतूनें प्रथम सर्वलोक ज्या शरीरास आत्मा असें म्हणतात असा अन्नमय कोशरूप जो स्थूल देह हाच ब्रह्म असें सांगितलें. नंतर

त्यापेक्षां सूक्ष्म जो प्राणमय कोश तो ब्रह्म असें सांगितलें, तंतर त्यापेक्षां सूक्ष्म जो मनोमय कोश तोच ब्रह्म असें सांगितलें, तंतर त्यापेक्षां सूक्ष्म जो विज्ञानमय कोश तोच ब्रह्म असें सांगितलें, तंतर त्याहून सूक्ष्म आणि सर्वांतर जो आनंदमय कोश त्यास पुच्छ म्हणजे पुच्छाप्रमाणें आधारभूत जें बिंबभूत आनंदस्वरूप तेंच ब्रह्म असें सांगितलें, येणें करून भृगुपित्यानें सांगितलेल्या ब्रह्मलक्षणाचा अन्नमयादिक कोणत्याही कोशाचे ठायीं संभव नाहीं असा त्या कोशस्वरूपांच्या विचारें करून निश्चय करून ग्राम्य धर्म निमित्तक जो आनंद त्यापासूनच सर्वभूतांची म्हणजे प्राण्यांची उत्पत्ति होते आणि उत्पन्न झालेल्या भूतांचें जीवन ही अन्नपानादिक जे विषयोपभोग त्यांपासून उत्पन्न होणाऱ्या आनंदापासूनच होतें आणि सर्व प्राण्यांचा लयही सुषुप्ति कालचे आत्मस्वरूपानंदाचे ठायींच होतो. सुषुप्ति कालीं आनंदाशिवाय प्रकाशानुभवरूप दुसऱ्या पदार्थांचा अनुभव नाहीं. यास्तव आनंदच ब्रह्म आहे असें लक्षणा वरून आणि अनुभवा वरून त्याणें जाणलें. या प्रमाणेंच छांदोग्योपनिषदांतील श्रुती वरून ही आत्मा आनंदरूप आहे असा निश्चय होतो. तो असा:- छांदोग्योपनिषदांत सनत्कुमार आणि नारद यांचा संवाद लिहिला आहे, त्यांत नारद पुराणासुद्धां चार वेद आणि अनेक शास्त्रें यांचें अध्ययन करून ही आत्मज्ञान न झाल्यामुळें फार शोकाविष्ट होऊन सनत्कुमारा जवळ जाऊन असें बोलला. हे विद्वन् सनत्कुमारा, मला वेदादिकांच्या अध्ययना पूर्वीं आध्यात्मिक (देहमन यापासून होणारें) आधिभौतिक (प्राणि मात्रा पासून होणारें) आधिदैविक (देवता क्षोभानें होणारें) यात्रिविध तापामुळें शोक होत होता. आध्यात्मिकादि पदार्थ-॥ किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम॥ अधिदैवंच किं प्रोक्तमधिभूतं किमुच्यते॥ या प्रश्नाचे उत्तरांत भगवंतानीं सांगितले आहेत, त्या पदार्थांमुळें होणारे जे ताप ते त्रिविध (तीन प्रकारचे) ताप जाणावे. वेदादिकांच्या अध्ययनानंतर वेदादिकांचा अभ्यास म्हणजे पाठावृत्ति करणें आणि पाठ केलेल्याचें विस्मरण होणें आणि भंग म्हणजे आपले पेक्षां अधिक पाठ करणारांनीं आपला केलेला जो तिरस्कार आणि गर्व म्हणजे आपणापेक्षां न्यून पाठ करणारा पाहिला म्हणजे आपले ठायीं आधिक्य बुद्धि यांहीं करून अधिकच शोक मला झाला आहे असा मी आत्मज्ञान नसल्यामुळें शोक करीत आहें आणि आपल्या सारखे जे तत्त्ववेत्ते आहेत त्यांपासून मी असें ऐकिलें आहे कीं, आत्मवेत्ता सर्व शोकांस तरतो यास्तव मी आपणा जवळ शोक तरण्याचा उपाय जें तत्त्वज्ञान तें मला व्हावें या साठीं आलों आहें. म्हणून हे भगवन् सनत्कुमारा, मला आत्मज्ञान सांगून शोकापासून तार. असें नारदाचें वाक्य ऐकून आकाशादिक पंचमहाभूतें आणि त्यांचीं कार्यें जे जरायुज (मनुष्य पश्वादिक) अंडज (प-

क्षि सर्पादिक ) स्वेदज ( मत्कुणादिक ) उद्भिजादिक ( वृक्षादिक ) प्राणी त्यांचे उत्पत्तीचे पूर्वी ज्यास विज्ञानमय ह्मणतात असा जो ज्ञाता म्हणजे बुद्ध्युपाधिक किंवा बुद्धि प्रतिबिंबित चैतन्यरूप जीव आणि ज्ञान म्हणजे ज्ञेयाकार मनोवृत्ती-चे ठायीं प्रतिबिंबित चैतन्य आणि ज्ञेय म्हणजे त्या ज्ञानानें प्रकाश पावणारे शब्दादिक विषय ही ज्ञाता, ज्ञान आणि ज्ञेय एतद्रूप त्रिपुटी नव्हती यामुळें द्वैत रहित जो भूमा म्हणजे देशकाल वस्तुपरिच्छेद रहित सर्व भूमांचें कारण जें ब्रह्म तें एकच होतें, तें त्रिपुटी रहित अद्वैत ब्रह्म प्राणिमात्रास सुषुप्तिकालीं आनंदरूपत्वें करून अनुभवास येतें, सुषुप्ती पासून जो उठला त्यास एतावत्काल पर्यंत सुखानें निजलों होतों असें स्मरण होतें, हें स्मरण सुखरूप आत्म्याचे अनुभवा शिवाय होणार नाहीं. यावरून आणि सुषुप्ति कालीं आत्मस्वरूप आनंदाशिवाय दुसरा आनंद होण्यास किंवा आनंदाचा अनुभव होण्यास लोकांतील प्रसिद्ध साधनें जीं विषय भोगादिक किंवा इंद्रियादिक तीं त्याकालीं नाहींत. यास्तव आनंदरूप जो आत्मा तत्स्वरूपच सर्वांस अनुभव होतो असें म्हणावें. याचप्रमाणें समाधीचे ठायीं विद्वानास सुखस्वरूप त्रिपुटी रहित अद्वैतात्म्याचा अनुभव आहे. समाधी पासून उठल्यानंतर एतावत् काल पर्यंत मी सुखानें ध्यान करीत होतों, दुसरें कांहीं जाणत नव्हतों अशा स्मरणावरून पूर्वोक्त युक्तीनें तो अनुभव सिद्ध होतो असें भूमब्रह्म नारदास सांगून तें ब्रह्म सुखरूप स्वात्मस्वरूपच आहे. आपणास दुःख देणारा जो आपणाहून दुसरा पदार्थ तो अद्वैतात्म्याचे ठायीं नाहीं. अल्प म्हणजे ज्ञाता ज्ञान ज्ञेय रूप जें परिच्छिन्न वस्तु त्याचे ठायीं सुख नाहीं. स्रक् चंदन वधूवस्त्र शब्दस्पर्शादिक विषयानुभवा पासून जरी लेश मात्र सुख अनुभवास येतें तथापि तें सुख सहस्त्रशः दुःखानीं किंवा शोकांनीं वेष्टित आहे. यामुळें विषयुक्त अन्ना प्रमाणें परिणामीं दुःखाचाच साधन आहे. या कारणानें आत्म्याचे ठायीं सुख नाहीं असें सांगितलें. असा सुखरूप जो आत्मा तद्रूप जें भूम शब्दवाच्य त्रिविध परिच्छेद रहित अद्वैत ब्रह्म-त्याच्या उपदेशेंकरून आत्मज्ञान होऊन नारदाचे सर्व शोक गेल्यानंतर त्याला तमाहून पर म्हणजे अज्ञान आणि त्यांचीं जीं कार्यें तीहीं करून रहित, असें आत्मस्वरूप सनत्कुमारानें दाखविलें. तेणें करून नारद कृतार्थ झाला. जागृदादि लक्षण सर्व प्रपंच आपलें उपादान कारण जी तमोगुण प्रधान प्रकृति तिचे ठायीं लयाप्रत पावला असतां त्या प्रकृतीनें म्हणजे प्रकृति शब्दवाच्य सुषुप्तींतील अज्ञानानें आवृत झालेला जीव आपलें निजस्वरूप ब्रह्म त्याप्रत पावतो म्हणजे उपाधि त्यागानें तद्रूपच होतो. या अर्थाची अथर्वण वेदांतील श्रुति ही आत्म्यास आनंदरूपत्वाविषयीं प्रमाण आहे आणि ब्रह्म विज्ञान स्वरूप आणि आनंद-

११

स्वरूप आहे अशा अर्थाची श्रुति वाजसनेयी पठनांत यावरून ही ब्रह्म आनंदस्वरूपच आहे. या प्रमाणें सर्व शाखास्थ महावाक्यें उपाधिरहित जीवस्वरूपास ब्रह्मत्व सांगतात. यावरून आत्मा आनंदरूप आहे असें श्रुतीवरून निश्चित होतें. तसेंच युक्तीवरून ही आत्म्यास आनंदरूपत्व निश्चित होतें. तें असें:– आत्मा परमानंदरूप आहे कशावरून म्हणाल तर तो निरतिशय प्रीतीचें आस्पद म्हणजे स्थान आहे म्हणून जो परमानंदरूप नाहीं तो निरतिशय प्रीतीचें आस्पद म्हणजे स्थान नसतो. जसें जड आणि दुःखादिरूप घटादिपदार्थ या अनुमानांतील हेतुभूत जें निरतिशयितप्रीतीचें आस्पदत्व (स्थानत्व) तें आत्म्यावर श्रुतियुक्ति आणि अनुभव यांहीं करून सिद्ध आहे त्यांत श्रुतीवरून कसें सिद्ध होतें तें सांगतो. याज्ञवल्क्य नामक यजुःशाखा प्रवर्तक ब्रह्मवेत्त्यां मध्यें श्रेष्ठ असा ऋषि आपली मैत्रेयी नामक जी प्रिय स्त्री तिला आत्मानंद बोधन करण्यासाठीं, स्त्री आपल्या पतीचे ठायीं जी प्रीति करते ती पतीचे प्रयोजनासाठीं करीत नाहीं, तर आपणास जेव्हां पतिविषयक काम होतो तेव्हां आपले प्रयोजनासाठींच करते याचप्रमाणें पति आपल्या स्त्रीचे ठायीं जी प्रीति करतो ती स्त्रीचे प्रयोजनासाठीं करीत नाहीं तर आपणास जेव्हां स्त्रीविषयीं काम होतो तेव्हां आपले प्रयोजनासाठीं करतो. जेव्हां क्षुधेकरून किंवा रोगादिकें करून आपणास काम नाहीं तेव्हां परस्पर प्रीति करीत नाहींत. जेव्हां दोघांसही एककालींच परस्परांचा काम होऊन दोघे प्रवृत्त होतात तेव्हां परस्परांची प्रीति आपआपलेच कामाचे तृप्तीचे उद्देशानें असते. तात्पर्य:– सर्वत्र सर्वांची प्रवृत्ति आपले प्रयोजनासाठींच असते, दुसऱ्याचे प्रयोजनासाठीं नसते. यास दृष्टांत:– आपल्या मुखावरील श्मश्रु कंटकाच्या वेधानें बालक रोदन करीत असतां ही पिता त्या बालकाचे मुखाचें चुंबन जसें आपले सुखासाठीं करतो तसेंच सुवर्णादिक वित्तावर प्रीति करून त्याचें चांगलें परिपालन सर्व करतात तें आपले प्रयोजनासाठींच असतें येथें वित्ताचे प्रयोजनाची शंका ही नाहीं. तसेंच वृषभ इच्छा करीत नसतां ही त्यावर प्रीति करून त्याचें पोषण वाणी किंवा कर्षक म्हणजे शेतकरी करतो तें त्या वृषभाचे प्रयोजनासाठीं नाहीं तर आपलें प्रयोजन जें भारवाहणें किंवा भूमीचें कर्षण करणें इत्यादिक यासाठींच आहे. तशीच ब्राह्मण्यावर जी प्रीति ती आपणास पूज्यत्व यावें या प्रयोजनासाठीं आहे, आणि क्षत्रियत्वावर जी प्रीति ती आपणास राज्य मिळावें या प्रयोजनासाठींच आहे. अचेतन ज्या जाती त्यांस मुळींच इच्छा नाहीं यास्तव त्यांचे प्रयोजनासाठीं म्हणणें संभवतच नाहीं. आणि स्वर्गलोक आणि ब्रह्मलोक यांवर जी प्रीति ती आपले भोगासाठींच आहे त्यांचे प्रयोजनासाठीं नाहीं. शिवविष्ण्वादिकांवर जी प्रीति ती आपले पापनिवृत्तिसाठीं आहे. त्यांस निष्पापत्वामुळें तिचें प्रयोजन–

नाहीं, वेदाध्ययनावर जी प्रीति ती आपलें ब्राह्मत्व जाण्यासाठीं वेदांस तिचें प्रयोजन नाहीं, पृथ्वीवर स्थान मिळण्यासाठीं, जलावर तृषा शांत होण्यासाठीं, तेजावर पाक होण्यासाठीं, वायूवर शुष्कता होण्यासाठीं, गगनावर अवकाश मिळण्यासाठीं, जी प्रीति ती सांगितलेले स्वार्था साठींच आहे, त्यांत त्या जडभूतांचें कांहीं प्रयोजन नाहीं या प्रमाणें सर्वांची सर्व व्यवहारांत आपले स्वार्था साठींच त्या त्या व्यवहारावर प्रीति असते असें जाणून सर्वही आत्मार्थच प्रिय आहे या साठीं सर्वांहून आत्माच अधिक प्रिय आहे आणि आत्म्याहून भिन्न जे स्त्री पुत्र, पति जायादिक ते आपणासाठीं म्हणजे आत्म्याचे साठींच प्रिय आहेत. अशी बुद्धीची दृढता करावी असें सांगता झाला. यावरून आत्म्यावर या श्रुति प्रमाणावरून निरतिशय प्रीतीचें आस्पदत्व सिद्ध झालें. आत्म्यास निरतिशयित प्रीतीचें आस्पदत्व जरी सिद्ध झालें तरी जशीं अन्न, पान, स्त्री, वस्त्रें सुखास साधन असल्यामुळें प्रिय होतात तसाच आत्माही सुखास साधन आहे या मुळें तो प्रिय आहे असें कां नाहीं आणि असें असेल तर आत्मा सुखरूप आहे असें कसें सिद्ध होईल अशी शंका करूं नये. जर आत्मा सुखास साधन असेल तर अन्नादिक जें सुखास अनुकूल पदार्थ त्यांस अनुकूलयितव्य म्हणजे त्यां पासून झालेल्या सुखाचा भोग त्यांस होईल असा अन्नादिकाहून निराळा जसा आत्मा आहे तसा येथें आत्म्याचे अनुकूलतेनें होणाऱ्या सुखास भोक्ता दुसरा कोण आहे आत्म्याशिवाय तर भोक्ता नाहीं तेव्हां हें कसें संभवेल? आत्म्याचे अनुकूलतेनें होणाऱ्या सुखाचा भोक्ता आत्माच आहे असें म्हणाल तर एकाच आत्म्यास अनुकूलत्व आणि अनुकूलयितव्य त्व हें धर्म द्वय विरुद्ध आहे. आत्मा सुखरूप असतांनां ही विषयां पासून होणाऱ्या सुखाहून विलक्षण आणि नित्य म्हणजे उत्पत्ति विनाशरहित आहे या कारणानें निरतिशय प्रीतीचें पात्र आहे. वैषयिक सुख तर उत्पन्न होऊन नाश पावणारें आहे या कारणानें एका सुखावरील प्रीति जाऊन दुसरे सुखावर प्रीति होते यास्तव त्यावरील प्रीतीचा व्यभिचार आहे म्हणून त्यावर केवळ प्रीति मात्र आहे निरतिशयित प्रीति नाहीं. आत्मस्वरूप सुख नित्य आहे यामुळें त्या वरील प्रीति सर्वदां एकसारखी असते यास्तव तिचा व्यभिचार नाहीं आणि वैषयिक सुखा प्रमाणें आत्मा त्याग करण्यास आणि ग्रहण करण्यास योग्य नाहीं यास्तव ही आत्म्या वरील प्रीतीचा व्यभिचार नाहीं आणि उपेक्षा करणारांचें स्वरूपच आत्मा आहे यावरून त्यावर वैषयिक सुखा प्रमाणें उपेक्षा ही होत नाहीं या कारणानीं ती प्रीति निरतिशयित आहे. कितीएकांस आत्म्यावर रोगादिक कारणामुळें द्वेष उत्पन्न होऊन ते आत्मत्याग करतात असें लोकांत पाहिलें आहे तेव्हां आत्म्यास निरतिशय प्रीतीचें आस्पदत्व कसें सांगतां आणि त्यास त्या-

ग करण्यास अयोग्यत्व कसें सांगतां अशी शंका करूंनये. रोग क्रोधादिकें करून जो त्याग करतात तो त्याग आत्म्याचा नाहीं आणि त्या त्यागास कारण जो द्वेष तो आत्म्यावरील नाहीं, तो त्याग करण्यास योग्य आणि रोगादिकें करून व्याप्त झाल्यामुळें द्वेषकरण्यास योग्य जो देह त्याचा आहे. देह कांहीं आत्मानव्हे आणि देहाहून जो भिन्न आत्मा त्याचवर रोगादिक नाहींत यास्तव देहादिकावर झालेले रोगादिकांचे संबंधामुळें जें आत्म्यास दुःख होतें त्याचा नाश होऊन आत्म्यास सुख व्हावें या साठीं देहाचा त्याग करतात यावरून आत्म्यावर निरतिशयित प्रीतीचें आस्पदत्व श्रुतींतील याज्ञवल्क्याचे संवादावरून सिद्ध झालें. युक्तीनें म्हणजे अनुमानें करून ही आत्म्यास प्रियतमत्व सिद्ध होतें. तें असें– आत्मा निरतिशयित प्रीतीचें आस्पद आहे. कशावरून म्हणालतर ज्यांवर आपण तारतम्यें करून प्रीति करतों ते वित्तादिक प्राणांत पदार्थ आत्म्याचेंच प्रयोजनासाठीं जी प्रीति तिचे आस्पद होतात या हेतूवरून तें असें– सुवर्णादिक वित्त आपले सुखास साधन आहे यामुळें तें सर्वांस प्रिय आहे कदाचित् आपले पुत्रास विपत्ति प्राप्त झालीतर तिचे परिहारासाठीं प्रिय वित्ताचा ही व्यय लोक करतात यास्तव वित्तापेक्षां ही पुत्र प्रिय आहे आपणावर प्रसंग आलातर आपल्या देहाचें रक्षण करण्यासाठीं पुत्रादिकांचें ही दान लोक करतात. यामुळें पुत्रादिकांपेक्षां ही आपला देह प्रिय आहे. आपले चक्षुरादिक इंद्रियांचा नाश होण्याचा प्रसंग प्राप्त झाला तर त्यांचा नाश न व्हावा यासाठीं आपले देहास पीडा जरी झाली तरी तिचा अंगीकार करतात. यावरून देहापेक्षां ही इंद्रियें प्रिय आहेत. प्राण जाण्याचा प्रसंग आला तर इंद्रियांचा नाश होऊन जर प्राण वांचतो तर इंद्रियांचाही नाश स्वीकारतात. यामुळें इंद्रियांपेक्षां ही प्राण प्रिय आहे. प्राण तर आत्म्यासाठींच प्रिय आहे या युक्तीवरून आत्मा निरतिशयित प्रीतीचें आस्पद आहे असें सिद्ध होतें. नसेंच मी कधीं ही नसावें असें होऊंनये. तर माझी सत्ता सर्वदां सर्वत्र असावी अशी सर्व प्राणिमात्र प्रार्थना करतात या सर्वांच्या अनुभवावरून ही आत्मा प्रियतम आहे असें सिद्ध होतें. याप्रमाणें निरतिशयित प्रीतीचे आस्पदत्वें करून आत्मा परमानंदरूप आहे असा अनुमानानें निश्चय होण्यास सार्वभौमापासून आरंभ करून हिरण्यगर्भापर्यंत जीं स्थानें आहेत तेथें उत्तरोत्तर शतगुणित अधिक आनंद आहे यामुळें त्या स्थानाची प्राप्ति व्हावी याविषयीं प्रीति वृद्धि पावते. असें तैत्तिरीय श्रुतींत आणि बृहदारण्यक श्रुतींत वर्णिलें आहे यावरून प्रीतीचें आधिक्य म्हणजे निरतिशयित्व आनंदाचे आधिक्यामुळें होतें असें जें सांगितलें श्रुतींत सूचविलें तेंही प्रमाण आहे, सुप्ती पासून आणि समाधी पासून जो उठला त्यास एतावत्पर्यंत मी सुखें करून निजलों होतों, सुखें करून ध्यान करीत होतों असें स्मरण होतें यावरून ही सुप्तींत (निद्रेंत) आणि समाधींत दुसरे वैषयिकादिक सुखाचे असंभ-

यामुळें सुखरूप जो आत्मा त्याचा स्वप्रकाश आत्मरूप अनुभव आहे असें ही सिद्ध होतें. आणि सुषुप्ति काळीं सुख प्राप्त व्हावें या हेतूनें मोठ्या प्रयत्नानें मृदु शय्यादिकांचें संपादन सर्व लोक करतात. या वरून ही आत्मा आनंदरूप आहे असें सिद्ध होतें. सुषुप्ति काळीं दुसरे विषय सुखाचा असंभवच आहे. जर आत्मा सुखरूप नाहीं तर हा प्रयास कशास लोक करितील. दुःख नाशासाठीं प्रयास करतात असें संभवत नाहीं. जे रोगादिकें करून पीडित आहेत त्यांचा प्रयास दुःख नाशार्थ आहे, असें म्हणतां येईल परंतु जे रोगी नाहींत आणि ज्यांस दुसरीं दुःखें नाहींत त्यांचा प्रयास दुःखनाशार्थ म्हणतां येत नाहीं तेव्हां त्यांचा प्रयास वैषयिक जें जागृद्वस्थेंतील सुख त्यापेक्षां ही अतिशयित आत्मस्वरूप जें सुख तें प्राप्त होण्या साठींच आहे असें कल्पावें हें योग्य आहे. अर्धजरतीय कल्पना योग्य नाहीं. शय्यादिक साधनानें आत्मसुखाचें अभिव्यक्तीस प्रतिबंधक जें जागरणांतील द्वैत दर्शन तें निद्रेनें जाऊन नित्य आत्मसुख निद्रेंत अभिव्यक्त होतें यामुळें त्या सुखावर साधन जन्यत्व शंका नाहीं या प्रमाणें श्रुति, युक्ति आणि अनुभव या प्रमाणा वरून आत्मा आनंदरूपच आहे असा तत्त्वज्ञान्यास अनुभवात्मक निश्चय होऊन तो त्या निरतिशय सुखस्वरूप आत्म्याच्या ठायींच सुखमात्रा कडे गमन करणारी आणि शुद्ध सत्व गुणाचा जो परिणाम तद्रूप अशीजी अंतःकरण वृत्ति रूप निरुपाधिक प्रीति ती करतो. नंतर त्या प्रीतीनें आणि नित्यानंदरूप जो आत्मा त्याचे अपरोक्षानुभवामुळें त्यास सर्व काम प्राप्त होऊन आत्म्याचेच ठायीं निरतिशयित तृप्तीनें तो युक्त होतो. आत्म स्वरूप ब्रह्मानंदानुभव ज्यास झाला त्यास सर्व कामांची प्राप्ति होऊन तो तृप्तीप्रत कसा पावतो तें तैत्तिरीयोपनिषदांत आणि बृहदारण्यकोपनिषदांत वर्णिलें आहे तें संक्षेपानें लिहितों. युवा म्हणजे तरुण आहे आणि रूपवान आहे आणि विद्यावान् आहे आणि निरोगी आहे आणि त्याचें चित्त दृढ आहे, आणि ज्या जवळ पुष्कळ गज, रथ, तुरंग, पदाति इत्यादि चतुरंग सैन्य आहे आणि वित्तानें पूर्ण आणि सर्व पृथ्वीचें पालन करणारा असा जो सार्वभौम राजा तो ज्या आनंदाप्रत पावतो त्या आनंदाप्रत निष्काम ब्रह्मवेत्ता पावतो. सार्वभौमास मनुष्य लोकांतील सर्व इच्छित भोग प्राप्त होऊन ज्यास मानुषानंद म्हणतात तो आनंद प्राप्त होतो. ब्रह्म वेत्त्यास सर्व विषय भोगांची प्राप्ती नाहीं असें वैषम्य असतां दोघांचे आनंद प्राप्तीचें साम्य कसें होईल अशी शंका करूं नये. राजास सर्व मनुष्य लोकांतील विषय भोग प्राप्त झाल्यामुळें त्यास त्या विषय भोगां विषयीं कामना होत नाहीं. आणि ब्रह्मवेत्त्यास नित्यानित्य वस्तु विवेक ज्ञान होऊन विषय भोगेच्छा होत नाहीं. यामुळें दोघांस ही निष्कामता समानच आहे यामुळें दोघांचीही तृप्ति निष्कामते मुळें सारखी आहे. तत्त्ववेत्त्यास वेदशास्त्रांत जे विषय भोगाचे दोष सांगितले आहेत ते मैत्रायणी शाखेंत बृहद्रथ नामक-

राजानें गाथाही करून गायले आहेत. ते देहदोष, चित्तदोष, भोग्यदोष, असे अनेक आहेत. ते येथें विस्तारभयानें लिहवत नाहींत. श्वानानें वांति केलेलें जें पायस त्यावरील दोष पाहून जशी कोणासही त्याचे भक्षणाची इच्छा होत नाहीं तशी तत्त्ववेत्त्यास विषयांवरील दोष पाहून त्यांचे भोगाविषयीं इच्छा होत नाहीं. राजा आणि तत्त्ववेत्ता यांस सांगितले प्रमाणें निष्काम सारखें असलें तरी राज्य मिळविण्याविषयीं राजास फार दुःख असतें आणि प्राप्त झालेले राज्याचा पुढें नाश होईल - अशा भीतीमुळें ही त्यास दुःख असतें. हें द्विविध ( दोनप्रकारचें ) ही दुःख ब्रह्मज्ञान्यास नाहीं यामुळें राजापेक्षांही ज्ञान्याचा आनंद अधिक आहे. आणि सार्वभौमाच्या आनंदापेक्षांही गंधर्वांचा आनंद शतगुणित अधिक आहे. त्यामुळें त्या आनंदाची इच्छा राजास असते ज्ञान्यास ती इच्छा नसते. मनुष्य, गंधर्व आणि देवगंधर्व याभेदानें गंधर्व दोन प्रकारचे आहेत. याच कल्पीं पूर्वी मनुष्य असून पुण्यपरिपाकें करून जो गंधर्वत्वाप्रत पावतो त्यास मनुष्य गंधर्व म्हणावें त्याचा आनंद मनुष्यांतील श्रेष्ठ जो सार्वभौम राजा त्याच्या आनंदापेक्षां शतगुणित अधिक आहे. पूर्वकल्पीं केलेल्या पुण्यें करून या कल्पाचे आरंभींच जे गंधर्वत्वाप्रत पावले आहेत. त्यांस देव गंधर्व म्हणावें. मनुष्य गंधर्वापेक्षां देवगंधर्वांचा आनंद शतगुणित अधिक आहे, अग्निष्वात्तादिक जे चिरकाल राहणाऱ्या लोकांत चिरकाल राहणारे पितर त्यांचा आनंद देव गंधर्वांच्या आनंदापेक्षां शतगुणित अधिक आहे. आजानदेव, कर्मदेव आणि मुख्यदेव असे तीन प्रकारचे देव आहेत. कल्पाचे आरंभींच जे पूर्वकल्पीं केलेल्या पुण्यानें देवत्वाप्रत पावले आहेत त्यांस आजान देव म्हणावें त्यांचा आनंद पितरांचे आनंदापेक्षां शतगुणित अधिक आहे. याच कल्पीं अश्वमेध यज्ञादिक पुण्यें करून जे मोठे पदाप्रत पावले आहेत आणि ज्यांची पूजा आजान देव ही करितात त्यांस कर्मदेव म्हणावें त्यांचा आनंद आजान देवांपेक्षां ही शतगुणित अधिक आहे, यम अग्नि इत्यादिक मुख्य देव आहेत त्यांचा आनंद कर्म देवांपेक्षांही शतगुणित अधिक आहे. त्यांपेक्षांही इंद्राचा आनंद शतगुणित अधिक आहे, इंद्राचे आनंदापेक्षां ही बृहस्पती जो देवांचा गुरु त्याचा आनंद शतगुणित अधिक आहे, बृहस्पतीचे आनंदापेक्षांही प्रजापतीचा म्हणजे विराट पुरुषाचा आनंद शतगुणित अधिक आहे, प्रजापतीच्या आनंदापेक्षांही सूत्रात्मा ज्यास हिरण्यगर्भ म्हणतात असें जें कार्य ब्रह्म त्याचा आनंद शतगुणित अधिक आहे. सार्वभौमापासून हिरण्यगर्भापर्यंत जे सांगितले ते आपले पेक्षां उत्तरोत्तर अधिक जो आनंद त्याची इच्छा करणारे सकाम आहेत ते त्यात्या आनंदाची इच्छा करतात. यांच्या आनंदापेक्षांही अधिक आणि वाणीस व मनास अगोचर असा निरतिशयित ब्रह्मानंद आहे तोच सार्वभौमापासून हिरण्यगर्भापर्यंत सांगितलेल्याच्या ज्या तत्तद्विषय भोगापासून झालेल्या सत्त्वगुणाच्या परि-

णाम भूत अंतःकरण वृत्ति त्या वृत्तींत त्यांच्या पुण्य परिपाकाधिक्यामुळें जें सत्व-गुणाचे शुद्धीचें तारतम्य त्यामुळें तर तमभावानें प्रतिबिंबित होऊन हा त्यांचा आनंद, हा त्यांचा आनंद अशा व्यवहाराप्रत पावला आहे. तो बिंबभूत ब्रह्मानंद स्वात्मत्वें करून ज्यानें अनुभविला आहे असा जो तत्वज्ञानी त्यास त्या प्रतिबिंबभूत-सर्व आनंदाची बिंबस्वरूपानंद प्राप्तीनें प्राप्ति होते. त्या प्राप्तीसच युगपत् म्हणजे एके काळींच सर्व कामावाप्ति असें म्हणावें. ती प्राप्ति झाल्यामुळें तो त्या सर्व आनंदा विषयीं निस्पृह होऊन निरंकुश तृप्तीप्रत पावतो. आणि आपणास कृतकृत्यत्व मानितो. आणि जें मिळवावयाचें तें सर्व मिळविलें असें मानितो. तें असें– जे अज्ञानी आहेत ते स्त्री पुत्रादिकांची अपेक्षा करून दुःख युक्त होऊन संसाराप्रत जावोत. अद्वितीय परमानंदरूप मी कोणाचे इच्छेनें संसाराप्रत जाईन म्हणजे सांसारिक दुःखानुभव करीन. ज्यांस स्वर्गादिक लोकांप्रत जाण्याची इच्छा आहे ते यज्ञादिक-करोत. सर्वांचें उपादान कारण जें ब्रह्म तदात्मक मी सर्वलोकस्वरूपच आहें तेव्हां मी कशाकरितां कर्म करीन. देहेंद्रिय मनोबुद्धींवर ज्यांचा तादात्म्याभिमान आहे असे जे वेदशास्त्रादिकांचे अध्ययनाध्यापनादिकाचे अधिकारी ते वेदाध्ययनादिक-करोत तसेच शास्त्रानें व्याख्यान करोत. निर्विकार ब्रह्मस्वरूप मी आहें यास्तव-तें करण्यास मला अधिकारच नाहीं. निद्रा, भिक्षा, स्नान, शौच हीं मी करण्यास इच्छीत नाहीं आणि मी करीत ही नाहीं देहादिक करतात तें पाहून लोक मी करतों-असें मानितील तर त्यांचे कल्पनेनें मला काय व्हावयाचें आहे. हा वन्हीच आहे अशी ज्यावर लोकांस भ्रांति झाली आहे असा जो गुंजांचा पुंज (समूह) तो जसा दाह करीत नाहीं किंवा स्वतः दाह पावत नाहीं त्या प्रमाणें दुसऱ्यांनीं आरोपिलेले जे कर्तृत्व भोक्तृत्वादिक धर्म त्यांहीं करून मी लिप्त होत नाहीं. ज्यास अद्वितीय ब्रह्मात्मतत्व समजलें नाहीं ते वेदांतादिकांचें श्रवण मननादिक करोत. ब्रह्माप्रत आत्मत्वें करून जाणणारा मी श्रवणादिकाचें अनुष्ठान कशास करीन. ब्रह्म आत्मस्वरूप आहे किंवा आत्म्याहून निराळें आहे असा ज्यांस संशय आहे ते ब्रह्माचा आत्मत्वें करून-निश्चय होण्यास मनन करोत. मला संशयच नाहीं यास्तव मी मनन कशासाठीं करीन. देहेंद्रियादिकांवर ज्यास आत्मत्व बुद्धिरूप विपर्यय म्हणजे भ्रम आहे ते त्या भ्रमाचे निवृत्ति साठीं निदिध्यासन करोत, देहात्मबुद्धिरूप विपर्ययच मला नाहीं तेव्हां मला ध्यान किमर्थ पाहिजे. सांगितलेला विपर्यय मला नसला तरी अनादि काला पासून ज्या विपर्यासाचा अभ्यास आहे त्याचा ज्ञानानें नाश जरी झाला-आहे तथापि त्याचा संस्कार देहादिरूप प्रारब्ध कर्माचे आरंभरूपानें राहिला-आहे त्यामुळें व्यवहार काळीं मी ब्राह्मण, मी मनुष्य, असा व्यवहार मी करतों.-त्याचा नाश हजारों वेळ ध्यान केलें तरीं प्रारब्ध कर्माचे नाशा शिवाय होणार ना-

हीं प्रारब्ध कर्मानें होणारा जो व्यवहार त्याचें विरलत्व (निराळेपणा) होण्या साठीं ध्यान करावें तर तो व्यवहार तत्त्व ज्ञानास किंवा त्याचें फळ जो मोक्ष त्यास बाधक नाहीं असें जाणणारा मी किमर्थ ध्यान करीन. मला विक्षेप म्हणजे देहात्मत्व भ्रमच नाहीं मग मला समाधि कशास पाहिजे विक्षेप किंवा समाधि विकार पावणाऱ्या मनाचा धर्म आहे, ब्रह्मात्मत्वानुभव होण्या साठीं समाधि करावा तर नित्यानुभव रूपच मी आहें. माझे स्वरूपाहून निराळा अनुभव मुळींच नाहीं याप्रमाणें जें कर्तव्य तें केलें. जें मिळवावयाचें तें मिळविलें असा निश्चय होऊन तो असेंही मानितो कीं, मी जरी कृत कृत्य आहें तथापि लोकांवर अनुग्रह करण्या साठीं शास्त्र विहित मार्गानें मी वर्तेन. यांत काय माझी हानि आहे तसा मी वर्तलों तरी मला तत्त्वत्वाभिमान नाहीं यामुळें मला कोणताही विकार नाहीं. देवार्चन करणें, भिक्षाटन, राज्य परि पालन इत्यादिक कर्म करण्या विषयीं शरीर राहो. मुख प्रणवाचा जप करो किंवा वेदांताचा पाठ करो. बुद्धि विष्णवादिकांचें ध्यान करो किंवा समाधि करो आणि समाधीनें ब्रह्मानंदाचे ठाईं लीन होवो या सर्व कर्माचा द्रष्टा साक्षी मी कांहीं करीत नाहीं आणि करवीत ही नाहीं. अशा निश्चयानें कोणतेही विषयाची तृष्णा आणि अधिक अधिक विषयाचे प्राप्तीचा लोभ त्यास नसल्यामुळें तो या सुखा हून दुसरें सुख अधिक नाहीं असें मानून आत्म स्वरूपाचे ठाईं निरंतर संतोष पावतो. त्यास कांहीं कर्तव्य नाहीं. ॥१७॥

## नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन॥ न चास्य सर्व भूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः॥ १८॥

पूर्वोक्त अर्थच विशेषें करून पुनः सांगतात. त्यास म्हणजे पूर्वोक्त तत्त्व ज्ञान्यास केलेले कर्मानें पुण्य नाहीं किंवा सांगितले प्रकारानें स्वर्गादिक प्राप्तीची इच्छा नाहीं. मोक्ष तर ज्ञाना वांचून होतच नाहीं या कारणानें कर्माचें प्रयोजन ही नाहीं. कर्म न केल्यानें त्यास कोणता प्रत्यवाय ही नाहीं. तात्पर्य - वर्ण किंवा आश्रम वय आणि अवस्था यांहीं करून युक्त जें शरीर त्यावर मी ब्राह्मण, मी गृहस्थ, मी संन्यासी, मी ब्रह्मचारी इत्यादिक अभिमान ज्याचा आहे असा जो अज्ञानी त्याचेंच उद्देशानें ब्राह्मणादिक वर्णांनीं अमुक कर्म करावें. ब्रह्मचारी गृहस्थादिकांनीं अमुक करावें तसेंच अमुक न करावें असे विधि किंवा निषेध शास्त्रांत सांगितले आहेत. ते देहादिकांवर ज्यास आत्मत्वाभिमान नाहीं आणि आत्मा देहादिकाहून निराळा असंग आणि अद्वितीय ब्रह्मरूपच आहे असा अनुभव ज्यास आहे असा जो ज्ञानी त्याचे उद्देशानें नाहींत. यामुळें तो ज्ञानी विधिनिषेधातीत आहे या कारणास्तव विधीचे अनुष्ठानानें पुण्य किंवा अनुष्ठान न केल्यानें किं-

वा निषिद्धाचें सेवन केल्यानें पाप त्यास लागत नाहीं. विधि निषेधातीत झाल्यामुळें ज्ञान्यास पुण्य पाप न लागलें तरीं जे मनुष्य ब्रह्म प्रत जाणतात ते देवांस प्रिय नाहींत. असें श्रुतींत सांगितलें आहे याबरून ज्ञानें करून मोक्ष होण्यास देवां पासून विघ्न संभावना आहे यास्तव देवानीं विघ्न न करावें यासाठीं देवांचे संतोषार्थ कर्मे करून देवांचें सेवन केलें पाहिजे अशी शंका येईल तर त्याविषयीं सांगतात. ब्रम्हादि स्थावरांत सर्व भूतांमध्यें ज्ञान्यास मोक्षरूप जो अर्थ त्यासाठीं आश्रय करण्याजोगा कोणी नाहीं. तात्पर्य - जो आत्मा तत्त्वज्ञ झाला त्याची ब्रह्मरूपानें स्थिती होणें अशा मोक्षास प्रतिबंध करण्यास देवही समर्थ होत नाहींत. कारण तो देवांचा आत्माच आहे असें श्रुतींनच सांगितलें आहे. देवांपासून विघ्न होणें तें ज्ञानाचे उत्पत्तीचे पूर्वींच होतें. ज्ञान झाल्यावर होत नाहीं. कारण पूर्वी सांगितलेले श्रुतींत मनुष्यांस ज्ञान होणें हें देवांस प्रिय नाहीं, असें सांगितलें यावरूनच ज्ञान होण्यास देव विघ्न करतात, ज्ञान झाल्यावर करीत नाहींत असें सूचविलें आहे. ॥१८॥

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर॥ असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः॥१९॥ ॥**

पूर्वी सांगितलेला जो ज्ञानी त्यास मात्र कर्माची गरज नाहीं अज्ञान्यास गरज आहे यास्तव तूं कर्मफलाविषयीं निरिच्छ होऊन अवश्य करावयाचें आणि वर्णास आणि आश्रमास विहित असें जें नित्य आणि नैमित्तिक कर्म त्याप्रत कर. कारण फला विषयीं निरिच्छ होऊन कर्माचरण करणारा पुरुष चित्तशुद्धीचे द्वारा मोक्षाप्रत पावतो. ॥१९॥

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः॥ लोकसंग्रहमेवापि संपश्यन् कर्तुमर्हसि॥२०॥**

या विषयीं शिष्टाचारानें प्रमाण सांगतात. संन्यासानधिकारी तुझे सारखे जनकादिक क्षत्रिय कर्मे करूनच शुद्धांतःकरण होऊन वेदांत श्रवणादिकानें उत्तम ज्ञाननिष्ठेप्रत पावले. स्वाराज्य काम जो राजा त्याणें राजसूयानें यजन करावें अशा राजसूयाचे विधींत राजत्वाची विवक्षा करून राजसूय याग करण्यास जसा क्षत्रियासच अधिकार सांगितला आहे त्या प्रमाणें ब्राह्मण पुत्रेषणा (पुत्राची इच्छा) वित्तेषणा (वासना) लोकेषणा (मनोरथ) त्यागकून भिक्षाचर्य आचरतात अशा संन्यासाचे विधींत ब्राह्मणत्वाची विवक्षा करून संन्यास करण्यास ब्राह्मणासच अधिकार आहे आणि ब्राह्मणांस चार आश्रम, क्षत्रियांस तीन, वैश्यांस दोन अशी स्मृति ही आहे. पुराणांत ही वैष्णव लिंग धारण म्हणजे संन्यास घेणें हा परमेश्वराचे मुखा पासून

झालेल्या ब्राह्मणांचाच धर्म आहे. बाहू पासून झालेल्या क्षत्रियांचा आणि मांड्यांपासून झालेल्या वैश्यांचा नाहीं असें सांगितलें आहे. या श्रुति स्मृति पुराणावरून क्षत्रियास संन्यास घेण्याचा अधिकार नाहीं. आतां तूं आपणास मी उत्तम ज्ञानवान् आहें असें जरी मानिशील तथापि कर्माचरण करणें हेंच तुला कल्याण कारक आहे असें सांगतात. ज्ञानी जो मी यानें कर्म केलें तर माझें पाहून सर्व लोक कर्म करतील आणि मी न केलें तर माझें पाहून अज्ञानी लोक कर्मत्याग करितील आणि पतन पावतील या साठीं कर्म केल्यानें लोकांची कर्माचे ठायीं प्रवृत्ति होईल. हें लोकोपकाररूप प्रयोजन मनांत आणून तुला जरी प्रयोजन नाहीं तथापि तूं कर्म करण्यास योग्य आहेस. ॥ २० ॥

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ॥ स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥ ॥**

तूं कर्माचरण केलेंस तर लोकांची कर्माचरणा विषयीं प्रवृत्ति कशी होईल तें सांगतात. श्रेष्ठ ज्याचें आचरण करतो त्याचेंच प्राकृत जन ही आचरण करतो. श्रेष्ठ ज्या प्रवृत्तिशास्त्रास किंवा निवृत्ति शास्त्रास प्रमाण मानतो त्याचाच दुसरे लोकही अंगीकार करतात. आणि त्या प्रमाणें प्रवृत्ति मार्गाचे ठायीं वर्ततात. ॥ २१ ॥

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ॥ नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥ ॥**

जरी आपणास प्रयोजन नसलें तरी लोक संग्रहार्थ कर्म करावें असें आहे तर ज्ञानी जे ब्राह्मण त्यानीं ही कर्मच करावें संन्यास करूं नये असें होईल. जे संन्यासी आहेत त्यांणी संन्यासाश्रम विहित जे धर्म ते करावे अशा त्यांच्या प्रयोजना साठीं विद्वान् ब्राह्मणांनीं संन्यास करावा. असें म्हणाल तर तसा संन्यास अर्जुनानें कां करूं नये, क्षत्रियास अधिकार नाहीं असें म्हणाल तर लिंग धारण रूप संन्यासा विषयीं अधिकार नसला तरी जडभरत ऋषभ देवादिकां प्रमाणें विक्षेप करणाऱ्या कर्मांचा संन्यास करणें त्यास कर्मत्याग म्हणतात त्याविषयी अधिकार आहे असें वार्तिकांत सांगितलें आहे. तें असें:—सर्वाधिकाराचा नाश करणारें ज्ञान जेव्हां उत्पन्न होतें तेव्हां अधिकार नियम कोठून होईल या वरून क्षत्रियादिकांस लिंग धारण नसलें तरी केवल कर्म त्यागरूप जो विद्वत्संन्यास त्या विषयीं अधिकार आहेच या वरून लोकोपकार करण्या साठीं ज्ञान्यानें कर्म करावें हें मुख्य प्रयोजन नाहीं. अशी शंका होईल तर या विषयीं मीच दृष्टांत आहें असें सांगतात. हे अर्जुना, मला कांहीं कर्तव्य नाहीं. स्वर्ग, मृत्य, पाताल, या तीन लोकांत न मिळालेलें मिळवावयाचें नाहीं तथापि मी कर्म करतों. आपले दृष्टांतानें लोकसंग्रह करण्या साठीं कर्म कर असा जो उपदेश हा अर्जुना विष-

यांचान आहे, कारण जडभरतादिकांप्रमाणें अर्जुन ज्ञानी आहे असा निश्चय ना-
हीं यावरून जडभरतादिकांसारख्यांस त्याचें प्रयोजन नाहीं असें तात्पर्य. ॥२२॥

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः ॥ मम**
**वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥ ॥**

मी आलस्यरहित होऊन कर्मांचें अनुष्ठान न करीन तर हे अर्जुना सर्व-
मनुष्य माझ्याच मार्गास अनुसरतील म्हणजे मी कर्म सोडल्यानें सर्वकर्म सोडतील.२३

**उत्सीदेयुरिमे लोकान कुर्यां कर्म चेदहम् ॥ सं-**
**करस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४**

मी जर कर्म करणार नाहीं तर हे सर्वलोक कर्मांचा लोप झाल्यापुढें ना-
श पावतील. आणि जो वर्णसंकर होईल त्याचा मीच कर्ता होईन आणि या प्रजां-
स मीच मलिन करीन. ॥२४॥

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वंति भारत ॥**
**कुर्याद्विद्वांस्तथा सक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५**

या साठीं आत्मतत्त्व ज्ञाल्याजें ह्या लोकांचें हित व्हावें यासाठीं त्यांचेंवर कृ-
पा करून कर्म करावें असें सांगून प्रकरणाची समाप्ति करतात. अज्ञानी लोक फ-
ला विषयीं आसक्त होऊन जसें कर्म करतात तसें विद्वान म्हणजे ज्ञानी यानें ह्या फ-
लाविषयीं आसक्त न होतां लोकांची कर्मांविषयीं प्रवृत्ति होऊन त्यांचें कल्याण-
व्हावें अशी इच्छा धरून कर्म करावें. लोकैषणादिकांपासून मुक्त झालेले जड-
भरतादिकांप्रमाणें लोकसंग्रहाचें प्रयोजन जरी ज्ञाल्यास नसलें तरी लोकांत दु-
ष्टांचा निग्रह करून वेदोक्त धर्म स्थापन करण्या साठीं माझे बरोबर तूं अवतार घे-
तला आहेस, मी ज्ञानी जरी आहे तरी अवताराचें प्रयोजन सिद्ध झालें पाहिजे म्ह-
णून मी जसें कर्म करतों तसें तुलाही माझे बरोबर केलें पाहिजे असा तात्पर्याची-
२१।२२।२३।२४।२५ या श्लोकांची व्याख्या कोणी करतात. ॥२५॥

**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ॥ जो-**
**षयेत् सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६**

लोकांवर कृपा करणें तर त्यांस ज्ञानाचाच उपदेश करावा असें म्हणाल
तर त्या विषयीं सांगतात. यज्ञादिक कर्मांचा कर्ता मीच आहें. या कर्मांचे योगानें-
इंद्रादिक देवता प्रसन्न होऊन मला स्वर्गादिक फल देतील असा अभिमान धरून

कर्म करणारे जे ज्ञानोपदेशास अनधिकारी अज्ञानी त्यांस आत्मा कर्ता आणि भोक्ता नाहीं, असंग, अद्वितीय ब्रह्मस्वरूप आहे असा ज्ञानोपदेश करून कर्माचरणावरील त्यांची बुद्धि फिरवूं नये. तर काय करावें तें सांगतात. त्यांची कर्माचरणानें चित्त शुद्धि होऊन शमदमादिक साधन संपत्ति रूप ज्ञानोपदेशाचा अधिकार प्राप्त होईतों पर्यंत ज्ञान्यानें आपण सावधान होऊन आणि आपण स्वतः कर्माचरण करून त्यांकडून सर्व नित्यनैमित्तिक कर्में करवावीं. असें न केलें तर ज्ञानोपदेशानें कर्मावरील त्यांची श्रद्धा सुटेल आणि चित्तशुद्धि नसल्यामुळें ज्ञान उत्पन्न न होऊन दों हीं पासून ही तो भ्रष्ट होईल असा भाव. ॥ २६ ॥

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ॥
अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥ २७

ज्ञान्यानें ही जर कर्म करावें तर मग ज्ञानी आणि अज्ञानी यांचा विशेष काय अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात. प्रकृति म्हणजे मायाती पासून उत्पन्न झालेले जे गुण म्हणजे देहेंद्रियादिक यानीं केलेल्या सर्व कर्मांचा कर्ता मीच आहें असें देहेंद्रियादिक मीच आहें अथवा माझीं आहेत अशा अभिमानानें ज्याचें मन मोहापन्न पावलें आहे तो मानितो. ॥ २७ ॥

तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ॥ गुणा- गुणेषु वर्तंत इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥ ॥

विद्वान् असें मानीत नाहीं असें सांगतात. हे महाबाहो अर्जुना, मी देहेंद्रियाहून भिन्न आहें, देहेंद्रिय माझें स्वरूप नाहीं असा जो गुण म्हणजे देहेंद्रियादिक त्यांचा आणि आत्म्याचा विभाग म्हणजे भेद तसाच देहेंद्रियांनीं केलेलीं जीं कर्में तीं माझीं नव्हेत किंवा मी यांचा कर्ता नव्हे असा जो कर्मांचा आणि आत्म्याचा विभाग, याचें तत्त्व जाणणारा जो ज्ञानी तो देहेंद्रियादिक जे गुण ते आपआपले कर्मांचे ठायीं वर्ततात. म्हणजे चालणें, बोलणें, ऐकणें इत्यादिक कर्में करतात. मी त्यांचा कर्ता नव्हे असें मानून कर्मांचे ठायीं सक्त होत नाहीं. ॥ २८ ॥

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जंते गुणकर्मसु ॥ ता- नकृत्स्नविदो मंदान् कृत्स्नविन्न विचालयेत् ॥ २९

ज्ञान्यानें अज्ञान्याच्या बुद्धीचा भेद करूं नये असें जें सांगितलें त्याची समाप्ति करतात. मायेचे गुण जे सत्व, रज, तम यांहीं करून जे संमूढ ते देहेंद्रियादिक जे गुण आणि त्यांचीं जीं कर्में त्यांचे ठायीं हें माझें हें मीच केलें अशा अ-

भिमानानें सक्त होनात. अथवा आत्म्याचे ठायीं भ्रमानें भासलेले जे प्रकृतीचे गुण म्हणजे कार्यभूत अहंकारादिक त्यांहीकरून संमूढ म्हणजे अहंकाराशीं आणि आत्म्याशीं ऐक्य आहे अशा भ्रमानें युक्त जे प्रकृति कार्य देहेंद्रियादिक आणि गमनादिक जीं कर्मे त्यांचे ठायीं सज्जंते म्हणजे मी हा ब्राह्मण आहें हें यज्ञादिक कर्म माझें आहे असें मानितात. त्या अज्ञान्यांस आणि मंदमनांस म्हणजे आत्मज्ञान रहित आणि शास्त्रार्थ ग्रहण करण्याविषयीं असमर्थ असे जे आहेत, त्यांस सर्वज्ञानें ज्ञानोपदेशें करून कर्माचरणा पासून निवृत्त करूं नये. ॥२९॥

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा॥
निराशीर्निर्ममो भूत्वा युद्ध्यस्व विगतज्वरः॥३०॥

सांगितलेले कारणानें तत्त्वज्ञान्यानें ही कर्म करावें, तूं तर अर्जुन नरवचेता नाहींस यास्तव तुला कर्मच केलें पाहिजे असें सांगतात. अंतर्यामी जो परमेश्वर त्याचे प्रेरणेनें मी कर्म करतों अशा बुद्धीनें किंवा अध्यात्म शास्त्राचे श्रवणानें आत्मानात्मविवेकानें युक्त झालेल्या मनानें सर्व कर्मे मला समर्पण करून फलेच्छा रहित आणि हें माझें कर्म, हें मला इष्टफल देईल अशी कर्मावरील जी ममता बुद्धि तीणें करून रहित आणि शोकरहित होऊन युद्ध कर. ॥३०॥

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः॥ श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेपि कर्मभिः॥३१॥

माझ्या वाक्यावर श्रद्धा ठेवणारे आणि दुःखस्वरूप कर्माचे ठायीं आह्यांस हा प्रवृत्त करतो अशी माझे ठायीं दोषदृष्टी न करणारे जे या माझ्या मताला अनुसरतील ते ही कर्मबंधा पासून मुक्त होतील. ॥३१॥

ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम्॥ सर्वज्ञानविमूढांस्तान् विद्धि नष्टानचेतसः॥३२॥

जे ईश्वर प्रीत्यर्थच कर्म करावें अशा माझ्या मताचा म्हणजे आज्ञेचा द्वेष करून माझ्या या मताचें अनुष्ठान करीत नाहींत ते विवेकानें रहित असल्यामुळें कर्मा विषयीं किंवा ब्रह्मा विषयीं ज्ञान रहित आणि नष्ट म्हणजे स्वर्गापवर्गा पासून भ्रष्ट असें जाण. ॥३२॥

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि॥ प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति॥३३॥

इंद्रियांचा निग्रह करून निष्काम होऊन स्वधर्माचें अनुष्ठान करण्यांत-जर मोठें फल आहे तर सर्वलोक तसें कां करीत नाहींत असें जर म्हणाल तर त्याविषयीं सांगतात. गुण दोष ज्ञान ज्यास आहे असा जो ज्ञानी तोही आपली जी प्रकृति म्हणजे पूर्वजन्मार्जित कर्मांचे संस्कारापासून झालेल्या स्वभावानुरूप चेष्टा म्हणजे कर्म करतो. मग ज्यास गुणदोषाचें ज्ञान नाहीं तो तदनुरूप करील यांत काय सांगावें. सर्व प्राणी सांगितलेले आपापले प्रकृतीस अनुसरतात. प्रकृति बलिष्ठ आहे ती पुढें मी असेंच करीन किंवा करणार नाहीं असा निग्रह काय करील तो तिचेपुढें दुर्बळ आहे तेव्हां स्वभावाप्रमाणेंच सर्व वर्ततात आणि मीही त्यांस अंतर्यामी रूपानें कर्मानुरूप प्रेरणा करून वर्तवितो. ॥ ३३ ॥

**इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ॥ तयो-र्नवशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥ ॥**

पुरुषाची प्रकृति जर प्रकृतीचे स्वाधीन आहे तर असें करावें, असें न करावें असे जे शास्त्रांतील विधि, निषेध ते व्यर्थ होतील. अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात. सर्व इंद्रियांचे आपापले विषयांचे ठायीं विषय अनुकूल असेल तर त्यांवर प्रीति आणि विषय प्रतिकूल असेल तर त्यांवर द्वेष, हे रागद्वेष व्यवस्थित म्हणजे अवश्य होणारे आहेत या कारणानें तदनुरूप प्राण्याची प्रवृत्ति होते. तथापि त्याचे स्वाधीन होऊंनये असें विधिनिषेध शास्त्र नियम करतें. कारण ते रागद्वेष मुमुक्षूंस शत्रू आहेत. तात्पर्य— असावध पुरुषांस प्रकृति विषयांचें स्मरण देऊन अनर्थाचे ठायीं बलात्कारें करून प्रवृत्त करते. विधिनिषेध शास्त्र तर प्रवृत्ति होण्याचे पूर्वींच रागद्वेष होण्यास प्रतिबंधक जें परमेश्वराराधन त्या विषयीं प्रवृत्त करतें. यास्तव मोठें गंभीर नदीच्या पूरांत पतन होण्याचे पूर्वींच जो सावध पुरुष नौकेचा आश्रय करतो तो जसा अनर्थाप्रत पावत नाहीं तसा जो सावधान पुरुष विषयाचे ठायीं रागद्वेष होण्या पूर्वींच विधिनिषेध शास्त्राचें अनुष्ठान करण्यास स्वतंत्रता शास्त्रसंमत आहे या कारणानें ईश्वराराधना विषयीं प्रवृत्त होतो तो अनर्थाप्रत पावत नाहीं. अथवा निग्रहानुग्रह समर्थ राजा आपले आज्ञेचें उल्लंघन करणाऱ्या अपराध्याचा निग्रह म्हणजे बंधन करणें किंवा त्यास अधिकारावरून काढणें याविषयीं आपले सेवकांस प्रवृत्त करतो त्याच राजास अपराध्यांनीं द्रव्य दान केलें किंवा त्याची मानपूजा केली तर तो त्यास मुक्त करून पूर्ववत् अधिकार ही देतो. त्याप्रमाणें ईश्वर जीवास कर्मानुसार रागद्वेषाचे द्वारानें पीडा करवीत असतां ही शास्त्रविधीप्रमाणें भक्ति, ध्यान आणि कर्म यांहीं करून त्यास प्रसन्न केलें तर तो त्या जीवास रागद्वेषाचे जया विषयीं प्रवृत्त करतो. ॥ ३४ ॥

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठिता-त् ॥ स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५**

या प्रमाणें पशूं सारख्या स्वाभाविक प्रवृत्तीस टाकून स्वधर्माचरण करावें. असें सांगितलें परंतु युद्धादिरूप स्वधर्म दुःखरूप आहे यास्तव त्याचें सांगितल्या प्रमाणें अनुष्ठान घडत नाहीं. हिंसा न करणें असा जो परधर्म तो सुलभ आहे यास्तव तोच चांगला असें मनांत आणील तर त्या विषयीं सांगतात. सकलांगांचें अनुष्ठान करून केलेला जो परधर्म त्याहून कांहीं अंगांनीं हीन जो स्वधर्म तोच प्रशस्त आहे. युद्धादिक जो स्वधर्म त्याचे ठायीं जो प्रवृत्त झाला त्यास मरण आलें तरी तें स्वर्गप्राप्ति होण्यास साधन आहे यामुळें तें कल्याणकारक आहे. परधर्म निषिद्ध आहे यामुळें त्याचे आचरणानें नरक प्राप्त होतो. ॥ ३५ ॥

**अर्जुनउवाच ॥ ॥ अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ॥ अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥ ॥ ॥**

रागद्वेषांचे स्वाधीन होऊंनये असें जें पूर्व श्लोकीं सांगितलें तें अशक्य आहे. कारण पुरुषाचे प्रवृत्तीस धर्माधर्म किंवा तदनुरूप प्रवृत्ति करविणारा ईश्वरच आहे. प्रवृत्ति विषयीं पुरुषास स्वातंत्र्य नाहीं असें मानून अर्जुन प्रश्न करतो. हे यादवकुलोत्पन्ना कृष्णा, अनर्थप्रद पाप करण्याची इच्छा न करणारा ही हा पुरुष म्हणजे जीव बलात्कारानें योजिल्या प्रमाणें कोणाचे प्रेरणेनें पापाचरण करतो. तात्पर्य— रागद्वेष जर प्रवर्तक म्हणावे तर इच्छा नाहीं, इच्छेवांचून राग होत नाहीं, राग नाहीं तर तन्मूलक प्रवृत्तिही धर्माधर्मा विषयीं नाहीं. यामुळें धर्माधर्म उत्पन्न होतच नाहींत. ईश्वर प्रवर्तक म्हणावा तर धर्माधर्मानुसार ईश्वर प्रवर्तक आहे. तेच नाहींत तर ईश्वर कशी प्रवृत्ति करील. यावरून मुख्य प्रवर्तक निराळे आहेत. ते कोणते तें सांग ? ॥ ३६ ॥

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ काम एष क्रोध एष रजोगुण समुद्भवः ॥ महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥ ॥ ॥**

श्रीभगवान् सांगतात ॥ कोणाचे प्रेरणेनें हा जीव पापाचरण करतो- असा जो तूं पापाचरणाचा हेतु विचारलास तो विषयांचे ठायीं प्रवृत्तिरूप जो काम पूर्वीं सांगितला. तोच आहे. हें मला असावें असा जो अभिलाष तो आणि तिन्हा-

ती एके ठिकाणीं स्थिति न होण्यास कारण जी मनाची वृत्ति जीस संकल्प असें ही म्हणतात. ती मनाची वृत्ति हें कामाचें स्वरूप आहे. तोच काम कोणी प्रतिबंध केल्यामुळें सिद्ध झाला नाहीं म्हणजे क्रोधरूपानें परिणाम पावतो हा काम रजोगुणा पासून उत्पन्न झालेला आहे. हाकाम मोक्ष मार्गास वैरी आहे असें जाणा. हा पुढें सांगावयाचा जो क्रम आहे त्याक्रमानेंच मारला पाहिजे. विषयांचें दान करून त्याचा जय करणें अशक्य आहे. कारण त्यानें भक्षण मोठें आहे यास्तव त्याचें पोट भरणें कठिण आहे, हा सामें करून वश होणारा नाहीं कारण मोठा पापी म्हणजे क्रूर आहे. रज म्हणजे रंजना स्वरूप प्रकृतीचा गुण त्याचे गुण म्हणजे कार्य तृष्णा आणि विषय संग हे उत्पन्न करणारे ज्याचे आहेत अथवा लोभ प्रवृत्ति रूप रजोगुणाची उत्पत्ति ज्या पासून आहे असा रजोगुण समुद्भव या पदाचा अर्थ जाणावा. ॥३७॥

**धूमेनाव्रियते वह्निर्यथाऽऽदर्शो मलेन च ॥ यथोल्बेनावृतोगर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥३८॥**

काम वैरी कसा तें सांगतात. जसा अग्नि बरोबर उत्पन्न होणाऱ्या धूमानें अग्नि आवृत ( आच्छादित ) होतो. जसा पूर्वी नसून नवीन येणाऱ्या मळानें आरसा आवृत होतो. जसा गर्भ आपणास वेष्टन करणाऱ्या जारेनें ( चर्मानें ) आवृत होतो. त्या प्रमाणें त्या कामानें हें सर्वजग आवृत केलें आहे. म्हणजे व्यापिलें आहे. ॥३८॥

**आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ॥ कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणानलेन च ॥३९॥**

नित्य वैरी आणि कितीही विषय दिले तरी ज्याची पूर्तता होत नाहीं आणि शोक संताप देतो या मुळें अग्नि सारखा असा जो काम यानें हे कौंतेया अर्जुना, ज्ञान्याच्या विवेक रूप ज्ञानाचें आच्छादन केलें आहे. हाकाम अज्ञान्यास विषय भोग काली सुखास कारण असला तरी परिणामीं दुःख देणारा आहे. ज्ञान्यास विषय भोग कालींच अनर्थानुसंधान होतें या मुळें त्यास तत्कालींही दुःख देणारा आहे यास्तव काम ज्ञान्याचा नित्य वैरी आहे असें जाणावें. ॥३९॥

**इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ॥ एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥४०॥**

आतां कामाचें अधिष्ठान आणि त्याचे जयाचा उपाय हीं सांगतात. वि-

षयांचें दर्शन, श्रवण, विषयाविषयीं संकल्प आणि विषयांच्या रूपाचा निश्चय झाल्यामुळे ही कामाचा आविर्भाव होतो. यास्तव इंद्रियें, मन आणि बुद्धि हीं त्याचें अधिष्ठान आहे असें म्हणतात. हा काम, इंद्रियें, मन आणि बुद्धि यांचे जे विषय दर्शनादिक व्यापार तीहीं करून विवेकरूप ज्ञानाचें आच्छादन करून देही जो जीव त्यास मोहाप्रत पाववितो. तात्पर्य- शास्त्रांत सांगितलेल्या आत्मानात्म विचारानें विवेक ज्ञान व्हावयाचें त्याविषयीं विचार करीत असतां जर " प्रभवति मनसि विवेको विदुषामपि शास्त्र संभवस्तावत् ॥ निपतंति दृष्टि विशिखायावन्नें दीवराक्षीणां " या श्लोकांत सांगितल्या प्रमाणें जीचीं कमलपत्रासारखीं नेत्रें आहेत अशी स्त्री पुरोभागीं उभी राहून आपलेकडे पाहूं लागली म्हणजे तिचेकडे आपलें चक्ष जाऊन ही मला मिळावी असा निश्चय झाला म्हणजे तो ज्ञान विचार मनांत न ठरतां विवेक भ्रष्ट होतो आणि " संतुविलोकन भाषण विलास परिहास केलि परिरंभाः ॥ स्मरणमपि कामिनीनामलमिह मनसो विकाराय ॥" या श्लोकांत सांगितल्या प्रमाणें स्त्रियांशीं संभाषण किंवा त्यांशीं क्रीडा किंवा त्यांचें अवलोकन किंवा त्यांचें आलिंगन हीं नर मनाचा विकार करतीलच परंतु हीं जर न घडलीं आणि स्त्रियांचें केवल स्मरण जरी झालें तरी तें मनाला विकार करण्यास पुरे. मनास विकार झाला म्हणजे विवेक ज्ञान ठरणें कठीण आहे. ॥४०॥

**तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ॥**
**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञान नाशनम् ॥ ४१ ॥**

यास्तव हे भरत वंशांतील श्रेष्ठा अर्जुना, मोह होण्या पूर्वींच तूं देहेंद्रियांचा निग्रह करून आणि मनाचाही निग्रह करून अनुभवात्मक जें आत्मज्ञान- आणि परोक्ष म्हणजे शास्त्र आणि गुरूपदेश यां पासून झालेलें विज्ञान म्हणजे निदिध्यासनाचे परिपाकें करून झालेलें जें मीच ब्रह्म आहें असें ज्ञान याचा नाश करणारा म्हणजे त्यांचे उत्पत्तीस प्रतिबंध करणारा आणि पापी असा जो हा- काम याचा जय कर. ॥ ४१ ॥

**इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ॥ म-**
**नसस्तु परा बुद्धिर्योबुद्धेः परतस्तुसः ॥ ४२ ॥**

केवळ बाह्येंद्रियांचा निग्रह केल्यानेंच कामाचा जय होत नाहीं. कामजयासाठीं योगाभ्यासानें मनाचा आणि बुद्धीचा ही जय केला पाहिजे यास्तव जेथें चित्ताचें स्थापन करून योगानें इंद्रियांचा आणि मनाचा निग्रह करण्यास शक्य होतो असें जें आत्मस्वरूप तें देहेंद्रियादिकांहून निराळें आहे असें दाखवि-

तात. इंद्रियें सूक्ष्म त्यास्तव आणि विषयांचा प्रकाश करणारीं आहेत. यास्तव देहाहून श्रेष्ठ आहेत. येणें करून देहाहून इंद्रियें भिन्न आहेत असेंही सूचविलें. विषयांचे ठायीं इंद्रियांची प्रेरणा करणारें संकल्पविकल्पस्वरूप मन इंद्रियांपेक्षां श्रेष्ठ आहे. मनापेक्षां निश्चयात्मक बुद्धि श्रेष्ठ आहे. कारण निश्चय झाल्यावांचून संकल्प होत नाहीं बुद्धीपेक्षां जो पर, बुद्धीचा प्रकाश करणारा, बुद्धीचा साक्षी आणि सर्वांतर्यामी तो आत्मा जाणावा. ॥ ४२ ॥

एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ॥
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥
॥ ॥ ओं तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगोनाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

विषयेंद्रियांचे संबंधापासून होणारे जे काम ते बुद्धीचेच धर्म आहेत, - आत्मा निर्विकार असून बुद्धीचा साक्षी, बुद्धीहून श्रेष्ठ आणि निराळा आहे असें जाणून अशा निश्चयात्मक बुद्धीनें योगानें आत्म्याचे ठायीं मनाचा निश्चय करून - कामरूप जो दुर्जय शत्रु त्यास हे महाबाहो अर्जुना, तूं जिंक हें उपलक्षण करून कामाचे जया विषयीं वासिष्ठादिकांत वस्तुविचार करावा म्हणून सांगितलें आहे. त्याप्रमाणें वस्तुविचार करून त्या स्त्री आदिक वस्तू विषयीं काम होतो त्या वस्तू वरील जे दोष आहेत त्यांचे अनुसंधानानें कामाचा जय करावा. तो वस्तुविचार कसा करावा त्याचें स्वरूप वासिष्ठादिकांत सांगितलें आहे तें संक्षेपानें येथें लिहितों. "मांसपांचालिका यास्तु यंत्र लोले कपंजरे ॥ स्नाय्वस्थि ग्रंथि शालिन्या स्त्रियः किमिव शोभनं ॥- या वासिष्ठांतील श्लोकांत त्या स्त्रीचे शरीरावर ही सुंदर आहे, हिचे नेत्र कमलासारखे आहेत, हिचा कटिपश्चाद्भाग स्थूल आहे, हिचे स्तन एकमेकांस संलग्न झालेले मांसल आणि उच्च आहेत, हिचें मुख कमलासारखें सुंदर आहे आणि - हिच्या भ्रुकुटि सुंदर धनुष्यासारख्या आहेत असा विचार रहित सुंदरत्वाचा अभिमान धरून जी विषयीं तुला काम उत्पन्न होऊन तूं मग्न होतोस आणि संतोष पावतोस आणि जीचे बरोबर क्रीडा करतोस ती स्त्री केवळ अशाची जें मांस, अस्थि आणि - शिरा यांहीं करून निर्मित केलेली पुतळी आहे. या पुतळींत जे स्तन नितंबादिक (कटिपश्चात्भागादिक) मांसाचे गोलक आणि नेत्रादिक, अस्थिशिरादिक पदार्थ आहेत त्यांचे स्वरूपांत काय सुंदर आहे याचा विचार करून पाहा. या स्त्रीरूप पुतळीचे ठायीं प्रत्यक्ष दुसऱ्या पदार्थांवरील गुणाचा आरोप करून हीस सुंदर आहे असें मानि-

नोस परंतु स्वभावें करून,पाहिलें असतां ती दुर्गंध जे मांसादिक पदार्थ तन्मय कुत्सितच आहे, स्तन मांस ग्रंथिरूपच आहेत, त्यांस स्वतः शोभा नसतां ही मुक्तादिकांचे हारांनीं आणि उत्तम वस्त्रांनें कंचुकीनीं शोभा आणिली आहे. तसेंच पाद आणि हस्त हे मांस आणि अस्थि एतन्मय अशोभन असतां ही नूपुरें आणि कंकणें यानीं त्यांस शोभा आणिली आहे आणि मुख. मांसास्थि निर्मित असून अशुचि जे श्लेष्मादिक त्यानीं युक्त असतां नथ, काप, बाळ्या, कुंकुम, इत्यादिकांनीं त्यास शोभा आणिली आहे, तसेंच शरीर स्वभावें करून दुर्गंध युक्त असतां ही त्यास चंदन, कुंकुम, केंशर याचे योगानें सुगंध आणिला आहे. नग्न शरीर मोकळे केशानीं युक्त पाहिलें तर किती बीभत्स आहे. परंतु त्यास वस्त्रादिकांनीं शोभा आणिली आहे. याप्रमाणें स्त्रीच्या आंतील आणि बाहेरील अवयवांचा विचार केला असतां तें केवळ अशुचि जें रक्त, मांस, मलमूत्र श्लेष्मादिक यानीं युक्त असून दुर्गंध युक्त बीभत्स आहेत त्यांस सांगितलेले पदार्थांनीं आणिली शोभा आहे. स्वतः शोभा नाहीं तथापि त्यां विषयीं अविचारानें काम उत्पन्न होऊन त्याचे योगानें पुरुष व्याकुळ होतात आणि कोणी ही स्त्री दृष्टिगोचर झाली म्हणजे "लीलावतीनां सहजा विलासा त एव मूढस्य हृदि स्फुरंति" या श्लोकांत सांगितल्या प्रमाणें ती स्त्री हिकडे तिकडे पाहणें, मंदहसणें, सख्यांशीं संभाषण करणें, अंगावरील वस्त्रादिकांवर किंवा अवयवांवर हात ठेवणें इत्यादिक व्यापार आपल्या स्वभावा प्रमाणें करो किंवा याचे उद्देशानें करो तथापि ही चंद्रमुखी कमलपत्राक्षी बाला मजकडे पाहते, माझी इच्छा करते आणि ही पृथुकुचश्रोणी बाला माझें आलिंगन करण्यास इच्छिते असें मानितो. परंतु तो नरपशु पुरुष असा विचार करीत नाहीं कीं, ही मांसास्थींनीं निर्मिलेली जड पुतळी कोणास ही पहात नाहीं या शरीरांत राहणारा जो परमात्मा पुरुष तो सर्व जाणणारा, पाहणारा आहे. जड शरीरास जाणणें पाहणें हा धर्म नाहीं. तो चेतन पुरुष तर अमूर्त म्हणजे दर्शनादिक क्रिया रहित आहे तो कसा पाहील असा वरतूंचा विचार करून स्त्री आदिक विषय दृष्टीस गोचर झाल्यानंतर त्यांविषयीं काम होण्या पूर्वीच विषयांकडे मनाचा जो चक्षुरादिक इंद्रियरूप मार्ग तो नेत्र निमीलनें करून बंद करून जर स्त्री आदिकांचे स्मरण मनांत झालें तर स्त्री आदिक विषयांस भोग कालीं जरी रमणीयत्व आहे तथापि परिणामीं ते विरस आहेत आणि बीभत्स आहेत. असें वारंवार मनांत आणून कामाचा जय करावा याच प्रमाणें सांगितलेले प्रकारच्या कामाचा परिणाम रूप जो क्रोध तो क्षमेनें जिंकावा. क्षमा प्राप्त झाली असतां क्रोधावेशामुळें फार निष्ठुर बोलण्या विषयीं जो वाणीस श्रम होतो तो होत नाहीं आणि संतोषामुळें क्रोधावेशानें जो मस्तकास शूळ होतो तो होत नाहीं आणि मनास संताप होत नाहीं आणि ताडनादिक जो शरीराचा संमर्द तो होत-

नाहीं आणि निरर्थक आणि अनर्थ करणारी अशीजी प्राण्यांची हिंसा तीही होत-नाहीं त्यामुळें क्षमाच क्रोधाचा जय करण्यास योग्य आहे. जे क्षमाशील पुरुष आहे-त ते क्रोधें करून कोणी आपले अंगावर शस्त्रादिकानें ताडन करण्यास आला तर-अहो या देवास धिक्कार असो ज्यामुळें ज्यांचीं इंद्रियें स्वाधीन नाहींत असा हा क्रो-धें करून मला मारावयास येणारा पुरुष त्यास अशी ही विपत्ति प्राप्त झाली. अ-से त्यावर दयेनें युक्त होतात. आणि क्रोधयुक्त पुरुषास पाहून त्याकडे हास्य वदन करतात आणि त्या चिन्हानें जरी यास मी मारावयास आलों तरी याचे म-नांत राग नाहीं. संतोषच आहे असें दाखवितात आणि असें केलें तरी त्याचा क्रो-धावेश न राहतां जर वाढला तर महाराज आमचे पासून चूक झाली असेल तर क्षमा करावी अशी त्याची प्रार्थना करतात. इतकें करून जर त्यानें ताडन केलें तर आपण केलेल्या पापाचा क्षय झाला असा संतोष मानितात. असें केलें तर त्या-चा क्रोध कोठून राहणार आहे. यास्तव क्षमें करूनच क्रोधाचा जय करावा. ॥४३

इतिश्रीमद्भगवद्गीता रघुनाथ शास्त्रि कृत भाषा विवृतौ तृतीयोऽध्यायः॥३

अध्याय ४ था.

**श्रीभगवानुवाच॥ ॥इदं विवस्वते योगं प्रो-क्तवानहमव्ययम्॥ विवस्वान् मनवे प्राहम-नुरिक्ष्वाकवेऽब्रवीत्॥१॥ ॥ ॥ ॥**

या प्रमाणें दोन अध्यायांनीं चित्तशुद्धि द्वारा ज्ञान योगास साधन जो क-र्मयोग तो सांगितला. यावर अप्रामाण्य शंका होऊं नये या साठीं हा कर्मयोग परं परेनें चालत आला आहे अशी त्याची स्तुति करून आपणावर भ्रांति किंवा प्र-तारणा संभवत नाहीं असें सूचवण्या करितां आपणास सर्वांचा आप्त जो सर्वज्ञ परमेश्वर तद्रूपत्व दाखवून श्रीभगवान् बोलतात. नाशरहित फलदातृत्वें करू-न अव्यय असा जो हा संध्या वंदनादिक निर्विकल्पक समाध्यंत संन्यासानधिका-री क्षत्रियास करण्यास योग्य असा कर्मयोग त्याप्रत मी सर्व क्षत्रियांस मूलका-रण भूत जो सूर्य त्याला सांगता झालों. सूर्य, आपला पुत्र जो श्राद्धदेव नामक मनु-त्यास सांगता झाला. तो मनु आपला पुत्र जो इक्ष्वाकु त्यास सांगता झाला. ॥१॥

**एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः॥ स कालेनेह महता योगो नष्टः परंतप॥२॥**

असा उपदेश परंपरेनें प्राप्त झालेला जो हा कर्मयोग त्याप्रत निमि प्रभृति जे

जनक अजातशत्रु कैकेय प्रभृति राजे तसेच सनक वसिष्ठादिक ऋषि अथवा राजे असून ऋषि ऐसे राजर्षि ते आपले पितर जे इक्ष्वाकु प्रभृति त्यां पासून जाणते झाले. आतां हाल्लींचे लोकांस त्या योगाचे अज्ञाना विषयीं कारण सांगतात. हे शत्रूंस तापदेणाऱ्या अर्जुना, मध्यें बहुत काळ गेल्यामुळें किंवा त्या योगाचा उपदेश करण्याचा संप्रदाय नष्ट झाल्यामुळें या लोकीं तो योग नष्ट म्हणजे उच्छिन्न झाला. ॥ २ ॥

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ॥ भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥**

तोच प्राचीन योग मी तुला आज सांगितला. तूं माझा भक्त म्हणजे मला शरणागत आहेस आणि सखा आहेस यास्तव हें मोठें रहस्य जरी आहे तथापि मी तुला सांगितलें. जो भक्त नाहीं त्यास विद्या सांगितली तर ती निर्वीर्य होते असें मंत्रांत सांगितलें आहे. ॥ ३ ॥

**अर्जुन उवाच ॥ ॥ अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ॥ कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥ ॥ ॥ ॥**

कृष्ण वसुदेवा पासून उत्पन्न झाला आहे या कारणानें कृष्णानें सूर्यास योगाचा उपदेश केला या गोष्टीचा असंभव मनांत आणून अर्जुन बोलतो. हे कृष्णा, तुझें जन्म आलीकडील आहे. आणि सूर्याचें जन्म फार पूर्वीचें आहे यास्तव आलीकडील जो तूं याणें प्राचीन काळचा जो सूर्य त्यास हा योग सांगितला हें समजण्यास मी कसा समर्थ होईन. ॥ ४ ॥

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ॥ तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥**

हा लीलावतार रूप कृष्णदेह जरी आलीकडील आहे तथापि अनादि परमेश्वर जो मी त्याचे अवतार अनंत आहेत. त्यांतील एका अवतारांत मी सूर्यास योग सांगितला अशा तात्पर्यानें श्रीकृष्ण भगवान् उत्तर सांगतात. हे शत्रूंस ताप देणाऱ्या अर्जुना तुझीं आणि माझीं बहुत जन्में होऊन गेलीं आहेत. माझे ज्ञानशक्तीचा लोप नाहीं यामुळें तीं जन्में मी जाणतों. तूं अज्ञानें करून आवृत आहेस म्हणून तीं तूं जाणत नाहींस. ॥ ५ ॥

अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन्। प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया॥ ६॥

ज्यास पुण्य किंवा पाप नाहीं आणि उत्पत्ति नाश रहित असा जो तूं परमेश्वर यास जीवा प्रमाणें पुण्य पापाचे फलांचा उपभोग होण्या साठीं होणारें जन्म कसें घडेल. अशी शंका होईल तर त्या विषयीं सांगतात. मी उत्पत्ति रहित, नाश रहित आणि ईश्वर म्हणजे जीवांस पुण्य पापांचें फल देणारा स्वतः पुण्य पापाहीं करून रहित असा असतां हि ज्ञानशक्ति, क्रिया शक्ति आणि बल शक्ति एतत्स्वरूप जी माझी वैष्णवी माया तीप्रत अधिष्ठाय म्हणजे वश करून आत्म मायें करून संभवामि म्हणजे मी देह धारी झाल्या प्रमाणें लोकांस दिसतों. परंतु परमार्थतः मला देह नाहीं अथवा पूर्वश्लोकांत तान्यहं वेद सर्वाणि — येणें करून सांगितलेलें जें सर्वज्ञत्व तें जातिस्मर जे योगी त्या प्रमाणें तुला आहे किंवा काय असें म्हणेल तर तसें नव्हे असें सांगतात. देहाहून भिन्न जें आत्मस्वरूप तेणें करून योगी जरी अज आणि अव्यय असे ईश्वर जो मी या प्रमाणें आहेत तथापि उत्पन्न होणाऱ्या आणि नाश पावणाऱ्या देहसंबंधानें योगी उत्पन्न होणारे आणि नाश पावणारे आहेत. यामुळें त्यां सारखा जातिस्मर मी नाहीं. माझा देह उत्पत्ति आणि नाश यांहीं करून रहित आणि नित्य आहे. यामुळें देही जे योगी त्यांहून मी ईश्वर, सर्वज्ञ, श्रेष्ठ आहें. "न त्वेवाहं जातु नासं" या श्लोकांत देहादि भिन्न जें आपलें स्वरूप त्यास नित्यत्व सांगितलें आणि येथें देह विशिष्ट म्हणजे देहासुद्धां आपले स्वरूपास नित्यत्व म्हणजे उत्पत्ति आणि नाश यांहीं करून राहित्य सांगितलें हा त्याला आणि याला विशेष आहे. आदित्यांतर्वर्ति म्हणजे सूर्य मंडलांत राहणारे हिरण्या सारखे ज्याचे श्मश्रू आहेत. ज्याचे केशही हिरण्या सारखे आहेत आणि जे नखा पासून मस्तका पर्यंत सुवर्णमयच आहे असें जें परमेश्वर नारायणाचें दिव्य शरीर वेदांत वर्णिलें आहे त्याची उत्पत्ति किंवा नाश होतो असें म्हणतां येत नाहीं यास्तव परमेश्वराचा देह नित्यच आहे. ज्यास सहस्त्रावधि मस्तकें, नेत्र आणि पाद आहेत. तो या सर्व चतुर्दश भुवनात्मक विश्वास व्यापून दशांगुलें वर राहिला आहे, असा जो पुरुष सूक्तांत वर्णिलेला नारायण तो मी सर्व जगद्रूप होऊन त्यास अतिक्रम करून राहीन असें इच्छिता झाला आणि तो नारायण पंचरात्र म्हणजे पांच अहोरात्रांनीं साध्य होणारा जो पुरुष मेधरूप क्रतु त्याप्रत अनुष्ठिता झाला असें शतपथ ब्राह्मणांत सांगितलें आहे. या वरून परमेश्वराचें ही शरीर पंचरात्राख्य कर्मापासून उत्पन्न झालें आहे असें म्हणूं नये. कारण त्या ब्राह्मणांत नारायण शब्दानें हिरण्यगर्भ विवक्षित घेतला आहे. कारण पूर्णकाम आणि सर्वांचा अतिक्रम क-

रून पूर्वीच राहिलेला जो परमेश्वर त्यास सर्व भूतांचा अतिक्रम करून राहीन अ-
शा इच्छेचा संभव नाहीं. ईश्वर प्रकरणीं वेदांत जेथें जगाची उत्पत्ति लिहिली आहे
तेथें तो परमात्मा मी बहुस्वरूप होईन अशी जी कामना सांगितली ती केवळ ली-
ला न्यायानें स्वकीय प्रयोजन नसतां ही सांगितली किंवा जीवांचे कर्मफलोपभो-
गार्थ जग उत्पन्न करावें या साठीं सांगितली. स्वार्था साठीं सांगितली नाहीं आणि
आप्तकामतेनें निस्पृह असतां ही लीलें करूनच कोट्यावधि ब्रह्मांडें उत्पन्न क-
रणारा जो परमेश्वर त्यास शरीर प्राप्ती साठीं कर्मानुष्ठान सर्वथा असंभावित आ-
हे. यास्तव ईश्वराचें शरीर कर्मोपासून उत्पन्न झालें नाहीं आणि तें भौतिक म्ह-
णजे पंचमहाभूतां पासून उत्पन्न झालेलें नाहीं. कारण स्थूल शरीर समष्टि रूप
जें विराट शरीर, तसेंच सूक्ष्मशरीर समष्टिरूप जो सूत्रात्मा किंवा हिरण्य गर्भा-
चे शरीराहून जें निराळें आहे तीं मात्र भौतिक आहेत. तर परमेश्वराचे शरीरास उ-
पादान कारण कोण, अविद्यातर ईश्वरास नाहींच. जीवाची अविद्या उपादान का-
रण म्हणावीतर शुक्तिकेवर अविद्येनें भासलेलें जें मिथ्या रजत त्याचा जसा शु-
क्तिका ज्ञानानें अभाव होतो त्या प्रमाणें त्याचा उच्छेद होईल यामुळें त्यास सत्य-
ता येणार नाहीं तेव्हां देवकी गर्भांत प्रविष्ट होऊन बाल्य, पौगंड, यौवन इत्याद्यव-
स्थांनीं जो प्रतीतीस आला त्या भगवंताचे देहाचें अधिष्ठान कोण असें म्हणेल-
तर त्या विषयीं सांगतात. ॥ "प्रकृतिंस्वामधिष्ठाय" इत्यादि - तात्पर्य - जीवांचे
देह आतात्म भूत म्हणजे जडप्रकृतीचे आहेत. म्हणजे तेज, आप, अन्न म्हणजे पृ-
थिवी, वायु आणि आकाश यां सुद्धां पंचभूतें यांचें अधिष्ठान करून आहेत म्हण-
जे त्यां पासून जन्मादिकांप्रत पावतात. मी परमेश्वर तर स्वीय म्हणजे प्रत्यगात्म्या-
हून अनन्य म्हणजे अभिन्न जी प्रत्यक् चैतन्यरूप प्रकृति ती प्रततच अधिष्ठून आ-
त्म मायेनें संभवतों म्हणजे शरीर धारण करतों. तात्पर्य - जसा एक लोकांतील
इंद्रजालिक मायावी आपले स्थाना पासून च्युत न होतां ही अदृश्य होऊन स्थूल
सूक्ष्म जीं पृथिव्यादिक महाभूतें तीं न घेतां केवळ आपले मायेनेंच दुसरा आप-
ले सारखा मायावी सूत्र मार्गानें गगनांत गमन करणारा उत्पन्न करतो. या प्रमाणें
सच्चिदानंद आणि निर्विकार स्वरूप मी परमेश्वर मायेनें आपलें चिन्मय शरीर उ-
त्पन्न करतों आणि मायावी जसा सूत्रावर चढणें, उतरणें अशा क्रिया दाखवितो.
त्याप्रमाणें मी आपल्या शरीरास बाल्यादिक अवस्था दाखवितों. परंतु लौकिक-
मायावी जेव्हां मायेचा उपसंहार करतो तेव्हां सूत्रानें गगनांत चढणाऱ्या दुसऱ्या मा-
यावीचाही उपसंहार करतो आणि मी मायेचा उपसंहार करीत नाहीं आणि आपलें
शरीराचाही उपसंहार करीत नाहीं हा विशेष आहे या वरून परमेश्वराचें मायाम-
य शरीर नित्य एकच आहे त्याच शरीरानें मी सूर्याला उपदेश केला आणि तुलाही

त्याच शरीरानें उपदेश करतों अशी या श्लोकाची व्याख्या करावी. ॥ ६ ॥

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ॥ अभ्युत्थानमधर्मस्य तदाऽऽत्मानं सृजाम्यहम् ॥ ७**

आतां अवतार घेण्याचें प्रयोजन सांगतात. हे भारत अर्जुना, जेव्हां जेव्हां धर्माची ग्लानता म्हणजे क्षीणता होते आणि अधर्माची वृद्धि होते तेव्हां-तेव्हां मी अवतार घेतों म्हणजे लीलेनें राम कृष्णादिक शरीरांहीं करून आविर्भूत ( प्रगट ) होतों. ॥ ७ ॥

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ॥ धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥**

स्वधर्मानें वर्तणारे जे साधु यांचें रक्षण करण्यासाठीं आणि दुष्टकर्म करणारे जे पापी त्यांचा नाश करण्यासाठीं व धर्माची उत्तम प्रकारें स्थापना करण्यासाठीं युग युगाचे ठायीं मी अवतार घेतों. या कारणावरून पुत्राचे हितार्थ मातेनें लालन किंवा ताडन जरी केलें तरीं मातेस जसें निर्दयत्व येत नाहीं तसें ईश्वरास निर्दयत्व येत नाहीं. ॥ ८ ॥

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ॥ त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९**

हे अर्जुना, या प्रमाणें माझें जन्म म्हणजे अवतार आणि धर्मपालनादि अलौकिक कर्म यांप्रत जो तत्त्वतः म्हणजे माझीं जन्म कर्मे लोकांचे हितासाठींच आहेत. स्वार्थासाठीं नाहींत असें जाणतो तो या देहाप्रत किंवा देहाभिमानाप्रत टाकून पुनः जन्माप्रत येत नाहीं. मजप्रत येतो. या सारीं ज्यास भगवत्प्राप्तीची इच्छा आहे त्यानें भगवंताचीं अवतारचरित्रें गावीं. असें तात्पर्य. ॥ ९ ॥

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ॥ बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥**

भगवंताच्या जन्मकर्माचें ज्ञानें करून भगवंताची प्राप्ति कशी होते तें सांगतात. विषयांची प्राप्ति व्हावी अशी जी इच्छा तो राग आणि मिळालेले विषय नाश पावतील असें भय आणि विषय प्राप्ति होण्यासाठीं प्रयत्न करीत असतां कोणी त्यास प्रतिबंध केल्यामुळें इच्छेचा विघात होऊन उत्पन्न होतो. जो मनाचा वृत्तिविशेष तो क्रोध हे राग भय क्रोध ज्यांचे गेले आहेत असे आणि मी श-

दू सखावनार स्वरूपानें धर्म परिपालन करतों असें माझे ठायीं परम कारुणिकत्व जाणून माझे ठायीं चित्त ठेवून आपलें जन्म मरण प्रवाहांत पडल्यामुळें जें दुःख त्या-च्या नाशाविषयीं माझाच ज्यांनीं आश्रय केला आहे असे बहुत माझे प्रसादें करून प्राप्त झालेलें जें आत्म स्वरूपाचें ज्ञान आणि त्याचा परिपाक होण्यास साधन जें तप म्हणजे स्वधर्मानुष्ठान किंवा पुनः पुनः विचार तेणें करून पूत म्हणजे अज्ञान आणि त्याचें कार्य जें देहेंद्रियां दिकांवर आत्म बुद्ध्यादिक तद्रूप जो मळ तो ज्यांचा गेला आहे असे होऊन माझे स्वरूपाप्रत पावले आहेत यावरून माझे भक्तीचा-मार्ग आतांच प्रवृत्त झाला असें नाहीं तो पुरातनच आहे असें सूचविलें. या प्रमा-णें तुझीं आणि माझीं जन्में बहुत होऊन गेलीं आहेत. त्यांप्रत तूं जाणत नाहींस आ-णि मी जाणतों असें सांगितलें येणें करून अज्ञानोपाधिक चैतन्य रूप जो जीव तो महावाक्यींतील त्वं पदाचा अर्थ आणि विद्योपाधिक चैतन्य रूप जो ईश्वर तो तत्प-दाचा अर्थ– असें दाखवून अज्ञान रहित आणि नित्य शुद्ध सत्वादि गुणयुक्त जो परमेश्वर त्याचें निष्काम कर्मादिक स्वधर्माचरणानें प्राप्त झालेल्या प्रसादें करून-जीवाच्या अज्ञानाची निवृत्ति होऊन नित्स्वरूपत्वानें त्यावर आत्मत्व साक्षात्कार होऊन परमेश्वराचें सारूप्य जीवास प्राप्त होतें असें सांगितलें. ॥१०॥

ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ॥
मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥

तुला जे शरण येतील त्यांस तूं आपलें सारूप्य जसें देतोस तसेंच काम-बुद्धीनें इतर देवतांस जे शरण जातात त्यांस तें देत नाहींस यावरून तुझे ठिकाणी-ही आह्मा जीवां प्रमाणें विषम भाव आहे असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात. जे जसे म्हणजे सकाम बुद्धीनें किंवा निष्काम बुद्धीनें मला भजतात त्यांस त्यांचे इच्छे प्रमाणें फळ देऊन त्यांवर मी अनुग्रह करतों. सकाम पुरुष मला सोडून इंद्रादि देवतां-चें भजन करतात म्हणून मी त्यांची उपेक्षा करीत नाहीं. कारण हे अर्जुना, इंद्रादि-कांनें यजन करणारे ही मीच उपदेश केलेले मार्गास अनुसरतात. तात्पर्य– सर्व श्रुति आणि स्मृति माझेच मुखांतून निघाल्या आहेत. यास्तव त्यांतील सर्व विधि किंवा निषे-ध माझ्याच आज्ञा आहेत. त्यांत स्वर्गादि फलेच्छा ज्यांस आहे त्यानीं माझ्या विभूति ज्या इंद्रादि देवता त्यांचेंच यज्ञादिकें करून यजन करावें. ज्यांस मोक्षेच्छा आहे त्यां-नीं निष्काम कर्माचरणें करून शुद्धांतःकरण होऊन सच्चिदानंद रूप जो मी त्याचें-स्वात्मत्वें करून उपासन करावें. अशा माझ्याच आज्ञा आहेत त्या प्रमाणें आपाप-ले अधिकारा प्रमाणें कोणते ही देवतेचें यजनादिकें करून आराधन केलें तरी ती दे-वता माझेंच स्वरूप आहे यास्तव तें आराधन माझेंच होतें आणि त्या देवतेनें ह्या-

मून आराधन करणाऱ्यास त्याचे इच्छे प्रमाणें मीच फलदेणारा आहें यावरून माझे ठिकाणीं विषम भाव नाहीं मी जर स्वेच्छेनें कांहीं करीन तरमला वैषम्य येईल तसें मी कांहींच करीत नाहीं अथवा जे आर्त म्हणजे पीडित किंवा ज्ञानेच्छु किंवा स्त्रीपुत्र द्र व्यादिक अर्थाची इच्छा करणारे त्यात्या कामानीं मला भजतात त्यांप्रत त्यांचें पीडा निवारण किंवा ज्ञान देणें किंवा अर्थ देणें येणेंकरून मी त्यांवर अनुग्रह करतों. कारण ते माझेच मार्गास अनुसरतात. अन्य देवतेचे ही भक्त माझेच भक्त आहेत. ११

## कांक्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः ॥ क्षिप्रंहि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥

असें जर आहे तर तुझें सारूप्य प्राप्त होणें असा जो मोक्ष त्यासाठीं सर्व निष्काम बुद्धीनें तुझेंच मुख्य स्वरूपाचें आराधन कां करीत नाहींत असें जरम्हणेल तर त्या विषयीं सांगतात. बहुत करून या मनुष्य लोकांत काम्य कर्माचे फलाची इच्छा करणारे जे आहेत ते इंद्रादिक देवतांचें यजन करतात. सच्चिदानंद रूप जो मी याचें स्वात्मत्वें करून ध्यानादि रूप भजन करण्यास साधन रूप चित्त शुद्धीचें संपादक निष्काम कर्म करीत नाहींत. कारण मनुष्य लोकीं काम्यकर्माचें पुत्र, पशु, द्रव्यादिक फल लौकर प्राप्त होतें. ज्ञान प्राप्तीचें साधन ध्यानादिक आणि चित्तशुद्धि होणें फार दुर्घट आहे यास्तव त्याचें फल माझें सारूप्य प्राप्त होणें तें लौकर प्राप्त होत नाहीं. ॥ १२ ॥

## चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ॥ तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥ ॥

सर्व सृष्टीचा कर्ता तूं आहेस तेव्हां कोणी सकाम होऊन इंद्रादि देवताचें यजन करतात. कोणी निष्काम होऊन तुझ्या मुख्य स्वरूपाचें भजन करतात. हें कर्म वैषम्य आणि कर्म करणारे जे ब्राह्मणादिक वर्ण त्यां मध्यें कोणी उत्तम, कोणी मध्यम कोणी अधम. असें वैलक्षण्य हीं तुझे पासूनच उत्पन्न झा लें आहे. यावरून तुझे ठायीं वैषम्य कसें नाहीं असें म्हणेल तर त्या विषयीं सांगतात. ब्राह्मण सत्त्व प्राधान्यें करून सत्त्वगुणी आणि त्यांचीं शम ( बाह्येंद्रियांचा निग्रह ) दम ( मनाचा निग्रह ) इत्यादिक स्वाभाविक कर्में असतात. सत्त्वगुण आहे अंगभूत ज्यास अशा रजो गुणानें प्राधान्यें करून युक्त क्षत्रिय आणि त्यांचीं शूरत्व युद्धादिक स्वाभाविक कर्में आहेत. तमोगुण आहे अंगभूत ज्यास अशा रजो गुणानें प्राधान्यें करून युक्त वैश्य आणि कृषि, वाणिज्य म्हणजे व्यापारादिक हीं त्यांचीं कर्में आहेत. रजोगुण आहे अंगभूत ज्यास अशा तमोगुणानें प्राधान्यें करून

युक्त शूद्र त्यास ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांची सेवा करणें इत्यादिक स्वाभाविक कर्मे आहेत. अशा गुणांच्या आणि कर्मांच्या विभागें करून युक्त ब्राह्मणादिक चार वर्ण मी उत्पन्न केले आहेत. मायेच्या संबंधानें त्यांचा कर्ता मी असतां ही परमार्थ दृष्टीनें किंवा त्या सृष्टि करण्याविषयींची जी आसक्ति तीणें करून मी रहित आहें यामुळें अव्यय म्हणजे निर्विकार असा जो मी याप्रत फलतः अकर्ता आहें असें तूं जाण. तात्पर्य - मी जी सृष्टि करतों ती मी आपले सुखादिकाचे प्रयोजना साठीं करीत नाहीं किंवा दुसऱ्याचे अनर्था साठीं करीत नाहीं आणि निष्कारण आपले इच्छेनें करीत नाहीं. अनादि जीं जीवांचीं कर्मे आहेत त्यांचें त्यास तदनुसार विचित्र फल देण्या साठीं विचित्र सृष्टि मी करतों. या मुळें मला कोणावर वैषम्य किंवा ममतेचा संभव हें नाहीं. ॥१३॥

**न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा ॥ इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥१४**

आतां पूर्वोक्त अर्थाचेंच प्रतिपादन करतात. मी निरहंकार आहें या मुळें विश्वाची सृष्टि करणें इत्यादिक जीं कर्मे तीं मला आसक्त करीत नाहींत. आणि मी आप्त काम म्हणजे सर्वकाम ज्यास प्राप्त झाले आहेत असा आहें म्हणून मला कर्म फलांची इच्छा नाहीं यामुळें ही तीं कर्मे मला लेप म्हणजे आसक्ति करीत नाहींत असा मी आहें असें जो स्वात्मत्वें करून जाणतो तोही कर्मफल त्यागामुळें कर्मानें बद्ध होत नाहीं. ॥१४॥

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ॥ कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतं ॥१५॥ ॥**

या प्रमाणें "ये यथा मां प्रपद्यंते" इत्यादि चार श्लोकांनीं प्रसंगानें प्राप्त झालेलें जें ईश्वरास वैषम्य त्याचें निराकरण करून पूर्वी सांगितला जो निष्काम कर्मयोग त्याचा विस्तार सांगण्या साठीं शिष्टाचाराचें प्रमाण दाखवून पूर्वी सांगितलेले कर्मयोगाचें स्मरण देतात. अहंकार, कर्तृत्वाभिमान, फलेच्छा इत्यादिक सोडून केवल ईश्वरोद्देशें करून केलेलें कर्म बंधक होत नाहीं असें जाणून पूर्वीचे मुमुक्षु जे जनकादिक त्यांहीं पूर्वतर म्हणजे वेदोक्त वास्तव आलीकडे कल्पिलेलें नव्हे असें अनादि सिद्ध जें कर्म तें चित्तशुद्धी साठीं आवश्यक आहे म्हणून केलें यास्तव किंवा पूर्वतर म्हणजे प्रथम कर्मच केलें यास्तव तूंही तेंच कर्म कर. ॥१५॥

**किं कर्म किमकर्मेति कवयोप्यत्र मोहिताः ॥ त-**

## त्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात्॥१६॥

जें जें कर्म करावयाचें तें तें जाणून करावें अशी स्मृति आहे यास्तव कर्मांचें वास्तविक स्वरूप समजणारे जे आहेत त्यांबरोबर विचार करून कर्मस्वरूप यथार्थ समजून तें केलें पाहिजे. केवल लोक करीत आले म्हणून आपण ही करावें अशा गतानुगतिकन्यायानें करूं नये असें सांगण्यासाठीं कर्मस्वरूपाचें ज्ञान दुर्घट आहे असें सांगतात. करावयाचें कर्माचें स्वरूप काय आणि अकर्म म्हणजे कर्म न करण्याचें स्वरूप काय या दोहों विषयीं दुर्निरूपत्वास्तव कवि म्हणजे क्रांतदर्शी विद्वान् ही मोहाप्रत पावले आहेत यास्तव तें कर्माचें आणि अकर्माचें स्वरूप तुला मी सांगतों. ज्या स्वरूपाप्रत जाणून अशुभ म्हणजे दुःखप्रद जो संसार त्या पासून तूं मुक्त होशील. ॥१६॥

## कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः॥ अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः॥१७॥

जाणें, येणें, पहाणें, ऐकणें, बोलणें इत्यादिक जो देहेंद्रियांचा व्यापार तें कर्म हें लोकांत प्रसिद्धच आहे असें म्हणेल तर त्या विषयीं सांगतात. शास्त्रविधीनें जें कर्म अवश्य करावें असें सांगितलें आहे त्याचें तत्व म्हणजे वास्तविक स्वरूप समजलें पाहिजे कारण तेंच कर्मस्वरूपाचें ज्ञान अनुष्ठानद्वारा चित्तशुद्धीस उपयोगी आहे. केवळ सांगितलेलें लौकिक कर्म स्वरूपाचें ज्ञान उपयोगी नाहीं. तसेंच विकर्म म्हणजे जें कर्म करूं नये असा शास्त्रांत निषेध सांगितला आहे त्या निषिद्ध कर्माचें ही तत्व म्हणजे यथार्थ स्वरूप समजलें पाहिजे. कारण कर्म हें उपलक्षण आहे. परंतु कर्म, अकर्म आणि विकर्म यांचें यथार्थ तत्त्व समजणें फार गहन म्हणजे खोल किंवा दुर्घट आहे. ॥१७॥

## कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः॥ स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत्॥१८॥

"तत्ते कर्म प्रवक्ष्यामि" असें जें पूर्वीं सांगितलें तेंच सांगतात. कर्मणि-म्हणजे केवल ईश्वराराधनोद्देशानें केलेलें जें निष्काम कर्म त्याचे ठायीं हें चित्तशुद्धीचे द्वारा मोक्षसाधनभूत ज्ञानास साधनच होतें बंधक होत नाहीं. या कारणानें हें अकर्मच आहे अशी जो बुद्धि करतो तो कर्म करणाऱ्या मनुष्याचे ठायीं बुद्धिमान् म्हणजे व्यवसायात्मक जी पूर्वोक्त बुद्धि तीणें करून युक्त आहे यास्तव श्रेष्ठ आहे आणि त्या बुद्धीनें त्यास कर्मानुष्ठान द्वारा चित्तशुद्धि होऊन ज्ञानप्राप्ति होते यास्तव तो युक्त म्ह-

णजे श्रवण मनन निदिध्यासन रूप योग युक्तच आहे आणि त्यास ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन ब्रह्मस्वरूपानंदाचा आत्मस्वरूपानें अनुभव होतो. या मुळें तो सर्व कर्म करणारा आहे. कारण सर्व कर्म फल भूत सर्व सुखाचा ब्रह्मानंदांत समावेश आहे, या प्रमाणें जेव्हां चित्तशुद्धि न झाल्यामुळें कर्मच करण्यास अधिकार आहे तेव्हां कर्मच केलें पाहिजे असा जो तृतीयाध्यायीं "न कर्मणा मनारंभात् नैष्कर्म्यं पुरुषोश्नुते" येणें करून कर्मयोग सांगितला तोच येथें स्पष्ट करून दाखविला. पूर्वी सांगितलेले कर्मयोगाचाच "कर्मण्य कर्मयः पश्येत्" हा विशेष सांगून प्रपंच म्हणजे विस्तर केला यास्तव पुनरुक्ति दोष नाहीं. येणें करूनच "यस्त्वात्मरतिरेव स्यात्" इत्यादिकें करून तो ज्ञान्यास कर्माचा उपयोग नाहीं म्हणून सांगितलेल्याचाहि अर्थात विस्तर केला असें जाणावें. या व्याख्येवर नित्य नैमित्तिक कर्मांचे ठायीं हें अकर्म अशी बुद्धि मोक्षहेतु ब्रह्मात्मतत्त्व ज्ञानरूप नाहीं या मुळें "तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसे ऽशुभात्" याशीं विरोध येईल आणि कर्मतत्त्वाचें यथार्थ ज्ञान व्हावें म्हणून कर्मस्वरूपाचें वास्तविक स्वरूप सांगण्यास प्रवृत्त होऊन कर्माचे ठायीं हें अकर्म असें मिथ्या ज्ञान सांगितलें हेंही विरुद्ध होईल. कारण अशा मिथ्या ज्ञानानें वास्तविक कर्मस्वरूप समजणार नाहीं आणि अशा मिथ्या ज्ञानें करून युक्त जो आहे त्याची "सबुद्धिमान् मनुष्येषु" अशी स्तुतीही संभवत नाहीं इत्यादिक दोष दृष्टीनें या श्लोकाची कोणी दुसरी व्याख्या करतात. ती अशी— कर्मणि परमार्थतः आत्मा निष्क्रिय निष्कल म्हणजे क्रियादिकांनीं रहित असतांही अनादि अविद्येचे आवरणानें आत्मस्वरूपाचे ठायीं आरोपानें भासमान जे देहेंद्रियादिक त्यांचें जें कर्म, विकर्म आणि अकर्म एतद्रूप व्यापार तेही देहादिकांवरील तादात्म्याभिमानानें म्हणजे आपणाशीं जो अभेद तद्रूप अभिमानानें मीच करतों असें मानून आत्मा त्या विषयीं प्रवृत्त असतांही जसे तीरस्थ वृक्षांवर चलन क्रिया नसतांही गमन करणार जी नौका तिचे उपाधीनें नौकास्थ पुरुषांस ते गमन करतात असें भासलें तरी परमार्थतः त्यांचे ठायीं चलन नाहीं त्या प्रमाणें अविद्या संबंधानें ते व्यापार आत्म्याचे ठायीं भासले तरी परमार्थतः आत्म्याचे ठायीं ते व्यापार नाहींत. आत्मस्वरूप निष्क्रिय आहे, आत्मा देहाहून भिन्न आहे अशा आत्मानात्म विवेक ज्ञानानें जो पाहतो तसाच अकर्मणि म्हणजे चलगुण वृत्तं, या न्यायें करून म्हणजे देहेंद्रिय प्राणादिक जे सत्वादि गुण कार्य भूत पदार्थ ते स्वभावें करून कायिक वाचिक, मानसिकादिक व्यापार रूप जीं कर्में तींहीं करून निरंतर युक्त असतांही निरंतर गति युक्त चंद्र तारका दिकांचे ठायीं जसा लोक गमनाभावाचा आरोप करतात त्या प्रमाणें तूष्णीं स्थिती मध्यें मी उगाच निश्चेष्ट बसलों आहें कांहीं करीत नाहीं असा उक्त व्यापार रूप कर्माभावाचा त्यांवर आरोप लोक करतात. असा आरोप केलेला कर्माभा-

व शरीरादिकांवर भासला तरीं त्याचे ठायीं उक्तन्यायानें निरंतर कर्म आहे असें-जो पाहतो तो मनुष्याचे ठायीं बुद्धिमान् म्हणजे तत्त्वदर्शी आणि पूर्वोक्त प्रकारांनीं आत्म्याचे ठायीं भ्रांतीनें कर्म स्वरूप व्यापार भासतो. निरंतर कर्मस्वभावरूप देहेंद्रियादिक अनात्म्यावर निष्क्रियत्व भ्रांतीनेंच भासतें परमार्थतः आत्मा निष्क्रिय आहे. देहेंद्रियादिक निरंतर क्रियायुक्तच आहेत असें जो पाहतो त्यास कर्म आणि योग यांचे फल जें आत्मतत्त्वाचें यथार्थ ज्ञान तें झाल्यामुळें तो योगी आणि सर्व कर्माचा करणारा अशी त्याची ही स्तुति केली आणि येणें करून आत्म्यास निष्क्रियत्वामुळें अकर्तृत्व आहे आणि देहादि संघातास क्रिया संबंधानें कर्तृत्व आहे असें अनुसंधान करून कर्में करावीं असें सूचविलें आणि अकर्त्रात्म तत्त्वज्ञानानंतर प्रारब्ध-कर्म वशें करून ज्ञान्यास निषिद्ध कर्माचरणानें प्रत्यवाय लागत नाहीं. अज्ञान्यास प्रत्यवाय लागतो. असें ही सूचविल्यानें विकर्माचें ही स्वरूप सांगितलें यास प्रमाण, जसा कमलाचे पत्रावर उदकाचा लेप होत नाहीं तसा आत्मतत्त्व वेत्त्यास पाप कर्माचा लेप होत नाहीं अशा अर्थाची श्रुति आणि ज्ञान्याचे ज्ञानापूर्वींच्या संचित-पाप पुण्यात्मक कर्मांचा ज्ञानानें नाश होतो. आणि ज्ञानानंतर झालेल्या त्या कर्माचा लेपच होत नाहीं. अशा अर्थानें ब्रह्मसूत्र आहे. असें जर आहे तर भोग केल्यावांचून कोट्यावधि कल्पांचे शतानें ही कर्म क्षीण होत नाहीं अशा अर्थाच्या श्रुतीची कायगति अशी शंका करूं नये. ज्ञानाग्नि सर्व संचित क्रियमाण कर्मांचा दाह करतो अशा श्रुतीवरून ती श्रुति प्रारब्ध कर्मा विषयींची आहे अथवा भोग समाधिकरण म्हणजे कर्म करणारास जो कर्म फलाचा भोग होतो तो आणि व्यधिकरण म्हणजे कर्म न करणारासही त्या कर्माच्या फलाचा भोग होतो तो याभेदानें दोन प्रकारचा आहे. ज्ञाना पूर्वीं समानाधिकरण भोगानें संचित क्रियमाण कर्माचा क्षय होतो. ज्ञान्यास विदेह कैवल्य झालें म्हणजे त्याचा दाय म्हणजे त्याचे पित्यानें किंवा त्यानें मिळविलेलें द्रव्य त्याचे पुत्राकडे जातें आणि त्याचें संचित क्रियमाण पुण्य त्याचे सुहृद् म्हणजे उपकर्ते जे असतील त्यांकडे जातें म्हणजे त्यांच्या फलाचा भोग त्यांस होतो. आणि त्यानें जें संचित क्रियमाण पाप असतें तें त्यांचे जे द्वेषी शत्रु त्यांकडे जातें म्हणजे त्याचे फलाचा भोग त्यांस होतो असें श्रुतीनें सांगितलें आहे त्या प्रमाणांवरून ज्ञानानंतर ज्ञान्याच्या संचित क्रियमाण पुण्य पापाच्या भोगाची अशी सुहृद् व द्वेषी यांजकडे व्यवस्था होऊन तो मुक्त होतो असें तात्पर्य. ॥१८

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः॥-**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः॥१९**

पूर्व श्लोकांत सांगितल्या प्रमाणें अज्ञान्यास कर्माचे ठायीं अकर्म भाव-

ना आणि अकर्माचे ठायीं कर्मभाव नाही. दृढ होण्यासाठीं विद्वानांचे म्हणजे ज्ञान्याचें जें ज्ञान त्याची स्तुति करतात. या फलासाठीं हें कर्म मी करीन अशी फलेच्छा आणि कर्म करण्याचा संकल्प यांहीं करून रहित ज्याचीं सर्व कर्में आहेत. आणि त्या कर्में करून चित्तशुद्धि द्वारा प्राप्त झालेलें जें पूर्वश्लोकोक्त ज्ञान तद्रूप अग्नीनें ज्याचीं संचित क्रियमाण सर्व कर्में दग्ध म्हणजे दग्ध बीजा प्रमाणें फल देण्या विषयींचे शक्तीनें रहित झालीं आहेत त्यास ज्ञानी पंडित असें म्हणतात. ॥१९

## त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः॥ कर्मण्यभि प्रवृत्तोपि नैव किंचित् करोतिसः॥२०

प्रायश्चित्तानें जसा पूर्व कर्माचा दाह होतो तसा ज्ञानानें ही संचित पूर्व कर्माचाच दाह होईल क्रियमाणाचा दाह होणार नाहीं यास्तव त्याचें फल अवश्य होईल अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात. आत्म स्वरूपानंदाचे प्राप्तीमुळें नित्य तृप्त होत्साता कर्मफलाचे इच्छेचा त्याग करून अहंकाराचे आश्रयामुळें कर्म होतें यास्तव कर्माचा आश्रय जो अहंकार तो ज्याचा गेला आहे आणि या कारणानें मी कर्म करतों असा जो कर्मासंग म्हणजे कर्म कर्तृत्वाभिमान त्याप्रत टाकून स्वाभाविक जें लौकिक कर्म किंवा शास्त्र विहित कर्म त्याविषयीं सर्वांगसाधनानें प्रवृत्त झाला असला तरी तो कांहीं करीत नाहीं म्हणजे त्यानें केलेलें कर्म अकर्मते प्रतच पावतें अथवा फल देण्यास दग्ध बीजा प्रमाणें शक्ति हीन होतें. ॥२०॥

## निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः॥शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्॥२१॥

अशा गौण कर्माचरणा पेक्षां कर्म न करणेंच श्रेष्ठ आहे अशी शंका होईल तर कर्म न करणें गृहस्थाश्रमास प्रत्यवाय कारक आहे असें व्यतिरेक मुखानें म्हणजे सत्व, रज, तम या मायेच्या गुणाचे संबंधानें उत्पन्न होणारीं पंचमहाभूतें, इंद्रियें व देवता यांची सृष्टि मिथ्यारूप असून ही ती ज्याच्या सत्तेनें सत्यवत् भासते अशा वस्तु रूपानें दाखवितात. विवाहादिकानें होणारा जो स्त्रियादिकाचा परिग्रह तो ज्याणें सोडला आहे असा जो संन्यासी तो निराशी म्हणजे योगापासून होणारें जें ऐश्वर्य त्याची ही इच्छा करीत नसतां यत म्हणजे योगाभ्यासानें स्वाधीन केलें आहे चित्त आणि आत्मा म्हणजे बुद्धि व देहेंद्रियांदिकांचा समुदाय समाधिकालीं ज्यानें स्वाधीन केली आहेत. असा योगी समाधी पासून जेव्हां उठतो त्या व्युत्थान कालीं शारीर म्हणजे शरीराचे स्थिति पुरतेंच केवल भि-

क्षाटनादि कर्म करीत असतां ही किल्बिष म्हणजे यावज्जीवन आहे तों पावेतों अग्निहोत्रादि करावें दिवसास संध्योपासनादि कर्म करावें. अशा विधीनें निरंतर करावयाचें जें नित्य नैमित्तिक कर्म त्याचा त्यानें विधीनें त्याग केला आहे यास्तव त्याचें अनुष्ठान न करण्यानें उत्पन्न होणारें पाप त्याला लागत नाहीं. ज्यास तर स्त्री आदिकांचा परिग्रह आहे तो फलेच्छा रहित असला तरी आणि पूर्वोक्त यतचित्तात्मा असला तरी पूर्वोक्त केवळ शारीर कर्म करणारा नित्यकर्मादिकांचें अनुष्ठान न केल्यामुळें प्रत्यवाय पावेल. ॥ २१॥

## यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ॥
## समः सिद्धावसिद्धौच कृत्वापि न निबध्यते ॥२२॥

सपरिग्रह म्हणजे गृहस्थाश्रमी जो आहे त्यास कुटुंब पोषणादिकानें व्यग्रते मुळें आणि बहुत द्रव्याचा व्यय करून व मोठ्या आयासानें सिद्ध होणारीं जीं अग्निहोत्रादिक कर्मे त्यांचें यावज्जीव म्हणजे जीवन आहे तों पर्यंत अनुष्ठान कसें संभवेल अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात. ऋत आणि अमृत या दोहीं करून ब्राह्मणानें उपजीवन करावें असें सांगून ऋत म्हणजे उंछ शील, अमृत म्हणजे अयाचित असें त्याचें व्याख्यान केलें आहे त्याप्रमाणें यदृच्छा लाभ म्हणजे याचना केल्या वांचून प्रारब्ध वशें करून जो झालेला द्रव्यादिकाचा लाभ तेणें करूनच संतुष्ट आणि द्वंद्वातीत म्हणजे बहुत लाभानें जें सुख किंवा लाभ न झाल्यामुळें जें दुःख तेणें करून रहित आणि विमत्सर म्हणजे दुसऱ्यास लाभ झाल्यामुळें होतो जो संताप तद्रहित व यदृच्छा लाभें करूनच इष्टि, पशु, चातुर्मास्यादिक जें नित्य नैमित्तिक कर्म त्याची जी सिद्धि म्हणजे अनुष्ठान किंवा असिद्धि या दोहीं करून ही सम म्हणजे निर्विकारांतःकरण असा जो गृहस्थाश्रमी तो कृत्वा म्हणजे इष्ट्यादिक कर्म करून त्याचें जें फल स्वर्गादिक तेणें करून बंध पावत नाहीं. अपि म्हणजे बंध करणाऱ्या कर्माच्या तत्त्व ज्ञानानें दाह झाल्यामुळें कर्म करून जसा बंध पावत नाहीं तसा इष्ट्यादि कर्म न केल्यामुळें जो प्रत्यवाय तेणें करू ही बंध पावत नाहीं. या विषयीं न्याय मार्गानेंच ज्यास धन प्राप्त होतें आणि तत्त्व ज्ञाननिष्ठ, अतिथिप्रिय म्हणजे अतिथीचें पूजन करणारा, श्राद्ध करणारा, सत्यवादी असा जो गृहस्थाश्रमी तोही मुक्त होतो. अशा अर्थाची स्मृति प्रमाण आहे. याचने वांचून देह निर्वाहा पुरतें मिळालेलें अन्न पुरे अशा अलं बुद्धीनें युक्त शीतोष्णादिक द्वंद्वांनीं पीडित झाला तरी खेद न करणारा कोणावर ज्याची वैर बुद्धि नाहीं, आणि शरीराचे निर्वाहार्थ होणारा जो यदृच्छा लाभ तेणें करून ज्यास हर्ष नाहीं आणि लाभाच्या अभावामुळें ज्यास खेद नाहीं असा "कर्मण्यकर्म यःप-

श्येत '' या श्लोकांत सांगितलें प्रमाणें कर्मादिकांवर अकर्मादिकाची बुद्धि ज्यास झा-
ली आहे असा संन्यासी "गुणागुणेषु वर्तंते - नैव किंचित्करोतिसः '' यांत सांगितल्या-
प्रमाणें परमार्थतः आत्म्यास कर्मादिकांचें कर्तृत्व नाहीं, कर्तृत्वादिक शरीरांतःकरणांचे
धर्म आहेत. शरीरादिकांहून भिन्न आत्मा असंग आहे असें जाणून शरीरनिर्वाहाप्र-
योगी भिक्षाटनरूप व्यापार शरीर करीत असतां ही हें शरीर मी आहें, मी भिक्षाटन
करतों असें अनुसंधान ज्यास नाहीं या कारणामुळें तो संन्यासी, अज्ञानकृत आवर-
णामुळें देहात्मभ्रमयुक्त अज्ञान्यानें त्यावर ह्या भिक्षाटनादि कर्म करतो असा आरो-
पिलेल्या कर्मानें किंवा कर्मकर्तृत्वानें बंधहेतु कर्मांचा ज्ञानाग्नीनें अज्ञाना सकट समूल
नाश झाल्यामुळें बंध पावत नाहीं. अशी या श्लोकाची संन्यासी विषयींची व्याख्या-
श्रीमच्छंकराचार्यांनी भाष्यांत केली आहे. ॥ २२॥

## गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ॥ य-
## ज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३॥ ॥

"त्यक्त्वा कर्मफलासंगं '' इत्यादि तीन श्लोकांनीं ज्ञानी कर्म करीत असतां-
ही त्याचें कर्तृत्व त्यास नाहीं यामुळें त्या कर्मांचा लेप त्यास होत नाहीं आणि लेप न झा-
ल्यामुळें तो कर्मफलानें बंध पावत नाहीं. म्हणजे ज्ञान्यास कर्मफल प्राप्त होत नाहीं अ-
सें जें सांगितलें तें ज्ञानाचे प्रतिबंधामुळें प्राप्त होत नाहीं किंवा कर्मांचा फलासकट ना-
श होतो यामुळें होत नाहीं. त्यांत अंतःकरण वृत्तिरूप ज्ञान क्षणिकच आहे यामुळें-
त्याचा नाश झाल्यानें किंवा देहेंद्रिय मनाच्या नाशानें त्याचा नाश झाल्यामुळें विदेह-
कैवल्य रूप मोक्षप्राप्ती नंतर ही ज्ञानरूप प्रतिबंध गेल्यामुळें मुक्तास ही अभुक्त
कर्मांचा नाश होत नाहीं म्हणून केलेल्या कर्मांच्या फलोपभोगासाठीं पुनः जन्ममरण-
रूप संसार प्राप्त होईल यास्तव ज्ञानानें फलासकट कर्मांचा नाश होतो असा जो
पक्ष त्याचा अंगीकार करून त्याची उपपत्ति सांगतात. ज्या कारणास्तव गत म्हण-
जे गेला आहे संग म्हणजे कर्तृत्वाभिमान ज्याचा असा येणें करून तो कर्म करीत-
नाहीं याविषयीं उपपत्ति सांगितली. आणि यज्ञ जो परमेश्वर त्याच्याच प्रीतीचे
उद्देशानें कर्म करतो यामुळें मुक्त म्हणजे ईश्वर प्रीती वांचून दुसरे कर्म फलाच्या कामना-
नीं रहित असा येणें करून कर्मफलाचा लेप त्यास होत नाहीं याविषयीं उपपत्ति
सांगितली. आणि ज्ञान म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार ज्ञानाचे ठायीं स्थित आहे चे-
त म्हणजे बुद्धि ज्याची असा जो ज्ञानी त्याचें समग्र म्हणजे कर्मानंतर होणारें
फल किंवा वासनारूप जें अग्र त्यासकट कर्म म्हणजे क्रियमाण ( नवीन होणारें )
कर्म, प्रविलीयते म्हणजे नाशाप्रत पावतें. क्रियमाण कर्मांचा हा नाश विद्वानाचे-
दृष्टीनें कमल पत्रावर उदकाच्या लेपाभावा प्रमाणें कर्मांचा आत्म्यास संग नसल्या

मुळें वास्तविक लेप न होणें असा जाणावा. अथवा ज्ञान्याचे शुभाशुभ कर्मांचें फल त्याच्या सुहृदांस किंवा शत्रूंस होतें असें पूर्वी सांगितलें आहे. त्यावरून त्या-कर्मांचें फल देण्याचें ज्ञान्याचें सामर्थ्य नाश पावतें एतद्रूप जाणावा. ॥२३॥

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ॥**
**ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्म समाधिना ॥२४॥**

ज्ञान्याचे दृष्टीनें आत्म्यास वास्तविक कर्माचा लेप म्हणजे संबंधच नाहीं असें जें "कर्म समग्रं प्रविलीयते" येणें करून सांगितलें त्याची उपपत्ति सांगतात. या सर्व दृश्यमान जगास कारण कालच आहे असें कोणी म्हणतात. कोणी स्वभावच कारण आहे. असें म्हणतात. कोणी अदृष्ट म्हणजे जीवानीं केलेले-धर्माधर्म तेच कारण म्हणतात. अशीं अनेक वादींचीं मतें सांगून वास्तविक कारण कोण आहे आणि हें जग कोणापासून उत्पन्न होतें असें तत्त्व समजावया साठीं मननशील मुनि किंवा सर्वदेव ध्यानयोगस्थ होत्साते देव म्हणजे प्रकाशमान जो परमात्मा त्याचे स्वरूपाहून भिन्न नाहीं अशीजी त्रिगुणात्मक मायाशक्ति तीप्रत पाहते झाले असें श्रुतींत सांगितलें आहे आणि हें सर्व द्वैत मायामात्र मिथ्या आहे. अद्वैतब्रह्मच सत्य आहे. इत्यादिक अर्थ प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींचे प्रमाणावरून हें सर्व-जग अनिर्वचनीय म्हणजे सत् किंवा असत् असें निरूपण जीचें होत नाहीं अशा-मिथ्या मायेनेंच ब्रह्माचे ठायीं कल्पिलेलें मिथ्याच आहे. या जगाची सत्ता ज्या ब्रह्माचे ठायीं मायेचे योगानें झाली आहे त्या ब्रह्मसत्तेहून ती निराळी नाहीं असें जाणून— ज्या कारणास्तव ते ज्ञानी अर्पण म्हणजे हवीचें अवदान म्हणजे समर्पण करण्यास-साधन भूत मंत्री, दर्वी, जुहु म्हणजे पात्र विशेष तें ब्रह्मच आहे, तसेंच अर्पण करावयाचें जे हवि म्हणजे घृतादिक होमद्रव्य तें ब्रह्मच आहे, जें हुत म्हणजे होमरूप क्रिया तें ब्रह्मच आहे अथवा हुत म्हणजे तृप्त केलेले देव ब्राह्मणादिक ते ब्रह्मच आहेत, जें अग्नीचे ठायीं हुत तें ब्रह्मच म्हणजे होम केला तो ब्रह्माचेच ठायीं होम केला असा अर्थ, हा अर्थ ब्रह्मणि या पदाचा अध्याहार करून करावा अथवा ब्रह्माग्नौ असें समस्त एकच पद करून ब्रह्मरूप जो अग्नि त्याचे ठायीं जें हुत तें ब्रह्मच येणें करून ज्यांत होम करतात तो अग्निही ब्रह्मच आहे असें सिद्ध होतें. जें यजमानानें हुत तें ब्रह्मानेंच-हुत म्हणजे होम कर्ता यजमान ब्रह्मच. या कर्मे करून जें फल व्हावयाचें तें ब्रह्मच आणि त्याचें जें शयन करणें, उठणें, बसणें, भोजन करणें इत्यादिक सर्व दुसरें कर्म तें ब्रह्मच अशी सर्व द्वैत रूप जगास ब्रह्मसत्ते शिवाय दुसरी सत्ता नाहीं आणि आत्मा ब्रह्माहून भिन्न नाहीं असें समाधिना म्हणजे समाधी पासून झाला जो स्वात्मलें करून अद्वैत ब्रह्म साक्षात्कार तेणें करून पाहतो यास्तव प्राप्त होणारें फल आत्मस्व-

रूपाहून भिन्न आहे असें त्याचे दर्शनें नाहीं यास्तव त्याचे सर्व कर्मांचा पूर्वोक्त-लेप त्यास होत नाहीं. हा आदित्य ब्रह्मच आहे, नाम ब्रह्मच आहे, इत्यादिक जशी आदित्य नामादिकावर ब्रह्मबुद्धि करणें अशी उपासना वेदांत सांगितली आहे. किंवा शालिग्राम विष्ण्वादिक प्रतिमांवर विष्णुबुद्धि करणें अशी उपासना सांगितली आहे त्या प्रमाणें "ब्रह्मार्पणं ब्रह्महविः" अशीं कर्में आणि त्यांचीं अंगें यांचे ठायीं कर्मांचा विलय होण्यासाठीं ब्रह्मबुद्धिरूप उपासना करावी असें या श्लोकांत सांगितलें अशी कोणी व्याख्या करतात. परंतु "कर्मण्यकर्म यः पश्येत् - तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसे शुभात्" येणें करून मोक्षसाधन जें सम्यक् ज्ञान म्हणजे यथार्थ वस्तु ज्ञान तें सांगण्याचा आरंभ करून पूर्वीं ही ज्ञानें करूनच मोक्ष होतो असें सांगून पुढें ही "श्रेयान् द्रव्यमयाद्यज्ञात् ज्ञानयज्ञः परंतप" असा ज्ञानाविषयींचाच उपसंहार म्हणजे मोक्षसाधन जें ज्ञान तें सांगण्याची समाप्ति केली आणि "ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति" अशी ज्ञानाची स्तुतीही केली आणि अध्याय समाप्त केला. यावरून उपासना सांगण्याविषयींचें तात्पर्य येथें संभवत नाहीं आणि जर उपासना येथें सांगितली असें म्हणावें तर - ब्रह्मैव तेन गंतव्यं - येणें करून ब्रह्मप्राप्तिरूप मोक्ष येथें सांगतात. तें तर तत्त्वज्ञानाचेंच फल तत्त्वज्ञानाशिवाय मोक्षास दुसरा मार्ग ( साधन ) नाहीं असें सर्वसंमत आहे. येथें उपासना जर सांगितली तर तें तत्त्वज्ञान नव्हे मग त्या उपासनेनें ब्रह्मप्राप्ति सांगितली तर तें विरुद्ध आहे इत्यादिक दोष त्या व्याख्येवर दाखवून ती भाष्यकारानें दूषित केली आहे. ॥ २४ ॥

## दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ॥ ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥ ॥

या प्रमाणें तत्त्वज्ञान यज्ञरूपच आहे असें सांगून त्याचे स्तुती साठीं दुसरे यज्ञ सांगतात. कोणी कर्मयोगी देव म्हणजे इंद्र अग्न्यादि देवता यांसच प्रधान मानून त्यांचेच उद्देशानें दर्शपूर्णमासादिक यज्ञाचें अनुष्ठान करतात. दुसरे ज्ञानयोगी सत्य ज्ञानानंदात्मक अद्वितीय जें ब्रह्म तेंच ज्ञानरूपानें सर्व कर्मांचा दाह करतें या कारणानें अग्निस्वरूप जें ब्रह्म त्याचे ठायीं यज्ञ म्हणजे देहेंद्रियादिक जे उपाधि त्यांचे योगानें जीवभावाप्रत पावलेलें जें आत्मस्वरूप त्याचा यज्ञें करूनच म्हणजे निरुपाधिक आत्मरूपें करूनच जुह्वति म्हणजे महाकाशामध्यें घटाकाशाचा जसा घटरूप उपाधीच्या त्यागानें लय होतो त्याप्रमाणें देहेंद्रियादिक उपाधींचा त्याग करून लय करतात म्हणजे निदिध्यासनानें त्या अभ्यास स्वात्मत्वें करून अनुभवितात. यासच ज्ञानयज्ञ म्हणतात. हा सर्व यज्ञामध्यें श्रेष्ठ आहे. ॥ २५ ॥

पुढील देशीं जाऊन ठेवलेली जी काडी किंवा कापूस यावर चलन क्रियेनें म्हणजे तें हालले म्हणजे जो एथ पर्यंत झाला असा निश्चय होतो त्यास देश दृष्ट रेचक असें म्हणावें. पायाचे तला पासून मस्तका पर्यंत शरीराचे आंत संचार करून तसा संचार झाला असतां जसा मुंग्यांचा स्पर्श होतो त्या प्रमाणें पायां पासून मस्तका पर्यंत त्याचा स्पर्श अनुभवास आला म्हणजे एथपर्यंत झाला असा ज्याचा निश्चय होतो त्यास देश दृष्ट पूरक असें म्हणावें. आपाद तल मस्तक पर्यंत देशांत स्थित होऊन रेचकाचा जो देश पूर्वी सांगितला. त्या देशीं ठेवलेलें तृण कापुसादिकांवर हालणें इत्यादिक क्रियेची किंवा पूरकाचा जो आपाद मस्तक देश सांगितला त्या देशीं मुंग्यांच्या स्पर्शा प्रमाणें स्पर्शाची अनुपलब्धि म्हणजे अप्रत्यक्ष किंवा अनुभव न झाला म्हणजे त्यास देशदृष्ट कुंभक असें म्हणावें. रेचकादिक इतके क्षण पर्यंत झाला असा निश्चय म्हणजे इयत्ता झाली असतां त्यास काल दृष्ट रेचक, काल दृष्ट पूरक, कालदृष्ट कुंभक असें म्हणावें. निमिष आणि उन्मेष म्हणजे डोळ्याचे पापण्यांचें उघडणें आणि मिटणें जितके कालांत होतें किंवा लघु (ह्रस्व) अक्षराचें उच्चारण जितके कालांत होतें त्या कालाचे प्रमाणास मात्रा असें नांव आहे. त्या द्वादश मात्रा पर्यंत रेचकादिकांनीं एक प्राणायाम होतो त्या रेचकादिक प्राणायामास संख्या दृष्ट असें म्हणावें. असा हा प्राणायाम सांगितले देश कालाचे नियमानें प्रतिदिवशीं केलेल्या अभ्यासानें क्रमें करून कालादिकाचे वृद्धीनें वाढविला म्हणजे दीर्घ काल पर्यंत त्याची स्थिति होऊन त्यास दीर्घ असें म्हणतात. आणि वायु संचार फार सूक्ष्म आहे म्हणून त्यास सूक्ष्म असें ही म्हणतात. सांगितले प्रमाणें बाह्य वृत्ति आणि आंतर वृत्ति रेचक आणि पूरक त्यांचा त्याग करून जो स्वतःच प्राण वायूचा स्तंभन रूप कुंभक होतो तो केवल कुंभकरूप चतुर्थ प्राणायाम म्हणावा. हा प्राणायाम मनें करून जी प्राणायामाची संख्या तीणें करून केला तर त्यास अगर्भ प्राणायाम म्हणावें आणि प्रणव गायत्र्यादिक ज्याची संख्या मनानें करून केला तर त्यास सगर्भ प्राणायाम म्हणावें. अगर्भा पेक्षां सगर्भ शंभरपट अधिक आहे. अशा त्या यमादिक प्राणायामा पर्यंत अंगांनीं धारणा ध्यान समाधि रूप जीं तीन पुढील अंगें तीं करण्यास मनाची योग्यता होते. कारण मनाचा व्यापार प्राणाधीन आहे. प्राणायाम सिद्धीनें प्राण स्थिर झाला म्हणजे मनाचें स्थैर्य होऊन सांगितलेले लक्षण युक्त मनाचे धारणा ध्यान समाधि होतात. चक्षुरादिक इंद्रियांचा आपले रूप शब्दादि विषयांशीं संबंध नसतां ध्यानादिकाचे ठायीं चित्ताचा जो आकार म्हणजे वृत्ति तदनुसार जो आकार होतो त्यास प्रत्याहार म्हणावें. त्या प्रत्याहाराची स्थिरता सिद्ध झाली म्हणजे भोगास साधन भूत जीं इंद्रियें त्यांस त्यांचें रंजन करणारे, मोह करणारे, कोप करणारे इत्यादिक विषय लोह चुंबका प्रमाणें बाहेर आ-

पल्याकडे ओढून नेत असतांही प्राणायामानें अंतर्मुख केलेले नेत्रक मनाचा बाहेर जाण्याचा प्रतिबंध झाल्यामुळें स्वतः विषयाकडे जाण्याचा विराम होऊन त्याची वशता म्हणजे स्वाधीनता होते. नंतर सांगितलेले लक्षणांचा संयम होतो तो संयम विषय भेदानें आणि फलभेदानें अनेक प्रकारचा आहे असें योगशास्त्रांत सांगितलें आहे, त्यांतील दोन तीन उदाहरणें दिक्प्रदर्शनार्थ लिहितो. परमेश्वरोपासक मरण पावल्यानंतर त्यास ब्रह्मलोकास अर्चिरादिमार्गानें त्या मार्गांतील देवता नेतात. त्या मार्गास देवयान मार्ग म्हणतात. त्या मार्गांतील सूर्य मंडलांतला छिद्ररूप जो मार्ग त्याचे ठायीं म्हणजे तद्विषयक पूर्वोक्त संयमानें त्या मार्गाचा साक्षात्कार झाला म्हणजे चतुर्दश भुवनांतील सर्व पदार्थांचें विशेषें करून म्हणजे निरनिराळें स्वरूपानें ज्ञान होतें. चंद्रा विषयीं संयम केला म्हणजे त्या संयमानें नक्षत्ररूप ज्या तारा म्हणजे तेजें त्यांचा जो व्यूह म्हणजे कोणतें नक्षत्र कोठें स्थित आहे, कोणतें कोठें स्थित आहे. असा जो त्याचा संनिवेश (स्थिति) त्याचें ज्ञान होतें. ताराचें ज्ञान झालें म्हणजे त्यांतील प्रधान भूत जो निश्चल ध्रुवरूप तारा ती विषयींचे संयमानें ही तारा किंवा हा ग्रह इतके कालानें अमुक राशी प्रत जातो असें ज्ञान होतें. या प्रमाणें बाह्य पदार्था विषयींचें अनेक संयमानें अनेक प्रकारच्या सिद्धि होतात, असें सांगून केळीच्या कंदा प्रमाणें प्रथम नाभिकंदरूप चक्र उत्पन्न झालें आहे तें शरीराचे मध्यभागीं राहिलें आहे. जसें कदली कंदापासून खालीं आणि वर शाखा पल्लव उत्पन्न होतात त्याप्रमाणें नाभिचक्रापासून खालचे प्रदेशीं आणि ऊर्ध्व म्हणजे वरील प्रदेशीं मस्तक हस्तपादादिक अवयव शरीरास उत्पन्न झाले आहेत त्या नाभिचक्रा विषयींचें संयमानें त्याचा साक्षात्कार झाला म्हणजे शरीरांत राहणारे जे वात, पित्त, कफ, रक्त, मांस, अस्थि, व मज्जादिक पदार्थ त्याच्या समुदायाचें ज्ञान होतें. कंठाचे अधोभागीं हृदय पर्यंत कूपाचे आकारा सारखें छिद्र आहे त्यास कंठकूप म्हणतात. त्या विषयींचे संयमें करून क्षुधा आणि तृषा यांची निवृत्ति होते. असें आंतर पदार्था विषयींचे जे अनेक संयम (निग्रह) त्यांचें अनेक प्रकारचें फल सांगितलें आहे. असा जो हा सांगितलेला संयम तोच इंद्रिय रूप जीं इंधनें त्यांच्या विषयापासून जो प्रत्याहार (निवृत्ति) रूप दाह त्याला कारण आहे म्हणून अग्नी प्रमाणेंच जो आहे त्या संयमाग्नीचे ठायीं कोणी श्रोत्रादिक इंद्रियांचा होम करतात म्हणजे निरंतर होणारा जो अनाहतध्वनि (शरीरांत जीं चार गुप्त चक्रें आहेत म्हणजे कंठचक्र, हृच्चक्र, नाभिचक्र इत्यादि यांतील एकाचा जो ध्वनि म्हणजे अवाज) त्या पासून कंठ तालूचे अभिघात रूप संबंधानें वर्ण उत्पन्न होतात त्यास नादब्रह्म किंवा शास्त्रांतरांत स्फोट असें म्हणतात त्याचे ठायीं श्रोत्रेंद्रियाचा पूर्वोक्त संयम केला म्हणजे दाहा प्रकां-

नें नादा एवढे नादाचा अनुभव होतो यामुळें दुसरें बाह्य शब्दांचें ग्रहण होत-नाहीं असें हंसोपनिषदांत सांगितलें आहे त्या प्रमाणें श्रोत्रादिक इंद्रियें आपाप-ले विषयांचें ग्रहण न करतील असें पूर्वोक्त संयमानें (नियमानें) करतात. कोणी म्हणजे यावज्जीव ब्रह्मचर्याचा संकल्प ज्यानीं केला आहे असे जे नैष्ठिक ब्रह्मचारी ते त्या त्या विषया पासून इंद्रियांचा निग्रह करणें असा जो संयम (नियम) तोच जो अग्नि त्याचे ठायीं श्रोत्रादिक इंद्रियांचा होम करतात. म्हणजे इंद्रियांचा निग्रह करणें हेंच मुख्य साधन आहे असें मानितात. अशी ही याची व्याख्या कोणी-करतात. शरीरस्थ मूलाधार चक्र नाभिचक्रा दिक जीं चक्रें त्यांतून कोणतेंही च-क्राचे ठायीं विषया पासून मना सुद्धां इंद्रियांचा उपसंहार म्हणजे निग्रह करून पूर्वोक्त धारणा, ध्यान समाधिरूप मनाचा संयम करण्या विषयीं जे समर्थ नाहीं-त असे आणि इंद्रियांचे चिंतनें करून दहा मन्वंतरें स्वर्गादिकाचे ठायीं स्थिति-होते असें वायुपुराणांत ज्या विषयीं फल सांगितलें आहे असे इंद्रिय चिंतक को-णी श्रोत्रादिक इंद्रिय रूप अग्नीचे ठायीं शब्दादिक विषयांचा होम करतात म्हणजे मना सुद्धां सर्व इंद्रियांनीं आपापले विषयांचें ग्रहण न केलें म्हणजे तोच समाधि आ-णि पूर्वीं सांगितले प्रमाणें विषया सुद्धां सर्वेंद्रियांचा मन आदिकाचे ठायीं धारणा-ध्यान समाधीनें उपसंहार करण्याचें प्रयोजन नाहीं असें मानितात. दुसरे गृहस्था-श्रमी श्रोत्रादिक जीं इंद्रियें तद्रूप जो अग्नि त्याचे ठायीं शब्दादिक विषयांचा होम कर-तात. म्हणजे विषय भोग करीत असतांही त्या विषयीं आसक्त रहात नाहींत अशी ही याची व्याख्या कोणी करतात. ॥ २६ ॥

## सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ॥
## आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७

दुसरे कोणी योगी श्रोत्र, त्वक्, चक्षु, रसना व घ्राण रूप जीं पांच ज्ञाने-द्रियें आणि त्यांचीं जीं शब्द ऐकणें, शीतोष्ण स्पर्श समजणें, रूप पाहणें, मधुरा-म्लादिक रसाचा स्वाद घेणें, व गंध घेणें इत्यादिक कर्में. तशींच वाक्, पाणि पाद-पायु उपस्थ अशीं जीं पांच कर्मेंद्रियें आणि त्यांचीं जीं बोलणें, देणें घेणें, चालणें, मल निःसरण करणें, मूत्र रेतानें निःसरण करणें इत्यादिक कर्में तशींच बाहेर-जाणें अन्नादिकांस खालीं नेणें शरीरादिकाचे किंवा तदवयवांचें अकुंचन कर-णें. वर नेणें, शीतोष्ण समान करणें, ढेंकर येणें, नेत्रादिकाचें उन्मीलन निमील-नादिक म्हणजे उघडणें मिटणें, क्षुधा उत्पन्न करणें, जांभई येणें शरीर मृत झा-लें तरी त्यास न सोडणें अशीं जीं प्राणा पान व्यान उदान समान रूप मुख्य प्राण-आणि नाग कूर्म कृकर देवदत्त, धनंजय रूप उपप्राण अशा दशविध प्राणांचीं-

जीं कर्मे या सर्व इंद्रिय प्राण कर्मांचा आत्मा देहेंद्रिय मनो बुद्धीहून निराळा त्यांचा साक्षिभूत आहे अशा ज्ञानानें दीपित म्हणजे प्रकाश पावलेला जो आत्म संयम योगाग्नि म्हणजे पूर्वोक्त जो बुद्धि संयम तद्रूप जो योग म्हणजे समाधि तद्रूप अग्नि त्याचे ठायीं दाह करतात. म्हणजे पूर्वोक्त सर्व कर्मांचा लय करून समाधिस्थच राहतात. पूर्वी जे इंद्रिय चिंतक योगी सांगितले त्यांच्या मनांचा लय न झाल्यामुळें सुषुप्तीप्रमाणें त्यांच्या प्राणांचा लय न होतां श्वासोच्छ्वासादिक कर्म करीत असतां प्राण रहातो. आतां जे सांगितलेले बुद्धि योगी त्यांच्या मनाचा समाधीचे योगानें लय झाल्यामुळें त्या कालीं त्यांच्या प्राणांचा ही उपसंहार होतो म्हणजे प्राणाचे जे व्यापार ते त्या वेळेस त्याचे होत नाहींत. या बुद्धि योग्याची बुद्धि बोद्धव्य विषय नसल्यामुळें म्हणजे विषयाकार वृत्ति न झाल्यामुळें ती बुद्धि लीन होऊन समाधि बुद्धिमात्र असते परंतु तेव्हां आत्मा बुद्ध्यादिकांहून निराळा आहे असें ज्ञान नसतें आणि अहंतात्याचे ठायीं बुद्धीचा उपसंहार (समाप्ति) होत नसतो हे बुद्धि चिंतक दहा हजार मन्वंतरें स्वर्गास रहातात. असें वायुपुराणांत सांगितलें आहे. यास्तव हे पूर्वोक्त इंद्रिय चिंतक योग्यां पेक्षां विशेष श्रेष्ठ आहेत. ॥२७॥

## द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ॥ स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥२८

या प्रमाणें तीन श्लोकांनीं पंचयज्ञ सांगितले आतां एका श्लोकानें पंच यज्ञ सांगतात. द्रव्यानें साध्य होणारे जे परोपकारार्थ वापी, कूप, तळीं, आराम (बाग) तीर्थांचे ठायीं बहिर्वेदी दान म्हणजे घांट बांधणें इत्यादिक करणें तेंच आहेत यज्ञ ज्यांचे असे जे ते द्रव्य यज्ञ. श्रौत यज्ञ पूर्वीच सांगितले आहेत यास्तव येथें सांगितलेले यज्ञच घ्यावे. आणि तप म्हणजे कृच्छ्र चांद्रायण मासोपवासादि रूप तेंच आहे यज्ञस्थानीं ज्यांच्या असे जे तपोयज्ञ आणि योग म्हणजे तृतीयाध्यायांत सांगितलेला कर्म कर्तृत्वाभिमानाचा आणि फलेच्छांचा त्याग करून नित्य नैमित्तिक संध्यावंदनादिक निर्विकल्प समाध्यंत कर्मांचें अनुष्ठान करणें असा जो कर्मयोग तोच आहे यज्ञ ज्यांचा असे जे योग यज्ञ अथवा पूर्वोक्त चित्तवृत्ति निरोध करणें असा जो यमनियमादिक अष्टांग योग तोच आहे यज्ञ ज्यांचा असे जे ते योग यज्ञ आणि स्वाध्याय म्हणजे वेदांचें नित्य अध्ययन करणें हाच आहे यज्ञ ज्यांचा ते स्वाध्याय यज्ञ म्हणजे वेदाध्ययना विषयीं निरंतर रत आणि ज्ञान म्हणजे वेदार्थाचा पूर्वमीमांसा व उत्तर मीमांसा यानीं जो विचार तोच आहे यज्ञ ज्यांचा ते ज्ञानयज्ञ, स्वाध्याय यज्ञ आणि ज्ञानयज्ञ असे जे ते स्वाध्याय ज्ञान यज्ञ असा समास करून या दोन यज्ञांचा या वाक्या पासून बोध होतो. असें जें उत्तम प्रकारचें तीक्ष्ण आहे-

व्रत म्हणजे अहिंसादिक व्रत ज्याचें असे जे पूर्वोक्त द्रव्य यज्ञादिक पांच प्रकारचे यति म्हणजे यत्नशील असे ही कोणी आहेत. ॥ २८ ॥

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ॥**
**प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९**

आतां अकरावा यज्ञ सांगतात. कोणी अधोवृत्ति जो अपानवायु त्याचे ठायीं ऊर्ध्ववृत्ति जो प्राण त्याचा पूरकें करून होम करतात म्हणजे पूरक समयीं प्राण आणि अपान यांस एकत्र करून पूरकाख्य प्राणायाम करतात. कोणी प्राणाचे ठायीं अपानाचा होम करतात म्हणजे रेचक समयीं अपान आणि प्राण एकत्र करून रेचकाख्य प्राणायाम करतात. कोणी मुख आणि नासिका यांतून बाहेर जाणें ही प्राणाचीगति आहे तसें गमन न करतां जें अधोगमन ही अपानाची गति याज्या प्राणापानांच्या गती त्यांचा कुंभकानें रोध करून रोध केलेले प्राणायामाविषयीं तत्पर होतात म्हणजे कुंभकाख्य प्राणायाम करतात. ॥ २९ ॥

**अपरे नियताहाराः प्राणान् प्राणेषु जुह्वति ॥**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३०**

आतां बारावा यज्ञ सांगतात- कोणी निगृहीत म्हणजे जिंकला आहे विषयभोग रूप आहार ज्यानीं असे वैराग्यवंत ते अंतःकरणासह्यां सर्व इंद्रियांस प्राण म्हणतात. त्यांतील प्राण म्हणजे मन, चित्त, अहंकार रूप अंतःकरणाचे वृत्तिभेद त्यांचे ठायीं प्राण म्हणजे श्रोत्रादिक पांच ज्ञानेंद्रियें आणि वाणी आदिकरून पांच कर्मेंद्रियें यांचा होम करतात. म्हणजे संकल्पविकल्पात्मक वृत्तिरूप मनाचे ठायीं श्रोत्रादिक इंद्रियांचा लय करून नंतर स्मरणात्मक वृत्तिरूप चित्ताचे ठायीं मनाचा लय करून नंतर अभिमानात्मक वृत्तिरूप अहंकाराचे ठायीं चित्ताचा लय करतात. या प्रमाणें इंद्रियांच्या वृत्तीसह्यां सर्व वृत्तींचा लय झाला म्हणजे अभिमान ठेवण्यास विषयच नाहींसा होतो तेव्हां इंधनें नसलीं म्हणजे अग्नि जसा जाग्यावरच लीन होतो तसा अहंकाराचा ही लय होतो. या लयासच समाधि असें ते मानितात. यामुळें त्यांस आभिमानिक असें म्हटलें आहे, हे आभिमानिक पूर्वोक्त बुद्धियोग्यांपेक्षां निकृष्ट आहेत या कारणानें आभिमानिक सहस्र मन्वंतरें पर्यंत स्वर्गास राहतात. असें वायुपुराणांत सांगितलें आहे. दुसरे कोणी आहार कमी करण्याचा अभ्यास करीत होत्साते प्राणाचे ठायीं इंद्रियांचा होम करतात म्हणजे इंद्रियें क्षीण झालेल्या कारणानें इंद्रिय वृत्तींचा लय होऊन प्राणमात्र राहतो त्या लयावरच होमाची भावना करतात अथ-

वा दुसरे प्राणायाम परायणच असतां उदरांतील दोन भाग अन्नानें पूर्ण करावे एक भाग जलानें पूर्ण करावा चवथा भाग प्राणवायूचे संचारासाठीं ठेवावा. असें योगशास्त्रांत सांगिलें आहे त्या प्रमाणें आहाराचा म्हणजे भोजनादिकांचा नियम करून कुंभकानें पूर्वोक्त प्रमाणें प्राणापानांच्या गतीचा रोध करून इंद्रियांचा प्राणाचे ठायीं होम करतात. म्हणजे कुंभकाचे ठायीं सर्व प्राण एकत्र झाले म्हणजे त्यांतच इंद्रियें ही स्वतः लीन म्हणजे वृत्तिरहित होतात या लयावर प्राणांचे ठाईं इंद्रियांचा होम अशी भावना करतात. अशी भावना करण्यास सर्वदा योगाच्या अभ्यासें करून जस जशी स्थिरता होते तस तशी वाणी, शरीर, दृष्टि इत्यादिकांचीहि स्थिरता होते असें योगशास्त्रांत सांगितलें आहे. तें प्रमाण आहे. अशी ही याची कोणी व्याख्या करतात. हे सर्वही यज्ञवेत्ते म्हणजे सांगितलेले त्या त्या यज्ञाचें अनुष्ठान करणारे आणि यज्ञें करून नाश पावलें आहे कल्मष म्हणजे पाप ज्यांचें असे सांगितलेले सर्वही यज्ञ पापक्षय करणारे आहेत. साक्षात् मोक्षास साधन नाहींत असें तात्पर्य. ॥३०॥

**यज्ञशिष्टामृतभुजो यांति ब्रह्म सनातनम् ॥ नायंलोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥३१॥**

या सांगितलेले यज्ञांतून कोणताही यज्ञ जे करीत नाहींत त्यां विषयीं सांगतात. पंचमहा यज्ञादिकें करून अवशिष्ट राहिलेले काळांत किंवा अवशिष्ट राहिलेलें जें अमृत रूप अन्न त्याप्रत भक्षण करणारे जे तेही चित्तशुद्धीचे-द्वारा सनातन जें ब्रह्म त्याप्रत पावतात. म्हणजे मुक्त होतात. पूर्वोक्त द्वादशयज्ञांतून कोणतेही यज्ञाचें अनुष्ठान जो करीत नाहीं त्यास अयज्ञ म्हणावें त्या-अयज्ञास ज्यांत अल्प सुख आहे असा हाही मनुष्य लोक नाहीं. मग हे कुरुश्रेष्ठा-अर्जुना, अन्य म्हणजे स्वर्गलोक किंवा मोक्ष स्वरूप ब्रह्मलोक कोठून होईल. ॥३१

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ॥ कर्मजान् विद्धि तान् सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२**

ज्ञान यज्ञाची स्तुति करण्या करितां सांगितलेले यज्ञ सांगण्याची समाप्ति करतात. या प्रमाणें बहुत प्रकारचे यज्ञ ब्रह्म म्हणजे वेद त्याचे मुखाचे ठायीं वितत आहेत म्हणजे वेदाचे द्वारानें गुरूनीं उपदेश द्वारा विस्तृत केलेले आहेत. ते सर्व कायिक, वाचिक, मानसिक, जीं कर्में त्यां पासून उत्पन्न होणारे आहेत. नैष्कर्म्यरूप नाहींत, असें समज म्हणजे तत्त्वज्ञान द्वारा या अशुभ संसारा पासून मुक्त होशील. ॥३२॥

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ॥ स-र्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥**

त्या साठीं हे सर्व यज्ञ सांगितले त्या ज्ञान यज्ञाची स्तुति करतात. द्रव्य म्हणजे बाह्याभ्यंतर जें देहेंद्रिय मन आदि करून त्या पासून साध्य म्हणजे त्यांचे व्यापारा पासून होणारा अशा द्रव्यमय यज्ञा पेक्षां जें ज्ञान झालें म्हणजे काया, वाणी, मन यांचे प्रवृत्तीचा उपरम होतो तद्रूप ज्ञान यज्ञ श्रेयान् म्हणजे फार श्रेष्ठ किंवा प्रशस्त आहे. श्रेयः असें न म्हणतां श्रेयान् असें म्हटलें यावरून द्रव्यमय यज्ञ प्रशस्त आहेत परंतु हा ज्ञान यज्ञ फार प्रशस्त आहे असें सूचविलें. अखंड ब्रह्माकार मनोवृत्तिरूप ज्ञान ही मनाचे व्यापारा पासूनच उत्पन्न झालें आहे अशी येथें शंका होते परंतु केवल इतर यज्ञा प्रमाणें जडस्वरूप मनोवृत्ति मात्र ज्ञान नव्हे त्या वृत्तीचे ठायीं अभिव्यक्त म्हणजे प्रतिबिंबित झालेलें ब्रह्मचैतन्यच मुख्य ज्ञान आहे. त्याचे संबंधानें वृत्तीवर ज्ञान असा व्यवहार होतो तो गौण आहे. तें ब्रह्मरूप ज्ञान वृत्तींत अभिव्यक्त मात्र होतें तें कोणा पासून उत्पन्न होत नाहीं तें नित्य आहे, वृत्ति उत्पन्न झाली म्हणजे ज्ञान उत्पन्न झालें. वृत्ति नष्ट झाली म्हणजे ज्ञान नष्ट झालें असा जो व्यवहार होतो तो गौणच आहे यास्तव ज्ञानमय यज्ञास द्रव्यमय यज्ञा पेक्षां श्रेष्ठत्व आहे. या विषयीं हेतु सांगतात. हे शत्रूंस ताप देणाऱ्या अर्जुना, फलासहित सर्व कर्म ज्ञानाचे ठायीं समाप्यते म्हणजे लीन होतें किंवा अद्वितीयानंदानुभवरूप ज्ञान फलांत सर्व कर्मांचे फलाचा समावेश होतो ३३

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ॥ उप-देक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्वदर्शिनः ॥ ३४ ॥**

तें ज्ञान प्राप्त होण्यास साधनें सांगतात. जे ब्रह्मात्मा परोक्ष ज्ञानी आहेत त्यांस दंडवत् नमस्कार करावा. आणि त्यांची भक्तीनें सेवा करावी. नंतर हा संसार मला कोठून प्राप्त झाला आणि याची निवृत्ति कशी होईल आणि मी कोण आहें असा आत्मस्वरूपाविषयीं प्रश्न करावा म्हणजे ते तत्व ज्ञानी तुला महावाक्यादिकें करून ब्रह्मात्म ज्ञानाचा उपदेश करतील. येणें करून भगवान् कृष्ण ज्ञान सांगत असतां ही आणि ज्ञानोपदेश करण्यास समर्थ असतां ही आत्म स्वरूपाचे विज्ञाना साठीं म्हणजे ब्रह्मत्वें करून आत्मा परोक्ष ज्ञानासाठीं मुमुक्षूनीं समित्पाणि ( कृतांजलि ) होऊन श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ जो ब्राह्मण त्या पाशीं ज्ञानोपदेशार्थ जावें, असा जो श्रुतींत विधि आहे त्यास गुरूपसत्ति म्हणतात. ती अवश्य केली पाहिजे असें सूचविलें. ॥ ३४ ॥

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ॥
येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५**

ज्ञानाचें फल सांगतात. त्या तत्ववेत्त्या ब्राह्मणानीं उपदेशिलेल्या अद्वितीय, अखंड आणि सच्चिदानंद रूप अशा ब्रह्मात्मत्व स्वात्मतें करून अनुभवात्मक ज्ञानानें जाणलें म्हणजे हे पंडुपुत्रा अर्जुना, तूं आतां सारखा पुनः मोह पावणार नाहींस आणि त्या ज्ञानानें ब्रह्मादि स्तंब तृण पर्यंत सर्व भूतांस आत्मनि म्हणजे देहेंद्रियादिक रूप उपाधि रहित जें महावाक्यांतील त्वंपदाचें लक्ष्य चिन्मात्र जीव स्वरूप त्याहून अनन्य म्हणजे अभिन्न जो महावाक्यांतील तत्पदाचा लक्ष्य माया आणि तन्मूलक जें तिचें कार्य भूत जगत्कारणत्वादिक उपाधि स्वरूप तेणें करून रहित जो चिन्मात्र स्वरूप मी परमेश्वर त्याचे ठायीं पहाशील. यास अंतर्यामी परमेश्वराचें स्वरूप सांगण्याचा आरंभ करून या अंतर्यामी परमेश्वराहून भिन्न द्रष्टा, श्रोता, विज्ञाता, मंता, जीव नाहीं अशा अर्थाची जीवेश्वर भेदाचा निषेध करणारी श्रुति प्रमाण आहे. सर्व भूतांस आत्मनि म्हणजे हीं माझे ठायींच आहेत. असें पहाशील. अथो म्हणजे आणि मयि म्हणजे मी जो वासुदेव याचे ठायीं च आहेत असें पहाशील. म्हणजे सर्वोपनिषदांत सांगितलेलें जें क्षेत्रज्ञ जो जीव आणि ईश्वर त्यांचें ऐक्य पहाशील. असा याचा अर्थ भाष्यांत केला आहे. ॥ ३५

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ॥
सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥**

जरी तूं सर्व पाप करणारांपेक्षां मोठा पाप करणारा असलास तरी मोक्षास प्रतिबंधक जो पुण्य पापरूप समुद्र त्यांत ज्ञान रूप नौकेनें तूं तरशील. ॥ ३६

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ॥ ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥**

जसा प्रदीप्त झालेला अग्नि काष्ठांस जाळून भस्म करतो त्या प्रमाणें ब्रह्मात्म साक्षात्कार रूप जें ज्ञान तद्रूप अग्नि संचित आणि क्रियमाण या कर्मांस जाळून भस्म करतो. प्रारब्ध कर्माचा क्षय भोगें करूनच शास्त्रांत सांगितला आहे. ३७

**नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ॥ तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ ३८ ॥**

ज्ञानासारखें पवित्र म्हणजे शुद्धि करणारें दुसरें तपयोग तीर्थादिक काहीं नाहीं तें ज्ञान समाधिरूप योगाभ्यासें करून किंवा निष्काम कर्मानुष्ठानेंकरून संसिद्ध म्हणजे ज्ञान प्राप्त होण्यास चित्तशुद्ध्यादिकरूप योग्यता पावलेला जो पुरुष तो बहुकालें करून पावतो. ॥ ३८ ॥

**श्रद्धावान् लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ॥**
**ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ३९**

ज्या साधनांनीं तें ज्ञान नियमानें प्राप्त होतें तीं साधनें सांगतात. जो श्रद्धालु असून तत्पर म्हणजे आत्मपरायण असतांही जितेंद्रिय असा जो तो ज्ञान पावतो आणि ज्ञान प्राप्त झाल्यानंतर लौकरच शांति म्हणजे विदेहकैवल्य पावतो. ॥ ३९ ॥

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ॥**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ४०**

अज्ञ ( आत्मज्ञानरहित ) अश्रद्दधान ( आस्तिक्यबुद्धि न ठेवणारा ) आणि संशयात्मा ( संशयी ) असा जो आहे तो नाश पावतो. परंतु जो अज्ञ आहे त्यास बोध करण्यास फार आयास लागत नाहीं जो श्रद्धारहित आहे त्यास बोध करण्यास फार आयास लागतो. जो संशयात्मा आहे त्यास बोध होणें असाध्यच आहे; कारण जे आपले मित्र सुहृत् आहेत त्यांवरही हे खरें सांगतात किंवा आपली प्रतारणा करतात असा ज्यास संशय आहे त्यास हा लोक नाहीं. आणि सर्वांस प्रमाण भूत जो वेद त्यावरही त्याच्या प्रामाण्याविषयीं त्यास संशय असल्यामुळें त्यास परलोक ही नाहीं. आणि सर्वदा संशयानें व्यापल्यामुळें त्यास सुख ही नाहीं यासाठीं संशय धरूं नये. ॥ ४० ॥

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ॥**
**आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ॥ ४१ ॥**

आणि योग म्हणजे " कर्मण्यकर्मयः पश्येत् " येणें करून जो ज्ञानरूप योग सांगितला तेणें करून फलद्वारा किंवा स्वरूपतः संन्यस्त म्हणजे टाकिलीं आहेत कर्में ज्यानें म्हणजे कर्मांचा किंवा फलांचा त्याग करणारा असा आणि आत्मा देहच किंवा देहाहून भिन्न असला तरी विभु म्हणजे महत् परिमाणाचा व्यापक किंवा अल्प परिमाणाचा, विभु असला तरी कर्ता भोक्ता किंवा अकर्ता, अभोक्ता, अकर्ता अभोक्ता असला तरी एक किंवा प्रति शरीरीं भिन्न भिन्न किंवा एक-

असला तरी सगुण किंवा निर्गुण इत्यादिक संशय ज्याचे त्या उत्तम ब्रह्मात्म ज्ञानानें छिन्न म्हणजे नाश पावले आहेत असा जो आत्मवान् म्हणजे शमदमादि साधन युक्त त्यास हे धनंजया अर्जुना, कर्मे बद्ध करीत नाहींत. ॥४१॥

**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ॥ छित्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥ ॥ ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥ ॥ श्रीकृ० ॥**

तस्मात् अज्ञाना पासून उत्पन्न झालेला हृत्स्थ म्हणजे बुद्धींतील संशय ब्रह्मात्म ज्ञान रूप खड्गानें छेदून मोक्ष साधन जें सर्वांहून उत्तम ब्रह्मात्मापरोक्ष ज्ञान त्यास साधन जें निष्काम कर्म तें कर आणि युद्धार्थ ऊठ. ॥ ४२ ॥ -

इतिश्री मद्भगवद्गीतायां रघुनाथ शास्त्रि कृत भाषाविवृत्तौ चतुर्थोऽध्यायः समाप्तः ॥ ॥ श्री कृष्णार्पणमस्तु. ॥ ॥ ॥ ॥

## अध्याय ५ वा.

**अर्जुनउवाच ॥ ॥ संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ॥ यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥ ॥ ॥**

तृतीयाध्यायीं "लोकेस्मिन् द्विविधा निष्ठा" येणें करून एकच ब्रह्मनिष्ठा अधिकारी भेदानें ज्ञाननिष्ठा आणि कर्मनिष्ठा या प्रकारानीं दोन प्रकारची असें सांगण्यास आरंभ करून "न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोश्नुते" येणें करून कर्मनिष्ठा ज्ञाननिष्ठेस अंग म्हणजे साधन आहे असें "कर्मण्येवाधिकारस्ते" इत्यादिकें करून सांगितलें. चतुर्थाध्यायीं ज्यांस अपरोक्ष ब्रह्मात्मतत्त्वाचें ज्ञान झालें त्यानीं केलेलें कर्म ज्ञानानें आत्म्यास अकर्तृत्व आल्यानें अकृतच होतें यास्तव त्यानीं व्यर्थ लौकिक व्यापारात्मक चेष्टेप्रमाणें कर्म करावें किंवा संन्यास करावा असें त्या विषयीं अनास्थेनें सांगितलें. आतां पुढें पंचम आणि षष्ठ या अध्यायानीं, अज्ञानी असून जो ज्ञानार्थी आहे त्यानें वैराग्य उत्पन्न होण्या पूर्वी चित्त-

शुद्धि साठीं कर्मच करावें. वैराग्य उत्पन्न झालें म्हणजे वेदांतविचारें करून ज्ञान उत्पन्न होण्यास प्रतिबंधक कर्मांचा विक्षेप न व्हावा यासाठीं कर्म संन्यास करून ज्ञान योगाचें अनुष्ठान करावें असें सांगतात. त्यांत चतुर्थाध्यायीं "त्यक्तसर्वपरिग्रहः" येणें करून संन्यास सांगितला आणि "छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत" येणें करून कर्मकर असें सांगितलें हें परस्पर विरुद्ध आहे. याचें अनुष्ठान एक कालीं मी एकट्यानें करण्यास बसणें आणि उठणें या दोन क्रियांचें एककालीं अनुष्ठान एक पुरुषानें करण्यास जसें दुर्घट आहे त्या प्रमाणें दुर्घट आहे असें मनांत आणून अर्जुन प्रश्न करतो. हे पापाचें कर्षण म्हणजे नाश करणाऱ्या कृष्णा, ज्ञानार्थी जो मी यास कर्मांचा संन्यास आणि योग म्हणजे कर्म या दोहोंप्रत करण्यास पुनः सांगतोस हें कसें? दोहोंचें विरुद्ध अनुष्ठान आतांच मला सांगतोस असें नाहीं तर वेद कर्ता जो तूं यानें वेदांत ही पूर्वी हा ब्रह्मस्वरूप जो संन्याशांस प्राप्त होण्याचा लोक त्याची इच्छा करणारे जे ते प्रव्रज्या म्हणजे संन्यास करतात. त्यांत सार नाहीं अशा संसारास पाहून सार कोणतें तें पाहावें या इच्छेनें मोठे वैराग्याचा आश्रय ज्यांनीं केला आहे असे जे विरक्त ते विवाह न करतांच संन्यास करतात. ब्राह्मण, वेदाचें अनुप्रवचन म्हणजे अध्ययन तसाच यज्ञ, तप, दान, इत्यादि कर्मांनीं यावर ब्रह्मरूपाचें ज्ञान व्हावें अशी इच्छा करतात. म्हणजे ज्ञानेच्छा होण्यासाठीं कर्मांचें अनुष्ठान करतात. अशा अर्थाच्या श्रुतींनीं परस्पर विरुद्ध संन्यास आणि कर्म हें तूं सांगितलें आहेस असें पुनः या पदानें सुचविलें. वेदोक्त दोन्ही आहेत तेव्हां दोन्ही प्रशस्त जरी आहेत तथापि या दोहोंत जें मला कल्याणकारक फार प्रशस्त असेल तें एक मला हें चांगलें किंवा हें चांगलें असा संशय न येण्या जोगें निश्चय युक्त सांग. ॥१॥

**श्रीभगवानुवाच॥ ॥संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ॥ तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते॥ २॥ ॥ ॥ ॥**

अर्जुनानें केलेले प्रश्नाचें सर्वज्ञ भगवान् कृष्ण उत्तर सांगतात. संन्यास आणि कर्मयोग हे ज्ञानोत्पत्तीस साधन आहेत यामुळें दोन्ही हीं निश्रेयस म्हणजे उत्तम कल्याण करणारेच आहेत तथापि त्यांमध्यें कर्मसंन्यासापेक्षां कर्म योग श्रेष्ठ आहे. तात्पर्य — चतुर्थाध्यायाचे शेवटीं जो मी "आतिष्ठोत्तिष्ठ भारत" येणें करून तुला कर्म योग सांगितला तो देहादिकांहून आत्मा भिन्न आहे, देह आत्मा नव्हे असें आत्मानात्म विवेक ज्ञान उत्पन्न होऊन ज्यास संसारा विषयीं किंवा देहादिकां विषयीं वैराग्य उत्पन्न झालें आहे असा जो ज्ञानयोगाचा अधिकारी त्या विषयीं सांगितला नाहीं. देहादिकच आत्मा आहे. हा उत्पन्न होतो नाश पावतो असा जो तूं किं-

वा तुझे सारखा दुसरा कोणी अविवेकी त्यास देहात्म बुद्धीनें झालेला किंवा होणा-
रा जो बंधु आदिकांचे नाशामुळें शोक मोह त्यामुळें झालेला जो पूर्वोक्त संशय त्या-
चा ज्ञानरूप खड्गानें नाश व्हावया साठीं कर्मानुष्ठानें करून चित्त शद्धीचे द्वारा आत्मा
नात्म विवेक उत्पन्न होऊन वैराग्य व्हावें यासाठीं कर्म कर असें सांगितलें. कर्मानुष्ठा-
नें करून चित्तशद्धि वैराग्यादिक साधनानें आत्म तत्त्व ज्ञान झाल्यानंतर त्या ज्ञाना-
चा परिपाक होऊन जीवन्मुक्ति सुखानुभव व्हावा या साठीं त्यास विक्षेप करणाऱ्या-
कर्मांचा संन्यास करावा. असें पूर्वीं सांगितलें या दोहों मध्यें संन्यास हा प्रधान आहे.
कर्मयोग अंग आहे. यामुळें कल्याणार्थ्यानें तो करावा किंवा हा करावा. असा विक-
ल्प होत नाहीं दोन्ही ही साधनें स्वतंत्रपणानें परस्परांची अपेक्षा न करतां सारखीं
असतीं तरच पूर्वोक्त विकल्प होतो. यास्तव ज्यास वैराग्यादिक नाहींत त्यास चित्त शु-
द्धीचे द्वारा ज्ञान प्राप्त होण्यास संन्यासा पेक्षां कर्मच प्रशस्त आहे, ज्यास चित्तशद्धि
द्वारा वैराग्यादिक प्राप्त होऊन आत्मतत्त्व ज्ञान झालें आहे त्यास ज्ञान परिपाक जी-
वन्मुक्ति सुखादिकार्थ कर्मा पेक्षां संन्यासच श्रेष्ठ आहे ॥ २॥

ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति॥
निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात् प्रमुच्यते ॥ ३॥
सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः॥
एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ४ ॥

हाच तात्पर्यार्थ कारण दाखवून स्पष्ट करून दाखवितात. प्रारब्ध कर्म-
वशें करून प्राप्त झालेल्या दुःखाचा जो द्वेष करीत नाहीं तसाच नष्ट झालेलें किंवा
भावि म्हणजे पुढें होणाऱ्या सुखाची किंवा कर्म फलाची जो इच्छा करीत नाहीं -
असा जो वैराग्यशील तो केवल ईश्वर प्रीत्यर्थ निष्काम कर्मानुष्ठान कालीं ही सं-
न्यासीच आहे असें जाणण्यास योग्य आहे. येणें करून ज्ञानास साधन जें सां-
ख्य आणि योग यांस रागद्वेषादिकें करून रहितत्व रूप साम्य सांगितलें फलें क-
रून साम्य पुढें सांगतील. चित्ताचा स्वभाव विषयांकडे जाण्याचाच आहे या कार-
णामुळें दृढ वैराग्य न होतां संन्यास केल्यानंतर विषयाभिलाष रूप रागादिक झा-
लेतर संन्यासी पतनच पावेल अशी संभावना आहे, रागद्वेषरहित असून कर्म-
करणाऱ्यास ती संभावना नाहीं या तात्पर्यानें संन्यासा पेक्षां कर्मयोग श्रेष्ठ आहे.
असें पूर्वीं सांगितलें तथापि निर्द्वंद्व म्हणजे सत्य जो अद्वितीय आत्मा आणि अ-
नृत म्हणजे मिथ्याभूत देहेंद्रियादिक त्यांचे परस्पर तादात्म्याभिमान रूप जें मि-
थुन तद्रहित तो निर्द्वंद्व म्हणजे वेदांत श्रवणादिकें करून सत्य आत्मा अनृत दे-
हादिकाहून भिन्न आहे असा विवेक करणारा तो रागद्वेषास उत्पन्न करणारें जें अ-

ज्ञान किंवा त्या पासून झालेलें देहात्मादि ज्ञान त्यांच्या विवेकरूप ज्ञानानें नाश झाल्या मुळें सुखें करून म्हणजे कर्म करण्याच्या आयासा वांचून केवल ज्ञानें करूनच बंधा पासून मुक्त होतो. त्यास कर्म करण्याची अपेक्षा नाहीं अथवा मिथुना पासून उत्पन्न होतो अशा अर्थाच्या श्रुतीचे प्रमाणावरून द्वंद्व म्हणजे स्त्रीपुरुषांचें मिथुन तद्रहित जो तो निर्द्वंद्व म्हणजे स्त्रीचा त्याग करणारा संन्यासी तो कुटुंब भरणादिकाचा आयास नसल्या मुळें सुखें करून बंधापासून मुक्त होतो असा ही कोणी अर्थ करतात यांचे त्याच्या पक्षीं पुढील श्लोकांतील सांख्य शब्दाचा जरी मुख्यार्थ- ज्ञाननिष्ठा आहे तथापि लक्षणें करून ज्ञाननिष्ठेस अंग म्हणजे वेदांत- श्रवणादि द्वारा साधन भूत संन्यास असा अर्थ करावा लागेल. संन्यास पक्षीं पूर्वोक्त रीतीनें पतन संभावना आहे, कर्मयोग पक्षीं अनुष्ठानाचा आयास आहे तेव्हां- दोहोंतून प्रशस्त तर श्रेयस्कर कोण अशी पुनः जिज्ञासा होईलच अशी शंका येईल तर त्या विषयीं फलें करून दोघांचें साम्यच आहे असें सांगतात. साधन भूत आणि फल भूत असे दोन प्रकारचे सांख्य आणि योग आहेत. वेदांत श्रवण द्वारा ब्रह्मात्म साक्षात्कारात्मक अंतःकरण वृत्ति रूप आत्म तत्त्व ज्ञानास साधनभूत जो कर्मसंन्यास त्यास साधन भूत योग म्हणावें चित्त शुद्धीचे द्वारा आत्म तत्त्व ज्ञानास केवल ईश्वरा र्‍हे शें करून निष्काम संध्यावंदन अग्निहोत्रादि कर्मानुष्ठान करणें यास साधन भूत योग म्हणावें. संदर्शनेकीभावे- असें सांख्य शब्दाचा अर्थ करतेवेळेस यास्कानीं (सूत्रकारादिकांनीं) सांगितलें आहे यावरून सम्यक् म्हणजे आत्म स्वरूपाहून अभिन्नत्वें करून ख्यायते म्हणजे प्रकाशित होतें परमार्थतः सच्चिदानंदात्मक ब्रह्म वस्तु जीणें करून ती संख्या म्हणजे स्थूल सूक्ष्म कारण प्रपंचाचा अद्वैत ब्रह्मात्म्याचेच ठायीं प्रविलाप करून म्हणजे आत्म्याचे अज्ञानानें आत्म्याचे ठायीं कल्पिलेल्या पूर्वोक्त सर्व प्रपंचाची भ्रमाधिष्ठान भूत आत्म स्वरूपा पेक्षां निराळी तात्त्विक सत्ता नाहीं. सर्वप्रपंच मिथ्याच आहे अशा निश्चयानें वेदांत श्रवणादिकें- करून झालेली जी अखंड ब्रह्मात्मा परोक्ष रूप अंतःकरण वृत्ति तीस वेदांत श्रवण द्वारा साधन जो संन्यास तो सांख्य- अशा सांख्य शब्दाचे विग्रहानें संन्यास हा- सांख्य शब्दाचा अर्थ होतो. हे साधन भूत जे सांख्य आणि योग त्यांचें रागद्वेष रहितत्वानें साम्य म्हणजे एकत्वच आहे असें पूर्वी सांगितलें. याजन्मीं किंवा जन्मांतरीं अनुष्ठान केलेले निष्काम कर्मांनीं चित्तशुद्धि झाल्या मुळें विक्षेप करणाऱ्या कर्मांचा- त्याग रूप संन्यास करून वेदांत श्रवणादिकानें झालेल्या पूर्वोक्त ब्रह्माकार अंतःकरण वृत्तीस फल भूत सांख्य असें म्हणावें. प्रमाण वृत्ति, विपर्यय वृत्ति, विकल्प वृत्ति, निद्रा वृत्ति आणि स्मृति अशा पांच अंतःकरण वृत्ति आहेत. त्यांचा पूर्वोक्त यमनियमादिक अष्टांग साधनानीं जो निरोध म्हणजे आत्म स्वरूपाचे ठायीं लय योगशा-

त्यांत सांगितला आहे हा मुख्य ( फल रूप योग ) आहे. जसें तडागादिकांतील उदक पन्हाळीचे द्वारानें तडागादिकाचे पुढें केलेलें जें चतुष्कोन वर्तुल त्रिकोणादिक क्षेत्र त्यांत जाऊन त्या क्षेत्राचे आकारा प्रमाणें होतें तसें तैजस अंतःकरण प्रत्यक्ष म्हणजे इंद्रियें आणि अनुमान शब्दादिक जीं प्रमाणें म्हणजे ज्ञानाला उत्पन्न करणारीं साधनें आहेत त्यांचे द्वारा विषयांवर जाऊन तदाकारच होतें. त्या आकारास प्रमाण वृत्ति म्हणावें किंवा यथार्थ ज्ञान म्हणावें. शक्तिकादिकांवर हें रजत म्हणजे रुपें असें जें भ्रांति ज्ञान होतें त्यास विपर्यय वृत्ति म्हणावें. पुढें एक उंच पदार्थ पाहून त्याचा जो विशेष म्हणजे हस्तपादादिक अवयव किंवा शाखामुळें याचा निश्चय झाल्यानें हा स्थाणु म्हणजे वृक्ष आहे किंवा पुरुष आहे. असें जें संशयात्मक ज्ञान त्यासही विपर्ययच म्हणावें शश ( सशाचें ) शृंग, वंध्यापुत्र, असा शब्द ऐकिल्यानें जो पदार्थ नाहीं असा निश्चय असला तरी त्याचें जें ज्ञान होतें त्यास विकल्प असें म्हणावें. हें ज्ञान नाहींतर शब्द प्रयोग बोलणारा करणार नाहीं. कारण शब्द प्रयोगाला अर्थ ज्ञान पाहिजे आणि तूं वंध्यापुत्र आहेस असें ऐकून श्रोत्यांस जो क्रोध येतो तो येणार नाहीं. यास्तव त्या शब्दा पासून असें ज्ञान होतें असें म्हटलें पाहिजे परंतु त्यांतील अर्थ बाधित म्हणजे हा नाहीं असा निश्चित असतो. पूर्वोक्त ज्या प्रमाणादि वृत्ति त्यांच्या अभावास हेतुभूत असें जें तम तदाकार जो वृत्ति तीस निद्रा म्हणावें. ती निद्रारूप वृत्ति निद्रे पासून उठलेल्याच्या मी एवढा वेळ मूढ होऊन निजलों होतों, कांहींजाणत नव्हतों. अशा स्मृती वरून आहे असें म्हटलें पाहिजे. स्मृति लोकांत प्रसिद्धच आहे. या फलभूत सांख्य आणि योगाचें एकच फल आहे असें फलतः साम्य म्हणजे एकत्व असतां हे सांख्य आणि योग मोक्ष होण्यास परस्परांची अपेक्षा न करतां स्वतंत्र पणानें साधन आहे असें बाल म्हणजे अज्ञानी बोलतात. पंडित म्हणजे यांचा पूर्वोक्त विवेक जाणणारे बोलत नाहींत. या विषयीं हेतु सांगतात. या दोघांतून एकाचाही आश्रय करणारा किंवा उत्तम अनुष्ठान करणारा आहे तो दोघांचे ही निर्विकल्पक सच्चिदानंदा द्वितीय ब्रह्मात्म रूपानें स्थितिरूप मोक्ष फलास पावतो. ॥ ३ ॥ ४ ॥

**यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ॥**
**एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५**

तेंच स्पष्ट करून दाखवितात. सांख्य ज्या मोक्ष पदाला पावतात त्याच पदास योगीही पावतात. योग ज्यास आहे तो योग असा-अर्शादिभ्यश्च अच् प्रत्यय करावा ह्मणजे सांख्य आणि योग या शब्दांचा ज्ञानी आणि योगी असा अर्थ होतो. या प्रमाणें स्वरूपें करून आणि फलें करून पूर्वोक्त सादृश्यानें सांख्य आणि योग एकच म्हणजे मोक्षरूप एकाच फलास साधन आहेत असें जो जाणतो तोच

ज्ञाना असें म्हणावें. ॥ ५ ॥

**संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ॥**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६**

सांख्यांस आणि योग्यांस मोक्ष साधनत्व जें सांगितलें तें परस्परांची अपेक्षा करून आहे किंवा अपेक्षा न करून आहे. पहिले पक्षीं सर्व मोक्षार्थ्यांस संन्यास केला पाहिजे असें होतें. असें असेल तर प्रथमच सर्वांनीं संन्यास करावा. दुसरे पक्षीं एकाच मोक्ष प्राप्तीस सांख्य आणि योग हे परस्पर निरपेक्ष दोन्हीं समान मार्ग आहेत असें होतें भग समान मार्ग आहेत असें अज्ञानी बोलतात. असें कसें म्हटलें आणि जर समान मार्ग आहेत तर आत्मज्ञानानेंच मोक्ष पावतो. ज्ञानावांचून दुसरा मार्ग मोक्षास नाहीं अशा अर्थाच्या श्रुतीशीं विरोध येईल अशी शंका होईल तर त्या विषयीं सांगतात. हे महाबाहो अर्जुना, संन्यास म्हणजे कर्म संन्यास किंवा सर्व द्वैत प्रपंचाचा उत्तम प्रकारें करून न्यास म्हणजे वेदांत श्रवणादिकानें मिथ्यात्व-बुद्धि होऊन अद्वैत ब्रह्मात्म साक्षात्कार रूपांतःकरण वृत्तिरूप आत्मतत्त्व ज्ञान ज्यास नैष्कर्म्य ( कर्माभाव ) ही म्हणतात. तो अयोगतः म्हणजे पूर्वोक्त साधन भूत आणि फल भूत योगाचे अनुष्ठाना वांचून प्राप्त होण्यास दुःख म्हणजे अशक्य आहे. तात्पर्य- ज्ञाननिष्ठा प्राप्त होऊन जीवन्मुक्ति सुखार्थ किंवा श्रवणादि द्वारा ज्ञाननिष्ठा प्राप्त होण्या साठीं जो संन्यास करावयाचा तो क्रमानें विद्वत्संन्यास किंवा विविदिषा म्हणजे जाणणारा संन्यास, कर्म योगानें चित्तशुद्धि व्हावयाचीती कर्मयोग न केल्यानें नझाली तर ज्ञाननिष्ठाच प्राप्त होत नाहीं यामुळें व्यर्थच आहे. यास्तव चित्तशुद्धी साठीं प्रथम साधनभूत कर्मयोगच केला पाहिजे कर्मयोग करणारा चित्तशुद्धीचे द्वारा ज्ञान निष्ठेला पावून लौकरच संन्यासानें जीवन्मुक्तिरूप ब्रह्मात्मा नंदात्मक सुख अनुभवितो, यास्तव जो अशुद्ध चित्त आहे त्यानें चित्त शुद्धि होण्या पूर्वीं संन्यास न करतां कर्मयोगच केला पाहिजे, पूर्वोक्त निर्विकल्पक समाधिरूप जो चित्तवृत्ति निरोध स्वरूप फलभूत योग तोही वेदांताचे श्रवणें करून महावाक्या पासून जो मोक्ष साधन ब्रह्मात्म साक्षात्कार व्हावयाचा त्यास साधनच आहे. यास्तव तोही तत्त्व ज्ञानाचे द्वारानेंच मोक्ष साधन आहे, स्वतंत्र साधन नाहीं यामुळें पूर्वोक्त श्रुतीशीं विरोधही नाहीं. शांत ( बाह्येंद्रियांचा निग्रह करणारा ), दांत ( मनाचा निग्रह करणारा ), उपरत ( वैराग्यशील किंवा संन्यासी ), तितिक्षु ( शीतोष्णादिक द्वंद्वांचें सहन करणारा ) असा जो अधिकारी तो समाहित म्हणजे पूर्वोक्त निर्विकल्पक समाधिस्थ होऊन नंतर मनाचे ठायींच आत्म्याप्रत पावतो म्हणजे अद्वितीय ब्रह्मात्म साक्षात्कार रूप मनोवृत्ति स्वरूप तत्त्वज्ञान वान् होतो अशा अर्थाच्या श्रुतींत पूर्वोक्त

फलभूत समाधिरूप योगास तत्त्व साक्षात्काराचें साधनत्व सांगितलें आहे. त्याचें तात्पर्य असें आहे कीं,– ब्रह्म सच्चिदानंदरूप आहे असें श्रुतींनीं सांगितलें आहे, तें ब्रह्म जीवाचें स्वरूपच आहे असें वेदांतांतील महावाक्यांनीं गुरूपासून श्रवण करून जन्मांतरीय पुण्य परिपाकानें चित्तशुद्ध होऊन ज्याचे अंतःकरणांतील सर्व असंभावना आणि विपरीत भावना गेल्या आहेत त्यास महावाक्याचे एकवार उपदेशानेंच ब्रह्मात्म साक्षात्कार होतो. प्रतिबंधक पापादिकामुळें त्याच्या असंभावना आणि विपरीत भावना गेल्या नाहींत त्यास महावाक्यापासून प्रथम परोक्षच ब्रह्मात्म तत्त्वज्ञान होतें, तें प्रस्तावनेंत सांगितलें. स्वरूपाचे एकवार श्रवणानें किंवा श्रवणाचे आवृत्तीनें होतें. नंतर प्रस्तावनेंत जीं मनन निदिध्यासनांचीं स्वरूपें संक्षेपानें सांगितलीं आहेत त्यांचें एकवार किंवा वारंवार अनुष्ठानानें असंभावना आणि विपरीत भावना जाऊन त्या श्रवण मनन निदिध्यासनाचे साधनानें महावाक्यापासून ब्रह्मात्मा परोक्षज्ञान होतें. या श्रवण, मनन, निदिध्यासनादिकांचे अनुष्ठानानें बुद्धीचे मंदत्वामुळें किंवा उपदेश करणाऱ्या गुरूचें निरंतर सान्निध्य नसल्यामुळें ब्रह्मात्म तत्त्व साक्षात्कार होण्यास जे असमर्थ आहेत त्यांस त्यांची कर्मानुष्ठानानें चित्तशुद्धि झाल्यानंतर गुरुशास्त्रांवर श्रद्धा उत्पन्न होऊन गुरूपासून ब्रह्म सच्चिदानंद अद्वितीय स्वरूप आहे असें परोक्षत्वें करून जाणून नंतर गुरूनें सांगितल्या मार्गानें तें ब्रह्म मीच आहें, अशी जी अंतःकरण वृत्तीचा निरंतर तदाकार प्रवाहरूप उपासना तिचें अभ्यासरूप अनुष्ठानानें ती उपासना परिपक्व झाली म्हणजे पूर्वोक्त यमादिक साधनानीं हळू हळू निर्विकल्प आत्म्या विषयींचा समाधि होतो नंतर त्या समाधींत किंवा समाधीनीं अखंड सच्चिदानंदाद्वय आत्मस्वरूपाचा वारंवार अनुभव झाला म्हणजे जें सच्चिदानंदाद्वितीय स्वरूप ब्रह्माचें लक्षण श्रुतींत सांगितलें आहे तेंच आत्म्याचें स्वरूप समाधींत अनुभवास येतें यास्तव आत्मा ब्रह्मच असावा. आत्मस्वरूपाहून ब्रह्म निराळें नसावें अशी ब्रह्मात्मैक्याची संभावना होऊन नंतर गुरूपदिष्ट महावाक्यरूप प्रमाणावरून मोक्षसाधनभूत ब्रह्मात्मा परोक्षज्ञानरूप साक्षात्कार निर्विवाद होतो. याच तात्पर्यानें कोणास योग असाध्य म्हणजे योग द्वारा तत्त्व निश्चय असाध्य आहे. कोणास श्रवण, मनन, निदिध्यासन द्वारा तत्त्व निश्चय असाध्य आहे. यास्तव हे सांख्य योगरूप दोन मार्ग अधिकारी भेदानें परमेश्वरानें सांगितले असे वासिष्ठ रामायणांत रामास वसिष्ठानीं सांगितलें आहे. ब्रह्म तत्त्वाच्या उपासनेनें निर्विकल्पक समाधि होऊन त्याचे सहायानें अपरोक्ष (समक्ष) ब्रह्मात्म तत्त्वज्ञान होऊन मोक्ष होतो. असें आहे तर ती उपासना सर्व वेदांतील एकच आहे यास्तव सर्व वेदांत उपासना प्रकरणीं जेथें जेथें जे जे विधेय म्हणजे भावरूप गुण आणि निषेध्य म्हणजे अभावरूप गुण ब्रह्माचे सां-

गितले आहेत. त्या सर्व गुणांचा उपसंहार म्हणजे ते सर्व गुण उपासनेंत आणून विज्ञान, आनंद, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सत्य, निरंजन, विभु, एक, प्रत्यक् म्हणजे अंतरात्म स्वरूप असे जे भावरूप ज्ञानानंदादि गुण तसेच जे स्थूल नव्हे, अणु नव्हे, ऱ्हस्व नव्हे, दीर्घ नव्हे, आणि जे अदृश्य, अग्राह्य, अशब्द, अस्पर्श, अरूप आणि अव्यय म्हणजे नाशरहित असे जे अस्थूलत्वादिक अभावरूप गुण त्यानीं जे बोधित म्हणजे व्यवहार दृष्टीनें हे पृथक् गुण भासले तरी ते गुण परमार्थ दृष्टीनें त्याहून निराळे सत्तेनें नाहींत असें जें ब्रह्म तेंच मी आहें अशी उपासना करावी असें वेदव्यासानीं ब्रह्म सूत्रांत तृतीयाध्यायीं सांगितली आहे आणि महावाक्यापासून होणाऱ्या ब्रह्मात्म तत्त्व ज्ञानाचा ही मी ब्रह्म आहें असाच आकार आहे तेव्हां तत्त्व बोध आणि ब्रह्म तत्त्वोपासना यांचा स्वरूपतः भेद नाहीं आणि तत्त्व ज्ञानानें ब्रह्मात्म भावरूप मोक्ष व्हावयाचा तें फल उपासनेचे दृढत्वानें आत्म्यास ब्रह्मत्व भास होईल. तेव्हां फल रूपानें ही भेद नाहीं तेव्हां उपासने नंतर समाधि आणि त्याचे सहायानें महावाक्या पासून तत्त्वबोध कशास पाहिजे जर उपासने पासूनच मोक्ष मानला तर तत्त्वज्ञाना वांचून मोक्ष साधन दुसरा मार्ग नाहीं अशा श्रुतीचा विरोध कसा जाईल अशी शंका करूं नये कारण तत्त्वबोध वस्तु तंत्र ( आधीन ) आहे म्हणजे परमार्थतः वस्तु जसें असेल तसेंच प्रमाणा पासून यथार्थ ज्ञान जें होतें तद्रूप बोध आहे आणि उपासना कर्तृ तंत्र ( कर्त्याच्या आधीन ) आहे म्हणजे मध्यें दुसरे पदार्थाकार वृत्तीचा प्रवेश न होतां उपास्य निर्गुण किंवा चतुर्भुज, चतुर्मुख, पंचमुख मूर्ति स्वरूपाकार अविच्छिन्न अंतःकरण वृत्ति प्रवाहरूप उपासना पुरुषांनीं आपले इच्छे प्रमाणें करण्यास किंवा न करण्यास किंवा अन्यथा म्हणजे एक मूर्तीची ज्या स्वरूपानें उपासना करावयाची तें स्वरूप सोडून दुसरें स्वरूपानें उपासना करण्यास शक्य आहे, बोध तसा नाहीं कारण बोधाची सामग्री मिळाली म्हणजे बोध मला न व्हावा अशी इच्छा असली तरी तो होण्यास राहणार नाहीं आणि प्रमाणा पासून बोध जो होईल तो जशी वस्तु असेल तसाच होईल आणि उपासना तर प्रयत्न साध्य आहे तेव्हां उपासना मला नको अशी इच्छा असली तर ती विषयीं उपासना मला असावी अशी इच्छा होणार नाहीं यास्तव उपासनेच्या इच्छेनें होणारा जो प्रयत्न तो न झाल्या मुळें होणार नाहीं असा उपासनेचा आणि बोधाच्या स्वरूपाचा भेद आहे आणि उपासना ही केवळ मनाचें वृत्तिरूप आहे. मन जसें चिंतन करील तशी वृत्ति होते यामुळें ती वृत्ति ज्ञान रूप जरी असली तरी तें यथार्थ ज्ञान नव्हे यामुळें तें अज्ञान निवृत्ति रूप कार्य करण्या विषयीं समर्थ होत नाहीं, जसें विधुर पुरुष निरंतर मनांत स्त्रीचें चिंतन करीत असतां चिंतनाचे अभ्यासानें त्याचे मनांत स्त्रीच्या मनो वृत्तीरूप साक्षात्कार जरी झाला तरी तो यथार्थ नव्हे यामुळें कार्य करण्यास समर्थ होत नाहीं. प्रमाणा पासून झालेलें जें मनो वृत्ति

रूप ज्ञान तेंच यथार्थ ज्ञान कार्यक्षम (कार्य करण्याविषयीं समर्थ) होतें. आणि उपासनेमुळें जें ब्रह्मत्व प्राप्त झालें तें जों पर्यंत उपासना आहे तों पर्यंतच राहतें. उपासना नाहींशी झाली म्हणजे नाहींसें होतें यास्तव उपासनेनें प्राप्त झालेला जो ब्रह्मभाव तो वास्तविक मोक्ष नव्हे. ज्ञानानें ब्रह्मस्वरूपता जीवास उत्पन्न होत नाहीं परंतु आपण ब्रह्मस्वरूप असतां ही अज्ञानानें आपले ब्रह्मस्वरूपाचें जें आवरण होऊन आपणास जीवत्व संसारित्वादिकाचा भ्रम झाला तो ज्ञानानें अज्ञान नाश पावून नाहींसा होतो आणि आपलें वास्तविक ब्रह्मस्वरूप प्रकाशित होतें यास्तव ज्ञानानें अभिव्यक्त म्हणजे जागृत केलेल्या आपले वास्तविक ब्रह्मस्वरूपाचा ज्ञान नाश झाला तरीं नाश होत नाहीं. उपासकालाही वास्तविक ब्रह्मता आहे असें म्हणाल तर जे मूढ किंवा पशुपक्षी यांस वास्तविक ब्रह्मता नाहीं कीं काय? त्यांस वास्तविक ब्रह्मता असली तरी ती विषयीं त्यांस अज्ञान आहे यामुळें ती त्यांच्या मोक्ष रूपस्वरूप पुरुषार्थास उपयोगी नाहीं असें म्हणाल तर अज्ञान नाशक ज्ञान न झालें तर उपासकांस ही अज्ञान आहेच तेव्हां त्यांची ही ती वास्तविक ब्रह्मता पुरुषार्थास उपयोगी नाहीं. जर मी ब्रह्म आहें असा उपासनात्मक ज्ञान भ्रम आहे तर तें भ्रमात्मक ज्ञान समाधीचे द्वारानें तरी वास्तविक मोक्षास साधन कसें होईल. अशी शंका करूं नये कारण उपासनात्मक ज्ञान जरी भ्रमरूप आहे तथापि तो संवादि भ्रम आहे विसंवादि भ्रम नव्हे ज्या भ्रमापासून इष्ट वस्तूचा लाभ होतो त्यास संवादि भ्रम असें म्हणावें आणि ज्यापासून इष्टवस्तूचा लाभ होत नाहीं त्यास विसंवादिभ्रम म्हणावें यास उदाहरण:-एके घरांत दीपाची प्रभा ज्यांतून बाहेर रत्नाकार वर्तुल पडावी असा पदार्थ दीपाचे आड ठेवून त्याचे आंतले प्रदेशीं दीप ठेविला त्याची प्रभा त्या आड ठेवलेले पदार्थाचे बाहेर वर्तुळ रत्नाकार पडली आहे तशीच दुसरे घरांत रत्नाची प्रभा ज्यांतून रत्नाचे आकाराप्रमाणें दीपाची प्रभा पडावी असा पदार्थ रत्नाचे आड ठेवून त्याचे आंतले प्रदेशीं रत्न ठेविलें त्याची प्रभा त्या आड ठेवलेले पदार्थाच्या बाहेर दीप प्रभेचे आकाराप्रमाणें पडली. त्या दोन्ही प्रभेला दुरून पाहून हे मणीच आहेत अशी बुद्धि होऊन एक पुरुष मण्याचे प्रभेकडे धांवला आणि एक पुरुष दीपाचे प्रभेकडे धांवला. त्या दोघांचीही त्या प्रभांवर हा मणि, हा मणि अशी बुद्धि म्हणजे ज्ञान भ्रमच आहे तथापि मणिप्रभेवर मण्याचे भ्रमानें जो तिकडे धांवत गेला त्यास मण्याचे जवळ गेल्यामुळें मण्यावर चक्षूंचा संबंध होऊन त्यापासून दुसरे यथार्थ चक्षूपासून मण्याचें ज्ञान होऊन मण्याचा लाभ होतो यास्तव तो त्याचा प्रथम भ्रम संवादी आहे, दीप प्रभेकडे जो मणि बुद्धीनें धांवला त्यास मण्याचा लाभ होत नाहीं यास्तव तो त्याचा विसंवादि भ्रम आहे, तसेंच कोणी एका प्रदेशीं धूमाप्रमाणें धुकें होतें त्यावर हा धूम (धूर) आहे असें भ्रमात्मक ज्ञान होऊन त्यापासून येथें अग्नि आहे असें आनुमानिक ज्ञान होऊन अ-

ग्नि बुद्धीनें तेथें गेल्यावर यदृच्छेंकरून तेथें अग्नि होता तो त्यास प्राप्त झाला. हें ही संवादि भ्रमाचें उदाहरण आहे. तसेंच गोदावरीचे उदकावर हें भागीरथीचें उदक-आहे असा भ्रम होऊन शरीर शुद्धी साठीं त्याचें प्रोक्षण केलें तर अपर्याप्त शुद्धि प्राप्त होते हें ही संवादि भ्रमाचें उदाहरण आहे. या प्रमाणें प्रत्यक्ष म्हणजे इंद्रिया पासून हो-णारे तसेंच अनुमाना पासून होणारे तसेंच शब्दा पासून होणारे जे संवादि भ्रम त्यां-चीं पुष्कळ उदाहरणें आहेत. त्या प्रमाणें मण्याच्या भ्रमाचे दृष्टांता प्रमाणें उपासना-त्मक संवादि भ्रमानें निर्विकल्पसमाधींत आत्म्याचे वास्तविक सच्चिदानंदात्मक स्व-रूपाचा साक्षात्कार होऊन पूर्वोक्तरीतीनें महावाक्या पासून ब्रह्मात्मा परोक्ष ज्ञानरू-प यथार्थ बोध होऊन मोक्ष प्राप्ति रूप इष्ट फल प्राप्त होतें असें म्हटल्यानें कांहीं वि-रोध नाहीं. या प्रमाणें योगयुक्त जो मुनि म्हणजे पूर्वोक्त संन्यासी तो नचिरेण म्हण-जे गुरु पासून महावाक्यार्थाचे श्रवणानेंच लौकर तत्त्वज्ञान होऊन ब्रह्मस्वरूप मो-क्ष पावतो. केवल संन्यासी मोक्ष पावत नाहीं याच तात्पर्यानें " नचसंन्यसनादेवसि-द्धिं समधिगच्छति " असें म्हटलें आहे. ॥ ६ ॥

## योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रि-यः ॥ सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्य-ते ॥ ७ ॥

कर्म योगानें चित्तशुद्धि होऊन ज्ञान प्राप्त झालें तरी ज्ञानोत्तर केलेल्या कर्मा-नें मोक्षास प्रतिबंध होईल अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात. योग म्हण-जे पूर्वोक्त चित्त वृत्ति निरोध रूप निर्विकल्पक समाधि तेणें करून युक्त अतएव वि-शुद्ध म्हणजे वृत्ति सारूप्य रूप दोष रहित आहे. असंग चैतन्य स्वरूप आत्मा ज्याचा असा अतएव जिंकिलीं आहेत आत्मा म्हणजे शरीर आणि इंद्रियें ज्यानें असा. तात्प-र्य- त्रिगुणात्मक अंतःकरणाच्या शांत, घोर, मूढ, अशा सत्त्व, रज, तमो गुणा पासून उत्पन्न झालेल्या सात्विक, राजस, आणि तामस अशा वृत्ति उत्पन्न होतात. वैराग्य, क्ष-मा, औदार्य या शांतवृत्ति. तृष्णा, स्नेह, राग, लोभ, इत्यादिक घोरवृत्ति. मोह, भय इत्या-दिक मूढवृत्ति. या वृत्तींचे ठायीं अंतःकरण समीपस्थ असंग आणि चैतन्य स्वरूप अ-शा आत्म्याचें प्रतिबिंब झालें म्हणजे स्फटिक मण्यास आरक्त, जास्वंदीच्या फुलाचें-सन्निधानानें जसें रक्त सादृश्य येऊन हा रक्त स्फटिक आहे अशा व्यवहारास जसा तो योग्य होतो किंवा मलिन दर्पणा मध्यें मुखाचें प्रतिबिंब झालें म्हणजे मुख मलिन आ-हे असा भ्रम होऊन शोक करण्यास जसें तें पात्र होतें तसें असंग चैतन्य रूप आत्म्या-स त्या वृत्तींचें सादृश्य प्राप्त होऊन जेव्हां समाधि नाहीं तेव्हां तो आत्मा त्या वृत्तींवरील

धर्मांचा आपणावर आरोप करून घेऊन मी शांत आहें, दुःखी आहें अशा व्यवहारास योग्य होतो. निर्विकल्पक समाधीनें सर्व वृत्तींचा निरोध होऊन त्या वृत्ति जेव्हां आहेत त्या काळीं वृत्तींचे धर्म आपलेवर पहाणारा जो आत्मा त्याची हा आत्मा विभु, उत्पत्ति रहित, जरा मरण रहित, आणि अभय आहे इत्यादिक जें श्रुतींत आत्म्याचें स्वरूप सांगितलें आहे त्या स्वरूपानें स्थिति असते असें योगशास्त्रांत सांगितलें आहे त्या प्रमाणें पूर्वोक्त विशुद्धात्मा येणें करून महावाक्यांतील त्वंपदाचा अर्थ सांगितला आतां त्याशीं महावाक्यांतील तत्पदार्थाचा अभेद सांगतात. कडीं, तोडे, कुंडलें इत्यादिकांचा आत्मा म्हणजे स्वरूप जसें त्याचें उपादान कारण सुवर्ण आहे त्या प्रमाणें सर्वभूतें ब्रह्मादि स्तंब पर्यंत चेतन आणि आकाशादिक जे अचेतन पदार्थ त्या सर्वांचा आत्मभूत म्हणजे कारणात्मक स्वरूप भूत किंवा त्यांहून भिन्न नव्हे असा आहे आत्मा म्हणजे देहेंद्रिय मनोबुद्धीचें साक्षी आणि प्रत्यक् म्हणजे अंतरात्म स्वरूप ज्याचें असा कार्याचें स्वरूप म्हणजे सत्ता उपादान कारणाहून भिन्न नाहीं. जसें घट, शराव (परळ), रांजण यांचें स्वरूप मृत्तिकेहून किंवा कडीं, तोडे, कुडक्या यांचें स्वरूप सुवर्णाहून निराळें नाहीं. तसा जो सर्वांचा प्रत्यगात्मा म्हणजे अंतरात्माच आहे यास्तव कर्म करीत असतां ही तो देहेंद्रिया दिकानीं केलेल्या कर्म कर्तृत्वा दिकाच्या अज्ञान दृष्टीनें त्यावर लोकांनीं व्यवहार करण्यास पात्र असतां ही आत्मा असंग देहेंद्रियादिकाहून निराळा त्यांचा साक्षी आहे असें आत्मतत्त्व ज्ञानानें त्याचें कर्तृत्व नाहीं असें समजलें असतां रज्जूवर अज्ञानानें भासलेला सर्प रज्जूचे यथार्थ ज्ञानानें हा सर्प नव्हे असें ज्ञान झालें म्हणजे जसा तो बाधक होत नाहीं तसा आत्मा त्या मिथ्या कर्म कर्तृत्वानें न लिप्यते म्हणजे बंध पावत नाहीं लोकदृष्ट्या त्यावर भासलेलें कर्म त्यास बाधा करीत नाहीं असें तात्पर्य.- सर्व जें ब्रह्मादिक चेतनाचेतन त्यांचा आत्मभूत म्हणजे अंतरात्म भूत आहे आत्मा म्हणजे स्वरूप ज्याचें असा सर्व भूतात्मभूतात्मा या पदाचा अर्थ करून जीवाचा आणि ईश्वराचा अभेद शब्दावरूनच सिद्ध होतो असें व्याख्यान यापदाचें कोणी करतात परंतु त्या व्याख्यानांत सर्वभूतात्मा म्हणजे सर्व जीं चेतना चेतन भूतें त्यांचा आत्मा असा अर्थ केला तरी जीवेश्वराचा अभेद रूप जो त्यांच्या व्याख्यानाचा बोध होतो यामुळें आत्मभूत हें पद व्यर्थ होईल. सर्वभूत म्हणजे सर्व अचेतन स्वरूप आणि आत्मभूत म्हणजे चेतन स्वरूप असा आहे उपादान कारण (अभिन्न कारण) आत्मा म्हणजे स्वरूप ज्याचें असा अर्थ करून जीवांस उपादान कारण ईश्वर आहे यास्तव तो त्याहून भिन्न नाहीं अभिन्नच आहे या अनुमानाचे द्वारा जीवेश्वरांचा अभेद या व्याख्याना पासून समजतो अशी ही कोणी याची व्याख्या करतात. याचे व्याख्येंत ही सर्व भूत म्हणजे सर्व चेतना चेतन स्वरूप आहे. आत्मा म्हणजे स्वरूप ज्या-

वें असा सर्वपदाचा संकोच करून अर्थ केला म्हणजे त्यांचे व्याख्यानाचा इष्ट-अर्थ लब्ध होतो. यामुळें त्यांचे व्याख्यानांत ही आत्मभूत या पदास वैयर्थ्य ( निरर्थकता ) येतें आणि सर्वपदाचा संकोच करून जर व्याख्यान केलें तर त्याचा जो गृहीत अर्थ तो सर्व म्हणजे अचेतन आणि आत्मे म्हणजे चेतन तद्रूप म्हणजे तत्स्वरूप आहे आत्मा म्हणजे स्वरूप ज्याचे असा अर्थ त्या पदाचा केला म्हणजे सर्वात्मभूतात्मा येणें करूनच लब्ध होतो. यामुळें प्रथमभूत पद ही व्यर्थ होतें. असे हे सर्वभूतात्म भूतात्मा या पदाचे मत भेदानें अनेक अर्थ होतात. ते लिहिले आहेत. यांतून निर्मत्सर पंडितांस जो चांगला वाटेल त्याचा त्यानीं स्वीकार करावा. आग्रह करूं नये. सर्वज्ञ भगवंताचें वाक्य कामधेनू प्रमाणेंच आहे. ॥ ७ ॥

नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ॥ पश्यन् शृण्वन् स्पृशन् जिघ्रन्नश्नन् गच्छन्स्वपन् श्वसन् ॥ ८ ॥ प्रलपन् विसृजन् गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ॥ इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥ ९ ॥

कर्मलेप ज्ञान्यास होत नाहीं असें जें पूर्वश्लोकीं सांगितलें त्याचीच उपपत्ति सांगतात. योगयुक्त जो तत्त्ववेत्ता ज्ञानी तो इंद्रियें म्हणजे ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें हें उपलक्षण करून प्राणापानादिक प्राण हे आपापले विषयांचे ठायीं वर्ततात. त्याहून निराळें त्याचें साक्षी असंग स्वरूप वर्तत नाहीं असा निश्चय झाल्यामुळें पश्यन् ( रूपादिक पहात असतां ) शृण्वन् ( शब्द ऐकत असतां ) स्पृशन् ( शीतोष्णादिक स्पर्शाचा अनुभव घेत असतां ) जिघ्रन् ( स्रगंधादिकांचा वास घेत असतां ) अश्नन् ( भोजनादिकानें स्वादुमधुरादिक रसांचा आस्वाद घेत असतां ) हे पांच ज्ञानेंद्रियांचे व्यापार सांगितले. गच्छन् ( गमन करीत असतां ) स्वपन् ( निद्रा करीत असतां ) श्वसन् ( श्वासोच्छ्वास करीत असतां ) प्रलपन् ( भाषण करीत असतां ) विसृजन् ( मलमूत्रादिकांचा त्याग करीत असतां ) हें आनंदाचें ही उपलक्षण करून मैथुनानंद अनुभवित असतां, गृह्णन् ( घेत असतां ) उन्मिषन् ( डोळे उघडीत असतां ) निमिषन् ( डोळे मिटीत असतां ) गमन, विसर्ग, प्रलपनादिक कर्मेंद्रियांचे व्यापार, निद्राबुद्धीचा व्यापार, श्वासोच्छ्वास प्राणाचे व्यापार, उन्मेष निमेष इप प्राणाचे व्यापार क्रमाची विवक्षा ( ग्रहण ) नाहीं जो ज्याला संभवेल तो घ्यावा. असे हे व्यापार करीत असतां ही कर्तृत्वाभिमान आत्मतत्त्व ज्ञानानें गेल्यामुळें मी-

कांहीं करीत नाहीं असें मानितो. ॥ ८ ॥ ९ ॥

## ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ॥ लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥

असंगात्म तत्त्व ज्ञानामुळें तत्त्ववेत्ता जसा कर्म कर्तृत्वानें लिप्त होत नाहीं-तसा जो आत्मतत्त्ववेत्ता नाहीं तोही सर्व कर्मांचा करविणारा सर्वांचा अंतर्यामी परमेश्वरच आहे मी कर्ता नव्हे या बुद्धीनें सर्व कर्में करून त्याचें फलेच्छा सोडून निष्काम बुद्धीनें परमेश्वराचे ठायीं जो अर्पण करतो तोही कमळाचें पत्र जसें उदकानें लेप पावत नाहीं तसा पापानें लिप्त होत नाहीं. पाप कर्माप्रमाणें पुण्यकर्मही जन्म मरणरूप संसार प्रवाहांत पाडण्यास कारण आहे यास्तव मुमुक्षूंस पुण्यकर्मही त्याज्यच आहे म्हणून एथील पापशब्द उपलक्षण करून पुण्यानेंही लेप पावत नाहीं असा अर्थ करावा. ॥ १० ॥

## कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ॥ योगिनः कर्म कुर्वंति संगं त्यक्त्वाऽत्मशुद्धये ॥ ११

ईश्वरार्पण बुद्धीनें केलेलें निष्काम कर्म बंधक होत नाहीं, असें सांगून त्यास चित्त शुद्धीचे द्वारा मोक्षसाधनत्व सांगतात. केवल म्हणजे हा मी ब्राह्मण तरुण-कर्म कर्ता असा जो देहादिकांवर अध्यास म्हणजे ऐक्यभ्रम तेणें करून रहित अशीं जीं देह, मन, बुद्धि आणि इंद्रियें. असा केवल ही विभक्ति फिरवून अर्थ करावा. त्यांहीं करून योगिनः म्हणजे देहेंद्रियमनोबुद्धींहून आत्मा भिन्न आहे असा जो आत्मानात्म विवेक तद्वन् जे ते, संग म्हणजे जो त्याप्रमाणें विवेकी जे तार्किकादिक-त्यांस जो आत्मा कर्ता आहे, भोक्ता आहे असा अभिमान आहे त्यापन टाकून आणि फलेच्छा ही टाकून चित्तशुद्धि साठीं कर्में करतात. तात्पर्य– तुलाही कर्म करण्याचा अधिकार आहे म्हणून तूंही तसा अभिमान टाकून कर्म कर. ॥ ११ ॥

## युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ॥ अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२

" ब्रह्मण्याधाय कर्माणि " येणें करून सांगितल्या लक्षणानें जो युक्त तो-कर्म फलाचा त्याग करून चित्त शुद्धीचे द्वारा प्राप्त ज्ञानयाची जी ब्रह्मनिष्ठेची फलभूत शांति म्हणजे विदेह कैवल्य मोक्ष ता प्रत पावतो. अयुक्त म्हणजे त्या लक्षणानें जो रहित तो कामाचे प्रेरणे करून फला विषयीं आसक्त होऊन कर्म करून बंध पावतो. ॥ १२ ॥

**सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी॥**
**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन्॥ १३॥ ॥**

अज्ञानी फलासक्तीमुळें कर्मांनीं बंधन पावतो. असें सांगितलें. आतां-ज्ञानी त्याहून विपरीत आहे असें सांगतात. वशी म्हणजे चित्ताचा जय केला आहे त्यानें असा समाधिस्थ योगी नवद्वार म्हणजे पांच ज्ञानेंद्रियें आणि प्राण ही सहा यांनच त्याचीं सजातीय कर्मेंद्रियें आलीं असें जाणावें आणि बुद्धि, चित्त, आणि अहंकार हीं तीन अशीं नऊ आहेत. द्वारें म्हणजे शरीर रूप पुराचा स्वामी जो जीव त्यास विषय भोगासाठीं प्रवेश करण्याचीं स्थानें ज्याचे ठायीं आणि विचित्र वासनाचीं-कल्पिलेलें आहेत अनंत विषय ज्याचे ठायीं आणि भिन्न भिन्न देहेंद्रियादिकांचीं जीं कर्में तद्रूप सचिव किंवा मंत्री यानीं जेथें वास केला आहे तशींच सुख दुःखादिक-नाना प्रकारचीं आहेत. बाजारांत क्रय विक्रय करण्या जोगीं वस्तु किंवा द्रव्यें ज्याचे ठायीं असें जें हें शरीर रूप पुर त्याचे ठायीं राजा जसा दिवाणाकडे सर्व राजकार्यें किंवा नगर संबंधीं कार्यें सोंपून सुखें करून राहतो त्या प्रमाणें मना कडून सर्व कर्मांचा उत्तम प्रकारें न्यास म्हणजे सर्व कर्में या शरीर रूप क्षेत्राचा धर्म आहे आत्म्याचा धर्म नाहीं अशी बुद्धि करून निर्विकल्प समाधीचे ठायीं सुखें करून म्हणजे सच्चिदानंदात्मक स्वस्वरूपें करून राहतो. देही म्हणजे समाधी पासून उठल्यावर व्यवहार दृष्टीनें देहाभिमान धरून असतां ही अमात्य प्रधानाचे स्वाधीन ज्यानें सर्व राज्य कारभार केला आहे असा राजा जसा कांहीं करीत नाहीं आणि करवीत नाहीं त्याप्रमाणें-तो योगी मी कर्ता किंवा करविणारा या बुद्धीचा समाधीनें नाश झाल्यामुळें कर्म करीत नाहीं तर असंगात्म ज्ञानानें निर्विकारच राहतो. अथवा चक्षु, श्रोत्र, आणि नासिका यांचीं दोन दोन छिद्रें, एक मुख, गुद आणि शिश्न यांचीं तीन छिद्रें हीं शरीराचीं नऊ द्वारें जाणावीं. या पक्षीं इंद्रियें सेवक, बुद्धि अमात्य, अहंकार युवराज म्हणजे दिवाण, आणि जीव मुख्य राजा असें जाणावें, बाकी पूर्वी प्रमाणेंच जाणावें. ॥१३॥

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः॥ न**
**कर्म फलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते॥ १४॥ ॥**

प्रभु म्हणजे देहेंद्रिय मनो बुद्धीचा प्रकाशक जो अविकार चिदात्मा तो लोक म्हणजे आपण प्रकाशित केलेला जो देहेंद्रियादिकांचा समुदाय त्यावर कर्तृत्व किंवा कर्म याप्रत उत्पन्न करीत नाहीं आणि त्यानीं केलेल्या कर्मांचे फलांचा संबंध ही त्यावर उत्पन्न करीत नाहीं. विकार नसल्यामुळें चिदात्म्यास कर्तृत्व नसो परंतु चलनादि विकार रहित अयस्कांत म्हणजे लोहचुंबक स्वस्थानींच असतां लोहाचे गमना-

दि क्रियेस जसा प्रवर्तक होतो तसा अविकार स्वरूप चिदात्मा देहेंद्रियादिकांचे व्यापारांस प्रवर्तक होईल अशी शंका येईल तर त्या विषयीं सांगतात. स्वभावच प्रवृत्त होतो म्हणजे ज्याचा जसा स्वभाव त्या प्रमाणें तो प्रवृत्त होतो. तात्पर्य:- सूर्य जसा अस्मदादिकांचा प्रकाश करणारा असला तरी अस्मदादिकांस कर्मादिकां विषयीं प्रवर्तक नव्हे; परंतु सूर्य उदयास पावला म्हणजे आपापले स्वभावा प्रमाणें सर्व आपापले कार्यांस प्रवृत्त होतात, कमलें विकसित होतात, कुमुदें मिटतात. त्या प्रमाणें आत्म्यानें प्रकाशित केलेले घटादिक पदार्थ चेष्टा करीत नाहींत. मनुष्यादिक किंवा त्यांचे देहेंद्रियादिक आपापले स्वभावा प्रमाणें व्यापारा विषयीं प्रवृत्त होतात. लोह चुंबक आणि लोह हे दोघे ही पदार्थ व्यावहारिक आहेत यामुळें त्यांचा व्यावहारिक संबंध सत्य आहे त्यामुळें व्यावहारिक प्रवृत्ति प्रवर्तकत्व असलें तरी आत्मा सत्य आहे आणि देहेंद्रियादिक अनृत म्हणजे मिथ्या यांचा पारमार्थिक संबंध नाहीं यास्तव आत्म्यावर प्रवर्तकत्व ही पारमार्थिक नाहीं. ॥१४॥

## नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ॥ अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥ १५ ॥

जर आत्म्यास असंग निर्विकार स्वरूपत्वास्तव कर्तृत्व आणि कारयितृत्व ( करविणें ) नाहीं तर हा परमेश्वर ज्यांस या लोकापेक्षां ऊर्ध्व म्हणजे वरील अशा स्वर्गादिक लोकांस नेण्या विषयीं इच्छितो त्यांकडून साधु म्हणजे पुण्य कर्म करवितो आणि ज्यांस या लोकांपेक्षां अधो लोकांस नेण्या विषयीं इच्छितो त्यांकडून असाधु म्हणजे पाप कर्म करवितो अशा अर्थाचे श्रुतीनें ईश्वरास कर्म कारयितृत्व जें सांगितलें तें विरुद्ध होईल. " सर्वभूतात्म भूतात्मा " येणें करून आत्म्याचा आणि ईश्वराचा अभेद सांगितला. तेव्हां आत्म्या प्रमाणें ईश्वर ही असंग निर्विकार स्वरूपच आहे त्याला ही कारयितृत्वादिक मानलें तर आत्म्यास कां नाहीं. ईश्वरास निर्विकारासंग स्वरूपानें कर्तृत्व आणि कारयितृत्व नसलें तरी माया संबंधानें त्यास तें आहे असें म्हणाल तर देहादिकांचे संबंधानें आत्म्यास ही तें येईल आणि ईश्वरास तें मानलें, तर कोणा पासून पाप, कोणापासून पुण्य ईश्वर करवितो आणि कोणास सुखी-कोणास दुःखी करतो असा ईश्वरास ही विषमभाव आणि निर्दयत्व जीवा प्रमाणें लोभ क्रोध मूलक आहे असें होईल यामुळें त्यास ही काम क्रोध मूलक संसार प्राप्त होईल अशी शंका असेल तर त्या विषयीं सांगतात. विभु म्हणजे व्यापक आणि क्रिया रहित परमेश्वर कोणा कर्त्याचें पाप घेत नाहीं तसेंच कोणा कर्त्याचें सुकृत म्हणजे पुण्य ही घेत नाहीं म्हणजे ईश्वरास कारयितृत्व नाहीं यामुळें कोणाकडून पाप करविण्यानें पापी किंवा पुण्य करविल्यानें पुण्यवान् होत नाहीं. जो सक्रि-

य आहे तो कोणाकडून आपले भाषणादिक व्यापारानें करवितो, ईश्वरावर विभुत्वा-स्तव कोणतीही क्रिया नाहीं आणि असंग अद्वितीयत्वास्तव पारमार्थिक माया संबंध ही नाहीं, तथापि जसा सार्वभौम महाराज सर्वेश्वर सुखी आणि स्वतंत्र असतांही आपले वास्तविक स्वरूपाचे अज्ञानानें निद्रेंत आपणास दुसऱ्यानीं बद्ध केलें आहे. आपण शतावधि संकटांचा अनुभव करतो. मी दीन आहें, दुःखी आहें, स्वतंत्र नाहीं, हा दुःखापासून सोडवील. असे अनेक स्वप्नभ्रम पाहतो. आणि मोह पावतो त्या प्रमाणें अनादि अविद्येनें हे जीव, हा ईश्वर असें भासविलें आहे अशा श्रुती आहेत त्यांवरून अनादि अविद्येचे आवरणानें आपलें वास्तविक अद्वितीय असंग सच्चिदानंद स्वरूपाचे ज्ञानाचें आच्छादन होऊन देहेंद्रियादिकांवर जो तादात्म्याभिमान झाला आहे त्याचे योगानें मी ईश्वर नव्हे त्याहून भिन्न कर्ता, भोक्ता, सुखी, दुःखी, संसारी आहें, असें मानून देहादिकांवरील धर्म आपले वर मानितो आणि त्या दुःखाचे निराकरणार्थ कल्पिलेले ईश्वराचें आराधन आणि कर्म करतो आणि तें न केलें तर ईश्वरापासून भितो आणि ईश्वरच आपले पासून शुभाशुभ कर्म रचितो असें मानितो. आणि ईश्वर उपास्य आहे आणि मी उपासक आहें असें मानितो असा जो हा अविद्येचे अवस्थेंत सर्व जीवांस भ्रम झाला आहे त्याचा पूर्वोक्त ईश्वरास प्रवर्तकत्व पापपुण्य कारयितृत्व सांगणारी श्रुति अनुवाद करते आणि अविद्येचे विचित्र शक्तीमुळें विचित्र नाना प्रकारचे जे जीवांस अविद्येनें भासविलेले जीव स्वरूपाविषयीं तसेंच ईश्वर स्वरूपाविषयीं विकल्परूप भ्रम त्यांचा ही अनुवाद करते. तोच अनुवाद श्रुतीचीं व्याख्यान करणारीं पुराणें ही करतात. त्यांतील जीवस्वरूपाविषयींचे विकल्प मूलक विवाद “ अथचेत्त्वं नित्यजातंनित्यंवामन्यसेमृतं ” या श्लोकांत स्पष्ट करून दाखविलेच आहेत तेणें करून महावाक्यांतील त्वं पदाच्या अर्थाचें शोधन होईल. ईश्वरस्वरूपा विषयींचे विकल्प मूलक जे विवाद आहेत त्यांचें प्रतिपादन महावाक्यांतील तत्पदार्थाचें शोधन होऊन ब्रह्मात्मैक्यरूप पदद्वय महा वाक्यार्थाचें यथार्थ ज्ञान होण्या साठीं येथें संक्षेपानें करतों. असंग जें चैतन्य त्यास चितिज्ञान असें ही म्हणतात. त्याचे सन्निधि मात्रानें जीवांस सुखदुःख फलाचा अनुभव व्हावयासाठीं या जगाची रचना करण्यास प्रवृत्त झालेली जी त्रिगुणात्मक प्रकृति जिचें स्वरूप पूर्वी लिहिलेंच आहे आणि पुढें ही प्रसंगानें लिहूं तिचा नियंता म्हणजे आपलें कार्य करण्या विषयीं प्रेरणा करणारा आणि क्लेश, कर्म, विपाक आणि आशय यांचा संबंध ज्यास नाहीं असा जो पुरुष विशेष त्यास ईश्वर म्हणावें. अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, आणि अभिनिवेश या पांचांस क्लेश असें म्हणावें. अनित्य, अशुचि, दुःख, अनात्मा म्हणजे जड देहादिक यांवर क्रमें करून हें नित्य, शुचि, सुख, आत्मा अशी भेद किंवा अभेदा विषयीं उदासीन सामान्य स्वरूप जी विपरीत बुद्धि ती अविद्या.

बुद्ध्या दिकांवर स्वरूपें करून धर्मेकरून अभेद जीनें भासतो अशीजी आत्म- बुद्धि जीस अहंकार म्हणतात ती अस्मिता. सुखाचें साधन जे विषय तद्विषयीं जो अभिलाष तदनुकूल जी हें मला असावें अशी मनाची वृत्ति तो राग (प्रीति). दुःखास जीं साधनें त्याविषयींची जी इच्छा तीस विरोधि म्हणजे हें मला नसावें अशीजी मनाची वृत्ति तो द्वेष, स्वभावें करून अविद्वानास किंवा विद्वानास सर्व- लोक प्रसिद्ध मरण त्रासानें होणारें जें भय किंवा तत्सजातीय भय तो अभिनिवे- श, हें पूर्वोक्त पांच क्लेशाचें स्वरूप देहेंद्रियादिकांचा जो व्यापार त्यास कर्म म्हणा- वें. तें शक्ल १ कृष्ण २ शक्लकृष्ण ३ आणि अशक्ल अकृष्ण ४ असें चारप्रकारचें आहे. केवळ पुण्याला साधन जें जप करणें अनशन (उपवासादिक करणें) असें जें कर्म तें शक्ल कर्म, तें वानप्रस्थांचें. केवल पापालाच साधन असें जें दुष्टाचें पर- स्त्री गमनादिक कर्म तें कृष्णकर्म, प्राधान्यें करून पुण्याला उत्पन्न करणाऱ्या ज्याक- र्मात अंगभूत अनुषंगानें किंचित पापही उत्पन्न होतें असें जें यज्ञादि कर्म तें शक्ल- कृष्ण कर्म. यज्ञादिकर्म वेदविहित आहे यामुळें मोठ्या पुण्याला तर साधन आहेच परं- तु त्यांत पशुहिंसा होते यामुळें अनुषंगिक यत्किंचित पापही होतें. यास प्रमाण पशूं- ची हिंसा झाल्यामुळें जें एन म्हणजे पाप झालें त्यापासून अग्नि माझें रक्षण करो अ- शा अर्थाचे जे यज्ञ प्रकरणांतील मंत्र त्यांतील लिंगें बोधक पदें आहेत. आणि अर्थ- वाद स्वावक्त वाक्यें ही आहेत. हे तीन प्रकारचें कर्म जे योगी नव्हेत त्यांचें आहे, स- माधी करून पूर्वोक्त योगज्यास सिद्ध झाला आहे त्याचें नव्हे. अशक्ल अकृष्ण म्हण- जे पुण्य किंवा पाप उत्पन्न करणारें नव्हे असें जें कर्म तें विपाक म्हणजे पूर्वोक्त कर्मा- चें आशय द्वारा परिणाम म्हणजे जाति, आयुः भोग एतद्रूप भिन्न भिन्न फलें देतें. जाति म्हणजे उत्तम देवादिक योनींत किंवा मध्यम मनुष्यादिक योनींत किंवा अधम पशु पक्षि कीटकादिक योनींत जन्म होणें. आयुष्य म्हणजे दीर्घायुष्य, अल्पायुष्य हो- णें, भोग म्हणजे सुखदुःखानुभव होणें, आशय म्हणजे पूर्वोक्त विपाकास कारणभू- त पूर्वोक्त कर्मां पासून होणारे पुण्य पापांचे समुदाय रूप संस्कार, मांगितलेले लक्ष- णाचा हा ईश्वर जीवा प्रमाणें असंग चिद्रूपच आहे आणि तो जीवाचे स्वरूपाहून भिन्न आहे. जर भिन्न न मानला तर बद्ध आणि मुक्त ही व्यवस्था होणार नाहीं. जीव आणि- ईश्वर असंग चिद्रूपत्वें करून समान असले तरी ईश्वर स्वरूपाचे ठायीं विशेष आहे. यामुळें प्रकृत्यादि नियंतृत्वरूप ईश्वरत्व आहे, अशा असंग चिद्रूप परमेश्वरास नि- यंतृत्व आहे, याविषयीं याचे भयानें वायु नियमा प्रमाणें वाहतो, याचे भयानें सूर्य नि- यमा प्रमाणें उदयास्त आणि अस्तास्त पावतो. याचे भयानें इंद्र आणि अग्नि हे आ- पापला व्यापार नियमानें करतात. याचे भयानें पांचवा मृत्यु हा नियमानेंच धांवतो या परमेश्वराचे आज्ञेत सूर्य आणिचंद्र भय धरून राहतात. प्रधान म्हणजे सत्वर-

त, तसी गुणांची जी समान अवस्था असते तीस प्रधान किंवा प्रकृति म्हणतात, क्षे-
त्रज्ञ म्हणजे जीव यांचा नियंता तसाच सत्वादिक गुणांचा नियंता अशा अर्थाच्या अ-
नेक श्रुति आणि अंतर्यामी ब्राह्मण प्रमाण आहेत आणि क्लेश कर्मादिक नसल्या-
मुळें तें नियंतृत्व त्यास युक्तच आहे. जीवांचें ही स्वरूप वस्तुतः यथार्थत्वें करून
असंग चिद्रूपच आहे यामुळें त्यांसही क्लेशादिकांचा परमार्थ दृष्टीनें संबंध नाहीं.
तथापि प्रकृति आणि तिचें कार्य जें देहेंद्रिय मनो बुद्ध्यादिक त्यां पासून आपलें स्वरू-
प निराळें आहे असा विवेक नसल्यामुळें जीवांस क्लेशादिकांचा संबंध आहे यावरू-
न त्यांचें ईश्वराशीं वैलक्षण्य (भिन्न लक्षणत्व) आहे. ईश्वरास अविवेक नाहीं असें
योगी म्हणतात. असंग चिद्रूप ईश्वरास नियंतृत्व संभवत नाहीं. तें मानलें तर त्याचा
संबंध झाल्यामुळें त्याची असंगता राहणार नाहीं. यास्तव जीवाहून ईश्वराचें वैलक्ष-
ण्यार्थ आणि त्यास नियंतृत्व जगत्कर्तृत्वादिकांचा संबंध होण्यास विष्णु परमेश्वरास
नित्य ज्ञान, नित्य इच्छा, नित्य प्रयत्न, असे गुण मानावे. त्या गुणानींच त्यास पुरुष विशे-
षत्व संभवतें दुसरे प्रकारानें संभवत नाहीं. ज्ञानादिक तीन गुण ईश्वराचे नित्य आहे-
त या विषयीं तो ईश्वर सत्यकाम, सत्य संकल्प आहे. सत्य म्हणजे नित्य अशा अर्था-
च्या अनेक श्रुति प्रमाण आहेत. असें तार्किक म्हणजे नैयायिक बोलतात. सृष्टि स्थि-
ति प्रलय करण्यास उपयोगी ज्ञान इच्छा आणि प्रयत्न हे जर ईश्वराचे नित्य आहेत त-
र सर्वदा सृष्टि किंवा स्थिति अथवा प्रलयच हीं होतील. क्रमानें होणार नाहींत. या-
स्तव पूर्वोक्त लिंगदेह समष्ट्यभिमानी सर्व लिंगदेह समुदायाभिमानी सर्व जीव संघा-
त रूप हिरण्य गर्भच ईश्वर आहे या हिरण्यगर्भास ईश्वरत्वा विषयीं हिरण्य गर्भाचें
माहात्म्य ज्यांत मोठे विस्तारानें वर्णिलें आहे असे उद्गीथ वेदांतील ब्राह्मण सर्व प्रमा-
ण आहेत. या हिरण्य गर्भास लिंग शरीराचा संबंध असला तरी त्यास कर्म नाहीं या-
मुळें तो संबंध कर्म निमित्तक नाहीं. सुख दुःख रूप कर्मफलाचे भोगासाठीं ज्यास
कर्म निमित्तक शरीर संबंध होतो तोच जीव, यामुळें हिरण्य गर्भ जीव नव्हे, तो ईश्वर
आहे, असें हिरण्य गर्भाचे उपासक हैरण्यगर्भ बोलतात. स्थूल शरीराला सोडून लिं-
ग शरीर कोठें ही दिसत नाहीं किंवा अनुभवास येत नाहीं यास्तव पूर्वोक्त स्थूल शरी-
राचे समष्टीचा अभिमानी असा सहस्र मस्तक, सहस्रचक्षु, सहस्र हस्तपाद, असा
विराट पुरुषच ईश्वर आहे अशा विराट पुरुषास ईश्वरत्वा विषयीं पुरुषसूक्त आणि त्या-
स सहस्रावधि मस्तक, चक्षु, हस्त, पाद, आहेत अशा अर्थाच्या दुसऱ्याही श्रुति प्रमाण
आहेत, असें विश्वरूपाचें चिंतन करणारे बोलतात. कोणी चतुर्मुख देह ज्यास आहे
तो ब्रह्मदेव त्यासच ईश्वर असें म्हणतात. आणि त्यास ईश्वरत्व आहे याविषयीं प्रजा-
पति जो ब्रह्मदेव तो या प्रजांप्रत उत्पन्न करता झाला, धाता म्हणजे ब्रह्मदेव यथापू-
र्व म्हणजे पूर्व कल्पींचे सृष्टी प्रमाणें सृष्टि करता झाला. या अर्थाची श्रुति प्रमाण दा-

खविनात. प्रजापति जो ब्रह्मदेव तो विष्णूचे नाभिकमळापासून उत्पन्न झाला.असें श्रुति पुराणांत सांगितलें आहे यास्तव विष्णूच ईश्वर असें भागवत बोलतात आणि विष्णूस ईश्वरत्वाविषयीं सृष्टीचे पूर्वी एक नारायणच होता ब्रह्मा नसाच ईशान म्हणजे रुद्र अग्नि, सोम, आकाश, पृथिवी हीं कोणी नवतीं असें महोपनिषदांत सांगितलें आहे. पुरुषसूक्तांत ज्याचें स्वरूप वर्णिलें आहे असा जो नारायण तो या प्रजांप्रत उत्पन्न करीन असें इच्छिता झाला. नारायणापासून ब्रह्मा, रुद्र उत्पन्न झाले असें नारायणोपनिषदांत सांगितलें आहे सृष्टीचे पूर्वी हें जग कांहीं नवतें. दिव्य देव नारायण एकच होता असें सुबालोपनिषदांत सांगितलें आहे, असेंच वैष्णव पुराणांत नारायणाचेंच ईश्वरत्वें करून वर्णन केलें आहे, असें प्रमाण दाखवितात. या सर्व जगास कारण कोण अशा विचार करणाऱ्या देवांस-सृष्टीचे पूर्वी मी एकच होतों असें शिव बोलला असें आथर्वशिरसांत सांगितलें-आहे, जेव्हां तमच होतें दिवस किंवा रात्र नवती, सत् म्हणजे सृष्टि केलेलें जग-असत् म्हणजे उत्पन्न न केलेलें जग नवतें तेव्हां केवळ शिवच होता तो शिव अक्षर ब्रह्म आहे असें श्वेताश्वतरमंत्रोपनिषदांत सांगितलें आहे.जो देवांचे पूर्वी व नंतरही आहे आणि विश्वाधिक म्हणजे सर्वापेक्षां श्रेष्ठ रुद्र महर्षी आहे तो आपले पासून उत्पन्न झालेल्या हिरण्यगर्भाप्रत पाहाता झाला. असें तैत्तिरीय शाखेंतील मंत्रांत सांगितलें आहे. ब्रह्मा, विष्णु, अग्नि, इंद्र हे सर्व उत्पन्न होणारे आहेत, या सर्वांचें कारण जो सर्वैश्वर्य संपन्न सर्वेश्वर शिव तोच ध्येय म्हणजे जगाचे कारणत्वें करून ध्यान-करण्यास योग्य आहे असें आथर्वशिरसांत सांगितलें आहे.आणि बहुत उपनिषदांत शिवच जगास कारण असें सांगितलें आहे. अष्टादश पुराणामध्यें दहा पुराणांत शिवाचें माहात्म्य वर्णिलें आहे, विष्णूचें चार पुराणांत माहात्म्य वर्णिलें आहे आणि-शिवाचे पायांचा ठिकाण लावावयास विष्णु समर्थ झाला नाहीं, असें ही पुराणांत वर्णिलें आहे, यावरून शिवच ईश्वर आहे विष्णु ईश्वर नव्हे असें शैव बोलतात. जेव्हां त्रिपुराचा दाह केला तेव्हां तें कर्म निर्विघ्न व्हावें यासाठीं शिवानीं गणपतीची पूजा केली असें पुराणादिकांत वर्णिलें आहे यास्तव गणपतीच ईश्वर असें गाणपत्य बोलतात. या प्रमाणें त्या त्या देवतेचे प्रकाशक मंत्र तसेच वेद पुराणादिकांतील अर्थवाद ( स्तावक ) वाक्यें म्हणजे त्या त्या देवतेचीं स्तुति करणारीं वाक्यें तसेच कल्प म्हणजे त्या त्या देवतांचे उपासना करण्याचे अनुष्ठान प्रयोग त्यांचा आश्रय करून भैरव, मल्लारी, मारिका, यक्ष, राक्षस, अश्वत्थ, वट, जल, पाषाण, मृत्तिका, द्रव, व्रीहि, तातणी ( पिंजारी ज्यानें कापूस पिंजतात ती ), कुऱ्हाड, कोयता, तरवार इत्यादिकांस कुलदेवतादिक बुद्धीनें ईश्वर मानून त्यांची पूजा करणारे पुष्कळ लोक आहेत. त्या पूज्य पूजकांचे तारतम्यानें त्या पूजेपासून फलें ही होतात.असें म-

नितात. या प्रमाणें मायेनें विचित्र शक्तीनें हीं ईश्वर स्वरूपें आणि पूर्वोक्त देहादि जीव स्वरूपें भासविलीं आहेत, त्या विषयीं पूर्वोक्त लोकायतादि सांख्यांत जीव वादी तसेच योगादिक स्थावरांत ईश्वर वादी ज्यांस मायेनें जसें जीव आणि ईश्वर रूप भासविलें आहे त्याचा अभिमान धरून जीवेश्वरांचे स्वरूपा विषयीं विवाद करतात. जर हीं जीवेश्वर स्वरूपें मायेनें भासविलीं नाहींत तर सर्व श्रुति पुराणांत एकच ईश्वराचें प्रतिपादन करावें, विकल्प असूं नये, जे वस्तु वास्तविक जसें आहे तें तसेंच सर्वदा आहे किंवा राहतें विकल्प पुरुषाचे बुद्धीनें मात्र होतात, बुद्धीनें अनेक विकल्प केले तरीं ते मनोमय विकल्प आहेत. वास्तविक नव्हेत. यामुळें ज्या वस्तूवर विकल्प होतात तें वस्तु एकरूपच राहतें विकल्पानें भिन्न होत नाहीं. यास उदाहरण:- जसा पुढील पदार्थ एकच असतां भ्रमानें कोणी स्थाणू अशी कल्पना करतो कोणी पुरुष अशी कल्पना करतो, हें बुद्धीनें कल्पिलेलें स्वरूप मात्र भिन्न होतें. मूळचें स्वरूप भिन्न होत नाहीं अथवा ईश्वर निर्मित मांसास्थिमय स्त्री स्वरूपतः एकच असतांही भर्तृ संबंध बुद्धीनें भार्या, श्वशुर संबंध बुद्धीनें स्नुषा, भर्तृ भगिनी संबंध बुद्धीनें नणंद, दीराचे पत्नी स्वरूप संबंध बुद्धीनें जाऊ इत्यादिक अनेक कल्पनेस योग्य होते या प्रमाणें अद्वितीय असंग सच्चिदानंदात्मक आत्मवस्तु माया, मायेनें भासविलेलीं जीं मायेचीं कार्यें देहेंद्रियादिक आणि मायेचे जे गुण सत्व रज तम किंवा त्यांचीं कार्यें यांचे संबंधानें जीव ईश्वर अशा व्यवहारास योग्य होऊन त्याचे ठायीं आपले भ्रांतीनें पूर्वोक्त जीवेश्वरा विषयींच्या अनेकांनीं अनेक कल्पना केल्या तरी तें पारमार्थिक अद्वैतासंग वस्तु भेद पावत नाहीं, तें अखंड एकच निरुपाधिक आहे यास्तव त्याच्या वादीनीं त्या त्या जीवेश्वराचे स्वरूपा विषयीं प्रमाण म्हणून दाखविलेल्या सर्व श्रुति त्या त्या मता प्रमाणें अविद्येनें किंवा मायेनें भासविलेले जीवेश्वराचे स्वरूपाचा-जो अनादि भ्रम त्या त्या वादीस झाला आहे त्याच्या अनुवाद रूप ( सिद्धार्थ सांगणाऱ्या ) च आहेत यथार्थ वस्तु विषयीं विकल्प नाहीं यास्तव आत्म वस्तूचें यथार्थ स्वरूप सांगणाऱ्या नाहींत यास्तव श्रुतींतील उपक्रम म्हणजे आरंभ आणि उपसंहार म्हणजे समाप्ति यांहीं करून चांगला तात्पर्य निर्णय होणारा विचार केला म्हणजे ब्रह्मात्म तत्त्व असंग अद्वितीयच आहे असें सिद्ध होतें. त्या विषयीं एक दोन उदाहरणें लिहितों:- तैत्तिरीयोपनिषदांत आत्म स्वरूप ब्रह्म सत्य ज्ञानानंद स्वरूप आहे असा आरंभ करून ज्या पासून वाणी आणि मन निवृत्त होतात म्हणजे वाणीस आणि मनास अगोचर जें आहे तें ब्रह्म अशी समाप्ति केली, तशीच छांदोग्योपनिषदांत सद्रूप अद्वैत ब्रह्माचा उपक्रम करून तें ब्रह्म तूंच आहेस असा उपसंहार केला आणि दोहोंत ही लोक दृष्टीनें जो जीवेश्वर जग या भेदाचा भ्रम झाला आहे त्याचा जगाची सृष्टि सांगून त्या उपाधीनें त्या भेद भ्रमाचा अनुवाद केला. असें सर्वोपनि-

षदांत आहे. अविद्यावस्थेंत पूर्वोक्त सर्व व्यवहारास आणि त्यांतील पदार्थांस सत्यत्व भासलें तरी परमार्थतः आत्म्यास कर्तृत्व कारयितृत्व नाहीं असें अद्वितीयात्मतत्त्वाचें वास्तविक स्वरूप श्रुतिच सांगते. अविद्यावस्थेंत जीवाचा आणि ईश्वराचा भेद असून ईश्वरास पूर्वोक्त पुण्य पाप कारयितृत्व व्यावहारिक असलें तरीं लोकव्यवहारांत कोणी अपराध केला तर त्यास दंड करून दुःख देणारा आणि यथान्याय मार्गानें वर्तणारावर अनुग्रह करून सुख देणारा जो धार्मिक राजा तो विषमभाव आहे, निर्दय आहे असें कोणीही म्हणत नाहीं. प्रत्युत अपराधी कोण निरपराधि कोण आहेत असा यथार्थ विवेक न पाहून त्यानीं सर्वांवर साम्य दृष्टी ठेविली तर तो लोकांत निंद्यच होतो त्या प्रमाणें परमेश्वर जो वांची जीं अनादि कर्मे तदनुसार त्यांस पुण्य कर्माविषयीं किंवा पाप कर्माविषयीं वर्तवीत असला किंवा कोणी सुखी-कोणी दुःखी अशी विषम सृष्टि करीत असला तरी त्यास वैषम्य किंवा निर्दयत्व नाहीं. जर ईश्वर आपले इच्छे प्रमाणें आपले प्रयोजना साठींच करील तर त्यास वैषम्यादिक येईल. तसें करीत नाहीं आणि करवीत ही नाहीं. सर्व सृष्टि स्थिति प्रलयादि कर्मे जीवांचे कर्मानुसार त्यांस त्यांचे कर्मानें सुख दुःख देण्या करतांच करतो. ॥१५॥

**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ॥ तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥ ॥**

तें पूर्वोक्त आत्मस्वरूपाचें आवरण करणारें ज्यांचें अज्ञान वेदांतांतील महावाक्य प्रमाणापासून झालेल्या मी ब्रह्म आहें अशा आत्मतत्त्वाचे ज्ञानानें नाश पावलें आहे त्यांचें तें ज्ञान सूर्य जसा सर्व जगास तमाचा नाश करून प्रकाशित करतो त्या प्रमाणें तत् ह्मणजे तेंजें सच्चिदाद्वितीय आणि परमार्थतः सद्रूप पर म्हणजे ब्रह्म त्या प्रत स्वात्मत्वें करून प्रकाशित करतें. यास्तव अनर्थप्रद जें अज्ञान त्याच्या नाशार्थ ज्ञानच पाहिजे. ॥१६॥

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ॥ गच्छंत्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥१७॥**

आत्मतत्त्व ज्ञानानें प्रकाशित होणारें जें ब्रह्म त्याचे ठायीं आहे बुद्धि म्हणजे वेदांत वाक्या पासून ब्रह्म आहे अशी परोक्षज्ञानरूप बुद्धि ज्यांची आणि वेदांताचे श्रवण मननें करून प्र त्तावनेंत ज्यांचीं स्वरूपें लिहिलीं आहेत अशा प्रमाणा संभवना (प्रमाण वाक्या वरील अप्रामाण्य बुद्धि ) आणि प्रमेया संभावना ( प्रमाण-सिद्ध अर्थावर अप्रामाण्य बुद्धि ) जाऊन तेंच ब्रह्म ज्यांचा आत्मा आहे म्हणजे आत्मा ब्रह्मच आहे अशा ज्ञानानें युक्त आणि त्याच ब्रह्माचे ठायीं आहे निष्ठा म्ह-

णजे मध्यें दुसरी विजातीय अनात्म विषयक वृत्ति न होतां मी ब्रह्म आहें अशा सजातीय मनो वृत्तींचा प्रवाह ज्यांचा म्हणजे निदिध्यासनानें देहादिकावर आत्मबुद्धि रूप जी विपरीत भावना तिणें करून रहित आणि तेंच ब्रह्म आहे परायण म्हणजे अज्ञानरूप उपाधीच्या नाशानें स्वात्मत्वें करून प्राप्य ज्यांस असे जे ज्ञानें करून निर्धूत म्हणजे गेलें आहे कल्मष म्हणजे अज्ञान ज्यांचें असे होत्साते अपुनरावृत्ति म्हणजे जो प्राप्त झाल्यानंतर पुन: जन्ममरण प्रवाहरूप संसार प्राप्त होत नाहीं. अशा मोक्षाप्रत पावतात. ॥१७॥

## विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ॥ शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥१८॥

आतां असे जे तत्त्ववेत्ते त्यांची पारमार्थिक बुद्धि कशी होते तें सांगतात. पंडा म्हणजे वेदांत श्रवणापासून झालेलें ब्रह्मात्मापरोक्ष ज्ञान ज्यांस झालें आहे ते पंडित, ते विद्या म्हणजे वेदाध्ययन किंवा वेदार्थज्ञान, विनय म्हणजे नम्रता यानीं युक्त जो उत्तम ब्राह्मण त्याचे ठायीं तसाच श्वानमांस शिजवणारा जो चांडालादिक हे कर्मेंकरून जरी विरुद्ध आहेत तरी त्यांचे ठायीं तसेच गाय हत्ती श्वान हे जाती करून जरी विषम आहेत तथापि त्यांचे ठायीं तद्रूपें करून आणि स्फुरण रूपें करून भासणार ब्रह्म एकच आहे. असें पाहण्याचा ज्यांचा स्वभाव आहे असे होत्साते मोक्षाप्रत पावतात. असा पूर्वश्लोकाशीं अन्वय करावा. तात्पर्य– ब्राह्मण आहे, ब्राह्मण भासतो चंडाल गवादिक आहे, भासतो. या व्यवहारांत जी आहे अशी सत्ता भासते असें जें स्फुरण म्हणजे त्या पदार्थाचा प्रकाश किंवा ज्ञान अनुभवास येतें तें ब्रह्म रूपच आहे ब्राह्मण गाय इत्यादिकांचा जो शरीररूप आकार आणि ब्राह्मण गाय हें नाम त्या सद्रूप ब्रह्माचे ठायीं कल्पिलें तेंच आहे त्याची ब्रह्मसत्तेहून भिन्न सत्ता नाहीं, जशीं सुवर्ण मृत्तिका यांपासून उत्पन्न झालेलीं कडीं, तोडे, कुडक्या किंवा घर, रांजण इत्यादिक कार्यें यांत सुवर्ण मृत्तिका यांचे सत्तेहून भिन्न सत्ता नाहीं त्यांचे कड्यांचे आणि घटाचे आकार आणि नांवें मात्र भिन्न आहेत याप्रमाणें सच्चिद्रूप ब्रह्मापासून उत्पन्न झालेलें म्हणजे रज्जूवर सर्पप्रमाणें भासले जे ब्राह्मणादिक ते उपलक्षण करून-जें सर्व जग त्याचे आकार आणि नांवें मात्र भ्रांतीनें निराळीं झालीं आहेत परंतु त्याची सत्ता ब्रह्म सत्तेहून निराळी नाहीं. नाम आणि आकार हें सोडून पाहिलें म्हणजे-आहे जी सत्ता म्हणजे ज्ञान भासतें तद्रूप ब्रह्म सर्वत्र एकच अखंड आहे यास प्रमाण विकार म्हणजे घट, रांजण अशा व्यवहारांत आलेलें वस्तु वाणीनें निष्पन्न होणारें केवल नाम मात्र आहे, केवल म्हणजे त्या नामाचा अर्थ म्हणून निराळा नाहीं असें-सूचविलें तरकाय आहे मृत्तिका हेंच सत्यवस्तु आहे. या प्रमाणेंच सद्वस्तु जें ब्रह्म त्या-

वांचून त्यावर भासणाऱ्या जगाची निराळी सत्ता नाहीं. अस्ति ( आहे ) भाति ( भासतें ) प्रिय नामरूप या प्रमाणें पांच अंश प्राय: सर्वत्र भासतात. त्यांत पहिले तीन अंश ब्रह्माचें रूप नामरूप हें जगाचें रूप अशा अर्थाच्या श्रुति स्मृति पुष्कळ आहेत. १८

इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ॥
निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९

दोघे विद्यादिकांनीं समान असतां त्यांचे पूजादिकांत विषम भाव जर केला तर तसाच एक विद्यादिकांनीं अधिक आणि एक न्यून किंवा उणा असे दोघे असतां दोघांची ही जर सारखीच पूजा केली तर तो पूजा करणारा या लोकापासून आणि परलोकापासून च्युत होतो आणि त्याचे अन्नाचें भोजन करूं नये असें गौतमस्मृतींत सांगितलें आहे यावरून विषमाचे ठायीं समान बुद्धि करणें धर्मशास्त्र विरुद्धाचरण आहे. तें करणें पंडितांस कसें योग्य आहे अशी शंका होईल तर त्या विषयीं सांगतात. ज्यांचें मन तात्पर्यांत पूर्वीं लिहिल्या प्रमाणें साम्याचे ठायीं म्हणजे ब्रह्मसत्ता सर्वभूतांचे ठायीं समानच आहे भिन्न नाहीं असें जें पाहणें त्याचे ठायीं स्थित म्हणजे राहिलें आहे त्यानीं इहैव म्हणजे या देहांत जिवंत असतांच सर्ग म्हणजे जन्म मरण रूप संसार जितः ( जिंकिला आहे ) हि यस्मात् ( ज्या कारणास्तव ) ब्रह्मसत्ता सर्वत्र निर्दोष म्हणजे न्यूनाधिक्यरूप जो विषम भाव तद्रूप जो दोष तेणें करून रहित आहे. तात्पर्य – सुवर्णानें केलेलें देवतांचें आसन आणि देवतांच्या मूर्ति यांप्रत सुवर्ण व्यवहारी सुवर्ण बुद्धीनें क्रयविक्रय कालीं समानच पाहतो. जो पूजक आहे तो मात्र त्याच्या आकार बुद्धीनें तारतम्य पाहतो. त्या प्रमाणें तत्ववेत्ता ब्राह्मणादि देहाचे ठायीं ब्रह्म बुद्धीनें साम्यत्व पाहतो जो अज्ञानी आहे तो कर्में करून किंवा जाती करून तारतम्य पाहतो. यास्तव पूर्वोक्त गौतम स्मृति अज्ञानानें तारतम्य पाहणारे जे अज्ञानी आहेत त्यां विषयींची आहे, तत्त्वज्ञाना विषयींची नाहीं याप्रमाणें ते तत्त्वज्ञानी सर्वत्र ब्रह्म निर्दोष आणि समानच आहे असें पाहतात. यास्तव ते ब्रह्माचे ठायीं स्थित आहेत म्हणजे ब्रह्मभूतच आहेत. ॥ १९ ॥

न प्रहृष्येत् प्रियं प्राप्य नोद्विजेत् प्राप्य चाप्रियम् ॥ स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥ ॥ ॥ ॥ ॥

पूर्वोक्त साम्य बुद्धीने स्थिरत्वा विषयीं साधन सांगतात. ब्रह्म निर्दोष सर्वत्र एकच आहे यास्तव प्रिय म्हणजे पुत्र वित्तादिक त्यांच्या प्राप्तीनें हर्ष पावूं नये. आणि अप्रिय म्हणजे शत्रु दुःखादिक त्यांच्या प्राप्तीनें खेद पावूं नये या साधनानें

पूर्वोक्त श्रुति आणि युक्ति यांचे विचारानें आत्मा अद्वितीय ब्रह्मच आहे अशी स्थिर केली आहे बुद्धि म्हणजे प्रज्ञा ज्यानें असा आणि असंमूढ म्हणजे अशा निदिध्यासनात्मक ध्यानानें झालेला जो ब्रह्मात्म साक्षात्कार तेणें करून गेला आहे मोह (अज्ञान) ज्याचें असा याच कारणास्तव ब्रह्मवित् म्हणजे स्वात्मत्वें करून निदिध्यासन कालीं ब्रह्म प्राप्ति झालेला तो निदिध्यासन रूप जो समाधि त्या पासून जेव्हां उठतो तेव्हां ही ब्रह्माचे ठायीं स्थित आहे म्हणजे तो ब्रह्मच आहे. ॥२०॥

## बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखं॥ सब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते॥२१॥

निदिध्यासनानें आत्मत्वें करून ब्रह्मसाक्षात्कार होण्या पूर्वी ज्याचा कधींही अनुभव नाहीं अशा ब्रह्मसुखाच्या लाभाचे इच्छेनें निरंतर अनुभविलेलें प्रसिद्ध बाह्य विषय सुख टाकणें अशक्य आहे तेव्हां "नप्रत्यक्षे प्रियं शाप्य" असें कसें सांगतां अशी शंका होईल तर त्या विषयीं सांगतात. बाह्य जे स्पर्श म्हणजे विषय आणि इंद्रियें यांचे संबंध त्यांचे ठायीं म्हणजे त्यां पासून होणाऱ्या सुखानुभवाचे ठायीं आसक्त म्हणजे इच्छा रहित आहे मन ज्याचें असा होऊन जो आत्मनि म्हणजे ब्रह्मानंद रूप स्वात्म्याचे ठायीं सुषुप्ति समयीं राहून यत् म्हणजे ज्या सुखाप्रत विंदति (अनुभवितो) सः म्हणजे तो सुख पावतो. कोणतें सुख तें सांगतात ब्रह्माचे ठायीं जो योग म्हणजे समाधि त्याचे ठायीं युक्त म्हणजे योजिला आहे आत्मा ज्यानें तो ब्रह्मयोग युक्तात्मा म्हणजे ब्रह्म सुख स्वरूप ब्रह्मवेत्ता म्हणजे ब्रह्मसुख असें तात्पर्य— ब्रह्मवेत्ता ब्रह्मच होतो अशा श्रुती वरून ब्रह्मवेत्ता ब्रह्मसुखरूपच आहे अशा अर्थाचें प्रति पादन करणारें ब्रह्मयोगयुक्तात्मा हें पद पुल्लिंगी आहे म्हणून तत् असें न म्हणून सः असें म्हटलें आणि तद्ब्रह्म योग युक्तात्मा असें न म्हणून म्हणजे त्यासुखाप्रत ब्रह्मवेत्ता अनुभवितो असें न म्हणून सब्रह्म योग युक्तात्मा म्हणजे तो ब्रह्मवेत्ता असें म्हटलें तें ब्रह्मवेत्ता ब्रह्मच आहे या मुळें म्हटलें. ब्रह्मसुख आणि ब्रह्मवेत्ता हे निराळे नाहींत. तो सुखस्वरूपच आहे असें सूचविलें, सुषुप्ति कालीं आणि समाधि कालीं एकच सुख आहे तर सुप्त म्हणजे निजलेला आणि समाधिस्थ याचा काय विशेष अशी शंका होईल तर त्या विषयीं सांगतात. ब्रह्मवेत्ता अक्षय जें मोक्ष सुख त्याप्रत अनुभवितो. समाधि कालीं आणि सुषुप्ति कालीं देहेंद्रिय विषयादिक द्वैताचें दर्शन न होणें तुल्य जरी असलें तरी आत्म तत्त्व ज्ञानानें अज्ञानाचे नाशामुळें ब्रह्मवेत्ता अक्षय ब्रह्मसुखाप्रत अनुभवितो. सुषुप्ताचे मूलाज्ञानाचा नाश न झाल्यामुळें त्यास सुषुप्ति कालीं जरी ब्रह्म आणि आत्मा यांचें एकत्व झाल्यामुळें ब्रह्मात्म सुखाचा अनुभव झाला तरी सुषुप्तीहून उठल्यानंतर तो नाहीं.

यामुळें त्याचा विशेष आहे. येणें करून ब्रह्म साक्षात्कार होण्या पूर्वीं ही सुषुप्तींत ब्रह्मसुखाचा अनुभव आहे यामुळें त्या सुखाचे इच्छेनें निरंतर अनुभविलेल्या बाह्य विषय सुखाचा त्याग करणें शक्य आहे अशक्य नाहीं असा पूर्वोक्त शंकेचा परिहार सुचविला. ॥२१॥

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ॥ आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥२२॥ ॥**

तर मोक्ष सुख सुषुप्तींतील सुखासारखें आहे तर त्या मोक्ष सुखार्थ बाह्य दिव्य अन्न पान, स्त्री, गीत, वाद्यादिकां पासून होणाऱ्या सुखाचा कोण अज्ञानी त्याग करील अशी शंका होईल तर त्याविषयीं, बाह्यसुख अनित्य आहे अशी त्याची निंदा करून सांगतात. जे विषय आणि इंद्रियें यांचे संबंधा पासून होणारे भोग म्हणजे सुखें आहेत तीं उत्पत्ति आणि नाश यानीं युक्त आहेत यास्तव दुःखासच योनि म्हणजे कारण आहेत. पुत्र झाला म्हणजे जें सुख तें पुत्र मरण पावला म्हणजे नाश पावतें आणि फारच दुःख होतें यास्तव तशा सुखाचे ठायीं त्याचा परिणाम पाहणारा बुध म्हणजे ज्ञानी रमत नाहीं म्हणजे त्या विषयीं आसक्त होत नाहीं. ॥२२॥

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीर विमोक्षणात् ॥ कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥२३**

तर उत्तम सुखी कोण असें म्हणाल तर त्या विषयीं सांगतात. इहैव म्हणजे याच देहांत असतां शरीर विमोक्षणा पूर्वीं म्हणजे मरणा पूर्वींच येणें करून मरण पर्यंत पुढें अवश्य करावयास सांगतात. जो कामक्रोधांचा जय तो मला झाला असा विश्वास धरूंनये असें सूचविलें. ऐकिलेला किंवा पाहिलेला जो विषय त्याविषयीं तृप्ति न होतां जी तृष्णा तो काम त्या पासून उत्पन्न झालेला जो वेग म्हणजे अंगावर रोमांच उभे राहणें आणि नेत्र, मुख हर्षयुक्त होणें या चिन्हानें ज्ञान होणारा असा जो मनाचा क्षोभ तसाच त्या कामाचा कोणी प्रतिबंध केल्यामुळें जो क्रोध रूपानें परिणाम होतो तो क्रोध त्या पासून उत्पन्न झालेला जो वेग म्हणजे अंगास कंप सुटणें, ओंठ चावणें नेत्र आरक्त होणें या चिन्हांनीं ज्ञान होणारा जो मनाचा परिणाम त्याप्रत सहन करण्या विषयीं जो शक्नोति म्हणजे समर्थ होतो तोच युक्त म्हणजे मुख्य योगी आणि उत्तम सुखी आहे किंवा म्हणावा दुसरा नाहीं. अथवा योगवासिष्ठांत सांगितल्या प्रमाणें मरणा नंतर विलाप करणाऱ्या स्त्रियांनीं आलिंगन केलेला आणि पुत्रादिकांनीं दाह केलेला गतप्राण पुरुष काम क्रोधाच्या वेगाचें सहन करतो म्हणजे जसे त्यास ते उत्पन्न होत नाहींत. तसा मरणा पूर्वीं म्हणजे जिवंत असतां ही जो काम क्रोधाच्या वेगाचें सहन करतो

तो युक्त म्हणजे सावधान आणि सुखी म्हणावा. दुसरा अर्थांतच नाहीं. ॥ २३ ॥

**योंऽतःसुखोंतरारामस्तथांतर्ज्योतिरेवयः॥ स-
योगी ब्रह्म निर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति॥२४॥**

आतां मुख्य योग्याचें आणि उत्तम सुखाचें स्वरूप सांगून केवळ कामक्रोधां-च्या वेगाचेंच सहन केल्यानें मोक्षसुख प्राप्त होतें असें नाहीं त्या विषयीं दुसरीं ही-साधनें पाहिजेत असें सांगतात. जो अंतः म्हणजे आत्मस्वरूपाचे ठायीं सुख म्हण-जे प्रीति मानितो म्हणजे करतो आणि बाह्य विषयाचे ठायीं प्रीति करीत नाहीं तो अं-तः सुख तसाच आत्म्याचे ठायीं आहे आराम म्हणजे मनोवृत्ति संचार रूप प्रीति-उत्पन्न होण्यास कारण स्त्रियादिकां बरोबर क्रीडा ज्याची तो अंतराराम म्हणजे स्त्रि-यादिकां बरोबर क्रीडा करून जो प्रीतीप्रत पावत नाहीं तसा अंतः म्हणजे आत्म्या-चे ठायीं आहे ज्योति म्हणजे दृष्टि ज्याची आणि क्रीडेला उपकरणें जीं गीत नृत्यादि-क त्याचे ठायीं ज्याची दृष्टि नाहीं तो अंतर्ज्योति असा जो योगी म्हणजे मुख्य योगी-आहे कारण तो योग्यांस प्राप्त व्हावयाचें जें ब्रह्मरूप मोक्ष सुख त्याप्रत ब्रह्मभूत म्हणजे जिवंत असतां या देहांतच ब्रह्मात्म तत्त्व ज्ञानानें अज्ञान नाश होऊन ब्रह्म-स्वरूपाप्रत पावला आहे यामुळें अनुभवितो. ॥ २४ ॥

**लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ॥-
छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहितेरताः॥२५**

अद्वैत ब्रह्मात्म तत्त्व ज्ञानें करून ज्यानें कल्मष म्हणजे अज्ञान रूप पाप नाश पावलें आहे आणि या कारणास्तव छिन्न म्हणजे नाश पावले आहेत द्वैध म्ह-णजे आत्मा देहच किंवा देहाहून भिन्न आहे. भिन्न असला तरी कर्ता भोक्ता आहे-किंवा नाहीं. अकर्ता अभोक्ता असला तरी ब्रह्मस्वरूप आहे किंवा त्याहून भिन्न आ-हे इत्यादिक संशय ज्यांचे आणि यत म्हणजे योगाभ्यासानें स्वाधीन झालें आहे आ-त्मा म्हणजे मन ज्यांचें आणि सर्व प्राण्यांचे हिता विषयीं रत असे ऋषि म्हणजे तत्त्व ज्ञानी पूर्वींचे श्लोकांत सांगितलेलें जें ब्रह्म निर्वाण म्हणजे मोक्षसुख त्याप्रत पाव-तात म्हणजे अनुभवितात. ॥ २५ ॥

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ॥
अभितो ब्रह्म निर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥२६**

काम क्रोधानीं रहित आणि यत म्हणजे स्वाधीन झालें आहे चित्त ज्यांचें असे समाधिस्थ योगी आणि विदित म्हणजे समाधि किंवा निदिध्यासन यानीं आ-

त्या ब्रह्मत्वें करून अपरोक्ष ज्यांस झाला आहे आणि यति म्हणजे ब्रह्म परोक्ष ज्ञान झाल्या नंतर जीवन्मुक्ति सुखानुभवार्थ ज्यानीं संन्यास केला आहे त्यांस अभितः म्हणजे मरणा नंतर आणि मरणा पूर्वी ही ब्रह्म म्हणजे ब्रह्मसुखस्वरूपानें स्थितिरूप मोक्ष वर्तत आहेच. ॥२६॥

**स्पर्शान् कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः॥ प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ॥२७ यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः॥ विगतेच्छाभयक्रोधो यः सदामुक्त एव सः॥२८॥**

या प्रमाणें उत्तम ज्ञाननिष्ठा ज्यांस प्राप्त झाली आहे, त्यांस तत्कालींच मुक्ति सांगितली आणि कर्मयोग, फलेच्छा सोडून केवल ईश्वर प्रीत्यर्थ केला असतां चित्तशुद्धि आणि ज्ञान प्राप्ति होऊन त्या द्वारानें मोक्षास साधन होतो असें ही सांगितलें आतां पुढें सहावे अध्यायांत ब्रह्मात्मापरोक्ष ज्ञानास अंतरंग ( जवळचा ) साधन जो योग तो विस्तारानें सांगावयाचा आहे त्याचा सूत्र भूत संक्षेप येथून तीन श्लोकांनीं. या अध्यायांत सांगतात. या तीन श्लोकांतील प्रथम श्लोकाचे "प्राणापानौ समौ कृत्वा" या उत्तरार्धांत पूर्वी जीं योगाचीं अष्टांगें सांगितलीं आहेत त्यांतील प्राणायाम सांगितला "स्पर्शान् कृत्वा बहिर्बाह्यान्" येणें करून प्रत्याहार सांगितला "चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः कृत्वा" येणें करून धारणा सांगितली. "विगतेच्छा भयक्रोधः" येणें करून यम आणि नियम साधनभूत आणि फलभूत असे दोन प्रकारचे आहेत ते सांगितले सवितर्क- सविचार-सानंद आणि सास्मित या भेदानीं संप्रज्ञात समाधि चार प्रकारचा आहे त्यांतील "यतेंद्रियः" येणें करून सवितर्कांख्य संप्रज्ञात समाधि सांगितला. "यतमना" येणें करून सविचार संप्रज्ञात समाधि सांगितला. "यत बुद्धि" येणें करून सानंद, सास्मित हे दोन संप्रज्ञात समाधि सांगितले, संप्रज्ञात आणि असंप्रज्ञात यांचीं पूर्वी सामान्य लक्षणें सांगितलींच आहेत. ज्या समाधींत उपास्य किंवा ध्येय वस्तु यांचा जो स्थूलांश चतुर्भुजादिक त्याचा साक्षात्कार ही होतो तो सवितर्क ज्यांत सूक्ष्मांश अव्यक्त माया रूप शरीरानें साक्षात्कार होतो तो सविचार या दोहोंचे अभ्यासानें आल्हाद साक्षात्कार ज्यांत होतो तो सानंद या तिहींस कारण जी बुद्धि ध्यान करणारा द्रष्टा त्याशीं एकत्व झालेली अंतःकरण वृत्ति ती अस्मिता तिचा साक्षात्कार ही अस्मिता तो ज्यांत होतो तो सास्मित अशीं त्यांचीं ही विशेष लक्षणें आहेत. मोक्षपरायण, येणें करून असंप्रज्ञात समाधि सांगितला, प्राणायाम सांगितल्यानें त्यास साधन

मून आसनादिक हीं सूचविलीं, समाधि सांगितल्यानें त्यास साधन ध्यान धारणा-हीं सूचविलीं याशिवाय दुसरे पदानीं योगफल सांगितलें असा विभाग आहे, हा-विभाग सांगण्या साठीं या श्लोकांतील पदांचा क्रम न घेतां अर्थाचे क्रमानें पदांची व्या-ख्या लिहितों "विगतेच्छा भयक्रोधः" याचा विगतेच्छ-विगतभय आणि विगत क्रोध असा अर्थ ज्यास इच्छा आहे तो आपलें इच्छित इष्टसिद्ध व्हावें या साठीं हिंसा, असत्य, स्तेय, परिग्रह यानीं युक्त होतो. विगतेच्छ म्हणजे इच्छारहित असा अर्थ आहे यावरून हिंसादिक त्यास नाहींत यामुळें त्यास विरुद्ध जे अहिंसा सत्य अ-स्तेय अपरिग्रहरूप पूर्वोक्त स्वरूप यम सूचविले. भय म्हणजे आपला नाश होई-ल अशी शंका ती ज्यास आहे तो शौच, संतोष, तप, स्वाध्याय ईश्वर प्रणिधान यानीं युक्त होण्यास समर्थ होत नाहीं. विगतभय म्हणजे भयरहित असा अर्थ आहे या-स्तव संतोषादिक पूर्वोक्त स्वरूप नियम सूचविले पूर्वोक्त रूप धारणा, ध्यान, स-माधि एकत्र झाले म्हणजे संयम होतो त्यासच चित्त प्रसादन किंवा मनोनिग्रह म्हण-तात. त्यास कारण प्राणायाम किंवा वासना नाश आहे. वासना नाश होऊन चित्त नै-र्मल्य किंवा प्रसादन होण्यास कारण मैत्री, करुणा, मुदिता, उपेक्षा यांची भावना आ-हे, सुखित प्राणी पाहून त्याचे ठायीं हे सुखी सर्व प्राणी माझे मित्रच आहेत अशी-भावना करावी. अशी भावना केल्यानें यांचें सुख तें माझेंच आहे असें ज्ञान होऊन स-र्व सुख विषयींचा अभिलाष नाहींसा होतो. नंतर व्यग्रता रूप कलुष भाव होण्यास-कारण नाहीं यामुळें चित्त निर्मल होऊन एकाग्र होतें, त्यासच मनोनिग्रह किंवा मनाचें प्रसादन म्हणतात. याप्रमाणें दुःखित प्राण्याचे ठायीं करुणेची भावना करावी म्हण-जे आपणास दुःख जसें असह्य आहे तसेंच दुसऱ्यासही सहन करण्यास अश-क्य आहे असा दुःखावर द्वेष होऊन हें कोणासही होऊं नये अशा दयेची भावना क-रावी. अशी भावना करणाऱ्याचा व्याघ्रादिकांवरील ही द्वेष निवृत्त होऊन त्याचें चि-त्त प्रसन्न होतें. या प्रमाणें पुण्य करणारा पुण्यवंतास पाहून त्याचे ठायीं मुदितेची भावना करावी म्हणजे त्यास पाहून हर्षाची भावना करावी. आपण हर्षित व्हावें म्ह-णजे त्या पुण्यें करून आपण ही पुण्यवान् होतो. या प्रमाणें पापीजन पाहून त्यावि-षयीं उपेक्षेची भावना करावी. त्यांची उपेक्षाच करावी म्हणजे आपण पापा पासून-निवृत्त होतों. नंतर चित्त प्रसन्न होतें. या प्रमाणें मैत्र्यादिकांच्या भावनेनें वासना ना-शहोऊन संयम होतो. जो क्रोधानें युक्त आहे तो सांगितल्या प्रमाणें मैत्र्यादिकांची-भावना करण्यास समर्थ होत नाहीं. विगतक्रोध याचा क्रोध रहित असा अर्थ आहे या-मुळें त्यास पूर्वोक्त मैत्र्यादिकांच्या भावना होऊन मनाचें प्रसादानें किंवा एकाग्रतारूप-निग्रहानें होणारे धारणा, ध्यान, समाधि आणि त्यांचा समुदाय एकत्र झाला म्हणजे होणारा संयम सूचविला या प्रमाणें साधनावस्थेंत यम नियम आणि चित्त प्रसा-

दन यांची सिद्धि होण्या साठीं निरिच्छत्व, निर्भयत्व निष्क्रोधत्व हीं साधनें जशीं पाहिजेत त्याप्रमाणें फलावस्थेचे ठायीं हीं तीं साधनें पाहिजेत असें योगशास्त्र संमत आहे तें असें संप्रज्ञात समाधि सिद्ध झाला म्हणजे मधुमती या नांवांची भूमिका प्राप्त होते त्या अवस्थेंत साधक योग्यास इंद्रादि देवांनीं एथें बसावें, हीं सुंदर घरें आहेत, या सुंदर स्त्रिया आहेत, हीं भक्ष्य, भोज्य, पेय, द्रव्यें जरामरणास दूर करणारीं आहेत. हीं द्रव्यें चमत्कार विनोद करण्या जोगीं आहेत, हे आह्मीं सर्व आपले सेवक आहोंत हें स्थान तुमचेंच पुण्यानें प्राप्त झालें आहे, अशी प्रार्थना करतात. ती केली असतां त्या पदार्थांचा संबंध किंवा हे आपणास मिळावे अशी इच्छा करूं नये आणि त्या देवांनीं पूर्वोक्त प्रार्थना केल्यामुळें मी मोठा देवांस ही प्रार्थना करण्यास योग्य झालों असा स्मय (गर्व) करूं नये कारण तो संग आणि स्मय पुढील प्राप्त होणाऱ्या असंप्रज्ञात समाधी पासून योग्याचा भ्रंश करण्यास कारण आहेत तसेंच भय ही योग्यास विघ्न करणारें जे त्यां पासून होणारें आणि वितर्कां पासून होणारें असें दोन प्रकारचें आहे, व्याधि, स्त्यान, संशय, प्रमाद, आलस्य, अविरति, भ्रांति, दर्शन, अलब्धभूमिकत्व, अनवस्थितत्व हे चित्ताचे विक्षेप त्यांस योगांतराय म्हणावें. व्याधि म्हणजे धातुरसादिकांच्या वैषम्या मुळें होणारा ज्वरादिक, स्त्यान म्हणजे चित्ताच्या चंचलत्वामुळें त्यास कर्म करण्याची योग्यता नसणें म्हणजे सिद्ध होईल कीं नाहीं असें ज्ञान, संशय, प्रमाद म्हणजे काम क्रोधादिक अथवा पूर्वीं करावें असा निश्चय झाला असला तरी नंतर न करावें. असा बुद्धि प्रमाद आलस्य म्हणजे योगाचें अनुष्ठान करण्याची प्रवृत्ति होण्यास प्रतिबंधक जे कफादिक तेणें करून शरीरास जें जडत्व येतें तें, अविरति म्हणजे विषयांची तृष्णा. भ्रांति, दर्शन म्हणजे रज्जूवर सर्पबुद्धि सारखें हें कार्य सिद्ध होणार नाहींच असें विपरीत ज्ञान. अलब्धभूमिकत्व म्हणजे योगाभ्यास करणारास प्राप्त होणाऱ्या समाधीच्या मधुमत्यादिक भूमिका सांगितल्या आहेत, त्यांची प्राप्ती न होणें. अनवस्थितत्व म्हणजे चित्ताचें स्थिरत्व पूर्व भूमि सोडून पुढील भूमिका प्राप्त होण्यास पाहिजे तें नसणें. पूर्वभूमीवर स्थिर झालेलें चित्तच उत्तर भूमीवर आरोहण करतें यास्तव चित्ताचें स्थिरत्व पाहिजे सांगितलेले जे योगास विघ्न करणारे व्याध्यादिक अंतराय त्यांपासून शरीरास व मनास दुःख होतें, मनाला दौर्मनस्य म्हणजे इच्छेचा विघात झाल्यामुळें क्षोभ होतो आणि अंगास कंप सुटतो. बाहेरचा वायु आंतच जावा. त्यामुळें रेचक प्राणायाम होऊं नये. कोठ्यांतील वायु बाहेरच जावा यामुळें पूरक प्राणायाम होऊं नये अशीं हीं दुःखादिक उत्पन्न होऊन योगास विघ्न होतें. वितर्क म्हणजे नियमातील अहिंसादिकांचे विरोधि हिंसादिक ते केलेले, करविलेले आणि अनुमोदन दिलेले असे तीन प्रकारचे आहेत त्यांचीं फलें ही अनंत आहेत. योगाचे जे अंतराय त्यांची निवृत्ति पूर्वीं

सांगितलेल्या ईश्वरप्रणिधानानें होते वितर्कांची निवृत्ति त्यांचे विरोधी जे अहिंसादिक नियम त्यानीं होते. अशा या विघ्नानीं रहित आणि शुद्धचित्त होऊन योगाभ्यासार्थ सांगितलेल्या सुखासनावर कटि आणि वक्षस्थळ आणि मान यानीत प्रदेशीं उंच केलेल्या शरीराचें स्थापन करून आसन जय म्हणजे आसनावर निश्चल बहुत वेळ बसण्याचा अभ्यास झाला म्हणजे प्राणायामाचा अभ्यास करावा. तेणें करून प्राण मंदगति झाला म्हणजे मनाचें चांचल्य जाऊन तें स्थिर होतें त्या प्राणायामाचें स्वरूप सांगतात प्राण आणि अपान हे कुंभकानें ऊर्ध्वगति आणि अधोगति यांचा प्रतिबंध होऊन नासिकेचे आंतच संचार करणारे असे सम म्हणजे अल्प करून नंतर बाह्य प्रदेशीं झालेले जे स्पर्श म्हणजे श्रोत्र चक्षुरादिक इंद्रियांचे द्वारा आंतर जी बुद्धि किंवा अंतःकरण त्याचे ठायीं निरंतर होणारे जे शब्द स्पर्श रूपादिक विषयांचे संबंध त्यांप्रत योग्यानें पूर्वीं सांगितलेला जो इंद्रियांचा प्रत्याहार (निवृत्ति) तेणें करून बहिः म्हणजे बाहेरच करावे आणि नंतर विषयां पासून इंद्रियें पराङ्मुख झालीं असतां स्वस्थानं इंद्रियें लीन होऊन विषयांचा इंद्रिय द्वारा मनाशीं संबंध नहोतां अंतर्मनानें म्हणजे अंतर्वृत्ति मनानेंच रहावें त्यास प्रत्याहार म्हणतात. असा प्रत्याहार करण्यास जो समर्थ नाहीं त्याची काय गति, त्यानें काय करावें, अशी शंका झालीतर त्या विषयीं दुसरा उपाय सांगतात. येथीलच वा शब्द म्हणजे विकल्प या अर्थी आहे, अथवा भ्रुकुटीचे मध्यभागीं चक्षूंचें स्थापन करावें यास खेचरी मुद्रा म्हणतात ही मुद्रा घशाच्या दोन छिद्रां मध्यें जें मांस लोंबतें ती लंबिका तिच्या ऊर्ध्वभागीं जें छिद्र आहे तेथें जिव्हा फिरवून स्थापन करावी आणि दृढ आसनावर चिरकाल बसावें यास खेचरी मुद्रा म्हणावें अथवा भ्रूमध्यभागीं दृष्टीनें स्थापन करावें अशी ही खेचरी मुद्रा होते असें महादेवानीं सांगितलें आहे. याच प्रमाणें आंतर विषयांचे ठायीं संयम करण्यास समर्थ जे नाहींत त्यांस पूर्वीं ज्यांचीं स्वरूपें आणि फलें सांगितलीं आहेत असे जे सूर्य चंद्रादिकांचे ठायीं संयम ते त्यानीं करावे. कांहीं एक स्थूल विषय सूर्य किंवा विष्ण्वादिक यांच्या प्रतिमा किंवा अविच्छिन्न नाद यांचे ठायीं मनाचें धारण म्हणजे स्थापन करून त्याचा अभ्यास झाला म्हणजे आपला देह ही दिसत नाहीं. यास महाविदेहा नामक धारणा म्हणतात. ही सिद्ध झाली म्हणजे चक्षुरादिक इंद्रियें आपापले विषयांचें ग्रहण करीत नाहींत. यास बाह्य विषय प्रत्याहार म्हणावें. आंतर विषय प्रत्याहार पूर्वीं सांगितलाच आहे. जेव्हां चित्त देहाचें स्मरण टाकून पुढें ठेवलेले मूर्त्याकार होतें तेव्हां त्या चित्ताचे मूर्त्याकार तैस वृत्ति म्हणावें. जेव्हां देहाचेंहि स्मरण न करतां केवल ध्येय चतुर्भुजादि मात्राकार होतें तेव्हां त्यास महाविदेहा नामक धारणा म्हणावें ती सिद्ध झाली म्हणजे त्यास बाह्य विषय समाधि म्हणावें. जेव्हां पूर्वापरानुसंधान नसून शब्दार्थांचा उल्लेख होऊन तत्पूर्वक या चतुर्भुजादि मूर्तीचें मी ध्यान-

करतों अशी भावना असून हा समाधि होतो तेव्हां त्यास सवितर्क बाह्यविषय-समाधि म्हणावें. जेव्हां पूर्वापर अनुसंधान नसून शब्दार्थाचा उल्लेख होऊन केवल ध्येय मूर्त्याकार पूर्वोक्त समाधि होतो आणि या मूर्तीचें ध्यान मी करतों अशी ज्यांत भावना नसते तेव्हां त्यास निर्वितर्क बाह्य समाधि म्हणावें. हा सिद्ध झाला म्हणजे योग्यास-जितेंद्रिय म्हणावें, आभ्यंतर प्रत्याहार पूर्वक जेव्हां मनानें कल्पिलेले सूक्ष्म विषयांचे ठायीं पूर्वापरानुसंधान असून शब्दार्थोल्लेख पूर्वक मनाची भावना होते तेव्हां तो-सविचार समाधि आणि पूर्वापरानुसंधान नसून शब्दार्थोल्लेख न होतां मनाची भावना जेव्हां प्रवृत्त होते तेव्हां तो निर्विचार समाधि असें म्हणतात. यांत पूर्वी प्रमाणें सविचारांत मी याचें ध्यान करतों अशी भावना असते. निर्विचारांत ती नसते. पूर्वीचे बाह्य-विषय स्थूला विषयीं आणि आंतर विषय सूक्ष्मा विषयीं जाणावे. हे दोन समाधि सिद्ध झाले म्हणजे योग्यास जितमना असें म्हणावें. जेव्हां मन ध्येय मूर्त्याकारास सोडून सत्व गुणाचे उद्रेका मुळें म्हणजे सत्वगुण वाढला म्हणजे समष्टी मना विषयींचे म्हणजे हें सर्व मीच आहें अशा आकाराची भावना होते तेव्हां त्यास सानंद समाधि म्हणावें. जेव्हां त्याही भावने मन टाकून कोणते ही विषयांचें भान न होतां अस्मि म्हणजे आहें अशाच आकाराची भावना होते तेव्हां त्यास सास्मित समाधि म्हणावें. अस्मितेंत मनविषय विमुख होतें. अहंकारांत मनविषयोन्मुख असतें इतकाच-अस्मिता आणि अहंकार यांचा भेद आहे. या सस्मित समाधीचे अवस्थेंत योग्यास बुद्धि हून निराळा जो महत्तत्वापलीकडील त्वं या पदाचा अर्थ आत्मा त्याचा साक्षात्कार-त्यास झाल्यामुळें जित बुद्धि असें म्हणतात. हें सर्व यतेंद्रिय मनोबुद्धि येणें करून-सूचविलें. त्याचा जितेंद्रिय, जितमना, जित बुद्धि असा अर्थ आहे. जेव्हां पूर्वोक्त अस्मितेचा ही ज्या समाधीनें ठायीं लय होतो त्यास निर्विकल्पक किंवा असंप्रज्ञात समाधि म्हणतात. तो असंप्रज्ञात समाधि एक क्षण भर झालानंतर शंभर यज्ञांचें फल प्राप्त होतें असें श्रुतींत सांगितलें आहे. तो हा मोक्षाख्य असंप्रज्ञात समाधिच पर म्हणजे उत्कृष्ट अयन म्हणजे प्रार्थना करण्याचें स्थान ज्यास आहे तो मोक्षपरायण-मुनि म्हणजे योगी म्हणावा. निर्विकल्पक समाधीचे अवस्थेंत त्यास जीवन्मुक्त असें म्हणतात " विगतेच्छा भयक्रोध : " याची व्याख्या पूर्वी लिहिलीच आहे असा जो-तो सदा म्हणजे बंधक द्वैत प्रतीति कालीं हि मुक्त सारखाच आहे. कारण यानंतर महावाक्या पासून या समाधींत अनुभवलेलें जें आत्म्याचें असंगाद्वितीयानंदरूप त्याचा ब्रह्मत्वें करून साक्षात्कार होऊन अज्ञान नाश होणें इतकेंच व्यवधान आहे. सदामुक्तच आहे येणें करून अहंकारादिक बंध कालत्रयीं ही नाहीं असें सूचविल्यानें तो बंध-मिथ्याच आहे असें सूचविलें. ॥ २७॥ २८ ॥

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ॥ सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥ ॥ ओं तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे संन्यासयोगोनाम पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥**

असा जो पूर्वोक्त योगानें युक्त योगी त्यानें काय जाणावें तें सांगतात. सोपाधिक जें कर्तृरूप किंवा देवतारूप तेणें करून यज्ञ आणि तप यांचा किंवा त्यांचे फलांचा भोक्ता आणि सर्व जीं भूतें किंवा त्यांचीं कार्यें हिरण्यगर्भादिक चेतना चेतन त्यांचा महेश्वर म्हणजे अंतर्यामी नियंता तसाच सर्व भूतांचा सुहृत् म्हणजे प्रत्युपकाराची अपेक्षा न करतां उपकार करणारा सर्व प्रत्ययांचा साक्षी असा जो नारायण त्यास मी स्वात्मत्वें करून म्हणजे स्वात्मा भेदानें जाणून म्हणजे अपरोक्ष (प्रत्यक्ष) करून तत्स्वरूप तेला पावून तंतर शांति म्हणजे निरुपाधिक ब्रह्म स्वरूप कैवल्य मोक्षाप्रत पावतो. येणें करून सोपाधिक ब्रह्म प्राप्ति पूर्वक निरुपाधिक अद्वैत ब्रह्म प्राप्ति होते असें सुचविलें. ॥ २९ ॥

इति श्री मद्भगवद्गीतायां रघुनाथ शास्त्रि कृत भाषा विवृत्तौ पंचमोऽध्यायः ५.

## अध्याय ६ वा.

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ॥ स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १ ॥**

चित्त शुद्ध झालें तरी ध्यान योगा वांचून केवल संन्यासानें जीवन्मुक्ति सुख होत नाहीं यास्तव पूर्वाध्यायाचे ठायीं अति संक्षेपानें जो योग सांगितला त्याचा या अध्यायांत विस्तार सांगण्या साठीं त्या योगाचे प्राप्तीस कारण भूत कर्मयोग आहे म्हणून त्याची स्तुति करतात. अथवा "सर्वकर्माणि मनसा" येथून आरंभ करून संन्यास पूर्वक ज्ञान निष्ठेवर तात्पर्य ठेवून ज्ञाननिष्ठा भगवंतानें सांगितली आणि कर्म करण्यांत दुःख ही फार आहे यास्तव चित्तशुद्धि झाल्या वांचून अकस्मात् सर्व लोक कर्म संन्यासच करतील तर तसें न करावें या साठीं संन्यासा पेक्षांही कर्मयोग श्रेष्ठ आहे अशी कर्म योगाची स्तुति करतात. अशी ही संगति कोणी लावतात. श्रीकृष्ण भगवान् बोलतात - कर्मफलाची इच्छा न करतां अवश्य करावयाचें नित्य नैमित्तिक कर्म जो करतो तोच फलसंकल्पाचा त्याग केल्यामुळें संन्यासी आणि योगी आहे.

निरग्नि म्हणजे विधीनें श्रौत स्मार्त कर्मांचा त्याग करणारा तोच संन्यासी आणि- अक्रिय म्हणजे प्राणायामादि कानें वाणी, मन आणि शरीर यांचे व्यापार ज्यानें- सोडले आहेत तोच योगी असें नाहीं. ॥१॥

## यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ॥ न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥

कोणत्या आदृश्यानें कर्म योग्याची संन्यासी आणि योगी अशी स्तुति करतां असें म्हणाल तर त्या विषयीं फल संकल्पाचा त्याग करणें या सामान्य गुणानें कर्मयोग्यास संन्यासी आणि योगी म्हणावें असें सांगतात. हे पांडवा अर्जुना, ज्यास कर्मफल- त्यागानें संन्यासी असें म्हणतात. तो त्याच सामान्य गुणानें योगी असें जाण. संकल्प त्याग करणारा तो संन्यासी असें मोक्ष शास्त्रांत सांगितलें आहे, ध्यान योगी ही संकल्प त्याग केल्या वांचून होत नाहीं. यास्तव त्या पूर्वोक्त सामान्य गुणानें संन्यासी- आणि योगी यांचें ऐक्यच आहे. जसें व्याघ्र किंवा सिंह यांचे ठाई जो क्रूरत्व रूप- सामान्य गुण आहे तो ज्या पुरुषावर आहे त्यास त्या सामान्य गुणानें व्याघ्रादिक आणि पुरुष यांचें ऐक्य आहे त्यामुळें हा पुरुष व्याघ्र किंवा सिंह आहे असें त्याची स्तुती करण्या साठीं म्हणतात. त्या प्रमाणें संकल्प त्याग करणें या सामान्य गुणानें कर्म- योगी ही संन्यासी आणि योगी आहे अशी त्याची स्तुति केली. योगाधिकार सिद्धि साठीं. निष्काम कर्म करावीं असें दोन श्लोकांचें तात्पर्य. ॥२॥

## आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ॥ योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥३॥ ॥

असें जर आहे तर यावज्जीव कर्मयोगच करावा की काय? अशी शंका होईल तर त्याविषयीं अवधि सांगतात. यम नियमादि अष्टांग युक्त जो योग त्यावर अत्यंत उत्सुकतेनें आरोहण करण्यास इच्छिणारा जो मुनि म्हणजे मननशील त्यास वैराग्य द्वारा कर्म कारण आहे असें बोलतात. वैराग्य उत्पन्न होऊन योगावर आरोहण करण्याची इच्छा उत्पन्न होई तों पावेतों कर्मानुष्ठान करावें असें तात्पर्य. योगारूढ म्हणजे त्या इच्छे नंतर अष्टांग योगानुष्ठाना विषयीं प्रवृत्त झालेला जो मुनि त्यास योगावर पूर्वोक्त आरोहण करण्यास विक्षेप म्हणजे प्रतिबंध करणारें जें कर्म त्याचा शम- म्हणजे विधीकरून त्यागरूप संन्यास कारण आहे यास्तव त्यानें कर्म संन्यास करावा. कर्म संन्यास न केला तर कर्मानुष्ठानाकडे चित्त व्यग्र झालें म्हणजे अष्टांग योगानुष्ठान करण्यास शक्य नाहीं असें तत्त्ववेत्ते बोलतात. ॥३॥

यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ॥ सर्व संकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥

योग शब्दाचा मुख्यार्थ चित्तवृत्ति निरोध वितिरूप समाधीच आहे त्या-समाधीवर ज्यानें आरोहण केलें आहे म्हणजे ज्यास समाधि प्राप्त झाला आहे त्याचा कर्मत्याग अर्थात होतच आहे मग कर्म संन्यास करावा असा त्यास विधिकशास्त्र पाहिजे अशी शंका होईल तर तिचें निराकरण करण्यासाठीं येथें योग शब्दाचा विवक्षित जो अर्थ तो सांगतात. जेव्हां श्रोत्रादिक इंद्रियें त्यांचे जे शब्द, स्पर्श, रूप, रस गंध रूप अर्थ म्हणजे विषय त्यांचे ठायीं आणि त्यांचे श्रवण दर्शनादि द्वारा होणारा जो-भोग म्हणजे सुखादिकाचा अनुभव त्याविषयीं वैराग्याचे दृढता मुळें आसक्त होत नाहीं आणि मनानें ही त्यांचें चिंतन करीत नाहीं आणि हें मला सुख असावें यासाठीं हें मी कर्मादिक करीन इत्यादिक सर्वसंकल्पाचा संन्यास म्हणजे त्याग करतो तेव्हां त्यास योगारूढ असें म्हणावें. ज्यांस तीव्र भोजनाची इच्छा झाली आहे ते दुसरा व्यापार टाकून भोजनासच बसतात. तसें योगावर आरूढ व्हावें म्हणजे योगच करावा. अशी ज्यांस इच्छा तीव्र झाली आहे ते कर्म संन्यास करून योगारूढच होतात. योगारूढ होईपर्यंत कर्में करावीं नंतर टाकावीं असें तात्पर्य. ॥ ४ ॥

उद्धरेदात्मनाऽऽत्मानं नात्मानमवसादयेत् ॥ आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥

विषयासक्तीनें बंध होतो आणि तिचे त्यागानें मोक्ष होतो असें जाणून क्रमें करून कर्मानुष्ठान द्वारा चित्तशुद्धीनें संपादन करून योगारूढ होत्साता अभ्यास आणि वैराग्य यांचे बलानें आपणाच म्हणजे मनानेंच विवेक द्वारा आपला उद्धार करावा. म्हणजे आपणास संसारांतून काढावें अधोगतीस नेऊंनये कारण आत्मा त्मनः म्हणजे आपला बंधु म्हणजे उद्धाररूप हित करणारा आत्मा म्हणजे विषयासक्ति रहित मनच आहे. पुत्र भार्यादिक समर्थ नाहींत आणि आत्मनः म्हणजे आपला रिपु म्हणजे संसार संकटांत घालणारा शत्रु आत्मा म्हणजे विषयासक्त मनच आहे. ॥ ५ ॥

बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ॥ अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६

मन कोणास बंधु आणि कोणास रिपु कसें होतें तें सांगतात. येन म्हणजे ज्या जीवानें आत्मना म्हणजे आपणच किंवा आपले मनानेंच आत्मा म्हणजे

मन देहेंद्रियादिक जिंन म्हणजे स्वाधीन केले आहेत त्या जीवास त्याचें मन बंधु म्हणजे उपकार करणारें होतें अनात्मनः म्हणजे ज्यानें मन आदिकांचा जय केला नाहीं. त्यास तें मन आदिक स्वाधीन नसल्यामुळें आत्मा म्हणजे मन आदिक शत्रुत्वाविषयीं वर्तेत म्हणजे राहतें म्हणजे शत्रूच होतें. ॥ ६ ॥

## जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ॥ शीतोष्णसुखदुःखेषु तथामानापमानयोः ॥ ७

ज्यानें मन आदिक आत्मा जिंकला त्यास मन बंधु होतें असें जें सांगितलें तेंच मनोजयाचें फल सांगून स्पष्ट करून दाखवितात. ज्यानें मन आदिकांचा जय केल्या मुळें प्रशांत म्हणजे सुख दुःख शीतोष्णादिक किंवा मानापमान प्राप्त झाले असतां ही ज्याचें मन विकार न पावतां शांत असतें असा जो योगी त्याचा आत्मा म्हणजे मन, परं म्हणजे उत्कर्ष करून समाहित म्हणजे समाधी प्रत पावतें यास्तव योगरूप समाधीचे सिद्धीसाठीं मनाचाच जय करावा. ॥ ७ ॥

## ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः ॥ युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥ ८ ॥

समाधि सिद्धीचें फल सांगतात. ज्ञान म्हणजे शास्त्र आणि गुरु यांचें उपदेशा पासून झालेलें परोक्षात्म ज्ञान आणि विज्ञान म्हणजे श्रुतार्थाचें मनन निदिध्यासनें करून झालेला ब्रह्मात्म विषयक अपरोक्षानुभव त्यानीं विषय म्हणजे विषयीं ज्याची बुद्धि तृप्त झाली आहे याच कारणामुळें कूटस्थ म्हणजे सांसारिक तापानें त्यास विकार नाहीं असा. येणें करून समाधीचें फल सांगितलें आतां त्याचेंच लोकांत जें प्रसिद्ध लक्षण आहे तें सांगतात. इंद्रियांचा जय ज्यानें केला आहे त्या योगानें लोष्ट म्हणजे मृत्तिकेचा गोळा तसाच अश्म (पाषाण) आणि कांचन (सुवर्ण) हीं ज्यास समानच आहेत असा जो योगी त्यास युक्त म्हणजे योग सिद्ध असें विद्वान म्हणतात. ॥ ८ ॥

## सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ॥ साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥ ॥

तें समत्वच स्तुती करून पुनः विशेषें करून सांगतात. सुहृत् म्हणजे प्रत्युपकाराची अपेक्षा न धरतां किंवा न सांगतां हितकर्ता, मित्र म्हणजे सांगितल्यानंतर हित कर्ता किंवा स्नेहवान् अरि म्हणजे शत्रु उदासीन म्हणजे वादि प्रतिवादी किंवा दुसरे कोणी त्यांचा पक्षपात न करणारा मध्यस्थ म्हणजे दोघांच्या हिताचे इच्छे-

नें मध्यस्थी करणारा, द्वेष्य म्हणजे आपलें अप्रिय करणारा, बंधु म्हणजे संबंधी,-साधू म्हणजे पुण्य करणारे, पाप म्हणजे पापकर्म करणारे यांचे ठायीं कोणाचें काय कर्म आहे याचा विचार न करतां समान आहे बुद्धि ज्याची असा जो आहे तो विशिष्यते म्हणजे श्रेष्ठ आहे. ॥ ९ ॥

**योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ॥**
**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १०**

आतां योगारूढानें योगाभ्यास कसा करावा तें सांगतात. योगाभ्यासतत्पर जो योगी त्यानें रहसि म्हणजे एकांत स्थलीं स्थित आणि एकाकी म्हणजे-कोणी ज्यास सहाय नाहीं असा किंवा संन्यासी आणि यत म्हणजे स्थिर केलें आहे-चित्त आणि आत्मा म्हणजे देहेंद्रियादिक ज्यानें आणि निर्गत म्हणजे गेली आहे आशी म्हणजे योगसिद्धि वांचून दुसऱ्या विषया विषयींची प्रार्थना ज्याची एकनिष्ठ आणि एकाकी किंवा संन्यासी असला तरी बहुत पुस्तकादिकांचा परिग्रह म्हणजे संग्रह ज्यास नाहीं अथवा स्त्री पुत्रादिकांचा जो परिग्रह तेणें करून रहित असा होत्साता आत्मानं म्हणजे बुद्धीमन युंजीत योगानें युक्त करावी. ॥ १० ॥

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ॥**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरं ॥ ११**

योग कसा करावा अशी जिज्ञासा ( जाणण्याची इच्छा ) झाल्यास त्याचीं आसनादिक अंगें आणि अनुष्ठान प्रकार सांगतात. शुचि म्हणजे स्वभावतः किंवा उदक गोमयादिकाचे संस्कारानें शद्ध केलेल्या पुण्य देशाचे ठायीं स्थिर आणि फार उंच नव्हे फार सखल नव्हे आणि कृष्णाजिनावर चैल म्हणजे कंबलादिक-वस्त्र आणि कुश दर्भावर कृष्णाजिनादिक आणि स्थंडिल ( ओटा ) त्यावर कुश-अशा आसनाचें स्थापन करून. ॥ ११ ॥

**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ॥ उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२**

त्या आसनाचे ठायीं उपविश्य ( बसून ) यत म्हणजे जिंकल्या आहेत विषय स्मरण रूप चित्ताच्या क्रिया आणि विषयग्रहण करणें अशा इंद्रिय क्रिया-ज्यानें असा होऊन बाह्य आणि आंतर विषयांनीं असंग झालेलें मन एकाग्र म्हणजे एकच आत्मतत्त्व ज्यास अग्रभागीं स्फुरतें दुसरें कांहीं स्फुरत नाहीं असें दुसऱ्या-विषयाकार वृत्ति ज्यांत नाहींत असा जो आत्मतत्त्वाकार अविच्छिन्न वृत्ति प्रवाह

तद्यत्न करून मनाची स्थिरता झाली म्हणजे आत्मविशुद्धये म्हणजे मनाचे विशुद्धी साठीं पूर्वोक्त वृत्ति प्रवाहाचाहि जो शेष तद्रूप योग करावा. ॥ १२॥

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः॥ संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन्॥१३**

चित्ताच्या एकाग्रतेचे उपयोगी जी देहेंद्रिया दिकांची धारणा ती दोन श्लोकांनीं सांगतात. योगाभ्यास करणारानें स्थिर म्हणजे निश्चल होत्साता दृढ प्रयत्न करून शरीराचा मध्य, मस्तक आणि ग्रीवा म्हणजे मान यांप्रत अचल आणि समान धारण करून म्हणजे मूलाधारा पासून मस्तक पर्यंत शरीर भाग निश्चल आणि ज्यांत वक्रता नाहीं असा सरल राही असें बसावें आणि नेत्र मिटले तर निद्रा येऊन मनाचा लय होईल. चांगले उघडे ठेवलेतर बाहेर रूपादि विषयां कडे जातील हीं दोन्हीं न व्हावीं या साठीं अर्धे उघडे अर्धे मिटलेले असे नेत्र ठेवून नासाग्र दृष्टी होऊन इकडे तिकडे दिशां कडे न पाहाणारा असा. ॥१३॥

**प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः॥ मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः॥१४**

युक्त म्हणजे योग युक्त योगी यानें गुरुशुश्रूषा, भिक्षा, भक्ति इत्यादिक जें ब्रह्मचारीचें व्रत त्याचे ठायीं स्थित म्हणजे त्या व्रताचें अनुष्ठान करणारा असा होत्साता मनः संयम्य म्हणजे मनाचा निग्रह करून मच्चित्तः ( माझे ठायींच आहे चित्त ज्याचें ) आणि मत्परः मीच सर्व भूतांचा आत्मा वासुदेव आहें पर ज्यास म्हणजे उत्कृष्ट पुरुषार्थ लें करून पावावयास योग्य मीच आहें असें मानणारा कोणी स्त्री चित्त असता तरी स्त्रीपर म्हणजे स्त्रीच सर्वांहून श्रेष्ठ मानीत नाहीं तर राजा किंवा देवत सर्वांहून श्रेष्ठ असें मानितो म्हणून तो तत्पर नव्हे अथवा कोणी परमेश्वर किंवा राजा यांवर चित्त असतां ही त्याचे आराधनानें जें इष्टफल आपणास पाहिजे त्या फला विषयींचा तो तत्पर असतो. हा तर मच्चित्त असून माझेच ठायीं मनाचें स्थापन करून मीच परम पुरुषार्थ रूप आहें दुसरें मज वांचून नाहीं असा मत्पर आहे याच कारणास्तव प्रशांतात्मा म्हणजे बाह्य आणि आंतर विषय सुखाचा त्याग करून आणि समाधी पासून होणाऱ्या सुखाचा ही त्याग करून शांत आहे आत्मा म्हणजे चित्त ज्याचें असा पूर्वोक्त अस्मिता मात्र शेष राहिली ज्याची असा होऊन विगत भी म्हणजे पूर्वोक्त भय रहित होत्साता आसीत असावें. या अवस्थेसच सत्व पुरुषान्यता ख्याति किंवा ब्रह्मात्म साक्षात्कार असें म्हणतात. या अवस्थेची प्राप्ती झाली म्हणजे पुरुष परम पुरुषार्थ भागी होतो. ॥१४

युंजन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः॥ शां-
तिं निर्वाण परमां मत्संस्थामधिगच्छति॥१५॥

या अवस्थेचें फल सांगतात. या प्रमाणें सर्वदा निरंतर आत्मानं म्हणजे मनास युंजन् म्हणजे समाधीनें युक्त करणारा योगी नियत मानसः म्हणजे योगशास्त्रोक्त ख्याति फला पासून ही निरिच्छ केलें आहे मन ज्यानें असा होत्साता निर्वाणपरमां मत्संस्थां शांतिं अधिगच्छति म्हणजे निर्विकल्प पद प्राप्ति रूप मोक्षच आहे उत्कृष्ट फल जीचें आणि माझेच ठायीं संस्था म्हणजे ऐक्य भावानें स्थिति किंवा समाधीची प्राप्ति होते तीणें करून अशा शांतीप्रत म्हणजे वैराग्या प्रत पावतो. ध्यानाचे ठायीं फलाची इच्छा न करणारास सत्व रज तमो गुणात्मक प्रधानाहून भिन्न जो पुरुष त्या विषयींचा, सर्व गुणांचे ठायीं मिळावयाचें तें मिळालें, जाणावयाचें तें जाणलें, करावयाचें तें केलें, टाकावयाचें तें टाकलें, देहादिक मी नाहीं, हे माझे नव्हेत. असा जो आत्मानात्म विवेक साक्षात्कार होतो त्यास विवेक ख्याति म्हणतात. तिचे सर्व वृत्तींचा निरोध करावा अशा इच्छेचे सहायानें ज्यास धर्म मेघ समाधी म्हणजे मेघा प्रमाणें प्रज्ञा आणि मोक्ष यांस अनुकूल योगज धर्म ज्यास म्हणतात अशा पुण्याचा वृष्टि करणारा समाधि म्हणतात. तेणें करून तद्रूप फल होतें. सांगितलेले पुरुषाचा आणि त्रिगुणात्मक प्रधानाचा जो विवेक त्याच्या साक्षात्कारास पुरुषख्याति म्हणतात. त्याचें फल गुण वैतृष्ण्य म्हणजे स्वर्गातील किंवा या लोकचे सर्व भोगांवरील तृष्णा जाणें असें जें उत्कृष्ट वैराग्य तें होतें. याचेंच मोक्षरूप फलनांतरीयक म्हणजे अवश्य होणारें असें योगी म्हणतात. सत्व आणि पुरुष यांची जी अन्यता म्हणजे विवेक त्याचे साक्षात्कारा पासून सर्व नियंतृत्व सर्वज्ञत्वादिक फल होतें अशीं हीं विवेक ख्याति, पुरुषख्याति, सत्व पुरुषान्यता ख्याति या नांवांच्या ख्यातींचीं फलें योग शास्त्रांत सांगितलीं आहेत. ॥१५॥

नात्यश्नतस्तु योगोस्ति न चैकांतमनश्नतः॥ न
चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन॥१६॥

या प्रमाणें योगाभ्यास निष्ठ जो झाला त्यास आहारादिकाचा नियम सांगतात. हे अर्जुना, अत्यश्नतः म्हणजे फार भोजन करणारास आणि अनश्नतः म्हणजे अगदींच भोजन न करणारास चित्त वृत्ति निरोध रूप योग किंवा समाधि सिद्ध होत नाहीं आणि अति स्वप्नशीलस्य जाग्रतश्च योगो न म्हणजे फार निद्रा करणारास किंवा फार जागरणच करणारास ही योग सिद्ध होत नाहीं. ॥१६॥

**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ॥ युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥१७**

तर योग कोणास होतो तें सांगतात. ज्याचा आहार, विहार (फिरणें) युक्त म्हणजे नियमित किंवा अमुक वेळेस इतकेंच खावयाचें अमुक वेळेस इतकेंच फिरावयाचें, अशा नियमाचें आहेत आणि या वांचून दुसरीं जीं बोलणें पाहणें ऐकणें इत्यादि कर्मे त्यांचे ठायीं ही ज्याच्या चेष्टा म्हणजे व्यापार परिमितच आहेत आणि ज्याचे स्वप्नावबोध म्हणजे निद्रा आणि जागरण अमुक वेळ निद्रा किंवा जागरण करावयाचें अशा नियमाचे परिमितच आहेत त्यास दुःखनाश करणारा योगसिद्ध होतो.१७

**यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ॥ निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥१८**

केव्हां योगी होऊन " शांतिं निर्वाणपरमां " येणें करून सांगितलेल्या शांतीला पावतो. त्याचीं लक्षणें सहा श्लोकांनीं सांगून स्पष्ट करतात. जेव्हां विनियत म्हणजे विशेषें करून एकाग्रतेला पावलेलें चित्त बाह्य विषयाचें चिंतन न करतां आत्म्याचेच ठायीं अवतिष्ठते म्हणजे स्थिति पावतें. पूर्वोक्त अस्मिता हीनसते आणि सर्व जे जागृति स्वप्न आणि सविकल्प समाधीचे ठायीं प्राप्त झालेले काम म्हणजे विषय त्यां विषयीं निर्विकल्पक समाधीनें सर्वात्मत्व प्राप्त झाल्यामुळें निःस्पृह होतो तेव्हां त्या योग्यास युक्त म्हणजे निर्विकल्पक योगी असें म्हणतात. ॥१८॥

**यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ॥ योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥१९**

एकाग्रता वस्थेचे ठायीं योग्याचें चित्त कसें असतें त्या विषयीं उपमा सांगतात. निवातस्थ म्हणजे निर्वात प्रदेशीं राहिलेला जसा दीप नेंगते म्हणजे चलन पावत नाहीं ही उपमा आत्म्याविषयींचा योग करणारा जो योगी त्याचे एकाग्र केलेले चित्तास योगवेत्त्यानीं सांगितली आहे यावरून योग्याचें चित्त योगकालीं तसें निश्चल झालें पाहिजे असें तात्पर्य. ॥१९॥

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ॥ यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥२०॥**

इष्ट प्राप्तिरूप योगाचें फल सांगतात. यत्र म्हणजे ज्या कालीं योग सेवेनें म्हणजे योगाभ्यासानें निरुद्ध म्हणजे बाह्य विषयाकडे संचार करण्या पासून नि-

वारण केलेलें चित्त उपरमते म्हणजे लय पावतें आणि ज्या काळीं आत्मना म्हणजे-समाधीनें परि शुद्ध झालेल्या अंतःकरणानें चैतन्य, आनंद ज्योति स्वरूप आत्म्या-प्रत अपरोक्षत्वें करून अनुभवून किंवा पाहून तुष्यते म्हणजे संतोष पावतें अर्थात् बाह्य विषयांचे ठायीं संतोष पावत नाहीं त्यास योग म्हणावें असा पुढें चवथ्या श्लोकांत अन्वय आहे. ॥ २० ॥

**सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ॥ वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्वतः ॥ २१ ॥**

आणि आत्यंतिक म्हणजे अनंत आणि इंद्रियांस अगोचर म्हणजे इंद्रियांचे आणि विषयांचे संबंधा पासून उत्पन्न न होणारें यास्तवच इंद्रियांची अपेक्षा न करतां केवळ बुद्धीनेंच जें अनुभवास येतें अशा सुखा प्रत वेत्ति म्हणजे अनुभवितो. आणि पूर्वोक्त आत्म स्वरूपाचे ठायीं स्थित असतां अयं म्हणजे विद्वान् आत्म-स्वरूपा पासून तत्वतः चलन पावत नाहीं. आत्म्याचा आणि बुद्धीचा तादात्म्या ध्यास जेव्हां आहे तेव्हां चलन पावल्या प्रमाणें भासला तरी परमार्थतः (यथार्थत्वें करून) चलन पावत नाहीं यास प्रमाण बुद्धि ध्यान करीत असतां हा ध्यान करणारा प्रमाणें दिसतो. बुद्धि चंचल झाली म्हणजे चंचल झाल्या प्रमाणें दिसतो अशा अर्थाचे श्रुतींत ध्यान चांचल्य वास्तविक आत्म्याचे ठायीं नाहीं. बुद्धीचे तादात्म्याभिमानानें-झालेलें नाहीं, तें मिथ्याच आहे असें जें सांगितलें तें आहे. ॥ २१ ॥

**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ॥ यस्मिं स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२**

चलन न पावण्यास कारण सांगतात. ज्या निरतिशय सुखरूप आत्मस्वरूपाचा लाभ योगाभ्यासानें झाला म्हणजे त्याहून दुसरा लाभ अधिक आहे असें-मानित नाहीं आणि ज्या योगाभ्यासानें आत्म स्वरूप सुखाचे ठायीं स्थित असतां गुरु म्हणजे मोठें जें शस्त्र पातादिक किंवा शीतोष्णा दिक दुःख तेणें करून ही चलन पावत नाहीं. येणें करून अनिष्ट दुःखादि निवृत्तिरूप ही फल योगाचें सांगितलें. ॥ २२ ॥

**तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योग संज्ञितम् ॥ स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥ २३**

"यत्रोपरमते चित्तं" येथून आरंभ करून जितकीं विशेषणें सांगितलीं तितक्या विशेषणानीं युक्त असा योग सांगितला. त्यास दुःखाचा जो संयोग म्हणजे संबंध त्याचा आहे वियोग म्हणजे नाश ज्या अवस्थेंत त्या अवस्थेस योग अशी संज्ञा केली

आहे असें जाणावें. यावरून समाधि स्वरूप जो योग तोच स्वरूपें करून आणि फ-लें करून मुख्य आहे. पूर्वी कर्मासच योग अशी संज्ञा केली ती या मुख्य योगास कर्म-साधन आहे या अभिप्रायानें केली असें जाणावें. योग स्वरूप आणि फल सांगण्याची समाप्ति करून निश्चय आणि अनिर्वेद यांस योग साधनत्व आहे असें सांगण्या साठीं योगाची कर्तव्यता सांगतात. तो पूर्वोक्त योग मोठें फल देणारा आहे यास्तव शास्त्राचे आणि गुरूचे उपदेशां पासून योग स्वरूप आणि त्याचे अभ्यासाचा अनुष्ठान प्रकार यांचा निश्चय करून घेऊन असा दुर्घट योग कसा सिद्ध होईल असा खेद ज्यापासून गेला आहे अशा मनानें प्रयत्न शिथिल न करतां मोठे प्रयत्नानें करावा. ॥२३॥

## संकल्प प्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः॥ मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः॥२४॥

हें मला असावें अशा मनो वृत्ति रूप संकल्पा पासून उत्पन्न होणारे जे म-नांतील काम म्हणजे विषयांच्या ज्या इच्छा त्यांस अशेषतः म्हणजे वासना सुद्धां टाकून- येणें करून शम सांगितला. आतां दम सांगतात, आणि मनानेंच विषयांव-रील दोष दृष्टीनें सर्व इंद्रियांचा बाह्य विषयां पासून निग्रह करून पूर्वोक्त योगाभ्या-स करावा. ॥२४॥

## शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया॥ आ-त्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत्॥२५

जर जन्मांतरीय कर्म योगें करून मन चंचल होईल तर त्याविषयीं सांग-तात. शनैः शनैः म्हणजे अभ्यासाचे क्रमानें किंवा भूमिकेचा क्रम योग शास्त्रांत सां-गितला आहे. त्या क्रमानें " धृत्यायया धारयते मनः प्राणें द्रिय क्रियाः॥ योगेनाव्यभि-चारिण्या धृतिःसापार्थ सात्विकी॥ " असें पुढें लक्षण जिचें सांगतील त्या धृतीनें म्हण-जे धैर्यानें गृहीत म्हणजे वश केलेल्या बुद्धीनें सर्व दिव्य आणिया लोकांतील विषयां पासू-न उपरम करावा आणि आत्म्याचे स्वरूपाचेच ठायीं आहे संस्था म्हणजे उत्तम प्रकार-ची स्थिती ज्याची असें मनन करून म्हणजे सर्व आत्माच आहे त्याहून दुसरें कांहीं नाहीं असें एकाग्र वृत्ति करून- येणें करून संप्रज्ञात समाधि सांगितला त्यांत पूर्वा-भ्यास वशें करून मी या ध्येयाचें ध्यान करतों असा संबंध आहे त्याचें निराकरण हो-ऊन असंप्रज्ञात समाधि सांगतात. किंचित् म्हणजे कांहीं ही म्हणजे ध्याता आणि-ध्यान अशा विभागापन ही जाणूं नये आणि सुषुप्ती प्रमाणें अखंड सच्चिदानंदात्मक आत्म रूपानेंच राहावें. ॥२५॥

## यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम्॥ त-

## तस्ततोनियम्यैतदात्मन्येव वशंनयेत्॥२६॥

शनैः शनैः उपरम करावा असें सांगितलें तोच उपरम कसा करावा तें सांगतात. ज्याज्या विषया मन ग्रहण करण्यासाठीं इंद्रियांचे द्वारा मन बाहेर गमन करतें. त्या त्या विषयावरील दोष मनांत आणून त्या त्या पासून आवरणें (काढणें) असा मनाचा प्रत्याहार करून त्याचें आत्मस्वरूपाचे ठायींच स्थापन करावें. ॥२६॥

## प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमं ॥ उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥२७॥

या प्रमाणें मन आत्मवश म्हणजे आत्म्याचे ठायीं स्थिर केलें म्हणजे त्या अभ्यासानें चंचल स्वभाव जो रजोगुण त्याचा नाश झाल्यामुळें मन वश करणारास सुख होतें असें सांगतात. बाह्याभ्यंतर विषय त्यागानें प्रशांत म्हणजे रजोगुणें करून रहित झालें आहे मन ज्याचें आणि शांत म्हणजे क्षीण झाला आहे रज म्हणजे रजो गुणाचें कार्य क्लेशादिक ज्याचें असा जो उपरत मनाचा योगी त्यास एकाग्रता भूमीचे ठायीं ब्रह्मभूत म्हणजे सद्रूप ब्रह्म स्वरूप, उत्तम म्हणजे निरतिशयित आणि अकल्मष म्हणजे पुण्य पापाचे वैषयिक सुख दुःख रूप फलानें किंवा पुण्य पापानें रहित जें सुख तें उपैति म्हणजे प्राप्त होतें. या विषयीं एकाग्र चित्त झालें असतां जो सद्रूप ब्रह्मरूप अर्थाचा प्रकाश करतो, कर्मबंधनें शिथिल करतो, क्लेशांचा क्षय करतो, त्यास संप्रज्ञात समाधि असें म्हणतात. असें योग भाष्यांत सांगितलेलें प्रमाण आहे, ब्रह्माकार मनाचे वृत्तीनें जो ब्रह्मभूतच झाला आहे आणि योगाभ्यासानें ज्याचें पाप गेलें आहे अशा योग्यास उत्तम जें समाधि सुख तें प्राप्त होतें अशीही कोणी व्याख्या करतात. ॥२७॥

## युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः॥सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते॥२८॥

या प्रमाणें आत्मस्वरूपाचे ठायीं मनाचें उत्तम प्रकारें स्थापन करणारा आणि पूर्वीं सांगितलेले योगाचे विघ्नानीं रहित असा योगी विगत म्हणजे गेलें आहे कल्मष म्हणजे अविद्या क्लेश किंवा पाप ज्याचें असा होत्साता सुखें करून म्हणजे अनायासें करून अत्यंत म्हणजे द्रष्टा दृश्य रूप जो परिच्छेद म्हणजे भेद तद्रहित ब्रह्मसंस्पर्श म्हणजे अखंड अद्वितीय ब्रह्माचा आहे संस्पर्श म्हणजे निरुपाधिक ऐक्य ज्यास असें जें ब्रह्म सुख त्याप्रत अश्नुते म्हणजे स्वात्मस्वरूपानें अनुभवितो. ॥२८॥

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ॥ ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥**

संप्रज्ञात, असंप्रज्ञात समाधिरूप दोन्ही योगांचें फल सांगतात. सोपाधिक आणि निरुपाधिक या दोहों भेदानें ब्रह्मवेत्ता दोन प्रकारचा आहे जो सर्वांचे ठायीं आपलें तादात्म्य पाहतो तो सोपाधिक, जो सर्व उपाधीनीं रहित शुद्ध अद्वितीय स्वरूप तो निरुपाधिक असें शास्त्रांत सांगितलें आहे त्या प्रमाणें संप्रज्ञात समाधींत घट कुंडलादिकांचे ठायीं त्याचें उपादान कारण मृत्तिका सुवर्णादिक जसें आहे त्या प्रमाणें सर्व भूतांचे ठायीं उपादान कारण स्वरूपानें आत्मस्वरूप राहिलें आहे असें योगानें युक्त म्हणजे समाधिस्थ झाला आहे आत्मा म्हणजे चित्त ज्याचें तो पाहतो आणि असंप्रज्ञात समाधीचे ठायीं ब्रह्मादिक स्तंब पर्यंत सर्व भूतांप्रत आत्म्याचे ठायीं आत्म सत्तेनेंच पाहतो. सर्प जसा रज्जूवर रज्जूचेच सत्तेनें आहे त्या प्रमाणें या योग्याची व्युत्थान ( समाधिविसर्जन ) समयीं स्थिति सांगतात सर्वत्र ब्रह्मादि स्थावरांत सम विषम भूतांचे ठायीं निर्विशेष स्वरूप ब्रह्माचें दर्शन ज्यास आहे असा तो असतो. २९

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ॥ तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३०**

अशाया आत्मैकत्व दर्शनाचें फल सांगतात. जो मी म्हणजे सर्वांचा आत्मा जो मी या प्रत पूर्वी सांगितल्या प्रमाणें उपादान कारण स्वरूपानें सर्वत्र पहातो आणि सर्वांप्रत अधिष्ठानभूत जो मी त्याचे सत्तेनेंच पहातो त्या योग्यास मी सर्वात्मा न प्रणश्यामि म्हणजे अदृश्य होत नाहीं म्हणजे ज्ञानानें अज्ञानाच्या आवरणाचा नाश झाला म्हणजे स्वात्मलाभें प्रकाशित झालेला मी पुनः आवृत होत नाहीं. कार्य देहेंद्रियादिक कारण अज्ञान यांच्या समुदायावर अभिमान ठेवणारा जो सोपाधिक जीव त्यानें अभिमान त्याग करून स्वात्मलें करून जाणलेलें स्वाधिष्ठान भूत ब्रह्म स्वरूप पुनः आच्छादित होत नाहीं. परंतु शुक्तीवर अध्यस्त रजत जसें शुक्तिस्वरूप अधिष्ठानाच्या ज्ञानानें समूल नाश पावतें तसें ब्रह्मस्वरूप अधिष्ठानाचे ठाईं अध्यस्त म्हणजे भ्रमानें कर्तृ भोक्तृ स्वरूपाप्रत पावलेले सोपाधिक जीव रूपाचें अधिष्ठान जें ब्रह्म त्याच्या साक्षात्कारानें समूल नाश पावेल तर मोक्षफल कोणास होईल अशी शंका येईल तर त्या विषयीं सांगतात. स च म्हणजे तो जीव ही मला न प्रणश्यति म्हणजे अदृश्य होत नाहीं. तात्पर्य — जीव जर माझे ठायीं अध्यस्त असेल तर त्याचा पूर्वोक्त नाश होईल तसें नाहीं. महावाक्यानीं जीवाचा आणि ब्रह्माचा भेद नाहीं असें सांगितलें आहे यावरून जीव स्वरूप माझे हून भिन्न

नाहींच असें असून अज्ञानानें केलेले आवरणामुळें जो देहादिक उपाधीवर आत्मत्व भ्रम झाला तो मात्र ज्ञानानें समूळ नाश पावतो आणि आपलें स्वरूप ब्रह्म अभिव्यक्त होतें. ॥३०॥

## सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः॥ सर्वथा वर्तमानोपि स योगी मयिवर्तते॥३१॥

सर्वात्मैकत्व दर्शी जीव स्वरूप मीच आहें यास्तव त्याच्या मोक्षास प्रतिबंध होत नाहीं असें सांगतात. सर्वोपादान कारण स्वरूप सर्व भूतांचे ठायीं सद्रूपें करून स्फुरण रूपें करून स्थित जो मी त्या प्रत जो जीव ब्रह्माचें ऐक्य रूपानें जाणून निर्विकल्पक समाधीनें भजतें म्हणजे सेवितो तो योगी समाधीपासून जेव्हां उठतो तेव्हां त्या अवस्थेंत ज्ञानानें बाधित झालेल्या पूर्व संस्कारानें प्रारब्ध कर्म वशें करून देहावर अभिमान ठेवणारा प्रमाणें सर्वथा याज्ञवल्क्या सारखा कर्म त्याग करून किंवा वसिष्ठ जनकादिकांसमान विहित कर्मानुष्ठानानें किंवा दत्तात्रेयादिकां प्रमाणें निषिद्ध कर्माचरणानें व्यवहार करीत असतां ही विधि किंकर तो नाहीं यामुळें माझे ठायींच रहातो मत्स्वरूप मोक्षा पासून च्युत होत नाहीं. त्या ब्रह्मवेत्त्याचें ऐश्वर्य च्युत करण्यास देवही समर्थ नाहींत. तो देवांचा आत्मा आहे या अर्थाच्या श्रुती वरून त्याचे मोक्षास प्रतिबंध करण्यास देवही समर्थ होत नाहींत. पूर्वोक्त ज्ञानी मला अदृश्य होत नाहीं आणि मी त्याला अदृश्य होत नाहीं, अशास मी प्रत्यक्ष होऊन कृपा दृष्टीनें त्यास पाहून त्यावर अनुग्रह करतों असें ही तात्पर्य कोणी बोलतात. ॥३१

## आत्मौपम्येन सर्वत्र समंपश्यति योर्जुन॥ सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः॥ ३२॥

जरी निषिद्ध कर्मे करून ही आत्मवेत्त्यास मोक्षा विषयीं प्रतिबंध होत नाहीं तथापि विहित कर्मशील योगीच श्रेष्ठ आहे. असें सांगतात. अथवा मला भजणाऱ्या योग्यां मध्यें ही सर्व भूतांवर दया करणारा श्रेष्ठ आहे असें सांगतात. मला सुख जसें प्रिय आहे आणि दुःख जसें प्रिय नाहीं या प्रमाणेंच सर्वांस ही सुख प्रिय आहे आणि दुःख प्रिय नाहीं. असें आपले सादृश्यानें सर्वत्र जो पहातो म्हणजे सर्वांस सुखच असावें असें इच्छितो तो हे अर्जुना, अहिंसक योगी परम ह्मणजे श्रेष्ठ मला मान्य आहे. ॥३२॥

## अर्जुन उवाच॥ ॥योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन॥ एतस्याहं न पश्यामि चं-

## चलत्वात् स्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥

सांगितल्या प्रमाणें साम्यें करून योग होणें अशक्य आहे असें मानून - अन्य उपाय असेल तर तें समजावें अशा इच्छेनें अर्जुन प्रश्न करितो हे मधुदैत्य मथना कृष्णा, जो हिंसा न करणें या प्राधान्यानें संन्यास पूर्वक सूत्रें प्रमाणें मनांत कांणती ही वृत्ति न उठणें किंवा विक्षेप म्हणजे विरुद्ध वृत्ति न होणें यानीं रहित होऊन केवल आत्माकार वृत्तीनें माझी स्थिति होणें किंवा सर्व वृत्तींचा निरोध करणें असा जो योग तूं सांगितलास त्याची मनाचे चंचलत्वा मुळें स्थिर म्हणजे चिर काल स्थिति होईल असें मी पाहात नाहीं. ॥३३॥

## चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ॥ तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥

हे कृष्णा, मन स्वभावें चंचल आहे आणि प्रमाथि म्हणजे देहेंद्रियांचा क्षोभ करणें असें जें मथन तें करणारें आहे आणि बलवत् म्हणजे विचारें करून ही जिंकावयास अशक्य आहे आणि दृढ म्हणजे विषय वासनांनीं भरलेलें आहे या मुळें भेद करण्यास अशक्य आहे यास्तव आकाशांत संचार करणाऱ्या वायूचा कुंभांत आवर करून रोध करण्यास जसा अशक्य आहे त्या प्रमाणें मनाचा ही विषयां पासून निग्रह म्हणजे आवर होणें फार कठिण आहे असें मी मानितों. ॥३४

## श्रीभगवानुवाच ॥ ॥असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ॥ अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥

मन चंचल आहे इत्यादिक जें अर्जुन बोलला त्याचा अंगीकार करून त्याचा निग्रह करण्यास साधन श्रीकृष्ण भगवान् सांगतात. हे महा बाहो अर्जुना, मनाच्या चंचल स्वभावा मुळें त्याचा निग्रह करणें कठीण आहे असें जें तूं बोललास तें. निःसंशय सत्य आहे तथापि हे कुंतीपुत्रा अर्जुना, परमात्माकार मनाच्या वृत्तीचा प्रवाह करण्याचा वारंवार प्रयत्न करणें असा जो अभ्यास तेणें करून किंवा बाह्य ध्येय चतुर्भुजादि मूर्तींचा निरंतर मनांत आणण्याचा जो अभ्यास तेणें करून आणि पाहिलेले, ऐकिलेले जे विषय किंवा त्यांचीं साधनें त्यांचे ठायीं अनित्यत्व अस्थिरत्व इत्यादिक दोष दृष्टीनें त्यां विषयीं तृष्णा न होणें असें जें वैराग्य त्याच्या साधनानें गृह्यते म्हणजे विपरीत वृत्ति होणें असा जो विक्षेप त्याचा प्रतिबंध होऊन विषयां कडे वृत्ति न होतां केवल आत्मा कार वृत्ति स्वरूपानें मन स्थिर होतें. ॥ ३५ ॥

असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ॥ व-
श्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६

पूर्वोक्त अभ्यास आणि वैराग्य या साधनानीं असंयत म्हणजे स्वाधीन झा-
ला नाहीं आत्मा म्हणजे मन ज्याचें असा जो त्यास पूर्वोक्त योग सिद्ध होणें कठीण आ-
हे असें मला वाटतें परंतु त्या दोन साधनानीं वश म्हणजे स्वाधीन झाला आहे आ-
त्मा म्हणजे मन ज्याचें असा आणि यत्न करणारा त्यास उपायें करून म्हणजे प्रयत्ना-
नें योगसिद्ध किंवा प्राप्त होण्यास शक्य आहे. ॥ ३६ ॥

अर्जुन उवाच ॥ ॥ अयतिः श्रद्धयोपेतो योगा-
च्चलितमानसः ॥ अप्राप्य योगसंसिद्धिं कां
गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥

मनाचा निग्रह कठीण आहे यास्तव योगसिद्धी विषयीं विघ्नें आहेत असें मानू-
न अर्जुन प्रश्न करितो. हे कृष्णा, कर्म योगा पासून चलित आहे मानस ज्याचें असा कर्म-
योग सोडलेला पुरुष श्रद्धेनें उपेत म्हणजे योगमार्गात प्रविष्ट झालेला ही अयति म्हण-
जे आयुष्याचे अल्पत्वा मुळें किंवा दृढ वैराग्य नसल्या मुळें योगाभ्यासा विषयीं अल्पप्र-
यत्न झालेला योग सिद्धि म्हणजे योग फल जो ब्रह्मात्म तत्व साक्षात्कार त्या प्रत न पावून
मरण पावला नर कोणते गतीला जातो. ॥ ३७ ॥

कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ॥
अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८

प्रश्नाचा अभिप्राय स्पष्ट करून दाखवितो. योगाभ्यासाचा आरंभ केल्यानें
कर्म सुटलें यामुळें स्वर्गादिक फल त्यास होणार नाहीं, योगाची सिद्धि न झाल्या मुळें-
ब्रह्म मार्गानें गयीं नर विमूढच म्हणजे अज्ञानीच आहे यामुळें मोक्ष फल ही नाहीं. या-
प्रमाणें पुरुषार्थ साधन भूत जे कर्म मार्ग आणि योग मार्ग या दोहों पासून भ्रष्ट होऊ-
न पुरुषार्थ साधनास आश्रय ज्यास नाहीं असा निराश्रय होत्साता जसें पहिले अ-
भ्रा पासून सुटलेलें आणि दुसरे अभ्रास न मिळालेलें अभ्र मध्येंच नाश पावतें
त्या प्रमाणें हे महा बाहो कृष्णा, तो योगभ्रष्ट नाश पावतो काय? ॥ ३८ ॥

एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ॥ त्वद-
न्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥

एतत् म्हणजे या माझ्या संशयाचा अशेषतः म्हणजे साकल्यें करून छे-

द करण्यास तूं योग्य आहेस. हे कृष्णा, तुझ्या वांचून या संशयाचा छेद करणारा कोणी नाहीं. ॥ ३९ ॥

श्रीभगवानुवाच ॥ ॥ पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ॥ न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥

या अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर श्रीकृष्ण भगवान् सांगतात. हे पार्था अर्जुना, त्याचा इह (यालोकीं) नाश म्हणजे नीच योनीची प्राप्ति, अमुत्र (परलोकीं) नाश म्हणजे नरकप्राप्ति हीं दोन्हीं ही होत नाहींत. कारण हे ताता, बाबा अर्जुना, हें लोकरीती प्रमाणें वत्सल तेनें संबोधन आहे. कल्याणकृत् (शुभकर्म करणारा) कोणी दुर्गतीला पावत नाहीं. तुझे प्रश्नांतील पुरुष श्रद्धेनें प्रथम प्रवृत्त झाल्यामुळें शुभ कर्म करणारा होतो यामुळें तो दुर्गतीला जाणार नाहीं. ॥ ४०

प्राप्य पुण्यकृतांल्लोकानुषित्वाशाश्वतीः समाः ॥ शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१

या लोकीं आणि परलोकीं हीं त्यास महत्वच प्राप्त होतें असें सांगतात. पुरुष मरण पावल्या नंतर तो जर सकाम आहे तर अश्वमेधादि पुण्य कर्म करणारास जे प्राप्त व्हावयाचे लोक त्यास जाऊन तेथें बहुत वर्षे पर्यंत राहून त्या लोकांतील सुख भोगून सदाचार संपन्न जे श्रीमंत त्यांचे गृहीं जन्मास येतो. जे सदाचार संपन्न आहेत ते सत्कारणींच द्रव्याचा व्यय करतात. आणि पहिले पेक्षां ही मोठे पदाप्रत जातात. असें तात्पर्य. ४१

अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ॥ एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥

तो योगभ्रष्ट विरक्त आणि निष्काम आहे तर त्या विषयीं सांगतात. अथवा धीमंत म्हणजे ज्ञानसंपन्न जे योगी त्यांचे कुलांत जन्म पावतो. पूर्वी सांगितले जे धनिक ते जर योगी नाहींत तर त्यांचे कुलांत जन्म पावत नाहीं, ज्ञान संपन्न योग्यांचे कुलांत जन्म होणें हें परंपरेनें मोक्षसाधन आहे. यामुळें फार दुर्लभ आहे. ४२

तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ॥ यततेच ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥ ४३ ॥

हे कुरुनंदना अर्जुना, तें जन्म प्राप्त झालें म्हणजे त्यांत पौर्वदेहिक जो-

बुद्धिसंयोग म्हणजे पूर्व देहाचे ठायीं योगाभ्यास करीत असतां जितकी योगभूमि प्राप्त झाली होती त्या भूमिकेंत जितके बुद्धीचा म्हणजे ज्ञानाचा लाभ झाला होता त्याप्रत पूर्वाभ्यासापेक्षां अल्पाभ्यासानेंच पावतो. ततः (तदनंतर) भूयः (पुनः) संसिद्धौ म्हणजे पूर्व भूमिकेपेक्षां ही अधिक योग भूमी सिद्ध व्हावी याविषयीं यतते (यत्न करतो). ॥४३॥

## पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ॥ जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४॥

कोणी शिक्षित नसतां ही कसा यत्न करतो तें सांगतात. अवश्य म्हणजे प्रह्लादादिकां प्रमाणें पिता आदिकांनीं दुसरे मार्गाकडे योजिला तरी पूर्वीचा किंवा प्रतिबंधक कर्मामुळें योगाभ्यासा विषयीं इच्छा न झाली तरी त्या कर्माचा नाश झाल्यावरतो पूर्वाभ्यास तो त्या कर्मा पेक्षां ही बलवत्तर झाल्यावर आपले कडे ओढून घेतो. म्हणजे त्यास योगाविषयीं आसक्त करतो. हेंच स्पष्ट करून दाखवितात. योगा विषयीं जिज्ञासु म्हणजे योगस्वरूपाचें ज्ञान व्हावें असें इच्छिणारा ही शब्दब्रह्माचा म्हणजे वेदोक्त कर्माचें फलाचा अतिक्रम करतो म्हणजे त्याहून अधिक फल त्यास प्राप्त होतें, मग योगाभ्यासाचा ज्यास पूर्वीचा संस्कार आहे तो कर्मादिकांचें उल्लंघन करून पुनः योगाभ्यासाविषयीं प्रवृत्त होईल म्हणून काय सांगावयाचें आहे. ॥४४

## प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ॥ अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५

या प्रमाणें योगभ्रष्टाची गति सांगून विषयांनीं आपलेकडे ओढून नेलेला जो योगाभ्यासाविषयीं पुनः प्रवृत्त होतो. त्याची गती सांगतात. प्राण वायूचा निरोध करण्या विषयीं जो दृढ प्रयत्न म्हणजे खेचरी आदिकरून मुद्रा करण्याचा दृढाभ्यास तेणें करून जो यतमान म्हणजे प्राणायामाभ्यास सिद्धी विषयीं यत्न करणारा तो संशुद्धकिल्बिष म्हणजे निष्पाप होतो. हाच अर्थ प्राणायामानीं दग्ध म्हणजे पाप जातें अशा प्रकारें मनुस्मृतींत सांगितला आहे. याच कारणास्तव तो अनेक जन्मानीं संसिद्ध म्हणजे योगसिद्ध होऊन नंतर ज्ञानद्वारा मोक्षाप्रत जातो. ॥ ४५॥

## तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ॥ कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥४६

याच कारणानें योग्याची स्तुति करतात. कृच्छ्र चांद्रायण मासोपवासादिक तप करणारां पेक्षां योगीश्रेष्ठ आहे आणि ज्ञानी म्हणजे ब्रह्मात्मा परोक्ष ज्ञान नसून जे वृ-

था पांडित्य ज्ञानी त्यांहून ही योगी श्रेष्ठ असें मान्य आहे आणि कर्मी म्हणजे अग्निहो-त्रादि कर्म करणारां पेक्षां ही योगी अधिक श्रेष्ठ आहे यास्तव हे अर्जुना तूं योगी हो. ४६

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ॥ श्रद्धावान् भजते योमां स मे युक्ततमोमतः ॥ ४७ ॥ इतिश्रीमद्भगवद्गीता सूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अभ्यास यो-गो नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥ ॥ श्रीकृष्णा० ॥**

कर्म योगाख्या निरूपणाचे प्राधान्यें करून महा वाक्यांतील त्वंपदार्थां-चा विचार समाप्त करून अतःपर उपासनेचें निरूपण प्रधानत्वें करून महावा-क्यांतील तत्पदार्थाचा विचार सांगावा. या इच्छेनें मांडे फल दाखवून प्रथम उपा-सनेची स्तुति करतात. "देवमेवा परे यज्ञं" एथून जें पंचमाध्यायांत सांगितले स-र्व योगी त्यांमध्यें मद्गतेन अंतरात्मना म्हणजे मी जो वासुदेव भगवान् त्याचे ठा-यीं स्थापन केलेले अंतःकरणानें श्रद्धा युक्त होत्साता मां म्हणजे मजप्रत जो भ-जतो तो मला युक्ततम म्हणजे फारश्लाघ्य, श्रेष्ठ, स्तुत्य असा मान्य आहे, यास्त-व तूं माझा भक्त हो असें तात्पर्य. ॥ ४७ ॥ इतिश्री मद्भगवद्गीता याः रघुना-थ शास्त्रि कृत भाषा विवृत्तौ षष्ठोऽध्यायः समाप्तः ॥ ६ ॥

अध्याय ७ वा.

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ मय्यासक्त मनाः पा-र्थ योगं युंजन्मदाश्रयः ॥ असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥**

पूर्वाध्यायांतीं मला परमेश्वरत्वें करून जो भजतो तो मोठा श्रेष्ठ आहे अ-सें सांगितलें त्या विषयीं पूर्वोक्त निष्काम कर्मयोगापेक्षां तुझें भजन विलक्षण (भि-न्न) कर्मे आणि योगा पेक्षां कोणते गुणानीं तुझें भजन करणारास श्रेष्ठत्व आहे. अशी शंका येईल अथवा तुझें परमेश्वर स्वरूप समजल्या वांचून तुझें भजन कसें हो-ईल अशी शंका येईल तर त्या शंकेचा परिहार आपणच श्री भगवान् करतात. रा-जाचा आश्रय केलेला कोणी पुरुष धन आणि मान यांजकडे आसक्त असतो तसा न होऊन माझेच ठायीं ज्यानें मन आसक्त आहे असा होत्साता मदाश्रय म्हणजे प-रम पुरुषार्थ स्वरूप जो मी त्यानेंच प्राप्तीची इच्छा करणारा आणि योगं युंजन् म्ह-

णजे माझे ठायीं समाधीचें अनुष्ठान करणारा असा होत्साता " सर्वभूतस्थ-मात्मानं " असें जें पूर्वी सांगितलें तेणें करून त्वंपदार्थाचे विचार समयीं जरी माझें ज्ञान झालें असलें तरी ईश्वर जीवाहून भिन्न आहे असें पातंजल म्हणजे योगी किंवा तार्किक मीमांसक म्हणतात. सांख्य ईश्वर नाहीं असें म्हणतात. इत्यादिक पूर्वी सांगितलेले ईश्वर स्वरूपाच्या विषयींचे विवादानें किंवा अज्ञानानें संशय रूपच होण्या जोगें आहे यामुळें समग्र नव्हे या साठीं तत्पदार्थ जो मी ईश्वर याप्रत असंशय म्हणजे संशय रहित(निश्चयात्मक)समग्र ज्ञानानें जसें जाणशील तसें तुला सांगतों. विभूतिबल, ऐश्वर्य येणें करून युक्त मी असा समग्र पदाचा कोणी अर्थ करतात. ॥१॥

## ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः॥ यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते॥२॥

जें पुढें सांगावयाचें तें ऐकण्यास श्रोत्याची श्रद्धा उत्पन्न व्हावी या साठीं त्याचें पूर्वी स्तोत्र करतात. ज्ञान म्हणजे ज्ञानानें प्रकाशित होणारें जें सत्य,ज्ञान, आनंद अद्वितीय स्वरूप इदं म्हणजे जीव स्वरूपाहून भिन्न नव्हे असें सर्वात्मभूत ब्रह्म तें अशेषतः म्हणजे त्याचें ज्ञान होण्यास जीं साधनें त्यां सुद्धां वक्ष्यामि म्हणजे सांगतों. शब्दाचा स्वभाव परोक्षज्ञान उत्पन्न करण्याचा आहे यास्तव स्वर्ग आहे, धर्माधर्म आहेत. या वाक्यां पासून स्वर्ग धर्मादिकांचें जसें परोक्ष ज्ञान होतें त्या प्रमाणें तुमचे वाक्या पासून पूर्वोक्त ब्रह्मस्वरूपाचें परोक्ष ज्ञान मला जरी झालें तरी मी ईश्वर नव्हे. संसारी, सुखी, दुःखी, कर्ता, भोक्ता, बद्ध आहें असा जो मला अपरोक्ष भ्रम झाला आहे त्याची निवृत्ति त्या परोक्ष ज्ञानानें कशी होईल अशी शंका येईल तर त्या विषयीं सांगतात. सविज्ञान म्हणजे अपरोक्ष किंवा अनुभवात्मक ज्ञान या सुद्धां पूर्वोक्त ज्ञान तुला सांगतों. तात्पर्य- जो कधींही अपरोक्ष नव्हे असा जो अर्थ त्याचें परोक्षच ज्ञान वाक्या पासून होतें असा शब्दाचा स्वभाव असला तरी जो नित्य अपरोक्षच असून अज्ञानादि कारणामुळें त्याची अपरोक्षता जाऊन त्यास परोक्षता येते त्या विषयींचें अपरोक्ष ज्ञान वाक्यरूप शब्दा पासून ही होतें. असाही शब्दाचा स्वभाव लोकांत पाहिला आहे यास उदाहरण- तूं दशम आहेस असें वाक्य आहे तें असें- कोणी दाहा पुरुष नदी उतरून पलीकडे गेले परंतु त्या दाहांतील आपण एक असतां ही संख्या करते वेळेस त्यानें आपणास सोडून मोजलें यामुळें नदीचे पलीकडील पुरुषा वरील नऊ या संख्येचे ज्ञानानें मी दाहावा आहें असें विवेक ज्ञान त्याचें नष्ट होऊन मी दाहावा असें तो जाणता न झाला आणि त्या दशमाचे अज्ञानानें आपण दाहावा असतां ही-

दशम दिसत नाहीं तेव्हां दशम नाहीं तो नदींत मरण पावला असें तो बोलूं लागला. हें त्याचे अज्ञानानें केलेलें आवरण म्हणावें आणि त्यामुळें जो शोक हृदय ताडनादिक करूं लागला. हें अज्ञानाचें कार्य आहे. नंतर कोणी आप्त तेथें आला त्यानें त्यासकां शोक करितोस असें विचारल्या नंतर दशम मरण पावला असें त्यानें सांगितल्यावर त्या आप्तानें त्याकडून दाहा पुरुषांची संख्या करून दशम मरण पावला नाहीं दशम आहे असें सांगितलें तेव्हां त्या आप्त वाक्या वरून दशम आहे असें स्वर्गादि लोक आहेत अशा परोक्ष ज्ञाना प्रमाणें परोक्ष दशमाचें ज्ञान प्रथम त्यास होऊन मग तो कोठें आहे अशा प्रश्ना वरून त्या आप्तानें त्याकडून गणना करून दाखवून हे तूं आणि दाहावा तूं असा उपदेश केला. त्या पासून अज्ञानानें जो भ्रम झाला होता तो जाऊन दशम मी आहें असें अपरोक्षानुभवात्मक नित्य अपरोक्ष जो स्वात्मा त्या विषयींचें ज्ञान त्यास उत्पन्न होऊन त्याचा शोक गेला. त्या प्रमाणें प्रथम ब्रह्मस्वरूप कोणतें अशा प्रश्ना वरून ब्रह्म सत्य ज्ञानानंदात्मकाद्वितीय आहे अशा वेदवाक्याच्या उपदेशानें सत्य ज्ञानानंदात्मक ब्रह्म आहे असें परोक्ष ज्ञान प्रथम होऊन त्याचीं जीं लक्षणें तीं पूर्वोक्त रीतीनें आपले स्वरूपावर आहेत असें पंच कोशादिकांचे विवेक रूप विचारें करून जाणून तें ब्रह्म आणि आत्मा एकच असावे अशी संभावना होते. नंतर तें ब्रह्म तूंच आहेस अशा गुरू पासून झालेले महावाक्याच्या उपदेशा पासून नित्य अपरोक्ष जो आत्मा त्याचें ब्रह्मस्वरूपानें अपरोक्षानुभवात्मक ज्ञान होऊन सर्व अज्ञान कृत भ्रम शोका पासून जीव मुक्त होतो. यत् म्हणजे जें ब्रह्मस्वरूप जाणल्यावर भूयः म्हणजे पुनः दुसरें ज्ञातव्य (जाणावयाचें) अवशिष्ट राहात नाहीं. सर्व जगास सद्रूप ब्रह्मच कारण आहे त्या जगाची सत्ता कारण भूत ब्रह्मसत्तेहून निराळी नाहीं, नाम रूप मिथ्याच आहे तें सोडून पाहिलें म्हणजे जगाचें स्वरूप सद्रूपच आहे. जसें घटादिकाचें नामरूप सोडून मृत्तिकाच स्वरूप तसें. तेव्हां सर्व सद्रूपानें ब्रह्म स्वरूपच आहे यामुळें ब्रह्मज्ञानानें सर्व जाणलें तेव्हां त्याहून दुसरें ज्ञातव्य नाहींच असें तात्पर्य. ॥ २ ॥

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ॥ यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥**

यात ज्ञानाला दुर्लभत्व दाखवून त्याचा स्तव करतात. जीव असंख्य आहेत त्यां मध्यें मनुष्यांशिवाय दुसरे जीवांची ज्ञानाविषयीं प्रवृत्तिच नाहीं. मनुष्यांत ही हजारांत एकादा पुण्यवशें करून ज्ञान आपणास प्राप्त व्हावें याविषयीं प्रयत्न करतो. सहस्रावधि प्रयत्न करणारां मध्यें ही पुण्य वशें करून कोणी एकादाच मी परमेश्वर असें तत्त्वतः म्हणजे स्वात्मत्वें करून जाणतो. असें हें ज्ञान दुर्लभ आहे तथापि तुला-

सांगतो. असें तात्पर्य. ॥ ३ ॥

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ॥-**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥**

ब्रह्मज्ञानानें सर्व जाणलें जातें कांहीं जाणावयाचें राहात नाहीं असें जें पूर्वीं सांगितलें त्याची उपपत्ति करण्या साठीं सर्व चेतना चेतन प्रपंच ज्ञानस्वरूप ब्रह्मरूपच कारणा पासून उत्पन्न झालेला आहे असें सांगतात. भूमी (पृथ्वी) आप (उदक) अनल (तेज) वायु (वारा), ख (आकाश), मन, बुद्धि, अहंकार हे भूम्यादिक विकारच आहेत. आणि पुढें ही आठ प्रकारची प्रकृति म्हणून सांगतात. यास्तव भूमिशब्दानें भूमीची प्रकृति म्हणजे सूक्ष्मरूप त्यास गंध तन्मात्र म्हणतात. तें घ्यावें. या प्रमाणेंच पुढें ही जाणावें. आपशब्दानें रसतन्मात्र, अनलशब्दानें रूपतन्मात्र, वायु शब्दानें स्पर्श तन्मात्र, ख शब्दानें शब्द तन्मात्र, मन शब्दानें त्याचा कारण भूत अहंकार, बुद्धि शब्दानें महत्तत्त्व त्यास समष्टि बुद्धि असें म्हणतात, अहंकार शब्दानें त्यास कारण भूत मूल प्रकृति किंवा अविद्या हीं त्या उदकादिकाचीं प्रकृति रूप सूक्ष्म रूपें घ्यावीं, या आठ भेदानीं भिन्न आठ प्रकारची माझी ही मूल प्रकृति आहे अथवा अभिन्ना असा पद छेद करून ही आठ प्रकारची प्रकृति मे म्हणजे माझेहून अभिन्न आहे. जसें शक्ती (शिंपला) वर भासलेलें रजत (रुपें) शक्तीहून अभिन्न आहे त्याप्रमाणें त्रयोदशाध्यायांत "महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेवच॥ इंद्रियाणि दशैकंच पंचचेंद्रिय गोचराः॥" या श्लोकानें पंचमहाभूतें, अहंकार, बुद्धि, अव्यक्त, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, मन, आणि शब्द, स्पर्शरूप रस गंध हे पांच विषय अशा चतुर्विंशति तत्त्वांचे भेदानें भिन्न प्रकृति चोवीस प्रकारची आहे असें सांगितलें आहे. तथापि पूर्वोक्त आठ भेदांतच बाकीच्या तत्त्वांचा समावेश करावा. या अभिप्रायानें येथें आठच भेद प्रकृतीचे असें सांगितलें आहे. सांगितलेले आठ भेदांत चतुर्विंशति तत्त्वांचा समावेश करावयाचा तो असा एथील भूम्यादिक शब्दांनीं पंचमहाभूतें आणि त्यांचीं पूर्वोक्त गंध तन्मात्रादिक सूक्ष्म रूपें घ्यावीं, अहंकार शब्दानें अहंकार आणि अहंकाराचीं कार्यें जीं पांच ज्ञानेंद्रियें आणि पांच कर्मेंद्रियें अशीं अकरा घ्यावीं, बुद्धिशब्दानें महत्तत्त्व घ्यावें, मन या शब्दानें मनानेंच जाणावयाचें असें जें महत्तत्त्व तें घ्यावें. ॥ ४ ॥

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे परां ॥ जी-**
**वभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥**

याप्रमाणें क्षेत्र स्वरूप प्रकृति सांगून क्षेत्रज्ञ रूप प्रकृति सांगतात. ही पू-

वोक्त आठ प्रकारची प्रकृति जड आहे. यामुळें या प्रकृतीस अपर प्रकृति म्हणता-त. या अपर म्हणजे कनिष्ठ जड प्रकृतीहून दुसरी चेतन जीवस्वरूप उत्कृष्ट प्रकृति माझी आहे. असें हे महाबाहो अर्जुना, तूं जाण. या चेतन प्रकृतीस क्षेत्रज्ञ असें म्हणतात. जीवरूप प्रकृतीस उत्कृष्टत्वा विषयीं कारण सांगतात. यया म्हणजे ज्या-जीवस्वरूप प्रकृतीनें या सर्व जगाचें आपले कर्मद्वारा धारण केलें आहे. तात्पर्य-जीवानें केलेलीं जीं शुभाशुभ कर्में त्यांचें सुख दुःख रूप जें फल त्याच्या भोगण्या-चा समय जेव्हां प्राप्त होतो तेव्हां त्या कर्मबलानें ईश्वरास जग करण्याची इच्छा उत्प-न्न होऊन तो जगाची उत्पत्ति करतो. उत्पन्न झालेलें जग जीवांचे कर्मांचा फलोपभोग-समाप्त होईतों पर्यंत राहतें. नंतर त्याचा लय होतो. असें शास्त्रांत सांगितलें आहे. या वरून जगाची स्थिति होण्यास आपले कर्मद्वारानें जीवच कारण आहे. ॥ ५॥

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ॥ अ-**
**हं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६॥**

क्षेत्ररूप अपर प्रकृति आणि क्षेत्रज्ञ जो जीव ती पर प्रकृति असें सांगून-त्यांचे द्वारा भगवान जगाच्या उत्पत्ति स्थिति लयांचें कारणत्व सांगतात. एतद्योनी-नि म्हणजे या माझ्या दोन परापर प्रकृति आहेत यांनि म्हणजे उत्पत्तिस्थिति लयांचें-कारण. ज्याअर्थी हीं सर्व भूतें आहेत त्याअर्थी पूर्वोक्त अपर जड प्रकृतीचा दे-हादि रूपानें परिणाम होतो. नंतर माझी अंशभूत जी चेतन जीवरूप परप्रकृति ती-भोक्तृ स्वरूपानें त्या देहांत प्रवेश करून कर्मफलोपभोग समाप्त होईतों पर्यंत. त्या-देहादिकांस आपले कर्मबलानें धारण करते, या दोन्ही प्रकृति माझे पासूनच उत्प-न्न झाल्या आहेत. यास्तव प्रकृती रूप्हां सर्व जगाचा प्रभव म्हणजे उत्पत्ति कर्ता परम-कारण मीच आहें, तथा म्हणजे तसाच प्रलय म्हणजे प्रलय स्थान मीच आहें. ॥ ६॥

**मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ॥ मयि -**
**सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥ ॥**

हे धनंजया अर्जुना, सांगितले कारणानें मत्तः म्हणजे माझे शिवाय परतर म्हणजे दुसरें कोण तेंही श्रेष्ठ असें जगाचे सृष्टि स्थिति लयांस स्वतंत्र कारण नाहीं. जगा-ची उत्पत्ति आणि लय हे ब्रह्माचे ठिकाणीं आहेत असें सांगितल्यानें जगास ब्रह्म उपा-दान कारण आहे यामुळें ब्रह्मसत्तेहून जगसत्ता भिन्न नाहीं यास दृष्टांत घटादिका-ची उत्पत्ति मृत्तिके पासून होते आणि लय ही तिचे ठायीं होतो यास्तव घटादिकास मृत्ति-का उपादान कारण आहे, उपादान कारणाहून कार्याची पृथक् सत्ता नाहीं. घट असा आ-कार हा वाणीनें निष्पन्न झालेलें नाममात्र आहे परंतु मृत्तिके शिवाय घटाची दुसरी-

गुणात्मक प्रकृतीचे कार्यभूत आहेत यास्तव मत्तएव म्हणजे रसतन्मात्र स्वरूप-सूत्रात्मक माझे पासूनच उत्पन्न झाले आहेत असें तूं जाण. या प्रमाणें जरतूं सर्व-जगत् स्वरूप आहेस तर जगाचे विकारानें तुला विकारित्व येईल अशी शंका होईल तर त्या विषयीं सांगतात. ज्या रसादिक पदार्थांचे ठायीं आप म्हणजे उदकादिक-पदार्थ प्रोत म्हणजे आश्रित आहेत म्हणून सांगितलें ते सूत्रात्म्याचे अवयव भूत-मिथ्या जड स्वरूप आहेत त्याचे ठायीं मी नाहीं म्हणजे माझे स्वरूपाचे ठायीं भासले-ल्या जगास अधिष्ठानभूत जो मी याची सत्ता स्फुरणें करून प्राप्त होऊन भ्रम कालीं-तें जग अस्ति म्हणजे आहे, भाति म्हणजे भासतें. अशा व्यवहारास मात्र योग्य होतें. जसें रज्जु, शक्ति इत्यादिकांवर भासलेले सर्प रजतादिक रज्जु शक्तीचे सत्तेनें पू-र्वोक्त व्यवहारास मात्र योग्य होतात तसें. परंतु मी, मिथ्या जड जगत्स्वरूप नाहीं. ज-सें रजत सर्प, शक्ति रज्जु स्वरूप नाहीं तसें ते पूर्वोक्त पदार्थ मयि म्हणजे माझे ठायीं अध्यस्त म्हणजे भ्रमानें शक्तीवर रजता प्रमाणें भासले आहेत, कार्य भूत जगास-कारण भूत ब्रह्माशीं अनन्यता जें सांगितलें तें जग आणि ब्रह्म एकत्र आहे अशा ता-त्पर्यानें सांगितलें नाहीं तर जग सत्ता ब्रह्मसत्तेहून भिन्न नाहीं ब्रह्माचे स्वरूप भूत सत्ते-नेंच पूर्वोक्त प्रकारानें अस्ति, भाति या व्यवहाराची उपपत्ति होते अशा तात्पर्यानें सांगि-तलें आहे. ॥१२॥

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ॥ मो-**
**हितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥१३॥**

असा जो परमेश्वर तूं या प्रत पूर्वोक्त स्वरूपानें सर्व कां जाणत नाहींत असें अर्जुन म्हणेल तर त्या विषयीं सांगतात. त्रिभिः म्हणजे प्रकाश प्रवृत्ति मोहात्मक किंवा पूर्वोक्त धर्मज्ञानादिक गुण एतन्मय म्हणजे सत्व रज तमो गुणां पासून उत्पन्न झाले-ले विकारात्मक भाव म्हणजे पदार्थ त्यानीं हें सर्व मोहित झालेलें जग एभ्यः म्हणजे-या भावांहून परम्हणजे यांनीं रहित किंवा यांचा संबंध ज्यास नाहीं असा जो यांचा नि-यंता अव्यय (नाशरहित) मी या प्रत सांगितले स्वरूपानें जाणत नाहींत. ॥१३॥

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ॥ मा-**
**मेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥१४॥ ॥**

तर कोण जाणतात तें सांगतात. जीत स्वरूपानें लीलें करून क्रीडा करणार जो देव मी याची ही प्रसिद्ध पिंड ब्रह्मांड रूपानें परिणाम पावलेली आणि आत्मा स्व-प्रकाश आनंद चिद्रूप असतां ही तो आपणास जाणत नाहीं असा सर्वांस अनुभव-आहे यावरून जी आहे असें कल्पना करण्यास योग्य झालेली आणि जीस अविद्या-

ही म्हणतात. आणि जिचा अतिक्रम करण्यास फार कठीण आहे अशी माझी माया-आहे या मायेपासून तरण्याचा उपाय सांगतात. मामेव म्हणजे सर्व भूतांचा आत्मा-सर्व भूतांत स्थित असा जो मी वासुदेव त्या मतच ये म्हणजे जे प्रपद्यंते म्हणजे स्वात्मत्वें करून भजतात ते, मायामेतां तरंति म्हणजे या मायेपासून तरतात. अधिष्ठान-ज्ञानानेंच समूल भ्रमाचा नाश होतो दुसरे ज्ञानानें किंवा मनाचें वृत्तीच्या निरोधानें होत नाहीं असा अर्थ. याचें तात्पर्य असें:- ईश्वर आणि जीव असा विभाग जेथें नाहीं. असें जें शुद्ध चिन्मात्र ब्रह्मस्वरूप याचे ठाई मायेची कल्पना झाली ह्मणजे त्या मायोपाधिकास ईश्वर अशी संज्ञा होते, त्या मायारूप दर्पणाचे ठायीं त्या मायोपाधिक चैतन्याचा प्रतिबिंब जो होतो तो जीव त्यास बिंबभूत ईश्वराच्या अनुरोधानें म्हणजे-आपण ईश्वराचे स्वाधीन होऊन जीवास आपले वश करून संसारांत येणें जाणें अशा व्यापारानें युक्त करते जसें मुखाचे अनुरोधानें दर्पणांतील प्रतिबिंब चलनादिक क्रियायुक्त होतें किंवा दर्पण मलिन झालें किंवा छिन्नभिन्न झालें म्हणजे दर्पणांतील प्रतिबिंब ही मलिन किंवा छिन्नभिन्न होतें त्याप्रमाणें जीवास बिंबभूत ईश्वरावरील चैतन्य आणि मायेवरील सर्व सुखदुःखादिक संसारांत जन्मास जाणें येणें यांनीं-जीव स्वरूप युक्त होतें हेंच मायेस ईश्वराधीनत्व आणि मायेचे द्वारा ईश्वरास सर्व जगाचे उत्पत्त्यादिकाचें कर्तृत्वादिक मायी परमेश्वर या विश्वाची सृष्टि करितो त्या सृष्टींत मायेनें वश केलेला दुसरा जीव निरुद्ध म्हणजे बद्ध झाला आहे या अर्थी त्या श्रुतींत-सांगितलें आहे, या प्रमाणें एकच माया उपाधि किंवा दर्पण स्थानापन्न होऊन ईश्वर रूप बिंब आणि प्रतिबिंब रूप जीव असा विभाग करते किंवा प्रस्तावनेंत लिहिले प्रमाणें एकच माया अविद्या आणि माया या दोन प्रकारची होऊन मायेंत प्रतिबिंबितईश्वर आणि अविद्येंत प्रतिबिंबित जीव असा विभाग करते. या जीवेश्वरांहून निराळें उपाधि-रहित या दोहों मध्यें राहिलेलें शुद्ध चैतन्य मुक्तानीं पावावयाचें तें तृतीय आहे, हे-जीवेश्वर आपले उपाधीचे पक्षपातानें उपाधिद्वारांत अल्पज्ञ शास्य म्हणजे शासन करण्यास योग्य जीव आणि सर्वज्ञ शास्ता नियंता ईश्वर असे होतात. हा जीवास जेव्हां ईश्वराराधनानें झालेलें ईश्वर प्रसादें करून आपलें आणि ईश्वराचें सच्चिदानंदात्मक अद्वितीय स्वरूप एकच आहे माया आणि तिणें कल्पिलेले जे सर्व उपाधि ते मिथ्या आहेत ते आपल्या स्वरूपीं नाहींत. ईश्वर आणि मी निरुपाधिक स्वरूपानें एकच आहें. असें ब्रह्मात्म तत्व ज्ञान होतें तेव्हां माया नष्ट होऊन जीवास पूर्वोक्त तृतीय चिन्मात्र स्वरूपाची प्राप्ती होऊन तो मुक्त होतो. ॥१४॥

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः ॥-**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥१५**

असें आहे तर सर्व तुला कां भजत नाहींत असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात. दुष्कृतिनः म्हणजे पापाचरण करणारे अतएव त्यांची चित्तशुद्धि नाहीं यामुळें मूढ म्हणजे आत्मानात्म विवेकज्ञान रहित असे अतएव नरांमध्यें जे अधम—आणि मायेनें अपहृत म्हणजे नष्ट झालें आहे ज्ञान म्हणजे सच्चिदानंदात्मकां द्वितीय ब्रह्मात्मत्व ज्ञान ज्यांचें येणें करून मायेस आवरण करण्याची शक्ति आहे असें सूचविलें यामुळें आसुर भाव म्हणजे विरोचनादिक जे असुर त्यांचा जो भाव म्हणजे देहेंद्रियादिकच आत्मा आहे याहून दुसरा आत्मा नाहीं यास्तव "ऋणंकृत्वा घृतंपिबेत्" या लौकिकांतील न्यायानें देहेंद्रियादिकांचेच विषय भोगें करून समाधान करावें हाच मुख्य पुरुषार्थ आहे इत्यादिक जो चित्ताभिप्राय किंवा सिद्धांत याप्रत आश्रित म्हणजे आश्रय केलेले, येणें करून मायेस विक्षेप करण्याची शक्ति आहे असें सूचविलें. या प्रमाणें यादोहीं शक्ती करून मायेचे योगानें आपलें वास्तविक स्वरूपाचें आवरण झाल्यामुळें देहादिकांवर आत्मत्व भ्रम होऊन त्याचे सुखासाठीं दुष्कृत करणारे-असे मूढ किंवा दंभ,दर्प,क्रोध,पारुष्य इत्यादिक जे असुरांचे स्वभाव त्यांप्रत आश्रय केलेले जे आहेत ते मांत प्रपद्यंते म्हणजे मजप्रत भजत नाहींत संसाररूप अनर्थच पावतात. ॥१५॥

**चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ॥**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥१६**

देहाभिमान असतांही मज पासून भय पावून सुकृत म्हणजे पुण्याचरण च करतात असे जे पुण्यवंत ते जन मला भजतात. हे अर्जुना, ते जन ही सुकृताचे-तारतम्यानें च्यार प्रकारचे आहेत. ते सर्वही माझी प्राप्ती व्हावी अशा कामनेनेच नाहींत. कोणी आर्त म्हणजे तस्कर व्याघ्रादिकांनीं पीडा केलेला असतो तो त्या पीडा परिहारार्थ मला भजतो. कोणी जिज्ञासु म्हणजे आत्मस्वरूपाचे अज्ञानाचा नाश होण्या साठीं-आत्मतत्त्व समजावें अशी इच्छा करणारा असतो तो ज्ञानप्राप्त्यर्थ मला भजतो. कोणी अर्थार्थी म्हणजे धन स्त्री पुत्रादिक इच्छिणारा त्या अर्थाचे प्राप्ती साठीं मला-भजतो आणि कोणी ज्ञानी म्हणजे आत्मतत्त्ववेत्ता असतो तोही मला भजतो हे जन्मांतरार्जित पुण्यवंत आहेत तर मला भजतात. नाहींतर त्या त्या कामनेनें क्षुद्रदेवतांसच भजतात असें सुकृति येणें करून सूचविलें. ॥१६॥

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ॥**
**प्रियो हि ज्ञानिनोत्यर्थमहं स च मम प्रियः ॥१७**

हे सर्व ही सुकृति आहेत तथापि त्यांमध्यें ज्ञानी ईश्वरत्व किंवा आत्मतत्त्व

एकच आहे त्या शिवाय दुसरा भजनीय पदार्थच नाहीं अशा निश्चयानें नित्य म्हणजे निरंतर युक्त म्हणजे मन्निष्ठ आहे आणि एकभक्ति म्हणजे मी जो एक वासुदेव सर्वांचा आत्मा त्याचेच ठायीं सर्वदा ज्याची भक्ति आहे कधींही तीचा व्यभिचार ( विपर्यास ) नाहीं त्यामुळें तो विशिष्यते म्हणजे अधिक आहे आर्तादिक त्या त्या अर्थाची प्राप्ति झाली म्हणजे मला भजत नाहींत यामुळें ते नित्ययुक्त नाहींत. आणि जे रोगी आर्त आहेत ते सूर्याला भजतात जे ज्ञानार्थी आहेत ते सरस्वतीस भजतात. द्रव्यार्थी कुबेरादिकांस भजतात. यामुळें ते अनेक भक्ति म्हणजे अनेकांची भक्ति करणारे-आहेत ते एकभक्ति नाहींत असें तात्पर्य- आणि ज्ञानी एकभक्ति आहे यास्तव ज्ञान्यास मी परम प्रेमास्पद आत्मस्वरूप आहें म्हणून अत्यंत प्रिय आहें. आपला-आत्मा जसा प्रिय आहे तसा दुसरा कोणी प्रिय नाहीं, सर्वही आत्म्यासाठींच प्रिय-आहे असें सर्व लोकांत प्रसिद्धच आहे, आणि तो ज्ञानी मला फार प्रिय आहे, भक्त-फार दुर्लभ आहे असें तात्पर्य. ॥ १७ ॥

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ॥ आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८**

हे सर्व माझी भक्ति करतात. यामुळें उदार म्हणजे उत्कृष्टच आहेत अथवा मला प्रियच आहेत, तथापि ज्ञानी माझा आत्मा आहे म्हणजे आत्म्या प्रमाणें निरतिशयित प्रिय आहे असें माझें मत आहे कारण तो युक्तात्मा म्हणजे मीच भगवान् वासुदेव आहें मी त्याहून अन्य नाहीं असें ज्याचें उत्तम प्रकारें माझे ठायीं चित्त आहे असा होत्सातां 'अनुत्तमां गतिं मामेव आस्थितः' म्हणजे ज्या पेक्षां उत्तम प्राप्त व्हाव-याचें स्थान नाहीं असा जो ब्रह्मस्वरूप मी वासुदेव त्या प्रत गमन करण्या विषयीं-प्रवृत्त होऊन माझी भक्ति करणारा आहे दुसऱ्या तिघांसारखा आरोग्यादिक प्राप्त व्हावें या इच्छेनें माझी भक्ति करणारा नाहीं. ॥ १८ ॥

**बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ॥ वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥**

पुनः ज्ञान्याची स्तुति करतात. ज्ञान प्राप्त्यर्थ ईश्वरोद्देशानें निष्काम कर्माचरण करून चित्तशुद्धीचे द्वारा वेदांतादिकाचें श्रवण मननादिक करीत असतां बहुत जन्मांचे अंतीं 'वासुदेवः सर्वमिति ज्ञानवान्' म्हणजे शेवटचे जन्मीं सर्व वासुदेवच आहे अशा ज्ञानानें युक्त होत्साता 'मां प्रपद्यते' म्हणजे मला वासुदेवरूप ब्रह्माला स्वात्मत्वें करून अपरोक्षानुभवानें जाणतो. स महात्मा म्हणजे असा जो ब्रह्मभूत ज्ञानी तो सुदुर्लभ म्हणजे फार दुर्लभ आहे. येथें- बहूनां जन्मनामंते- येणें

करून पूर्वोक्त अपरोक्ष ब्रह्मात्म तत्त्वज्ञान होण्यास जो प्रतिबंध आहे तो नाश पावला म्हणजे पूर्वोक्त ज्ञानवान् होतो इतकेंच विवक्षित (ग्राह्य) आहे. मुमुक्षा (मोक्षेच्छा) उत्पन्न होऊन भगवद्भक्ति,आत्मविचार इत्यादिक करण्यास प्रवृत्त जे झाले त्यासर्वांस ही बहुत जन्मांचे अंतीच अपरोक्ष आत्मतत्त्व ज्ञान होतें असें विवक्षित नाहीं. या विषयीं निश्चय होण्या साठीं विचार लिहितों. ब्रह्मात्मतत्त्वज्ञान, परोक्ष आणि अपरोक्ष किंवा अपरोक्षानुभवरूप या भेदानें दोन प्रकारचें आहे. त्यांतील परोक्ष ज्ञान होण्यास वेदशास्त्र गुरु यांचे वाक्यावर अश्रद्धा म्हणजे अविश्वास प्रतिबंधक आहे तिचा नाश होऊन श्रद्धा उत्पन्न झाली म्हणजे आत्मा सच्चिदानंदात्मक, अद्वितीय ब्रह्म स्वरूप आहे अशा उपदेश वाक्या पासूनच आत्म तत्त्वाचें परोक्ष ज्ञान म्हणजे सांगितले स्वरूपाचें आत्म तत्त्व आहे असा निश्चय होतो. पूर्वोक्त आत्मतत्त्वाचा आत्मत्वें करून ब्रह्म साक्षात्कार रूप अपरोक्ष ज्ञान उत्पन्न होण्यास अविचार म्हणजे विचार न करणें प्रतिबंधक आहे यास्तव वेदांत श्रवण मननादिक विचार करावा. म्हणजे अविचार रूप प्रतिबंधकाचा नाश होऊन महावाक्या पासून विचाराचे साहाय्यानें आत्म तत्त्वाचें अपरोक्ष ज्ञान उत्पन्न होतें. महावाक्यांतील तत्त्वं पदार्थ जे ईश्वर जीव यांचा वेदांतवाक्यानें विचार केला तरी ब्रह्म आणि आत्मा यांचे ऐक्याचा साक्षात्कार महावाक्या पासून जर न होईल तर पुनःपुनः अपरोक्षज्ञान होई तों पर्यंत विचार करावा. कारण अपरोक्ष ज्ञानास विचारा वांचून दुसरें कारण नाहीं. कारण जो अनुष्ठानाचा विधि अदृष्टार्थच आहे म्हणजे पुण्यार्थच आहे, त्याचें एकवारच अनुष्ठान पुरतें. जसें पुरोडाशार्थ व्रीहींचें प्रोक्षण करावें असें जें विधीनें सांगितलें तें एकवार ही केलें तरी अदृष्ट उत्पन्न होतें यास्तव त्याची आवृत्ति म्हणजे वारंवार अनुष्ठान नको परंतु जो अनुष्ठानाचा विधि दृष्टार्थ म्हणजे प्रत्यक्ष फला साठीं आहे त्याचें अनुष्ठान तें फल होई तों पावेतों वारंवार केलें पाहिजे. जसें विधीनें सांगितलेलें व्रीहींचें अवहनन म्हणजे कांडणें तें एकवार केलें असतां व्रीही वरील कोंडा जाऊन पुरोडाशास उपयोगी चांगले स्वच्छ तांदुळांची निष्पत्ति (अवस्था) होत नाहीं यासाठीं कोंडा जाऊन शुद्ध तांदूळ होत तों पर्यंत व्रीहींनें कंडण (कांडणें) केलें पाहिजे. तसा वेदांत विचार अपरोक्ष ज्ञान होऊन अज्ञान निवृत्ति होणें हें दृष्टफल होई तों पर्यंत केला पाहिजे. अतएव श्वेतकेतूला उद्दालकानें तूं ब्रह्म आहेस अशा अर्थाच्या महावाक्यानें नऊ वेळ उपदेश केला असें छांदोग्योपनिषदांत लिहिलें आहे, आणि श्री वेदव्यासानीं ब्रह्मसूत्रांत असेंच सांगितलें आहे या प्रमाणें मरण पर्यंत विचार केला तरी प्रतिबंधामुळें जर आत्मतत्त्वाचें अपरोक्ष ज्ञान न होईल तर प्रतिबंधाचा नाश झाला म्हणजे जन्मांतरीं पूर्वी केलेल्या विचाराचे संस्कारानें अपरोक्षात्म तत्त्व साक्षात्कार होतो असें प्रतिबंध नसला तर याच जन्मीं विचारा पासून आत्मविद्या म्हणजे अपरोक्षात्मतत्त्व ज्ञान होतें आणि प्रतिबंध असला तर जन्मां-

तरी होतें. अशा अर्थाच्या सूत्रांनीं वेदव्यासानीं सांगितलें आहे, आणि श्रवण करणारे ही बहुत अपरोक्षत्वें करून ब्रह्मात्मतत्त्व जाणत नाहींत, असें श्रुतींत ही सांगितलें आहे आणि वामदेव नामक ऋषीनीं वेदांत विचार केला असतां ही प्रतिबंधामुळें त्यांस त्या देहांत आत्मतत्त्व साक्षात्कार न होऊन दुसरा देह प्राप्त झाला तेव्हां त्यांस गर्भांत असतांना आत्मत्वें करून ब्रह्म साक्षात्कार झाला अशा अर्थाचा वेदांत मंत्र आहे. कृषीस (शेतकीस) आरंभ केल्या पासून कांहीं कालानेंच तें कर्म फलास येतें तसाच गर्भाधाना पासून कांहीं कालानेंच गर्भाचा परिपाक होऊन त्यास चैतन्य उत्पन्न होतें. तसा आत्मविचार ही शनैः शनैः म्हणजे कालें करून परिपक्क होऊन फलास येतो हठानें तत्कालच फलद्रूप होत नाहीं पुनः पुनः विचार केला तरी त्यास त्रिविध (तीन प्रकारचा) जो प्रतिबंध आहे त्याचा नाश झाल्या शिवाय त्या पासून आत्मतत्त्व साक्षात्कार होत नाहीं असें सुरेश्वराचार्यांनीं वार्तिकांत सांगितलें आहे. तो प्रतिबंध भूत, वर्तमान आणि भावी असा तीन प्रकारचा आहे. भूत प्रतिबंधाचें उदाहरण: लौकिक गाथेनें ग्रंथांतरीं लिहिलें आहे तें लिहितों:- कोणी एक संन्यासी संन्यासापूर्वीं गृहस्थाश्रमी असतां त्याचा एका महिषीवर बहुत स्नेह झाला होता नंतर संन्यास करून वेदांत श्रवणार्थ प्रवृत्त झाला तरी त्या पूर्वीच्या महिषीचे ठायीं झालेल्या स्नेहानें तिचें वारंवार स्मरण होऊन गुरूनें उपदेश केलेले आत्मतत्त्वानें त्यास अपरोक्ष ज्ञान झालें नाहीं. नंतर गुरूनें तो प्रतिबंध जाणून महिषींतील आत्मस्वरूपाचा उपदेश केला तेव्हां त्यानें चिंतन करीत असतां महिषी हा उपाधि सुटून त्यास केवल आत्मतत्त्वाचें चिंतन होऊं लागलें त्यामुळें तो स्नेहरूप प्रतिबंध नाश पावून त्या संन्याशास आत्मतत्त्वाचा साक्षात्कार झाला. चित्ताची विषय भोगाकडे आसक्ती, प्रज्ञा म्हणजे बुद्धीनें मंदत्व, कुतर्क म्हणजे कुतर्कानें वेदवाक्याचे विपरीत अर्थ करणें, विपर्यय म्हणजे आत्मा कर्ता, भोक्ता आहे किंवा ईश्वराहून परमार्थतः भिन्न आहे असा दुसराग्रह, हे वर्तमान प्रतिबंध यांचा श्रवणादिकांच्या आवृत्तिभगवद्भक्ति शमदमादिक इत्यादिकांनीं नाश झाला म्हणजे अपरोक्ष आत्मतत्त्व साक्षात्कार होतो. जन्मांतर झालेंच पाहिजे असा जो प्रारब्ध कर्मरूप प्रतिबंध तो भावी प्रतिबंध, हा पूर्वोक्त वामदेवाचे दृष्टांतानें जाणावा. तो वामदेवाचा एका जन्मानेंच नाश पावून त्यास अपरोक्षात्मतत्त्व ज्ञान झालें, भरतास विचार केला असतां ही अपरोक्ष ज्ञान होण्या साठीं त्या प्रतिबंधाच्या नाशार्थ तीन जन्म घ्यावे लागले नंतर तो नाश पावला. अशी पुराणांत कथा आहे. जो योगभ्रष्ट झाला त्यास बहुत जन्म गेल्यावर प्रतिबंधाचा नाश होऊन ब्रह्मात्मतत्त्व साक्षात्कार होऊन तो मुक्त होतो असें:- " प्राप्य पुण्य कृतां लोकान् " इत्यादि श्लोकांनीं गीतेंतच सांगितलें आहे ब्रह्मलोकाची प्राप्ति व्हावी- अशी इच्छा धरून जे वेदांत श्रवणादिक करतात त्यांस या लोकीं आत्मतत्त्व साक्षा-

त्कार न होऊन ते ब्रह्म लोकीं जातात. नंतर त्यांस तेथें आत्मतत्त्व साक्षात्कार होऊन-ब्रह्म देवाचे प्रलय काळीं ते ब्रह्मदेवा बरोबर मुक्त होतात. असें वेदांतांत सांगितलें आहे. या सर्व शास्त्रार्थाचे विचारावरून ब्रह्मात्मतत्त्व साक्षात्कारास जे त्रिविध पूर्वोक्त प्रतिबंध आहेत त्यांचा नाश झाला म्हणजे वेदांतश्रवणादिक विचार आणि भगवद्भक्तीनें झालेल्या भगवत्प्रसाद यानीं आत्मतत्त्व साक्षात्कार होऊन मुक्ति होते इतका अर्थ बहूनां जन्मनामंते ज्ञानवान् भवति तदनंतरं मां प्रपद्यंते। येणें करून संमत आहे असें सिद्ध झालें. ॥१९॥

## कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यंतेऽन्यदेवताः॥ तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥२०

चार प्रकारचें भजन करणारांत ज्ञान्या शिवाय दुसऱ्यांस सर्व वासुदेवच आहे असें माझें परमेश्वर स्वरूपाचें ज्ञान होण्यास कारण सांगतात. तैः तैः कामैः म्हणजे द्रव्य, पुत्र, पशु, स्वर्ग इत्यादिकांविषयींच्या ज्या इच्छा त्यानीं हृतज्ञानाः म्हणजे नष्ट झालें आहे विवेकज्ञान ज्यांचें असे आणि स्वया प्रकृत्या नियताः म्हणजे आपल्या जीजन्मांतरार्जित कर्म संस्कार रूप पुढें सांगावयाची दैवी आणि आसुरी प्रकृति तिणें आपल्या स्वाधीन केलेले असे अज्ञानी तं तं नियमं आस्थाय म्हणजे त्या त्या इंद्रादिक देवतांचें आराधन करण्याचें विधांत जेजे चतुर्दश्युपवासादिक नियम प्रसिद्ध आहेत. त्यांचा स्वीकार करून अन्यदेवताः प्रपद्यंते म्हणजे सर्वात्मभूत वासुदेवाहून अन्यदेवतांप्रत या देवते पासून हें फल मी पावेन या कामनेनें भजतात. ॥२०॥

## यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति॥ तस्य तस्याऽचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥२१

यो यो भक्तः यां यां तनुं श्रद्धया अर्चितु मिच्छति म्हणजे जो जो सात्विक, राजस, किंवा तामस भक्त ज्या ज्या शरीराचे देव, यक्ष, राक्षस, पिशाचादिक देवतेप्रत श्रद्धें करून पूजावयास इच्छितो. तस्य तस्य म्हणजे त्यास त्यास तामेव अचलां श्रद्धां म्हणजे त्याच त्याच सात्विकी, राजसी किंवा तामसी स्थिर श्रद्धेप्रत विदधामि म्हणजे मी उत्पन्न करतों. ॥२१॥

## स तया श्रद्धया युक्त स्तस्याराधनमीहते ॥ लभतेच ततः कामान् मयैव विहितान् हितान् ॥२२

सः तया श्रद्धया युक्तः सन् म्हणजे तदनंतर तो तो भक्त त्या श्रद्धेनें युक्त होत्साता तस्याः आराधनं ईहते म्हणजे त्या त्या मूर्तीचे देवतेचें आराधन पूजनादि-

व. करण्यास इच्छितो आणि ततः मयैवविहितान् हितान् कामान् लभते म्हणजे तो त्या त्या देवतेस मीच आज्ञा करून त्या त्या देवते पासून देवविलेले जे पूर्वोक्त द्रव्य पुत्रादिक इच्छित विषय त्यांस तो पावतो. येणें करून सर्व देवता आपले परमेश्वराचे आज्ञेंत आहेत. असें किंवा सर्वांतर्यामी मी परमेश्वर सर्वदेवतांस कामदेण्याविषयीं प्रेरित करतों असें सूचविलें. ॥२२॥

## अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ॥ देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥ २३ ॥

सर्व देवता माझेच अंश आहेत, यामुळें त्यांचे आराधनानें त्यांच्या अंतर्यामी जो मी त्याचेंच आराधन होतें, त्या आराधनाचें फल ही त्यां कडून किंवा त्या देवताचे स्वरूपानें देवविणारा किंवा देणारा मीच आहें तथापि साक्षात् माझे भक्त आणि मदंश भूत दुसऱ्या देवतांचे भक्त त्यांच्या फलांत वैलक्षण्य (भिन्नत्व) आहे असें सांगतात. अल्पमेधसाम् तेषां तत् फलं अंतवद्भवति म्हणजे अल्प म्हणजे परिच्छिन्न किंवा परिमित आहे बुद्धि ज्यांची किंवा अल्पफल करणारे जे पुत्रपशु इत्यादिक त्यांचे ठायीं आहे फल साधन बुद्धि ज्यांची असे जे ते अन्यदेवता भक्त, त्यांस त्यां पासून प्राप्त झालेलें जें द्रव्य पुत्रादिक फल तें नाशवंत आहे, माझे भक्तांस होणारें ब्रह्म प्राप्तिरूप फल नाशवंत नाहीं; कारण सांगतात. देवयजो देवान् यांति म्हणजे मदंश भूत अंतवंत ज्या देवता त्यांचें यजन करणारे त्या देवतां प्रत पावतात. अपि म्हणजे अंतवंत जे यक्ष राक्षस पिशाच त्यांचें यजन करणारे यक्षराक्षसां दिकां प्रत जातात. मद्भक्ता मां यांति म्हणजे माझेजे भक्त ते नाश रहित जो मी त्या प्रतच येतात. ॥२३॥

## अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः ॥ परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥

असें जर फलांत तारतम्य आहे तर सर्व मोठे फला साठीं तुलाच कां भजत नाहींत अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात. अव्यक्तं मां सर्वोपाधिरहितयामुळें इंद्रिया दिकांस अगोचर असा जो मी त्याचे मम अव्ययं अनुत्तमं परंभावमजानंतः म्हणजे माझें जें नाशरहित आणि ज्याहून दुसरें उत्तम नाहीं असें उत्कृष्ट तत्त्व स्वरूप त्या प्रत न जाणत होत्साता ते व्यक्तिमापन्नं मां मन्यंते म्हणजे इतर जीवां प्रमाणें वासुदेव शरीरानें उत्पन्न झालेला आणि देहाभिमानी आहे असें मला मानितात. ॥२४॥

## नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ॥ मू-

## ढो ऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम्॥२५

तुझ्या वास्तविक स्वरूपाचें ज्ञान लोकांस कां नाहीं असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात. हे योग म्हणजे हे योगिन् अर्जुना, अर्शआदिलक्षण अच् प्रत्यय करून योग ज्यांस आहे तो योगी असा योगशब्दाचा अर्थ होतो. योगमायासमावृत: असें एकपद कोणी करतात. योग म्हणजे सत्व रज तमो गुणाचें जें घटन म्हणजे एकत्र मेलन तीच जी माया म्हणजे त्रिगुणात्मक माया अथवा भगवंताचा चित्त समाधि योग त्याणें केलेली जी माया म्हणजे भगवंताचे संकल्पास अनुसरणारी जी योग माया तिणें समावृत म्हणजे आच्छादित जो तत्पदार्थ मी तो सर्वस्य म्हणजे त्वंपदार्थ मात्रास जाणणारा जो सर्व जीव समुदाय त्यास प्रकाश: न म्हणजे प्रत्यक्ष नाहीं. अयंमूढ: लोक: अजं अव्ययं मां नाभि जानाति म्हणजे हा अज्ञानी जीव समुदाय उत्पत्ति रहित आणि नाशरहित असा जो मी त्याप्रत जाणत नाहीं.॥२५॥

## वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन॥ भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन॥२६॥

योग माया माझे स्वाधीन आहे यामुळें मायी जो मी याचें ज्ञानाचा प्रतिबंध तिचे कडून होत नाहीं. जसा लौकिक इंद्रजाल विद्या करणारा आपले मायेनें लोकांस मोहित करतो परंतु ती माया त्याचे स्वाधीन आहे या मुळें त्याचे ज्ञानाचा प्रतिबंध करण्यास ती समर्थ होत नाहीं. त्या प्रमाणें असें सांगतात. जीव समुदाय आणि मी वस्तुत: एकच असतां ही मायारूप उपाधीनें जीव आणि ईश्वर असा विभाग केला आहे, त्यामुळें उपाधीचे जे धर्म त्यांवर अभि मान ठेवल्या मुळें जीव मूढ आहेत. मला अभिमान नाहीं यामुळें सर्वज्ञ मी, समतीतानि म्हणजे उत्पन्न होऊन नाश पावलेलीं, वर्तमानानि म्हणजे वर्तमान कालीं ज्यांची स्थिति आहे तीं आणि भविष्याणि म्हणजे पुढें उत्पन्न होणारीं अशा सर्व भूतां प्रत मी जाणतों. मांतु कश्चन नवेद परंतु त्या भूतांतील कोणी मला जाणत नाहींत.॥२६॥

## इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत॥ सर्व भूतानि संमोहं सर्गे यांति परंतप॥२७॥ ॥

ईश्वराच्या स्वरूपा विषयींचें अज्ञान जीवांस असण्याचें कारण सांगतात. जें आपणास अनुकूल सुख किंवा सुखाचें साधन त्या विषयीं इच्छा आणि जें आपणास प्रतिकूल दुःख किंवा दुःखास साधन त्या विषयीं द्वेष त्यां पासून उत्पन्न झालेला जो द्वंद्व मोह म्हणजे शोभन अशोभन, सत्य असत्य, नित्य अनित्य, आत्मा-

अनात्मा अशीं जीं द्वंद्वें यांचे ठायीं मोह म्हणजे रक्तमांसादिक अशुद्ध पदार्थांनीं उत्पन्न केलेले अशोभन स्त्रियादिकांवर शोभन अशी बुद्धि आणि शोभनावर अशोभन बुद्धि असत्य म्हणजे मिथ्या जो प्रपंच त्यावर सत्यत्व बुद्धि आणि सत्य असून देह भिन्न अशा आत्म्यावर मिथ्यात्व बुद्धि, अनित्य स्वर्गादि सुखावर नित्यत्व बुद्धि आणि अनात्मा जो देहादिक त्यावर आत्मत्व बुद्धि अशा विपरीत ज्ञानात्मक भ्रमें करून हे भरत कुलोत्पन्ना हे शत्रूंस तापदेणाऱ्या अर्जुना, सर्व भूतानि म्हणजे सर्व जीव: सर्गे म्हणजे सृष्टीतील पदार्थां विषयीं, संमोहं यांति म्हणजे पूर्वोक्त मोहाप्रत पावतात. तात्पर्य— जो सृष्टीचें उपादान कारण आणि सृष्टीचें स्वरूप तत्त्वत: जाणतो तो ब्रह्मवेत्ता ब्रह्मस्वरूपानें जाणतो. ज्यास सृष्टीच्या स्वरूपा विषयीं पूर्वोक्त विपरीतज्ञान आहे त्यास प्रतिबंधामुळें सर्व भूतांचें किंवा त्यांचें उपादान कारण जें परमात्मस्वरूप त्याचें ज्ञान होत नाहीं. इच्छा आणि द्वेष यांपासून उत्पन्न झालेला जो द्वंद्व मोह म्हणजे शीतोष्ण सुखदु:खस्वरूप जीं द्वंद्वें त्याप्रमाणें परस्पर विरुद्ध जे पूर्वोक्त इच्छा आणि द्वेष तद्रूप मोहानें सर्व भूतें, सर्ग म्हणजे उत्पत्ति कालींच मोहाप्रत पावतात म्हणजे मोहाचे वश होऊन उत्पन्न होतात. यामुळें सर्व भूतें अतीतादि सर्व भूतांस न किंवा सर्व भूतांचा अधिष्ठान भूत जो मी त्याप्रत जाणत नाहींत असा हा याचा अर्थ आहे. ॥ २७ ॥

येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ॥ ते
द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रता: ॥ २८ ॥ ॥

येषां पुण्यकर्मणां जनानां म्हणजे पुण्य करणाऱ्या जीवांचें, पापं अंतगतं म्हणजे पाप नाशाप्रत पावलें आहे ते, द्वंद्व मोहनिर्मुक्ता: म्हणजे पूर्वोक्त द्वंद्व मोहानें रहित आणि दृढव्रत म्हणजे शमदमादि साधन युक्त होत्साते मां भजंते म्हणजे मला भजतात. ॥ २८ ॥

जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये ॥ ते
ब्रह्म तद्विदु: कृत्स्नमध्यात्मं कर्म चाऽखिलम् ॥ २९

जरामरण मोक्षाय— जरा म्हणजे लक्षणेनें जन्म आणि मरण यांचा प्रवाहरूप जो संसार त्या पासून आपल्याचा मोक्ष व्हावा या साठीं मां आश्रित्य म्हणजे माझे ठायीं चित्तानें स्थापन करून ये यतंति म्हणजे आत्मतत्त्व ज्ञाना साठीं वेदांत श्रवणादिका विषयीं जे यत्न करतात ते तद्ब्रह्म विदु: म्हणजे सर्ववेदांत प्रसिद्ध जें तें ब्रह्म त्याप्रत स्वात्मत्वें करून जाणतात. आणि कृत्स्नं अध्यात्मं विदु: म्हणजे सर्व अध्यात्म म्हणजे शरीराचे ठायीं स्थित जें त्वंपद वाच्य आत्मतत्त्व त्याप्रत जाणतात आ-

णि अखिलं कर्म च विदुः म्हणजे तत्त्वं पदार्थ ज्ञानाचें साधनभूत जें श्रवण मननादिक तें सर्व जाणतात. अथवा कृत्स्नं ब्रह्मविदुः म्हणजे विराट् पुरुष सूत्रात्मा दिकांची उपासना करणारे ब्रह्म जाणतात. परंतु स्थूल सूक्ष्म समष्टि (सर्वव्यापक) शरीरोपाधि युक्त रूपानें जाणतात. म्हणून ते कृत्स्न म्हणजे सर्व ब्रह्म जाणत नाहींत. माझे वासुदेवाचे भक्त तर त्या शरीराहून भिन्न आणि त्या शरीराहून अतीत अशा शुद्ध ब्रह्म स्वरूपास ते जाणतात. यास्तव ते कृत्स्न ब्रह्म जाणतात. अशी योजना करावी. येणें करून ज्या ब्रह्माचें ज्ञान झालें म्हणजे कांहीं जाणावयाचें शेष राहत नाहीं असें जें एक ब्रह्म ज्ञानानें सर्व ज्ञान होतें असें सांगण्यास आरंभिलें होतें त्याची समाप्ति केली. ॥२९॥

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः॥**
**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः॥३०**
**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां**
**योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानविज्ञान**
**योगो नाम सप्तमोऽध्यायः॥७॥ ॥श्रीकृ०॥**

या प्रमाणें तात्काल मुक्तीस साधन भूत तत्पदार्थाचा विचार सांगून त्याची समाप्ति करून ज्यां पासून क्रमें करून मुक्ति रूप फल प्राप्त होतें अशीं तत्पदार्थ ईश्वराचें प्राप्तीचीं साधनभूत जीं उपासनादिक तीं सविस्तर सांगावीं अशा इच्छेनें त्यांचें प्रथमतः संक्षेपें करून कथन करतात. साधिभूताधिदैवं मां म्हणजे अधिभूत अधिदैव आणि अधियज्ञ यांचीं स्वरूपें अर्जुनाचे प्रश्नाचे उत्तरांत पुढील अध्यायांत श्रीकृष्ण भगवान् सांगतील. अधिभूत आणि अधिदैव यांहीं करून युक्त आणि ये साधियज्ञं च विदुः म्हणजे अधियज्ञानें युक्त जो मी त्याची जे उपासना करतात विदुःएथील धातु ज्ञाना प्रमाणें उपासनेचाही वाचक आहे, ते युक्तचेतसः म्हणजे माझे ठायीं ज्यानीं चित्ताची योजना केली आहे असे होत्साते- प्रयाणकालेऽपि मां विदुः म्हणजे वेळेस सर्व मोह पावतात अशा मरण समयीं ही ते मला जाणतात. या साठीं भगवंताचे ठायीं निरंतर भावना करावी असें तात्पर्य. ॥३०॥

इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथ शास्त्रि कृत भाषाविवृत्तौ सप्तमोऽध्यायः समाप्तः ॥७॥ ॥श्रीगोपाल कृष्णार्पणमस्तु॥

अध्याय ८ वा.

**अर्जुन उवाच॥ ॥किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं-**

**कर्म पुरुषोत्तम ॥ अधिभूतं च किं प्रोक्तमधि-
दैवं किमुच्यते ॥ १ ॥　　॥　॥　　॥**

पूर्वाध्यायीं मायोपाधिक ब्रह्म सर्व जगाचे उत्पत्ति स्थिति लयांस कारण आहे असें सांगितलें तें उत्तमाधिकाऱ्यांस उपाधि स्वरूप लक्षणाचे द्वारानें उपाधि सोडून निरुपाधिक सच्चिदानंदात्म स्वरूपानें ज्ञेय (जाणण्यास योग्य) आहे आणि उपाधि सहित परमेश्वर स्वरूपानें उपास्य आहे याप्रमाणें मानून ज्ञेय ब्रह्म स्वरूपाविषयीं एक आणि उपास्य ब्रह्मस्वरूपाविषयीं सहा असे सात प्रश्न अर्जुन करणार त्यांनें सात विषय - तेब्रह्मतद्विदुः कृत्स्नं - इत्यादिक दीड श्लोकानें भगवंतानीं सूत्रभूत सूचविले त्यावरून त्याविषयींचे प्रश्न अर्जुनानें केले आहेत. त्या सूत्रभूत भगवंताचे वाक्याचा व्याख्यानरूप या अध्यायाचा आरंभ करतात ॥ अर्जुनउवाच ॥ पूर्वाध्यायांतील पूर्वोक्त दीड श्लोकांतील सूत्रभूत जे ब्रह्मादि शब्द त्यांच्या अर्थाचा चांगला स्पष्ट बोध होण्याचे इच्छेनें अर्जुन प्रश्न करतो. हे पुरुषोत्तमा पुरुषश्रेष्ठा कृष्णा, तद्ब्रह्म किं म्हणजे तें ज्ञेय कृत्स्न (पूर्ण) ब्रह्म कोणतें आणि अकृत्स्न सोपाधिक उपास्य परमेश्वर रूप ब्रह्म कोणतें. असे हे ब्रह्म शब्दानें सोपाधिक आणि निरुपाधिक ब्रह्मस्वरूपाविषयीं दोन प्रश्न. किं अध्यात्मं म्हणजे अध्यात्म तें कोणतें? किं कर्म म्हणजे कर्म तें कोणतें? नंतर अधिभूतं किं प्रोक्तं म्हणजे अधिभूत म्हणून जें सांगितलें तें कोणतें? अधिदैवं किमुच्यते आणि अधिदैव कोणास म्हणतात. ॥ १ ॥

**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ॥
प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥**

अत्र देहे अधियज्ञः कः म्हणजे या देहाचे ठायीं यज्ञाचा प्रवर्तक किंवा यज्ञाचें फल देणारा अधियज्ञ तो कोण आहे, हा अधियज्ञाचे स्वरूपाविषयीं प्रश्न? कथं म्हणजे तो कसा जाणावा, त्या अधियज्ञाची उपासना कशी करावी या विषयींचा हा प्रश्न, हे दोन्ही प्रश्न मिळून एकच प्रश्न, अध्यात्म अधिदैव इत्यादिकांचे स्वरूपाविषयींचे प्रश्ना वरून अधियज्ञादि उपाधीनें युक्त जें उपास्य सगुणेश्वराचें स्वरूप त्याविषयींचे प्रश्न, अर्थात् सिद्ध झाले. हे मधुसूदना म्हणजे हे मधुदैत्यास मारणाऱ्या कृष्णा, नियतात्मभिः प्रयाणकाले कथं ज्ञेयः असि - म्हणजे ज्यांणीं चित्त स्वाधीन केलें आहे ते मरण कालीं तुला कसें जाणतात. ॥ २ ॥

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ अक्षरं ब्रह्म परमं स्वभा-
वोऽध्यात्ममुच्यते ॥ भूतभावोद्भवकरो विसर्गः**

कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥ ॥ ॥ ॥

या प्रश्नांचीं उत्तरें क्रमें करून तीन श्लोकांनीं श्रीकृष्ण भगवान् सांगतात. ज्ञेय ब्रह्म कोणतें असा जो प्रश्न केला त्याचें उत्तर प्रथम सांगतात. परमं अक्षरं ब्रह्म - म्हणजे परम जें अक्षर तें ब्रह्म. अक्षर असें लोकांत वर्णास म्हणतात. आणि प्रणवरूप जें एकाक्षर त्यासही श्रुति स्मृतींत ब्रह्म असें म्हटलें आहे तें ब्रह्म अशी शंका होईल ती न व्हावी यासाठीं परम हें अक्षराचें विशेषण केलें यावरून अक्षरापासून सर्व-जगाची उत्पत्ति सांगून तें अक्षर कोणतें अशी शंका झालीतर तिचें निराकरण कर-ण्यासाठीं हे गार्गि जें स्थूल नव्हे, जें अणु नव्हे, जें ऱ्हस्व नव्हे, जें दीर्घ नव्हे, असें तें जगास कारणभूत वस्तु त्यास ब्रह्मवेत्ते अक्षर असें म्हणतात. असें उपनिषदांत सांगि-तलें आहे असें जें अक्षर तें ब्रह्म असा अर्थ निष्पन्न होतो. प्रणवरूप अक्षर तसें नाहीं. म्हणून तें ब्रह्म नव्हे अशी त्याची व्यावृत्ति ( निवडणें ) झाली. अथवा द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ॥ क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ या पंधरावे अध्या-यांतील श्लोकांत आणि प्रधानास अक्षर म्हणावें. अमृत जो जीव त्यास अक्षर म्हणावें. असें श्रुतींत सांगितलें आहे यावरून अक्षर असें जीवाचेंही नाम आहे तेव्हां अक्षर ब्र-ह्म असें म्हटलें तर जीव ब्रह्म म्हणजे मायोपाधिक जगाचे उत्पत्ति स्थिति लयांस का-रणभूत सर्वज्ञत्वादिक गुणयुक्त पूर्वाध्यायीं सांगितलेलें सोपाधिक ब्रह्म असा अर्थ-होईल तो विरुद्ध आहे. जीवास पूर्वोक्त सोपाधिक ब्रह्मरूपता संभवत नाहीं. सोपाधि-क जीव आणि ईश्वर यांचा भेद उपाधिनिमित्तक आहे या साठीं परम हें अक्षराचें विशे-षण केलें, तेणें करून जें जीवाख्य अक्षर तें परम म्हणजे निरुपाधिक ब्रह्म असा अ-र्थ होतो तो विरुद्ध नाहीं. वेदांतांतील महावाक्यानीं महावाक्यांतील त्वंपदाचा जो वि-वक्षित निरुपाधिक जीवात्मा त्यास तत्पदाचा जो विवक्षित निरुपाधिक परब्रह्मरूपा-र्थ तद्रूपता स्पष्ट सांगितलीच आहे. तोच येथें जीव ब्रह्मैक्यरूप महावाक्यार्थ सांगि-तला. किंतत् ब्रह्म - या प्रश्नवाक्यानें परम ब्रह्म कोणतें असा जरी प्रश्न केला नाहीं तथापि पूर्वाध्यायांतील सूत्रभूत वाक्यांत - तद्ब्रह्मतद्विदुः कृत्स्नं - असें म्हटलें आ-हे त्यावरून - किंतद्ब्रह्म - असा प्रश्न केला त्यावरून या प्रश्नांतील ब्रह्मपदानें तें कृत्स्न म्हणजे परब्रह्म कोणतें असा प्रश्न निष्पन्न झाला. त्याचें उत्तर - अक्षर परब्रह्म अ-सें सांगितलें यास्तव प्रश्न आणि उत्तरें दोन्हीं एकाविषयींच सिद्ध झालीं अशी अर्था-ची योजना करावी. आतां अध्यात्म कोणतें या प्रश्नाचें उत्तर सांगतात. स्वभावः अ-ध्यात्मं उच्यते म्हणजे ब्रह्म आपला जो अंशभूत जीव त्याचें जें सर्व देहांचे ठाईं कर्तृ भोक्तृ स्वरूप तेणें करून स्थित झालें असतां त्यासच अध्यात्म असें म्हणतात. स्व-स्य म्हणजे आपला जो भाव म्हणजे कर्तृ भोक्तृ स्वरूपानें स्थिति होणें. असा स्वभा-

व शब्दाचा अर्थ केला म्हणजे पूर्वोक्त अर्थ होतो. आतां कर्म कोणतें या प्रश्नाचें उत्तर सांगतात. भूतभावोद्भवकरः विसर्गः कर्मसंज्ञितः - जरायुज, अंडज, स्वेदज, उद्भिज या भेदानें चार प्रकारचे जे प्राणी तीं भूतें. त्यांचा भाव म्हणजे उत्पत्ति आणि उद्भव म्हणजे आदित्यापासून वृष्टि होते, वृष्टिपासून अन्न होतें, अन्नापासून प्रजा होतात. या क्रमें करून होणारी प्राण्यांची वृद्धि ती प्रत करणारा जो विसर्ग म्हणजे देवतांचे उद्देशानें अग्नि आदिकांत केलेला हवि आदिकांचा होम किंवा दान त्यास कर्म अशी संज्ञा आहे, उत्पत्ति समयीं ज्यांचे शरीरास जरेचें वेष्टन असतें ते जरायुज म्हणजे मनुष्यादिक, जरेस जार असें लोकांत म्हणतात. ज्यांचे शरीराची उत्पत्ति अंडांत होते आणि अंड फुटलें म्हणजे शरीर बाहेर व्यक्त (उघडें) होतें ते अंडज म्हणजे पक्षि सर्प इत्यादिक, ज्यांचीं शरीरें घर्मा (घाम) पासून उत्पन्न होतात ते स्वेदज म्हणजे कृमि, दंश, मत्कुण इत्यादिक, जे भूमीचा भेद करून उर्ध्वभागीं वाढतात ते उद्भिज म्हणजे वृक्ष, लता, गुल्म (झुडपें) इत्यादिक असे हे प्राण्यांचे भेद जाणावे ॥ ३

## अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ॥
## अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतांवर ॥ ४ ॥ ॥

आतां अधिभूत तें कोण अशा प्रश्नाचें उत्तर सांगतात. क्षरोभावः अधिभूतं म्हणजे नाश पावणारें जें सर्व प्राण्यांचें कर्मफलभूत देहेंद्रियादिक वस्तुमात्र-उत्पन्न होणारें तें अधिभूत हें सर्व प्राण्यांस कर्मफलाचा उपभोग देणारें आहे. म्हणून यास अधिभूत अशी संज्ञा आहे आतां अधिदैव कोणास म्हणतात. या प्रश्नाचें उत्तर सांगतात. चपरं पुरुषः अधिदैवतं- आणि ज्याणें हें सर्व जग व्यापलें आहे किंवा सर्व शरीररूप पुरींत जो शयन करतो असा जो सर्व इंद्रियांस आपापलीं कार्यें श्रवण दर्शनादिक करण्याविषयीं अनुग्रह करतो किंवा शक्ति देतो असा जो सूर्य मंडळांत राहणारा सकळ देवतांचा आत्मा हिरण्यगर्भ त्यास अधि दैवत म्हणावें. सर्व दैवता याच्या अंशभूत आहेत म्हणून त्यास अधिदैवत अशी संज्ञा आहे. यास प्रमाण- कोच हिरण्यगर्भ ज्यास ब्रह्मा असें ही म्हणतात. तो प्रथम शरीरी आहे त्यास पुरुष ही म्हणतात. आणि सर्व भूतांचा अधिपति, आदिकर्ता तो आहे या अर्थाची श्रुति आहे. आतां या देहाचे ठायीं अधियज्ञ तो कोण या प्रश्नाचें उत्तर सांगतात. हे देहभृतांवर अत्र अधियज्ञः अहमेव म्हणजे हे देहधारण करणाऱ्यांत श्रेष्ठा अर्जुना, यज्ञ विष्णुर्व आहे या-अर्थाच्या श्रुतीवरून यज्ञाभिमानिनी यज्ञ प्रवर्तक किंवा यज्ञाचें फल देणारी विष्णुवाख्य देवता या शरीराचे ठायीं मीच आहे. येणें करून परमेश्वराची या देहांत जशी कर्तृ भोक्तृ जीव स्वरूपानें स्थिति आहे तशी सर्वकर्म प्रवर्तक सर्व कर्म फलदातृ अंतर्यामि स्वरूपानें हि स्थिति आहे असें सूचविलें यास प्रमाण या देहरूप वृक्षास-

जीव आणि ईश्वर एतद्रूप दोन पक्षी अधिष्ठून राहतात आणि एक जीव कर्म करून त्याचें ईश्वरास समर्पण करून संतोषाप्रत पावविते एक ईश्वर जीवानें केलेले कर्माचें फल त्यास देऊन संतोषाप्रत पावविते याप्रमाणें परस्परांस संतोष पावविणारे ते परस्परांचे सखे आहेत. त्यांतील एक जीव केलेले कर्माचें फलाचा सुख दुःखानुभवरूप भोग या शरीराचे ठायीं करते. ईश्वर अंतर्यामी कर्मफलाचा उपभोग न करतां साक्षिभूत स्वप्रकाश स्वरूपानें राहतो अशा अर्थाची श्रुतिप्रमाण आहे. देह धारण करणाऱ्यांत तूं श्रेष्ठ आहेस. असें अर्जुनास संबोधन दिल्यानें तूं श्रेष्ठ आहेस यास्तव आपली प्रवृत्ति निवृत्ति अंतर्यामीचे स्वाधीन आहे असें जाणून त्याची तूं अंतर्यामिरूपानें उपासना कर असें सुचवून तो अधियज्ञ कसा जाणावा आणि त्याची कशी उपासना करावी अशा कथं या प्रश्नाचें उत्तर सांगितलें. ॥ ४ ॥

**अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ॥**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५**

या प्रमाणें सांगितलेले प्रश्नोत्तरांतील प्रथम प्रश्नोत्तरांत जीवास ब्रह्मभाव सांगितला. त्याचें अपरोक्षज्ञान ज्यांस आहे त्यांस त्या विषयींचें चिंतन नको, त्यापुण्यें करून त्यांचे प्राण वर जात नाहींत ते येथेंच लीन होतात. तो ब्रह्म असतांच ब्रह्म पावला असें श्रुतींत सांगितलें आहे. यावरून द्वितीय प्रश्नोत्तरांत महावाक्यांतील शब्द त्वं पदार्थ सांगितला त्याचें ज्ञान वस्तु तत्त्व विषयींचें आहे यास्तव त्या विषयींही चिंतन नको, तृतीय चतुर्थ प्रश्नोत्तरांत कर्मफल आणि फल साधन कर्म हीं सांगितलीं त्यांचें ही चिंतन नको. कारण कर्मानेंच चित्ताचा अवरोध होतो यामुळें फल किंवा त्याचें साधन कर्म यांचें अंतकालीं स्मरण होईलच न झालें तर उत्तमच आहे. पंचम आणि षष्ठोत्तरांत कार्योपाधि हिरण्यगर्भ कारणोपाधि मायोपाधि अंतर्यामी ईश्वर हीं दोन स्वरूपें उपास्य सांगितलीं त्यांतून एका उपास्याचें तरी चिंतन दृढ झालें असलें तर त्या संस्कारानें अंतकालीं त्याचा प्रत्यय किंवा स्मरण अवश्य होईल यास्तव त्या परमात्म्याचे दोन उपास्य रूपांतून एके स्वरूपानें परमेश्वरास स्मरत असतां जो कलेवर म्हणजे शरीर टाकितो तो अर्चिरादिक मार्गानें ब्रह्मलोकास जाऊन तेथें त्यास ब्रह्मात्मत्व साक्षात्कार होऊन तो माझे स्वरूपाप्रत पावतो म्हणजे मुक्त होतो असें सांगून ज्यांनीं चित्त स्वाधीन केलें आहे ते तुला मरण समयीं कसें जाणतात? या प्रश्नाचें उत्तर सांगतात. अंतकालीं म्हणजे मरण समयीं मामेव स्मरन् म्हणजे माझ्या पूर्वोक्त रूपाचेंच स्मरण करीत असतां कलेवरं मुक्त्वा म्हणजे देह सोडून यः प्रयाति म्हणजे जो जातो सः मद्भावं याति म्हणजे तो माझे स्वरूपाप्रत पावतो. नास्ति अत्र संशयः म्हणजे यांत संशय नाहीं. ब्रह्मात्मैक्य साक्षात्कार ज्या-

स झाला तो याच देहांत ब्रह्म प्राप्त होऊन मुक्त होतो. त्यास कोठें गमन नाहीं. उपासकांस अर्चिरादि मार्गानें ब्रह्मलोकीं गमन होऊन तेथें ते मुक्त होतात. असें सांगितलें या प्रमाणेंच वेदांत श्रवणानें ज्यांस महावाक्यांतील शब्द तत्वं पदांचे जे विवक्षित शब्द निरुपाधिक जीवेश्वर पदार्थ त्यांचें उत्तम ज्ञान निश्चयात्मक झालें आहे तेही ब्रह्मलोकीं जाऊन ब्रह्मदेवाचे प्रलय कालीं ब्रह्मदेवा सहवर्तमान त्यांस तेथें ब्रह्मात्मा परोक्ष साक्षात्कार होऊन ते मुक्त होतात, असें श्रुतींत सांगितलें आहे. यावरून शब्द तत्वं पदार्थ निरुपाधिक जीवात्म स्वरूप जाणणारा जो पूर्वोक्त अध्यात्मज्ञानी त्यास ही क्रममुक्ति उपासका प्रमाणें होते. तीश्रुति ब्रह्मात्मा परोक्ष साक्षात्कार ज्यास झाला आहे त्यास याच देहांत ब्रह्म प्राप्ति रूप मोक्ष प्राप्ति होते असें श्रुतींत सांगितलें आहे यावरून त्या विषयींची नव्हे, त्या श्रुतींत उपासना सांगितली नाहीं आणि निरुपाधिकात्म स्वरूप मात्राचें ज्ञान ज्यास आहे त्यास पूर्वोक्त सगुण ब्रह्मोपासना संभवत ही नाहीं. यास्तव " नहिकल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं तात गच्छति " या श्लोकांत सांगितल्या प्रमाणें त्या अध्यात्म ज्ञान्यास क्रममुक्ति, ती श्रुति सांगत्ये असें निर्विवाद प्रसिद्ध आहे. ॥ ५ ॥

यं यं वापि स्मरन् भावं त्यजत्यंते कलेवरम् ॥
तं तमेवेति कौंतेय सदा तद्भाव भावितः ॥ ६ ॥

केवल कार्योपाधिक व कारणोपाधिक अशा उपास्य परमेश्वराचे चिंतनानेंच देह मरणा नंतरच त्यास परमेश्वर स्वरूपाची प्राप्ति होते असें नाहीं. लोकांत एक कीट आहे तो भ्रमराचे चिंतनानें जीवंत असतां भ्रमर स्वरूपाप्रत पावतो असें प्रसिद्ध आहे. तसेंच महादेवाचें चिंतन करीत असतां नंदिकेश्वरास त्या देहांतच महादेवाचें सारूप्य प्राप्त झालें असें योगशास्त्रांत प्रसिद्ध आहे. मग जो ज्याचें निरंतर चिंतन करतो त्यास मरण समयीं त्याचें स्मरण होऊन दुसरे देहांत त्या ध्येय वस्तूची प्राप्ति होते म्हणून काय सांगावयाचें आहे अशा तात्पर्यानें हा विषय दुसरे ठिकाणीं ही दाखवितात. हे कौंतेया कुंतीपुत्रा अर्जुना, वा म्हणजे अथवा यं यं भावं स्मरन्– म्हणजे जो ज्या देवतेचें किंवा दुसऱ्या पदार्थाचें स्मरण करीत असतां– अंते कलेवरं त्यजति म्हणजे मरण कालीं शरीराचा त्याग करतो तो– सदा तद्भाव भावितः– म्हणजे सर्वदा त्या स्वरूपाचे चिंतनाचे अभ्यासें करून युक्त झाल्या मुळें तं तं एति– म्हणजे त्या त्या स्वरूपा प्रत पावतो. ॥ ६ ॥

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मरयुद्ध्य च ॥ मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥ ७ ॥

तस्मात् म्हणजे असें आहे या कारणास्तव.- सर्वेषु कालेषु मां अनुस्मर - म्हणजे मरण कालीं माझें स्मरण होण्या साठीं सर्वकाल माझें चिंतन तूं कर, जर अंतःकरणाच्या अशुद्धतेमुळें माझें निरंतर चिंतन करण्यास समर्थ नसशील तर अंतःकरण शुद्ध्यर्थ- युद्ध्यच- म्हणजे स्वधर्मानुष्ठान रूप शास्त्रविहित युद्ध कर. च शब्दें करून युद्ध आणि उपासना या दोन्हीं ही करण्याचा उपदेश केला. ज्ञान आणि कर्म यांचा समुच्चय जसा विरुद्ध आहे तशीं कर्म आणि उपासना हीं विरुद्ध नाहींत असें ही- युद्ध्यच- याचें व्याख्यान करतात. मय्यर्पितमनो बुद्धिः म्हणजे नित्य नैमित्तिक निष्काम कर्मानुष्ठानें करून चित्त शुद्धि होऊन माझे ठायीं समर्पित आहे. संकल्प विकल्पात्मक मन आणि निश्चयात्मक बुद्धि ज्यानें असा तूं सर्वदा माझें चिंतन करीत होत्साता अंतकालीं मला स्मरून असंशय मा मेव एष्यसि म्हणजे निःसंशय मजप्रतच येशील. ७

## अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ॥ परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥ ८ ॥

याचेंच तीन श्लोकांनीं स्पष्टीकरण करतात. हे पार्था अर्जुना, अभ्यासयोग युक्तेन म्हणजे ध्येय किंवा उपास्य वस्तूचे ठायीं चित्ताची स्थिरता करण्या विषयींचा जो प्रयत्न त्यास अभ्यास म्हणावें. ज्या अभ्यासानें ध्येया शिवाय इतर पदार्थाकार वृत्ति न होतां निरंतर ध्येय मात्राकार अंतःकरण वृत्तीचा निरंतर प्रवाह होतो तद्रूप किंवा तत्फल भूत जो योग म्हणजे ध्येयाचे ठायीं चित्त स्थैर्यरूप समाधि तेणें करून युक्त आणि अनन्य गामिना- म्हणजे ध्येय वस्तु सोडून दुसरे विषया कडे न जाणारें असें चेतसा म्हणजे अंतःकरणानें, अनुचिंतयन् म्हणजे शास्त्र आणि गुरु यानीं उपदेश केलेले परमेश्वराचे ध्येय स्वरूपाचें चिंतन करीत असतां- परमं दिव्यं पुरुषं याति म्हणजे सर्वोत्कृष्ट जो अंतर्यामी आदित्य मंडलांत वर्ती पुरुष त्या प्रत पावतो. ॥ ८ ॥

## कविम्पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ॥ सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥

चिंतन करावयाचा आणि पावावयाचा जो दिव्य पुरुष त्याचेंच पुनः वर्णन करतात. कवि म्हणजे अतीत अनागत अशा सर्व पदार्थांस पाहणारा सर्वज्ञ, पुराण म्हणजे सर्वांस कारणभूत आहे यामुळें चिरंतन किंवा अनादि आणि अनुशासिता म्हणजे अंतर्यामीचे स्वरूपानें सर्वांचें शासन किंवा नियमन करणारा आणि अणोः म्हणजे सूक्ष्मा पेक्षां ही, अणीयांस म्हणजे फार सूक्ष्म दुर्ज्ञेय असें तात्पर्य आणि सर्वस्य धातारं म्हणजे सर्व शुभाशुभ कर्मफलें यथा योग्य विभाग करून देणारा आणि-

अचिंत्यरूपं म्हणजे अपरिमित महिमा असल्यामुळें ज्याचे स्वरूपाचें चिंतन करण्यास शक्य नाहीं असा आणि आदित्यवर्णं म्हणजे सूर्याप्रमाणें निरंतर प्रकाशमान ज्याचें रूप आहे असा आणि तमसः परस्तात् म्हणजे अज्ञानस्वरूप किंवा मोहस्वरूप जो अंधकार त्याहून पलीकडील स्वप्रकाश स्वरूपामुळें अज्ञान किंवा त्यामुळें होणार जो देहादिकांवर आत्मत्व बुध्यादिक रूप मोह तद्रहित असें तात्पर्य- अशा पुरुषाप्रत यः अनुस्मरेत् म्हणजे जो चिंतन करील तो त्याप्रत पावतो असा पूर्वश्लोकांशीं अन्वय करावा किंवा- स तं परं पुरुष मुपैति दिव्यं - या पुढील श्लोकांतील त्या दिव्य पुरुषाप्रत तो पावतो असा अन्वय करावा. ॥ ९॥

**प्रयाण काले मनसा चलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ॥ भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ १०॥ ॥**

मरण समयीं त्या दिव्यपुरुषाचें चिंतन होण्या विषयीं मोठा प्रयत्न करावा असें सुचवून चिंतनाचें फल सांगतात. भक्त्या युक्तः म्हणजे ईश्वराचे ठायीं जें प्रेम तद्रूप भक्तीनें किंवा आराध्यत्व बुद्धीनें युक्त होत्साता - योगबलेन भ्रुवोर्मध्ये सम्यक् प्राणं आवेश्य म्हणजे हृदय कमलाचे ठायीं सर्व इंद्रियें, प्राण आणि मन यांच्या व्यापारांचा निरोध करणें असा जो योग त्याचें जें बल म्हणजे अभ्यासाचा संस्कार तेणें करून भ्रुकुटीचे मध्यभागीं उत्तम प्रकारानें प्राणाचें स्थापन करून- अंतकाळें अचलेन मनसा म्हणजे मरणकाळीं एकाग्र मनानें - तं पुरुषं अनुस्मरन् - सः तं दिव्यं पुरुषं उपैति म्हणजे त्या दिव्य पुरुषाचें चिंतन करणारा त्या दिव्य पुरुषाप्रत पावतो तात्पर्य- मूलाधार चक्रापासून नाभि हृदय ब्रह्मरंध्रापर्यंत जीं स्थानें योग शास्त्रांत सांगितलीं आहेत त्यांचे ठायीं प्राण वरवर चढवावा त्यांपासून खालीं उतरावा असा जो केलेला अभ्यास त्याचे बलानें मरण समयीं हृदयाचे ठायीं प्राणास स्थापन करून नंतर सुषुम्ना नाडीचे द्वारा भ्रुकुटीचे मध्यभागीं आज्ञाचक्र आहे त्याचे ठायीं प्राणाचें स्थापन करावें, त्याचे तेथेंच स्थापन करण्याचें प्रयोजन असें आहे कीं, भ्रूमध्यापासून वर ब्रह्मरंध्रापर्यंत प्राणवायू चढविला तर मनाला मूर्छा प्राप्त होते. यामुळें मरणकाळीं ईश्वर चिंतन, ईश्वर स्मरण पूर्वक होणार नाहीं. यास्तव मरण समयीं भ्रूमध्यभागींच प्राणाचें स्थापन करावें. तंतर ईश्वर चिंतना प्रमाणें उपासक मरण पावल्या नंतर त्यास ब्रह्मलोकास जावयाचा अर्चिरादि मार्ग पुढें सांगितला आहे त्या मार्गांतील- पर्वें म्हणजे उपासकास ब्रह्मलोकास पोंचविणाऱ्या ज्या देवता त्यांचीं स्थानें आणि त्या उपासकाला ब्रह्मलोकास अमानव पुरुष ज्या स्थाना पासून पोंचवितो तें स्थान आणि तो पुरुष आणि पावावयाचा मुख्य ब्रह्मलोक यांचे ही तेथेंच म्हणजे भ्रूमध्य देशीं चिं-

तन करावें. त्या चिंतनाचे संस्कारानें उपासकाचें मन वृत्तियुक्त होऊन पूर्व संस्कारबळानें उपासकानें भ्रूमध्या पासून वर चढविलेले प्राण ब्रह्मरंध्राचा भेद करून गेल्यावर दिव्य देहादिकें करून युक्त आणि अर्चिरादि मार्गानीं गमन करते वेळेस त्या त्या मार्गातील देवतांनीं पूजा करून पुढील मार्गाचे ठायीं पोंचविलेला आणि अमानव पुरुष ब्रह्मदेवाचा सेवक त्याच्या बरोबर आहे आणि त्यास इच्छित जें स्थल त्याचे ठायीं त्या अमानव पुरुषानें नेऊन पोंचविला आहे. अशा उपासकाचे आत्म्याप्रत पाहतें. नंतर तो उपासक योगी "कविं पुराणमनुशासितारं" येथें करून सांगितलेला जो सर्व जगाची उत्पत्ति करणारा नारायण त्यास म्हणतात. अशा हिरण्यगर्भाप्रत पावतो म्हणजे ब्रह्मलोकीं त्याचे समीप जातो. ब्रह्म विष्णु महेश्वरांचे लोक एकावर एक आहेत अशी कल्पना पौराणिक मतांत जशी केली आहे त्या प्रमाणें वैदिक मतांत त्या लोकांची कल्पना नाहीं तर ते सर्व लोक हिरण्यगर्भाचा जो लोक त्यास सत्यलोक म्हणतात, त्यांतच अंतर्भूत आहेत त्याशिवाय दुसरे पृथक् नाहींत. असे बृहदारण्यकोपनिषद आणि त्याचें भाष्य यांत स्पष्ट सांगितलें आहे. त्यावरून येथें लिहिलें याविषयीं सदसद्विचार निर्मत्सर पंडितांनीं करून युक्त असेल त्याचा स्वीकार करावा. ॥१०॥

**यदक्षरं वेदविदो वदंति विशंति यद्यतयो वीतरागाः ॥ यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥११॥ ॥ ॥ ॥**

भ्रुकुटींचे मध्यभागीं प्राणाचें स्थापन करून परमेश्वराचें चिंतन करावें म्हणून सांगितलें तें परमेश्वराचें प्रतिपादन करणारे अनेक मंत्र आणि अनेक नामें आहेत त्यांतून कोणता तरी एक मंत्र किंवा एक नाम मनांत धरून त्याचे द्वारानें करावें असें प्राप्त झालें म्हणून त्याविषयीं नियम करतात. आणि मरण समयीं भ्रुकुटींचे मध्यभागीं प्राणाचें स्थापन करून परम पुरुषाची प्राप्ति होते असें पूर्वोक्त श्लोकांत सांगितलें यावरून ब्रह्मविद्ये वांचून ही केवल योगमार्गानें ब्रह्मप्राप्ति होईल असें ही प्राप्त झालें त्याविषयीं योग्यास ही ब्रह्मविद्येची अपेक्षा आहे असें सांगतात. यत् अक्षरं वेदविदः वदंति म्हणजे ज्यास ॐकाराख्य ब्रह्म असें वेदविदः म्हणजे वेदारंभीं ज्याचा पाठ करतात असा जो ॐकार हाच पर आणि अपर ब्रह्म आहे असा त्याचे ठायीं निर्गुण किंवा सगुण ब्रह्माची उपासना करावी असें सांगण्याचा आरंभ करून अकार, उकार आणि मकार या तीन मात्रा रूप वर्ण ज्यांत आहेत असें जें ॐ असें प्रणव रूप अक्षर येणें करून म्हणजे याचा अर्थ परब्रह्मच आहे असें किंवा हा परब्रह्माचा वाचक आहे यास्तव हा ब्रह्मच आहे असें ध्यान करील तो त्या पर किंवा अपर ब्रह्माप्रत पावतो. असा जो वेदोक्त अर्थ त्याप्रत जाणणारे बोलतात. अथवा ज्यास-

ॐकार या शब्दाचें वाच्य अक्षर म्हणजे नाशरहित ब्रह्म असें जें स्थूल नव्हे, अणु नव्हे, ह्रस्व नव्हे, दीर्घ नव्हे असें जें जगाचें कारण त्यास ब्रह्मवेत्ते ब्राह्मण अक्षरब्रह्म असें म्हणतात. असा जो वेदोक्त अर्थ त्या प्रत जाणणारे बोलतात. वीतरागाः यतयः यत् विशंति म्हणजे निस्पृह यत्न करणारे संन्यासी ज्याचा ब्रह्म चिंतन करण्यासाठीं शालिग्राम प्रतिमादिका प्रमाणें प्रतीकरूपानें आश्रय करतात. आणि शालिग्रामादिका प्रमाणें ज्याचे ठायीं ब्रह्म चिंतन करतात. म्हणजे समुद्राप्रत जशा नद्या आपलीं नांवें आणि रूपें टाकून प्रवेश करतात त्या प्रमाणें ते संन्यासी देहेंद्रियादिकोपाधि सोडून ज्याचे ठायीं प्रवेश करतात तद्रूपच ते होतात असा अर्थ जाणावा. यत् इच्छंतः ब्रह्मचर्यं चरंति ॥ ज्या ॐकार किंवा परब्रह्माच्या प्राप्ती साठीं गुरु कुलवासादिक ब्रह्मचर्य व्रताचें धारण करतात. तत् पदं ते संग्रहेण प्रवक्ष्ये - तें निर्गुणब्रह्म किंवा सगुण ब्रह्म यांचे प्राप्तीस साधन भूत अकार उकार मकार रूप वर्णत्रयात्मक ॐकाररूप पद किंवा ब्रह्मविद्यांनें प्राप्त व्हावयाचें जें परब्रह्म स्वरूप विष्णवाख्य पद त्याप्रत तुला बोध होईल असें संक्षेपानें सांगतों. तें अक्षर ब्रह्म मी कसा जाणेन असा व्याकुल होऊं नको. येणें करून मंद किंवा मध्यम बुद्धि जे अधिकारी यांणीं पूर्वोक्त श्रुतींत पर किंवा अपर ब्रह्मस्वरूपाचें ॐकाराचे ठायीं जें उपासन सांगितलें आहे तें योग धारणा सहित केलें असतां क्रमानें मुक्तिरूप फलास साधन होतें असें सूचविलें आणि अकाराचा वासुदेव विष्णु असा अर्थ, उकाराचा ब्रह्मा असा अर्थ, मकाराचा महादेव असा अर्थ. या प्रमाणें त्रिमात्रात्मक ॐकाराचा ब्रह्मा विष्णु महेश्वर रूप सगुण ब्रह्मरूप अर्थ आणि ॐकारांत जी प्लुत अर्धमात्रा आहे ती सत्व रज तमो रूप गुणत्रयातीत तुरीय सच्चिदानंदात्मक ज्ञेय ब्रह्माचें प्रतिपादन करते तें ब्रह्म महा वाक्या पासून स्वात्मत्वें करून अपरोक्ष त्यानें ज्याणीं जाणलें आहे त्यांस याच देहांत ब्रह्म प्राप्ति होते असें सूचविलें. ॥११॥

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ॥ मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥१२॥**

योग धारणा सहित पूर्वोक्त प्रणवोपासन त्याचें फल, अर्चिरादि मार्गानीं ब्रह्म लोक प्राप्ति आणि त्याच्या प्रसंगानें दुसरें कांहीं असें येथून पुढें अध्याय समाप्ती-पर्यंत सांगावयास आरंभ करतात. भ्रूमध्यभागीं प्राणांचें स्थापन कसें करावें तें सांगतात. आत्मनः म्हणजे आपलीं, सर्वद्वाराणि संयम्य म्हणजे बाह्य शब्दादिक विषयांचें ग्रहण करण्यास द्वारभूत जीं श्रोत्र चक्षुरादिक इंद्रियें त्यांस शब्दादिक विषयां पासून आवरून आणि मनः हृदि निरुध्य म्हणजे बाह्येंद्रियांचा निग्रह केला तरी-मनानें विषयांचें चिंतन होईल यास्तव हृदयाचे ठायीं मनाचा निरोध करून म्हणजे

मनांत ही विषयांचें चिंतन न होईल असें करून – मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् – म्हणजे मूला धारापासून मस्तकपर्यंत जी विद्यमान सुषुम्ना नामक नाडी तिचे द्वारा गुरूपदिष्ट मार्गानें प्राणवायूस भ्रूमध्य भागीं स्थापन करून – योगधारणां आस्थितः म्हणजे ज्या हृदयकमलरूप देशाचे ठायीं ध्येय वस्तूचें चिंतन करावयाचें त्या देशीं मनाची निश्चल स्थिति करणें ज्यास योगशास्त्रांत धारणा असें म्हणतात त्या धारणेनें युक्त होत्साता आत्मनः योगधारणां आस्थितः म्हणजे आत्मविषयक समाधिरूप धारणेनें युक्त होत्साता असा ही अर्थ आत्मनः या पदाचा हि कडे अन्वय करून करतात. ॥१२॥

**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन् मामनुस्मरन् ॥ यः प्रयाति त्यजन् देहं स याति परमां गतिम् ॥१३॥**

मूर्ध्याचे ठायीं प्राणानें स्थापन करून नंतर काय करावें तें सांगतात. ॐ इति एकाक्षरं ब्रह्म व्याहरन् – पूर्वी सांगितल्या प्रमाणें ॐकार हा परब्रह्माचा वाचक आहे अथवा ज्यावर देवता बुद्धि करून उपासना करतात. असें जें शालिग्रामादिक किंवा सुवर्णादिकाच्या प्रतिमा त्यांस प्रतीक असें म्हणतात. त्या जशा विष्णवादि स्वरूपच आहेत या प्रमाणें प्रणव हा परब्रह्माचे उपासनेचें प्रतीकच आहे म्हणून ॐकाररूप एक अक्षर हें ब्रह्म आहे त्याचें जपरूप उच्चारण करीत असतां एकाक्षर या विशेषणानें मरण समयीं इतर मंत्राचे जप पेक्षां या एकेच अक्षराचा जप अनायासानें होतो आणि फल मोठें अशी स्तुति केली आणि मां अनुस्मरन् म्हणजे परमेश्वर जो मी याचें स्मरण करीत असतां अथवा एक म्हणजे अद्वितीय अक्षर म्हणजे नाश रहित असें जें ॐकार यांतील अर्धमात्रेनें प्रतिपाद्य तुरीय ब्रह्म त्याप्रत स्वात्मत्वें करून स्मरत असतां यः देहं त्यजन् प्रयाति म्हणजे मूर्धन्य (मस्तकांतील) नाडींतून ब्रह्मरंध्राचे मार्गानें प्राण गेला म्हणजे देहाप्रत टाकून अर्चिरादिक मार्गानीं गमन करतो – सः परमां गतिं याति म्हणजे जसें कोणी एका पुरुषाचें स्मरण करून त्याचें नाम घेऊन हाक मारली तर तो ऐकून त्याचे सन्निध येतो. त्या प्रमाणें परब्रह्माचें स्मरण करून त्याचें प्रणवरूप नामाचे उच्चारणानें तें व्यापक आहे यामुळें तें सन्निध होऊन ब्रह्मलोक प्राप्तीचे द्वारा तो त्या ब्रह्माप्रत पावतो. त्या ब्रह्म स्वरूपाचें वर्णन करावयास आरंभ करून ज्ञान्यास किंवा उपासकास हें ब्रह्म परमगति आहे. हें ब्रह्म त्यास परमानंदरूप आहे. असें श्रुतींत सांगितलें आहे अशी व्याख्या केली तर पतंजलीनीं चित्तवृत्ति निरोधरूप योगास अभ्यास आणि वैराग्य हीं साधनें आहेत, असें सांगून त्या विषयीं उपाय सांगून ज्यास तीव्र वैराग्य आणि अभ्यास हीं साधनें आहेत किंवा त्यांचे उपाय जे सांगितले त्यांचें अनुष्ठान लौकर प्राप्त झालें आहे त्यांस योगरूप समाधि आसन्न म्हणजे जवळ आहे असें-

सांगितलें. नंतर सांगितले साधना शिवाय ही ईश्वराचा वाचक जो प्रणव त्याचा जप त्याच्या अर्थाचें चिंतन करणें असें जें ईश्वर प्रणिधान तें समाधि सिद्ध होण्यास सुलभ साधन आहे असें ईश्वर प्रणिधान द्वारा समाधि सिद्धिरीश्वर प्रणिधानात्-या सूत्रानें योग शास्त्रांत सांगितलें आहे. येथें तर त्या ईश्वर प्रणिधानानें साक्षात् परम गतिच प्राप्त होते असें या पूर्वोक्त व्याख्ये प्रमाणें सांगितलें तर हें परस्पर विरुद्ध होईल यास्तव ॐ इति एकाक्षरं ब्रह्मव्याहरन्-मां अनुस्मरन्-आत्मनः योग धारणां आस्थितः यः देहं त्यजन् प्रयाति सः परमां गतिं प्रयाति म्हणजे प्रणवरूप एकाक्षर ब्रह्माचा जप करीत असतां आणि माझें चिंतन करीत असतां आणि आत्मविषयक समाधि स्वरूप योगानें युक्त होत्साता जो देहापन टाकून जातो तो परम गतीला पावतो अशी योजना करावी असें कोणी व्याख्यान करतात. ॥ तस्मात् मद्भक्तियुक्तस्य योगिनो वै मदात्मनः ॥ न ज्ञानं नच वैराग्यं प्रायः श्रेयो भवेदिह ॥ यत्कर्मभिर्यत्तपसा ज्ञानवैराग्य तश्चयत् ॥ योगेन दान धर्मेण श्रेयोभिरितरैरपि ॥ सर्वंमद्भक्ति योगेन मद्भक्तो लभतेंजसा ॥ " याचा अर्थ-माझे ठायीं ज्यानें मन आहे असा जो माझा भक्त त्यास बहुत करून माझे भक्तिशिवाय ज्ञान किंवा वैराग्य कल्याण कारक होणार नाहीं. जें फल कर्माचरणानें, तपानें, ज्ञानानें, वैराग्यानें, योगानें, दान धर्मानें, आणीक जीं श्रेयस्कर साधनें आहेत त्यांनीं प्राप्त होतें तें सर्व फल माझा भक्त मद्भक्तीनेंच अनायासें करून किंवा निश्चयें करून पावतो. असें श्रीमद्भागवतांत सांगितलें आहे आणि भगवद्गीतेंतच " तमेव शरणं गच्छ सर्व भावेन भारत ॥ तत्प्रसादात् परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतं ॥ सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ॥ अहंत्वा सर्व पापेभ्यो मोक्षयिष्यामि माशुचः॥ " येणें करून त्या ईश्वरालाच तूं सर्व भावानें शरण जा. त्याचे प्रसादानें तुला शाश्वत ब्रह्मपद प्राप्त होईल. सर्व धर्मांचा परित्याग करून मलाच शरण जा. तुला मी सर्व पापा पासून मुक्त करीन. असें सांगितलें आहे. यावरून भगवद्भक्तांस मोक्षापर्यंत फल देणारी भक्तिच परम पुरुषार्थ आहे आणि आवश्यक आहे. योगाभ्यास आवश्यक नाहीं असें असतां योगाहून ही अधिक जी भक्ति तिचा योग सिद्धी साठीं योग साधनें जी वैराग्यादिक त्यांशीं जो पतंजलीनीं विकल्प केला तो विरुद्ध दिसतो, जीं एक फला विषयीं समान साधनें असतात त्या विषयीं हें करावें किंवा हें करावें असा विकल्प होतो असें शास्त्र संमत आहे अशी शंका होते तथापि भगवद्गीतेंतच षष्ठाध्यायीं जीवन्मुक्ति सुखास मनोजय, वासना नाश, कारण आहे. यास्तव ज्यास जीवन्मुक्ति सुखाची इच्छा आहे त्यानें त्या सुखासाठीं मनोजय आणि वासना नाश यांस साधन भूत जो योग तो अवश्य करावा असें योगास ही श्रेष्ठत्व सांगितलें आहे. यास्तव जे मुमुक्षु आहेत त्यांस योगही आवश्यक आहे त्यांस अति सुलभ साधन भगवद्भक्ति आहे कारण तिचे योगानें भगवत्प्रसाद होऊन या भक्तांस योग

लौकर सिद्ध होवो असा ईश्वर संकल्प होतो. ईश्वर संकल्प सत्य आहे या मुळें भक्तास लौकर इतर साधनापेक्षां भक्तिरूप साधनानें योगसिद्ध होतो या तात्पर्यानें पतंजलीनीं भक्तीचा योगसाधनाशीं विकल्प केला असें जाणावें. ॥१३॥

## अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ॥ तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥१४॥

सांगितल्या प्रमाणें प्राणनिरोध करण्याचा अभ्यास नाहीं किंवा होत नाहीं त्यास भ्रुकुटी मध्यें प्राणाचें स्थापन करून मूर्धन्य सुषुम्ना नाडीचे द्वारा ब्रह्म रंध्रांतून प्राण घालवून स्वेच्छेनें देह टाकण्यास अशक्य आहे त्याची वाट काय असें ह्मणेल तर त्या विषयीं सांगतात. ॥ अनन्यचेताः सन् यः नित्यशः मां अनुस्मरति ॥ ह्मणजे मी जो परमेश्वर त्याचेच ठायीं आदर ठेवून त्याहून दुसरे विषयावर ज्याचें चित्त नाहीं असा होत्साता जो निरंतर म्हणजे मरण पर्यंत माझें चिंतन करतो - तस्य नित्ययुक्तस्य योगिनः हे पार्थ अहं सुलभः अस्मि - म्हणजे कर्मवश होऊन किंवा योग बलानें स्वच्छेनें प्राण त्याग करणारा जो निरंतर माझे ठायीं स्थिरचित्त झालेला किंवा योगी त्यास मी परमेश्वर सुलभ म्हणजे सुखें करून पावावयास योग्य आहें. येणें करून यावज्जीव विक्षेपशून्य भगवंताचें चिंतनच परम गतीस साधन आहे. योग मार्गानें स्वेच्छें करून प्राणोत्क्रमण घडो किंवा न घडो त्या विषयीं आग्रह करूं नये. असें सुचविलें. सांगितले प्रमाणें निरंतर माझें चिंतन करणारा जो नित्ययुक्त योगी म्हणजे योग्यास अवश्य कर्तव्य जो नियमित आहारादिक त्यांहीं करून आणि यम नियमादिकांहीं करून युक्त जो योगानुष्ठान करणारा त्यास मी सुलभ आहें. येणें करून सांगितली गति दुर्लभ आहे असें मानूं नये अशी ही कोणी व्याख्या करतात. ॥१४॥

## मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ॥ नाप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥१५॥

मी सुलभ झालों म्हणजे काय होतें तें सांगतात. ॥ महात्मानः परमां संसिद्धिं गताः - म्हणजे रज आणि तम एतद्रूप मलाचा माझे चिंतनें करून नाश होऊन ज्यांचें अंतःकरण शुद्ध झालें आहे असे शुद्ध सत्व गुणी ब्रह्मात्म साक्षात्कार वंत आणि माझे लोकीं येऊन भोग समाप्ति झाल्यानंतर मोक्षाप्रत पावलेले जे पूर्वोक्त उपासक ते - मां उपेत्य- म्हणजे मी जो परमेश्वर त्याप्रत पावून ॥ दुःखालयं अशाश्वतं पुनः जन्मन आप्नुवंति - म्हणजे गर्भांत वास करणें, योनींतून बाहेर पडणें, इत्यादिक सर्व दुःखाचें स्थान आणि मूढ दृष्टया किंचित् वैषयिक सुखाचें स्थान असलें तरी अशाश्वत म्हणजे नाश पावणारें आणि अतितुच्छ अशा पुनः दुसऱ्या जन्मास ये-

न नाहींत. ॥१५॥

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ॥ मा-**
**मुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥१६॥ ॥**

मजप्रत पावून पुनः जन्मास येत नाहींत, असें सांगितल्यानें जे परमेश्वरा-प्रत पावले नाहींत त्यांची पुनः जन्ममरणांत येणें जाणें अशी आवृत्ति आहे असें अर्थात सिद्ध झालें तें सांगतात. हे अर्जुन, - आब्रह्मभुवनात् लोकाः पुनः आवर्तिनः संति- म्हणजे जेथें भूतें उत्पन्न होतात तें भुवन म्हणजे लोक- आब्रह्मभुवनात् म्हणजे ब्रह्मलोका सुद्धां सर्व भोग भूमि स्वरूप जे भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनो लोक, तपोलोक तेथें गेलेले प्राणी पुनः जन्मास येतात. याचें असें तात्पर्य आहे-कीं, या ब्रह्मपुरांत म्हणजे जेथें ब्रह्म प्राप्ति होते अशा या शरीरांत दहर म्हणजे सूक्ष्म हृदय कमल आहे यांत सूक्ष्म आकाश आहे तें ब्रह्मच आहे त्याची उपासना उपनिषदांत सांगितली आहे तीस दहरोपासना म्हणतात तशी मी ब्रह्मच आहें अशी जी-उपासना सांगितली आहे तीस अहंग्रहोपासना म्हणतात. तशीच येथें सांगितलेल्या ॐकाराचे ठायीं ब्रह्मोपासनादिक उपासना या सर्व उपासना क्रममुक्ति म्हणजे मरणानंतर अर्चिरादि मार्गानीं ब्रह्मलोकास जाऊन तेथें ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन मोक्ष देणाऱ्या आहेत. या उपासना करून जे ब्रह्मलोकीं गेले ते परत जन्मास येत नाहींत. योषा म्हणजे स्त्री पुरुष, पृथ्वी, पर्जन्य आणि द्यु लोक म्हणजे स्वर्ग या पांच पदार्थांचे ठायीं हे प्रत्येक अग्नि आहेत अशी उपासना करण्यास वेदांत सांगितलें आहे. या उपासनेस पंचाग्नि विद्या असें म्हणतात. या उपासनेनें ब्रह्मलोक प्राप्ति होते असें वेदांतच सांगितलें आहे. यास्तव ते उपासक मरणानंतर ब्रह्मलोकास जातात. परंतु ते ईश्वरोपासक नव्हेत यामुळें त्यांस तेथें ब्रह्म साक्षात्कार न होतां ते पुण्यक्षय झाल्यानंतर परत जन्मास येतात. या तात्पर्यानें ब्रह्मलोकास गेलेले ही परत जन्मास येतात. असें सांगितलें. तेथें गेलेले सर्व परत जन्मास येतात. असें समजूं नये. हे कौंतेय, ॥ मामुपेत्य पुनर्जन्म न विद्यते- म्हणजे हे कुंती पुत्रा अर्जुना, मजप्रत जे पावतात त्यांस पुनर्जन्म होत नाहीं. या श्लोकांत अर्जुन आणि कौंतेय हें दोनवेळ संबोधन आदारार्थ-आहे. ॥१६॥

**सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः ॥ रात्रिं यु-**
**गसहस्रांतां तेऽहोरात्रविदो जनाः ॥१७॥ ॥**

ब्रह्मलोका सुद्धां सर्व लोक पुनरावृत्तिशील (पुनर्जन्म देणारे) आहेत याचें कारण ते सर्व लोक कालानें परिच्छिन्न म्हणजे इतका काळ राहावयाचे पुढें नाश पावत-

याचे अशा इयत्तेचे आहेत असें सांगतात. अथवा तपस्वी, दानशील वैराग्य संपन्न आणि शीतोष्णांचें सहन करणारे जे आहेत ते महर्लोक, जनोलोक, तपोलोक आणि सत्यलोक यांचे ठायीं शोकरहित स्थानाप्रत पावतात. अशा अर्थाचीं पुराणांत वाक्यें आहेत. यावरून भूरादिक खालचे तीन लोकांपेक्षां ही त्यावरील महरादिक चारलोक यांस उत्कृष्टत्व आहे असें होतें. जरब्रह्मलोकसुद्धां सर्व लोकांचाही नाश होतो किंवा तेथें गेलेले जीव पुनः परत जन्मास येतात. तर मग ह्या लोकांचा पुराणोक्त विशेष कसा संभवेल अशी शंका होईल तर जरी सर्व लोकांचा नाश होतो तथापि कोणाचा अल्प कालानें नाश होतो, कोणाचा त्यापेक्षां बहुत कालानें होतो असा विशेष सांगण्या साठीं ब्रह्मदेव स्वभावें करून शंभर वर्षें पर्यंत आयुष्याचा आहे, ब्रह्मदेवाचे मानानें त्याचे एक दिवसांत भूरादि तीन लोकांची उत्पत्ति आणि रात्रीं प्रलय होतो असें सांगण्यासाठीं ब्रह्मदेवाचे दिवसाचें आणि रात्रीचें मान सांगतात.॥ सहस्रयुगपर्यंतं ब्रह्मणः यत् अहः म्हणजे कृत, त्रेता, द्वापर आणि कलि हीं चार युगें मनुष्यांचे कालमानानें सहस्रवेळ जितक्या कालमानांत जातील तितके कालमानानें ज्यांचा पर्यंत म्हणजे समाप्ति होते तितक्या कालमानाचा ब्रह्मदेवाचा दिवस आणि - युग सहस्रांतां ब्रह्मणः रात्रिं म्हणजे दिवसाचें जें कालमान सांगितलें तितकेच कालमानानें जिचा अंत (समाप्ति) होते तितकेच कालमानाची ब्रह्मदेवाची रात्रि अशा कालमानाच्या ब्रह्मदेवाचा दिवस आणि रात्र यांप्रत - ये - विदुः म्हणजे जे जाणतात - ते जनाः अहोरात्रविदः म्हणजे त्यांस अहोरात्र वेत्ते असें म्हणावें. जे केवल चंद्र आणि सूर्य यांच्या गतीनें अहोरात्र मान जाणतात ते अल्पदर्शी आहेत यास्तव त्यांस अहोरात्र वेत्ते म्हणूं नये असें अर्थातच सिद्ध झालें. या श्लोकांतील - सहस्रयुगपर्यंतं॥ येथील युग पदानें कृतादिक चारयुगें घ्यावीं याविषयीं चतुर्युगसहस्रंतु ब्रह्मणो दिनमुच्यते - असें पुराणांतील वाक्य आहे. या विषयीं कालगणना करण्याचा प्रकार असा आहे. चांद्रादि मानानें तीनशें पंचावन्न ३५५ दिवसांचें जें मनुष्याचें एकवर्ष तें देवांचें एक अहोरात्र म्हणजे एक दिवस आणि रात्र होते तीं अहोरात्रें १५ झालीं म्हणजे एक पक्ष होतो. दोन पक्ष झाले म्हणजे एक मास होतो. ते १२ बारा मास झाले म्हणजे एकवर्ष होतें या प्रमाणें देवांचीं बारा हजार वर्षें गेलीं म्हणजे कृतादिक चार युगें होतात. तीं चार युगें एक हजार वेळ गेलीं म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो आणि तितकेंच कालमान गेलें म्हणजे ब्रह्मदेवाची एकरात्र होते, अशीं तीस अहोरात्रें गेलीं म्हणजे एक मास होतो. असे बारामास गेले म्हणजे एकवर्ष होतें. या मानानें शंभर वर्षें ब्रह्मदेवाचें आयुष्य आहे. त्याची इयत्ता आहे यास्तव त्याचे लोकीं गेलेले पुनः परत जन्मास येतात म्हणून काय सांगावयाचें आहे.॥१७॥

**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ॥**

**रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके॥१८॥**

ब्रह्मदेवाचे दिवसांत आणि रात्रींत काय होतें तें सांगतात. ॥ अहरागमे अव्यक्तात् सर्वाः व्यक्तयः प्रभवंति । म्हणजे दिवसाचे प्रारंभीं किंवा प्रजापति जो ब्रह्मा त्याचे प्रबोध समयीं (निद्रेंतून उठण्याचे वेळीं) सुषुप्त्यवस्थापन्न (गाढनिद्रागत) जो ब्रह्मदेव त्या पासून सर्व प्रजा व्यवहार करावया जोग्या अभिव्यक्त (प्रगट) होतात. ॥ रात्र्यागमे तत्रैव अव्यक्त संज्ञके प्रलीयंते ॥ म्हणजे प्रजापति जो ब्रह्मदेव त्याच्या सुषुप्ति कालीं अभिव्यक्त झालेल्या सर्व प्रजा, ज्या सुषुप्त्यवस्था युक्त अव्यक्ता पासून अभिव्यक्त झाल्या त्याचेच ठायीं लय पावतात. नामरूपात्मक आकाशादिक प्रपंचाची ज्या अवस्थेंत अभिव्यक्ति नाहीं अशी जी आकाशादिकांचे उत्पत्तीस किंवा अभिव्यक्तीस (प्रगट होण्या) कारण भूत अव्याकृतावस्था तद्युक्त माया किंवा मूल प्रकृतीच अव्यक्त शब्दाचा मुख्य अर्थ आहे. तथापि येथें ब्रह्मदेवाचे प्रति दिवशीं आणि प्रति रात्रीस होणारे जे सृष्टि प्रलय ज्यांस दैनंदिन सृष्टि प्रलय म्हणतात, ते सांगावयाचा आरंभ केला आहे. त्यांत नामरूपात्मक आकाशादिक भूतें आहेतच यास्तव अव्यक्त शब्दानें येथें ब्रह्मदेवाची सुषुप्त्यवस्था घेतली, दृष्ट सृष्टि पक्षीं अस्मदादिक जीवानीं अज्ञान कल्पित हा प्रपंच अस्मदादिकांचे सुषुप्ति कालीं जसा अज्ञानांत लीन होतो आणि प्रबोध म्हणजे जागृदवस्थेंत पूर्वीं प्रमाणेंच अभिव्यक्त होतो त्या प्रमाणें सर्व जीव समष्टि रूप प्रजापतीचे अज्ञानानें कल्पिलेला सर्व प्रपंच त्याचे सुषुप्तींत म्हणजे अज्ञानांत लीन होतो. आणि प्रबोधांत यथा पूर्व आविर्भूत (प्रगट) होतो याच तात्पर्यानें धाता म्हणजे ब्रह्मदेव यथा पूर्व प्रपंचास उत्पन्न करिता झाला. असें न म्हणून कल्पिता झाला असें म्हटलें. ॥१८॥

**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ॥**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥१९॥**

उत्पत्तीचे पूर्वीं कार्य अत्यंत असत् म्हणजे अगदींच नसतें आणि नाशानंतर अगदीं नाहींसें होतें असें कोणी मानितात. त्यांचे पक्षीं कृत नाश म्हणजे ज्या देहेंद्रिय मनो बुद्धिरूप उपाधि युक्त जीवानीं कर्म केलें त्या कर्माचा प्रलय कालीं त्या उपाधि युक्त जीवाचा उपाधीचे प्रलयानें प्रलय झाल्यामुळें नाश होईल आणि सृष्टि समयीं ज्या देहेंद्रियाची उत्पत्ति झाली तदुपाधिक जीवांस न केलेले कर्माचा फलोपभोग होईल यास अकृताभ्यागम म्हणतात. हे दोष येतील त्यांचे परिहारासाठीं आणि हा संसार लौकर नाश पावणारा असला तरी अविद्या, काम आणि-

कर्म यांचे पारतंत्र्यामुळें अत्यंत निवृत्ति न होऊन पुनः पुनः त्याचा प्रादुर्भाव होतो, आणि लय होतो असें जाणून या विषयीं वैराग्य व्हावें या साठीं सांगतात. हे पार्था-अर्जुना, ॥ स एव अयं भूत ग्रामः म्हणजे पूर्व कल्पीं लीन झालेला तोच हा स्थावर जंगमात्मक सर्व भूतांचा समुदाय-अहरागमे म्हणजे ब्रह्मदेवाच्या दिवसाचे आरंभीं-भूत्वा भूत्वा म्हणजे पुनःपुनः उत्पन्न होऊन म्हणजे अभिव्यक्त होऊन-रात्र्यागमे प्रलीयते-म्हणजे ब्रह्मदेवाच्या रात्रीचे आरंभीं लीन होतो-पुनः अहरागमे स एव प्रभवति-म्हणजे पुनरपि तोच दिवसाचे आरंभीं अभिव्यक्त होतो. पूर्व कल्पींचा भूत समुदाय अगदीं नाहींसा होऊन दुसरे कल्पीं नवीन दुसराच भूत ग्राम उत्पन्न होतो आणि उत्पन्न झालेला प्रलय कालीं अगदीं नाहींसा होतो असें नाहीं तर त्यासच पुनः पुनः आविर्भाव (प्रगटता) आणि तिरोभाव (अदृश्यता) होतात, ते होण्यास कारण सांगतात. यतः अवशः म्हणजे ज्याकारणास्तव तो अविद्या-काम आणि कर्म त्यांचे जे संस्कार त्यांचे स्वाधीन आहे स्वतंत्र नाहीं. या साठीं या सर्वानर्थास बीजभूत जी अविद्या तिचा नाश होऊन जन्ममरण प्रवाहाचा उच्छेद व्हावा या साठीं आत्मतत्व ज्ञान होण्याचा प्रयत्न करावा असें तात्पर्य. ॥१९॥

## परस्तस्मात्तु भावोन्यो व्यक्तोऽव्यक्तात्सनातनः॥ यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति २०

या प्रमाणें ॥ आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनः॥ याची उपपत्ति रूप-व्याख्या करून-आतां मां उपेत्य पुनर्जन्म न विद्यते-याची तीन श्लोकांनीं व्याख्या करतात. ॥ तस्मात् अव्यक्तात्-म्हणजे चराचर स्थूल सर्व प्रपंचाचा कारण भूत जो सुषुप्त्यवस्था पन्न हिरण्यगर्भ त्याहून परः अन्यः अव्यक्तः यः भावः अस्ति-म्हणजे-व्यतिरिक्त किंवा श्रेष्ठ हिरण्य गर्भाच्या ही कारण भूताहून अत्यंत विलक्षण आणि रूपादिक नसल्या मुळें जो चक्षुरादिकांस गोचर नाहीं असा आणि अविद्येनें कल्पिलेलीं जीं ब्रह्मदेवादि स्तंब पर्यंत चेतनाचेतन कार्यें त्यांचे ठायीं अस्ति म्हणजे आहे अशा-व्यवहारास कारण भूत जें सद्रूप तेणें करून एकरूपानें राहिलेला आणि याच कारणानें नामरूपांचा नाश झाला तरी नाश न पावणारा म्हणजे त्याचे उत्पत्तीनें उत्पन्न न होणारा असा जो नित्य परमात्मा आहे. सः सर्वेषु भूतेषु नश्यत्सु नविनश्यति म्हणजे तो हिरण्य गर्भादिक सर्व भूतें नाश पावलीं तरी नाश पावत नाहीं. हिरण्य गर्भ, सूक्ष्म-शरीर समष्टि रूप जो कार्योपाधि त्याचा अभिमानी आहे या मुळें उपाधीचे नाशानें-त्याचा नाश होतो. परमात्मा निरुपाधिक आहे या मुळें त्याचा नाश होत नाहीं. तो नित्य-च आहे असें तात्पर्य. ॥ २०॥

## अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम्॥

## यं प्राप्य ननिवर्त्तंते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥

तो रूपादिकें करून रहित आहे यामुळें इंद्रियगोचर नाहीं यास्तव. अव्यक्तः अक्षरः इति उक्तः त्यास अव्यक्त असे म्हणतात. आणि नाशरहित आहे यामुळें त्यास अक्षर ब्रह्म असें म्हणतात. तं परमांगतिं आहुः-हिरण्यगर्भ पर्यंत ज्यागति म्हणजे पावावयाचीं स्थानें आहेत तीं उत्पन्न होऊन नाश पावणारीं आहेत यास्तव त्यागति उत्कृष्ट नाहींत परमात्म स्वरूप जें पावावयाचें स्थान तें नित्य आहे तें प्राप्त झालें म्हणजे पुनर्जन्म नाहीं यास्तव त्या परमात्म्यास परम गति असें श्रुति स्मृति सांगतात.- यं प्राप्य ननिवर्तंते- ज्या स्थानाप्रत जाऊन पुनः संसारांत जन्म होत नाहीं.- तत्परमंमम धाम म्हणजे तें उत्कृष्ट माझें स्वरूप म्हणजे तें मीच आहें. जसा राहू शिरोरूपच आहे, शिराहून भिन्न नाहीं, तथापि राहूचें शिर असा लोकांत भेदानें व्यवहार गौण किंवा लाक्षणिक करतात तसा हा माझें धाम असा व्यवहार लाक्षणिक आहे. ॥ २१ ॥

## पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ॥
## यस्यांतस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२

या प्रमाणें निरुपाधिक अद्वितीय ज्ञेय ब्रह्मात्म तत्त्व सांगून त्याचें ज्ञान द्वारा मुक्ती साठीं ज्ञान साधन भूत जें सर्व जगत्कारण सगुण ब्रह्मोपासन तें सांगण्या साठीं आतां-"अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ॥ तस्याहं सुलभः पार्थ" येणें करून परमेश्वरा विषयींचा जो भक्तियोग सांगितला तोच अद्वितीय ब्रह्मात्म तत्त्व ज्ञान द्वारा पर ब्रह्म प्राप्तीस उपाय आहे असें सांगतात. हे पार्थ,- सः परः पुरुषः अनन्यया भक्त्या लभ्यः- म्हणजे तो सर्व शरीरांचे ठायीं अंतर्यामि स्वरूपानें स्थित परमात्मा- ज्यांत उपास्य उपासक लक्षण भेद ही भासत नाहीं असें जें- मी ब्रह्मच आहें, असें जें उपासन तद्रूप भक्ती करूनच प्राप्त होण्यास योग्य आहे. तु शब्दानें दुसरे साधनानीं लभ्य नव्हे असें सूचविलें, अनन्य भक्ती म्हणजे परमेश्वराचे ठायीं जी- अव्यभिचरित प्रेम लक्षण भक्ति. ती असें ही कोणी व्याख्यान करतात. तो परमात्मा कोण हें सांगतात. सर्वाणि यस्य अंतःस्थानि म्हणजे आकाशादिक सर्व भूतें आणि त्यांचीं स्थावर जंगमात्मक सर्व भौतिक कार्यें बीजांत जसें वृक्ष राहतात त्या प्रमाणें अंतःस्थ आहेत म्हणजे ज्याच्या स्वरूपाचे ठायीं कारण रूपानें स्थित आहेत आणि- येन सर्वं इदं ततं अस्ति म्हणजे ज्यानें हें सर्व जग उपादान कारणभूत सद्रूपानें व्यापिलें आहे म्हणजे ज्याचे तादात्म्या ध्यासानें (तद्रूपाध्यासानें) आहे. अशा सत्तेनें व्यवहारास योग्य झालें आहे. येणें करून त्या परमात्म्यास जगाचें कारणत्व सांगितलें. हाच अर्थ- ज्या परमात्म्या हून पर म्हणजे कारण अपर म्हणजे कार्य कोणी भिन्न नाहीं.

ज्याहून फार अणु किंवा मोठा कोणी नाहीं. आपले प्रकाशमान स्वरूपानें ठायीं वृक्षा-प्रमाणें निश्चल जो एकच राहतो. ज्या पुरुषानें सर्व हें विश्व व्यापिलें आहे. या जगाचे ठायीं जें कांहीं पाहण्यांत येतें, ऐकण्यांत येतें त्या सर्वांचे आंत बाहेर व्यापून नारायण स्थित आहे- या अर्थाच्या श्रुतीनें प्रतिपादिला आहे. ॥२२॥

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः॥ प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ॥२३॥ ॥**

पूर्वोक्त सगुण ब्रह्मोपासक ब्रह्मलोकाप्रत जाऊन पुनः परत येत नाहींत ते तेथेंच ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन क्रमानें मुक्त होतात. त्यांस ब्रह्म साक्षात्कारा पूर्वीं ब्रह्मलोकीं जाण्यास मार्ग सांगितला पाहिजे यास्तव त्या उपासकांस ब्रह्मलोक प्राप्ती साठीं ज्यांस देवयान मार्ग किंवा अर्चिरादि मार्ग म्हणतात. त्याचा उपदेश करतात. ज्यास पितृयान मार्ग किंवा धूमादि मार्ग म्हणतात. त्याचा उपदेश ही येथें देवयान मार्ग त्याहून श्रेष्ठ आहे अशी त्याची स्तुति करण्यासाठीं सांगतात. हे भरतर्षभ, यत्र काले प्रयाताः योगिनः - अनावृत्तिं आवृत्तिंच यांति - तं कालं वक्ष्यामि - म्हणजे हे भरत कुलांतील श्रेष्ठा अर्जुना, ज्याकालीं मरण पावलेले ध्यान योगी पुनःपरत येत नाहींत आणि कर्म योगी पुनःपरत येतात तो काल तुला सांगतों. असा या श्लोकाचा उत्तानार्थ दिसतो आणि यावरून उत्तरायणांत मरण पावलेले परत येत नाहींत. आणि दक्षिणायनांत मरण पावलेले परत येतात अशी लोकांची समजूत आहे परंतु तो अर्थ वास्तविक नव्हे आणि येथें ही भगवंतांनीं तसें सांगितलें नाहीं कारण ज्या कालीं मरण पावलेले असा- यत्र काले - याचा अर्थ इष्ट आहे तर- अग्निः ज्योतिः धूमः यापदांचा त्या- अर्थीं अन्वय होत नाहीं आणि "नैते सृती पार्थ जानन्" येणें करून दोन मार्गांप्रत जाणारा असें पुढें सांगतात. अशा या अर्थाचा आणि "शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते॥ एकया यात्यनावृत्तिमन्यया वर्तते पुनः" येणें करून हे शुक्ल आणि कृष्ण असे दोन मार्ग आहेत. शुक्ल मार्गानें गेलेला पुनः परत येत नाहीं आणि कृष्ण मार्गानें गेलेला पुनः परत येतो असें पुढें सांगतात. या अर्थाचा अन्वय होत नाहीं. यास्तव कालशब्दाची लक्षणा करून प्राणोत्क्रमणा नंतर असा अर्थ करावा. यत्र काले म्हणजे शुक्ल कृष्णापक्ष उत्तरायण दक्षिणायनादि कालांच्या आणि अग्निज्योति धूमादिकांच्या अभिमानी देवतानीं उपलक्षित म्हणजे त्या देवता ज्या मार्गाचे पर्वात आहेत त्या- मार्गानीं गेलेला ध्यानयोगी परत येत नाहीं आणि कर्म योगी परत येतो असा जो देवयान मार्ग आणि पितृयान मार्ग त्यांप्रत सांगतों. त्या मार्गांत कालाभिमानी देवता प्रमाणें अग्नि धूम यांच्या अभिमानी देवता असल्या तरी कालाभिमानी देवता पुष्कल आहेत. यास्तव कालशब्दानेंच लक्षणें करून कालाभिमानी देवता आणि अग्नि धूमांच्या-

देवता यानीं उपलक्षित मार्ग सूचविला, यास उदाहरणः— ज्या वनांत आंब्याचे वृक्ष पुष्कळ आहेत, दुसरे ही वृक्ष आहेत परंतु थोडे आहेत. तेथें आंब्याचें वन किंवा आंब्याची बाग असा लाक्षणिक प्रयोग लोकांत करतात अथवा प्रातःकालीं अग्नि देवता नसलीतरी अग्नि आणि सूर्य यांचे उद्देशानें हवीचा प्रक्षेप ज्यांत करतात अशा होमावर अग्नि आणि सूर्य यांतील एक देवतेचा वाचक जो अग्नि शब्द तद्घटित अग्निहोत्र शब्दाचा वैदिक प्रयोग जसा आहे त्या प्रमाणें जरी देवयान मार्गानें पंचाग्नि विद्योपासक ब्रह्म लोकास जाऊन ही परत येतात तथापि पितृयान मार्गानें गेलेले सर्वही पुनः परत येतात्च ते कोणी ही क्रमानें मुक्तीस जात नाहींत. देवयान मार्गानें जे ब्रह्म लोकास गेले त्यांतील जे परमेश्वराचे उपासक नव्हेत ते परत आले तरी जे परमेश्वरोपासक त्या मार्गानें ब्रह्म लोकास जातात ते क्रमानें मुक्त होतातच परत येत नाहींत असा या श्लोकाचा विवक्षित अर्थ आहे आणि श्री वेदव्यासानीं ब्रह्मसूत्रांत चतुर्थाध्यायीं सगुणब्रह्मोपासक ब्रह्मलोकास जाण्याविषयीं उत्तरायणांतच मरण झालें पाहिजे असा नियम आहे कीं काय इत्यादिक विचार करून या श्लोकाचा जो अर्थ हा लिहिला त्याप्रमाणें सिद्धांत केला आहे, तो विचार त्यांचे टीकेंत म्हणजे भाष्यांत पुष्कळच विस्तृत आहे तथापि या प्रसंगानें त्याविषयीं संक्षेपानें लिहितों. सगुण ब्रह्मोपासकांनीं परमेश्वराचें निरंतर चिंतन रूप उपासन करावें असा विधि सांगून हृदयाचे ठायीं १०१ एकोत्तरशत नाडी आहेत त्यांतील एक नाडी मूर्ध्यापर्यंत म्हणजे तालुदेश पर्यंत गेली आहे तालूसच ब्रह्मांड असें ह्मणतात. आणि ती नाभिचक्रास लागून आहे हृत्कमल अधोमुख आहे तें नाभिचक्रा पर्यंत आहे आणि नाभिचक्रास संलग्न असून जी मूर्ध्या पर्यंत नाडी गेली आहे ती ऊर्ध्वमुख आहे तीस मूर्धन्य नाडी किंवा ब्रह्मनाडी म्हणतात. मरणकालीं हृदयकमलांत जीव प्रविष्ट होऊन त्या नाडीचे द्वारा मूर्ध्यांतून बाहेर जातो आणि तेथून ब्रह्म लोकास जाण्याचा मार्ग पुढील श्लोकांत सांगावयाचा आहे त्यांतील देवता आपल्यास नेतात इत्यादिक प्रतिदिवशीं चिंतन करावें असें ईश्वरोपासनेचें अंगभूत चिंतन सांगितलें आणि त्या चिंतनाचे अभ्यासानें आणि ईश्वराचें जें चिंतनात्मक उपासन केलें त्यामुळें सर्व पापक्षय होऊन ईश्वराचे प्रसादानें मरण समयीं त्या मूर्धन्य नाडींतून मूर्ध्या बाहेर जीवाचें गमन होऊन प्रथम अर्चि म्हणजे सूर्य रश्मींत प्रवेश होतो. नंतर पुढील श्लोकांत सांगितले मार्गानें तो ब्रह्म लोकास जातो असें सांगून जर परमेश्वरोपासक रात्रीं मरण पावेल तर रात्रीं सूर्य रश्मी नाहींत यामुळें तो देवयान मार्गानें जाणार नाहीं किंवा त्यानें दिवसाची प्रतीक्षा करावी अशी शंका करून जसा दोन ग्रामांस एक मार्ग मोठा संलग्न असतो तसे सूर्याचे रश्मि म्हणजे किरण या लोकास आणि परलोकास संलग्न झालेले आहेत ते हृदयांतील नाडी पासून सूर्या पर्यंत आणि सूर्या पासून हृदयांतील नाडी पर्यंत निरंतर व्याप्त आहेत याच कारणानें

ग्रीष्म कालीं रात्रीं ही उष्मा होतो इत्यादिक अर्थाच्या श्रुति आहेत. यावरून रात्रीं ही हृदयांतील नाडीचा आणि सूर्य रश्मींचा संबंध आहे या कारणानें उपासक रात्रीं मरण पावला तरी मूर्धन्य नाडीचे द्वारा सूर्य रश्मीचे ठायीं जाऊन देवयान मार्गानें ब्रह्मलोकास जातो. आणि रात्रीं मरण पावलेल्या उपासकास सूर्य रश्मींचा संबंध होत नाहीं असें म्हटलें तर उपासक मरण पावल्या नंतर सूर्य रश्मीचे द्वाराच गमन करतो-असा श्रुतींत नियम केला आहे तो विरुद्ध होईल. जर दिवसाची अपेक्षा केली तर मरणा नंतर तत्काल आदित्य रश्मीप्रत जातो असें श्रुतींत सांगितलें आहे तें ही विरुद्ध होईल. आणि रात्रीं मरण पावणाऱ्या उपासकास सूर्य रश्मींचा संबंध नाहीं यामुळें त्याला उपासनेचें फल देव यान मार्गानें ब्रह्मलोक प्राप्ति होत नाहीं तर उपासनेचें फल संदिग्ध किंवा पाक्षिक म्हणजे दिवसास मरण होईल तर होईल रात्रीं मरण होईल तर होणार नाहीं असें झालें आणि अमुक वेळेस मरण होईल असा निर्णय तर कोणास नाहीं या कारणानें कोणाची ही उपासने विषयीं प्रवृत्ति होणार नाहीं-उपासकांस तर मरणा नंतर ब्रह्मलोक प्राप्ति निःसंशय होते असें श्रुति सांगते यास्तव उपासक रात्रीं जरी मरण पावला तरी सूर्य रश्मि द्वारा देवयान मार्गानें ब्रह्म लोकास जातो असा निर्णय करून "अतश्चायनेपि हि दक्षिणायने" या सूत्रानें रात्रीं मरणाचा-न्याय दक्षिणायनांत मरण्या विषयीं यो जावा असें श्री वेद व्यासानीं सांगितलें त्याचें तात्पर्य भाष्यादिकांत लिहिलेलें संक्षेपानें लिहितों. दक्षिणायनांत मरण पावलेला विद्वान् म्हणजे दहरविद्योपासक (हृदयाकाशांतील अन्नमयादि पंचकोशोपासक) किंवा अहंग्रहोपासक (अहं ब्रह्मास्मि म्हणजे मी ब्रह्म आहें अशी उपासना करणारे) पूर्वोक्त रीतीनें मूर्धन्य नाडीचे द्वारा प्राणोत्क्रमण होऊन मरणा नंतर सूर्य रश्मी शीं संलग्न होऊन देवयान मार्गानें ब्रह्मलोकास जातोच कारण पूर्वोक्त रीतीनें नाडी आणि सूर्य रश्मी यांचा संबंध जों पर्यंत देहांत प्राण आहे किंवा देह आहे तों पर्यंत अवश्य आहेच या कारणानें दक्षिणायनांत मरण झालें यामुळें तो नाहींसा होत नाहीं आणि दक्षिणायनांत मरण पावणारास अर्चिरादि मार्गानें ब्रह्म लोकास जाण्या विषयीं उत्तरायणाची प्रतीक्षा आहे असें ही संभवत नाहीं. तसें म्हटलें तर देह पातानंतर तत्काल सूर्य रश्मींत जाऊन त्या द्वारा देवयान मार्गानें जातो अशी फारतरा श्रुतींत सांगितली आहे तिचा विरोध येईल. दक्षिणायनांत मरण पावला इतक्याच अपराधानें त्यास अर्चिरादि मार्ग प्राप्त होत नाहीं अशी कल्पना केली तर उपासनानें ब्रह्मलोक प्राप्ति रूप फल उत्तरायणांत मरण झालें तरच होतें. दक्षिणायनांत जर झालें तर होत नाहीं असें पाक्षिक होईल आणि अमुक वेळेस मरण होईल असा निश्चय तर कोणास नाहीं यामुळें त्या उपासनें विषयीं कोणाची प्रवृत्ति होणार नाहीं. उपासनेचें फल ब्रह्मलोक प्राप्ति तर अवश्य होते असें श्रुतींत निःसंशय सांगितलें आहे. या सर्व का-

रणां वरून दहराद्युपासक, अहंग्रहोपासक इत्यादिक दक्षिणायनांत मरण पावले तरी देवयान मार्गानें ब्रह्मलोकास जाऊन क्रमानें मुक्त होतात." दिवाच शुक्लपक्षश्च उत्तरायण मेवच ॥ मुमूर्षुणां प्रशस्तानि विपरीतं तु गर्हितं ॥ या पुराण वचनानें दिवस शुक्लपक्ष उत्तरायण हे काल मरणारास प्रशस्त आहेत याहून विपरीत म्हणजे रात्र, कृष्ण पक्ष, दक्षिणायन हे काल मरणारास निंदित आहेत असें जें दिवा शुक्लपक्ष उत्तरायण या कालांत मरणाचें प्राशस्त्य सांगितलें आहे तें जे अविद्वान् म्हणजे ब्रह्मात्म तत्त्व ज्ञानी नाहींत आणि जे पूर्वोक्त उपासक नव्हेत असे जे अविद्वान् आहेत त्या विषयींचें आहेत. ज्ञान्याची किंवा उपासकाची सर्व पापादिक प्रतिबंधकाची निवृत्ति होते यामुळें त्यास उपासनेचे फलाची प्राप्ति अवश्य होते या मुळें त्याविषयीं चें नाहीं. आणि भारतांत भीष्म शरपंजरांत पडल्या नंतर मरणा साठीं उत्तरायण कालाची प्रतीक्षा त्यानें केली असें सांगितलें आहे. तेंही अविद्वानास उत्तरायणांत मरण अति प्रशस्त आहे हें प्रसिद्ध करण्या साठींच भीष्म स्वेच्छा मरणी होता यामुळें लोकानुग्रह करण्या साठीं त्यानें उत्तरायणाची अपेक्षा केली याविषयींचेंच आहे, विद्वाना विषयींचें किंवा उपासका विषयींचें नाहीं. ॥२३॥

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ॥ तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदोजनाः ॥२४॥**

उपासकांस मरणा नंतर ब्रह्मलोकास जाण्याचा देवयान मार्ग सांगतात. ॥ अग्निः ज्योतिः -या दोन पदानीं अर्चि म्हणजे सूर्यरश्मि त्याची अभिमानी देवता लक्षणेनें घ्यावी. या प्रमाणें पुढें ही पदार्थांची देवतांवर लक्षणा आहे. अहः म्हणजे दिवसाची अभिमानी देवता शुक्लः म्हणजे शुक्लपक्षाची देवता, षण्मासा उत्तरायणं म्हणजे षण्मासात्मक उत्तरायण कालाची देवता हें उपलक्षण करून देवयान मार्गाचें प्रतिपादन करणाऱ्या श्रुतींत या शिवाय दुसऱ्या ज्या देवता सांगितल्या आहेत, त्या ही घ्याव्या. यासर्व देवता अति वाहक देवता म्हणजे उपासकास ब्रह्मलोकास पोंचविणाऱ्या आहेत. त्या श्रुतींचा अर्थ लिहितों. उपासक मरण पावल्यानंतर प्रथम अर्चीची अभिमानी देवता जेथें आहे तेथें जातो. नंतर ती देवता जेथें दिवसाची देवता आहे तेथें त्यास पोंचविते. दिवसाची देवता जेथें आपूर्यमाण पक्ष म्हणजे ज्यांत चंद्राच्या कला वाढतात. अशा शुक्लपक्षाची देवता आहे तेथें त्यास पोंचविते. शुक्लपक्षाची देवता उत्तरायण कालाची देवता जेथें आहे तेथें त्यास पोंचविते, उत्तरायण कालाची देवता जेथें संवत्सराची देवता आहे तेथें त्यास पोंचविते. संवत्सराची देवता जेथें देवलोकाची देवता आहे तेथें त्यास पोंचविते, देवलोकाची देवता जेथें वायु देवता आहे तेथें पोंचविते, वायु देवता आदित्य देवता जेथें आहे तेथें पोंचविते, आदित्य देवता जे-

थें चंद्रमा देवता आहे तेथें पोंचविते, आदित्य चंद्रमा या शब्दानें त्यांचीं मंडलें घ्यावीं, चंद्रमा देवता विद्युद्देवता जेथें आहे तेथें त्यास पोंचविते, नंतर ब्रह्म देवाचा जो मनुष्य नव्हे असा अमानव पुरुष तेथें येतो तो तेथून जेथें वरुण आहे तेथें त्यास घेऊन जातो. नंतर जेथें इंद्र आहे तेथें घेऊनजातो, नंतर जेथें प्रजापति आहे तेथें घेऊन जातो, विद्युदादि देवता तो अमानव पुरुष आला म्हणजे त्यास वाहत नाहींत. परंतु तो पुरुष त्यास नेत असतां प्रति बंधकरीत नाहींत, प्रजापति पर्यंत मार्ग पर्वांची पूर्ती झाली, पर्वें म्हणजे मुक्कामाच्या जागा त्यांस देवपथ किंवा ब्रह्मपथ असें म्हणतात. या मार्गानीं गेलेले उपासक पुनः या मानव आवर्तांत म्हणजे जन्ममरण प्रवाहाचे भोंवऱ्यांत परत येत नाहींत. असें श्रुतींत सांगितलें आहे. तेंच येथें सांगतात. ॥ तत्र प्रयाता ब्रह्मविदः जनाः ब्रह्म गच्छंति ॥ म्हणजे त्या मार्गानें गेलेले परब्रह्मवेत्ते किंवा उपासक जीव कार्य ब्रह्म जो हिरण्यगर्भ त्याप्रत जातात. ॥ २४ ॥

## धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम्॥ तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्त्तते ॥ २५ ॥

सांगितलेले देवयान मार्गाचे स्तुती साठीं पितृयान मार्ग सांगतात, धूमः म्हणजे धूमाभिमानिनी देवता, रात्रिः म्हणजे रात्र्यभिमानिनी देवता, कृष्णः म्हणजे कृष्णपक्षाभिमानिनी देवता, षण्मासा दक्षिणायनं म्हणजे षण्मासात्मक दक्षिणायनाची देवता, हें उपलक्षण करून पितृयान मार्गांतील या देवतां शिवाय ज्या दुसऱ्या देवता आहेत त्या घ्याव्या. याही देवता अतिवाहिक म्हणजे कर्मयोग्यास स्वर्गलोकास पोंचविणाऱ्याच आहेत. त्या श्रुतीचा अर्थ लिहितों. कर्मयोगी मरण पावल्या नंतर प्रथम धूमाभिमानिनी देवता जेथें आहे तेथें जातात. नंतर धूमाभिमानिनी देवता त्यास जेथें रात्रीची देवता आहे तेथें पोंचविते, रात्रीची देवता जेथें कृष्णपक्षाची देवता आहे तेथें पोंचविते, कृष्ण पक्षाची देवता षण्मासात्मक दक्षिणायनाची देवता जेथें आहे तेथें पोंचविते, दक्षिणायनाची देवता जेथें पितृलोकाची देवता आहे तेथें पोंचविते, पितृलोकाची देवता जेथें आकाशाची देवता आहे तेथें पोंचविते, आकाशाची देवता जेथें चंद्राचें ज्योति आहे अशा स्वर्गलोकास पोंचविते, तो चंद्र देवांचें अन्न आहे म्हणजे चंद्र अमृतमय आहे त्या अमृताचें भक्षण करून किंवा त्याला पाहून देव तृप्त होतात, त्या स्वर्गलोकास गेल्यावर तेथें कर्म क्षय होई तों पर्यंत वास करून कर्म योगी पुनः त्याच मार्गानें परत जन्मास येतो असें श्रुतींत सांगितलें आहे तेंच येथें सांगतात. ॥ तत्र योगी चांद्रमसं ज्योतिः प्राप्य निवर्तते ॥ म्हणजे सांगितलेल्या देवता ज्या मार्गांत आहेत त्या मार्गानें मरणा नंतर गेलेला इष्ट पूर्ता दिक कर्म करणारा योगी म्हणजे श्रौतस्मार्त कर्म करणारा नसाच नद्यीं, विहिरी, बागा, देवालयें, धर्मशाळा, ब्राह्मण भोजन इत्यादिक धर्मार्थ कर-

णारा स्वर्गामन पावून कर्मक्षय झाल्यावर परत जन्मास येतो. यास्तव आवृत्ति मार्गा-पेक्षां अनावृत्ति मार्ग श्रेष्ठ आहे. ॥ २५॥

**शुक्लकृष्णेगती ह्येते जगतः शाश्वते मते॥ एकया-यात्यनावृत्तिमन्यया वर्त्तते पुनः॥ २६॥ ॥**

सांगितलेले दोन मार्गांचा उपसंहार (समाप्ति) करतात. ॥ एते शुक्लकृष्णेग-ती- म्हणजे ब्रह्मलोकाचे प्राप्तीचे द्वारा ब्रह्मात्मतत्त्व ज्ञानास देवयान मार्ग साधन आहे, म्हणून तो शुक्ल आणि पितृयान मार्ग ज्ञानास साधन नाहीं म्हणून तो कृष्ण असे हे शु-क्लकृष्ण मार्ग ॥ जगतः शाश्वते मते- म्हणजे जगांतील उपासक आणि कर्मयोगी यांस ब्र-ह्मलोकास आणि स्वर्गलोकास जाण्याचे जगाचे अनादित्वामुळें अनादि सिद्ध आहेत. ॥ एकया अनावृत्तिं याति- म्हणजे देवयान मार्गानें ब्रह्मलोकास गेलेला उपासक पुनः परत येत नाहीं. ॥ अन्यया पुनः आवर्तते॥ म्हणजे दुसऱ्या पितृयान मार्गानें स्वर्गास-गेलेला योगी पुनः परत येतो. ॥२६॥

**नैते सृती पार्थ जानन् योगी मुह्यति कश्चन॥ त-स्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन॥ २७॥**

दहरोपासक व अहंग्रहोपासक इत्यादिकांनीं पूर्वीं सांगितल्या प्रमाणें ब्रह्मो-पास नांगल्यानें देवयान मार्गें करून जसें गमन होईल असें त्याचें ही उपासन करावें यासा-ठीं त्या मार्गाचे ज्ञानाची स्तुति करतात:- हे पार्थ- एते सृती जानन् कश्चन योगी न मुह्य-ति- म्हणजे हे अर्जुना, या दोन मार्गांमत एक क्रम मुक्ती साठीं आहे आणि एक पुनरावृ-त्ती साठीं आहे असें जाणणारा कोणी ही योगी उपासक धूमादि मार्ग फल देणाऱ्या कर्म मार्गा-चे ठायीं आसक्त होऊन योगभ्रष्ट किंवा योगा विषयींचा प्रयत्न अल्प करीत नाहीं:- तस्मा-त् सर्वेषु कालेषु हे अर्जुन त्वं योगयुक्तो भव- म्हणजे या कारणास्तव सर्वकाल तूं पुनः जन्म न व्हावें या साठीं ध्यान योगनिष्ठ हो. ॥२७॥

**वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदि-ष्टम्॥ अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्था-नमुपैति चाद्यम्॥ २८॥ ॥ इति श्रीमद्भगवद्गी-तासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णा-र्जुनसंवादे अक्षरब्रह्मयोगो नाम अष्टमोऽध्या-यः॥ ८॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ ॥**

ध्यान योगावर फार श्रद्धा होण्यासाठीं त्याचें फल सांगून त्याची स्तुति करतात. वेदेषु म्हणजे दर्भ पवित्र हस्त आणि प्राङ्मुख अशी गुरूची सेवा करीत असतां उत्तम प्रकारें करून वेदांचें अध्ययन केल्यानें- यज्ञेषु म्हणजे अंग उपांगासुद्धां उत्तम प्रकारानें श्रद्धें करून यज्ञादिकांचे शास्त्र विध्युक्त अनुष्ठानानें- तपःसु- म्हणजे मनोबुद्धीचे एकाग्रत्वें करून श्रद्धेनें कृच्छ्र चांद्रायण मासोपवासादिक रूप तप केल्यानें दानेषु म्हणजे पुण्य देशीं पुण्य कालीं सत्पात्रीं श्रद्धें करून केलेले तुलादिक मोठमोठ्या दानानें- यत्फलं प्रदिष्टं- म्हणजे शास्त्रांत जें पुण्यफल स्वर्ग राज्यादिकाची प्राप्ति होणें इत्यादिक फल सांगितलें आहे.- तत्सर्वं इदं विदित्वा अत्येति- म्हणजे त्या सर्व फलाचा या अध्यायांत सात प्रश्नांचे उत्तरांत जें सांगितलें तें सर्व जाणून अतिक्रम करतो म्हणजे त्या सर्व फलाहून अधिक फलाप्रत पावतो, केवल अधिक फलच पावतो असें नाहीं तर योगी- आद्यं- परं स्थानं उपैतिच- म्हणजे आणि ध्यान योगी सर्वोत्कृष्ट सर्व जगास कारणभूत परब्रह्मरूप स्थानाप्रत पावतो. ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन ब्रह्मच होतो. येणें करून- या अध्यायांत महावाक्यांतील तत्पदार्थ परमेश्वराचें निरूपण केलें. ॥२८॥

इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथ शास्त्रिकृत भाषा विवृत्तौ अष्टमोऽध्यायः समाप्तः ॥ ८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

## अध्याय ९ वा.

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ॥ ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा - मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥ ॥ श्रीकृष्णा० ॥**

पूर्वाध्यायीं " किंतद्ब्रह्म किमध्यात्मं " येणें करून अर्जुनानें केलेले पूर्वोक्त सात प्रश्नांचीं उत्तरें " अक्षरं ब्रह्म परमं " इत्यादिकें करून सांगितलीं आणि- ज्यां विषयीं प्रश्न केले त्यांचे उत्तरांनीं ज्यांचें स्वरूप सांगितलें त्यांचे ज्ञानाचें फल काय अशा जिज्ञासेचे विचार निवृत्ती साठीं कर्म स्वरूप जाणणारांस त्यांचे अनुष्ठान- द्वारा धूमादि मार्गानें प्राप्त होणारें अधिक स्वर्गादि प्राप्ति फल म्हणून सांगितलें यावरून प्राप्य स्वर्गादिक आणि प्रापक कर्म असा यांचा विभाग दाखविला. येणें करून कर्म आणि अधिभूत यांचें सविस्तर निरूपण झालें आणि सूत्रात्मा आणि अंतर्यामी- परमेश्वर यांच्या उपासकांस अर्चिरादिक मार्गानें क्रमें करून मुक्ति होते असें निरूपण केल्यानें अधिदैव आणि अधियज्ञ यांचें सविस्तर निरूपण झालें. " ॐमित्येकाक्षरं ब्रह्म " येणें करून अंत कालीं तुला कसें जाणावें या प्रश्नाचें उत्तर सविस्तर- सांगितलें या प्रमाणें ध्येय म्हणजे उपास्य सगुण ब्रह्म विद्येचें सांग निरूपण केलें.

ज्ञेय ब्रह्म विषयींचे जे "किं तद्ब्रह्म किमध्यात्मं" असे प्रथमचे दोन प्रश्न त्यांचें उत्तर "अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोध्यात्म मुच्यते" येणें करून संक्षेपानेंच सांगितलें परंतु त्याचे ज्ञानाचें फल कोणतें, त्याचें साधन काय इत्यादिक सविस्तर सांगितलें नाहीं, यास्तव त्या विषयीं जिज्ञासा राहिली तिची निवृत्ति होण्यासाठीं त्याचें सविस्तर निरूपण करण्यास या नवमाध्यायाचा आरंभ करतात. त्यांत प्रथम पूर्वीं सांगितल्या प्रमाणें योगधारणा पूर्वक मूर्धन्य नाडीनें प्राणोत्क्रमण होऊन अर्चिरादि मार्गानें ब्रह्मलोक प्राप्ति झाल्यानंतर तेथें ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन ब्रह्म कल्पांतीं मुक्ति होते. या प्रमाणें क्लेश आणि विलंबच मुक्ती साठीं पाहिजे असा नियम नाहीं. त्यास वेदांत वाक्य श्रवण, मनन, निदिध्यासन, भगवद्भक्ति, भगवत्प्रसाद - एतद्रूप साधनानीं येथेंच या देहांत ब्रह्मात्म साक्षात्कार होतो. त्यास सद्यः ( तत्काल ) मुक्ति होते असा हा विशेष सांगण्यासाठीं श्रीकृष्ण भगवान् बोलतात. अनसूयवे ते म्हणजे दुसऱ्याचे गुणावर दोषारोप करणें अशा असूयें करून रहित जो तूं या कारणें - इदं तु गुह्यतमं विज्ञान सहितं ज्ञानं वक्ष्यामि ॥ म्हणजे पूर्वाध्यायोक्त ध्येय सगुण ब्रह्मापेक्षां विलक्षण निरुपाधिक अद्वितीय अत्यंत गोप्य असें जें ज्ञप्तिमात्र म्हणजे केवल ज्ञानरूप ज्ञेयब्रह्म तें अपरोक्षानुभवात्मक ज्ञाना सुद्धां सांगतों. ॥ यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे ॥ म्हणजे ज्या ज्ञानस्वरूप ब्रह्माचे स्वात्मत्वें करून अपरोक्ष ज्ञानानें अशुभ म्हणजे रूरव दुःखास साधनभूत संसार या पासून तूं मुक्त होशील. "ज्ञानं ते हं स विज्ञान मिदं वक्ष्याम्य शेषतः" येणें करून सप्तमाध्यायीं विज्ञान सहित ज्ञान रूप ब्रह्म सांगण्याची प्रतिज्ञा करून ब्रह्म निरूपण केलें. या अध्यायांत ही विज्ञान सुद्धां ज्ञानरूप ब्रह्म सांगण्याची पुनः प्रतिज्ञा करून ब्रह्म निरूपण करतात. यावरून पौनरुक्त्य ( पूर्वीं सांगितलेली ) शंका येथें होते तथापि विज्ञान सहित ज्ञान रूप ब्रह्म सांगण्याची सप्तमाध्यायांत प्रतिज्ञा करून त्याचें ज्ञान होण्यासाठीं परापर प्रकृति सांगून त्याचे द्वारा शाखा चंद्र न्यायें करून जगाचे उत्पत्ति स्थिति लय कारणत्वरूप तटस्थ ब्रह्मलक्षण सांगून त्या लक्षणानें उपलक्षित ब्रह्म स्वरूपाचें निरूपण केलें. ज्याचें लक्षण सांगतात त्यास लक्ष्य म्हणावें. जें लक्ष्य नव्हे तें अलक्ष्य म्हणावें, जें लक्षण जाणल्यानें अलक्ष्यावर झालेली लक्ष्य स्वरूपाची बुद्धि नाहींशी होऊन किंवा हें लक्ष्यस्वरूप नव्हे अशी बुद्धि होऊन लक्ष्य स्वरूपावरच तें हें - अशी बुद्धि साक्षात् किंवा परंपरेनें होते त्या लक्षणास तटस्थ लक्षण किंवा उपलक्षण म्हणतात. उपलक्षणास लोकांत खूण असें म्हणतात. यास उदाहरण - देवदत्ताचें म्हणजे कोणा मनुष्याचें घर कोणतें असें कोणी विचारल्यास जेथें काक बसला होता तें त्याचें घर असें काकरूप लक्षण खूण सांगतात. अथवा चंद्र आकाशांत आहे असें ऐकून कोणी पुरुष आकाशांतच हूं कडे कोणता चंद्र तो पहावा म्ह-

णून पाहावयास लागतो त्यास हा चंद्र असें समजण्यासाठीं कोणी चोहों कडे त्याची आ-काशांत जी दृष्टी गेली आहे ती तिकडून फिरवावयासाठीं या शाखेवर चंद्र आहे अ-सें चंद्राचें ज्ञान होण्यासाठीं शाखारूप लक्षण म्हणजे खूण प्रथम सांगतो त्यावरू-न तो चहूंकडून दृष्टि काढून शाखेवर दृष्टि करतो त्याची त्या लक्षणानें शाखे समोर दृष्टि स्थिर झाली म्हणजे शाखे समोर दुसऱ्या ज्या तारा आहेत त्यावर हा चंद्र असा भ्रम त्यास न व्हावा या साठीं शाखेवर जो मोठ्या प्रकाशाचा आहे तो चंद्र असा-उपदेश करतो नंतर त्यास वास्तविक जो चंद्र त्यावर, हा चंद्र अशी बुद्धि सहज हो-ते यास शाखाचंद्र न्याय म्हणतात. शाखा हें चंद्रस्वरूप समजण्यास तटस्थ ल-क्षण आहे. मोठा प्रकाश हें चंद्र समजण्याचें स्वरूप लक्षण आहे याच न्यायानें ब्रह्म-वेत्ता मोक्षाप्रत पावतो असें श्रुतिवाक्या वरून ऐकून ब्रह्म असें जीवास किंवा ब्रह्मदे-वास किंवा वेदांस किंवा ब्राह्मणास ही म्हणतात. तेव्हां मुमुक्षूनें जाणावयाचें ब्रह्म-कोणतें अशा संदेहांत पडलेल्या पुरुषाचे बुद्धीचें एकत्र स्थिरी करण करण्यासा-ठीं जगाचे उत्पत्ति स्थिति लयांस जें कारण तें ब्रह्म असा जगत्कारणत्व लक्षणाचा श्रुतीनें उपदेश केला यावरून जीवादिक जे पूर्वीं सांगितले ते सर्व सृष्टींतील उत्पन्न होणारेच आहेत यास्तव ते मुमुक्षूनें जाणावयाचे नव्हेत अशी त्यांवरून ब्रह्म बुद्धि नाहींशी झाली तरी सांख्य मतानें किंवा तार्किक मतानें जगाचे उत्पत्ति स्थिति ल-यांस कारण जें प्रधान म्हणजे प्रकृति किंवा परमाण्वादिक त्यांवर हें मुमुक्षूनें ज्ञेय ब्रह्म अशी भ्रम बुद्धि होईल तिचें निराकरण करण्या साठीं जें सत्- चित् आणि आ-नंद एतत्स्वरूप तें ब्रह्म असा श्रुतीनें ब्रह्मस्वरूप लक्षणाचा उपदेश केला त्यावरू-न प्रधान किंवा परमाणू जड आणि दुःखरूप आहेत यास्तव ते मुमुक्षूनें ज्ञेय ब्रह्म-नव्हे अशी त्यावरील ब्रह्म बुद्धि जाऊन वास्तविक ज्ञेय जें ब्रह्म त्यावर ब्रह्मबुद्धि स्थि-र होते. या प्रमाणें सप्तमाध्यायांत जगत्कारणत्व लक्षणानें उपलक्षित आणि मुमु-क्षूनीं ज्ञेय असें जें ब्रह्म त्याचें निरूपण करून नंतर पुढें त्याचे ज्ञाना विषयीं अधि-कार सिद्ध्यर्थ सगुण ब्रह्माचें उपासन सांगितलें हें सर्व ज्याचें ज्ञान होण्या साठीं सां-गितलें तें प्रधान भूत ब्रह्म ज्ञेयत्वें करून सांगण्या साठीं या नवमाध्यायांत सप्तमा-ध्याया प्रमाणेंच पुनः प्रतिज्ञा केली आणि त्याच्या ज्ञानानें याच देहांत मोक्ष होतो अ-सें येथें निरूपण करतात. यास्तव पौनरुक्त्य नाहीं. उपदेश रूप शब्दानें त्या ब्रह्मा-चें विज्ञान म्हणजे अपरोक्ष ज्ञान कसें होतें तें सप्तमाध्यायीं लिहिलें आहे त्याचें येथें स्मरण करावें. ॥१॥

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ॥ प्र-
त्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २॥

जें ज्ञप्ति ( ज्ञान ) रूपब्रह्म विज्ञान सहित तुला सांगतों अशी प्रतिज्ञा केली-तेंच ब्रह्म महा वाक्या पासून अपरोक्ष ब्रह्मात्माकार वृत्ति होऊन त्या वृत्तीनें व्याप्त झालें किंवा वृत्ति तादात्म्यानें युक्त झालें म्हणजे त्यासच किंवा त्या वृत्तीसच ब्रह्मज्ञान किंवा ब्रह्म विद्या म्हणतात. त्या ज्ञानाविषयीं श्रोता अभिमुख व्हावया साठीं त्या ज्ञानाची स्तुति करतात. इदं राजविद्या म्हणजे दुसऱ्या विद्या अंशतः अज्ञानाचा नाश करणाऱ्या आहेत आणि हें ज्ञान सर्व अज्ञानाचें नाश करणारें आहे म्हणून हें ज्ञान सर्व विद्यांमध्यें राजा म्हणजे श्रेष्ठ आहे. विद्या असें सामान्यतः ज्ञानाचें नांव आहे. आणि हें ज्ञान-राजगुह्यं-म्हणजे बहुत जन्मार्जित सुकृतानें प्राप्त होणारें आहे यास्तव सर्वांस हें प्राप्त होत नाहीं. या कारणानें सर्व गुह्यां मध्यें म्हणजे दुर्मिळ पदार्थां मध्यें राजा आहे. इदं उत्तमं पवित्रं - म्हणजे प्रायश्चित्तानें सर्व महापापें समूळ जात नाहींत. कोणाची व्यवहार प्रतिबंध करणारी शक्ति नाश पावली तरी परलोक प्रतिबंधक शक्तीचा नाश होत नाहीं. कोणाची परलोक प्रतिबंधक शक्ति नाश पावली तरी व्यवहार प्रतिबंधक शक्ति राहते. आणि पापाचें सूक्ष्मरूप अविद्या ( अज्ञान ) कायम कर्धीहि तिः शेष न गेल्या मुळें पुनः पापाचरण होतें. हें ब्रह्मज्ञान तर अनेक सहस्त्रावधि जन्मार्जित संचित आणि-ज्ञानोत्तर क्रियमाण सर्व पापाचा त्याचे स्थूल सूक्ष्म रूपास मूळ कारण जी अविद्या तिच्या सुद्धां तत्काळ नाश आणि अलेप करणारें आहे यास्तव सर्वोत्कृष्ट पावन आहे आणि प्रत्यक्षा वगमं म्हणजे आत्मा ब्रह्मत्वें करून अवगम्यते म्हणजे जाणला-जातो जेणें करून तो अवगम म्हणजे प्रमाण मी आत्मा ब्रह्मत्वें करून जाणला असें साक्षि स्वरूप प्रत्यक्षच आहे अवगम म्हणजे प्रमाण त्याविषयीं तें प्रत्यक्षावगम म्हणजे साक्षिस्वरूप जो अनुभव त्यानें सिद्ध असें हें ज्ञान आहे अथवा अवगम्यते म्हणजे जाणलें जातें तें अवगम म्हणजे फळ माझें आतां आत्म्या विषयींचें अज्ञान नष्ट झालें अशा साक्षिस्वरूप अनुभवानें सिद्ध आहे अवगम म्हणजे अज्ञान निवृत्ति रूप फळ ज्याचें असें हें ज्ञान स्वरूपतः आणि फलतः साक्षि प्रत्यक्ष रूप अनुभवात्मकच आहे. धर्मा साररवा याचे स्वरूपा विषयीं किंवा फला विषयीं कोणास संशय नाहीं. धर्म्यं असें सर्वानुभव सिद्ध असतां ही अनेक जन्मार्जित निष्काम धर्मानेंच प्राप्त होणारें आहे. कर्तुं सुसुखं आणि देश कालाची अपेक्षा न करतां गुरू पासून उपदेश द्वारा प्राप्त झालेले विचाराचे सहायानें महावाक्या पासून त्वरित सुखानें होण्या जोगें आहे, दुःसाध्य नाहीं. अव्ययं म्हणजे त्वरित आणि फार आयास न करतां प्राप्त झालें तरी ज्याचा नाश नाहीं अशा मोक्षाख्य मोठे फलास देणारें आहे. ॥२॥

## अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ॥ अ-

## प्राप्य मां निवर्तंते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥ ॥

असें हें ज्ञान सुकर असून सर्वोत्कृष्ट मोक्षरूप फल देणारें आहे, तर सर्व ही याचे प्राप्ती विषयींच कां यत्न करीत नाहींत असें म्हणेल तर त्या विषयीं सांगतात. हे परंतप अस्य धर्मस्य अश्रद्दधानाः पुरुषाः म्हणजे या आत्मज्ञान रूप धर्माचें स्वरूप, साधन आणि फल हें सर्व शास्त्र प्रतिपादित असतां ही वेदविरोधी जे नास्तिकादिक त्यानीं दाखविलेले जे विरुद्ध तर्क त्यांचे योगानें मलिन ज्यांचें अंतःकरण झालें आहे असे पुरुष याविषयीं अश्रद्धेनें अप्रामाण्य मानीत होत्साते हे शत्रूस तापदेणाऱ्या अर्जुना, आपले बुद्धीनें कल्पित जे धर्म त्यांचें अनुष्ठान करतात ते शास्त्रविहित साधन नाहीं यामुळें ते - मां अप्राप्य मृत्युसंसार वर्त्मनि निवर्तंते - म्हणजे मजप्रत न पावून सर्वदा जन्म मरण प्रवाहानें नारकीय तिर्यगादि योनीचे ठाईंच निश्चयें करून भ्रमण पावतात. ॥ ३ ॥

## मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ॥ मत्स्थानि सर्व भूतानि नचाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥ ॥

याप्रमाणें स्तुतीनें श्रोत्यास अभिमुख करून जें सांगण्याची प्रतिज्ञा केली तें सांगतात. ॥ इदं सर्वं जगत् अव्यक्तमूर्तिना मया ततं ॥ म्हणजे भूत भौतिक परिदृश्यमान हें सर्व जग सर्वइंद्रियादिक ज्ञान करणारांस अगोचर ( अप्रत्यक्ष ) आहे. - सच्चिदानंदात्मक स्वरूप ज्याचें असा जो सर्व अज्ञान कल्पित जगास अधिष्ठान भूत पारमार्थिक सत्ता स्वरूप मी याणें सद्रूपानें आणि स्फुरण स्वरूपानें व्यापिलें आहे म्हणजे रज्जु स्वरूपाने अज्ञानानें रज्जूवर भासलेला सर्प जसा रज्जूचे सत्ता स्फुरणानें - अस्ति - भासते अशा व्यवहारास योग्य होतो वस्तुतः सर्प किंवा त्याचें स्फुरण नाहीं त्याप्रमाणें जगाचे भ्रमास अधिष्ठान भूत जो मी त्याचेच स्वरूपसत्तेनें आणि स्फुरणानें आहे. भासतो अशाव्यवहाराचे योग्यतेस आणलें आहे वस्तुगत्या ( यथार्थत्वें करून जगाला सत्ता किंवा स्फुरण नाहीं - येणें करून ब्रह्माचें सच्चिदानंदात्मक स्वरूप लक्षण सांगितलें. सप्तमाध्यायीं " अहं सर्वस्य प्रभवः मत्तः सर्वं प्रवर्तते " येणें करून तटस्थ लक्षण सांगितलें यावरून पौनरुक्त्य नाहीं अत एव ॥ मत्स्थानि सर्वभूतानि संती व स्फुरंतीव मद्रूपेणास्थितानि ॥ म्हणजे असल्या प्रमाणें माझे सद्रूप चिद्रूपानें राहिलेलीं हीं स्थावर जंगमात्मक भूतें आहेत. परमार्थतः वास्तवीकरीतीनें पाहिलें असतां - तेषु अहं न अवस्थितः - म्हणजे मी जगास उपादान कारण आहें तरी मृत्तिका जशी घटादिकास परिणामी उपादान आहे तसा मी नाहीं तर रज्जू जसा सर्पाला विवर्तोपादान ( खोटया वस्तूला खऱ्या वस्तूच्या भासास कारण ) आहे त्या-

प्रमाणें मी विवर्त्तोपादान आहें. यास्तव घटाचे ठायीं जशी मृत्तिका राहते त्या प्रमाणें अज्ञानानें माझे ठायीं, कल्पिलेले जगाचे ठायीं किंवा भूतांचे ठायीं मी स्थित नाहीं. कल्पित जें मिथ्यावस्तु आणि सत्य जें अधिष्ठान त्याचा वास्तविक संभव दुर्निरूप संबंध नाहीं. तात्पर्य—उपादान कारण आरंभक उपादान, परिणामी उपादान आणि विवर्त्तो पादान या भेदानें तीन प्रकारचें आहे. आरंभक उपादान म्हणजे घटाचे जे अवयव कपालें किंवा शकलें आणि पटाचे अवयव जे तंतु त्यांचा परस्पर संयोग झाला म्हणजे त्यांहून अत्यंत भिन्न घट आणि पट उत्पन्न होतो आणि घटाहून कपालें किंवा शकलें आणि पटाहून तंतु अत्यंत भिन्न आहेत. त्यास आरंभवाद म्हणतात. या वादांत घटास कपालें किंवा शकलें आणि पटास तंतु आरंभक उपादान कारण आहे हें तार्किकांचें मत आहे. कारण भूत मृत्तिकेस किंवा सुवर्णास पहिली अवस्था जाऊन कर्त्याच्या व्यापारानें जी घटावस्था किंवा कटक कुंडला द्यवस्था येते यास परिणाम वाद म्हणतात. हा वाद मीमांसकांचा आहे त्यांचे मतीं घटास मृत्तिका आणि कटक कुंडला दिकांस सुवर्ण परिणामी उपादान कारण आहे, कारणाहून अत्यंतभिन्न कार्य अपूर्व उत्पन्न होत नाहीं. पूर्वावस्थेचा किंवा पूर्व स्वरूपाचा परित्याग न करतां दुसरे अवस्थेने किंवा दुसरे कल्पित स्वरूपानें भान होणें यास विवर्त म्हणतात. जसे रज्जू स्वरूपाचा किंवा रज्जूचे अवस्थेचा त्याग न होतां तो रज्जू सर्प रूपानें भासतो त्या सर्पास रज्जु विवर्त्तोपादान कारण आहे हें मत वेदांत्यांचें आहे. यांतील आरंभक उपादान कारणत्व आणि परिणामी उपादान कारणत्व ज्यास अवयव आहेत त्यासच संभवतें, ब्रह्म तर निरंश निरवयव आहे असें श्रुतीत सांगितलें आहे यास्तव तें दोन प्रकारचें ही जगाचें उपादान कारणत्व ब्रह्मास संभवत नाहीं यास्तव भ्रमाधिष्ठान स्वरूप जगाचें विवर्त्तो पादानत्वच ब्रह्मास मानावें तें निरवयवास ही संभवतें. जसें आकाश निरवयव निरूप असतांही त्याच्या स्वरूपाचें ज्ञान ज्यांस नाहीं ते अज्ञानी अधोमुख कढई प्रमाणें आणि इंद्रनील मण्या प्रमाणें कृष्णवर्ण आहे असा तल (तळ) मलिनत्वाचा आकाशावर आरोप करतात. त्या आरोपित तल मलिनत्वास आकाश विवर्त्तोपादान जसें होतें त्याप्रमाणें ब्रह्मस्वरूपाचे अज्ञानामुळें ब्रह्माचे ठायीं भ्रमानें भासलेले आरोपित जगाचें ब्रह्म विवर्त्तोपादान कारण आहे. ॥ ४ ॥.

**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ॥**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५**

या प्रमाणें लोकव्यवहार दृष्ट्या माझे ठायीं जगाचें विवर्त्तोपादानत्व अ-

सर्वे तरी तें परमार्थतः माझे ठायीं नाहीं असें सांगतात. नचमत्स्थानिभूतानि- म्हणजे निश्चल आकाशस्थ सूर्याचे ठायीं जलाचे चलनानें कल्पिलेले चलना दिका प्रमाणें माझे ठायीं अविद्येनें कल्पिलेलीं सर्व भूतें मला अधिष्ठून राहत नाहींत. माझे ठायीं त्यांचें आधारत्व किंवा अधिष्ठानत्व परमार्थतः नाहीं. तात्पर्य- या द्वैतरूप इंद्रजालाचें उपादान कारण अज्ञान आहे त्याचा आश्रय करून ब्रह्म- जगाला कारण असें बोलतात. असें वार्तिकांत सांगितलें आहे यावरून अज्ञान शब्दवाच्य मायाच जगाला उपादान कारण तिलाच शक्ति किंवा अव्यक्त म्हणतात ती ब्रह्मशक्ति माया इचे ठायीं जशी दाहक शक्ति प्रत्यक्ष वन्ही हून निराळी दिसत नसतां ही स्फोट होणें, दाह होणें, या कार्यानीं आहे असें अनुमान होतें त्यावरून सिद्ध आहे ती न मानली तर मणि किंवा मंत्रादिक वन्हि सन्निधीस असले तर वन्हीनें दाह होत नाहीं यास्तव ते वेळेस शक्तिनाश पावली ते जेव्हां नाहींत- तेव्हां उत्पन्न होते अशा कल्पनेनें सिद्ध होतें परंतु ती वन्हि स्वरूपाहून निराळी- नाहीं. जर असेल तर वन्ही प्रमाणें प्रत्यक्ष होईल वन्हि स्वरूप ही नाहीं वन्ही- असतां ही दाहादि कार्य होत नाहीं यामुळें प्रतिबंध करणारी शक्ति मानिली पाहिजे. ती वन्हि स्वरूप जर आहे तर वन्हीचा प्रतिबंध होत नाहीं तेव्हां कार्य दाहादिक कां होत नाहीं. वन्हीहून निराळी शक्ति मानावी आणि ती अतींद्रिय आहे- यामुळें तिचें प्रत्यक्ष होत नाहीं आणि मणि असला म्हणजे शक्तिनाश होतो यामुळें दाह होत नाहीं अशी कल्पना करावी तर दाहाला मणिच प्रतिबंधक होतो अशीच कल्पना कां करीत नाहीं. अशा प्रकारानीं अनिर्वचनीय जशी वन्हि शक्ति आहे त्या प्रमाणें ब्रह्मशक्ति ही अनिर्वचनीयच आहे. जर ती ब्रह्माहून निराळी आहे- तर तिची उपलब्धि होईल. आणि ती सत्य आहे तर अद्वैत श्रुतीशीं विरुद्ध कल्पना होईल आणि तिचा कालत्रयीं निषेध श्रुतीनें सांगितला तो विरुद्ध होईल शशशृंगा सारखी अत्यंत असत् मानिली तर ती पासून कार्य कसें होईल याही प्रकारानें- अनिर्वचनीयच आहे आणि परमात्मा तर असंग आणि अद्वितीय असा श्रुतींत सांगितला आहे आणि समाधि आदिकांमध्यें तशा स्वरूपाचा अनुभव विद्वानास आहे यास्तव तशा अति तुच्छ मायेशीं किंवा तिचे योगानें कल्पिलेल्या तुच्छ जगरूप- कार्याशीं मी अधिष्ठान किंवा आधार आणि जग आधेय किंवा माझेवर राहणारें- असा अनिर्वचनीय ही आधाराधेय भाव संबंध परमार्थतः संभवत नाहीं आणि- जें अज्ञानानें पूर्वीं आच्छादित रज्जू आदिक असतें तें अनिर्वचनीय म्हणजे भासमान मिथ्या सर्पाच्या अनिर्वचनीय संबंधानें भ्रम कालीं युक्त असतें मी तर प्रकाश- रूप साक्षि स्वरूप आहें यामुळें सर्वदा आवरण न झालेल्या स्वरूपाचाच आहें.- यास्तव माझे ठायीं माया किंवा तिचे कार्याचा संबंध संभवतच नाहीं असें आहे तर-

सर्व लोक जगाला तूं कारण आहेस असा व्यवहार करतात. आणि श्रुतिहि तदनुवादरूप प्रतिपादन करतात याची गति काय असें ह्मणेल तर त्या विषयीं सांगतात. ॥मे ऐश्वरं योगं पश्य ॥ म्हणजे अर्जुना, तूं शास्त्र बुद्धि टाकून मायोपाधि ईश्वरत्व निमित्तक लौकिक ऐंद्र जालिक मायाची प्रमाणें माझें अघटित घटना करण्याचें चातुर्य पाहा. मला लौकिक मायावी प्रमाणें पाहा असें तात्पर्य- जसा लौकिक ऐंद्र जालिक आपले स्वस्थानींच स्थित असतां मायेनें एक सूत्र निर्माण करून आपले सारखा हातांत ढाल तरवार घेतलेला पुरुष निर्माण करून त्या सूत्र मार्गानें आकाशांत चढतो पुढें तेथें उत्पन्न केलेले गंधर्व नगरांत संचार करतो पुनः खालीं उतरतो असें लोक पाहतात त्या प्रमाणें बोलण्या दिकांचा व्यवहार करतात परंतु तो सूत्रावर चढत उतरत नाहीं सूत्र त्यास आधार ही नाहीं तो सूत्रावर राहिलेला नाहीं त्या प्रमाणें सर्व जगांतील भूतांचें उपादान कारणत्वें करून धारण करणारा किंवा पोषण करणारा असा भूत आणि सर्व भूतांची कर्तृ स्वरूपानें भावन-म्हणजे उत्पत्ति करणारा तो भूत भावन असा जगास उपादान कारण आणि कर्ता-असा लोकांस भासला तरी ममात्मा म्हणजे सच्चिदानंद अद्वितीय निर्विकार माझें स्वरूप म्हणजे मी परमार्थतः भूतभृत् न भूत भावनः न म्हणजे पूर्वोक्त भूतभृत् नाहीं आणि भूत भावन नाहीं. माझा आत्मा हा प्रयोग- राहूचें शिर- या प्रयोगा-प्रमाणें अभेदा विषयींचा आहे. ॥ ५ ॥

## यथाऽऽकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ॥ तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥

ज्यांचा संबंध नाहीं त्यांचा ही एक आधार आणि एक त्यावर राहणारा आधेय असा आधाराधेय भाव संबंध आहे असें दृष्टांतानें सांगतात. ॥ यथा सर्वत्रगः महान् वायुः आकाशस्थितः ॥ म्हणजे जसा सर्वत्र गमन करणारा आणि परिमाणें करून मोठा सदागतिशील वायु कोणाशीं संगी होऊन राहत नाहीं आकाशांत-स्थित असतां ही आकाशाशीं त्याचा संबंध नाहीं त्याप्रमाणें- सर्वाणि भूतानि मत्स्थानि इति उपधारय- म्हणजे सर्वभूतें असंग स्वभाव जो मी त्याचे ठायीं संबंधनसतांही राहिलेलीं आहेत असें विचारानें जाण अथवा किंतत् ब्रह्म- या प्रश्नाचें उत्तर- अक्षरं ब्रह्म परमं- येणें करून अक्षर संज्ञक जो शब्द तत्पदार्थ आत्मा तो-निरुपाधिक ब्रह्म असें सांगितलें तें निरुपाधिक ब्रह्म श्लोक द्वयानें सविस्तर सांगितलें आतां त्या निरुपाधिक ब्रह्माचा अक्षर संज्ञक शब्द तत्पदार्थ आत्म्याचा अभेद सदृष्टांत आणि सविस्तर सांगतात. वायु- मणि जसे सूत्रांत प्रोत म्हणजे ओंवलें

ले असतांत नसें हें जग सूत्रांत प्रोत म्हणजे ओंवलेलें आहे असें पूर्वीं सांगितलेलें सूत्र हें वायु आहे असा जो श्रुतींत वायुशब्दानें सूत्रात्मा म्हणजे सर्व सूक्ष्म शरीरांच्या समष्टीचा अभिमानी आणि सर्व जीवांस आपले तादात्म्यानें पाहणारा आणि सर्वजीव समुदायात्मा हिरण्यगर्भ सांगितला तो सर्व जीव समष्टि-(सर्वव्यापक) स्वरूप आहे यामुळें सर्वत्रग आहे आणि महान् म्हणजे प्रसिद्ध वायूहून ही चेतन त्यास्तव मोठा श्रेष्ठ आहे तो जसा नित्य आपले उपाधीचे उत्पत्तीनें होणारी जी आपली उत्पत्ति तिचे नंतर उत्पत्ति समयीं आणि तसाच नाशानंतर ही आकाशस्थितः म्हणजे स्व कारण जें परम ब्रह्म स्वरूप अव्याकृत आकाश त्याचे ठायीं अभेदानें स्थित आहे त्या प्रमाणें- सर्वाणि भूतानि- म्हणजे निकृष्ट उपाधींनीं युक्त आणि त्याचाच अवयव भूत आणि त्वंपदार्थ जो जीवांचा समुदाय तो त्या-निकृष्ट उपाधीचे उत्पत्तीनें होणाऱ्या आपल्या उत्पत्तीचे पूर्वीं आणि तसाच नाशानंतर घटाकाश मठाकाश हें जसें घटमठादिक उपाधि गेल्यावर महाकाशाशीं अभिन्नच आहे त्या प्रमाणें ब्रह्मरूप अव्याकृत आकाशाशीं अभिन्नच आहे असें महावाक्याचे उत्तम विचारानें तूं जाण. येणें करून- स्वभावो ध्यात्ममुच्यते ॥ असें जें पूर्वीं जीवात्मा आणि ब्रह्म यांचें ऐक्य सांगितलें त्यानें सविस्तर निरूपण केलें. ॥ ६ ॥

**सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ॥**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७**

या प्रमाणें जर उपाधि रहिताचाच ब्रह्माचे ठायीं लय आहे तर उपाधीची-गती काय होते असें म्हणेल तर जसा कल्पित जगाचा उत्पत्तिकालीं मला वास्तविक संबंध नाहीं तसा प्रलय कालीं ही त्याचा असंग जो मी याचे ठायीं संबंध नाहीं असें-सांगतात. जसें लौकिक ऐंद्रजालकानीं (गारुड्यानीं) मायेनें निर्माण केलेले पदार्थ त्याचे मायें तच किंवा तिचे द्वारा त्याचेच ठायीं लीन होतात. त्या प्रमाणें हे कौंतेय सर्व भूतानि कल्पक्षये मामिकां प्रकृतिं यांति- म्हणजे हे कुंतीपुत्रा अर्जुना- शरीर देहें द्रिय मनोबुद्धि रूप सर्व उपाधि किंवा स्थावर जंगमात्मक सर्वजग प्रलय कालाचे ठायीं माझी शक्ति अशी कल्पिलेली जी पूर्वोक्त त्रिगुणात्मक सर्व जगाची सूक्ष्मरूप भूत प्रकृति तीप्रत जातात. म्हणजे त्याच प्रकृतीचे ठायीं तद्रूपसूक्ष्म रूपानें राहतात-तानि भूतानि कल्पादौ पुनः अहं विसृजामि- म्हणजे विभक्त पणा सोडून प्रलय कालीं प्रकृतीशीं ऐक्य पावलेलीं म्हणजे प्रकृति रूपानेंच राहिलेलीं तीं सर्व भूतें सृष्टीचे आरंभीं सर्वज्ञ आणि सर्वशक्ति जो मी परमेश्वर तो पुनः नानाविध परस्पर भिन्न रूपानें उत्पन्न करतों. ॥ ७ ॥

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ॥ भू-**

## तग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात्॥ ८॥

ही सृष्टि परमेश्वर किन्निमित्त करतो, सर्व साक्षिभूत, असंग, चैतन्यमात्र स्वभाव आणि परमानंद रूपत्वामुळेंच आप्त काम अशा परमेश्वरास भोक्तृत्व नाहीं असा श्रुतींत भोगाचा निषेध केला आहे यामुळें आपले भोगासाठीं करतो असें संभवत नाहीं आणि ईश्वरास भोक्तृत्व मानलें तर त्यास संसारित्व प्राप्त होईल, दुसऱ्याच्या भोगासाठीं करतो असें ही म्हणतां येत नाहीं. ईश्वराहून दुसरा, द्रष्टा, श्रोता, चेतन नाहीं असा श्रुतीनें निषेध केला आहे आणि जीव रूपानें ईश्वरच सृष्टींत प्रविष्ट झाला आहे असें श्रुतींत सांगितलें आहे यावरून जीवास भोक्तृत्व मानलें तर ईश्वरासच भोक्तृत्व प्राप्त होईल. अचेतनास तर भोक्तृत्व संभवतच नाहीं, जीवाचे मोक्षार्थ सृष्टि करतो असें ही संभवत नाहीं. सृष्टीचा संबंधच परमार्थतः असंग आत्मस्वरूपाचे ठायीं संभवत नाहीं मग मोक्ष कसा होईल आणि सृष्टि कोठें होते, कशी उत्पन्न झाली असें पूर्वी सांगितल्या प्रमाणें सांगतां ही येत नाहीं इत्यादिक अनुपपत्ति सृष्टीस मायामयत्व रूप मिथ्यात्व आहे या सिद्धांतास अनुकूलच आहेत. सृष्टीस सत्यत्व मानणारांनींच त्याची उपपत्ति सांगितली पाहिजे त्याविषयीं उपपत्ति सांगतां येत नाहीं असें श्री हर्ष आदिक ग्रंथकारानीं वासिष्ठ रामायणादिक पुराणांत वसिष्ठादिकांनीं आणि बहुत श्रुति स्मृति पुराणानीं प्रतिपादन केलें आहे यास्तव ती अनुपपत्ति सृष्टीचे मिथ्यात्वाविषयीं प्रतिकूल नाहीं या अभिप्रायानें सृष्टीस मायामयत्व स्वरूप मिथ्यात्व तीनश्लोकांनीं सांगतात. ॥ स्वां प्रकृतिं अवष्टभ्य म्हणजे माझा संबंध जीला आहे अशी कल्पिलेली जी मायाख्य अनिर्वचनीय मिथ्याभूत प्रकृति तीप्रत अवलंबून म्हणजे आपल्या स्फूर्तीचे संबंधानें-आहे भासते अशा रूप लौकिक व्यवहारास योग्य करून ॥ प्रकृतेः वशात्॥ म्हणजे पूर्वोक्त अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश (आग्रह) इत्यादिकांस कारण भूत आवरण विक्षेप शक्ति स्वरूप जो त्या प्रकृतीचा प्रभाव म्हणजे सामर्थ्य तेणें करून ॥ अवशं इमं कृत्स्नं भूतग्रामं पुनः पुनः अहं विसृजामि॥ म्हणजे प्रकृतीचे स्वाधीन असल्यामुळें स्वतंत्र नव्हे असा जो हा-उत्पन्न होणारा सर्व स्थावर जंगमात्मक भूतांचा समुदाय त्याप्रत कल्पना मात्रानें-स्वप्न द्रष्टा जसा स्वप्नांतील पदार्थ उत्पन्न करतो त्याप्रमाणें मी उत्पन्न करतों.॥ ८॥

## न च मां तानि कर्माणि निबध्नंति धनंजय॥ उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु॥ ९॥ ॥

हे धनंजय, ॥ तानि कर्माणि मां न निबध्नंति॥ म्हणजे धर्मराजाचे राजसूयार्थ सर्व शत्रूंस जिंकून त्यांपासून धन आणणाऱ्या अर्जुना, स्वप्नांतील राज्य दान-

किंवा मातृपितृ वधादिक कर्मे कल्पित आहेत अतएव मिथ्या स्वरूप आहेत या मु-
ळें तीं जागृत जो स्वप्नद्रष्टा त्यास बंधक होत नाहींत म्हणजे पुण्याला किंवा पापाला
उत्पन्न करणारीं होत नाहींत या प्रमाणें बोधात्मा जो मी त्यास कल्पित मिथ्या भूत अ-
शीं जगाचीं सृष्टि प्रलय, इत्यादिक कर्मे बंधक होत नाहींत म्हणजे कोणावर अनुग्र-
ह करतों त्यामुळें तीं मला पुण्यवंत करीत नाहींत आणि कोणाचा निग्रह म्हणजे ना-
श करतों या मुळें तीं मला पापानें युक्त करीत नाहींत. या विषयीं दुसरा हेतु सांगतात.
उदासीन वदासीनं - म्हणजे जसा कोणी निस्पृह, ममता रहित, उपेक्षा करणारा अ-
सा उदासीन पुरुष दोघे विवाद करीत असतां कोणास जय झाल्यानें हर्ष पावत नाहीं?
आणि निर्विकार मनानें असतो त्या प्रमाणें मी हें कर्म करतों अशा अभिमानानें रहित.
आणि उदासीना प्रमाणें मी आहें यास्तव तीं कर्मे मला बंध करीत नाहींत. कर्तृत्वा-
भिमान ठेवणारास बंध होतो असा अभिप्राय. ॥९॥

## मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ॥ हे
## तुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥१०॥ ॥

मी उदासीना प्रमाणें राहतों असें सांगतां आणि पुनः पुनः भूतांचे सृष्टिप्र-
लय करतों असें ही म्हणतां आणि हें तर परस्पर विरुद्ध आहे. जो उदासीन तो कांहीं
करीत नाहीं असें म्हणोल तर त्याविषयीं सांगतात. ॥ अध्यक्षेण मया प्रकृतिः सचरा
चरं सूयते- म्हणजे निर्विकार प्रकाशमात्र स्वरूपानें प्रकाशित केलेली त्रिगुणात्मक-
अनिर्वाच्य प्रकृतीच स्थावर जंगमात्मक सर्व जग उत्पन्न करते मी करीत नाहीं सूर्यानें
प्रकाशित केलेले जन जसा आप आपला व्यापार करतात आणि सूर्य त्यांचा जसा प्र-
काशक मात्र असतो तसा मी प्रकाशक मात्र आहें. हे कौंतेय, अनेन हेतुना जगत्
विपरिवर्तते- म्हणजे हे कुंतीपुत्रा अर्जुना, या प्रमाणें प्रकाशक मात्र मी आहें याचे
निमित्तानें हें सर्व जग जन्मास येणें, क्रमानें वृद्धि पावणें, नाश पावणें अशा अने-
क विकारांनीं युक्त होतें. ॥१०॥

## अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ॥
## परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम् ॥११॥

भूतमहेश्वरं मां मम परं भावं अजानंतः मूढाः- म्हणजे याप्रमाणें नि-
त्य शुद्ध बुद्ध मुक्त स्वभाव, सर्व भूतांचा आत्मा आणि सच्चिदानंद घन जो सर्व-
भूतां मध्यें मोठा श्रेष्ठ ईश्वर मी या मत आणि माझें पूर्वोक्त सर्वोत्कृष्ट स्वरूपा प्र-
त न जाणणारे मूढ म्हणजे अविवेकी- मानुषीं तनुं आश्रितं मला मां अवजानं-
ति- म्हणजे आपले इच्छे करून भक्तानुग्रहार्थ मनुष्या प्रमाणें दिसणारी मूर्ति-

धारण करून व्यवहार करणारा जो मी याप्रत त्या शरीराकडे पाहून हा मनुष्यच-आहे असें मानून मी साक्षात् ईश्वरच आहें असा माझा आदर करीत नाहींत किंवा-निंदा करतात. ॥११॥

## मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ॥ राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥१२॥

ते भगवत् स्वरूपाचें अज्ञानानें आणि अनादर किंवा निंदा करण्यानें महा पापानें दुष्टबुद्धि होत्साते निरंतर नरकवास करण्यासच योग्य होतात असें सांगतात. ॥ मोघाशाः — म्हणजे ईश्वरावांचून आह्मीं केलेलीं कर्मेंच आह्मास फल देतील-अशी ज्यांची निष्फल फलाशा आहे असे ॥ मोघकर्माणः — म्हणजे ईश्वरास विमुख झाल्यामुळें अग्निहोत्रादिक कर्में ज्यांचीं निष्फलच आहेत असे ॥ मोघज्ञानाः — म्हणजे ईश्वर नत्वाचें प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रापासून झालेलें ज्यांचें ज्ञान कुतर्कयुक्त असल्यामुळें निष्फलच आहे असे ॥ विचेतसः — म्हणजे भगवंताची अवज्ञा केल्यामुळें झालेल्या दुरितानें ज्यांचें विवेक ज्ञान नष्ट झालें आणि यामुळें पूर्वोक्त प्रकारचे झालेले होत्साते ॥ राक्षसीं आसुरींच मोहिनीं प्रकृतिं श्रिताः — म्हणजे अविहित हिंसा करण्यास हेतुभूत जो द्वेष तो ज्यांत मुख्य आहे अशा शास्त्रीय ज्ञानाचा भ्रंश करणाऱ्या तामस राक्षसाच्या स्वभावाप्रत आणि शास्त्रविहित नव्हे असा जो यथेष्ट परस्त्रीगमनादिक विषयभोग त्यास हेतुभूत रजोगुण प्रधान शास्त्रीय विवेक ज्ञानाचा भ्रंश करणारा जो असुरांचा स्वभाव त्याप्रत आश्रय करतात आणि-"त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः -" येणें करून सांगितल्याप्रमाणें निरंतर नरकाचाच अनुभव करतात. ॥१२॥

## महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ॥ भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥१३

जे भगवंतास विमुख ते सर्व पुरुषार्थ बाह्य असें सांगून आतां ऐहिक आणि पारलौकिक सर्व पुरुषार्थ कोणास प्राप्त होतात तें सांगतात। हे पार्थ-महात्मानस्तु दैवीं प्रकृतिं आश्रिताः- म्हणजे हे अर्जुना-अनेक जन्मार्जित सुकृतानें शुद्ध अंतःकरण झाल्यामुळें क्षुद्र वैषयिक सुखाविषयीं निरिच्छ असे जे पूर्वोक्त्याहून-विलक्षण ते ॥" अभयं सत्त्व संशुद्धिः " येणें करून पुढें सांगावयाची जी सात्त्विक-प्रकृति तिचा आश्रय करतात आणि ॥ अनन्यमनसः ॥ म्हणजे माझे वांचून दुसऱ्याविषयावर ज्यांचें मन नाहीं असे होत्साते दुसरे भक्ति करतात म्हणून आपणही करावी-असें न करून ॥ भूतादिं अव्ययं मां ज्ञात्वा भजंति ॥ म्हणजे सर्व भूतांचा आदिकारण-

आणि नाशरहित मी आहें असें मला जाणून मला भजतात. ॥ १३ ॥

**सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ॥ नमस्यं-
तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥ ॥**

त्यांच्या भजनाचें स्वरूप सांगतात. ॥ सततं मां कीर्तयंतः ॥ म्हणजे ब्रह्मवेत्ता जो गुरु त्या पाशीं जाऊन वेदांत श्रवण करून वेदांत प्रतिपाद्य माझ्या स्वरूपाचें निरंतर उपनिषदानें किंवा स्तोत्रादिकानें कीर्तन करणारे आणि यतंतः - म्हणजे गुरूसमीप किंवा अन्यत्र वेदांतास विरोधी नव्हेत अशा तर्कांचे अनुसंधानानें वेदांत श्रवणानें जाहलेल्या ब्रह्मात्मतत्त्व रूप माझे स्वरूपा विषयीं असंभावना रहित निश्चय होण्यासाठीं यत्न करणारे किंवा पूजादिक करण्या विषयीं प्रयत्न करणारे आणि - दृढव्रताः म्हणजे प्रतिपक्ष जे कामक्रोधादिक त्यांनीं ज्यांची हिंसा न करणें, चौर्य न करणें, सत्य भाषण करणें, ब्रह्मचर्य, असत् प्रतिग्रह न करणें, इत्यादिक व्रतें चंचल करण्यास अशक्य आहेत. शमदमादि साधन संपन्न आणि ॥ नित्यं मां नमस्यंतश्च ॥ म्हणजे सकल कल्याण गुणरूप रत्नांचें स्थान असा जो इष्टदेवता रूपानें किंवा गुरूरूपानें स्थित मी वासुदेव याप्रत मन वाणी आणि शरीर यानीं नित्य नमस्कार करणारे च म्हणजे " श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं ॥ अर्चनं वंदनं दास्यं सख्य मात्मनिवेदनं ॥ " येणें करून परमेश्वराचे ठायीं निरतिशयित प्रेम रूप मुख्य भक्तीस साधनभूत जी श्रवण कीर्तनादि रूप नवविध भक्ति ती करणारे असे होत्सातें भक्तीनें माझी उपासना करतात. असा पुढें अन्वय आहे. गुण किंवा स्वरूप यांचें वेदवेदांत वाक्यादिकांनीं कीर्तन तसेंच स्मरण आणि जो भगवान् विष्णु महत्वें करून तीन लोकांचें अतिक्रमण वामनावतारांत करिता झाला तो भगवान् आमचा प्रभु किंवा स्वामी असो असें सतत चिंतन करणें यास दास्य भक्ति म्हणतात. ती - आणि जो भगवान् प्रथम ब्रह्मदेवा प्रत उत्पन्न करून त्याप्रत वेद सांगता झाला आणि जो सर्वांच्या बुद्धीचा साक्षी स्वप्रकाश रूप देव त्याप्रत मुमुक्षु मी शरण आहें असें, भगवानच तारणारा अशा बुद्धीनें निरंतर राहणें एतद्रूप आत्मनिवेदन भक्ति - आणि वामनावतारीं त्रैलोक्य तीन पादानीं व्यापून राहिलेला ज्यास उरुक्रम म्हणतात अशा विष्णूचे पादांचे ठायीं रुचिकर मधुर उदकांचा प्रवाह आहे त्याचें प्राशन करण्यास विष्णुपद प्राप्त व्हावें या इच्छेनें मनुष्य इच्छितात. त्या भगवंताचा मी सखा होईन अशी भावना निरंतर करणें एतद्रूप जी सख्य भक्ति ती या अव्यक्त परमेश्वराविषयीं संभवतच आहे पूर्वोक्त नमस्कार रूप वंदन तसेंच पूजादि रूप अर्चन तसेंच पादसेवन या भक्ति गुरुस्वरूपानें किंवा परमेश्वराच्या ज्या प्रतिमा त्यांच्या स्वरूपानें संभवतात. याच तात्पर्यानें - मां - म्हणजे भजप्रत असें पुनः या श्लोकांत म्हटलें.

नाहींतर एकवारच पुरे दोनवेळ म्हटलें यावरून जगत्कारण भूत अव्यक्त मायोपाधिक मी जो सर्वांतर्यामी परमेश्वर किंवा गुरु रूपानें स्थित जो मी परमेश्वर यास यथा संभव ॥ सततं कीर्तयंतः, नमस्यंतः ॥ असा पूर्वोक्त अर्थ होतो. यास प्रमाण :- "यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥ तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ॥" या श्रुति वचनानें ज्याची देवाचे ठायीं उत्कृष्ट भक्ति आहे आणि जशी देवाचे ठायीं तशीच गुरूचे ठायीं भक्ति आहे त्यास हे वेदशास्त्रोक्त कर्म उपासना ज्ञानादिरूप अर्थ प्रकाशित होतात असें जें सांगितलें आहे तें वाक्य प्रमाण आहे. तसेंच भक्त्या नित्ययुक्ताः - म्हणजे परमेश्वराचे ठायीं निरतिशयित प्रेमरूप जी भक्ति तिणें करून निरंतर युक्त होत्साते श्रवण मनना नंतर होणारें जें, मी जो परमेश्वर त्या वांचून दुसरे विषयांचें चिंतन मध्यें न होतां परमेश्वराविषयींच मनाचे वृत्तीचा प्रवाह निरंतर होणें असें निदिध्यासन रूप माझें उपासन त्याप्रत करतात. येणें करून परमेश्वर प्राप्ति होण्यास निदिध्यासन हें चरम म्हणजे शेवटचें साधन आहे आणि ॥ सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ॥ नमस्यंतश्च मां नित्यं ॥ येणें करून जें सांगितलें तणें करून त्या विषयीं साधन संपत्ति होते आणि जीं प्रतिबंधकें असतात त्यांचा भगवंताचे प्रसादानें निरास होतो असें सांगितलें यावरून शम दमादिक साधन संपन्न, वेदांत श्रवण मनन परायण, परमेश्वर व गुरु यांविषयीं जी सांगितलेली श्रवणादिक भक्ति तीणें करून ज्यांचीं प्रतिबंधकें गेलीं आहेत ते पूर्वोक्त निदिध्यासन रूप परमेश्वराची उपासना करतात. त्यांस परमेश्वराचे प्रसादानें गुरूपदिष्ट महा वाक्या पासून ब्रह्मात्मैक्य साक्षात्कार होऊन त्यांचे अज्ञानाचा पापादि कार्यासहित समूल नाश होऊन तत्काल याच देहांत मुक्त होतात. त्यांस मोक्षा साठीं पूर्वोक्त रीतीनें मरणकालीं ब्रह्मनाडीनें प्राणोत्क्रमण होऊन अर्चिरादि मार्गानें ब्रह्म लोकास जाऊन तेथें ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन ब्रह्म कल्पांतीं मुक्ति होते अशा विलंबाचें किंवा आयासाचें प्रयोजन नाहीं असें जें "इदंतु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे" या श्लोकांत सांगण्याच्या प्रतिज्ञेनें सूचविलें होतें तें ज्ञान एथवर सविस्तर सांगितलें त्या ज्ञानाचें मोक्षरूप फल - यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् - येणें करून प्रतिज्ञेतच सांगितलें आहे यास्तव पुनः येथें सांगितलें नाहीं. ॥१४॥

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजंतो मामुपासते ॥ एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥१५॥**

आतां पूर्वोक्त रीतीनें श्रवण मनन निदिध्यासन करण्याविषयीं असमर्थ तेही उत्तम, मध्यम, मंद याप्रकारें तीन प्रकारचे आहेत ते आपापल्या अधिकाराप्रमाणें माझी नाना प्रकारें उपासना करतात असें सांगतात. ॥ अन्ये ज्ञान यज्ञेनच अपि-

यजंतः एकत्वेन मां उपासते—ह्मणजे—च—याचा एव असा अर्थ अपि शब्दाचा दुसऱ्या साधनाचा त्याग असा अर्थ ॥ पूर्वोक्त श्रवणादिक साधनानुष्ठाना विषयीं असमर्थ जे आहेत ते कोणी उत्तमाधिरी हे देव अहं त्वं अस्मि त्वं वा अहमसि म्हणजे हे देवा परमेश्वरा मी तूंच आहेस किंवा तूं मीच आहें अशा अर्थाच्या श्रुतींत सांगितलेलें जें उपासन ज्यास अहंग्रहोपासन म्हणतात तद्रूप जें ज्यांत ईश्वर उपास्य आहे आणि मी उपासक आहें अशा भेदाचें चिंतन करतां मीच वासुदेव किंवा वासुदेव मीं असें परमेश्वराचें आणि आपलें ऐक्य करून चिंतन रूप ज्ञान तद्रूप जो यज्ञ—म्हणजे बाह्य पूजादिक तेणें करून च दुसऱ्या साधनाची स्पृहा सोडून माझी उपासना करतात. कोणी मध्यमाधिकारी ॥ पृथक्त्वेन उपासते ॥ म्हणजे ज्यांत हा उपास्य—आणि मी उपासक अशी भेद बुद्धि आहे असें जें हा आदित्य ब्रह्मच आहे. असें श्रुतींत सांगितलेलें उपासन ज्यास प्रतीकोपासन म्हणतात तद्रूप ज्ञानयज्ञानें अथवा ईश्वर माझा स्वामी आहे आणि मी त्याचा दास आहें असें जें ज्ञान तद्रूप यज्ञानें माझी-उपासना करतात. कोणी अहंग्रहोपासन किंवा प्रतीकोपासन हीं करण्या विषयीं असमर्थ आहेत ते मंदाधिकारी—विश्वतो मुखं मां बहुधा यजंते—म्हणजे सर्वात्मक जो मी त्याप्रत भिन्न भिन्न पूजा मार्गांनीं किंवा कर्म उपासना मार्गांनीं कोणी विष्णु रूपानें. कोणी रुद्ररूपानें, कोणी शक्ति किंवा गणपति, सूर्य यांचे रूपानें असें अनेक प्रकारांनीं भजतात. जें पाहिलें तें भगवद्रूपच आहे, जें ऐकिलें तें भगवन्नामच आहे जें केलें किंवा भक्षिलें तें भगवंताचेंच आहे. असें अनेक प्रकारचें माझें उपासन करतात असा ही ॥ विश्वतो मुखं मां भजंते ॥ याचा कोणी अर्थ करतात. ॥१५॥

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ॥ मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥१६॥ ॥**

जर असें बहुत प्रकारानीं उपासन करतात तर तें उपासन तुझें कसें असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात. अहं क्रतुः म्हणजे श्रौतकर्म रूप जो ज्योतिष्टोमादिक यज्ञ तो मी अहं यज्ञः म्हणजे ज्यास पंचमहा यज्ञ म्हणतात असें जें वैश्वदेवादिक स्मार्त कर्म तें मी ॥ अहं स्वधा—म्हणजे जें पितरांचे उद्देशानें अन्नदान करतात-तें मी ॥ अहं औषधं—म्हणजे सर्व प्राणी ज्याचें भक्षण करतात असें जें व्रीहि आदिक औषधी पासून निष्पन्न झालेलें अन्न तें मी अथवा प्रसिद्ध जें रोगनिवर्तक—औषध तें मी ॥ अहं मंत्रः—म्हणजे जेणें करून देवास किंवा पितरांस हविर्देतात. तो मंत्र मी ॥ अहं घृतं—म्हणजे घृत हें उपलक्षण आहे, घृतादिक जें सर्व होमद्रव्य तें मी ॥ अहं अग्निः म्हणजे घृतादिक होमद्रव्याचा ज्याचेठायीं होम करतात तो आहवनी यादिक अग्नि मीं ॥ अहं हुतं—म्हणजे होम करण्याचा जो व्यापार तें-

मी. या प्रमाणें सांगितलेले सर्व पदार्थ मीच आहें. येथें अहं या शब्दाचा प्रत्येक निरनिराळा प्रयोग केला यामुळे यांतील एक एक स्वरूपाचे ठायीं माझें चिंतन, माझें उपासन होतें असें सूचविलें. येणें करून क्रिया कारक फल (कर्म व कर्ता-आदिकरून कारकांच्या योगानें होणारें फल) भगवत्स्वरूपाहून भिन्न नाहीं असें ही या एकदेशानुवादरूप उपलक्षणानें सूचविलें असें जाणावें. नाहीं तर सर्वही भगवद्रूपच असतां कितीएक पदार्थच मी आहें असें सांगणें अभिप्राय रहित होईल.१६

## पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः॥
## वेद्यंपवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ॥१७

अस्यजगतः पिता-म्हणजे या जगाचा उत्पन्न करणारा जनक, माता-उत्पन्न करणारी जननी, धाता-पोषण करणारा किंवा त्या त्या शुभाशुभ कर्मांचा फल देणारा, पितामहः-जनकाचा जनक, वेद्यं-जाणावयास योग्य वस्तु, पवित्रं-शुद्धी करणारें गंगास्नान गायत्री जपादिक, ओंकारः-जाणावयास योग्य जें ब्रह्म वस्तु त्याचे ज्ञानास साधनभूत-ॐकार, ऋक्-पाद आणि अक्षरें अमुक असावीं असा ज्याविषयीं शास्त्रोक्त नियम आहे असा जो मंत्र तो, साम-पूर्वोक्त लक्षणाची ऋक् गान युक्त झाली म्हणजे त्या ऋचेवर गान केलें म्हणजे तीसच साम असें म्हणतात, तें साम. यजुः ज्यांत अक्षरादिकांचा नियम नाहीं असा जो मंत्र तो, हे तीन प्रकारचे मंत्र कर्मोपयोगी आहेत. चकारानें अथर्व, आंगिरस इत्यादिक जे पारायणोपयोगी तेही घ्यावे. ॥१७॥

## गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत्॥
## प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम्॥१८

गति-म्हणजे कर्मफल किंवा मुक्तांस पावावयाचें स्थान, भर्ता-कर्मफल देऊन पोषण करणारा किंवा सुख साधनच देणारा, प्रभुः-हा माझा असा-स्वीकार करणारा किंवा अंतर्यामी, साक्षी-सर्व प्राण्यांचें शुभाशुभ कर्म पाहणारा, निवासः-ज्याचे ठायीं स्थिति करावयास होते असें सुख स्थान, शरणं-ज्याचे ठायीं स्थित असतां दुःख शीर्ण म्हणजे नाहीं सें होतें असा जो आपले आश्रयास आलेल्याचें दुःख निवारण करणारा तो, सुहृद्-प्रत्युपकाराची अपेक्षा न करतां उपकार करणारा, प्रभवः उत्पत्ति कर्ता, प्रलयः संहार कर्ता, स्थानं स्थितीचें स्थान म्हणजे आधार, निधान-त्याकालीं भोग देण्यास योग्य नसल्यामुळें कालांतरीं भोग होण्या करितां भोग्यवस्तु ज्यास्थानीं ठेवितात असें जें स्थान म्हणजे सूक्ष्मरूपानें राहणाऱ्या सर्व वस्तूंचें अधिकरण प्रलय स्थान अथवा शंख, पद्म इत्यादि-

क नवनिधि, अव्ययं बीजं - अंकुरादिक कार्योत्पत्तीनें नाश पावणाऱ्या व्रीह्यादिक बीजाहून विलक्षण, जगास कारणभूत अविनाशी आद्य कारण, हे सर्व प्रत्येक मीच आहें. ॥१८

**तपाम्यहमहं वर्षं निगृण्हाम्युत्सृजामिच ॥ अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥१९॥**

हे अर्जुना, अहं तपामि - म्हणजे मी आदित्य होऊन या जगास तापवितों आणि वर्षं निगृण्हामि - म्हणजे तदनंतर तापाचे योगानें आठ महिन्यांत कांहीं एक आपले किरणानीं पृथिवींतील वृष्टीनें सोडलेलें उदक आकर्षण करून घेतों, उत्सृजामिच म्हणजे - आणि चार महिने कांहीं किरणानीं पुनः पृथ्वीचे ठायीं आकर्षण केलेलें उदकाची वृष्टि करतों, आणि अमृतं - म्हणजे देवांचें भक्ष्य जें अमृत किंवा सर्व प्राण्यांचें जीवन जें उदक तें मी, एव काराचा मीच असा अर्थ. मृत्युः - काल किंवा सर्व प्राण्यांचा नाशक मी, सत् म्हणजे उत्तम सुखकारक आणि असत् - म्हणजे दुःख कारक तें मीच, अथवा सत् म्हणजे कार्य, असत् - म्हणजे कारण हीं मीच, या प्रमाणें सर्वात्मक जो मी त्या मज जाणून आपापले अधिकारा प्रमाणें सर्व मला पूर्वोक्त बहुत प्रकारानीं भजतात. ॥१९॥

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते ॥ ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नंति दिव्यान् दिवि देवभोगान् ॥ २०॥**

पूर्वोक्त तीन प्रकारांतून एका प्रकारानें ही माझी उपासना करीत नाहींत असे जे कर्म मूढ त्यांची कायगती ती सांगतात. त्रैविद्याः म्हणजे हौत्र (होत्याचें कर्म) - आध्वर्यव (अध्वर्यूचें कर्म) औद्गात्र (उद्गात्याचें कर्म) त्यांचें ज्ञान होण्यास किंवा ज्ञान द्वारा त्या कर्माचे अनुष्ठानास क्रमानें साधनभूत जे ऋग्यजुः सामवेद ती आहे विद्या ज्यांस असे जे त्रिविद्य त्यांसच त्रैविद्य म्हणतात. अथवा त्या तीन विद्या जे जाणतात असे जे तीन वेदांस जाणणारे ते त्रैविद्य, सोमपाः - म्हणजे सोमपान करणारे याज्ञिक ते, यज्ञैः इष्ट्वा - म्हणजे अग्निष्टोमादिक यज्ञानीं प्रातःसवन, माध्यंदिन सवन, सायं सवन, या सवनांचा ज्याक्रमानें वसुरुद्र आदित्य रूप देवता तद्रूप जो मी त्याचें यजन करून म्हणजे या देवतांच्या रूपानें मी आहें असें त्यांस ज्ञान झालें तरी त्या देवता माझेंच स्वरूप आहेत. यास्तव त्यांचें यजन तें माझेंच यजन झालें असें समजून तें करून - पूतपापाः म्हणजे सोम पानानें स्वर्गास प्रतिबंध करणाऱ्या पापा पासून मुक्त होत्साते. स्वर्गतिं प्रार्थयंते - म्हणजे सकाम होऊन स्वर्गास गमन व्हावें अशी प्रार्थना करतात. अंतःकरण शुद्धि व्हावी म्हणून प्रार्थना करीत नाहींत. ते पुण्यं सुरेंद्र लोकं आसाद्य - म्हणजे ते याज्ञिक सर्वोत्कृष्ट देवांचा राजा जो इंद्र त्याचे लोकीं सुखकारक स्थान पावून -

दिवि दिव्यान् देव भोगान् अश्नंति - म्हणजे स्वर्गलोकीं मनुष्यांस दुर्लभ अशा उत्तम विषय भोगांचा उपभोग करितात. ॥ २० ॥

**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ॥ एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥२१॥ ॥ ॥**

ते तं विशालं स्वर्ग लोकं भुक्त्वा - म्हणजे ते याज्ञिक काम्य कर्मा नुष्ठानाचे पुण्यानें विस्तीर्ण जो स्वर्गलोक त्याप्रत भोगून ॥ क्षीणे पुण्ये मर्त्य लोकं विशंति - म्हणजे त्या भोगाला देणारें पुण्य भोगून नाश पावलें म्हणजे स्वर्ग लोकीं पुण्यानें उत्पन्न झालेल्या देहाचा नाश होऊन पुनः देह ग्रहण करण्यासाठीं मनुष्य लोकीं गर्भ वासादिक यातना भोगण्या साठीं परत येतात. ॥ एवं त्रयी धर्मं अनुप्रपन्नाः कामकामाः - म्हणजे याप्रमाणें ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद या तीन वेदांनीं प्रतिपादन केलेला जो अग्निष्टोमादिक काम्य कर्मरूप धर्म त्याप्रत पुनः पुनः करणारे ते स्वर्गादिक सुखरूप विषयोपभोगाची इच्छा करणारे होत्साते ॥ गतागतं लभंते ॥ म्हणजे काम्य कर्म करून स्वर्गास जावें पुण्य सरल्यावर पुनः काम्य कर्म करण्या साठीं मनुष्य लोकास परत यावें अशा गर्भवासादिक यातना अनुभवितात याविषयीं यज्ञादिक प्लव म्हणजे नौका या दृढ नाहींत - हें यज्ञादिक कर्म सोळा ऋत्विज, यजमान आणि यजमान पत्नी अशा अठरा जणा पासून सिद्ध होतें तें अवर म्हणजे नाशवंत आहे किंवा त्याचें फल नाशवंत आहे यास जे मूढ श्रेयस्कर मानितात ते जन्ममरण प्रवाहांत पुनः पुनः येतात. या अर्थाची श्रुति प्रमाण आहे. ॥२१॥

**अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ॥ तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥२२**

अनन्याश्चिंतयंतः ये जनाः मां पर्युपासते ॥ म्हणजे भेद बुद्धि करण्यास दुसरा पदार्थच ज्यांस नाहीं सर्वत्र अद्वैत ब्रह्मात्म सत्ताच पाहणारे आणि याच कारणानें सर्व भोगांविषयीं निस्पृह झालेले आणि मीच भगवान् सर्वात्मा वासुदेव आहें माझे वांचून दुसरा पदार्थ नाहीं असें जाणून माझें नारायणाचेंच स्वात्मत्वें करून निरंतर चिंतन करणारे असे शम, दम, वैराग्य व सुखदुःखादि द्वंद्व सहन शक्ति साधन चतुष्टय संपन्न जे जीव माझी अपरिच्छिन्न सर्वात्मत्वें करून उपासना करितात. ते कृतार्थच होतात. असें शेष पूरण करावें ॥ नित्याभियुक्तानां तेषां - म्हणजे निरंतर माझे पूर्वोक्त चिंतना विषयीं तत्पर झालेले यामुळें आपले देहाचे निर्वाहा विषयीं ही कांहीं प्रयत्न न करणारे असे जे उपासक त्यांचा, योगक्षेमं अहं वहा-

मि - म्हणजे जें न मिळालें त्याचें संपादन करणें त्यास योग म्हणतात. आणि मिळाल्या-चें रक्षण करणें त्यास क्षेम म्हणतात. असे शरीर स्थिति होण्यास साधनभूत जे योग क्षेम त्यांपन मी परमेश्वरच वाहतों म्हणजे त्याविषयींचा उद्योग करणें तो मीच करतों. ज्ञानी मला फारप्रिय आहे, ज्ञानी माझा आत्माच आहे. असें पूर्वी सांगितलें आहे त्या-वरून त्या विषयीं उद्योग करणें तो आपले विषयींचाच आहे, जरीं सर्वांचा योगक्षेम करणारा ईश्वरच आहे तथापि दुसऱ्यांचा योगक्षेम त्यांकडून प्रयत्न करवून करतो. आणि ज्ञान्या विषयीं आपणच स्वतः प्रयत्न करतो असें तात्पर्य. योगक्षेम म्हणजे - देह निर्वाहोपयोगी अन्नादिकांची प्राप्ति आणि त्यांचें रक्षण उपासनेनें पूर्वभूमिका प्राप्त होणें आणि प्राप्त झालेली भूमिका पुढील भूमिका प्राप्त होईतों पावेतों सुरक्षित ठेवणें हे योगक्षेम अशीही कोणी व्याख्या करतात. ॥ २२ ॥

## येप्यऽन्यदेवताभक्ता यजंतेश्रद्धयान्विताः ॥ - तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥

सर्वात्म स्वरूप तुझ्या वांचून दुसरा पदार्थच नाहीं तेव्हां दुसऱ्या देवतांचें य-जन करणारे दुसऱ्या देवतांचे भक्तही तुझेच भक्त आहेत असें असून वसुरुद्रादित्य भक्त जन्ममरण प्रवाहांत पडतात आणि तुझे भक्त कृतकृत्य होतात. असें कसें सांगतां अ-सें म्हणेल तर त्या विषयीं सांगतात. ॥ ये अन्य देवता भक्ताः श्रद्धयान्विताः यजंते ते-मामेव यजंति - म्हणजे जसे माझे भक्त माझें यजन करतात तसे श्रद्धें करून म्हणजे आ-स्तिक्य बुद्धीनें युक्त वसुरुद्रादित्यादिकांचें अग्निष्टोमादिक यज्ञानीं यजन करणारे त्यां-चे भक्त त्यात्या देवतांचे स्वरूपानें राहिलेल्या माझेंच यजन करतात. परंतु तें यजन पू-जन ॥ अविधिपूर्वकं ॥ म्हणजे अज्ञान पूर्वक आहे. सर्वात्मत्वें करून मला न जाणून व-सुरुद्रादित्यादिक देवता माझ्याहून भिन्न आहेत असें कल्पून केलें आहे. ॥ २३ ॥

## अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ॥ न तु मामभिजानंति तत्त्वेनातश्च्यवंतिते ॥ २४ ॥

हि अहं सर्व यज्ञानां भोक्ता च प्रभुः - म्हणजे मी भगवान् वासुदेव श्रौतस्मा-र्त सर्व यज्ञांचा त्या त्या देवता रूपानें भोक्ता आणि ज्यास पूर्वी अधियज्ञ म्हणून सांगि-तलें त्या अंतर्यामी परमेश्वर रूपानें फलदाता आहें हें प्रसिद्ध आहे ॥ नतु मां अभिजानं-ति ॥ म्हणजे देवतांतराचें यजन करणारे नर वासुदेव सर्वात्माच यज्ञभोक्ता यज्ञफल-दाता आहे दुसरा कोणी नाहीं असें जाणत नाहींत ॥ अतः ते तत्त्वेन च्यवंति ॥ म्हणजे या-स्तव माझे स्वरूपाचे अज्ञाना मुळें ते अज्ञानी ज्ञाननिष्ठ भक्त न पावून धूमादि मार्गानीं-स्वर्ग लोकीं जाऊन पुण्य क्षय झाला म्हणजे त्याच मार्गानें पुनः जन्म मरण प्रवाहांत प-

इतात. पूर्वोक्त ज्ञानपूर्वक परमेश्वरोपासक अर्चिरादि मार्गानें ब्रह्मलोकास जाऊन तेथें कल्पांतीं मुक्त होतात एवढा विशेष आहे. ॥ २४ ॥

**यांति देवव्रता देवान् पितृन्यांति पितृव्रताः ॥ भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥**

दुसऱ्या देवतांचें भजन करणारांस मोक्षफल न झालें तरी त्या त्या देवतांचे यागाचे योग्यते प्रमाणें अल्पफल होतें असें सांगून त्यापेक्षां परमेश्वरोपासकाचा विशेष सांगतात. पूर्वोक्त अविधिपूर्वक यजन करणारे सात्विक, राजस आणि तामस या भेदानें तीन प्रकारचे आहेत. त्यांत ॥ देवव्रताः देवान् यांति ॥ म्हणजे वसुरुद्रादित्यादिक जे देव त्यांस बलि देणें, त्यांची पूजा करणें, त्यांस नम्रतेनें नमस्कारादिक करणें इत्यादिक जे तत्संबंधीं व्रतें करणारे सात्विक ते या देवां प्रतच जातात ॥ पितृव्रताः पितृन् यांति – म्हणजे श्राद्धादिक क्रियांनीं अग्निष्वात्तादिक पितरांचें आराधन करणारे जे राजस ते त्यां प्रतच जातात. ॥ भूतेज्याः भूतानि यांति – म्हणजे यक्ष, राक्षस, विनायक, मातृगण इत्यादिकांची पूजा करणारे जे तामस ते त्या यक्षराक्षसादिक भूतां प्रत जातात. याप्रमाणें त्या त्या देवतांचे पूजनादिक करणारे त्या त्या देवतां प्रत जातात. असें त्यास नाशवंत फल सांगून भगवद्भजन करणारांस अनंत फल सांगतात. मद्याजिनः मां यांति – मी जो परमेश्वर त्यास सर्वात्मत्वें करून जाणून जे त्याची पूजादिक करतात ते मज प्रतच येतात. आयास समानच असतां सर्वांतर्यामी जो परमेश्वर त्याचें अनंत फल देणारें आराधन न करून अंतवंत फल देणारें दुसऱ्या देवतांचें आराधन करतात. हें केवळ अज्ञान्याचें दुर्दैव आहे असा अभिप्राय. ॥ २५ ॥

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ॥ तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥**

आतां माझी भक्ति फारसकर ही आहे देवतांचे यजना प्रमाणें बहुत द्रव्य व्यय साध्य आणि आयास साध्य ही नाहीं असें सांगतात. जो पत्र, पुष्प, फल, किंवा तोय ( पाणी ) अथवा दुसरें कांहीं जें आयास न करतां आणि द्रव्यव्यय न होतां मिळालेलें तें ॥ मे भक्त्या प्रयच्छति ॥ म्हणजे अनंत ऐश्वर्य महाविभूति जो मी षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् त्याकारणें वासुदेवाहून दुसरें कांहीं नाहीं – अशा बुद्धीनें केलेल्या भक्तीनें सर्वत्र माझेंच स्वामित्व आहे, माझें नाहीं असें कोण तें ही नाहीं यास्तव माझेंच मला 'भृत्यजसा स्वामीस देतो त्याप्रमाणें ' समर्पण क-

रतो - प्रयतात्मनः भक्त्युपहृतं तत् अहं अश्नामि - म्हणजे समर्पण करणारा जो-तो शुद्ध बुद्धि त्याचें तें भक्तीनें त्यानें दिलेलें अल्प असलें तरी सर्वेश्वर ही मी स्वीकारून त्याचे योगानें श्री दामा ब्राह्मणानें आणिलेल्या कणांचें भोजन केल्या प्रमाणें तृप्त होतों. येणें करून भक्तीनें अर्पिलेल्यावर आपल्या प्रीतीचा अतिशय आहे असें सूचविलें. ॥२६॥

## यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्॥ यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥२७॥

यास्तव सर्व मला अर्पण करावें असें सांगतात. ॥ यत्करोषि - म्हणजे शास्त्र विहित नसतां ही जें इच्छेनेंच होतें असें जें गमनादिक करशील,॥ यत् अश्नासि - म्हणजे जें आपले तृप्ती साठीं किंवा कर्मसिद्धी साठीं कर्माचें अंगत्वानें भक्षिशील, ॥ यज्जुहोषि - म्हणजे शास्त्र विहित जें श्रौतस्मार्त अग्निहोत्र होमादिक नित्य करशील, यद्ददासि - म्हणजे जें अतिथी ब्राह्मणादिकांस अन्न किंवा द्रव्यादिक देशील,॥ यत् तपस्यसि - म्हणजे प्रतिवर्षीं अज्ञानानें झालेल्या पापाच्या नाशा साठीं जें चांद्रायणादिक आचरशील अथवा यथेष्ट प्रवृत्ति नव्हावी या साठीं जें देहेंद्रियांचें नियमन करशील हें उपलक्षण करून जें नित्य नैमित्तिक किंवा अवश्य होणारें स्नापगमनादिक तें वैदिक लौकिक सर्व कर्म, ॥ हे कौंतेय मदर्पणं कुरु - म्हणजे हे अर्जुना, मला अर्पण जसें होईल तसें कर. ॥२७॥

## शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः॥ संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि॥२८

असें केल्यानें जें फल होतें तें सांगतात. ॥ एवं शुभाशुभ फलैः कर्मबंधनैः त्वं मोक्ष्यसे - म्हणजे या प्रमाणें अनायासानें होणारें सर्व कर्मार्पण केलें असतां इष्ट किंवा अनिष्ट फल देणारीं जीं शुभाशुभ कर्मरूप म्हणजे पुण्य पाप रूप कर्मबंधनें त्या सर्व कर्मांनें मला अर्पण केल्यामुळें त्यांचा तुला संबंध न होता मुक्त होशील. नंतर ॥ संन्यास योग युक्तात्मा विमुक्तः सन् मां उपैष्यसि - म्हणजे भगवंतानें गायीं सर्व कर्मांनें समर्पण करणें हाच जो संन्यास योग म्हणजे चित्त शुद्धि करणारा योग तेणें करून शुद्धांतःकरण ज्याचें झालें असा तूं आत्म तत्व ज्ञानानें अज्ञान नाश होऊन मजप्रत येशील. आतां ही मद्रूप होत्साता सर्वोपाधी पासून मुक्त होऊन मायेनें कल्पिलेले व्यावहारिक भेदानें युक्त होणार नाहींस. ॥२८॥

## समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः॥ ये

## भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९

जर तूं भक्तांवरच अनुग्रह करतोस आणि अभक्तांवर अनुग्रह करीत नाहींस तर तूं रागद्वेषयुक्त जीवां प्रमाणेंच आहेस मग तूं ईश्वर कसा असें म्हणेल तर - त्याविषयीं सांगतात. ॥ सर्वेषु भूतेषु अहं समः ॥ म्हणजे सर्व प्राण्यांचे ठायीं मी सद्रूपानें किंवा स्फुरणरूपानें किंवा आनंदरूपानें एकसारखाच आहें यास्तव मला कोणी-द्वेषास पात्र किंवा प्रीतीस पात्र नाहीं तरमग भक्त आणि अभक्त यांस फल वैषम्य कां असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात. ॥ ये तु भक्त्या मां भजंति - म्हणजे जे भक्त सर्वकर्म समर्पणादिक भक्तीनें मला भजतात. ॥ ते मयि तेषु च अहं - म्हणजे ते त्यामुळें शुद्धांतःकरण झालेले भक्त माझे ठायीं राहतात. आणि त्यांचे ठायीं मी राहतों. तात्पर्य - जें स्फटिकादिक स्वच्छ द्रव्य आहे त्याचा स्वभाव असा आहे कीं, ज्या रक्तवर्ण-जपाकुसुमादिकांचा ( जास्वंदीचें फुल इत्यादिकांचा ) संबंध त्यास होतो त्याचा जो आकार किंवा वर्ण त्यास तें ग्रहण करतें. आणि स्वच्छ द्रव्याशीं ज्या वस्तूंचा संबंध होतो त्या वस्तूंचा स्वभाव असा आहे कीं, त्याचा त्या स्वच्छ द्रव्यांत प्रतिबिंब व्हावा. पाषाणादिक अस्वच्छ द्रव्याचा स्वभाव असा आहे कीं, ज्या वस्तूंचा त्यास संबंध होतो त्याचा आकार किंवा रंग तो ग्रहण करीत नाहीं आणि त्या अस्वच्छ द्रव्याशीं-संबंध झालेले वस्तूंचा ही स्वभाव असा आहे कीं, त्या अस्वच्छ द्रव्यांत त्यांचा प्रतिबिंब होत नाहीं या वरून सर्वत्र विद्यमान सूर्य प्रकाश स्वच्छ दर्पणांतच अभिव्यक्त-होतो अस्वच्छ घटपाषाणादिकांत अभिव्यक्त होत नाहीं म्हणून त्याची दर्पणावर प्रीति किंवा घट पाषाणादिकांवर द्वेष नाहीं. या प्रमाणें स्वच्छ भक्तांचें अंतःकरणांत मी-प्रगट होतों आणि अभक्तांचें जें अस्वच्छ अंतःकरण त्याचे ठायीं मी प्रगट होत नाहीं. यामुळें मला प्रीति किंवा द्वेष नाहींत. या प्रमाणें अग्नि जसा जवळ बसणारांचें शीताचें निवारण करतो आणि दूर बसणारांचे शीताचें निवारण करीत नाहीं. जसा कल्पवृक्ष-त्याचे खालीं बसून जे जसें फल इच्छितील तसें त्यांस फल देतो. जे न बसून फल इच्छीत नाहींत त्यांस फल देत नाहीं. परंतु यामुळें त्याची कोणावर प्रीति किंवा द्वेष-नाहीं त्याप्रमाणें जे मला जसे ज्या फलाचे इच्छेनें भजतात, त्यांस तसें त्यांचे इच्छे प्रमाणें आणि भजनाचे तारतम्या प्रमाणें मी फल देतों यामुळें मला कोणावर प्रीति-किंवा कोणावर द्वेष असें वैषम्य नाहीं. ॥ २९ ॥

## अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ॥
## साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३०

समत्व असतां ही वैषम्य करते असा माझे भक्तीचा महिमाच आहे,

असें सांगतात. ॥ स दुराचारो पि मां अनन्य भाक् भजते चेत् सः साधुरेव मंतव्यः- म्हणजे कोणी अजा मिळा सारखा पूर्वी फार दुराचारी असला तरी कांहीं जन्मांतरीं केलेले कर्माचे उदया मुळें दुसऱ्या कडे ज्याचें चित्त नाहीं असा होत्साता मज प्रत भजतो जर तर तो साधु नसला तरीं माझें भजन करावयास लागल्या नंतर तो साधु असाच मानावा. ॥ हि सः सम्यक् व्यवसितः- म्हणजे कारण तो उत्तमाचरण करण्याच्या निश्चयानें युक्त झाला आहे. ॥३०॥

## क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति॥ कौंतेय प्रति जानीहि नमे भक्तः प्रणश्यति ॥३१॥

यामुळें पूर्वीचा दुराचार सोडून ॥ क्षिप्रं धर्मात्मा भवति ॥ म्हणजे माझे भक्तीचे माहात्म्यानें तोलवकरच धर्मा कडे ज्याचें अंतःकरण आहे असा सदाचार-संपन्न होतो. शश्वत् शांतिं निगच्छति- आणि निरंतर भगवद्भक्तीचे शक्तीनें वैराग्य झाल्यामुळें विषय भोगाविषयीं निरिच्छ होतो. ॥ कोणी तुझा भक्त पूर्वीं केलेल्या दुराचाराचा त्याग न करितां धर्मात्मा न होईल तर तो नाश पावेलच असें जर म्हणेल तर दयेनें भक्त परवश झालेले भगवान् रागें भरून बोलतात. हे कौंतेय- मे भक्तः न प्रणश्यति इति प्रति जानीहि - म्हणजे हे कुंतीपुत्रा अर्जुना, माझे भक्तीचें माहात्म्य असें आहे कीं, वासुदेवाचा भक्त दुराचारी असला तरी प्राणांत संकट प्राप्त झालेला, जें मागण्याची आपली योग्यता नाहीं, जें फार दुर्लभ आहे त्याची प्रार्थना करणारा, अतिमूढ आणि ज्यास कोणाचा आश्रय नाहीं असा असला तरीं तो नाश पावत नाहीं अशी अशी विवाद करणारांच्या सभेंत त्यांची अवज्ञा करून गर्वानें निःशंक तूं प्रतिज्ञा कर. या विषयीं अजामिळ, प्रल्हाद, ध्रुव गजेंद्रादिकांचे दृष्टांत पुराणांत प्रसिद्धच आहेत आणि " न वासुदेव भक्तानामशुभं विद्यते क्वचित् " हें वचन वासुदेवाचे भक्तांस अशुभ होत नाहीं असेंच सांगतें. ॥३१॥

## मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः॥ स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परांगतिं॥३२

या प्रमाणें आगंतुक दोषानें जे दुष्ट झाले त्यां विषयीं सांगून जे स्वभावें-करूनच दुष्ट पापी आहेत त्यांविषयीं सांगतात. हे पार्थ, ये पाप योनयः स्युः- म्हणजे हे पार्था अर्जुना, जे पापयोनी म्हणजे जाति दोषांनीं दुष्ट अत्यंत किंवा पशुपक्षी इत्यादिक तिर्यग्योनींतील प्राणी आहेत, ॥ तथा स्त्रियः वैश्याः शूद्राः- म्हणजे आणि वेदाध्ययन नसल्या मुळें निकृष्ट ज्या स्त्रिया आणि कृषिकर्म करण्या विषयींच तत्पर जे वैश्य तसेंच जाती मुळें वेदाध्ययन शून्य आणि परमगति प्राप्त होण्यास अयोग्य जे

शूद्र तेही माझा आश्रय करून म्हणजे माझी भक्ती करून परम गतीप्रत पावतात. अपि शब्दानें पूर्वोक्त दुराचारी ही परम गतीप्रत पावतात. असें सूचविलें. ॥ ३२

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ॥**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व मां ॥ ३३**

पुण्याः भक्ताः ब्राह्मणाः तथा राजर्षयः किं पुनः - ह्मणजे मग सदाचारसंपन्न उत्तम योनी माझे भक्त ब्राह्मण तसेच क्षत्रिय हे उत्तम गती प्रत पावतील म्हणून काय वारंवार सांगावें. याविषयीं कोणास संदेहच नाहीं. ज्या कारणास्तव माझे भक्तीचा असा मोठा महिमा आहे यास्तव मोठ्या प्रयत्नानें ॥ अनित्यं असुखं इमं लोकं प्राप्य मां भजस्व - म्हणजे लौकर जो नाश पावतो आणि गर्भवासादि अनेक दुःखानें व्यापलेला आणि सर्व पुरुषार्थास साधन भूत अशा या अति दुर्लभ मनुष्यदेहाप्रत पावून जो पर्यंत हा नाश पावला नाहीं तों पर्यंत लौकर माझें भजन कर. ना हींतर हे क्षत्रियश्रेष्ठ तुझें जन्म व्यर्थ होईल. ॥ ३३ ॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ॥**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४**
**इति श्रीमद्भगवद्गीता सूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्य योगो नाम नवमो ऽध्यायः ॥ ९ ॥**

आतां भजन प्रकार सांगून समाप्ति करतात. ॥ मन्मनाः मद्भक्तो भव - म्हणजे माझे ठायींच आहे मन ज्याचें असा माझा भक्त तूं हो. राजाचा भृत्य, राजाचा भक्त असला तरी त्याचें मन स्त्रीपुत्रां कडे असतें आणि तो स्त्री पुत्रादिकांचा भक्त नसतो त्याहून विलक्षण मन्मना आणि मद्भक्त हो आणि मद्याजी भव - म्हणजे - माझें पूजनादिक करणारा हो. मां नमस्कुरु - म्हणजे मन, वाणी आणि काय यानीं मला नमस्कार कर. ॥ मत्परायणः सन् आत्मानं एवं युक्त्वा मां एष्यस्येव ॥ - म्हणजे मीच आहें उत्कृष्ट आश्रय ज्यास असा होत्साता मनाप्रत माझे ठायीं निरंतर योजून तूं मजप्रतच येशील. ॥ ३४ ॥

इतिश्री मद्भगवद्गीतायाः रघुनाथ शास्त्रिकृत भाषा विवृत्तौ नवमो ऽध्यायः समाप्तः ॥ ९ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीगा० ॥

॥ नवमो ध्यायः समाप्तः ॥

अध्याय १० वा.

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ॥ यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥**

सप्तमाध्यायीं महावाक्यांतील तत्पदाचा वाच्यार्थ सोपाधिक उपास्य परमेश्वर सांगितला आणि त्याचे उपासनानीं क्रममुक्ति अष्टमाध्यायीं सांगितली. नवमाध्यायीं तत्पदाचा लक्ष्यार्थ निरुपाधिक ज्ञेय ब्रह्मरूप सांगितला आणि तत्पद वाच्यार्थ सोपाधिक परमेश्वराचे ध्यानास आणि निरुपाधिक लक्ष्यार्थाचे ज्ञानास साधनभूत विभूति "रसोहमप्सु कौंतेय" इत्यादिकें करून सप्तमाध्यायीं आणि "अहंक्रतुरहं यज्ञ"-इत्यादिकें करून नवमाध्यायीं संक्षेपानें सांगितल्या आणि परमेश्वराचें विश्वतोमुख उपासन ही नवमाध्यायीं सांगितलें परंतु तें, अशुद्ध मन ज्याचें आहे त्यास संक्षेपानें सुबोध होणार नाहीं यास्तव दुर्ज्ञेय सर्वात्मक स्वरूपानें परमेश्वराचें उपासन अनायासानें व्हावें या साठीं सर्वपदार्थांचे ठायीं भगवंताचें स्वरूपाची बुद्धि होण्याकरतां मुख्य मुख्य ईश्वराच्या विभूतींचें विस्तरें करून निरूपण करण्या साठीं दशमाध्यायाचा आरंभ करतात. आणि या अध्यायांत सविस्तर सांगितलेल्या ईश्वर विभूतींचे ज्ञानाचें फल विश्वतोमुख परमेश्वराचें उपासन आणि त्या उपासनेचें फल जें भगवंताचें विश्वरूप दर्शन त्याचें एकादशाध्यायीं निरूपण करतील. नंतर द्वादशाध्यायीं तत्पदाचा लक्ष्यार्थ जें अव्यक्त निरुपाधिक ब्रह्म त्याचें उपासन आणि त्याचे शोधनात्मक उपासकांचीं लक्षणें सांगून तत्पदार्थ निरूपण रूप उपासना कांडाची समाप्ति करतील. भक्त वात्सल्यास्तव या अध्यायाचे आरंभीं श्रीभगवानच बोलतात. हे महाबाहो भूयः एव मे परमं वचः शृणु - म्हणजे युद्धादिक स्वधर्मानुष्ठाना विषयीं आणि पूज्य आहेत त्यांचे पूजे विषयीं ज्यांचे बाहू प्रशस्त आहेत अशा अर्जुना पूर्वी सांगितलेलें आहे तथापि पुनः ही निरतिशय परब्रह्म स्वरूपाचा बोध करणारें माझें हें वचन ऐक. ॥ यत् प्रियमाणाय ते हित काम्यया अहं वक्ष्यामि - म्हणजे जें माझें वाक्य ऐकून अमृत पान केल्या प्रमाणें संतोष पावणारा जो तूं याकारणें तुझ्या हिताचे इच्छेनें मी बोलतों. ॥ १ ॥

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ॥ अहमादिर्हि देवानां महर्षीणांच सर्वशः ॥ २ ॥**

माझें स्वरूप फार दुर्ज्ञेय आहे यास्तव तुला पुनः सांगतों असें सांगतात. मे प्रभवं सुरगणाः महर्षयः न विदुः - म्हणजे माझ्या प्रभावास किंवा अनेक-

विभूतीनीं होणाऱ्या माझ्या प्रादुर्भावास इंद्रादिक जे सर्व देव आणि सर्वज्ञ भृग्वादिक-महर्षी तेही जाणत नाहींत. ते कां जाणत नाहींत याविषयीं हेतु सांगतात. हि अहं देवानां-महर्षीणांच सर्वशः आदिः-म्हणजे ज्या कारणास्तव मी देवांचा आणि महर्षींचा उत्पन्न करणारा आणि त्यांच्या बुद्धींचा प्रवर्तक आणि उपादान आणि निमित्तकारण अशा सर्व प्रकारानीं आदि कारण आहें यास्तव त्यांच्या उत्पत्तीचे पूर्वीं मी त्यांचा उत्पन्न करणारा आहें यास्तव ते माझा प्रभाव जाणत नाहींत. ॥२॥

## यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ॥ असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥३॥

भगवंताच्या प्रभावाचे ज्ञानापासून मोठें फल आहे असें सांगत असतां तें ज्ञान एकाद्यासच होतें, सर्वांस होत नाहीं असें सांगतात. ॥यः अनादिं अजं लोकमहेश्वरं मां वेत्ति-म्हणजे सर्वांचा कारण आहे यामुळें ज्यास कोणी कारण नाहीं आणि याच कारणास्तव ज्यास उत्पत्ति नाहीं आणि सर्व लोकांचा महेश्वर म्हणजे नियंता जो मी याप्रत जो जाणतो. ॥ सः मर्त्येषु असंमूढः सन् सर्वपापैः प्रमुच्यते-म्हणजे तो सर्व मनुष्यांचेठायीं मोहरहित होत्साता बुद्धिपूर्वक केलेले पापां पासून आणि त्यांचें मूळ कारण जें अज्ञान त्याचा ज्ञानानें नाश झाल्यामुळें त्यांचें सूक्ष्मरूप जे संस्कार त्यां पासून ही मुक्त होतो. ॥३॥

## बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ॥ सुखं दुःखं भवो भावो भयं चाभयमेव च ॥४॥ ॥

आपण महेश्वर म्हणून जें सांगितलें तें बुध्यादिकांचे उत्पत्तीस आपण कारण आहें या हेतूनें स्पष्ट करतात. ॥ बुद्धिः-म्हणजे अंतःकरणास सूक्ष्मार्थाचें विवेक ज्ञान होण्याचें सामर्थ्य ॥ ज्ञानं-म्हणजे आत्मा कोणता अनात्मा कोणता असा सर्व पदार्थांचा बोध ॥ असंमोहः-म्हणजे जाणावयास योग्य जे पदार्थ त्यांचें ज्ञान जेव्हां आवश्यक आहे तेव्हां त्यांचे ज्ञानाविषयीं किंवा करावयास योग्य जीं कार्यें तीं करण्याचा समय प्राप्त झाला असतां तें कार्य करण्याविषयींची जी अव्यग्र मनानें हें करावयाचें हें न करावयाचें अशी जी विवेक ज्ञान पूर्वक प्रवृत्ति ॥ क्षमा म्हणजे दुसऱ्यानीं मारावयास ओढलें असतां किंवा मारलें असतां ही मनास विकार न होणें ॥ सत्यं-म्हणजे प्रत्यक्ष शब्दादिक प्रमाणानीं जो अर्थ आपणास जसा समजला असेल त्याविषयीं तसेंच यथार्थ भाषण करणें दमः-म्हणजे बाह्येंद्रियांचे शब्दादिक-जे विषय त्यांपासून त्यांचा निग्रह करणें म्हणजे त्या विषयांचे त्या इंद्रियांनीं ग्रहण न करणें ॥ शमः-म्हणजे अंतःकरणाचा विषयस्मरण न करण्याविषयीं निग्रह ॥

सुख - म्हणजे अनुकूल विषय जाणून झालेला पुण्यकर्माचा फलरूप आल्हाद, दुःख म्हणजे प्रतिकूल विषय जाणून झालेला पापकर्माचा फलरूप मनाचा संताप, भव म्हणजे उत्पत्ति, भावः म्हणजे सत्ता [असणें] अभाव म्हणजे असत्ता (नसणें) भयं म्हणजे त्रास, अभयं म्हणजे त्रास नसणें, च शब्दानें अबुद्धि अज्ञानादिक जे बुद्धि ज्ञानादिकाचे विपरीत हे घ्यावे. ॥ ४॥

## अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ॥ भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः॥ ५॥

अहिंसा म्हणजे प्राणिमात्रास पीडा नकरणें, समता म्हणजे शत्रु, मित्र, सुख दुःख इत्यादिकांवर समान बुद्धि, तुष्टि म्हणजे जितकें मिळेल तितक्यानेंच संतोष अथवा भोगाविषयीं तृप्ती बुद्धि, तपः म्हणजे शास्त्रांत सांगितलेले मार्गीनें शरीराचें व इंद्रियांचें दमन किंवा शोषण करणें, दानं म्हणजे उत्तम देशीं उत्तमकालीं आणि सत्पात्रीं यथाशक्ति द्रव्यादिक देणें, यश म्हणजे हा मोठा थोर साधू आहे इत्यादि लोकांत धर्माचरणामुळें झालेली प्रसिद्धि, अयशः म्हणजे अधर्माचरणामुळें लोकांतील निंदा, एते भूतानां पृथग्विधाः भावाः मत्त एव भवंति म्हणजे हे बुद्ध्यादिक स्वरूपाचे पदार्थ प्राण्यांस मजपासूनच प्राप्त होतात. यांचा उत्पन्न कर्ता मीच आहें, यास्तव मीच सर्व महेश्वर असें जाणून उत्तम गुण आपणास प्राप्त व्हावे या इच्छेनें तूं माझाच आश्रय कर. असें तात्पर्य. ॥ ५॥

## महर्षयः सप्तपूर्वे चत्वारो मनवस्तथा ॥ मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः॥ ६॥

सांगितलेल्याच अर्थ दृढ करतात. पूर्वे महर्षयः सप्त म्हणजे " भृगुं मरीचि मत्रिंच पुलस्त्यं पुलहं क्रतुं ॥ वसिष्ठंच महातेजाः सोऽसृजन् मनसा सुतान्॥" या पुराण वाक्यांत तेजस्वी ब्रह्मदेवानें भृगु १ मरीचि २ अत्रि ३ पुलस्त्य ४ पुलह ५ क्रतु ६ वसिष्ठ ७ हे सात मनानें उत्पन्न केले असें सांगितलें आहे, ते सृष्टीचे आरंभीं आविर्भूत (प्रगट) झालेले वेद आणि त्यांचा अर्थ जाणणारे सर्व विद्यांचा संप्रदाय ज्यां पासून प्रवृत्त झाला असे सर्वज्ञ भृगु आदिकरून सात महर्षि. चत्वारः मनवः म्हणजे ज्यास सावर्ण मनु म्हणतात. असे चार मनु अथवा भृगु आदिकरून आद्य सात महर्षि आणि त्यांपेक्षां ही आद्य सनक १ सनंदन २ सनातन ३ सनत्कुमार ४ हे चार महर्षि आणि स्वायंभुवादिक १४ चतुर्दश मनु आहेत. ॥ मद्भावा मानसा जाताः म्हणजे हिरण्यगर्भ जो ब्रह्मदेव तत्स्वरूप माझे संकल्पात्मक मनापासूनच उत्पन्न झालेले अयोनिसंभव आहेत ते माझे चिंतनानें माझ्या ज्ञान आणि

ऐश्वर्य या शक्तीनीं युक्त आहेत, येषां लोके इमाः प्रजाः म्हणजे या लोकांचे ठायीं जे भृगु आदिकरून सात ऋषी, सनकादिक चार ऋषी आणि चतुर्दशमनु जे पूर्वी सांगितले त्यांच्या जन्में करून किंवा विद्यें करून पुत्र पौत्रादिक शिष्य प्रशिष्यरूप या सर्व ब्राह्मणादिक प्रजा आहेत. असे जे मोठे प्रभावाचे भृग्वादिक तेहि माझीच उपासना करतात. यास्तव तूंही माझेंच भजन कर असा भाव. ॥ ६॥

## एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः॥ सोऽवि कंपेन योगेन युज्यते नात्र संशयः॥ ७

या प्रमाणें सोपाधिक परमेश्वराचा प्रभाव सांगून त्याच्या ज्ञानाचें फल सांगतात. ॥ मम एतां विभूतिं योगंच यः तत्त्वतः वेत्ति म्हणजे बुद्ध्यादिक आणि महर्ष्यादिक रूपानें स्थिति स्वरूप जी माझी भगवंताची विभूति आणि त्या पदार्थाची उत्पत्ति करण्याचें परमेश्वर्य रूप सामर्थ्य त्या प्रत जो खरें जाणतो ॥ सः अविकंपेन योगेन युज्यते अत्र संशयः न म्हणजे तो निश्चल जी तत्वसाक्षात्काराची स्थिति तद्रूप समाधि योगानें युक्त होतो त्या विषयीं कांहीं प्रतिबंधक नाहीं. अथवा उपासनेचा अधिकारी सांगतात. ही जी पुढें सांगावयाची विभूति आणि भगवान् विश्वतोमुख म्हणजे सर्व विश्वरूपच आहे असें जें मनाचें परमेश्वराचे ठायीं स्थापन त्या प्रत जो तत्त्वतः जाणतो म्हणजे विभूति जाणण्यास आणि योगाचें अनुष्ठान करण्यास जो समर्थ होतो तो षष्ठाध्यायांत सांगितलेला जो माझे स्वरूपा विषयींचा निश्चल समाधि तेणें करून युक्त होतो. नंतर कृतार्थ होतो. या विषयीं संशय नाहीं. भगवंतावर आप्तत्वबुद्धि मुळें त्याचे वाक्यावर संशय होणार नाहीं तथापि येथें संशय नाहीं. हें जें सांगितलें तें प्रवृत्तीचा अतिशय होण्या साठीं असें जाणावें. ॥ ७॥

## अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्त्तते॥ इति मत्वा भजंते मां बुधा भावसमन्विताः॥ ८॥ ॥

विभूतीचे आणि योगाचे ज्ञानानें निश्चल योगाची प्राप्ति होते असें दाखवितात. ॥ अहं सर्वस्य प्रभवः म्हणजे मी परब्रह्म वासुदेव सर्व जगाचे उत्पत्तीचें उपादान आणि निमित्त कारण आहे ॥ मत्तः सर्वं प्रवर्तते म्हणजे जगाची स्थिति आणि नाशादिक माझे पासूनच होतात. अथवा मी जो अंतर्यामी सर्वज्ञ सर्वशक्ति याणें प्रेरणा केल्यावरून आपापली मर्यादा न सोडतां सर्व जग चेष्टा करते. इति मत्वा म्हणजे असें मानून, बुधाः म्हणजे विवेक ज्ञानानें ज्यांस तत्व समजलें आहे असे ज्ञानी, भाव समन्विताः म्हणजे परमार्थ तत्त्व ज्ञानात्मक निश्चयानें युक्त होत्साते, मां भजंते म्हणजे माझें भजन करतात. ॥ ८॥

**मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम्॥ क-
थयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ ९ ॥ ॥**

त्या प्रेम पूर्वक भजनाचीच व्याख्या करून त्याचें स्वरूप स्पष्ट करून दाखवितात ॥ मच्चित्ताः म्हणजे माझ्याच ठायीं आहे चित्त ज्यांचें असे ॥ मद्गत प्राणाः म्हणजे माझ्याच ठायीं आहेत चक्षुरादिक इंद्रियें ज्यांचीं म्हणजे माझ्या भजना साठींच इंद्रिय व्यापार करणारे अथवा माझें भजन करण्या साठींच जगण्या विषयीं ज्याची इच्छा आहे दुसऱ्या विषयीं नाहीं असें आणि परस्परं बोधयंतः म्हणजे तत्त्वबोधेच्छेनें करून प्रश्नोत्तर रूप भाषणानीं परस्पर माझेंच स्वरूपाचें बोधन करणारे, - नित्यं मामेव कथयंतः म्हणजे आपल्या शिष्यांस माझे स्वरूपाचाच निरंतर उपदेश करणारे असे होत्साते, तुष्यंति म्हणजे माझे ठायीं चित्त ठेवणें आणि बाह्येंद्रियांसही माझे भजना कडेच लावणें, माझे भजना विषयींच आपले जीवनाचें प्रयोजन ठेवणें, बरोबरीचे जे आहेत त्याशीं परस्पर माझे स्वरूपाविषयींच संवाद करणें आपले पेक्षां न्यून आहेत त्यांस माझे स्वरूपाचा उपदेश करणें इत्यादिक माझें भजन तेणें करूनच संतोष पावतात. म्हणजे या वांचून दुसरें कांहीं मिळावयाचें नाहीं याणेंच सर्व मिळालें असा संतोष मानतात. रमंतिच म्हणजे आणि त्या भजनापासून झालेले संतोषानें प्रिय वस्तूचा लाभ होऊन जसा सुखानुभव होतो. त्याप्रमाणें सुखानुभव घेतात. संतोषा पासून सुखानुभव होतो या विषयीं संतोषा पासून सर्वोत्कृष्ट सुखलाभ होतो अशा अर्थाचें पतंजलीचें योग सूत्र आणि "यच्च कामसुखं लोके यच्च दिव्यं महत्सुखं ॥ तृषाक्षयसुखस्यैतत् कलांनार्हति षोडशीं ॥" असें कामसुख आणि स्वर्गसुख हें तृषाक्षय रूप जो संतोष त्याच्या सोळाव्या कलेशीं तुलना पावत नाहीं अशा अर्थाचें पुराण वाक्य प्रमाण आहे अथवा ८ आणि ९ या दोन श्लोकांनीं उपासनेचें स्वरूप सांगतात. बुध म्हणजे ज्ञानी वासुदेव मीच आहें. असें मला स्वात्मत्वें करून जाणून मीच सर्व जगाचा प्रभव म्हणजे उत्पत्तीचें कारण- आणि माझा अनुग्रह पावूनच पूर्वोक्त बुद्ध्यादिक सर्व आपापले कार्या विषयीं प्रवृत्त होतें. मीच जगाचा कर्ता अंतर्यामी आहें अशा भावनेनें युक्त होत्साते मीच जगत्कर्ता अंतर्यामी परमेश्वर अशी अहं ग्रहोपासना करतात. तीच भावना "मच्चित्ता मद्गत प्राणाः" येणें करून दाखविली. श्लोकार्थ पूर्वी प्रमाणेंच अशीही व्याख्या यादोन श्लोकांची कोणी- करतात. ॥ ९ ॥

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्॥ ददा-
मि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ १० ॥ ॥**

उपासनेचें फल सांगतात. ॥ तेषांसततयुक्तानां म्हणजे सर्व भगवंताचे ठायीं निरंतर एकाग्र मन करून राहिलेले आणि, प्रीति पूर्वक भजतां म्हणजे लाभ किंवा आपली लोकांनीं पूजा करावी आपली भगवद्भक्त अशी लोकांत प्रसिद्धि व्हावी अशी इच्छा न धरून केवल प्रेमें करूनच जे माझें पूर्वोक्त प्रकारानीं भजन सेवन करतात त्यांस - ददामि बुद्धियोगंतं म्हणजे "अविकंपेनयोगेन" येथें करून सांगितला जो बुद्धि योग म्हणजे ज्ञानरूप योग किंवा माझें स्वरूपाविषयीं उत्तम ज्ञाननिष्ठा तीप्रत देतों ॥ येन तेमां उपयांति म्हणजे ज्या ज्ञाननिष्ठेनें ते समुद्राप्रत नद्या जशा आपलीं नामरूपें टाकून प्रवेश करतात त्या प्रमाणें ते उपाधि त्याग करून मजप्रत येतात. म्हणजे मद्रूपच होतात. विभूति आणि योग यांच्या ज्ञानाचें फल सांगतात. चारपहिले पक्षिं बुद्धि योगानें "मच्चित्तामद्गत प्राणा" येथें करून सांगितले प्रमाणें मजप्रत भजतात असा अर्थ करावा. ॥१०॥

**तेषामेवानुकंपार्थ महमज्ञानजं तमः ॥ नाशयाम्यात्म भावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥ ॥**

तेषां एव अनुकंपार्थं म्हणजे आपलें प्रयोजन नसतांही त्यांवर अनुग्रह करावा याच हेतूनें ॥ आत्मभावस्थः अहं म्हणजे आत्माकार अंतःकरण वृत्तींत राहिलेला म्हणजे वृत्तीनें व्याप्त मी स्वप्रकाश सच्चिदानंदाद्वय स्वरूप आत्मा ॥ भास्वता ज्ञानदीपेन॥ म्हणजे प्रकाशरूप किंवा प्रबल तेजस्वी ज्ञानरूपदीपानें ॥ अज्ञानजंतमः नाशयामि ॥ म्हणजे अविवेका पासून उत्पन्न झालेलें जें देहेंद्रियादिकांवर आत्मत्व बुद्धि किंवा आत्म्यावर कर्तृत्व भोक्तृत्वादि विषयक मिथ्याज्ञान एतद्रूप तम म्हणजे सर्व अनर्थांस कारण अज्ञान मोहरूप अंधकार त्याचा नाश करतो, महावाक्या पासून ब्रह्मात्माकार रूप अंतःकरण वृत्ति होण्यास श्रवण मनन निदिध्यासनादिकांची अपेक्षा आहे. दीपास तेल आणि वात यांची अपेक्षा आहे, त्या साधनानीं दीप उत्पन्न होतो व अंधकाराचा नाश होऊन आपले दृष्टिगोचर (दृश्य) जे विषय त्यांचा तो प्रकाश तत्काळ करतो त्या विषयीं दीपाच्या आवृत्तीची (वारंवार करण्याची) गरज नाहीं त्या प्रमाणें श्रवणादिक साधनानीं एकवार ब्रह्म परोक्ष ज्ञानरूप प्रबलवृत्तीनें अज्ञान नाश होऊन मोक्ष प्राप्त होतो त्या विषयीं ज्ञानाचे दृढत्वाविषयीं पुनःपुनः उपासनं प्रमाणें ज्ञाना वृत्तीचें प्रयोजन नाहीं असें, भास्वता या पदानें सूचविलें. ॥ ११ ॥

**अर्जुनउवाच ॥ ॥ परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ॥ पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुं ॥ १२ ॥**

या प्रमाणें "एतां विभूतिं योगंच" येथें करून विभूतींचे ज्ञानाचा निशे-

ष आहे असें ऐकून त्यानी प्राप्ति आपणास व्हावी म्हणून उत्सुक झालेला अर्जुन-प्रथम स्तुति करून भगवंताचें आर्जव करून बोलतो. भवान परब्रह्म म्हणजे तूं पर म्हणजे मुमुक्षूनीं ज्ञेय निरुपाधिक ब्रह्म आहेस हेंच वास्तविक ब्रह्मत्व म्हणजे ब्रह्माचें स्वरूप, हें अशी उपासना करण्यास शक्य नाहीं असें श्रुतींत सांगितलें आहे यावरून वास्तविक सोपाधिक उपास्य ब्रह्म तूं नव्हेस. परं धाम म्हणजे तूं स्वप्रकाश तेजोरूप आहेस. तुझे संबंधानें प्रकाश पावून विषयांस प्रकाश करणारें जें उत्पन्न होणारें अंतःकरण वृत्तिरूप अपर ज्ञान तें तूं नव्हेस. भवान् परमं पवित्रं म्हणजे तूं पूर्वोक्त रीतीनें परम पवित्र आहेस, अपर गंगादिका प्रमाणें नाहींस याविषयीं प्रमाण दीड श्लोकांनीं सांगतात. तूं पुरुष म्हणजे सर्व शरीरांतस्थ परमात्मा, शाश्वत म्हणजे सर्वदा एक रूप आणि नित्य दिव्य म्हणजे प्रकाशात्मक अथवा हृदयाकाशाचे ठाचीं आविर्भाव (प्रगट) पावणारा, आदिदेव म्हणजे सूत्रात्मा जो हिरण्यगर्भ त्याचाही आदिकारण, आणि याच कारणानें अज म्हणजे उत्पत्तिरहित आणि विभु म्हणजे व्यापक असा आहेस. असें तुला सर्व ऋषी बोलतात. असा पुढील श्लोकांत याचा अन्वय आहे. ॥१२॥

## आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ॥ असितो देवलो व्यासः स्वयंचैव ब्रवीषिमे ॥१३॥ ॥

त्वां सर्वे ऋषयः आहुः तथा देवर्षि नारदः म्हणजे तूं पूर्वोक्त स्वरूप अनंत महिम्यानें युक्त आहेस असें नव्हत्र सर्व भृगु आदिकरून ऋषी बोलतात तसा देवर्षि नारद तसाच असित धौम्याचा ज्येष्ठभ्राता देवल आणि भगवान् बादरायण व्यास हे सर्व बोलतात. हे पूर्वी प्रमाणेंच ऋषि असतांही नारदादिक साक्षात्-आतां बोलतात. यास्तव ते पृथक् घेतले आणि स्वयंचैव मे ब्रवीषि म्हणजे तूंही स्वतः तसेंच बोलतोस. ॥१३॥

## सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ॥ नहिते-भगवन् व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥१४॥ ॥

सर्वं एतत् ऋतं मन्ये यन्मां केशव वदसि म्हणजे ऋषीनीं जें सांगितलें-आणि हे केशवा, तूं जें मला बोलतोस तें सर्व मी सत्य मानितो. तुझ्या बोलण्यावर कोठें ही मला अविश्वास नाहीं हें तूं सर्वज्ञ जाणतोसच आहेस. क म्हणजे ब्रह्मा, ईश म्हणजे रुद्र हे सर्वेश्वर असतांही त्यांप्रत हे आपणास दयाकरण्यास पात्र आहेत असें जो वाति म्हणजे जाणतो तो केशव असा केशव शब्दाचा अर्थ करून भगवंताचें निरतिशयित ऐश्वर्य केशव पदानें समजावें. हे भगवन् देवाः दानवाः ते व्यक्तिं-

न हि विदुः म्हणजे हे भगवन् सर्वैश्वर्य संपन्न जो तूं त्या तुझ्या प्रभावा प्रत अतिशयित ज्ञानी देव नसेच दानव जाणत नाहींत. महर्षी ही जाणत नाहींत असें उपलक्षणानें घ्यावें. ॥१४॥

**स्वयमेवात्मनाऽऽत्मा नं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ॥ भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥१५॥ ॥**

हे भूतभावन म्हणजे भूतास उत्पन्न करणाऱ्या, हे भूतेश म्हणजे भूतांच्या नियंत्या, हे देवदेव म्हणजे सर्व देवांचाही आदिदेव. हे पुरुषोत्तम म्हणजे-पुरुषश्रेष्ठा, हे जगत्पते, म्हणजे जगाचा संरक्षण करणाऱ्या. स्वयमेव आत्मना आत्मानं जानासि म्हणजे तूं दुसऱ्याच्या उपदेशा वांचून आपल्या स्वरूपानें आपणाप्रत जाणतोस, निरुपाधिक स्वरूपास आत्मत्वें करून आणि सोपाधिक स्वरूपास निरतिशय ज्ञानैश्वर्यादिशक्तियुक्तत्वें करून जाणतोस दुसरा कोणी जाणत नाहीं. हें दाखविण्यासाठीं प्रेमानें पूर्वोक्त संबोधनें दिलीं. पुरुषोत्तम येणें करून सर्व पुरुष तुजपेक्षां निकृष्ट अल्पज्ञच आहेत तेव्हां तुझें स्वरूप जाणण्यास ते अशक्त आहेत असें सूचविलें, पुरुषोत्तमत्व कसें तें दुसऱ्या संबोधनानीं स्पष्ट केलें आहे. देवदेव येणें करून सर्वांस आराध्य जे देव त्यांसही आराध्य तूं देव येणें करून सर्वोत्कृष्टत्व सूचविलें. इतर पदानीं ही तेंच स्पष्ट सूचविलें आहे. ॥१५॥

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ॥ याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥१६॥**

ज्या कारणास्तव तुझ्या विभूति दुसऱ्यांनीं जाणावयास अशक्य आहेत त्याकारणास्तव ॥ याभिः विभूतिभिः त्वं इमान् लोकान् व्याप्य तिष्ठसि ॥ ज्या विभूतीनीं या लोकांप्रत व्यापून तूं राहतोस । ताः दिव्याः आत्मविभूतयः अशेषेण वक्तुं अर्हसि ॥ म्हणजे त्या तुझ्या असर्वज्ञ जे आहेत त्यानीं जाणावयास अशक्य अशा मुख्य विभूति साकल्येंकरून सर्वज्ञ तूं मला सांगण्यास योग्य आहेस. ॥१६॥

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन् ॥ केषु केषु च भावेषु चिंत्योसि भगवन्मया ॥१७॥**

त्यानें सांगण्याचें प्रयोजन सांगतो. हे योगिन् हे निरतिशयैश्वर्यादि शक्तियुक्त परमेश्वर अथवा विश्वरूप परमेश्वर ॥ त्वां सदा परिचिंतयन् अहं त्वां कथं विद्यां तुझें निरंतर ध्यान करीत असतां देवादि कोणीही तुला जाणावयास शक्त नाहीं असा जो तूं या प्रत अति स्थूलमति मी कसा जाणेन ॥ भगवन् केषु केषु भावेषु

त्वं मया चिंत्यः असि ॥ म्हणजे हे भगवंता, चेतन किंवा अचेतन पदार्थांमध्यें कोठें को-ठें तूं मला चिंतन करण्यास योग्य आहेस. मी तुझें चिंतन कोठें कोठें करावें असा भाव.१७

**विस्तरेणात्मनोयोगं विभूतिं च जनार्दन ॥ भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥**

हे जनार्दन विस्तरेण आत्मनः योगं विभूतिंच भूयः कथय म्हणजे हे जना-र्दना कृष्णा, तूं आपला सर्वैश्वर्य सर्वज्ञत्व सर्वशक्तित्व रूप किंवा विश्वरूपत्व रूप-योगा प्रत पुनः विस्तरें करून मला सांग. सर्वजनानीं स्वर्गादिक सुख किंवा मोक्षसु-ख प्राप्त होण्यासाठी यांचना करण्यास तूं पात्र आहेस असा जनार्दन शब्दाचा अ-र्थ आहे यास्तव माझी यांचना तुजजवळ युक्तच आहे असें सूचविलें ॥ हि अमृ-तं शृण्वतः मे तृप्तिर्नास्ति म्हणजे एकवार जरी तूं विभूति संक्षेपानें सांगितल्या-स तथापि तुझ्या वाक्यरूप अमृताचें श्रवण करणारा जो मी या मला तृप्ति होत च नाहीं यास्तव पुनः विस्तरें करून सांग. ॥१८॥

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ॥ प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्यमे ॥ १९ ॥**

श्रीकृष्ण याविषयीं उत्तर सांगतात. हंत म्हणजे आतां किंवा तूं जें वि-चारिलेंस तें मी सांगेन असें आश्वासन देऊन हे कुरुश्रेष्ठ ते दिव्याः आत्मविभूत-यः प्राधान्यतः कथयिष्यामि म्हणजे हे अर्जुना, पुराणांतरांत ही ज्या श्रेष्ठत्वें क-रून प्रसिद्ध आहेत अशा मी आपल्या विभूति कथन करीन. यास्तव व्याकुल होऊं नको. ज्या योगास उपयोगी आहेत त्या मुख्य मुख्य मात्र सांगेन. कारण हे कुरुश्रे-ष्ठा अर्जुना, मे विस्तरस्य अंतो नास्ति ॥ म्हणजे माझ्या विभूति अनंत आहेत, त्यां-ची इयत्ता नाहीं हें उपलक्षण करून योग ही संक्षेपानें सांगेन असें सूचविलें. नाहीं-तर विभूति आणि योग सांग असें अर्जुन बोलला. त्याचें उत्तर भगवंतांनीं विभूति-मात्र सांगेन असें दिलें या वरून भगवंतास अवधान नाहीं असें होईल. ॥१९॥

**अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ॥ अ-हमादिश्च मध्यंच भूतानामंत एवच ॥ २० ॥**

प्रथमतः संक्षेपानें योग सांगतात. हे गुडाकेश म्हणजे अर्जुना, आत्मा स-र्व व्यापक किंवा सच्चिदानंद रूप आहे अतएव सर्वभूतांचा आशय म्हणजे ऐक्य-भाव होण्याचें स्थान आहे, जसा तटाकादिक जलाशय उदकाचें ऐक्य होण्याचें स्था-

न आहे. जसा तटाकादिक जलाशय उदकाचें ऐक्य होण्याचें स्थान त्याप्रमाणें अचल-स्थिर अथवा सर्व भूतांचे हृदयाचे ठायीं अंतर्यामि रूपानें आणि कर्त्रे, मोक्ष स्वरूपानें स्थित असा जो मी वासुदेव त्याचेंच तूं ध्यान कर. गुडाकेश या पदाचा निद्रेचा जय करणारा असा अर्थ आहे यावरून अर्जुनास ध्यान करण्याची योग्यता सूचविली. आतां ध्येय वस्तूचें कोणते गुणानीं ध्यान करावें तें सांगतात. अहं भूतानां आदिः म्हणजे मी सर्व भूतांचा उत्पत्ति आहे, मध्यंच म्हणजे स्थिति मी आहें आणि अंत एवच म्हणजे संहार ही मीच आहें. या उत्पत्ति स्थिति लयाचे स्वरूपानें किंवा त्यांचे कारणस्वरूपानें माझें ध्यान करावें असें तात्पर्य. येथें सर्व भूताशयस्थित आत्मा सर्व जगाचे उत्पत्तीचा, स्थितीचा, व प्रलयास कारण मीच आहें असें जें श्रीकृष्णांनीं सांगितलें आणि याप्रमाणें पूर्वी ही बहुत वेळ मी हें सर्व जग व्यापिलें आहे. मायेचे योगानें हें सर्व जग मीच उत्पन्न करितों त्याचा लय मीच करितों. एकत्वें करून पृथक्त्वें करून विश्वतो मुख माझीच उपासना करतात. या जगाचा पिता माता मीच आहें, सर्व यज्ञाचा भक्ता भोक्ता मीच आहें तूं मत्परायण मन्मना हो. माझेंच भजन कर. तूं मज प्रतप्र येशील असें सांगितलें आहे आणि पुढें ही असेंच सांगतील तें अर्जुनाची रथस्थित जी मूर्ति तदुपाधिक स्वरूपा कडे लक्ष्य देऊन सांगितलें, नाहींतर वामदेवा प्रमाणें शास्त्र दृष्ट्या मलाच तूं अमृत अभय असें जाण असा प्रतर्दनास इंद्राचा उपदेश आहे असें व्यासानीं ब्रह्मसूत्रांत सांगितलें आहे त्या न्यायानें कृष्णानीं शास्त्र दृष्टीनें सच्चिदानंदाद्वय सर्वनियामी सर्वव्यापक सर्वांचा आत्मा मायेचे योगानें कल्पिलेले जगाचे सृष्टिस्थिति प्रलयास कारण भूत आणि परमार्थतः अद्वितीय निरुपाधिक पूर्वोक्त स्वरूप ब्रह्मच मी म्हणजे माझें वास्तविक स्वरूप ब्रह्मच आहे असें लक्ष्य ठेवून त्यावर अहं शब्दाचा लाक्षणिक प्रयोग केला या न्यायाचें उदाहरण संक्षेपानें लिहितों. कौषीतकी ब्राह्मणोपनिषदांत दिवोदासाचा पुत्र प्रतर्दन नामक राजा त्यानें इंद्रलोकीं जाऊन युद्धांत आपलें पौरुष इंद्रास दाखविलें त्यावर इंद्र प्रसन्न होऊन वरमाग असें बोलल्यावर जें मनुष्यांस फार हित कारक आहे असें जें तुला संमत असेल तें तूंच विचार करून मला सांग. असें तो प्रतर्दन बोलल्यावर मी प्राण प्रज्ञान स्वरूप आहें आणि अमृत म्हणजे मरण रहित आणि सर्व प्राणि मात्रांचे जीवनास साधन भूत आहें असें मलाच जाण असा प्रथम उपदेश करून शेवटीं तो प्राणरूप मी प्रज्ञान स्वरूप अजर आणि अमृत आनंद स्वरूप आहें असें सांगितलें आणि मध्यें ही जो मला जाणतो त्याचीं भ्रूणहत्यादि सर्व पापें नष्ट होतात असें सांगितलें इत्यादिक आख्यायिका सांगिली आहे तें वाक्य विचारांत घेऊन या वाक्यांत इंद्ररूप जो प्राण ज्ञेयत्वें करून म्हणजे अत्यंत हितकारक मोक्ष त्यास पाहिजे त्याणें तो जाणावा ह्मणून सांगितला तो परब्रह्मच आहे इंद्रादि देवतारूप जीव किंवा प्रसिद्ध-

प्राण वायू नव्हे. कारण प्रतर्दनानें सर्वांस जो अतिहित मोक्ष त्याचें साधन सांग असा प्रश्न केल्यावरून प्राणरूप मी अमृत प्रज्ञान आनंद स्वरूप मी आहें मलाच तूं जाण असें मोक्ष साधन ज्ञान सांगितलें ब्रह्मज्ञाना वांचून तर मोक्षास दुसरा मार्ग नाहीं असें श्रुतींत सांगितलें आहे आणि इंद्रानें मलाच जाण असें सांगून जाणणाराचे भ्रूणहत्यादि सकल पापांचा क्षय सांगितला तें ब्रह्म ज्ञानाचेंच फल श्रुति स्मृतींत सांगितलें आहे. आणि अमृतत्व आणि आनंद प्रज्ञान रूपत्व जें सांगितलें तें प्राणास किंवा इंद्र देहोपाधिक देवता रूप जीवास संभवत नाहीं असा सिद्धांत करून जर असें आहे तर इंद्रानें मलाच तूं जाण असा शब्द प्रयोग केला त्याची उपपत्ति कशी अशी शंका घेऊन तो उपदेश शास्त्र दृष्टीनें वामदेवा प्रमाणें आहे म्हणजे वामदेव नामक कोणी ऋषी ब्रह्मात्मत्व साक्षात्कार युक्त होऊन गर्भांत शयन करीत असतांच शास्त्र दृष्टीनें ब्रह्म स्वरूपानें आपणास सर्वात्मत्व मानून मी मनु झालों, मी सूर्य झालों असें बोलला असें वेदांत सांगितलें आहे तें मी या शब्दाचा लाक्षणिक जो ब्रह्मरूप अर्थ त्यावर लक्ष्य ठेवून बोलला. त्या प्रमाणें इंद्रही शास्त्र दृष्टीनें आपण ब्रह्मच आहें असें जाणून मलाच अमृत अजर आनंद प्रज्ञान असें जाण असें मी या शब्दाचा लाक्षणिक जो ब्रह्मरूप अर्थ त्यावर लक्ष्य ठेवून बोलला असें व्यासानीं पूर्वींच्या सूत्रानें सांगितलें त्या प्रमाणें श्रीकृष्ण भगवंतानें ही अहं शब्दाचा लाक्षणिक जो ब्रह्मरूप अर्थ त्यावर लक्ष्य ठेवून पूर्वोक्त सर्व उपदेश रूप बोलणें आहे यास्तव त्या बोलण्याचा अहं शब्दाच्या मुख्यार्थावर संभव नसला तरी दोष नाहीं. अहं या शब्दाचे एक मुख्य आणि दोन अमुख्य म्हणजे लाक्षणिक असे तीन अर्थ आहेत. असंग, निर्विकार, कर्तृत्व भोक्तृत्वादि रहित जो आत्मा आणि देह, मन, इंद्रियांचा समुदाय यांचें भेद ग्रहण नसल्यामुळें परस्पर ऐक्य भ्रमानें एकत्वाप्रत पावलेला जो आत्मा आणि देहेंद्रियादिकांचा समुदाय त्यावर सर्व अविवेकी मूढ लोक मी कर्ता, मी भोक्ता, मी काणा, मी बधिर, मी अंध, मी जातों, मी येतों इत्यादिक अहं म्हणजे मी या शब्दाचा प्रयोग करतात. यामुळें तो समुदाय त्या शब्दाचा मुख्यार्थ आहे, आत्मा आणि देहेंद्रियादिक हे परस्पर भिन्न आहेत असें जाणणारे विवेकी ज्ञानी लौकिक शास्त्रीय व्यवहारांत प्रत्येकावरच प्रयोग करतात. म्हणजे आत्मा सोडून केवल देहेंद्रिय मन-बुद्धि आदिकांवरच मी कर्ता, भोक्ता, मी पाहतों, मी ऐकतों, इत्यादिक लौकिक व्यवहारांत लाक्षणिक प्रयोग करतात. आणि मी असंग आहें सच्चिदानंद ब्रह्मच आहें असा शास्त्रीय व्यवहारांत आत्मा सोडून केवल देहेंद्रिय मन बुद्धि इत्यादिकांवर लाक्षणिक प्रयोग करतात. यावरून शास्त्रीय व्यवहारांत केवल आत्मा आणि लौकिक व्यवहारांत केवळ देहेंद्रिय मन इत्यादिक अहं म्हणजे मी या शब्दाचे अमुख्य म्हणजे लाक्षणिक अर्थ आहेत असें जाणावें. ॥२०॥

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमा-
न् ॥ मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१

पूर्वोक्त जगदुत्पत्ति स्थिति लय कारण रूपानें सर्व भूताशय सर्वव्यापक सच्चिदानंद स्वरूप परमेश्वराचें ध्यान करण्यास जे अशक्त आहेत त्यांणीं बाह्य ज्या परमेश्वराच्या विभूति त्यांचें ध्यानें करावीं यासाठीं विभूति सांगतात. आदित्यानां अहं विष्णुः म्हणजे द्वादशादित्यांमध्यें विष्णु नामक आदित्य मी अथवा वामनावतार ज्यास उपेंद्र म्हणतात. तो मी म्हणजे माझी विभूति याप्रमाणें पुढें ही अध्याय समाप्ती पर्यंत मी म्हणजे माझी विभूति असा अर्थ जाणावा. येथें अवताररूप जें वामन स्वरूप आपलें विभूतिमध्यें सांगितलें आणि पुढें ही राम वासुदेवादिक स्वरूपें विभूतिमध्यें सांगतील तें ज्या अवतारांत विशेष प्रभाव प्रगट केला तो विभूति रूप आहे त्यारूपानें उपासन करावें अशा तात्पर्यानें आहे - असें जाणावें. ज्योतिषां अंशुमान अहं म्हणजे प्रकाश करणाऱ्या तेजांमध्यें ज्याचे किरणांची सर्व विश्वांत व्याप्ति आहे असा सूर्य मी अथवा ताप करणाऱ्या अग्न्यादिकांमध्यें मध्यान्ह कालीं ग्रीष्म कालीं अत्यंत तापदेणारा सूर्य मी ॥ मरुतां मरीचिः अस्मि ॥ म्हणजे एकुणपन्नास मरुद्गणांमध्यें मरीचि यानांवाचा मरुद्गण मी, नक्षत्राणां शशी अहं म्हणजे नक्षत्रांमध्यें त्यांचा अधिपति चंद्र मी. ॥ २१

वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ॥
इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२

वेदानां सामवेदः अहं म्हणजे च्यार वेदांमध्यें गानमाधुर्येंकरून फार रमणीय जो सामवेद तो मी, देवानां वासवः अस्मि ॥ म्हणजे एकादशरुद्र, द्वादशादित्य, अष्टौवसु आणि अश्विनी कुमार देवांचे वैद्य अशा त्रयस्त्रिंशत् देवांमध्यें सर्व देवांचा अधिपति इंद्र मी, इंद्रियाणां मनः अस्मि म्हणजे इंद्रियांमध्यें सर्वज्ञानेंद्रिय कर्मेंद्रियांचे प्रेरक जे त्यांचें नायक मन तें मी, सर्वभूतानां चेतना अस्मि - म्हणजे सर्वभूत संबंधि परिणामां मध्यें चैतन्याला प्रगट करणारी जी अंतःकरण वृत्ति ती मी आहे. ॥ २२ ॥

रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ॥
वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३

रुद्राणां शंकरः अस्मि - म्हणजे एकादश रुद्रांमध्यें शंकर मी, यक्षरक्षसां वित्तेशः अस्मि - म्हणजे यक्ष आणि राक्षस यांमध्यें त्यांचा अधिपति वित्तेश-

म्हणजे सर्व नवनिधींचा अध्यक्ष कुबेर तो मी, वसूनां पावकः म्हणजे अष्टौ वसूं मध्यें पावक नामा वसू मी, शिखरिणां मेरुः अहं म्हणजे ज्यांस शिखरें आहेत असे जे उंच पर्वत त्यांमध्यें मेरु मी, अथवा शिखरें म्हणजे रत्नें ज्याचे ठायीं आहेत अशा पर्वता मध्यें मेरु मी. ॥२३॥

**पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ॥**
**सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ॥ २४॥**

सर्व राजपुरोहितां मध्यें आणि सर्व राजांमध्यें श्रेष्ठ जो देवराज इंद्र त्याचा उपाध्याय बृहस्पति मी, सेनापतीं मध्यें देवांचा सेनापति जो स्वामि कार्तिकेय तो मी; सर्व सरोवरां मध्यें समुद्र मी ॥ २४॥

**महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ॥ यज्ञा-**
**नां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५**

भृगु आदिक जे पूर्वी सांगितलेले सात ब्रह्मर्षि त्यामध्यें अति तेजस्वि भृगु मी, अनेक वर्णसमुदाय रूप जीं पदें त्यांमध्यें एकाक्षर म्हणजे ॐ कार मी, यज्ञा मध्यें हिंसारहित परम पवित्र जपरूप यज्ञ मी, स्थितिमंत म्हणजे निश्चल जे पदार्थ त्यांमध्यें हिमालय मी, पर्वतांत मेरू पूर्वी सांगितला येथें स्थितिमतांमध्यें हिमालय सांगितला असा अर्थाचा भेद आहे. ॥ २५॥

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ॥ गंध-**
**र्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६॥**

सर्ववृक्ष म्हणजे वनस्पति त्यांमध्यें आणि दुसरे वृक्षांमध्यें अश्वत्थवृक्ष मी, देव असून जे मंत्रद्रष्टे झाल्यामुळें ऋषि ते देवर्षि त्यांमध्यें नारद मी, देवांचे गायक जे गंधर्व त्यांमध्यें चित्ररथ नामक गंधर्व मी, प्रयत्ना वांचून जन्म होतांच धर्मज्ञान वैराग्य रूप ऐश्वर्य प्राप्त होऊन जे कृतार्थ झाले असे ते जन्मतः सिद्ध त्यांमध्यें कपिल महा मुनि मी. ॥ २६॥

**उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ॥ ऐरा**
**वतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम् ॥ २७॥**

अश्वजातीमध्यें अमृत प्राप्ती साठीं समुद्र मंथन देवानीं केलें ते वेळेस उत्पन्न झालेला जो उच्चैःश्रवा या नावाचा अश्व तो मी, गज जातीं तील उत्तम जातींत समुद्र मंथन समयीं उत्पन्न झालेला जो ऐरावत जातीचा गज तो मी, नरां मध्यें म-

नुष्यांचा अधिपति राजा मी असें जाण. ॥ २७

**आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ॥**
**प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८**

शस्त्रास्त्र रूप जीं आयुधें त्यांमध्यें दधीची नामक ऋषीचे अस्थीं पासून उत्पन्न झालेलें वज्रायुध मी, दोहन करण्यास योग्य ज्या धेनु त्यांमध्यें समुद्र मंथन कालीं उत्पन्न झालेली इच्छित विषय देणारी काम धेनु मी, प्रजोत्पत्तीस जीं कारणें त्यांमध्यें धर्मशास्त्रानुसारी विवाहित स्त्री विषयींचा जो काम तो मी, वृथा मैथुनरूप काम मी नव्हे, सर्पजातीं मध्यें त्यांचा राजा वासुकी मी. ॥ २८॥

**अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ॥**
**पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९**

नागजातीं मध्यें त्यांचा राजा अनंत म्हणजे शेष मी, यादस म्हणजे जलचरां मध्यें त्यांचा राजा वरुण मी, पितरांमध्यें त्यांचा राजा अर्यमा नामक पितर मी, संयमतां ॥ म्हणजे धर्माचें किंवा अधर्माचें फल देऊन अनुग्रह करणाऱ्यां मध्यें यमधर्म राजा मी. ॥ २९॥

**प्रल्हादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ॥**
**मृगाणांच मृगेंद्रोहं वैनतेयश्च पक्षिणां ॥ ३०**

दितीचे वंशांतील जे दैत्य त्यांमध्यें सात्विक स्वभावामुळें सर्वांस आनंद देणारा प्रल्हाद मी, गणना करणारांमध्यें काल मी, मृग म्हणजे पशु त्यांमध्यें मृगाचा राजा सिंह मी, पक्ष्यां मध्यें विनतेचा पुत्र गरुड मी. ॥ ३०॥

**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ॥**
**झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जान्हवी ॥ ३१**

पवतां म्हणजे पावन करणाऱ्यां मध्यें किंवा वेगवंतां मध्यें पवन म्हणजे वायु मी, ॥ शस्त्रभृतां - म्हणजे शस्त्र धारण करणारे युद्ध कुशल जे त्यां मध्यें रामः म्हणजे दुष्ट क्षत्रियांचा नाश करणारा परशुराम किंवा सर्व राक्षस कुळांचा संहार करणारा दाशरथि राम मी, झषाणां म्हणजे मत्स्य जाती मध्यें - मकरः - म्हणजे मकर जातीचा मत्स्य मी, स्रोतसां - म्हणजे वेगें करून जल प्रवाहानें गमन करणाऱ्या नद्यां मध्यें जन्हु राजाची कन्या आणि सर्व नद्यांत श्रेष्ठ जी गंगा ती मी. ॥ ३१॥

सर्गाणामादिरंतश्च मध्यं चैवाहमर्जुन ॥ अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२

हे अर्जुना, सर्गाणां म्हणजे अचेतन सृष्टींचा आदि, अंत, मध्य म्हणजे उत्पत्ति, नाश, स्थिति मी आहें, पूर्वी भूतांचा म्हणजे जीवाविष्ट चेतनत्वें करून जीं प्रसिद्ध भूतें त्यांचा आदि, अंत, मध्य मी असें सांगितलें, येथें सर्गांचे म्हणजे अचेतन सृष्टीचे आदि, मध्य, अंत, मी असें सांगितलें यास्तव पौनरुक्त्य (पुनः) नाहीं, अथवा पूर्वी पंच महाभूतांचे आदि, अंत, मध्य मी असें सांगितलें. येथें भौतिक म्हणजे महाभूतांपासून झालेलीं सूक्ष्म स्थूल कार्ये (पदार्थ) त्यांस भौतिक म्हणतात त्यांचा आदि, अंत, मध्य मी असें सांगितलें. विद्यानां म्हणजे चतुःषष्टि संख्याक किंवा चतुर्दश संख्याक ज्या विद्या त्यांमध्यें मोक्ष कारण भूत ब्रह्मात्म विद्या मी. "भूतानामस्मि चेतना" येथें भूत शब्दानें लक्षणें करून तत्संबंधीं परिणाम जसें घेतले त्या प्रमाणें - प्रवदतां - या शब्दानें लक्षणें करून बोलणारांचे संबंधी जे वाद (वाद जल्प वितंडा) रूप बोलणीं त्यांमध्यें वादरूप बोलणें मी. ज्यांत राग, द्वेष नाहींत असे जे गुरु आणि शिष्य किंवा सब्रह्मचारी म्हणजे एके गुरूपाशीं अध्ययन केलेले गुरुबंधु त्यांचे परस्परांचा जयपराजय व्हावा अशी इच्छा ज्यांत नसून तत्वबोध व्हावा या इच्छेनें एकानें एकपक्ष बोलावा आणि त्याविषयीं प्रमाण दाखवावें तर्क दाखवावा एकानें त्याचें प्रमाण किंवा तर्क दाखवून खंडन करावें असें जें तत्वनिर्णय होईतों पर्यंत पूर्वपक्ष सिद्धांत कथन रूप किंवा प्रश्नोत्तर रूप बोलणें त्यास वाद म्हणतात. वादिप्रतिवादींनीं आपला पक्ष सिद्ध होऊन आपला जय व्हावा आणि दुसऱ्याचे पक्षाचें निराकरण होऊन त्याचा पराजय व्हावा या हेतूनें एकानें आपला पक्ष बोलावा त्या विषयीं तर्क आणि प्रमाण दाखवावें दुसऱ्यानें त्याचें प्रमाण किंवा तर्क आपल्या पक्षा विषयीं दाखवून त्याचें खंडन करावें आणि आपला पक्ष प्रमाण तर्क दाखवून सिद्ध करावा असें जें जयपराजय पर्यंत बोलणें त्यास जल्प म्हणतात. ज्या बोलण्यांत जल्पाप्रमाणेंच सर्व आहे परंतु आपले पक्षाचें प्रमाण दाखवून किंवा तर्क दाखवून व्यवस्थापन न करतां दुसऱ्याचे पक्षाचें मात्र प्रमाणादिक तर्कादिक दाखवून निराकरण करतात त्या बोलण्यास वितंडा म्हणतात. वितंडांत एक आपल्या पक्षाचें स्थापन मात्र करतो-दुसऱ्याच्या पक्षाचें निराकरण करीत नाहीं, दुसरा दुसऱ्याच्या पक्षाचें खंडन मात्र करतो आपल्या पक्षाचें स्थापन करीत नाहीं, जल्पांत दोघेही आपापले पक्षाचें स्थापन करून दुसऱ्याच्या पक्षाचें खंडन ही करतात असा विशेष आहे. या तीन बोलण्यांतील जल्प आणि वितंडा यांत वादिप्रतिवादींची बोलण्याची शक्ति किती-

आहे या विषयीं मध्यस्थादिकांस परीक्षा होते इतकेंच फल आहे, वादकथेंत-तर तत्त्व निर्णय होणें हें फल आहे. म्हणून वादकथाच श्रेष्ठ आहे यास्तव ती ईश्वर विभूति आहे. ॥ ३२॥

अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ॥
अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः॥३३॥

अक्षरांमध्यें अ हें अक्षर मी आहें, स्वर आणि व्यंजनें या भेदानें अक्षरें म्हणजे वर्ण दोन प्रकारचे आहेत, स्वर म्हणजे अ आ इ ई इत्यादिक १६ आणि व्यंजनें म्हणजे क ख इत्यादिक ३६ या मध्यें अ हा वर्ण किंवा अक्षर सर्व वाणींत म्हणजे शब्दांत दुसरे वर्णापेक्षां व्यापक आहे आणि अकार हा सर्व वाणीचें स्वरूप आहे ती वाणी स्पर्श आणि ऊष्मे यांनीं व्यक्त झाली म्हणजे नानारूप होते असें श्रुतींत सांगितलें आहे यावरून अकार परमेश्वराची विभूति असें सांगितलें. सामासिकस्य- म्हणजे समासाचे समुदायामध्यें दोन्ही पदाचे अर्थ ज्यांत प्रधान (मुख्य) आहेत असा द्वंद्व समास मी. कुंभाच्या समीप जो देश तो उपकुंभ, पिप्पलीचें जें अर्ध तें अर्धपिप्पली, अशा उपकुंभ- अर्धपिप्पली- या अव्ययीभाव समासांत उप आणि अर्ध हीं जीं उत्तर पदें त्यांचे जें समीप देश आणि अर्ध हे अर्थ ते प्रधान आहेत. राजाचा जो सेवक तो राजसेवक अशा तत्पुरुष समासांत उत्तर पदाचा अर्थ जो सेवक तो प्रधान आहे. चित्र विचित्र आहेत गाई ज्याच्या अशा चित्रगु या बहुव्रीहि समासांत चित्रपद आणि गोपद यांच्या अर्थाहून अन्य- जो चित्र गायींचा स्वामी असा अर्थ तो प्रधान आहे, नील घट या कर्मधारय समासांत ही उत्तर पदाचा अर्थ जो घट तो प्रधान आहे, राम आणि कृष्ण या द्वंद्व समासांत राम आणि कृष्ण या पदांचे अर्थ जे रामकृष्ण हे दोन्ही प्रधान आहेत. यामुळें सर्व समासांमध्यें द्वंद्व समास श्रेष्ठ आहे यास्तव तो परमेश्वराची विभूति आहे. अथवा समं म्हणजे विद्वानाचे मंत्र म्हणजे गमलत करण्यास किंवा गुरु शिष्याचें पूर्वोक्त वादरूप बोलण्यासाठीं एकत्र असणें किंवा बसणें त्यास समास असें म्हणावें तेथें विदित म्हणजे निश्चित केलेले जे अर्थ त्याच्या समुदायामध्यें द्वंद्व म्हणजे रहस्य (फारगुप्त ठेवण्याजोगा अर्थ) तो मी आहें, द्वंद्वं रहस्ये- या सूत्रांत द्वंद्व शब्दाचा रहस्य असा अर्थ वैया करणांस संमत आहे. अक्षयः- म्हणजे नाशरहित असा जो प्रवाहरूपी काल तो मी. कालः कलयतामहं- येथें जो काल सांगितला तो आयुष्याची गणना करणें एतद्रूप जो शतवर्षादिक- काल तो क्षय म्हणजे नाश पावणारा आहे आणि येथें सांगितला तो प्रवाहरूपी परमेश्वरस्वरूप अक्षय काल आहे यास्तव पुनरुक्ति (पुन:) नाहीं. कर्म-

फल देणारांमध्यें विश्वतोमुख म्हणजे सर्व कर्मफल दाता परमेश्वर मी. ॥ ३३ ॥

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ॥ कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ ३४ ॥**

संहार करणारांमध्यें सर्वांचा संहार करणारा मृत्यु मी, भविष्यतां म्हणजे पुढें होणारे जे कल्प त्यांचा उद्भव म्हणजे जो उत्कर्ष तो मी. नारीणां - म्हणजे - स्त्रियांमध्यें कीर्ति १, श्री २, वाक् ३, स्मृति ४, मेधा ५, धृति ६ आणि क्षमा ७ या सात धर्म पत्नी मी आहें. ज्यांचा स्वल्प ही आश्रय पुरुषांस झाला तरी ते लोकांत श्लाघ्यतेप्रत पावून कृतार्थ होतात. धार्मिक स्वभावामुळें नाना देशांत जी ख्याति होते तीस कीर्ति म्हणावें. धर्म अर्थ कामांची जी समृद्धि किंवा शरीराची उत्तम कांति तीस श्री म्हणावें. सर्वार्थांचा प्रकाश करणारी सरस्वती किंवा संस्कृत वाणी तीस वाक् म्हणावें. पदार्थांचा अनुभव झाल्यास फार काळ झाला असला तरी किंवा एक वार ऐकला किंवा पाहिला असला तरी त्याचें स्मरण होण्याची जी शक्ति तीस स्मृति - म्हणावें अनेक ग्रंथार्थांची जी धारणाशक्ति ती मेधा. मरणादिक समयीं देहें द्रियें भूमीवर पडावया जोगीं क्षीण झालीं तरीं त्यांचें स्तंभन करून उचलून धरण्याची शक्ति म्हणजे उच्छृंखल प्रवृत्ति होण्या जोगें कारण प्राप्त झालें तरीं देहें द्रियांनें चांचल्य न होऊं देण्याची शक्ति ती धृति. कोणी ताडन करण्यास आला किंवा ताडन ही केलें तरीं मनास विकार न होणें ती क्षमा. ॥ ३४ ॥

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् ॥ मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥**

वेदांमध्यें सामवेद मी म्हणून सांगितलें त्यांत ही विशेष सांगतात. साम्नां बृहत् साम म्हणजे ऋचांचे अक्षरांवर जीं गानें करतात त्यांस सामें म्हणतात. त्यांमध्यें ज्या ऋचेंत इंद्राची सर्वेश्वरत्वें करून स्तुति केली आहे त्या ऋचेचे अक्षरांवर जें गान करतात त्यास बृहत् साम असें म्हणतात. तें इंद्राची सर्वात्मत्वें करून स्तुति करणारें आहे यास्तव सर्व सामामध्यें श्रेष्ठ आहे तें मी आहें. छंदसां गायत्री म्हणजे ज्यांत अक्षरांचा आणि पादांचा नियम आहे अशा छंदांमध्यें गायत्री रूप छंद मी आहें. गायत्रीचे उपदेश मात्रानें द्विजत्व प्राप्त होतें तें प्राप्त झाल्यावर वेदाध्ययनाधिकार प्राप्त होतो. पूर्वीं छंद चार अक्षरांचेच होते त्यांतील जगती छंद सोमवल्ली आणावयास गेला त्याचीं तीन अक्षरें नाहींशीं झालीं. त्रिष्टुप् छंद सोमवल्ली आणावयास गेला त्याचें एक अक्षर नाहींसें झालें. नंतर गायत्रीनें त्या अक्षरां सह्वां सोमवल्ली आणली यामुळें गायत्रीस आठ अक्षरें झालीं. ती गायत्री

तीन पादांची आणि चतुर्विंशति अक्षरांची आहे, इत्यादिक गायत्रीची शतपथ ब्राह्मणांत स्तुति केली आहे म्हणून ती श्रेष्ठ परमेश्वर विभूति आहे. मासानां मार्गशीर्षः – चैत्रादिक द्वादश मासांमध्यें नवीन शाळी म्हणजे तांदूळ आणिशाकादिक पक्व होतात. आणि फार शीत नाहीं आणि फार उष्णा नाहीं या मुळें सुखकारक असा मार्गशीर्ष मास मी. वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत्, हेमंत आणि शिशिर यासहा ऋतूं मध्यें सर्व सुगंधी पुष्पें ज्यांत उत्पन्न होतात आणि वसंत काळीं ब्राह्मणाचें उपनयन करावें ब्राह्मणानीं अग्निहोत्र वसंत काळीं सिद्ध करावें प्रति वसंत ऋतूंत ज्योतिष्टोम करावा. असा सांगितलेले कर्मां विषयीं प्रशस्त म्हणून श्रुतीनीं सांगितलेला वसंतऋतू मी. ॥३५॥

द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्वं सत्ववतामहम् ॥३६

छलयतां द्यूतं अस्मि – म्हणजे दुसऱ्याची वंचना करणार जे तत्संबंधीं जें सर्वस्वापहरण करणारें द्यूत म्हणजे फांशादिक निर्जीव पदार्थांनीं खेळणें तें मी आहें. घोडे, बैल, येडके इत्यादिक सजीव पदार्थांनीं जें खेळणें त्यास समाव्हय ह्मणतात. तेजस्विनां तेजः अहं – म्हणजे अति उग्र ज्यांचा प्रभाव आहे त्यांचे संबंधी जें तेज म्हणजे त्यांची सर्वांनीं आज्ञा मानावी असें सामर्थ्य तें मी दुसऱ्याचा पराजय करणाराचे ठायीं जो उत्कर्ष असतो तो जय मी आहें, व्यापार करणारे जे व्यवसायी त्यांचा कृषि वाणिज्यादिक अवश्य फल देणारा उद्यम मी. सत्ववतां सत्वं अहं – म्हणजे सात्विक पुरुषांचें जें धर्म ज्ञान वैराग्य ऐश्वर्यस्वरूप कार्य तें सर्व मी आहें. ॥३६॥

वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः ॥ मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥३७

वृष्णीनां वासुदेवः – म्हणजे यादवांमध्यें वसुदेवाचा पुत्र म्हणून प्रसिद्ध जो तुला उपदेश करणारा, तुझ्या रथावर बसणारा तो मी. धर्मराजादिक जे पंडूचे पुत्र त्यां मध्यें धनंजय म्हणजे अर्जुन मी, मननशील जे मुनी त्यांमध्यें भगवान् वेदव्यास मी. अतीत अनागत जाणणारे जे कवि त्या मध्यें उशना कवि - म्हणून जो विख्यात शुक्राचार्य तो मी. ॥३७॥

दंडो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ॥ मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥३८

दमयतां दंडः अस्मि- म्हणजे अमार्गानें चालणाऱ्यांची अमार्गापासून निवृत्ति होण्यासाठीं त्यांस जे दंड करणारे तत्संबंधीं जी दंड करण्याची शक्ति ती मी आहें. जिगीषतां नीतिः अस्मि - म्हणजे शत्रूंचा जय करण्यास जे इच्छितात तत्संबंधी जय अमुक कारणानें होईल असें जाणविणारी जी नीति ती मी आहें. गुह्यानां मौनं अस्मि - म्हणजे उघड करावयाचीं नव्हेत अशीं जीं गोप्यें त्यांची प्रसिद्धि न होण्यास साधन जें मौन म्हणजे वाणीनें उच्चार न करणें तें मी आहें. अथवा गुह्यांमध्यें आत्म्याचें श्रवण मनन पूर्वक निदिध्यासन तें मी आहें. ज्ञानवतां ज्ञानं अहं - म्हणजे ज्ञानवंतांचें जें श्रवण मनन निदिध्यासनांचे परिपाकापासून झालेलें अद्वितीय ब्रह्मात्म साक्षात्काररूप सर्व ज्ञानाचें नाश करणारें ज्ञान तें मी. ॥ ३८

## यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ॥ नतदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरं ॥ ३९ ॥

सर्व भूतानां यत् बीजं तत् अहं - म्हणजे सर्व स्थावर जंगमात्मक भूतांचे उत्पत्तीस मूलकारण मायोपाधिक जें चैतन्य तें मी. हे अर्जुना, मयाविना यत् स्यात् - म्हणजे माझेवांचून जें राहील असें चराचर भूत न अस्ति - म्हणजे नाहीं, सर्व माझेपासून उत्पन्न झालेलें माझें कार्य मद्रूपच आहे असें तात्पर्य. ॥ ३९ ॥

## नांतोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ॥ एषतूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४०

आतां या विभूति सांगण्याच्या प्रकरणाचा उपसंहार म्हणजे समाप्ति करतात. हे परंतप - म्हणजे कामक्रोधादिक शत्रूंस ताप देणाऱ्या आणि त्यांच्या पराजय करणाऱ्या अर्जुना ॥ मम दिव्यानां विभूतीनां अंतः नास्ति - म्हणजे माझ्या दिव्य विभूति इतक्याच आहेत अशी त्यांची इयत्ता नाहीं. एषतु उद्देशतः विभूतेर्विस्तरः मया प्रोक्तः - म्हणजे हा विभूतींचा विस्तर मुख्य मुख्य विभूतींचा एकदेशानें मी तुला सांगितला आहे. ॥ ४० ॥

## यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा ॥ तत्तदेवावगच्छत्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ ४१ ॥

ज्या ईश्वराच्या विभूति सांगितल्या नाहींत त्यांचें सामान्य रूपानें ज्ञान व्हावें या विषयीं सांगतात. यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन - येणें करून सर्वात्मक मी आहें असें सामान्य रूपानें सांगितलें तथापि सर्वात्म ज्ञानाविषयीं जे समर्थ नाहींत त्यांस प्रकारांतरानें त्यांचें ज्ञान व्हावें याविषयीं हें सांगतात. यद्यत् सत्वं

म्हणजे जो जो प्राणी, विभूतिमत् – म्हणजे ऐश्वर्ययुक्त आहे आणि श्रीमत्– म्हणजे लक्ष्मीवान् आहे किंवा उत्तम शोभेनें किंवा कांतीनें युक्त आहे, आणि ऊर्जितं – म्हणजे बलादिकाचे अतिशयानें युक्त आहे, तत् तत् – म्हणजे तो तो प्राणी, मम तेजोंशसंभवं त्वं अवगच्छ – म्हणजे तो पदार्थ माझे शक्तीचे अंशानें उत्पन्न झाला आहे असें तूं जाण. लोकांमध्यें फार रमणीय जें असेल त्याचें भगवद्रूपानें ध्यान करावें असें तात्पर्य. ॥४१॥

**अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ॥ विष्ट-**
**भ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ ४२ ॥**
**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्या-**
**यां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूति-**
**योगो नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥ ॥ श्री ॥**

या प्रमाणें बुद्धिमंदांस एकदेशानें निरनिराळ्या विभूति सांगून उत्तमाधिकाऱ्यांस साकल्यें करून सांगतात. हे अनघ, बहुना एतेन ज्ञातेन तव किं – म्हणजे निष्पाप अर्जुना, या सांगितलेल्या बहुत विभूतींचे ज्ञानानें तुला काय व्हावयाचें आहे, तूं इतकेंच जाण कीं, अहं इदं कृत्स्नं जगत् एकांशेन विष्टभ्य स्थितः अस्मि – म्हणजे हें सर्व जग मी आपले एका अंशानें व्यापून राहिलों आहें, या-साठीं परिच्छिन्न बुद्धि म्हणजे एकैक विभूतीचे ठायीं ईश्वर बुद्धि टाकून सर्वत्र ईश्वर बुद्धिच कर असा भाव. या सर्व जगास मी एकांशानें व्यापून राहिलों असें सांगितल्यानें त्यास सहस्रावधि मस्तकें आहेत, सहस्रावधि नेत्र आहेत हें उपलक्षण करून इतर ही श्रोत्रादिक इंद्रियें सहस्रावधि त्यास आहेत. त्यास सहस्रावधि हस्तपादादिक अवयव आहेत. सहस्रावधि म्हणजे अगणित असा अर्थ जाणावा. तो विराटरूपी पुरुष म्हणजे परमेश्वर पृथिव्यादिक चतुर्दश भुवनात्मक-ब्रह्मांडास व्यापून दाहा अंगुलें अवशिष्ट राहिला आहे. हीं उत्पन्न होणारीं जड-दुःखस्वरूप नश्वर सर्व भूतें त्याचा एकपाद म्हणजे चतुर्थांश आहे. येणें करून त्याचें अवशिष्ट ब्रह्मविष्णुमहेश्वरात्मक त्रिपात् अमृतस्वरूप द्योतमान सच्चिदानंदात्मक परब्रह्मस्वरूपाचे ठायीं आहे असें पुरुषसूक्तादिकांत सांगितलेलें परमेश्वराचें स्वरूप सूचविलें. येथें ब्रह्मांडा बाहेर दाहा अंगुलें परमेश्वरस्वरूप आहे असें विवक्षित नाहीं. परमेश्वरा पासून उत्पन्न झालेलीं जीं आकाशादिक पंचमहाभूतें तीं आकाशा पेक्षां वायु दशांशन्यून आहे. वायू पेक्षां तेज दशांशन्यून आहे. तेजा पेक्षां जल दशांशन्यून आहे. जला पेक्षां पृथ्वी दशां-

शन्यून आहे अशीं आहेत, असें पुराणांत सांगितलें आहे. त्या प्रमाणें आकाशादिक पंच महाभूतें आणि त्यांचीं जीं सूक्ष्म स्थूल कार्यें तद्रूप ब्रह्मांड परमेश्वर स्वरूपापेक्षां दशांश म्हणजे निरवधिक न्यून आहे असें परमेश्वर स्वरूप फारमोठें आहे अशी बुद्धि होऊन त्याप्रमाणें त्याचें चिंतन केलें असतां अनंत फलप्राप्त होतें असें विवक्षित आहे, आणि सहस्रावधि मस्तकें, इंद्रियें, हस्तपादादिक अवयव ज्यास आहेत असा हजारों मस्तकांचा हजारों इंद्रियांचा हजारों हस्तपादादिक अवयवांचा एक परमेश्वराचा देह आहे असें विवक्षित नाहीं. तसा ईश्वराचा एक देह असला तर या ब्रह्मांडांत त्याची सर्वत्र व्याप्ति होऊन दुसरे जीवाचे देहादिक राहण्यास ब्रह्मांडांत अवकाशच राहणार नाहीं असें होईल. तर पुरुषसूक्तादिकांत सांगितलेलें विराट स्वरूप देहाचा यथार्थ विचार केला म्हणजे चतुर्दशभुवनात्मक ब्रह्मांडांतील अनंत जीवांचीं जीं अनंत मस्तकें, इंद्रियें आणि हस्तपादादिक-तींच-समष्टि (सर्वव्यापक) जीव शरीरोपाधिक समष्टि जीवांस हे माझेच अंश मद्रूपच आहेत असें जाणणारा जो विराट् पुरुष त्याचीं आहेत. असें विवक्षित आहे, त्या मस्तकादिकांहीं करूनच त्यास सहस्र मस्तकांचा, सहस्र चक्षुरादिक इंद्रियांचा, सहस्र हस्तपादादिक अवयवांचा असें म्हटलें आहे. असें हें ईश्वराचें विराट् स्वरूप सुलभ रीतीनें मनांत येण्यासाठीं या प्रसंगसंगतीनें शास्त्रार्थ संक्षेपानें लिहितों.॥ सच्चिदानंदाद्वय परब्रह्माचे स्वरूपाचें आवरण करून राहिलेली आणि जीच्या स्वरूपानें सत्वें (सत्यत्वें) करून किंवा असत्वें (असत्यत्वें) करून निरूपण पूर्वी सांगितल्या प्रमाणें करवत नाहीं आणि अनादि निः-स्वरूप त्रिगुणात्मक अशी जी मूल प्रकृति ती अव्यक्त असतां ही पंचमहाभूतें-आणि त्यांचीं कार्यें एतद्रूप सृष्टि होते यावरून या सृष्टीस उपादान कारण कोणी आहे अशा अनुमानानें सिद्ध होते आणि श्रुतीचे प्रमाणावरून ही सिद्ध होते॥ ती प्रकाशात्मक जो सत्व गुण त्याची शुद्धि म्हणजे रजोगुण आणि तमोगुण यांहीं करून मलिनता न होणें असा जो सत्वशुद्धि रूप उपाधि आणि सत्वगुणाची जी अशुद्धि म्हणजे रजोगुण आणि तमोगुण यांहीं करून मलिनता होणें असा जो सत्वाशुद्धि रूप उपाधि याहीं करून सत्वशुद्धि प्रधान ती माया आणि सत्वाशुद्धि प्रधान ती अविद्या म्हणजे अज्ञान अशा भेदानें दोन प्रकारची आहे. त्या दोन उपाधींतील मायेचे ठायीं जो प्रतिबिंबित झालेला सच्चिदानंद रूपात्मा त्यास सर्वज्ञत्वादि गुणयुक्त ईश्वर असें म्हणतात. तो ईश्वर आपला जो उपाधि माया तीस आपले स्वाधीन ठेवून राहतो अविद्यारूप जो दुसरा उपाधीचा भेद त्याचे ठायीं प्रतिबिंबित झालेला जो चिदात्मा त्यास जीव असें म्हणतात. तो जीव अविद्येचे स्वाधीन आहे म्हणून स्वतंत्र नाहीं आणि आपल्या उपाधिस्वरूपाच्या सत्वगुणासं-

बंधि अशुद्धतेचे न्यूनाधिकत्वामुळें देव, मनुष्य, तिर्यग् म्हणजे पशुपक्षी कीटक-या भेदानें अनेक प्रकारचा आहे आणि त्या प्रत्येक जीवांस कारण शरीर आणि सूक्ष्म शरीर ज्यास लिंग शरीर असें म्हणतात. आणि स्थूल शरीर अशीं तीन शरीरें सुषुप्ति, स्वप्न आणि जागृति या तीन अवस्थांचे ठायीं क्रमानें आहेत. अविद्यारूप जो जीवाचा उपाधि त्यास कारण शरीर म्हणतात. त्यावर अभिमान ठेवणारा जो सुषुप्तींतील जीव त्यास प्राज्ञ असें म्हणतात. ते प्राज्ञ जेव्हां स्वप्नावस्थेंत लिंग शरीरावर अभिमान ठेवितो तेव्हां त्यास तैजस असें म्हणतात. आणि जागृतींत जेव्हां स्थूल देहावर अभिमान ठेवितो तेव्हां त्यास विश्व असें म्हणतात. असे जे जीव त्यास त्यांचे शुभाशुभ कर्मांचा सुखदुःख साक्षात्काररूप जो भोग तो देण्यासाठीं पूर्वीं सांगितलेली जी त्रिगुणात्मक प्रकृति तिचे तमोगुण प्रधान अंशापासून जगाचा अधिष्ठाता आणि नियंता जो सर्वज्ञ मायोपाधिक म्हणजे माया प्रतिबिंबित चिदात्मरूप परमेश्वर त्याचे इच्छेनें आकाश, वायु, तेज, जल आणि पृथ्वी अशीं पंच महाभूतें उत्पन्न झालीं. त्या पंचमहाभूतांच्या प्रत्येक सत्वांशापासून क्रमें करून पंच ज्ञानेंद्रियें उत्पन्न झालीं. म्हणजे आकाशाचे सत्वांशापासून श्रोत्रेंद्रिय - वायूचे सत्वांशापासून त्वगिंद्रिय, तेजाचे सत्वांशापासून चक्षुरिंद्रिय, जलाचे सत्वांशापासून रसनेंद्रिय - पृथ्वीचे सत्वांशापासून घ्राणेंद्रिय अशीं उत्पन्न झालीं आणि पंच महाभूतांच्या सर्व पांच सत्वांशापासून मन आणि बुद्धि या दोहोंस उपादान कारण अंतःकरण उत्पन्न झालें तें मन आणि बुद्धि या दोन वृत्ति म्हणजे अवस्था त्यांचे भेदानें दोनप्रकारचें आहे. संशयात्मक जी अंतःकरणाची वृत्ति तीस मन म्हणावें. निश्चयात्मक जी अंतःकरणाची वृत्ति तीस बुद्धि असें म्हणावें. पंचमहाभूतांतील आकाशाच्या रजोगुणांशापासून वागिंद्रिय उत्पन्न झालें. वायूचे रजोगुणांशापासून पाणी म्हणजे हस्त हें इंद्रिय उत्पन्न झालें. तेजाच्या रजोगुणांशापासून पाद हें इंद्रिय उत्पन्न झालें. जलाचे रजोंशापासून पायू म्हणजे गुद हें इंद्रिय उत्पन्न झालें. पृथ्वीचे रजोगुणांशापासून उपस्थ म्हणजे गुह्य ( शिश्न, योनि ) हें इंद्रिय उत्पन्न झालें, पांचांच्याही पांच रजोगुणांशांपासून प्राण उत्पन्न झाला. तो एकच असतां स्थान भेदानें त्यास प्राण, अपान, व्यान, उदान, समान असे पांच भेद प्राप्त झाले आहेत. स्थान भेद पूर्वीं सांगितले आहेत, सांगितलेलीं पांच श्रोत्रादिक ज्ञानेंद्रियें तशींच वागादिक पांच कर्मेंद्रियें तसेंच पांच प्राण, बुद्धि आणि मन हे जे सप्तदश पदार्थ यांचे समुदायास सूक्ष्मशरीर किंवा लिंगशरीर म्हणावें. हें लिंगशरीर प्रत्येक जीवास प्रत्येक शरीरीं भिन्न भिन्न आहे, त्या प्रत्येक लिंगशरीरास व्यष्टि असें म्हणतात. आणि सर्व जीवांच्या सर्व शरीरांतील लिंगशरीराचे समुदायास समष्टि-

असें म्हणतात. मलिन सत्त्व प्रधान अविद्योपाधिक जो प्राज्ञ म्हणजे जीव तो या व्यष्टि म्हणजे प्रत्येक लिंगशरीरावर तादात्म्याभिमान जेव्हां ठेवितो तेव्हां त्यास तैजस असें म्हणतात. शुद्ध सत्त्व प्रधान मायोपाधिक परमेश्वर या लिंग शरीराचे समष्टीवर म्हणजे सर्वलिंगशरीरांचे समुदायावर किंवा व्यष्टि लिंग शरीरावर अभिमान ठेवणारे सर्व तैजस जीव समुदायावर जेव्हां तादात्म्याभिमान ठेवितो तेव्हां त्यास हिरण्यगर्भ असें म्हणतात. व्यष्टि आणि समष्टि असा तैजस आणि हिरण्यगर्भ यांचा जो भेद सांगितला त्याच कारणानें जीव अल्पज्ञ आणि हिरण्यगर्भ सर्वज्ञ असें जाणावें. याप्रमाणें हिरण्यगर्भ पर्यंत सूक्ष्मसृष्टि उत्पन्न केल्यानंतर पुनः मायोपाधिक परमेश्वर जीवास त्यांचे शुभाशुभ फलांचा सुख दुःख साक्षात्कार होण्यासाठीं अन्नपानादिक भोग्यविषय आणि सुखदुःख साक्षात्कार रूप भोग होण्याचें जें स्थान तें जरायुज, अंडज, स्वेदज, उद्भिज या भेदें करून च्यार प्रकारच्या जातीचे स्थूल शरीरांची सृष्टि करण्यासाठीं पंचमहाभूतांतील एकेक भूत पूर्वी पंच स्वरूप नव्हेतें तें पंचस्वरूप करतो. तो प्रकार असा – एकेक भूताचे सोळा सोळा अंश कल्पावे आणि प्रत्येक भूतांचे दोन भाग करावे. एक भाग म्हणजे आठ अंश निराळा करावा. त्यांत दुसरे च्यार भूतांचे प्रत्येकांचे दोन दोन अंश असे आठ अंश मिळवावे. म्हणजे आकाशादि प्रत्येक भूत आपले आठ अंश आणि दुसरे च्यार भूतांचे प्रत्येक दोन दोन अंश मिळून आठ अंश यांहीं करून युक्त झालें म्हणजे षोडशात्मक आणि पंचभूतात्मक सिद्ध होतें. या प्रमाणें पंचीकृत जीं पंचमहाभूतें त्यां पासून ब्रह्मांड उत्पन्न होतें, त्या ब्रह्मांडांत उपरिभाग म्हणजे वर राहणारे भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनोलोक, तपोलोक आणि सत्यलोक हे सात आणि भूमीचे अधोभागीं म्हणजे खालीं राहणारे अतल, वितल, सुतल, तलातल, रसातल आणि पाताल हे सात अशीं चवदा भुवनें आणि त्या चतुर्दश भुवनांत राहणारे जे देव मनुष्यादिक प्राणी त्यांनीं भोगण्यास योग्य जीं अन्नपानादिक आणि त्यांचा भोग करण्यास त्या त्या लोकीं योग्य जीं शरीरें तीं ही त्या पंचीकृत भूत निर्मित भूतां पासूनच परमेश्वराचे इच्छेनें उत्पन्न होतात. या प्रमाणें स्थूल ब्रह्मांडाची सृष्टि झाल्या नंतर पूर्वी सांगितले प्रमाणें व्यष्टि म्हणजे प्रत्येक शरीरावर अभिमान ठेवणारे जे तैजस जीव त्यांस विश्व असें नांव प्राप्त होतें आणि समष्टि म्हणजे ब्रह्मांडांतील सर्व स्थूल शरीरावर आपले आत्म्याचे तादात्म्याचा अभिमान ठेवणार जो हिरण्यगर्भ त्यास विराट् पुरुष असें नांव प्राप्त होतें. असें विराट स्वरूपाचें ज्ञान चर्मचक्षूनीं होणार नाहीं कारण शास्त्रीय ज्ञानरूप दृष्टीनेंच तें जाणण्यास योग्य आहे म्हणून तुला दिव्य म्हणजे ज्ञानरूपचक्षु देतों असें बोलून आपले

स्वरूपाचे ज्ञानाचा उपदेश केला. असें या प्रकरणाचें तात्पर्य आहे. कथाभाग पक्षीं लोकदृष्टीनें अर्थस्पष्टच आहे तो पुढें लिहूं. ॥ ४२॥

इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथ शास्त्रीकृत भाषाविवृत्तौ दशमोऽध्यायः समाप्तः ॥ १०॥

## अध्याय ११ वा.

**अर्जुनउवाच॥ ॥ मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ॥ यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १॥ ॥ ॥ ॥**

पूर्वाध्यायीं – एतां विभूतिं योगंच ममयो वेत्ति तत्त्वतः ॥ येणें करून आपल्या विभूतींच्या आणि योगाच्या ज्ञानें करून निश्चल समाधिरूप योग प्राप्त होतो असें भगवंतांनीं सांगितल्यावरून ॥ विस्तरेणात्मनो योगं विभूतिंच जनार्दन। भूयः कथय ॥ येणें करून तूं आपल्या विभूतीं प्रत आणि योगाप्रत पुनःकथन कर– अशी अर्जुनानें प्रार्थना केल्यावर ॥ अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ॥ येणें करून संक्षेपानें भगवंताचा विभूति पूर्वीं सर्वाधारत्वरूप योग सांगितला नंतर विभूति सांगून ॥ विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ येणें करून भगवंताचें सकल विश्वात्मक रूप सांगून त्या योगाचेंच स्मरण दिलें, तें भगवंताचें विश्वरूप ऐकून त्याचा साक्षात्कार आपणास व्हावा अशा मोठ्या उत्कंठेनें युक्त झालेला अर्जुन पूर्वीं तें भगवंतांनीं आपणास सांगितलें त्या सर्वांचे अभिनंदन करून बोलतो ॥ मदनुग्रहाय ॥ म्हणजे मला झालेले जे शोक आणि मोह यांचें निराकरण व्हावें असें मनांत आणणें एतद्रूप जो अनुग्रह तदर्थ म्हणजे त्याचें फल जें शोकमोहनिवृत्ति होणें त्यासाठीं ॥ परमं गुह्यं अध्यात्म संज्ञितं ॥ म्हणजे ज्यापासून निरतिशय पुरुषार्थच प्राप्त व्हावयाचा असें आणि यःकश्चित् सामान्य मनुष्यास जें बोलावया जोगें नाहीं असें आणि आत्मानात्म विवेक ज्या पासून उत्पन्न होतो असें. अशोच्यानन्वशोचः त्वं – इत्यादिक सहा अध्याय पर्यंत महावाक्यांतील त्वंपदाचा अर्थ ज्यांत मुख्यत्वें करून प्रतिपाद्य आहे असें. यत् त्वया वचः उक्तं, म्हणजे जें परम कारुणिक आणि सर्वज्ञ तूं वचन बोललास ॥ तेन मम अयं मोहः विगतः – म्हणजे त्या वाक्यानें हे भीष्म द्रोणादिक माझे हातून मरणपावतील मी यांस मारीन इत्यादिक जो नाना प्रकारचा मला मोह झाला होता तो आत्मा निष्क्रिय नित्य, अकर्ता आहे असें जाणून सर्व निःशेष गेला. ॥ १॥

**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ॥ त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥**

आणि महावाक्यांतील तत्पदाचा अर्थच ज्यांत मुख्यत्वें करून प्रतिपाद्य आहे अशा सप्तमाध्याया पासून दशमाध्याय पर्यंत - हे कमलपत्राक्ष भूतानां भवाप्ययौ त्वत्तः विस्तरशः मया श्रुतौ – म्हणजे कमल पत्राप्रमाणें दीर्घ आणि ज्यांचे प्रांतभाग आरक्त आहेत अशा महा पुरुषाचे लक्षणानें युक्त आणि परम सुंदर आहेत नेत्र ज्याचे अशा कमलपत्राक्षा कृष्णा, सर्व भूतांचें उत्पत्ति आणि प्रलय तुजपासूनच होणारे आहेत, असें सविस्तर तुजपासून मी ऐकिलें. केवल तुजपासून होणारे भूतांचे उत्पत्ति प्रलयच ऐकिले असें नाहीं तर - अव्ययं माहात्म्यं अपि श्रुतं ॥ म्हणजे विश्व सृष्ट्यादिक करीत असतां ही तुला विकार नाहीं. जीवां पासून शुभाशुभ कर्म करवीत असतां ही तुला वैषम्य म्हणजे विषमभाव किंवा निर्दयत्वादिक तुला नाहीं. जीवांस बंधमोक्षा दिक विचित्र फल देत असतां ही तूं असंग आणि उदासीना प्रमाणें आहेस आणि तूं सर्वात्मा असतां ही निरुपाधिक आहेस असें नाश पावावयाचें नाहीं आणि निरंतर राहणारें तुझें माहात्म्य ही ऐकिलें. ॥ २ ॥

**एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर ॥ द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥**

हे परमेश्वर त्वं आत्मानं यथा आत्थ एतत् एवमेव - म्हणजे ज्ञान, ऐश्वर्य, शक्ति, बल, वीर्य, तेज या गुणानीं युक्ता कृष्णा, तूं आपणास जगदाधारत्वादिक जें पूर्वी सांगितलेंस तें तुझें निरतिशय ऐश्वर्य खरें आहे असें मी मानतों तुझे वचनावर माझा कोठें ही अविश्वास नाहीं तथापि हे पुरुषोत्तम ते ऐश्वर्यरूपं द्रष्टुं इच्छामि - म्हणजे क्षराक्षरा तीता हे पुरुषोत्तमा कृष्णा, मायोपाधिक जो तूं ईश्वर तत्संबंधीं जें सर्वविश्वात्मक मायामय रूप त्या प्रत पाहण्यास मी इच्छितों. सर्वभूतगुणानीं युक्त असें जें मला पाहतोस ही मायाच आहे हे नारदा, याप्रमाणें मला तूं जाणावयास योग्य नाहींस तर हें मायामय रूप मिथ्या आहे असें जाणून शुद्ध सच्चिदानंदा द्वितीय स्वरूप मी आहें असें जाणावयास तूं योग्य आहेस असें विश्वरूप धारण करून नारदास दाखविणाऱ्या भगवंताचें वाक्य. विश्वात्मक भगवंताचें रूप मायेनें कल्पिलेलें मायामय आहे याविषयीं प्रमाण आहे आणि येथेंच पुरुषोत्तम आणि ऐश्वरं या दोन पदानीं सर्वभूतांस क्षर अशी संज्ञा आहे त्याहून अतीत जो पुरुष तो उत्तम पुरुष परमात्मा असें पंधराचे

अध्यायांत सांगितलें आहे यावरून विश्वातीत असतां ही ज्यास मायेनें विश्व-रूप असें भासविलें आहे असा अर्थ सूचविला आहे. यावरून विश्वरूप माया-मयच आहे तें ध्येय मात्र आहे, ज्ञेयरूप तर निरुपाधिक, माया आणि मायेचे का-र्यांचा ज्यास कालत्रयीं ही स्पर्श नाहीं असें अखंड सच्चिदानंदात्मक अद्वितीयरू-प आहे असें जाणावें. ॥ ३ ॥

**मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ॥ योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥**

मी पाहण्यास इच्छितों इतक्यावरूनच तें रूप मला दाखवूं नये. हे प्र-भो योगेश्वर सृष्टिस्थिति संहार आणि तदुपयोगी आज्ञा करणाऱ्या सर्वांच्या ई-श्वरा आणि योग्यांच्या ईश्वरा कृष्णा, तत् मया द्रष्टुं शक्यं यदि मन्यसे – म्हणजे-या अर्जुनानें तें तुझें विश्वात्मकरूप पाहण्यास शक्य आहे असें जर तूं मानशील. ॥ ततः अव्ययं आत्मानं दर्शय – म्हणजे तर आपल्या अव्यय विश्वरूपाप्रत म-ला दाखीव, योगेश्वर या पदानें अणिमादिक आठ सिद्धि ज्यांस आहेत असे जे योगी त्यांचा तूं ईश्वर आहेस. यामुळें तसें ही रूप मला डोळ्यांनीं पाहण्यासमी योग्य होईन असें करण्यास तुला सामर्थ्य आहे असें सूचविलें. ॥ ४ ॥

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ पश्य मे पार्थ रूपाणि शतशोथ सहस्रशः ॥ नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥**

ह्या प्रमाणें अत्यंत भक्त अर्जुनानें प्रार्थिलेला भगवान् आपलें रूप-पाहण्यास अर्जुनाला सावधान करीत होत्साता बोलतो. हे पार्थ, मे नाना विधा-नि – म्हणजे हे अर्जुना अनेक प्रकारचीं ॥ दिव्यानि म्हणजे लोकांत कधीं ही पा-हिलीं नाहींत अशीं अति अद्भुत ॥ नानावर्णाकृतीनि ॥ म्हणजे शुक्ल कृष्ण पी-तादिक अनेक वर्ण ज्यांचे आहेत आणि नाना प्रकारच्या आकृति ज्यांस आहेत अशीं. शतशः सहस्रशः म्हणजे अनंत माझीं रूपें पहा. ॥ ५ ॥

**पश्यादित्यान् वसून् रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ॥ बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥**

दिव्य रूपें कोणतीं तीं सांगतात. हे भारता अर्जुना, द्वादशादित्य, अष्टे-वसु, एकादशरुद्र, देवांचे वैद्य दोन अश्विनी कुमार, एकुणपन्नास मरुद्गण तसे या-शिवाय दुसरे ही जे देव आहेत त्यांप्रत पहा. अनंत नानाविध रूपें सांगतात. बहू-

न्य दृष्टपूर्वाणि - म्हणजे या मनुष्यलोकाचे ठायीं तूं किंवा दुसऱ्यानें कोणी पाहि-लीं नाहींत अशीं बहुत रूपें पाहा. नानावर्णाकृति रूपें सांगतात. आश्चर्याणि-म्हणजे कोणास च्यार मुखें, कोणास पांच मुखें, कोणास महामुखें अशीं आश्च-र्य कारक अद्भुत रूपें पाहा. ॥६॥

## इहैकस्थं जगत् कृत्स्नं पश्याद्य सचराचरम्॥ मम देहे गुडाकेश यच्चान्य द्रष्टुमिच्छसि॥७॥

केवल इतकेंच नाहींतर माझे देहांत राहिलेलें सर्व जग ही पाहण्यास-तूं योग्य आहेस असें सांगतात. हे गुडाकेश मम इह देहे म्हणजे हे निद्राजय क-रणाऱ्या अर्जुना, माझ्या या देहाचे ठायीं - कृत्स्नं चराचरं जगत् म्हणजे सर्व स्था-वर जंगमात्मक विश्व, त्या त्या स्थलीं कोट्यावधि वर्षें भ्रमण केलें तरी जें पाहण्या-स शक्य नाहीं तें आतांच - एकस्थं म्हणजे एके अवयव रूपानें राहिलेलें म्हण-जे माझे नखाग्रीं राहिलेलें असें पाहा आणि याशिवाय जें दुसरें जय कोणास हो-ईल पराजय कोणास होईल अशा संशयाचे निरासासाठीं जें पाहण्यास इच्छि शील तें ही पाहा. अथवा कृत्स्नं - म्हणजे वर्तमान कालचें सर्व जग पाहा आणि दुसरें अतीत म्हणजे गेलेलें आणि पुढें होणारें जग आणि दृष्टी समोरचें जें नव्हे फार लांबचें स्थूल, सूक्ष्म इत्यादिक जें पाहण्यास इच्छिशील तें सर्व पाहा. ॥७॥

## न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा॥ दि-व्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम्॥८॥

जर तुझें विश्वरूप मी पाहण्यास समर्थ होईन तर मला दाखीव असें जें अर्जुन बोलला त्या विषयीं सांगतात. अनेन स्वचक्षुषा मां द्रष्टुं न शक्यसे - म्हण-जे या स्वाभाविक सर्व साधारण चर्मचक्षूनें दिव्यरूपी जो मी यास तूं पाहावयास समर्थ नाहींस यास्तव - ते दिव्यं चक्षुः ददामि - म्हणजे तुला माझें दिव्यरूप पाहा-ण्या जोगें अप्राकृत किंवा ज्ञानरूप चक्षू मी देतों. तेणें करून - मे ऐश्वरं योगं प-श्य - म्हणजे माझें ईश्वर संबंधीं सर्व जगदाधारत्व रूप अघटित घटना करणा-रें अशा सामर्थ्याप्रत पाहा. ॥८॥

## संजय उवाच॥ ॥ एवमुक्त्वा ततो राजन् म-हायोगेश्वरो हरिः॥ दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम्॥९॥ ॥.॥ ॥

असें बोलून भगवंतांनीं आपलें दिव्यरूप अर्जुनास दाखविलें तें दि-

व्यरूप पाहून अर्जुनानें विस्मययुक्त होऊन भगवंताची प्रार्थना केली असें-संजय या श्लोकांनीं धृतराष्ट्रास बोलतो ॥ हे राजन्, एवं उक्त्वा ततः महायोगेश्वरः हरिः - म्हणजे हे राजा धृतराष्ट्रा, तुला दिव्यचक्षू देतों असें बोलून नंतर त्याम्स दिव्य चक्षू देऊन मोठे श्रेष्ठ जे योगी त्यांचा ईश्वर किंवा मोठे योगांचा ईश्वर भक्तांचा क्लेश दूर करणारा भगवान् हरी पाहण्यास अशक्य असें आपलें - परमं ऐश्वरं रूपं पार्थाय दर्शयामास - म्हणजे उत्कृष्ट आपलें ईश्वर संबंधीं मायामय विश्वरूपापर्यंत एकांतभक्त जो अर्जुन त्यास दाखविता झाला. ॥९॥

## अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ॥ अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥ ॥

त्याच रूपाचें वर्णन करतो. अनेक म्हणजे अनंत आहेत मुखें आणि नेत्रें ज्या रूपाचे ठायीं आणि विस्मय करणारे अलौकिक पदार्थ अनंत ज्याचे ठायीं दिसत आहेत असें आणि अनंत आहेत दिव्य भूषणें ज्याचे ठायीं असें आणि दिव्य अनंत चक्रादिक उचललेलीं आहेत आयुधें ज्याचे ठायीं असें ॥१०

## दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनम् ॥ सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥

आणि दिव्य पुष्पांच्या माला हें उपलक्षण करून तशाच दिव्य रत्नांच्या माला आणि दिव्य वस्त्रें यांचें धारण ज्याणें केलें आहे आणि दिव्यचंदन केशरादिकांची उटी ज्यास केली आहे आणि आश्चर्य कारक सर्व पदार्थ ज्यांत भरले-आहेत असें आणि प्रकाशमान आणि ज्यास या देशीं या कालीं आहे या देशीं-या कालीं नाहीं असा देशकालांचा परिच्छेद नाहीं असें आणि सर्वत्र म्हणजे दशदिशेकडे आहेत मुखें ज्यास अशा रूपापर्यंत दाखविता झाला असा पूर्वीचा अन्वय करावा. ॥११॥

## दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ॥ यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥१२॥

दिव्यं - येणें करून जें प्रकाशमय रूप सांगितलें त्याचें स्पष्टीकरण करतात. ॥ दिवि सूर्य सहस्रस्य युगपत् उत्थिता यदि भाः भवेत् - म्हणजे आकाशाचे ठायीं एका कालींच अनंत सूर्यांचा समुदाय उदयापर्यंत पावून त्यांची कांति जर एक कालींच पसर पावेल. तर्हि सा तस्य महात्मनः भासः सदृशी स्यात् - म्हणजे तर ती कांति महात्मा जो विश्वरूप परमेश्वर त्याचे कांतीशीं तुल्य होईल.

नशी जर कांति एककाळीं उत्पन्न होणार नाहीं तरमग भगवंताचे कांतीस उपमा-च नाहीं असें निरुपमत्वा विषयींच तात्पर्य येथें ध्वनित होतें. अशा वर्णनास अभूतोपमारूप अतिशयोक्ति असें अलंकारिक म्हणतात. जें कधीं झालें नाहीं त्याची उपमा देऊन कोणाचें अतिशयोक्तीनें वर्णन करतात. त्यास अभूतोपमारूप अतिशयोक्ति म्हणावें त्यावर्णनाचें फळ वर्णन करावयाचे वस्तूस उपमा नाहीं असें दारवविणें हेंच आहे. ॥१२॥

## तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ॥ अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥१३॥ ॥

या माझे देहाचे ठायीं सर्व जग एका अवयवरूपानें राहिलेलें आहे तें-पाहा असें भगवंतांनीं अर्जुनास सांगितलें त्याप्रमाणें अर्जुनानें पाहिलें असें संजय सांगतो. ॥ तदा पांडवः देवदेवस्य तत्र शरीरे – म्हणजे त्याकाळीं पंडूचा पुत्र-अर्जुन देवांचाही आराध्य देव जो भगवान् त्याचे त्याविश्वात्मक शरीराचे ठायीं ॥ अनेकधा प्रविभक्तं – म्हणजे देवपितर, मनुष्यादिक अनेक रूपानीं युक्त ॥ कृत्स्नंजगत् एकस्थं अपश्यत् – म्हणजे अशा सर्व जगाप्रत तें एके तरवाच्या अग्राचेच ठायीं स्थित आहे असें पाहता झाला. येणेंकरून भगवत्स्वरूपाचे चिंतनाचा जो प्रकार भागवतांत सांगितला आहे तो सूचविला. तो असा – प्रथमतः भगवंताचे चतुर्भुज, पंचमुख, चतुर्मुख. कोणतेही मूर्तीचें चिंतन करण्याचे अभ्यासानें त्यामूर्तीवर मन स्थिर झालें म्हणजे त्या मूर्तीचे दुसऱ्या अवयवांचें चिंतन न करतां सुंदर हास्ययुक्त जें भगवंताचें मुख त्याचेंच चिंतन करावें. तेथें चित्तस्थिर झालें म्हणजे तेथून चित्त काढून अव्यक्त जें भगवंताचें शरीर ज्यास अव्याकृताकाश म्हणतात ज्यापासून हें सर्व जग उत्पन्न होतें यास्तव तें विश्वस्वरूपच आहे त्याचें चिंतन करावें. तेथें मन स्थिर झालें म्हणजे निर्विकल्प स्वरूप जो मी सच्चिदानंदाद्वयपरमात्मा त्याचे स्वरूपाचे ठायीं स्थित होऊन दुसरें कोणाचेंहि चिंतन करूं नये. या प्रकारानें नाना प्रकारच्या भेदानीं विभागामत पावलेल्या परमेश्वराचे स्थूल स्थूल विभूतींचे चिंतनानें तेथें मन स्थिर झाल्यानंतर त्या सर्व विभूती परस्पर विभक्तपणा सोडून सूक्ष्म रूपानें जेथें ऐक्य पावतात. असें जें परमेश्वराचें अव्यक्त विश्वात्मक एकच रूप त्याचें चिंतन करता झाला. तुला दिव्यचक्षु देतों असें जें भगवंतानीं सांगितलें तें स्थूल रूपाचे चिंतनानें अव्यक्त किंवा सूक्ष्म जें एकरूप त्याचें-चिंतन करण्या जोगें मन तुला देतों म्हणजे तुझें मन तसें मी करतों असें तात्पर्य ठेवून सांगितलें. जसें सगुण ब्रह्मोपासना प्रकरणीं त्या सगुण ब्रह्मोपासकांचें मन हेंच दिव्यचक्षु आहे त्या मनोरूप दिव्यचक्षूनें हार्दाकाशांत म्हणजे अव्याकृत ब्रह्मस्वरू

पांत राहणाऱ्या सर्व विषयांस तो पाहतो असें श्रुतीत सांगितलें आहे. तसें-च येथें घ्यावयाचें आहे. कथा पक्षीं स्थूल दृष्टीनें उत्तानार्थ तर लिहिलाच आ-हे आणखी पुढें लिहूं. ॥१३॥

**ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः॥ प्र-णम्यशिरसा देवं कृताञ्जलिरभाषत॥१४॥**

ततः सः विस्मयाविष्टः धनंजयः – म्हणजे तें परमेश्वराचें रूप पाहिल्या-नंतर अत्यद्भुत रूप पाहिल्यामुळें झालेला जो अलौकिक चमत्कार तेणें करून व्या-प्त झालेला महादेवा बरोबर युद्ध करून महादेवास ज्याणें संतोषा प्रत पावविलें अशा प्रभावानें जो प्रसिद्ध तो धनंजय म्हणजे युधिष्ठिराचे राजसूय यज्ञांत, उत्त-र गोग्रहणांत सर्वांस जिंकून ज्यानें धन आणिलें अशा प्रख्यात प्रतापाचा धीर-अर्जुन अथवा अति तेजस्वित्वामुळें केवळ अग्निस्वरूपच तो अर्जुन भगवद्दर्श-नानें झालेले सात्विक भावानें ज्याचे सर्व अंगावर रोमांच उभे राहिले आहेत अ-सा होत्साता – देवं शिरसा प्रणम्य – म्हणजे तो विश्वरूपी जो नारायण त्या प्र-त भक्ति आणि श्रद्धा यांचे अतिशयानें नमस्कार करून कृतांजलिः म्हणजे हा-त जोडून- अभाषत – म्हणजे बोलता झाला. ॥१४॥

**अर्जुन उवाच॥ ॥पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूत विशेषसंघान्॥ ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान्॥१५**

जें भगवंतांनीं मला विश्वरूप दाखविलें तें सर्व लोकांस पाहावयास-अशक्य जरीं आहे तथापि भगवंतांनीं मला दिलेले दिव्य चक्षूनें तें मी पाहिलें-असा आपला अनुभव प्रगट करीत होत्साता अर्जुन बोलतो. ॥ हे देव तव देहे दे-वान् पश्यामि – म्हणजे हे देवा, तुझ्या या विश्वरूप देहाचे ठायीं आदित्य, वसु, रुद्र, अश्विनी कुमार या देवांप्रत मी नेत्रांनीं पाहतों – तथा भूत विशेष संघान् प-श्यामि – म्हणजे आणि जरायुज, अंडज, स्वेदज, उद्भिज असे प्राणी किंवा जं-गमा जंगम सर्व भूतें त्यांच्या समुदायांप्रत पाहतों आणि कमलासनस्थं ब्रह्मा-णं – म्हणजे पृथिवी रूप कमलाची जी मेरूरूप कर्णिका किंवा भोंवरा तिचे ठा-यीं स्थित किंवा भगवंताचे नाभिकमलाचे ठायीं स्थित आणि ईश म्हणजे जगा-चा नियंता जो चतुर्मुख ब्रह्मदेव त्याप्रत नेत्रानीं पाहतों आणि सर्व ब्रह्मपुत्रादि-क ऋषि तसे दिव्य म्हणजे अप्राकृत कैलासादि स्थित वासुकी प्रभृति सर्प-च-शब्दानें पाताळस्थ प्राकृत अनंतादि सर्प यांप्रत पाहतों. ॥१५॥

अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोनं-
तरूपम् ॥ नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि
विश्वेश्वर विश्वरूपं ॥१६॥

अनंत आहेत बाहू, उदरें, मस्तकें आणि नेत्रें ज्यास आणि सर्वत्र आहेत अनंत रूपें ज्याचीं असा जो तूं या प्रत मी पाहतों. परंतु हे विश्वाचे ईश्वरा, हे विश्वस्वरूपा– व्यापकस्वरूपामुळें दीर्घ रज्जू प्रमाणें तुझा शेवट, मध्य आणि आरंभ यांप्रत पाहत नाहीं. ॥१६॥

किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो
दीप्तिमंतम् ॥ पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंता-
द्दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥१७॥ ॥

त्याच परमेश्वराचें पुनः प्रकारांतरानें वर्णन करतो। किरीट, गदा आणि सुदर्शन हीं धारण केलीं आहेत आणि तेजाचा पुंज आणि सर्वत्र ज्याची कांति पडली आहे आणि दिव्य चक्षूं वांचून पाहण्यास जो शक्य नाहीं आणि प्रदीप्त जो अग्नि आणि सूर्य यांच्या कांती प्रमाणें ज्याची कांती आहे आणि एवढा आहे अशी ज्याची इयत्ता होत नाहीं अशा तुजप्रत पाहतों. येणें करून पूर्वोक्त शाखादिक तटस्थ लक्षण जसें चंद्रांचें वास्तविक स्वरूप ज्ञानाला प्रयोजक होतें तसें सगुण ब्रह्मज्ञान निर्गुण ब्रह्म ज्ञानाला प्रयोजक होतें असें सूचविलें. ॥१७॥

त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं नि-
धानं ॥ त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातन-
स्त्वं पुरुषो मतो मे ॥१८॥

या तुझ्या मोठ्या ऐश्वर्यावरून असें मी अनुमान करतों ॥ वेदितव्यं परमं अक्षरं त्वं- म्हणजे अक्षरं ब्रह्म परमं- येणें करून जें मुमुक्षूनीं ज्ञेय निरुपाधिक अक्षर परब्रह्म सांगितलें तें तूंच आहेस. आतां सगुण उपास्य ब्रह्म ही तूंच आहेस असें सगुण रूपाचें वर्णन करून बोलतो ॥ त्वं अस्य विश्वस्य परं निधानं- म्हणजे या सर्व विश्वाचा स्थिति कालीं उत्कृष्ट आश्रय किंवा प्रलय कालीं विश्रांति स्थान तूंच आहेस याच कारणास्तव- त्वं अव्ययः- म्हणजे तूं नाशरहित आहेस आणि - शाश्वत धर्मगोप्ता- म्हणजे वेद प्रतिपाद्य त्यास्तव नित्य जो धर्म- त्याचें पालन करणारा अथवा- हे शाश्वत- म्हणजे नित्यस्वरूप तूं धर्माचें- पालन करणारा आहेस आणि- सनातन- म्हणजे पुरातन जो पुरुष- म्हणजे-

जीव किंवा परमात्मा तो तूंच आहेस असें मी मानतों. ॥१८॥

अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम् ॥ पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदंतपंतम् ॥१९॥ ॥ ॥ ॥

अनादिमध्यांतं — म्हणजे उत्पत्ति, स्थिति, नाश ज्यास नाहींत असा — आणि — अनंतवीर्यं — म्हणजे अनंत आहे प्रभाव ज्याचा असा आणि — अनंतबाहुं — म्हणजे अनंत आहेत हस्त ज्यास असा आणि — शशिसूर्यनेत्रं — म्हणजे चंद्र आणि सूर्य आहेत नेत्र ज्याचे असा आणि — दीप्तहुताशवक्त्रं — म्हणजे प्रदीप्त अग्नीच आहे मुख ज्याचें किंवा प्रदीप्त अग्नि आहे मुखाचे ठायीं ज्याच्या असा — आणि — स्वतेजसाइदंविश्वं तपंतं — म्हणजे आपले तेजानें या विश्वास तापदेणारा जो तूं यांप्रत मी पाहतों. ॥१९॥

द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ॥ दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥२०॥ ॥ ॥ ॥

हे महात्मन् — म्हणजे विश्वरूप देवा, इदं द्यावापृथिव्योः अंतरं सर्वाः दिशश्च एकेन त्वया व्याप्ताः म्हणजे पृथिवी आणि स्वर्ग यांचें हें अंतर म्हणजे मध्यभाग आणि सर्व दिशा तूं एकट्यानें व्यापिल्या आहेत. इदं अद्भुतं उग्रं तव रूपं दृष्ट्वा लोकत्रयं प्रव्यथितं — म्हणजे हें अद्भुत आणि भयंकर तुझें रूप पाहून स्वर्गमृत्यु पाताळ हे तिन्ही लोक व्यथेप्रत पावले आहेत. ॥२०॥

अमी हि त्वा सुरसंघा विशंति केचिद्भीताः — प्रांजलयो गृणंति ॥ स्वस्ती त्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥२१

भूभार संहारकारी परमेश्वराचें रूप पाहून त्रैलोक्याला जी व्यथा झाली ती सांगतों. अमी सुरसंघाः त्वां विशंति — म्हणजे मनुष्य लोकीं भूभार हरणार्थ अवतरले ते हे आदित्यवसु आदिकरून देवांचे समुदाय युद्ध करीत असतां तुझे ठायीं प्रवेश करतात अथवा असुरसंघाः — असा पदच्छेद करून भूभारभूत जे दुर्योधनादिक असुरांचे अंश, त्यांचे समुदाय तुजप्रत प्रवेश करतात. आणि दोन्ही सैन्यांमध्यें पलायन करण्यास असमर्थ असून जे कोणी भीताः म्हणजे भ्याले ते — त्वां प्रांजलयः गृणंति — म्हणजे दूरच उभे राहून अंजलि

पुट जोडून तुझा जय असो आमचें रक्षण कर. अशी तुझी प्रार्थना करतात. किं-
वा तुझी स्तुति करतात. आणि युद्ध उपस्थित झाल्यावर उत्पातादिक वाईट नि-
मित्तें पाहून - स्वस्ति इति उक्त्वा - म्हणजे या जगास कल्याण असो असें बोलू-
न महर्षिसिद्ध संघाः - म्हणजे युद्ध पाहण्यास आलेले नारदादिक महर्षि आ-
णि सिद्ध म्हणजे देव जातींतील पदें ते - पुष्कलाभिः स्तुतिभिः त्वां स्तुवंति - म्ह-
णजे ज्यांत परिपूर्ण अर्थ आहे अशा ज्या तुझ्या गुणवर्णनात्मक स्तुतिरूप वाणी
त्यांहीं करून तुज प्रत स्तवितात. ॥ २१ ॥

**रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ॥ गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥**

आणि तुझा ज्यांवर अनुग्रह आहे ते रुद्र ११ आदित्य १२ वसु ८ साध्य
या नांवाचे देव आणि विश्वे देव आणि देवांचे वैद्य अश्विनी कुमार ज्यांस नास-
त्य दस्र असें म्हणतात. आणि ४९ मरुद्गण - म्हणजे एकुण पन्नास मरुत् या-
नांवाचे देव आणि ऊष्मप म्हणजे उष्ण भक्षण करणारे पितर यास प्रमाण पित-
र उष्मपपि तर आहेत या अर्थाची श्रुति आणि जों पर्यंत अन्न उष्ण आहे आणि
श्राद्धीं बसलेले ब्राह्मण वाग्यत म्हणजे भाषण न करीत होत्साते त्या अन्नाचें भक्षण
करतात. आणि शाक पाकादिक अन्नें फार उत्तम, रुचिकर स्वादिष्ट झालीं आहेत. अ-
शी जों पर्यंत त्या हविरूप अन्नाची स्तुति श्राद्धीं बसलेले ब्राह्मणांनीं केली नाहीं तों-
पर्यंत तें अन्न पितर भक्षितात अशा अर्थाची स्मृति आहे आणि देवांचे गायक -
जे गंधर्व, यक्ष, असुर आणि सिद्ध यांचे समुदाय ते अलौकिक चमत्कार पाहून वि-
स्मयानें युक्त होत्साते तुला पाहतात. ॥ २२ ॥

**रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ॥ बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहं ॥ २३ ॥**

हे महाबाहो - ते महत् बहुवक्त्रनेत्रं बहुबाहूरुपादं - म्हणजे तुझें मो-
ठ्या परिमाणाचें आणि अनंत आहेत मुखें आणि नेत्रें ज्यास आणि अनंत आहेत
हस्त मांड्या पाद ज्यास आणि - बहूदरं बहुदंष्ट्राकरालं - म्हणजे बहुत आहेत उ-
दरें ज्यास आणि बहुत ज्या दाढा त्यांहीं करून भयंकर असें तुझें - रूपं दृष्ट्वा म्ह-
णजे रूपाप्रत पाहून - लोकाः प्रव्यथिताः तथा अहं - म्हणजे सर्वलोक भयानें -
व्यथेप्रत पावले आहेत आणि तसा मी ही भयानें व्यथेप्रत पावलों आहें. ॥ २३

**नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशा-
लनेत्रम् ॥ दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा धृ-
तिं न विंदामि शमं च विष्णो ॥२४॥ ॥**

रूपाला भयंकरत्व कसें त्याचें वर्णन करून त्याचे पाहण्यानें झालेली-आपली व्यथा सांगतो. ॥ नभस्पृशं- म्हणजे स्वर्ग आणि पृथिवी यांचें जें अंतर-त्यास व्यापून राहिलेलें आणि दीप्त म्हणजे प्रज्वलित आणि अनेक वर्ण- म्हणजे रक्तपीतादिक अनेक वर्ण ज्याचे आहेत आणि व्यात्ताननं- म्हणजे पसरलेलीं आहेत मुखें ज्याचीं आणि- दीप्त विशालनेत्रं म्हणजे अग्नी प्रमाणें प्रज्वलित आणि विशाल आहेत नेत्र ज्याचे अशा- त्वां दृष्ट्वा- म्हणजे तुजप्रत पाहून हे विष्णो, विश्वव्यापका देवा- प्रव्यथितांतरात्मा- म्हणजे मोठ्या व्यथेनें युक्त झालें आहे-अंतःकरण ज्याचें असा मी- धृतिं शमं च न विंदामि- म्हणजे धैर्य आणि चित्ताचीस्वस्थता यांप्रत पावत नाहीं. विष्णो- येणें करून तूं व्यापक आहेस. यामुळें तुझे भयंकर रूपानें युक्त देश सोडून पळून जाणें ही संभवत नाहीं असें सुचविलें. ॥२४॥

**दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानल-
सन्निभानि ॥ दिशो न जाने न लभे च शर्म प्रसी-
द देवेश जगन्निवास ॥२५॥ ॥ ॥ ॥**

ते दंष्ट्राकरालानि कालानलसन्निभानि मुखानि दृष्ट्वा- म्हणजे अक्राल विक्राल दाढांनीं जीं भयंकर आणि प्रलय कालचे अग्नी सारखीं तुझीं मुखें त्यांप्रत पाहूनच- दिशः नजानें- म्हणजे दिशांप्रत ही पूर्वही दक्षिण ही उत्तर ही पश्चिम अशा भेदानें मीजाणत नाहीं मला दिशाभूल झाली आहे. आणि-शर्म न लभे- म्हणजे तुझे रूपाचें दर्शन झालें तरी सुख पावत नाहीं. यास्तव हे देवेश, हे जगन्निवास- मी जसा सुख पावेन असा प्रसन्न हो. ॥२५॥

**अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवाऽव-
निपालसंघैः ॥ भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथा-
सौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥२६॥ ॥
वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति दंष्ट्राकरालानि
भयानकानि ॥ केचिद्विलग्ना दशनांतरेषु संदृ-
श्यंते चूर्णितैरुत्तमांगैः ॥ २७॥ ॥ ॥ ॥**

आतां- यच्चान्यत् द्रष्टुमिच्छसि-येणें करून या संग्रामांत पुढें होणारे जे जय पराजय त्यांप्रत माझे देहाचे ठायीं पाहा असें जें भगवंतांनीं सांगितलें-त्याप्रत पाहून होत्साता पांच श्लोकांनीं बोलतो. ॥ अमी धृतराष्ट्रस्य पुत्राः -म्हणजे हे धृतराष्ट्राचे पुत्र युयुत्सु शिवाय सर्व शंभर सोदर बंधु- अवनिपालसंघैः सहैव- म्हणजे पृथिवीचे पालन करणारे जे शल्य प्रभृति राजे त्यांचे समुदायांसहवर्तमान तुजप्रत त्वरेनें प्रवेश करतात. असा पुढील श्लोकांतील क्रियेशीं अन्वय करावा. आणि ज्याविषयीं हे अजेय आहेत अशी सर्वांस संभावना आहे असे भीष्म,द्रोण- तसा हा सूतपुत्र म्हणजे माझा विद्वेष्टा कर्ण, हे आमचे कडील युद्ध करणाऱ्यां मध्यें श्रेष्ठ धृष्टद्युम्न प्रभृति राजांसहूां -दंष्ट्राकरालानि ते मुखानि त्वरमाणा विशंति-म्हणजे दाढांनीं भयंकर अशा तुझ्या मुखांप्रत त्वरेनें युक्त होत्साते प्रवेश करताहेत. पापिष्ट धृतराष्ट्राचे पुत्र तुजप्रत प्रवेश करतात. असें सांगितल्या वरून त्रैलोक्य शरीर भगवंताचे शरीरांत प्रवेश करून त्यांतील त्यांस योग्य जें नरकस्थान त्या प्रतच जातात आणि भीष्मादिक जे भगवद्भक्त ते भगवंताचे मुखांत प्रवेश करतात. असें सांगितल्या वरून दुर्योधनादिक आणि भीष्मादिक यांचे गतींचें वैलक्षण्य (भिन्नत्व) सूचविलें. चूर्णितैः उत्तमांगैः केचित् दशनांतरेषु संलग्नाः दृश्यंते-म्हणजे त्यांतील चूर्ण झालेल्या मस्तकांनीं युक्त कोणी दांतांचे संधींत संलग्न झालेले दिसतात- म्हणजे तेथेंच लोंबतात. २६।२७

**यथा नदीनां बहवोंऽबुवेगाः समुद्रमेवाभिमुखाद्द्रवंति ॥ तथा तवामी नरलोकवीरा विशंति वक्त्राण्यभिविज्वलंति ॥ २८ ॥ ॥ ॥**

प्रवेश कसे करतात, त्याविषयीं दृष्टांत सांगतात. यथा नदीनां बहवः अंबुवेगाः -म्हणजे अनेक मार्गांनीं वाहणाऱ्या नद्यांच्या उदकांचे समुदाय जसे- समुद्रमेव अभिमुखाः द्रवंति-म्हणजे समुद्राप्रत सन्मुख होत्साते प्रवेश करतात. ॥ तथा अमी नरलोकवीराः -म्हणजे तसे हे मनुष्य लोकांतील युद्ध करणारे राजे ॥ अभि विज्वलंतितवक्त्राणि विशंति- म्हणजे आसमंतात् जाज्वल्यमान तुझ्या मुखांप्रत प्रवेश करतात. ॥ २८ ॥

**यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशंति नाशाय समृद्धवेगाः ॥ तथैव नाशाय विशंति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥ ॥ ॥ ॥**

अबुद्धिपूर्वक प्रवेशा विषयीं दृष्टांत सांगून बुद्धिपूर्वक प्रवेशा विषयीं

दृष्टांत सांगतात. ॥ यथा पतंगाः समृद्धवेगाः संतः नाशाय प्रदीप्तं ज्वलनं नविशंति- म्हणजे जसे पतंग मोठ्या वेगानें युक्त होत्साते आपल्या मरणा साठींच बुद्धि पूर्वक प्रदीप्त अग्नींत प्रवेश करतात ॥ तथैव लोकाः समृद्धवेगाः संतः तवापि- अभिविज्वलंति मुखानि विशंति- तसेंच हे सर्व दुर्योधन प्रभृति राजे मोठ्या त्वरेनें युक्त होत्साते जाज्वल्यमान तुझ्या मुखांत आपले मरणा साठीं प्रवेश करताहेत. ॥२९॥

## लेलिह्यसे ग्रसमानः समंताल्लोकान् समग्रान्-वदनैर्ज्वलद्भिः ॥ तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपंति विष्णो ॥ ३०॥ ॥ ॥

भगवन्मुखांत युद्धेच्छु राजांच्या प्रवेशाचा प्रकार सांगून ते वेळचे भगवत्स्वरूपाचा आणि त्याच्या कांतीचा प्रकार सांगतात. ॥समग्रान् लोकान् ग्रसमानः सन् ज्वलद्भिः वदनैः लेलिह्यसे-म्हणजे या प्रमाणें सर्व प्रवेश करणारे दुर्योधनादिक जे लोक त्यांचा ग्रास करीत असतां जाज्वल्यमान मुखांनीं त्यांप्रत चाटितोस. ॥ हे विष्णो तेउग्राः भासः तेजोभिः सर्वजगत् आपूर्य प्रतपंति- म्हणजे हे व्यापक विश्वरूप परमेश्वरा तुझ्या या दीप्ति आपल्या तेजानीं सर्व जगाला व्यापून तापविताहेत. ॥३०॥

## आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोस्तु ते देववर प्रसीद ॥ विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं नहि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥३१॥ ॥ ॥ ॥

भवान् उग्ररूपः कः तत् मे आख्याहि-म्हणजे उग्ररूप तूं कोण आहेस तें मला सांग. ॥ ते नमः अस्तु- म्हणजे सर्व गुरूंचा तूं याला नमस्कार असो. हे देववरप्रसीद-म्हणजे हे देवांतश्रेष्ठा प्रसन्न हो ॥ आद्यं भवंतं विज्ञातुं इच्छामि- म्हणजे जगास आद्य कारण जो तूं या तत विशेष रूपानें जाणावयास मी इच्छितो. मी तुझा सखा जरी आहे तथापि तूं असा किमर्थ प्रवृत्त झाला आहेस हें मी जाणत नाहीं. ॥३१॥

## श्रीभगवानुवाच ॥ ॥ कालोस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ॥ ऋतेऽपि त्वां न भविष्यंति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥३२

या प्रमाणें अर्जुनानें प्रार्थिलेले श्री भगवान् सांगतात् ॥ अहं प्रवृद्धः

लोकक्षयकृत् कालोस्मि – म्हणजे मी क्रियाशक्ती करून उपहित म्हणजे त्या उपाधीनीं युक्त सर्व संहार कर्ता कालरूपी परमेश्वर आहें ॥ इह लोकान् समाहर्तुं प्रवृत्तः ॥ म्हणजे या संग्रामाचे ठायीं दुर्योधनादिक सर्व योध्यांचा संहार करण्यासाठीं प्रवृत्त झालों आहें – त्वां ऋतेपि सर्वे न भविष्यंति – म्हणजे युद्ध करणाऱ्या तुझ्या युद्धरूप व्यापारा वांचून ही हे सर्व भीष्मादिक आणि शत्रु सैन्याचे ठायीं जे युद्धार्थ उभे राहिले आहेत ते सर्वही कालरूपी जो मी याणें मारल्या प्रमाणेंच आहेत ते मरण पावतील. यांचा मारण्या विषयीं तुझा व्यापार निरर्थक आहे. ॥३२॥

तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुंक्ष्व राज्यं समृद्धम् ॥ मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥ ॥

तस्मात् त्वं उत्तिष्ठ यशः लभस्व – म्हणजे या कारणास्तव तूं युद्धार्थ उठून देवानीं ही जिंकण्यास अशक्य असे जे भीष्म द्रोणादिक अतिरथि यांस अर्जुनानें जिंकलें असें यश संपादन कर आणि – शत्रून् जित्वा समृद्धं राज्यं भुक्ष्व – म्हणजे दुर्योधनादिकांस जिंकून ज्यांत शत्रु नाहींत असें किंवा धन धान्य समृद्ध अशा राज्याचा उपभोग कर. एते मयैव निहताः हे सव्यसाचिन् त्वं निमित्तमात्रं भव – म्हणजे काल रूपी जो मी ईश्वर याणें युद्धा पूर्वींच हे सर्व तुमचे शत्रू मारले आहेत. वाम आणि दक्षिण या दोहों हातांनीं बाण संधान किंवा लक्ष्य वेध करण्याचा ज्याचा स्वभाव आहे अशा हे अर्जुना या युद्धांत या शत्रूंचे नाशाविषयीं तूं निमित्तमात्र हो. ॥३३॥

द्रोणंच भीष्मंच जयद्रथंच कर्णं तथाऽन्यानपि योधवीरान् ॥ मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युद्ध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥ ॥

भीष्मं, द्रोणं, जयद्रथं, कर्णं, तथा अन्यानपि योध मुख्यान् मयाहतान् त्वं जहि – म्हणजे तुला ज्या विषयीं शंका आहे ते हे भीष्म, द्रोण आणि जयद्रथ तसाच कर्ण व दुसरे युद्ध करणारांत मोठे मोठे आहेत ते काल रूपी जो मी याणें मारलेच आहेत, यां प्रत तूं जिंक. मा व्यथिष्ठाः – म्हणजे मारलेल्यास मारण्याचा श्रम नाहीं यास्तव मी यांस मारण्यास कसा समर्थ होईन अशा भीती मुळें व्यथेप्रत पावूंनको – युद्ध्यस्व – म्हणजे युद्ध कर. रणे सपत्नान् जेतासि – म्हणजे संग्रामाचे ठायीं सर्व शत्रूंस तूं जिंकणारा आहेस किंवा होशील. द्रोणंच भीष्मंच-

जयद्रथंच – या तीन चकारांनीं पूर्वोक्त अजेयत्व शंकेचा अनुवाद(सिद्धार्थीचें कथन) केला आणि पुढील तथा शब्दानें आणि अपि शब्दानें त्या शंकेचा अनुवाद केला. ॥३४॥

**संजय उवाच॥ ॥एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी॥ नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य॥३५॥**

तदनंतर काय झालें तें संजय धृतराष्ट्रास सांगतो. ॥ एतत् केशवस्य वचनं श्रुत्वा – म्हणजे या प्रमाणें पूर्वोक्त कृष्णाचें वचन ऐकून ॥ वेपमानः किरीटी – म्हणजे देवांचे शत्रू जे निवात कवचादिक त्यांस स्वर्ग लोकीं गेल्यावर अर्जुनानें मारल्यावर इंद्र प्रसन्न होऊन ज्याचे मस्तकावर इंद्रानें किरीट घातला तो – अर्जुन कंपायमान होत्साता ॥ कृतांजलिः कृष्णं नमस्कृत्वा – म्हणजे हस्ताचा अंजलिपुट करून भक्ताचे पापाचें आकर्षण करणाऱ्या कृष्णाप्रत नमस्कार करून ॥ भीत भीतः प्रणम्य सगद्गदं भूय एव आह – म्हणजे भयभीत होत्साता पुनः ही नम्र भावानें नमस्कार करून गद्गद स्वर ज्यांत आहे अशा वाक्यांप्रत पुनः कृष्णाप्रत बोलता झाला. भयानें किंवा हर्षानें नेत्रास अश्रू येऊन कफानें कंठ अवरुद्ध झाला म्हणजे वाणीला जो मंदत्व आणि कंप युक्तत्व विकार होतो त्यास गद्गद स्वर म्हणतात. ॥३५॥

**अर्जुन उवाच॥ ॥स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च॥ रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः॥३६॥**

अर्जुन अकरा श्लोकांनीं बोलतो. हे हृषी केश तव प्रकीर्त्या जगत् प्रहृष्यति तत्स्थाने – म्हणजे हे सर्वेंद्रिय प्रेरका कृष्णा, तूं अत्यंत अद्भुत प्रभावाचा आहेस आणि भक्त वत्सल आहेस अशा तुझ्या उत्कृष्ट कीर्तीनें जगहर्ष पावतें तें युक्तच आहे. आणि अनुरज्यतेच – म्हणजे तुझ्या नामसंकीर्तनें करून जगत् तुझ्याठायीं निरतिशय प्रेम करतें तें ही युक्तच आहे. आणि रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति तत्स्थानें – म्हणजे तुझ्या नामसंकीर्तनें करून राक्षस भयभीत होत्साते दशदिशां कडे पळतात. तें ही युक्तच आहे. आणि– सर्वे सिद्ध संघाः नमस्यंति तत् स्थानें – म्हणजे सर्व कपिल मुन्यादिक सिद्धांचे समुदाय तुला नमस्कार करतात, तें युक्तच आहे. हा श्लोक रक्षोघ्न मंत्र म्हणून मंत्र शास्त्रांत जो प्रसिद्ध – आहे तो नारायणाष्टाक्षर मंत्र आणि सुदर्शनास्त्र मंत्र यांहीं करून युक्त करू-

न जपावा म्हणजे राक्षसादिकांचा नाश होतो. नारायणाष्टाक्षर मंत्र प्रसिद्धच आहे. सहस्रारहुं फट् स्वाहा हा सुदर्शनास्त्रमंत्र. ॥३६॥

**कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे॥ अनंत देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत्॥३७॥**

ते सिद्ध समुदाय माझ्रे प्रमाणें हजारों ब्रह्मांडें उत्पन्न करण्यास समर्थ असतां ते मला कां नमस्कार करतात. त्या विषयीं बोलतो.॥ हे महात्मन् गरीयसे ब्रह्मणोपि आदिकर्त्रे ते कस्मान्न नमेरन्॥ म्हणजे हे परमोदार चित्ता सर्वांचा स्त्रष्टा जो ब्रह्मदेव त्याचाही जो आदिकर्ता सर्वांहून मोठा तूं या प्रत ते सिद्ध कां नमस्कार करणार नाहींत. तात्पर्य- तूं नित्य सिद्ध आहेस ब्रह्मदेवादिक तुझ्या उपासनेनें सिद्ध होऊन तुझ्या आज्ञें करूनच जगाचें निर्माण करते होतात या कारणास्तव- हे अनंत, हे देवेश, हे जगन्निवास,- म्हणजे देशकालांचा परिच्छेद ज्यांस नाहीं. सर्व देवांचा ही जो नियंता सर्व जगाचें राहण्याचें जें स्थान अशा परमेश्वरा तूं- सत् असत्- म्हणजे आहे असें विधिमुखानें जें भासतें आणि नाहीं असें जें निषेधमुखानें भासतें तें तूं अथवा सत् म्हणजे व्यक्त झालेलें कार्य आणि असत् म्हणजे प्रलयकालीं कारणभूत सूक्ष्म रूपानें राहिलेलें कारण तें तूं- आणि तत्परं- म्हणजे त्या सताहून आणि असताहून ही सूक्ष्म म्हणजे मूलकारण तें तूं म्हणजे कार्य आणि कारण यांहून निराळें अक्षरं म्हणजे अक्षर ब्रह्म तूं आहेस, तुझे सत्तेनें सर्व आहे. अशा व्यवहारास आलें आहे तुझे सत्तेवांचून दुसरी सत्ता नाहीं असें तात्पर्य. ॥३७॥

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम्॥ वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप॥३८॥**

पुनः स्तव करतो. त्वं आदिदेवः- म्हणजे सर्वांची सृष्टी करणारा- तूं आदिदेव आहेस.- पुराणः पुरुषः- म्हणजे सर्व जीवांचे शरीरांत शयन करणारा आणि त्या शरीरांच्या नाशानें ज्याचा नाश नाहीं असा तूं नित्य पुरुष आहेस.- त्वं अस्य विश्वस्य परं निधानं- म्हणजे तूं या विश्वाचे प्रलयकालीं विश्रांति स्थान आहेस. हें विश्व तुझेच ठायीं प्रलय पावतें या प्रमाणें उत्पत्ति आणि लय यांचें कारणत्व सांगून ब्रह्माला जगाचें उपादान कारणत्व सांगितलें. आतां घटादिकांस उपादान कारण मृत्तिके पेक्षां निमित्त कारण चेतन कर्ता कुलाल (कुं-

भार ) जसा आहे त्या प्रमाणें या जगास उपादान कारण ब्रह्म पेक्षा भिन्न निमित्त कारण दुसरा कर्ता आहे कीं काय अशी शंका होऊं नये या साठीं कर्तृत्व रूप निमित्त कारणत्वही ब्रह्मालाच सर्वज्ञेश्वर रूपानें सांगतात. त्वं वेत्तासि - म्हणजे सर्व जगाचा ज्ञाता तूंच आहेस. जो ज्ञाता तोच कर्ता असतो तर जग निराळें त्याचा जाणणारा निराळा असें द्वैत आहे कीं काय अशा शंकेनें निवारण करतात. वेद्यंच - म्हणजे जाणावयाचें जग तूंच आहेस. वेदन रूप जो तूं अधिष्ठान त्याचे ठायीं सर्व कल्पिलें आहे या मुळें अधिष्ठान भूत तुझे सत्ते शिवाय निराळी सत्ता नाहीं. तुझे सत्तेनेंच हें अस्ति अशा व्यवहारास पात्र आहे आणि परंच - धाम - म्हणजे वेद्य आणि वेत्ता यांहून निराळें शुद्ध अद्वितीय चैतन्यात्मक मुक्त प्राप्य ब्रह्म तूं आहेस. हे अनंतरूप - म्हणजे त्रिविध परिच्छेद रहित स्वरूपा देवा ॥ त्वया इदं विश्वं ततं ॥ म्हणजे तूं आपले सत् आणि चित् रूप यांचे योगानें हें सर्व जग - अस्ति - भासते अशा व्यवहारास योग्य केलें आहेस. ॥ ३८

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ॥ नमो नमस्तेऽस्तु सहस्त्रकृत्वः पुनश्च भूयोपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥ ॥**

आतां सर्व देवता स्वरूपानें भगवंताची स्तुति करितो. वायु, यम, अग्नि, वरुण शशांक (चंद्र), हें उपलक्षण करून सूर्यादिक आणि प्रजापति - म्हणजे विराट् आणि हिरण्यगर्भ आणि हिरण्यगर्भाचाही पिता सर्वांचा पितामह तूं आहेस यास्तव सर्वांस ही तूं नमस्कार करण्यास योग्य सर्वात्मक आहेस यास्तव तुला हजारवेळ मी नमस्कार करतों आणि पुनः पुनः नमस्कार करतों. नमस्काराच्या आवृत्तींनीं श्रद्धातिशय सूचविला. ॥ ३९ ॥

**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोस्तु ते सर्वत एव सर्व ॥ अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥ ॥ ॥ ॥**

हे अनंतवीर्य अमितविक्रमः त्वं यतः सर्वं समाप्नोषि ततः सर्वः असि - म्हणजे अनंत आहे शारीरबल ज्यानें अशा परमेश्वरा अपरिमित आहे युद्ध-शिक्षा शास्त्र कौशल्यादिक ज्यानें असा तूं एके सद्रूप स्फूर्ति रूपानें या सर्व जगास सत्ता स्फूर्ति व्यवहारास्पद करतोस यास्तव तूं सर्व स्वरूपच आहेस तुझे-वांचून दुसरी सत्ता नाहीं यास्तव कर्माचे आरंभीं आणि त्यांचे समाप्तीचे ठायीं अथवा सर्वांचे आरंभीं अंतीं राहणारा जो तूं यास नमस्कार असो. अथवा

तुला पूर्वभागीं आणि पृष्ठभागीं नमस्कार असो. हे सर्व स्वरूप सर्वज्ञ एव म्हणजे तुला सर्व देशीं नमस्कार असो. अथवा सर्वदिशांचे ठायीं राहणारा जो तूं यास नमस्कार असो. एकं प्राणाधिकं मन्ये अपरं शिक्षयाधिकं - यांन सांगितल्या प्रमाणें भीम बलें करून अधिक दुर्योधन युद्ध शिक्षा शास्त्र कौशल्यानें अधिक असें वीर्य किंवा पराक्रमादिक एकेकास जसें आहे त्या प्रमाणें परमेश्वर नाहीं. तर अनंत वीर्य अनंत पराक्रम आहे असें अनंतवीर्यामित विक्रमः यापदानें सूचविलें. ॥४०॥

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ॥ अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥ ४१ ॥ ॥ ॥**

अशी स्तुति करून आपण केलेले अपराधांची क्षमा मागतो. तव इदं महिमानं अजानता - म्हणजे तुझ्या या विश्वरूपात्मक महिम्याप्रत न जाणणारा जो मी याणें तूं माझ्या समान वयस्क सखाच आहेस असें मानून प्रसभं - म्हणजे आपला उत्कर्ष दाखवून तुझा पराभव केल्या प्रमाणें. हे कृष्ण, हे यादव हे सखेति - म्हणजे अरे कृष्णा, अरे यादवा, अरे माझ्या सख्या, असें जें मी तुला - प्रमादात् प्रणयेन वा यत् उक्तं - म्हणजे असावधपणानें किंवा चित्ताचे विक्षेपानें अथवा स्नेहें करून जें काय तुला बोललों. ॥४१॥

**यच्चावहासार्थमसत्कृतोसि विहारशय्यासनभोजनेषु ॥ एकोथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥ ॥ ॥**

आणि विहार शय्यासन भोजनेषु - म्हणजे क्रीडा करतांना किंवा फिरतांनां एके शय्येवर निजतांनां किंवा सिंहासनावर बसतांनां किंवा पंक्तींत भोजन करतांनां, एकः अथवा तत्समक्षं म्हणजे मित्रां वांचून एकांतस्थलीं तूं आणि मीच असतांनां अथवा मित्रां समक्ष सर्व हसत असतांनां, अवहासार्थं म्हणजे थट्टा मस्करीनें. यत् असत्कृतोसि - म्हणजे जो काय तुझा मी असत्कार म्हणजे अपमान केला असेल किंवा असत्कारा प्रमाणें भाषण बोललों असेन त्या सर्वापराधांची अप्रमेयं त्वां क्षमापये - म्हणजे अचिंत्य प्रभाव जो तूं यापाशीं मी क्षमा मागतों. अचिंत्य प्रभाव तूं निर्विकार आणि करुणा समुद्र आहेस यास्तव तुझ्या माहात्म्याप्रत न जाणणारा जो मी याचे सर्वापराधांची क्षमा करण्यास तूं योग्य आहेस. ॥४२॥

**पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्य-श्च गुरुर्गरीयान् ॥ न त्वत्समोस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेप्यप्रतिमप्रभाव: ॥४३॥**

भगवंताच्या अचिंत्य प्रभावाचेंच वर्णन करतो. अस्य चराचरस्य लोकस्य त्वं पिता असि - म्हणजे सर्व चराचर विश्वाचा तूं पिता आहेस. यास्तव आमच्या शिशूंचा अपराध क्षमा करावा. हें तुला योग्यच आहे. पूज्यः गरीयान् गुरुश्च म्हणजे आणि सर्वेश्वरत्वास्तव तूं पूज्य आहेस आणि ब्रह्मदेवासही वेदोपदेश तूं केलास यामुळें अतिशयित श्रेष्ठ सर्वांचा तूं गुरुरूप आहेस. यास्तव अप्रतिम प्रभाव: न त्वत्समः अन्यः कोपि - म्हणजे तुझ्यासारखा अचिंत्य प्रभाव कोणी दुसरा नाहीं, मग - कुतः अभ्यधिकः - म्हणजे तुझ्याहून अधिक कोठून असेल असें तात्पर्य. ॥४३॥

**तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ॥ पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुं ॥ ४४ ॥**

तस्मात् कायं प्रणिधाय प्रणम्य म्हणजे या कारणास्तव शरीर भूमीवर दंडाप्रमाणें ठेवून आणि नमस्कार करून - ईड्यं ईशं त्वां प्रसादये - म्हणजे सर्वांस स्तुति करण्यास योग्य जो तूं ईश्वर त्या तुज मी अपराधी प्रसाद मागतों. पिता पुत्रस्येव म्हणजे पुत्राचा अपराध पिता जसा पोटांत घालतो. सख्युः सखेव - म्हणजे सख्याचा अपराध जसा सखा पोटांत घालतो. प्रियायाः प्रिय इव - म्हणजे पतिव्रता जी आपली प्रियपत्नी तिचा अपराध जसा पति पोटांत घालतो त्या प्रमाणें देवा माझ्या अपराधाची क्षमा करून माझा अपराध - आपले पोटांत घालण्यास तूं योग्य आहेस. ॥ ४४ ॥

**अदृष्टपूर्वं हृषितोस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ॥ तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥ ॥ ॥ ॥**

या प्रमाणें भगवंताची स्तुति करून आपल्यास जें इष्ट आहे त्याविषयीं प्रार्थना करतो. अदृष्टपूर्वरूपं दृष्ट्वा हृषितोस्मि - म्हणजे कधीं ही न पाहिलेलें अशा या विश्वरूपा प्रत पाहून मी हृष्ट म्हणजे संतोषी किंवा हर्षित झालों.

आणि - भयेन मे मनः प्रव्यथितं - म्हणजे विलून भयंकर रूप पाहिल्यानें जें भय झालें तेणें करून माझें मन व्यथें प्रत पावलें आहे. हे देव तदेव रूपं मे दर्शय म्हणजे देवा तुझें प्राणापेक्षां ही मला प्रिय असें जें तुझें पूर्वींचें चतुर्भुज श्रीकृष्ण रूप तें मला दाखीव. हे देवेशा प्रसन्न हो, हे जगन्निवासा प्रसन्न हो. ॥४५

## किरीटिनं गदिनं चक्रहस्त मिच्छामि त्वां द्रष्टु-मह तथैव ॥ तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्त्र बाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥ ॥ ॥

त्या पूर्वीच्या रूपानेंच वर्णन करतो ॥ किरीटिनं - म्हणजे ज्याचे मस्तकावर किरीट आहे. गदिनं चक्रिणं - म्हणजे ज्याच्या हातांत कौमोदकी गदा आणि सुदर्शन चक्र आहे आणि - तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतं - म्हणजे जो तेजाचा केवळ पुंजच आहे आणि सर्वत्र ज्याची दीप्ति म्हणजे कांति पसरली आहे. अशा त्वां - म्हणजे तुजप्रत.- तेनैव म्हणजे चतुर्भुजेन रूपेण द्रष्टुं इच्छामि - म्हणजे पूर्वीच्या चतुर्भुज रूपानेंच मी पाहण्यास इच्छितो. हे सहस्त्र बाहो विश्वमूर्ते - तेनैव रूपेण युक्तो भव - म्हणजे हे अनंत हस्त हे विश्वरूप त्या चतुर्भुजादिक सौम्य पूर्वीच्या रूपानें युक्त हो. येणें करून भगवंताचें चतुर्भुज रूप अर्जुनास सदा दृष्टिगोचर होतें असें होतें. ॥४६॥

## श्रीभगवानुवाच ॥ ॥ मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ॥ तेजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥४७॥

याप्रमाणें अर्जुनानें प्रार्थिलेले भगवान् प्रसन्न होऊन अर्जुन भय पावला. आहे असें पाहून तत्कालीं उचित वचनानें त्याचें आश्वासन करीत होत्साते बोलतात. हे अर्जुन, ॥ प्रसन्नेन मया आत्मयोगात् - म्हणजे हे अर्जुना, तुजविषयीं अतिशय कृपा ज्यास उत्पन्न झाली आहे असा जो मी त्याणें आपले असाधारण सामर्थ्यानें ॥ तव इदं रूपं दर्शितं - म्हणजे तुला हें मी आपलें विश्वरूप दाखविलें तें रूप कसें तें सांगतात. ॥ तेजोमयं चिन्मयं, विश्वं - अनंतं - म्हणजे तेजःपुंज, ज्ञानरूप, सबाह्याभ्यंतर व्यापक आदि अंत रहित - आणि - त्वदन्येन न दृष्टपूर्वं - म्हणजे तुजवांचून दुसऱ्यानीं कधीं पूर्वीं पाहिलें नाहीं. ॥४७॥

## न वेद यज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ॥ एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्ये

न कुरुप्रवीर ॥ ४८ ॥ ॥ ॥ ॥ ॥

हें रूप उपासनात्मक योगानेंच जाणण्यास योग्य आहे. जे कर्मी-आहेत त्यांस दुर्मिळ आहे असें सांगतात. ॥ वेदयज्ञाध्ययनैः म्हणजे चारही वेदांच्या गुरूपासून अक्षरग्रहणात्मक जें अध्ययन आणि मीमांसा कल्पसूत्राचे द्वारा वेद बोधित-म्हणजे वेदांनीं प्रतिपादन केलेले जे यज्ञ म्हणजे कर्मे त्यांचा जो विचार तद्रूप जें यज्ञाध्ययन तेणें करून आणि दानैः तुला पुरुषादिक जीं महादानें तीहीं करून आणि तपोभिः उग्रैः-म्हणजे कृच्छ्र चांद्रायणादिक जीं उग्र-म्हणजे शरीर शुष्क करणारीं दुष्कर तपें तीहीं करून ॥ एवं रूपः अहं-म्हणजे तूं जसा पाहिलास तसा विश्वरूप मी- नृलोके हे कुरु प्रवीर त्वदन्येन द्रष्टुं न शक्यः-म्हणजे या मनुष्य लोकाचे ठायीं हे कुरुकुलश्रेष्ठा वीरा अर्जुना, तुज वांचून दुसऱ्यानीं पाहण्यास मी शक्य नाहीं. ॥ ४८ ॥

मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ॥ व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥

तुजवर अनुग्रह करण्यासाठीं तुला प्रगट केलेलें रूप पाहून जर तुला व्यथा होत असेल तर त्याचा उपसंहार मी करतों असें सांगतात. ॥ ईदृक् मम-घोर रूपं दृष्ट्वा-म्हणजे याप्रकारचें माझें उग्र रूप पाहून-ते व्यथा मा विमूढभावश्च माभवतु-म्हणजे यारूप दर्शनानें झालेल्या भयामुळें तुला व्यथा नसो-आणि व्याकुल चित्तत्व किंवा असंतोष तुला नसो. ॥ व्यपेत भीः प्रीतमनाः त्वं-म्हणजे ज्याची भीती गेली आहे आणि ज्याचें मन प्रीतीनें युक्त आहे असा होत्साता तूं ॥ तदेव मे रूपं इदं प्रपश्य-म्हणजे तेंच माझें हें चतुर्भुजादि युक्त रूप संतोषानें पाहा. ॥ ४९ ॥

संजय उवाच ॥ ॥ इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ॥ आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥

संजय धृतराष्ट्राप्रत बोलतो ॥ वासुदेवः इति अर्जुनं उक्त्वा-म्हणजे वसुदेव पुत्र भगवान् कृष्ण अर्जुनाप्रत याप्रमाणें बोलून ॥ तथा स्वकं रूपं भूयः दर्शयामास-म्हणजे पूर्वीं जसें होतें तसें आपलें स्वकीय किरीट मकर कुंडल गदा चक्रादियुक्त चतुर्भुज आणि श्री वत्स कौस्तुभ वनमाला पीतांबर यां-

हीं शोभायमान असें रूप पुनः दाखविता झाला. ॥ महात्मा पुनः सौम्यवपुः भूत्वा - म्हणजे आणि भयंकर विश्वरूपी पुनः सौम्यवपु होऊन ॥ भीतं एनं आश्वासयामास - म्हणजे भयभीत झालेल्या अर्जुनाप्रत आश्वासन देता झाला. ॥५०

**अर्जुन उवाच ॥ ॥ दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ॥ इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥ ॥ ॥ ॥ ॥**

नंतर अर्जुन निर्भय होत्साता बोलतो ॥ हे जनार्दन, इदं सौम्यं मानुषं तव रूपं दृष्ट्वा - म्हणजे तुझ्या त्या मनुष्याकृतीच्या सौम्य रूपाप्रत पाहून ॥ इदानीं प्रकृतिं गतः सचेताः संवृत्तः अस्मि - म्हणजे आतां भयामुळें झालेल्या व्यथेनें रहित स्वस्थ आणि भयानें झालेला व्यामोह जाऊन अव्याकुल चित्त मी झालों आहें. ॥५१॥

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ॥ देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ ५२ ॥ ॥ ॥ ॥**

आपण केलेला अनुग्रह फार दुर्लभ आहे असें च्यार श्लोकांनीं सांगत असतां भगवान् बोलतात. ॥ यत् मम रूपं त्वं दृष्टवान् - म्हणजे जें माझें विश्वरूप तूं पाहाता झालास. ॥ इदं सुदुर्दर्शं - म्हणजे हें पाहण्यास फार अशक्य आहे. कारण - देवा अपि अस्य रूपस्य नित्यं दर्शन कांक्षिणः संति - म्हणजे या रूपाचें दर्शन व्हावें अशी देवही निरंतर इच्छा करतात. नित्यं - येणें करून त्याणीं पूर्वीं कधीं ही हें रूप पाहिलें नाहीं आणि माझे अनुग्रहा शिवाय पुढें ही पाहणार नाहींत असें सूचविलें. ॥५२॥

**नाहं वेदैर्नतपसा न दानेन न चेज्यया ॥ शक्य एवं विधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥**

ज्या प्रमाणें मला विश्वरूपानें तूं पाहता झालास त्या प्रमाणें मी वेदाध्ययनानें - तपानें - दानानें - यज्ञानें पाहण्यास अशक्य आहें ॥ नवेदयज्ञाध्ययनैः - या श्लोकानेंच हा गतार्थ आहे तथापि तोच अर्थ पुनः माझें विश्वरूप दर्शन परम दुर्लभ आहे याचे दृढी करणासाठीं सांगितला. ॥५३॥

**भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ॥**

ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४ ॥

तर कोणत्या उपायानें तूं पाहण्यास शक्य आहेस तें सांगतात. हे-अर्जुन, हे परंतप, शत्रूंस तापदेणाऱ्या अर्जुना, - अनन्यया भक्त्या ॥ म्हणजे अव्यभिचारी माझे ठायीं निरतिशय प्रीति रूप जी भक्ती तीणें करून ॥ एवंविधः अहं - म्हणजे या प्रकारचें दिव्यरूप धारण करणारा मी ॥ ज्ञातुं - म्हणजे परोक्षत्वें करून शास्त्रें करून जाणावयास आणि द्रष्टुं तत्त्वेनशक्यः - म्हणजे वेदांत वाक्य श्रवण मनन निदध्यासनाचे परिपाकानें ब्रह्मात्मत्वें करून जें साक्षात्कारात्मक ज्ञान तेणें करून पाहण्यास योग्य आहें ॥ आणि प्रवेष्टुंच - म्हणजे ब्रह्मात्मत्व साक्षात्कारा नंतर अज्ञान आणि त्यानें कार्य यांचा नाश झाला असतां तद्रूपत्वें करून माझेच ठायीं प्रवेश करण्यास शक्य आहें. ॥ ५४ ॥

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ॥ निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥ ॥
इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शन योगो नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥ ॥

आतां सर्व गीताशास्त्राचा सारभूत आणि ज्याचें अनुष्ठान कल्याणाश्र्यानें करावयाचें असा जो अर्थ तो एकत्र गोळा करून सांगतात. - मत्कर्मकृत् - म्हणजे माझे परमेश्वराचेच उद्देशानें विहित कर्म करणारा, स्वर्गादिक कामना असेल तर हें घडणार नाहीं यास्तव सांगतात. मत्परमः - म्हणजे मीच आहें परम म्हणजे प्राप्यत्वें करून निश्चित ज्यास स्वर्गादिकास जावें अशी इच्छा नाहीं याच कारणानें मद्भक्तः म्हणजे सर्व प्रकारांनीं मद्भक्तजन परायण स्त्री-पुत्रादिकांवर स्नेह असल्यास असें कसें घडेल या विषयीं सांगतात. ॥ संगवर्जितः - म्हणजे बाह्य अनात्मवस्तु विषयक स्नेह ज्यास नाहीं आणि - सर्वभूतेषु निर्वैरः - म्हणजे आपणावर ज्याणें अपकार केला आहे त्याचे ठायीं ही - द्वेष रहित असा जो तो - हे पांडवा - म्हणजे पंडु पुत्रा अर्जुना ॥ मां प्रति म्हणजे अभेदानें भजन येतो म्हणजे मद्रूपच होतो. ॥ ५५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथ शास्त्रि कृत भाषाविवृत्तौ एकादशो ध्यायः समाप्तः ॥ ११ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीः ॥

अध्याय १२ वा.

**अर्जुन उवाच ॥ ॥ एवं सततयुक्ता ये भक्ता-स्त्वां पर्युपासते ॥ ये चाऽप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥ ॥ ॥ ॥**

सप्तमाध्यायापासून एतावत् पर्यंत महावाक्यांतील तत्पदाचा वाच्यार्थ जो जगदुत्पत्तिस्थितिलयकारण मायोपाधिक परमेश्वर त्याचें निरूपण केलें. आतां तत्पदार्थ शोधनरूप उपासना कांडाची समाप्ति या अध्यायांत करीत असतां-अर्थात विवक्षित (ग्रान्थ) प्रधानभूत जो निरुपाधिक परब्रह्म स्वरूप लक्ष्यार्थ-आणि त्यास जाणणारे जे ब्रह्मवेत्ते त्यांचीं लक्षणें ही दाखविनात. मच्छब्दें करून लोक बुद्ध्यनुसार तत्पद वाच्यार्थ सगुण परमेश्वराचें ही उपासन दाखवितात. पूर्वाध्यायांतीं - मत्कर्मकृत् मत्परमः - येणें करून माझें भजन करणारा मजप्रत येतो असें सांगितलें. तेथें मच्छब्दें करून निराकार निरुपाधिक निर्गुण ब्रह्म समजावें किंवा साकार सगुण ब्रह्म समजावें "बहूनां जन्मनामंते ज्ञानवान् मां प्रपद्यते" या श्लोकांत निराकार निर्गुणब्रह्मावर मच्छब्दाचा प्रयोग केला आहे, आणि विश्वरूप दाखविल्यानंतर "नाहं वेदैर्न तपसा" या श्लोकांत साकारसगुण ब्रह्मावर ही मच्छब्द प्रयोग केला आहे यास्तव संशय होतो. ॥ उभयविध ब्रह्माचा उपदेश जो तूं केलास तो अधिकारि भेदानेंच केलास असें म्हटलें पाहिजे नाहींतर विरोध येईल. तेव्हां मुमुक्षु जो मी यानें निराकार वस्तूचेंच चिंतन करावें किंवा साकार सगुण वस्तूचें चिंतन करावें यांतून आपणास कोणता अधिकार आहे असा आपले अधिकाराचा निर्णय होण्यासाठीं अर्जुन प्रश्न करतो. एवंसततयुक्ताये भक्ताः त्वां पर्युपासते - म्हणजे "मत्कर्मकृत् मत्परमः" येणें करून पूर्वाध्यायाचे अंतीं सांगितले प्रकारानीं निरंतर भगवंताचे कर्मादिका विषयीं सावधान मनस्क होऊन प्रवृत्त झालेले भक्त साकार भगवत् वस्तूसच शरण झाले होत्साते साकार सगुण जो तूं परमेश्वर याची निरंतर चिंतनात्मक उपासना करतात. आणि - येचाऽप्यक्षरं अव्यक्तं पर्युपासते - म्हणजे जे सर्वत्र विरक्त होऊन सर्व कर्मांचा त्याग करून - हे गार्गि, जें स्थूल नव्हे, जें अणु नव्हे, जें दीर्घ नव्हे, जें ऱ्हस्व नव्हे त्यास ब्रह्मवेत्ते ब्राह्मण अक्षर ब्रह्म म्हणतात. अशा अर्थाच्या श्रुतींत सांगितलेलें सर्वोपाधि रहित निर्गुण अतएव सर्व इंद्रियादिकांस अगोचर निराकार सद्रूप ब्रह्म त्याची उपासना करतात. तेषां - म्हणजे हे दोघेही योग म्हणजे भगवच्चिंतन रूप समाधीप्रत जाणणारे आहेत परंतु त्या दोहोंमध्यें - के योगवित्तमाः - म्हणजे श्रेष्ठ योगी कोण आहेत. या द्विविध योग्यांच्या किंवा उपासकांच्या

उपासनेंतील कोणते उपासनेचें मी अनुष्ठान करावें असें तात्पर्य. ॥ १॥

**श्रीभगवानुवाच॥ ॥ मय्यावेश्य मनो ये मां-नित्ययुक्ता उपासते ॥ श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २॥ ॥ ॥ ॥**

निर्गुण वस्तु दुष्प्राप्य आहे असें सांगतात यावरून त्यास श्रेष्ठत्व आहे असें समजून अर्जुनास सगुण ब्रह्मोपासने विषयींच अधिकार आहे असें पाहून त्याणें किंवा त्या समान दुसऱ्या अधिकाऱ्यानें सगुण ब्रह्मोपासनच करावें असें भगवंतास सांगावयाचें आहे आणि अधिकारि भेदानें द्विविध उपासनेचीं साधनें ही सांगावयाचीं आहेत त्यांत प्रथम सगुण ब्रह्म विद्येवर म्हणजे उपासनेवर अभिरुची व्हावी यास्तव सगुण ब्रह्मोपासनेची स्तुति करीत असतां पूर्वोक्त दोहों उपासकां मध्यें सगुण ब्रह्मोपासक श्रेष्ठ आहेत असें श्री भगवान् उत्तर सांगतात. ॥ मयि मनः आवेश्य — म्हणजे मी जो सगुण ब्रह्म परमेश्वर सर्वात्मा वासुदेव त्याचे ठायीं आत्म स्वरूप त्यास्तव आणि प्रियतम त्यास्तव अनन्य भावानें मन प्रविष्ट करून म्हणजे हिंगुळादिक रंग लाखेंत मिसळले म्हणजे जसे लाखमयच होतात. त्या प्रमाणें मन सर्वदा मदाकार करून ॥ नित्ययुक्ताः- म्हणजे निरंतर उद्युक्त —परया श्रद्धया उपेताः — म्हणजे हा परमात्मा उपासनेनें आह्मांस संसार सागरा पासून तारीलच अशी निश्चयात्मक जी सात्त्विकी श्रद्धा जीस आस्तिक्य बुद्धीही म्हणतात. तीणें करून युक्त होत्सात सर्व योगेश्वरांचा ही ईश्वर आणि सकल कल्याण गुणांचें स्थान आणि साकार असा जो मी याची उपासना करतात. ॥ ते मे युक्त तमाः मताः — म्हणजे "ज्ञानीत्वात्मैवमेमतः" येणें करून जो अद्वितीय ब्रह्म स्वात्मत्वें करून जाणतो तो माझा आत्माच आहे. असें भगवंतांनीं सांगितलें आहे. या वरून आत्म्या सारखा निरतिशयित प्रीतीस पात्र दुसरा पदार्थ कोणी नाहीं हें अर्थसिद्धच आहे यामुळें ज्ञान्यास तर मी आपलें स्वरूपच आहे असें पाहतो. तेव्हां त्यावर जसा माझा पक्षपात आहे तसा दुसऱ्यावर नाहींच परंतु जे अज्ञानी असून आपणास शरण आले आहेत आणि निरंतर सगुण स्वरूपानें ही जरी उपासना करतात तथापि ते श्रेष्ठ योगी आहेत असें मी त्यांस मानितो. ॥ २॥

**ये त्वक्षर मनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ॥ सर्वत्र-गमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३॥ ॥ सन्नियम्येंद्रियग्रामं सर्वत्र संमबुद्धयः ॥ ते प्रा-**

प्नुवंति मामेव सर्वभूतहितेरताः ॥ ४ ॥

सगुण ब्रह्मोपासना येत्ने जर श्रेष्ठ असे तुला मान्य आहेत तर निर्गुणब्रह्म वेत्ते श्रेष्ठ नाहींत असें समजावें कीं काय असें जर म्हणेल तर ते तर फारच दुर्लभ आहेत असें तीन श्लोकांनीं सांगतात. अथवा निर्गुण ब्रह्मोपासकांपेक्षां सगुण ब्रह्मोपासकांत कोणता विशेष आहे, जेणें करून ते तुला युक्ततम असे मान्य आहेत असें म्हणेल तर सगुण ब्रह्मोपासकाचे ठायीं विशेष दाखविण्यासाठीं निर्गुणोपासकांची स्तुति करतातः येतु अक्षरं पर्युपासते- म्हणजे जें स्थूल नव्हे, अणु नव्हे, ऱ्हस्व नव्हे, दीर्घ नव्हे. अशा अर्थाच्या श्रुतीनीं सर्वधर्म शून्य अक्षर ब्रह्म सांगितलें त्याचें ध्यान करतात. तें ब्रह्म कसें आहे तें विशेषणानीं सांगतात.- अनिर्देश्यं- म्हणजे गुण किंवा जाति किंवा क्रिया यांचा कोणा एकाचा ही संबंध ज्याचे ठायीं आहे त्यावर हा बरा, वाईट, निळा, पिंवळा, मूर्ख, विद्वान्, ब्राह्मण, शूद्र, जातो, येतो इत्यादिक शब्दांची प्रवृत्ति होते ब्रह्मावर धर्म कोणताही नाहीं यास्तव तें असें किंवा अमुक प्रकारचें अशा शब्दानें निरूपण करण्यास अशक्य आणि याच कारणास्तव- अव्यक्तं- म्हणजे मनास ही चिंतन करण्यास अविषय याविषयीं सर्व वाणी मनासुद्धां ज्याप्रत न पावून- परतात- म्हणजे सर्व ही शब्द ज्याचें प्रतिपादन करण्यास समर्थ होत नाहींत. आणि ज्याचें चिंतन करण्यास मनही समर्थ होत नाहीं अशा अर्थाची श्रुति प्रमाण आहे. अद्वितीय निर्गुण ब्रह्म वेदांत प्रतिपाद्य आहे त्या विषयीं वेदांतील महावाक्यें प्रमाण आहेत असें जें श्रुतींत सांगितलें आहे तें निर्गुण निष्क्रिय निर्धर्मक ब्रह्मावर अविद्या कल्पित लक्ष्यत्व ब्रह्मत्वादिक धर्म मानून त्या कल्पित धर्मानीं ब्रह्म असें आहे. असा वेदांत वाक्यापासून लक्षणा वृत्तीनें त्या वाक्यापासून तादृश ब्रह्माकार अंतःकरण वृत्तिरूप बोध होऊन त्या अंतःकरण वृत्तिरूप बोधानें सर्व कल्पनास मूलभूत जी अविद्या आणि तिचें कार्य जें देहेंद्रिय, मन, बुद्धि आदिक सर्व द्वैत प्रपंच त्याची त्या वृत्ती सुद्धां निवृत्ति होऊन आपले अद्वितीय सच्चिदानंदात्मक स्वरूपानें जीवास स्थिति होते अशा भावानें सांगितलें. मनानें चिंतन करण्यास अशक्य म्हणून जें सांगितलें तें अशुद्ध मनाविषयीं सांगितलें. शुद्धांतःकरणानें निर्गुण ब्रह्मोपासन किंवा पूर्वोक्त वृत्तिरूप बोध होतो असें श्रुतिस्मृति आणि पुराण यांनीं सिद्ध आहे. जसा या गुहेंत शब्द नाहीं असा कोणी बाहेर उच्चारला शब्द ऐकणारास आपलें सुद्धां कोणताही शब्द गुहेंत नाहीं असा बोध उत्पन्न करून आपण शांत होतो आणि गुहा निःशब्द आहे असा ऐकणारास बोध झाला यामुळें त्यास गुहेंतील शब्दाविषयींचें अज्ञान राहात नाहीं तशी वेदांत वाक्यापासून कल्पित अंतःकरणापासून झालेली कल्पित वृत्ति ती-

ब्रह्म निर्धर्मक अद्वितीय आहे अशा स्वरूप बोधानें ब्रह्म स्वरूपाविषयींचें जें अज्ञान आणि त्या पासून झालेलें देहेंद्रिय मन आणि आपणा सुद्धां सर्व द्वैत याची निवृत्ति करून परमात्मा वशेष होऊन आपण शांत होणें. येथें निवृत्ति शब्दानें मिथ्यात्व ज्ञान घ्यावें. देहेंद्रिय मन आदि कांची प्रतीती न होणें असें समजूं नये. कारण तसा महावाक्या पासून बोध झाला तरी देहपात होईतों पावेतों बाधितानुवृत्ती नीं म्हणजे मिथ्या ज्ञान झालें तरी पूर्व प्रारब्ध संस्कारानें ज्ञान्यास देहादिक द्वैताची प्रतीति असतेच आणि परमात्मा वशेषही परमात्म्याच मत्य असें समजणें एतद्रूपच समजावा. नाहींतर सुषुप्तींत आणि मूर्छावस्थेंत ही देहादिकांची प्रतीति होत नाहीं यास्तव तत्वज्ञानाचे यत्नाशिवाय ही सर्व लोक मुक्त होतील तसें झालें तर मग ज्ञान शास्त्र सर्वही व्यर्थ होईल आणि ज्ञान्यास ही देहादिकाची प्रतीति होतच आहे यामुळें जीवन्मुक्ति प्रतिपादन करणारें शास्त्र ही व्यर्थच होईल. जर शब्दानीं ही बोलतां येत नाहीं आणि मनानें ही चिंतन करतां येत नाहीं तर असें ब्रह्म नाहींच कीं काय असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात. सर्वत्रगं—म्हणजे सद्रूप आणि स्फूर्ति रूप जी सत्ता तीणें करून जें सर्वत्र राहतें, सर्व जगाच्या सद्रूपानें—अस्ति—या व्यवहारास आस्पद होतें आणि स्फुरण रूपानें—भासतें—अशा व्यवहारास आस्पद होतें तें शून्या सारखें नाहीं कसें म्हणतां येईल. तर तार्किकादिकांनीं सत्ताजाति जी मानली आहे तीच ब्रह्म काय सर्वत्र अनुगत असें म्हणेल तर तसें ही नाहीं असें सांगतात. अचिंत्यं—म्हणजे तार्किकानीं जी सत्ताजाती मानली आहे ती प्रत्यक्ष मानली आहे, ब्रह्म तर इंद्रियांस प्रत्यक्ष नाहीं—आणि जातीला म्हणजे सामान्याला सत्ता म्हणजे—अस्ति—अशा व्यवहाराची योग्यता ब्रह्मसत्तेनेंच येते, नाहींतर सामान्यावर सत्ता तार्किक मानीत नाहींत—या मुळें सामान्याला असत्वच येईल. सामान्यं अस्ति—म्हणजे सामान्य आहे अशा व्यवहारांत आश्रयावरची सत्तात परंपरा संबंधानें सामान्यावर भासते—असें म्हटलें तरतें म्हणणें सामान्यावर सत्ता नाहीं अशा पर्यायानेंच झालें आणि—अस्ति—हा व्यवहार सर्वत्र सारखा असतां त्यांत कोठें सत्ता साक्षात् संबंधानें भासते कोठें परंपरा संबंधानें भासते अशी कल्पना करण्यापेक्षां सर्वत्र—अस्ति—या व्यवहारा मध्यें ब्रह्मसत्तात भासते असें मानणेंच उत्तम आहे यास्तव सद्रूपानें सर्व जगाचे कल्पनेस अधिष्ठान भूत ब्रह्मरूपादिक नसल्यामुळें तें इंद्रियादिकांस गोचर नाहीं. सर्व जगाची कल्पना होण्यास त्याचे ठायीं कल्पित अविद्येचा संबंध सांगतात. कूटस्थं—म्हणजे बाहेर चांगले गुणानीं दिसतें परंतु आंत दोष असावे असें जें मिथ्या असतां सत्यत्वें करून भासतें त्यास कूट असें लोकांत म्हणतात. जसें कूटपण—कूट साक्षी॥ त्या प्रमाणें मिथ्या असतां ही

आपले कार्यी स्फूर्ती सत्यत्वें करून जें प्रतीतीस येतें असें जें अज्ञान तें कूट त्याचे ठायीं कल्पित संबंधानें अधिष्ठानत्वें करून राहिलेलें तें कूटस्थ म्हणजे अज्ञान आणि त्याचे कार्यानें अधिष्ठान याच कारणास्तव सर्वजगाचा संबंध अविद्येनें च कल्पिला आहे. यामुळें सर्व विकारास साक्षिभूत असून स्वतः निर्विकार असें सांगतात. अचलं–म्हणजे सर्वविकार रहित, याच कारणास्तव–ध्रुवं म्हणजे नित्यं ॥ प्रारब्ध कर्म बळानें विषयभोग साधन विषयेंद्रिय संबंध होत असतां अशा ब्रह्माचें, इतर पदार्थी विषयींची वृत्ति मनांत न उठतां निरंतर ब्रह्माविषयींच वृत्ति प्रवाह रूप उपासन कसें घडेल असें म्हणेलतर त्याविषयीं आस्थेचा अतिशय करून विषयांचे ठायीं दोष दृष्टि स्वरूप वैराग्याचा अभ्यास करून त्या साधनानें तें उपासन करावें असें सांगतात. ॥ इंद्रिय ग्रामं सन्नियम्य – म्हणजे विषयां पासून इंद्रिय समुदायाचा निग्रह करून ॥ सर्वत्र सम बुद्धयः॥–म्हणजे इष्ट विषय प्राप्तीनें हर्ष नाहीं अनिष्ट विषय प्राप्तीनें द्वेष नाहीं आणि विषयाचे दोष दृष्टीनें त्या विषयींची स्पृहा गेल्यामुळें सर्वत्र समानच बुद्धि ज्याची आहे असे वैराग्यशील याच कारणानीं हिंसादि कारण राग द्वेष रहित त्यास्तव "अभयं सर्व भूतेभ्यो दत्वा संन्यास माचरेत् ॥" यास्मृतींत सांगितल्या प्रमाणें सर्व भूतांस ज्यां पासून कोणतीही पीडा नाहीं असे सकल साधन संपन्न होत्साते जशी परपुरुषाचें जीस व्यसन लागलें आहे ती आपलें गृह कर्म करण्यांत व्यग्र असतां ही निरंतर परसंगाचेंच चिंतन करीत असतां त्या परसंगाचाच मनानें आस्वाद घेत असते त्याप्रमाणें प्रारब्ध कर्मवशें करून विषय भोगानुभव करीत असतां ही गृह कृत्या कडे ज्या स्त्रीस व्यसन आहे ती जशी गृह कृत्य उत्तम प्रकारानें करते त्याप्रमाणें पर व्यसनी स्त्री गृहकृत्य करीत नाहीं. त्या प्रमाणें प्रारब्धानें विषयानुभव करीत असतां ही त्यांचें चिंतन उत्तम प्रकारानें न करतां परब्रह्म चिंतनाचे आस्थेच्या अतिशयानें विषय भोग काळीं ही पर ब्रह्म चिंतनच करीत होत्साते – ते मामेव प्राप्नुवंति – म्हणजे ते निर्गुण ब्रह्मोपासक ब्रह्मात्मत्व साक्षात्कारानंतर मजप्रतच प्राप्त होतात. पूर्वीं ब्रह्मरूपच ते ज्ञानें करून अज्ञान निवृत्ति होऊन मद्रूपच राहतात. ब्रह्म असतांच ब्रह्मप्रत येतो ब्रह्मवेत्ता ब्रह्मच होतो अशा अर्थाच्या श्रुति आणि ज्ञानीतर माझा आत्माच आहे–असें गीतेंतील भगवद्वाक्य तें या विषयीं प्रमाण आहे. यास्तव भगवद्रूपचजे आहेत त्या निर्गुणोपासकां विषयीं हे युक्त. किंवा युक्ततम हें काय सांगावयाचें आहे. ॥३॥४॥ ॥ ॥ ॥

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ॥–
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥५॥

परंतु त्या उपासनेच्या अनुष्ठाना विषयीं क्लेश फार आहेत इतकेंच सांगतात. सगुणोपासना करण्याविषयीं सगुणोपासकांस ही मन इंद्रियांचे द्वारा विषयांकडे न नेतां विषयां पासून मनाचा निग्रह करून दुसरे विषयांचें चिंतन न करतां सगुण परमेश्वराचे ठायींच निरंतर त्याचें स्थापन करणें "मत्कर्मकृत् मत्परमः" या श्लोकांत सांगितले प्रमाणें भगवत्कर्म पर भगवत्पर निरंतर होणें परमश्रद्धेनें युक्त असणें यांत क्लेश आहेच तथापि त्यास चिंतन करण्यास सगुण परमेश्वरादिकांचे स्वरूपाचा अवलंब आहे. त्या अवलंबामुळें त्या चिंतनाचा अभ्यास होऊन मनाचे एकाग्रतेचा अभ्यास होऊन पायरी वरून पायरी चढावी यास सोपाना रोहण न्याय म्हणतात. या न्यायानें पुढें ते क्रमानें निर्गुण चिंतन करण्यास मन समर्थ झाल्यामुळें निर्गुणोपासना करतात. आणि क्रमानें ब्रह्म साक्षात्कार वंत होतात. जे पक्ष्या प्रमाणें अकस्मात् ऊर्ध्व पदावर चढावें अशी इच्छा करून चित्तास स्थिर करण्यास अवलंब नसल्यामुळें चित्त विक्षेप होऊन चिंतना पासून भ्रष्ट होतात. आणि पुनः चिंतन करण्यास लागतात. असे अव्यक्त चिंतना विषयीं आसक्त झालेले त्यांस – क्लेशः तेषां अधिकतरः – म्हणजे त्यांस फारच मोठा क्लेश आहे. याविषयीं भगवंत आपणच हेतु सांगतात. देहवद्भिः अव्यक्ता गतिः दुःखं अवाप्यते – म्हणजे देहधारी जे आहेत त्यांस निरालंबगति दुःखें करून प्राप्य आहे क्रमानें प्राप्य नाहीं हें प्रसिद्धच आहे, असें आहे तर निर्गुण ब्रह्मोपासनेचा असंभवच आहे अशी शंका करूं नये. सगुण ब्रह्मा विषयीं प्रत्यया वृत्ति म्हणजे वारंवार तदाकार मनाची वृत्ति करणें एतद्रूप उपासन संभवतें तसें निर्गुणब्रह्माकार निरंतर मनाची वृत्ति करणें एतद्रूप निर्गुण ब्रह्माचें उपासन ही संभवतें तें चतुर्भुज किंवा पंचभुज, परस्थ लक्ष्मी युक्त, अर्धांगस्थ पार्वतीयुक्त, गरुड वाहन अशा विष्ण्वादि मूर्ति आहेत असें शास्त्रा पासून परोक्षत्वें करून जाणून उपासना कालीं त्याची ही मूर्ती अगें प्रत्यक्ष नसलें तरी त्याची तदाकार वृत्ति प्रवाह रूप उपासना करतात. त्याप्रमाणें वेदांत वाक्या पासून ब्रह्म सच्चिदानंदाद्वय आहे असें गुरूपासून परोक्षत्वें करून जाणून विज्ञान, नित्य, शुद्ध बुद्ध, सत्य मुक्त, निरंजन, विभु, अद्वय, आनंद, पर, प्रत्यगेक रस इत्यादिक विधेय गुणानीं आणि अस्थूल, अनणु, अन्हस्व, अदृश्य, अग्राह्य, अशब्द, अस्पर्श, अरूप, अव्यय इत्यादिक निषेध्य गुणानीं उपलक्षित तें परब्रह्म मी आहें असें गुरूपासून निर्गुणोपासनेचें स्वरूप ऐकून त्याप्रमाणें प्रत्यया वृत्ति रूप निर्गुणोपासन करावें ब्रह्मजरी – शास्त्रांत प्रत्यगात्म स्वरूपानेंच वर्णिलें आहे तथापि विचारा शिवाय तें प्रत्यगात्मत्वें करून ब्रह्मज्ञान दुर्घट आहे यास्तव बुद्धीचे मंदत्वा मुळें किंवा तत्त्वोपदेष्टा जो गुरु त्याचें निरंतर सान्निध्य नसल्यामुळें किंवा देश कालाची संपत्ति नसल्या-

मुळें जो विचार करण्यास असमर्थ आहे आणि गुरूपासून श्रद्धेनें पारोक्ष्यखें करून ब्रह्मस्वरूप जाणून उपासना प्रकार ही पूर्वोक्त जाणून निरंतर त्या ब्रह्मा-चे प्रत्यया वृत्ति रूप उपासन करावें अपरोक्ष द्वैत बुद्धि असली तरी श्रद्धाळूस परोक्षत्वें करून अद्वैत ब्रह्म ज्ञानास ती विरोधी होत नाहीं जशी शालग्रामादिक किंवा प्रतिमादिकावर शिलात्व बुद्धि अपरोक्ष असली तरी ती हा विष्णूच आहे अशा शास्त्रीय परोक्ष ज्ञानास ती विरोधी होत नाहीं कारण शालिग्राम प्रतिमादिका वरील शास्त्रीय विष्णुत्वा विषयीं कोणाचा विवाद नाहीं जे श्रद्धालु आस्तिक असतील तेच या उपासने विषयींचे अधिकारी आहेत यास्तव अश्रद्धालु नास्तिकास त्या प्रतिमादिका वर विष्णुत्वा विषयीं विश्वास नसला तरी त्याचें उदाहरण येथें घेऊं नये. यास्तव उपासनोपयोगी अद्वैत ब्रह्म तत्व विषयक परोक्ष ज्ञान श्रद्धालु आस्तिकास गुरूपासून वेदांत वाक्याच्या एकवार उपदेशानें ही होतें त्यावरून त्याविषयींचें उपासन विचारा पासून ही होतें. वाणीला मनाला अगोचर अशा निर्गुण ब्रह्माचें उपासन संभवत नाहीं असें म्हणाल तर तशा ब्रह्माचें ज्ञान तरी कसें संभवेल. वाणीला आणि मनाला अगोचर या प्रमाणेंच त्याचें ज्ञान संभवतें तर या प्रकारेंच उपासन ही संभवतें. उपास्यत्व मानलें तर त्याच गुणानें सगुणत्व येईल असें म्हणाल तर वेद्यत्व मानल्यानें त्याच गुणानें सगुणत्व येणार नाहीं कीं काय. लक्षणा वृत्तीनें वेद्यत्व मानितों म्हणजे सगुणत्व येणार नाहीं असें म्हणाल तर उपास्यत्व ही लक्षणावृत्तीनें मानितों मग सगुणत्व कोठून येईल. जें मनानें चिंतितां येत नाहीं ज्याचे योगानें मनास सत्ता आली आहे तेंच तूं ब्रह्म जाण. ज्याची असें आहे. अशी उपासना करतां येत नाहीं या अर्थाच्या श्रुती वरून ब्रह्मोपासन निषिद्ध आहे असें म्हणाल तर तें ब्रह्म विदिताहून अन्य आहे अवेद्य आहे अशा श्रुतीनें वेद्यत्व ही निषिद्ध आहे, जर वेद्यत्व निषेध करणाऱ्या श्रुति अशुद्ध मनानें वेद्यत्व निषेधपर आहेत तर उपास्यत्व निषेधपर श्रुतिही अशुद्ध मनानें उपास्यत्व निषेध पर आहेत, यास्तव अद्वैत सर्वधर्म शून्य ब्रह्म असतांही अविद्येनें कल्पित लक्ष्यत्व सत्य ज्ञानानंद त्व रूप धर्माचे योगानें मनोवृत्तिरूप वेद्यता ब्रह्मास आहे त्या प्रमाणें पूर्वोक्त गुणानीं उपलक्षित ब्रह्माकार मनोवृत्तिरूप उपास्यत्व आहे. याविषयीं तापनीयोपनिषत् शैब्य प्रश्न मांडुक्योपनिषदांत निर्गुणोपासन प्रकार लिहिला आहे तो प्रमाण भूत आहे असें जाणावें. ॥ ५ ॥

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ॥**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ६ ॥**

सगुण ब्रह्मोपासक आणि निर्गुण ब्रह्मोपासक यांस एकच मोक्षरूप

सारखें फल असेल तर क्लेशाच्या न्यूनत्वामुळें सगुणोपासनेचा उत्कर्ष आणि-क्लेशाच्या आधिक्यामुळें निर्गुणोपासनेचा अपकर्ष होईल तसें तर नाहीं निर्गुण-ब्रह्मोपासनेचे साह्यानें महावाक्यापासून ब्रह्मात्मा परोक्ष ज्ञान होऊन अविद्या आणि तत्कार्य यांचा नाश होऊन निर्विशेष (मुख्य) आनंद बोधात्मक ब्रह्म स्वरू-पानें अवस्थान रूप मोक्ष सद्यः प्राप्त होतो. सगुण ब्रह्मोपासकांस अविद्या निवर्त्त-क अधिष्ठानभूत ब्रह्मापरोक्ष ज्ञान नसल्यामुळें अविद्या निवृत्ति न होतां कार्य ब्र-ह्मलोक प्राप्ति स्वरूप ऐश्वर्य विशेषरूप फल होतें तेव्हां निर्गुणोपासकांस आया साधिक्य असलें तरी सगुण ब्रह्मोपासकांपेक्षां फल मोठें आहे यास्तव तें आया-साधिक्य निर्गुणोपासनेस अपकर्ष संपादन करणारें नव्हे अशी शंका करूंनये-सगुणोपासनेचे योगानें ईश्वर प्रसाद पुण्यविशेष होऊन त्या योगानें तत्वबोधार्थ जें प्रतिबंध ते सर्व नाश पावून सगुणोपासकांस गुरूपदेश किंवा वेदांत श्रवण मन-न निदिध्यासन रूप क्लेश वांचून ही भगवत्प्रसादानें वेदांतातील महावाक्याची-स्फूर्ति होऊन तत्व साक्षात्कार होऊन अज्ञानाचा कार्यासह नाश होऊन सगुणो-पासनाचे पुण्यें करून प्राप्त झालेल्या ब्रह्मलोकांतील भोगाच्या अंतीं निर्गुण ब्रह्म विद्येचें जें फल विदेह कैवल्य तें प्राप्त होतें असें दोन श्लोकांनीं सांगतात. येतुस-र्वाणि कर्माणि मयि संन्यस्य-म्हणजे जें तर सगुण ब्रह्मोपासक सर्व नित्य नैमित्ति-क स्वाभाविक जीं कर्में तीं मी जो सगुणेश्वर वासुदेव याचे ठायीं अर्पून-मत्पराः-म्ह-णजे मी वासुदेवच आहें पर म्हणजे उत्कृष्ट प्रीति करण्यास पात्र ज्यांस असे होत्सा-ते-अनन्येनैव योगेन म्हणजे मज वांचून ज्यांस आलंबन दुसरें नाहीं अशा एकां-त भक्तियोगानें॥ मां ध्यायंतः-म्हणजे मी जो भगवान् वासुदेव, सकल सौंदर्य-निधान, आनंद घन, द्विभुज किंवा चतुर्भुज, समस्त लोक मनोहर मोहन करणाऱ्या-मुरली प्रत सप्तस्वरानें वाजविणारा कमल, कौमोदकी, गदा, रथांगचक्र, शंख युक्त-पाणि पल्लव अथवा नरसिंह राघव रूप अथवा पूर्वीं दाखविलेले रूपानें युक्त प-रमेश्वर याचेंच निरंतर ध्यान करीत असतां॥ उपासते-म्हणजे त्याच उपास्य-ध्येय स्वरूपाचे ठायीं मनाच्या निरंतर दृढ स्थिती प्रत पावतात. ॥६॥

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्॥ भवा-**
**मि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम्॥७॥**

मय्यावेशितचेतसां-म्हणजे पूर्वोक्त स्वरूप जो मी याचे ठायीं एका-ग्रतेनें ज्यानीं मनाचें स्थापन केलें आहे तेषां-म्हणजे असे जे उपासक त्यांचा-मृत्यु संसार सागरात् समुद्धर्ता-म्हणजे मृत्युयुक्त जो मिथ्याज्ञान कार्यभूत प्रपंच तोच दुस्तरत्वास्तव समुद्र त्या पासून अनायासानें उत्तम म्हणजे सर्व बा-

धांचा अवधि म्हणजे शुद्ध जो ब्रह्मरूप ऊर्ध्वदेशी त्याचे ठायीं ज्ञानाचा अवष्टंभ-देऊन धारण करतो. हे पार्थ, नचिरात् भवामि-म्हणजे हे अर्जुना, लौकरच होतों. असें तात्पर्य. ॥७॥

## मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ॥ निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः॥८॥ ॥

या प्रमाणें एतावत् पर्यंत सगुण ब्रह्मोपासनेची स्तुति करून ती करावी असा विधि सांगतात ॥ मय्येव मन आधत्स्व विश्वरूप जो मी याचे ठायींच-संकल्प विकल्पात्मक मनाचें स्थापन कर - म्हणजे सर्व मनाच्या वृत्ति मदाकार कर. मयि बुद्धिं निवेशय - म्हणजे निश्चयात्मक बुद्धीचें ही माझेच ठायीं स्थापन कर- म्हणजे विषयांतराचें बुद्धीनें चिंतन न करतां माझेंच चिंतन कर, असें-करण्याचें फल सांगतात. ॥ अत ऊर्ध्वं मय्येव निवसिष्यसि नसंशयः—म्हणजे शरीर पातानंतर शुद्ध ब्रह्मरूप जो मी याचे ठायीं मद्रूपानेंच राहशील. ॥८॥

## अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम्॥ अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय॥९॥

विश्वरूप चिंतना विषयीं जो असमर्थ त्याविषयीं सांगतात. ॥ अथ मयि-स्थिरं चित्तं समाधातुं न शक्नोषि चेत् ॥-म्हणजे विश्वरूप जो मी याचे ठायीं एकाग्रतेनें उत्तम प्रकारें करून चित्ताचें स्थापन करण्यास तूं जर समर्थ न होशील तर-ततः अभ्यास योगेन- म्हणजे आंतर किंवा बाह्य प्रतिमादिकालंबनाचे ठायीं-सर्वत्र गेलें लें चित्त आवरून पुनः पुनः स्थापन करणें असा जो अभ्यास तत्पूर्वक जो चित्ताची स्थिरता करणें एतद्रूप योग तेणें करून-हे धनंजय, मां आप्तुं इच्छ -म्हणजे हे धनंजया अर्जुना, मी जो विश्वस्वरूप ईश्वर त्याची प्राप्ति होण्या विषयीं इच्छा कर. ॥९॥

## अभ्यासेप्यसमर्थोसि मत्कर्मपरमो भव ॥ मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि॥१०

अभ्यासेऽपि असमर्थः असिचेत् तर्हि - म्हणजे जर सांगितलेले अभ्यासा विषयीं ही तूं असमर्थ असशील तर- मत्कर्म परमः भव- म्हणजे "श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं॥ अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्म निवेदनं॥" या प्रकारचें जें नवविध भजन तें मत्कर्म तेंच आहे आवश्यक ज्यास असा तूं हो॥ मदर्थं कर्माणि कुर्वन्नपि- म्हणजे नवविध पूर्वोक्त भागवत धर्म भजनात्मक कर्म करीत

असतां ही अंतःकरण शुद्धि आणि ज्ञानोत्पत्ति यांचे द्वारानें—सिद्धिं अवाप्स्यसि—म्हणजे ब्रह्मरूपानें स्थिति रूप मोक्षाप्रत पावशील. ॥ १० ॥

**अथैतदप्यशक्तोसि कर्तुं मद्योगमाश्रितः॥ सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान्॥ ११॥**

बाह्य विषयाकडे चित्त व्यग्र झाल्यानें किंवा बाह्य विषयांनीं चित्त आकृष्ट केल्यामुळें पूर्वोक्त मत्कर्मपरम होण्यास समर्थ नसशील तर—मद्योगं आश्रितः—म्हणजे मदेक शरणतेचा आश्रय केलेला आणि यतात्मवान्—म्हणजे इंद्रिय निग्रहानें युक्त विवेकी होत्साता ॥ सर्व कर्म फल त्यागं कुरु—म्हणजे सर्व कर्मांच्या फलाच्या इच्छेचा त्याग कर. ॥ ११ ॥

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते॥ ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम्॥ १२**

कर्म फलत्यागावरच सर्वसाधनाचें पर्यवसान करून त्याची स्तुति करतात. अभ्यासात् ज्ञानं श्रेयः म्हणजे ज्ञानार्थ केलेला जो श्रवण मननाभ्यास त्यापेक्षां शब्द आणि युक्ति यां पासून झालेलें आत्मनिश्चय रूप ज्ञान प्रशस्त आहे ॥ ज्ञानात् ध्यानं विशिष्यते—म्हणजे पूर्वोक्त श्रवण मनना पासून निष्पन्न झालेलें ज्ञानापेक्षां निदिध्यासनात्मक ध्यान अपरोक्षात्म ज्ञानास साधन असल्यामुळें प्रशस्त आहे ॥ ध्यानात्कर्मफलत्यागः विशिष्यते—म्हणजे निदिध्यासनात्मक ध्यानापेक्षां कर्मफलाचा त्याग प्रशस्त आहे याप्रमाणें सर्वसाधनापेक्षां निदिध्यासनात्मक ध्यान श्रेष्ठ आहे त्यापेक्षांही अज्ञान्यानें केलेला कर्मफल त्याग प्रशस्त आहे अशी त्याची स्तुति केली. ॥ त्यागात् अनंतरं शांतिः—म्हणजे नियतचित्त पुरुषानें केलेले सर्व कर्म फल त्यागापासून कारणासह्रां संसाराचा उपशम तत्काल होतो. एथें जेव्हां मनुष्याचे चिदचिद्ग्रंथि रूप मन स्थित काम निवृत्त होतात तत्काल देहादि मरणानें मरणभाव जीव अमृत म्हणजे देहाभिमान गेल्यामुळें तत्रून मरणानें रहित होतो आणि याच देहांत ब्रह्मस्वरूपानें मोक्षाप्रत पावतो या अर्थाच्या श्रुतींत आणि "प्रजहाति यदाकामान् सर्वान् पार्थ मनोगतान्" याश्लोकांत—स्थितप्रज्ञ लक्षणामध्यें गीतेंत सांगितलेला जो चिद चिद्ग्रंथि रूप काम त्याग त्यास मोक्ष साधनत्व निश्चित आहे यामुळें आणि कर्मफल त्यागही त्याग आहे यास्तव त्यागत्व सामान्य रूपानें त्याची स्तुति केली. जशी अगस्ति ब्राह्मणानें समुद्रपान केलें, जामदग्न्य ब्राह्मणानें पृथ्वि निःक्षत्रिय केली यामुळें ब्राह्मणत्व सामान्यानें आतांचे ब्राह्मण ही अनंत पराक्रमाचे आहेत अशी त्यांची स्तुति करतात

त्या प्रमाणें . ॥१२॥

## अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ॥ निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

या प्रमाणें जे मंदाधिकारी आहेत त्यांस अतिदुष्कर जें अक्षरनिर्गुण ब्रह्मोपासन त्यांत फारक्लेश आहे अशी निंदा करून त्यांचे उद्देशानें एकर सगुणोपासनाचा विधि सांगून शक्तितारतम्याचे अनुवादानें दुसऱ्याही साधनाचा विधी भगवान् वासुदेवानें सांगितला. या सांगण्याचा हेतु इतकाच आहे कीं; त्या साधनाचे अनुष्ठानानें आणि सगुण ब्रह्मोपासनेनें सर्व दुरितादिक प्रतिबंधकांचा नाश होऊन चित्त शुद्ध होऊन अक्षर निर्गुण ब्रह्म विद्येचे अनुष्ठानास उत्तमाधिकार प्राप्त होऊन अक्षर निर्गुण विद्येचें अनुष्ठान मुमुक्षूंस प्राप्त व्हावें. यास प्रमाण निर्विशेष निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार होण्यास जे समर्थ नाहींत-असे जे मंदाधिकारी त्यांस सविशेष ब्रह्माचें निरूपण करून त्यांवर अनुग्रह करतात. सगुण ब्रह्मचिंतनें करून ज्यांचें मन स्वाधीन झालें आहे त्यांच मनांत सर्व उपाधीनीं निर्मुक्त तें निर्गुण ब्रह्म अभिव्यक्त होतें अशीं वाक्यें आणि निर्विकल्पक समाधीची सिद्धि ईश्वर प्रणिधानें करून होते ईश्वरप्रणिधाना ( ईश्वराच्या ध्यानादि उपासना ) पासून प्रत्यगात्मा जो चैतन्य रूप त्याची प्राप्ति होते आणि सर्व जे अंतराय म्हणजे निर्विकल्पक समाधीस प्रतिबंधक त्याचा नाश होतो अशा अर्थाचीं योगसूत्रें आहेत. यावरून अक्षर निर्गुण ब्रह्मोपासनेची निंदा मंदाधिकाऱ्यांस सगुण ब्रह्मोपासनेचे स्तुती विषयीं आहे. निर्गुणोपासना करूं नये. या विषयींची नाहीं. जशी उदित होमाची निंदा म्हणजे सूर्य उदय पावल्यानंतर होमाची निंदा अनुदित होमाचे म्हणजे सूर्योदया पूर्वीच्या होमाचे स्तुती साठीं आहे तशीच अनुदित होमाची निंदा उदित होमाचे स्तुती विषयीं आहे परस्पर दोघांची निंदा परस्पर स्तुत्यर्थच आहेत. त्याचा त्याचा त्याग करण्याविषयीं नाहींत. निंदा करण्या विषयीं प्रवृत्त होत नाहींतर ज्याविषयीं विधी सांगावयाचा-असतो त्याचे स्तुती साठीं प्रवृत्त होते असा न्याय ही यास प्रमाण आहे. यास्तव "प्रियो हि ज्ञानिनोत्यर्थ महं सच मम प्रियः ॥ उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतः" इत्यादिकें करून पुनः पुनः फार उत्कृष्टत्वें करून प्रिय तमत्वें करून स्वात्मत्वें करून भगवंतांनीं सांगितलेले निर्गुण अक्षर ब्रह्मोपासकच परमार्थतः योगवित्तम आहेत त्यांचेच धर्माचा आणि ज्ञानाचा तूं आश्रय कर. असें अर्जुनास समजावें या इच्छेनें परम हित इच्छिणारा भगवान् ब्रह्मात्मा भेददर्शि जे अक्षरोपासक त्यांची सातश्लोकांनीं स्तुती करतात. ॥ सर्व भूतानां अद्वेष्टा-म्हण-

जे सर्व भूतांस स्वात्मत्वें करून जाणल्यामुळें दुःखास जो हेतु त्याविषयीं प्राति-कूल्य बुद्धि नाहीं यास्तव कोणाचा द्वेष जो करीत नाहीं नर-मैत्रः म्हणजे सर्वभू-तां विषयीं स्निग्धांतःकरण आणि करुणः म्हणजे दुःखाचे ठायीं जो दयावान् अ-थवा सर्व भूतांस अभय देणारा संन्यासी ॥ अतएव-निर्ममः-म्हणजे देहावरही ज्याची ममता बुद्धि नाहीं. आणि निरहंकारः-म्हणजे मीचांगलें आचरण करणा-रा चांगले स्वभावाचा, मी मोठा, अध्ययनशील, द्रव्यवान्, कुलीन, पूज्य, परंपरेनें प्रतिष्ठित इत्यादिक ज्याचा अहंकार गेला आहे आणि समदुःखसुखः-म्हणजे द्वेषाविषयीं किंवा रागाविषयीं ऐक्य बुद्धीमुळें सुख किंवा दुःख किंवा त्यांचीं सा-धनें ज्यांस समानच आहेत आणि कोणी आपणास मारलें किंवा आपली कोणी-निंदा केली तरी ज्याचे मनास विकार होत नाहीं. ॥१३॥

## संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ॥ म-य्यर्पित मनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥१४

सततं संतुष्टः-म्हणजे शरीर निर्वाहोपयोगी यदृच्छेनें झालेल्या ला-भानें किंवा लाभ न झाला तरी संतोष पावणारा किंवा इतकेंच पुरे अशी अलंबु-द्धि ज्यास आहे असा आणि सततं योगी-म्हणजे निरंतर श्रवण, मनन, निदिध्या-सनां विषयींच ज्यानें चित्त स्थित आहे असा आणि यतात्मा-म्हणजे स्वाधीन-आहेत शरीर इंद्रियें, मन ज्यास आणि दृढनिश्चयः-म्हणजे कुतर्कांनीं फिरवि-ण्यास शक्य नाहीं असा दृढ आहे. मी अकर्ता, मी अभोक्ता, मी सच्चिदानंदासं-ग अद्वितीय ब्रह्मच आहें असा वेदांतापासून झालेला निश्चय ज्याचा असा-स्थित प्रज्ञ. आणि मय्यर्पित मनोबुद्धिः-म्हणजे मी शुद्ध ब्रह्मरूप जो वासुदेव याचे ठायींच अर्पित आहेत मन आणि बुद्धि ज्याच्या असा जो मद्भक्तः म्हणजे शुद्ध अक्षर ब्रह्म वेत्ता तो-मे प्रियः म्हणजे माझा आत्माच आहे यामुळें प्रिय-आहे असें समजावें.

## यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ॥ हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥१५॥

यस्मात् लोकः न उद्विजते-म्हणजे सर्व भूतांस अभय देणाऱ्यापासून-कोणी जीव व्यथेप्रत पावत नाहीं आणि यः लोकात् न उद्विजते-म्हणजे दुसऱ्या-स पीडा करावी असा ज्याचा स्वभाव अशा खल जीव समुदायापासून अद्वैत द-र्शनास्तव किंवा परम कारुणिकत्वामुळें क्षमाशीलत्वास्तव जो व्यथेप्रत पावत-नाहीं असा आणि- हर्षामर्षभयोद्वेगैःमुक्तः- म्हणजे प्रियवस्तूचा लाभ झाला

असतां शरीरावर रोमांच उभे राहावे, आनंदाश्रु यावे यास कारणभूत जो आनंद त्याला अभिव्यंजक मनाचा जो वृत्ति विशेष तो हर्ष. दुसऱ्याचा उत्कर्ष पाहिला म्हणजे त्याचें सहन न व्हावें असा जो चित्ताचा वृत्तिविशेष तो अमर्ष, व्याघ्रादिकांच्या दर्शना पासून झालेला जो त्रास रूप चित्त वृत्ति विशेष तें भय, मी एकटा या विजन देशीं स्त्री पुत्रादिकांनीं रहित कसा जगेन या प्रकारचा जो व्याकुलता रूप चित्त वृत्ति विशेष तो उद्वेग असे जे हर्ष, अमर्ष, भय आणि उद्वेग त्यांनीं रहित किंवा अद्वैत दर्शित्वास्तव आपणास अयोग्य असें जाणून त्यांनींच त्याग केलेला त्यांचे त्यागाविषयीं आपण प्रयत्न करणारा नव्हे असा जो तो- मेप्रियः- म्हणजे पूर्वीं प्रमाणेंच मला प्रिय आहे. ॥१५॥

## अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ॥ सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः समे प्रियः ॥१६॥

आणि अनपेक्षः- म्हणजे सर्व भोग साधनें यदृच्छेंकरून प्राप्त झालीं असतां ही त्यां विषयीं निरिच्छ. शुचिः म्हणजे पूर्वोक्त बाह्य आणि आभ्यंतर शौचानें युक्त. दक्षः- म्हणजे कर्तव्य जें भगवद्भजन किंवा वेदांत श्रवण त्याविषयीं निरलस किंवा सावधानचित्त. उदासीनः- म्हणजे दोघांचे विवादांत कोणाचाही पक्ष न घेणारा किंवा कोणाचे जयपराजयानें ज्यास हर्ष विषाद नाहींत असा आणि- गतव्यथः- म्हणजे दुसऱ्यानें ताडनादिक केलें तरी त्याची व्यथा जो मानीत नाहीं किंवा व्यथाच ज्यास होत नाहीं असा. व्यथा उत्पन्न झाली तरी ज्याणें व्यथा केली त्यास अपकार करण्याचें सामर्थ्य असतां ही जो अपकार करीत नाहीं तो क्षमाशील आणि व्यथा होण्यास कारण प्राप्त झालें तरी ज्यास व्यथा उत्पन्नच होत नाहीं किंवा मानीत नाहीं तो गतव्यथ असा विशेष जाणावा. आणि सर्वारंभ परित्यागी म्हणजे या लोकींचे पदार्थ कृषि वाणिज्यादि कर्में आणि परलोकचे फलार्थ यज्ञ यागादिक काम्य कर्माचरण करणें हे सर्व आरंभ म्हणजे क्रिया रूप व्यापार ज्यानें सोडले आहेत. असा जो माझा पूर्वोक्त भक्त तो मला फार प्रिय आहे. ॥१६॥

## यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ॥ शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥१७

समदुःखसुखः असें जें सांगितलें त्याचेंच व्याख्यान करितात. ॥ योनहृष्यति- म्हणजे जो इष्ट वस्तूचा लाभ झाल्या मुळें हर्ष पावत नाहीं. नद्वेष्टि म्हणजे अनिष्ट किंवा अप्रिय वस्तू प्राप्त झाल्या मुळें जो द्वेष करीत नाहीं. नशोचति-

म्हणजे इष्टवस्तूचा वियोग झाल्यामुळें जो शोक करीत नाहीं.–नकांक्षति–म्हणजे प्राप्त न झालेले इष्टवस्तूचे प्राप्ती विषयीं जो इच्छा करीत नाहीं. आतां सर्वारंभ परित्यागी– याचें व्याख्यान करतात.॥ शुभाशुभ परित्यागी–म्हणजे सुख साधन भूत किंवा दुःख साधनभूत जीं पुण्य पापरूप कर्मे किंवा मंगला मंगल रूप कर्मे त्यांचा परित्याग करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा जो पूर्वोक्त भक्तिमान् तो मला प्रिय आहे. ॥१७॥

## समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः॥
## शीतोष्ण सुखदुःखेषु समः संगविवर्जितः॥१८

उदासीनत्वाचें व्याख्यान करतात.॥ समः शत्रौच मित्रेच – म्हणजे शत्रू विषयीं आणि मित्रा विषयीं जो समान। तथा मानापमानयोः – म्हणजे तसाच मान आणि अपमान यां विषयीं जो समान। आणि शीतोष्णसुखदुःखेषु समः – म्हणजे शीत किंवा उष्ण आणि सुख किंवा दुःख यां विषयीं जो सम। संगविवर्जितः – म्हणजे व्यथा होण्यास जो संग त्या सर्व संगानें रहित. ॥१८॥

## तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित्॥
## अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः॥१९

आणि तुल्यनिंदास्तुतिः– म्हणजे निंदेनें ज्यास दुःख होत नाहीं आणि स्तुतीनें ज्यास सुख होत नाहीं असा, आणि मौनी– म्हणजे वाणीचें नियमन केलेला किंवा अध्यात्म विचारा शिवाय किंवा भगवद्गुणानु वादा शिवाय जो वाणीचा व्यापार तो न करणारा. आणि येनकेन चित् संतुष्टः म्हणजे शरीर निर्वाहा साठीं ही प्रयत्न केल्या शिवाय प्रारब्ध कर्मबलानें जें शरीर निर्वाहोपयोगी भोजनाच्छादन मिळेल तितक्यानेंच जो संतोषी. आणि अनिकेतः- म्हणजे नियत राहण्याचें स्थान जें गृह मठादिक तें ज्यास नाहीं असा आणि स्थिरमतिः–म्हणजे ब्रह्मात्मतत्त्वा विषयीं ज्याची स्थिर बुद्धि आहे असा जो पूर्वोक्त भक्तिमान् तो मला फारप्रिय आहे. येथें भक्तिमान् भक्तिमान् असें भक्तीचें पुनःपुनः ग्रहण जें केलें तें मोक्षास भक्तिच पुष्कळ कारण आहे असें दृढ करण्या साठीं केलें असें जाणावें. आणि "अद्वेष्टा सर्व भूतानां" इत्यादिकें करून जे अद्वेष्टृत्वादिक बहुत धर्म सांगितले ते अक्षरब्रह्मोपासक जीवन्मुक्त जे आहेत त्यांचे लक्षणभूत स्वभाव सिद्ध सांगितले हेच धर्म पूर्वीं स्थितप्रज्ञाचे लक्षणालें करून सांगितले आहेत असेंच ज्यास साक्षात्कारात्मक ब्रह्मात्म ज्ञान झालें आहे त्यास अद्वेष्टृत्वादिक धर्म प्रयत्ना वांचून स्वभावतःच उत्पन्न होतात ते त्यास साधन भूत नव्हे-

त या अर्थाचे वार्तिकांत सुरेश्वराचार्यांनीं सांगितले आहेत, ते धर्म जे मुमुक्षु आहेत त्यांनीं अवश्य साधकदशेंत संपादन करावे. ॥१९॥

ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ॥ श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥२०॥
इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥१२॥ ॥ ॥ ॥

हे धर्म मुमुक्षूंस जीवन्मुक्ति होण्यास साधन आहेत असें प्रतिपादन करीत असतां प्रकरण समाप्ति करितात. येतु यथोक्तं इदं धर्म्यामृतं म्हणजे मुमुक्षु अद्वेष्टा सर्वभूतानां इत्यादिकानें एथवर सांगितलेले मोक्षसाधन तास्तव धर्मरूपच जें अमृत त्याची- श्रद्दधानाः -म्हणजे श्रद्धें करून युक्त. आणि मत्परमाः - म्हणजे मी अक्षर ब्रह्मस्वरूप वासुदेवच आहें. प्राप्तव्य ज्यांस असे होत्साते - पर्युपासते - म्हणजे उपासना म्हणजे अनुष्ठान करितात. ते भक्ताः - म्हणजे निरुपाधिक मद्रूप ब्रह्माचे स्वात्मत्वें करून भजन करणारे भक्त माझे आत्मस्वरूपच - आहेत. या कारणामुळें मला - अतीव प्रियाः - म्हणजे निरतिशय प्रीतीचे आस्पद आहेत. या प्रमाणें सगुण ब्रह्मोपासनेच्या परिपाकें करून निरुपाधिक निर्गुण ब्रह्माचें चिंतन करणारा जो अद्वेष्टृत्वादिक धर्मांनीं युक्त मुख्याधिकारी त्यास वेदांत श्रवण मनन निदिध्यासनांचे आवृत्तीनीं किंवा सकृत् अनुष्ठानानें महावाक्यापासून ब्रह्मात्मत्व साक्षात्कार होऊन मुक्ति होते यास्तव त्या मुक्तीस साधन महावाक्यांतील तत्पदार्थ परमेश्वराचें अनुसंधान करावें असें या गीतेंतील मध्यम अध्यायषट्कानें सिद्ध झालें. ॥२०॥

इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथ शास्त्रिकृत भाषा विवृत्तौ द्वादशोऽध्यायः समाप्तः ॥१२॥ ॥श्रीकृष्णार्पणमस्तु॥ ॥ ॥

## अध्याय १३ वा.

श्रीभगवानुवाच ॥ ॥इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ॥ एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥१॥ ॥ ॥ ॥ ॥

प्रथमाध्यायापासून सहाव्या अध्याया पर्यंत प्रथमषट्कांत "अव्यक्तो-

य मचिंत्योय मविकार्यो यमुच्यते" इत्यादिकें करून महावाक्यांतील त्वं पदार्थ शब्दात्म स्वरूप सांगितलें. सप्तमाध्याया पासून द्वादशाध्याय पर्यंत मध्यम षट्कांत "येत्वक्षर मनिर्देश्य मव्यक्तं पर्युपासते। सर्वत्र गमचिंत्यंच कूटस्थ मचलं ध्रुवं" इत्यादिकें करून तत्पदार्थ शब्द ईश्वर स्वरूप सांगितलें। आतां तत्त्वं पदात्मक जें वाक्य त्यांतील जो त्वं पदार्थ आणि तत्पदार्थ यांचा ऐक्य रूप जो अर्थत्याचे प्रतिपादन द्वारा ब्रह्मात्मैक्य रूप वाक्यार्थापरोक्ष ज्ञान हें तृतीय षट्कीं आरंभितात. पूर्वी "तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसार सागरात् भवामि" येणें करून माझे जे भक्त आहेत त्यांचा मृत्युरूप संसार समुद्रा पासून उद्धार करणारा मी होतों यास्तव तूं माझा भक्त हो असें सांगून भक्तांवर भगवंताचा लौकर प्रसाद होण्यास साधनभूत जे अद्वेष्टृत्वादिक धर्म त्यांचें अनुष्ठान मुमुक्षूंस अवश्य केलें पाहिजे असें ही जीवन्मुक्तांचे ते स्वाभाविक धर्म आहेत अशा कथनानें सूचविलें. परंतु आत्मस्वरूपाचे अज्ञाना मुळें जन्ममरण प्रवाह रूप संसार जीवासजो प्राप्त झाला आहे त्या पासून उद्धार- सच्चिदानंदाद्वितीय परब्रह्म तत्वाचें आत्मत्वें करून जें ज्ञान ज्यास आत्मतत्व ज्ञान म्हणतात त्याशिवाय संभवत नाहीं. जीवास जो अविद्या कल्पित संसार निमित्तक सर्वानर्थ प्राप्त झाला आहे त्यास मूलभूत देहादि संघाता त्मक किंवा त्याहून भिन्न, मीजड, मीकर्ता, मी भोक्ता, मी संगी, मी संसारी, मी अल्पज्ञ, मी दुःखी, मी सुखी, मी परब्रह्माहून भिन्नच आहें. असा स्वस्वरूपा ज्ञान मूलक भेद भ्रमच आहे. याची निवृत्ति होऊन पूर्वोक्त अनर्थ रूप संसार समुद्रा पासून तरण होण्यास पूर्वोक्त धर्मानुष्ठानें करून भगवद्भक्तीनें चित्त शुद्ध जरी झालें तरी ब्रह्मात्मैक्या परोक्षात्मक पूर्वोक्त तत्व ज्ञानच पाहिजे यास्तव अर्जुनास ब्रह्मात्मैक्योपदेश करावा असें मनांत आणून संसारी जीव प्रतिशरीरीं भिन्न भिन्न असतां त्याचा असंसारी एक अद्वितीय ब्रह्माशीं अभेद कसा संभवेल अशी असंभावना निवृत्त होण्यासाठीं संसार हा अविद्येनें कल्पित आहे आत्म्याचा धर्म नाहीं आत्मा असंग स्वभाव आहे आत्मभेद ही देहादिक उपाधी मुळें अविद्येनेंच भासविला आहे तो भेद वास्तविक नाहीं. सप्तमाध्यायांत ज्या अपर आणि पर प्रकृति सांगितल्या त्यांचे अविवेका मुळें जीवांस देहादिकांवर तादात्म्याभिमान होऊन हा संसार प्राप्त झाला आहे आणि ज्या परापर प्रकृतींच्या योगानें जीवांस कर्म फलोपभोग व्हावा यासाठीं ईश्वर सृष्टि आदिकां विषयीं प्रवृत्त होतो त्या प्रकृति द्वयास क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ अशी संज्ञा आहे त्यांचें परस्पर भिन्न भिन्न स्वरूप आहे- म्हणजे देहेंद्रियांतःकरणात्मक क्षेत्रांहून क्षेत्रज्ञ सर्व क्षेत्रांत निर्विकार एकच आहे. क्षेत्रें मात्र परस्पर भिन्न आहेत. असें अर्जुनास समजावें या साठीं क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचा विवेक या अध्यायांत सांगत असतां-

श्रीभगवान् बोलतात. हे कौंतेय, इदंशरीरं क्षेत्रं इति अभिधीयते- म्हणजे हे कुंतीपुत्रा अर्जुना, सुखदुःखानुभवरूप भोगाचें स्थानभूत इंद्रियें आणि अंतःकरण यांसकट जें हें शरीर त्यास क्षेत्र असें म्हणतात. धान्यादिकांची निष्पत्ति ज्या भूम्यादिकांचे ठायीं होते त्यास शालिक्षेत्र, गोधूमक्षेत्र, चणकक्षेत्र असें जसें म्हणतात. त्या प्रमाणें पूर्वार्जित शुभाशुभ कर्मफल सुखदुःखादिकांची निष्पत्ति जी या शरीरांत होते त्या फलनिष्पत्तिरूप गुणानें यास क्षेत्र असें म्हणतात. असें तात्पर्य- एतत् यो वेत्ति- म्हणजे या क्षेत्रास हें मीच आहें- किंवा माझें आहे असें जो असंग आत्मस्वरूपाचे अज्ञानामुळें मानितो- तं तद्विदः क्षेत्रज्ञ इति प्राहुः- म्हणजे त्यास क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचा परस्पर भेद आहे असें जाणणारे विवेकी तो क्षेत्र फलाचा भोक्ता आहे या कारणानें क्षेत्रज्ञ असें म्हणतात. ॥१॥

**क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ॥-**
**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥**

या प्रमाणें आत्मस्वरूपाचे अज्ञानामुळें देहादिक मीच किंवा तो माझा इत्यादिक अभिमानानें युक्त जो तो संसारी जीव असें त्याचें संसारिस्वरूप सांगून आतां पारमार्थिक असंसारि रूप त्याचें सांगून त्याशीं परमात्म्याचें ऐक्य सांगतात हे भारत सर्वक्षेत्रेषु क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि- म्हणजे हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना- सर्व क्षेत्रांचे ठायीं विद्यमान आणि अविद्येनें कर्तृत्व भोक्तृत्वादिक संसार धर्मांचा ज्यावर आरोप झाला आहे परमार्थतः अविद्या आणि अविद्येनें कल्पिलेले जे कर्तृत्वादिक धर्म त्यानीं रहित स्वप्रकाश चैतन्य स्वरूप नित्य विभु जो क्षेत्रज्ञ तो अविद्या कल्पितरूप त्यागानें असंसारी अद्वितीय- सच्चिदानंद परब्रह्म रूप मीच आहें असें जाण. या प्रमाणें क्षेत्र क्षेत्रज्ञ योर्यत् ज्ञानं- म्हणजे शरीरेंद्रिय संघात रूप क्षेत्र मायेनें कल्पिलेलें मिथ्या- आहे आणि क्षेत्रज्ञ तर परमार्थतः सत्यचित् आनंद अद्वितीय ब्रह्म स्वरूप असून त्या क्षेत्राचे भ्रमास अधिष्ठान आहे असें जें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचें तत्व निश्चयात्मक विवेक ज्ञान तेंच मोक्ष साधन त्वास्तव अविद्यानाश करणारें- ज्ञानं मतं मम- म्हणजे ज्ञान आहे याशिवाय दुसरें शिल्पादिकाचें ज्ञाना प्रमाणें पांडित्य मात्र रूप जें ज्ञान तें अविद्या नाशक नव्हे तें ज्ञान नव्हे तें अज्ञानच- आहे असें माझें सर्वज्ञ परमेश्वराचें मत आहे. येथें जीव आणि ईश्वर यांचा- अविद्येनें कल्पिलेला भेद घटाकाश महाकाशांच्या भेदा प्रमाणें औपाधिक आहे परमार्थतः अभेदच आहे. तो वेदांतील महावाक्यानें उपदेशिला आहे तो पू-

र्वी प्रकार लिहिला आहेच याविषयीं युक्ति भाष्यादिक ग्रंथांत वादविवादानीं सविस्तर परमत खंडन पूर्वक लिहिल्या आहेत. तो विस्तर समुद्रा प्रमाणें आहे यास्तव मुमुक्षूंनीं सारांश मात्र घ्यावा या साठीं तो वाद विवाद न लिहितां सिद्धांतार्थ मात्र लिहिला आहे. ॥२॥

## तत्क्षेत्रं यच्च यादृक्च यद्विकारि यतश्च यत्॥
## स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु॥३॥

संक्षेपानें जो अर्थ सांगितला त्याचेंच सविस्तर निरूपण करण्यास आरंभ करतात. तत् क्षेत्रं यच्च—म्हणजे "इदंशरीरं" या श्लोकानें सांगितलेलें जें शरीर रूप क्षेत्र स्वरूपें करून ज्या जड दृश्य परिच्छिन्न स्वभावाचें आहे आणि—या दृक्च—म्हणजे ज्या इच्छादि धर्मानीं युक्त आहे, आणि यद्विकारि म्हणजे ज्या इंद्रिया दिकां च्या विकारानें युक्त आहे आणि यतश्च यत् म्हणजे-स्थावर जंगम या भेदानें भिन्नभिन्न जें ज्या प्रकृति आणि पुरुष यांचे संयोग-रूप कारणा पासून उत्पन्न होतें. सच यः—म्हणजे तो क्षेत्रज्ञ ही स्वरूपें करून ज्या स्वप्रकाश चैतन्यानंदात्मक स्वभावाचा आहे. यत्प्रभावः—म्हणजे मायारूप उपाधीनें कल्पिलेल्या ज्या ज्या शक्तीनें युक्त आहे. तत्—म्हणजे हें जें क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचे सांगितलेले सर्व विशेषणानीं युक्त यथार्थ स्वरूप त्यापन-समासेन मे शृणु—म्हणजे संक्षेपानें मजपासून तूं श्रवण कर किंवा निश्चित कर. ॥३॥

## ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक्॥
## ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः॥४॥

कोणी विस्तरें करून निरूपण केलेल्याचा तुम्हीं येथें संक्षेप सांगतां असें म्हणेल तर श्रोतृ बुद्धीस रोचनार्थ जें सांगावयाचें त्याची स्तुति करून बोलतात. तें क्षेत्र क्षेत्रज्ञांचें यथार्थस्वरूप ऋषिभिः बहुधागीतं—म्हणजे वसिष्ठादिक ऋषींनीं योगशास्त्रांत आणि योगवासिष्ठादिकांचे ठायीं ध्यान धारणा विषयत्वें करून आणि विराट् देह रूपानें अशा बहुत प्रकारानीं निरूपिलें आहे आणि विविधैः छंदोभिः पृथक् गीतं—म्हणजे नित्य नैमित्तिक कर्म प्रतिपादन करणारे जे वेद किंवा ऋगादिक मंत्र आणि ब्राह्मण यानीं यजन करण्यास योग्य ज्या देवता आणि यजन करणार यजमान यांच्या अनेक प्रकारच्या रूपानीं गायिलें किंवा निरूपिलें आहे. आणि ब्रह्मसूत्र पदैश्च बहुधा गीतं म्हणजे ब्रह्म बोधक जीं सूत्रें आणि पदें यानीं जें बहुत प्रकारें निरूपिलें आहे. पूर्वोक्त शाखा चंद्र न्यायानें कांहीं व्यवधान करून तटस्थ लक्षणानें ब्रह्मस्वरूपाचें सूचन रू-

प बोधन करतात. अशीं हीं भूतें ज्या पासून उत्पन्न होतात किंवा ज्यापासून-उत्पन्न झालीं आहेत. किंवा ज्याचे सत्तेनें युक्त होऊन अस्ति या व्यवहारास योग्य होणें अशा स्थितीप्रत पावतात आणि लय पावत असतां ज्याचेच ठायीं लय पावतात. म्हणजे आपलें नामरूपात्मक व्यक्त स्थूल रूप टाकून अव्यक्त कारण रूपानें स्थित होतात तें ब्रह्म असें जगदुत्पत्ति स्थिति लय कारणत्वरूप तटस्थ ब्रह्म लक्षण सांगणारीं वेदांतील सर्व कारण वाक्यें तीं ब्रह्मसूत्रें म्हणावीं. आणि साक्षात् स्वरूप लक्षणानें ब्रह्मस्वरूपाचें बोधन करतात. अशीं जीं ब्रह्म सत्य आहे ज्ञानरूप आहे आनंदस्वरूप आहे असें सच्चिदानंदात्मक मिथ्या जड दुःखाहून भिन्न ब्रह्मस्वरूपाचें लक्षण सांगणारीं वेदांतांतील ब्रह्मस्वरूप प्रतिपादन करणारीं वाक्यें तीं पदें म्हणावीं. तीं ब्रह्मसूत्रें आणि ब्रह्मपदें कशीं तीं विशेषणानीं सांगतात.-हेतुमद्भिः-म्हणजे लक्षणानीं ज्याचें प्रतिपादन करावयाचें आहे तें ब्रह्म या जगाचे पूर्वीं सद्रूप सजातीय स्वगत भेद रहित एक अद्वितीय कारण रूपानेंच होतें त्यास जग करावें असा संकल्प होऊन त्यापासून हें सर्व जग उत्पन्न झालें असें सांगून सृष्टी पूर्वीं या जगास कारण कांहीं नव्हतें. जगउत्पत्तीचे पूर्वीं अत्यंत असत्च होतें म्हणजे या जगाचें स्थूल किंवा सूक्ष्म रूप कांहीं नव्हतें असें कोणी बोलतात. असा शून्यवादी किंवा असद्वादी यांचे मताचा अनुवाद करून त्या मताचें निराकरण करण्या करितां जें कार्य उत्पन्न होतें तें आपले उपादान कारणाशीं सजातीयत्व उत्पन्न होतें. जसें मृत्तिके पासून उत्पन्न झालेलें घट रांजण इत्यादिक कार्य मृन्मयच होतें. सुवर्णापासून उत्पन्न झालेलें कटक कुंडलादिक सुवर्णरूप होतें. अत्यंत विजातीय होत नाहीं याप्रमाणें हें उत्पन्न झालेलें जग सद्रूपें करून म्हणजे-अस्ति- आहे. अशा व्यवहारांत सत्तेनें युक्त जें भासतें तें सद्रूप कारणा पासूनच उत्पन्न झालें असावें- असता पासून सत् कसें उत्पन्न होईल. यास्तव या जगास सृष्टी पूर्वीं कारण जें सद्रूप आहे तेंच ब्रह्म आणि ब्रह्म आनंदात्मस्वरूपच आहे त्या आनंदात्मक ब्रह्मापासून आकाशादिक पंच महाभूतें आणि भौतिक स्थूल सूक्ष्म देहेंद्रिया दिकांची उत्पत्ति झाली-असें सांगून या सृष्टीस उत्पन्न करणारा सृष्टीचे पूर्वीं आसमंतात् भागीं प्रकाश पावणारा ब्रह्मात्म स्वरूप आनंद नसेल तर कोण प्राणी अपान आणि प्राण वायूंच्या व्यापारानें युक्त होईल हाच सर्व प्राण्यांस जो विषय संबंधी आनंद प्रतिबिंब रूप होतो त्यास मूल कारण बिंबरूप आनंद आहे. अशा ब्रह्म सत्तेचें व्यवस्थापन करणाऱ्या ज्या युक्ति त्या युक्तींनीं युक्त तीं पूर्वोक्त ब्रह्मसूत्रें आणि ब्रह्मपदें आहेत. आणि-विनिश्चितैः-म्हणजे उपक्रम (आरंभ) आणि उपसंहार म्हणजे समाप्ती हें ज्यांचें एकरूप म्हणजे अद्वितीय सद्रूप एकच ब्रह्मात्मतत्व आ-

हे याविषयींचे आहेत यामुळें निःसंशय जें ब्रह्मात्मैक्यरूप मुमुक्षूनीं ज्ञेयार्थ-त्याचें प्रतिपादन करणारीं तीं ब्रह्मसूत्रें आणि ब्रह्मपदें आहेत. उपक्रम आणि उपसंहार यांचें ऐक्य रूपामुळें निःसंशय अद्वितीय ब्रह्मात्म तत्व बोध कोणत्या वाक्या पासून होतो त्याचें ज्ञान होण्यास संक्षेपानें छांदोग्यांतील सद्विद्येचें उदाहरण येथें लिहितों. उद्दालक नामक ऋषीचा पुत्र श्वेत केतू आपले गुरु कुला पासून सकल वेदादिक विद्येचा अभ्यास करून आपले पित्याचे घरीं आला. तो निरंतर स्तब्धमानीच होऊन राहिला. त्याची स्तब्धता जावी या हेतूनें उद्दालकानें त्यास आरंभीं प्रश्न केला कीं, जें वस्तु उपदेशानेंच समजतें त्याचे ज्ञानानें न जाणलेलें ही जाणलें जातें. न ऐकलेलें ही ऐकलें जातें असें वस्तु आपले गुरूपासून समजून घेतलेंस काय? अशा प्रश्नानें एका कारणाच्या ज्ञानानें सर्वकार्याच्या कारण स्वरूपानें ज्ञानाची प्रतिज्ञा करून त्या वस्तूचा उपदेश करण्यास आरंभ केला. त्या आरंभीं हें सर्व नामरूपें करून व्यक्तीस पावलेलें दृश्यमान जग सृष्टीचे पूर्वीं एक अद्वितीय सद्रूपच होतें तें या जगानें बहुत रूपानें विस्तार व्हावा हें जग उत्पन्न करून या जीवात्म रूपानें त्यांत प्रवेश करून नाम आणि रूप यांहीं करून या जगास स्पष्ट व्यवहारास योग्य करीन असा संकल्प करतें झालें नंतर सद्रूप उपादान कारणा पासून या सर्व प्रजा उत्पन्न झाल्या त्या सद्रूपाधिष्ठान सत्तेनेंच सत्तेस पावल्या आहेत. याचें लयस्थान सद्रूपच आहे असें सांगून नंतर जसें एका मृत्पिंडाचे ज्ञानेंकरून मृन्मय विकार जे घट रांजण इत्यादिक ते मृत्तिका स्वरूपानें जाणले जातात. तो विकार केवळ वाणीनें उत्पन्न होणारे घट शराव, रांजण इत्यादिक नाममात्र आहेत परंतु त्या नामांचा मृत्तिके शिवाय दुसरा अर्थ आहे असें नाहीं त्या शब्दाचा-मृत्तिका हाच सत्य अर्थ आहे अशा प्रकारच्या अनेक दृष्टांतानीं उपादान स्वरूप जाणलें म्हणजे त्या उपादान स्वरूपानें उपादेय सर्व कार्य स्वरूप ज्ञात होतें असें-दाखवून याप्रमाणें जगास कारण तें सद्वस्तु आहे. ज्या उपादान कारण सद्रूप वस्तूच्या ज्ञानानें हें सर्व जग अस्ति आहे. अशा सत्तेनें निरनिराळे नामरूपानें व्यवहारास येतें. वस्तुतः सद्रूपाहून निराळें पाहिलें असतां असत् मिथ्याच आहे. असें सद्रूप ब्रह्म ज्ञानानें सद्रूपानें सर्व जगाचें ज्ञान मध्यें सांगून अंतीं हें सर्वजग ऐतदात्म्य म्हणजे सद्रूप जो आत्मा तत्स्वरूपच आहे हा आत्मा ज्याचा तो-एतदात्मा त्याचा जो भाव तें ऐतदात्म्य असा बहुव्रीहि समास करून नंतर भाव प्रत्यय करावा. भावप्रत्ययाचा प्रकार भूत जो प्रकृतीचा अर्थ तो अर्थ आहे. या वरून एतदात्मा या बहुव्रीही समास प्रतिपाद्य एतदात्म संबंधीं असा अर्थ त्यांतील सद्रूप प्रकार भूत जो आत्मा तो ऐतादात्म्य शब्दाचा अर्थ आहे हा आत्मा हें सर्वजग असें म्हटल्यानें, ही हा अर्थ निष्पन्न होतो तथापि असें म्हणणें

हा महदात्मा अशा आत्मात्मीय भाव संबंध स्थलीं ही संभवतें तसा जगाचा आणि आत्म्याचा संबंध नाहीं असें रूचवण्या साठीं बहुव्रीही आणि भाव प्रत्यय असा प्रयत्न केला. त्यामुळें जर आत्मात्मीय भाव रूप संबंध येथें विवक्षित आहे तर त्याचा बोध बहुव्रीहीनें, ही होतो. मग भावप्रत्यय निराळा केला याचें वैयर्थ्य येईल यामुळें ती शंका गेली तरी-हा आत्मा ज्याचा अशा बहुव्रीहींत हा आत्मा असें जें पदांचें सामानाधिकरण्य आहे तें-मृत् घटः-येथें जसें परिणाम रूपार्थी आहे किंवा-यत् रजतं इति अभात् साशक्तिः यः चोरः सः स्थाणुः-येथें जसें बोधार्थी ही-आहे त्यांतून कोणते अर्थी आहे असा संशय होऊं नये यास्तव त्याचा निर्णय करण्या साठीं तें सत्य या अर्थाचें वाक्य आहे त्यांतील तत् या शब्दाचा प्रकृत जो सद्रूप प्रधान भूत आत्मा तो अर्थ तेव्हां तो आत्माच सत्य असें त्याणें सिद्ध झालें यावरून जगरूप विकार अनृत मिथ्या असा अर्थ निष्पन्न झाल्यानें तें सामानाधिकरण्य बाधार्थी आहे असा निश्चय होऊन जसा पूर्वोक्त उदाहरणीं जें रजत म्हणून भासलें तें रजत नव्हे. तर शक्ति असा रजताचा बाध होऊन शक्तितत्व त्या वाक्याचा-अर्थ किंवा दुरून उंच पदार्थ पाहून हा चोर असा जो भासला होता तो चोर नव्हे तर स्थाणु म्हणजे वृक्षाचा खुंट आहे असा चोराचा बाध होऊन स्थाणूची सत्ता असा त्या वाक्याचा अर्थ होतो. त्या प्रमाणें जें हें भिन्न भिन्न सत्तेनें नामरूपात्मक जग भासत होतें तें सद्रूप आत्माच आहे असा जगाचे सत्तेचा बोध होऊन सद्रूपात्म सत्ता असा त्या वाक्याचा अर्थ होतो. नंतर तो सद्रूप आत्मा तूंच आहेस असा श्वेतकेतूला शेवटीं ब्रह्मात्मोपदेश केला असा आरंभीं आणि मध्यें आणि अंतीं ब्रह्मात्मैक्य रूप एकच अर्थ सांगितला यावरून सर्व सद्विद्येचें अद्वितीय ब्रह्मात्मैक्य प्रतिपादन करण्या विषयीं तात्पर्य आहे असा विचार वंतांस निर्णय होतो. यास विद्येचें तात्पर्य जीव आणि ईश्वर भिन्न आहेत, जग सत्य आहे. या विषयीं चेंच आहे. असें उपक्रम आणि उपसंहार यांचे क्लिष्ट कल्पनेनें निराळे आपले पक्षास साधक अर्थ करून वर्णन करतात. परंतु ते वास्तविक नव्हेत. असें समजण्या साठीं श्री वेद व्यासानीं सद्विद्येचे मोक्षधर्मात श्वेत केतु आणि सुवर्चला यांचे संवाद रूपानें उपबृंहण म्हणजे व्याख्यान लिहिलें आहे त्याचें संक्षेपानें येथें वर्णन करतों म्हणजे त्यांचें तें वर्णन दुराग्रहामुळें असें स्पष्ट होईल. सुवर्चला नामक देवकन्या जन्मांतर सिद्ध ब्रह्म तत्वानुभव जीस झाला आहे अशी होती. ती आपले सारखा ब्रह्मवेत्ता पति आपणास असावा असें इच्छून श्वेतकेतूस त्याचे पित्या पासून ब्रह्मात्मतत्वबोध झाला आहे असें ऐकून त्यास तिनें पतित्वें करून वरलें. नंतर ब्रह्मवेत्तों तीं दंपतीं गृहस्थाश्रम धर्मानीं-युक्त असतां सद्विद्येचे ठायीं उद्दालकानें वारंवार ब्रह्मतत्वोपदेश केलेला श्वेत-

केतु ब्रह्मात्म तत्त्व कसें जाणतो हें समजण्याचे इच्छेनें सुवर्चलेनें श्वेत केतूस प्रश्न केला तो असा-" ततः कदाचित् भर्तारं श्वेतकेतुं सुवर्चला॥ पप्रच्छ कोभवानत्र ब्रूहि मे द्विज सत्तम" हे द्विजश्रेष्ठा तूं कोण आहेस असा आपले भर्त्यास सुवर्चलेनें प्रश्न केला, त्या प्रश्नाचा अभिप्राय श्वेत केतूनें जाणून ही एकाएकीं उत्तर न देतां क्रमानें उत्तर द्यावें अशा तात्पर्यानें-" तामाह भगवान् वाग्मी त्वया ज्ञातो न संशयः॥ द्विजोत्तमोहं सुभगे सत्य व्रत परायणः॥" हे द्विजोत्तम असें मला संबोधन करणारी जी तूं इणें मी ब्राह्मण सत्यव्रत परायण आहें असें जाणलेंच आहे तेव्हां यांत प्रष्टव्य (प्रश्नयोग्य) काय आहे असें उत्तम बोलणार ब्रह्मवेत्ता जो श्वेत केतु यानें उत्तर दिलें नंतर " सातमाह महात्मानं पृच्छामि त्वदिशायिनं॥" देहोपाधि रूप निमित्तानें आत्म्यावर कल्पिलेलें जें देहावरील प्रत्यक्ष ब्राह्मण्य त्या विषयीं माझा प्रश्न नाहीं तर मी द्विजोत्तम आहें असा जो देहाहून निराळा आत्मा अहं म्हणजे मी या शब्दानें सांगतोस त्या हृदयांत शयन करणाऱ्या आत्म्या विषयीं माझा प्रश्न आहे असें सुवर्चला बोलली. नंतर "तच्छ्रुत्वा प्रत्युवाचेतां सर्वज्ञो मुनि पुंगवः" तें ऐकून तो सर्वज्ञ मुनिश्रेष्ठ श्वेतकेतू सुवर्चलेप्रत वक्ष्यमाण प्रत्युत्तर बोलला." मनसेव समायुक्तमात्मानं मन्यसे यदि॥ तन्मिथ्या गोत्र सद्भावे वर्तते देह बंधनः॥ त्वमप्यहमहं सर्व महमित्येव वर्तते॥ आत्र तत्पर मार्थं तद्यान्मांत्व मनुपृच्छसि॥" मन आदिकं उपाधीनीं युक्त जें आत्मस्वरूप त्याचे ठायीं अहं या शब्दाचा प्रयोग मुख्य आहे. मन आदिक उपाधीनीं युक्त जें लोकानीं मानलेलें आत्मस्वरूप तें ब्राह्मण कुलोत्पन्न देहाचे उपाधीनीं आत्म्यावर कल्पिलेले ब्राह्मण्या प्रमाणें मिथ्यात्व आहे यास्तव अहं शब्दार्थ मुमुक्षूस प्रश्न करण्यास योग्य नाहीं आणि अहंभाव माझे ठायीं आणि तुझे ठायीं आणि दुसऱ्याचे ठायीं ही साधारण प्रत्यक्षच आहे यास्तव परमार्थ वस्तूचे जाणण्याची इच्छा जर तुला आहे तर अहंभाव प्रश्नार्ह नाहीं असें प्रत्युत्तर श्वेतकेतूनें दिलें. नंतर कर्तृत्व भोक्तृत्वादि युक्त अहंभाव जर मिथ्या आहे तर कर्तृत्व ज्ञान पूर्वक श्रौतस्मार्त रूप वैदिक कर्म तूं कसें करतोस असा सुवर्चलेनें प्रश्न केल्या नंतर लोक संग्रहार्थ मी कर्म करतों. असें उत्तर श्वेत केतूनें दिलें. नंतर अहं या शब्दाचा प्रयोग सर्व अहं भावावर करतात. तोच त्याचा मुख्य वाच्यार्थ आहे मुख्य आत्मा तर शब्दाला अगोचर आहे त्यावर वाणीची प्रवृत्ति नाहीं असें श्वेत केतूनें सांगितल्यानंतर पुनः त्या दंपतीचीं प्रश्नोत्तरें प्रवृत्त झालीं. सुवर्चला प्रश्न करते-" सदाहंकार शब्दोयं व्यक्तमात्मनि संश्रितः॥ न वाचस्तत्र वर्तंत इति मिथ्या भविष्यति॥" शब्दाचा आणि अर्थाचा वाच्य वाचक भाव संबंधच आहे संयोगादिक नाहीं तेव्हां सर्व अहं शब्दाचा प्रयोग आत्म्यावर लौकि-

कव्यवहारांत करतात असें असून आत्म्याचे ठायीं शब्दाची प्रवृत्ति नाहीं असें मिथ्या कसें सांगतां असा रूवर्चलेनें प्रश्न केला. त्यावर "अहंशब्दो त्वहंभावे नात्मभावे शुभप्रभे॥ नवर्तते परेचिंत्ये वाचः सगुण लक्षणाः॥" अहंशब्द अहंभावाचे ठायीं प्रवृत्त होतो. गुणकर्मजाती या धर्मांचे संबंधानें प्रवृत्त होणाऱ्या वाणी-निर्धर्मक, निर्गुण, निष्क्रिय, अचिंत्य, परमात्म तत्वाचे ठायीं प्रवृत्त होत नाहींत. असें श्वेतकेतूनें उत्तर दिलें. नंतर "अहंभावोत्रको नाम त्वात्मभावस्तथैवच॥ तन्मेब्रूहि यथान्याय मेवंचेन्मुनिसत्तम॥" असें आहे तर अहंभाव तो कोणता आणि त्याहून भिन्न आत्मभाव तो कोणता तें मला मुनिश्रेष्ठा सांग. असें रूवर्चलेनें पुसल्यानंतर "मृन्मयो हि घटाभासस्तादृक् भाव इहेष्यते॥ अहंभावः परेचिंत्ये त्वात्मभावो महान्परः॥ नवाच स्तत्र वर्तते इति नैव विरुध्यते-" मृत्तिकेचे ठायीं घट हा जसा आभास मिथ्या कल्पिला आहे तसा असंग आत्मस्वरूपाचे ठायीं अहंभाव हा आभास मिथ्याभूत कल्पिला आहे॥ असा अहं या शब्दाचा अर्थ आणि आत्मा यांचा भेद दाखवून कल्पिताकार रूप उपाधीला घेऊन प्रवृत्त जो अहं शब्द तो आत्मस्वरूपाचे ठायीं मुख्य वृत्ती करून राहत नाहीं. तेथें लक्षणेनेंच ज्ञाने लौकिक वैदिक व्यवहारांत त्याचा उपयोग करतात. हें पूर्वी अहं शब्दाचे एक मुख्य अर्थ आणि दोन अमुख्य अर्थ असें प्रतिपादन केलें आहे तेथें सविस्तर लिहिलेंच आहे. या वरून मुख्य वृत्तीनें कोणती ही वाणी आत्मस्वरूपाचे ठायीं राहत नाहीं हें विरुद्ध नाहीं: सर्व शब्दांची शुद्ध आत्मस्वरूपावर लक्षणाच आहे असें तात्पर्य सांगून याचा उपसंहार केला नंतर आत्मा अहंकाराहून भिन्न आहे तो सर्व प्रपंचास अधिष्ठानभूत ब्रह्मरूप आहे असें श्वेतकेतूनें सिद्ध करून आकाश सर्व वाय्वादिकांस आश्रय असलें तरी निरवयत्वास्तव असंग स्वभावामुळें वायु आदिकांशीं असंबद्धच आहे या प्रमाणें सर्व प्रपंचास अधिष्ठान भूत ही परब्रह्म असंगत्वामुळें प्रपंचाशीं असंबद्ध आहे असें श्वेतकेतूनें प्रतिपादन केल्यानंतर पुनः प्रश्नोत्तरें प्रवृत्त झालीं. रूवर्चला-" निर्विकारं त्वमूर्तंच निरंशं सर्वगं तथा॥ दृश्यतेच वियन्नित्यं तादृगात्मा नदृश्यते॥" निर्विकार निरवयव क्रियाशून्य सर्वव्यापक आकाश जसें दिसतें तसा आत्मा कां दिसत नाहीं असा रूवर्चलेनें प्रश्न केल्यावर श्वेतकेतु-" त्वचा स्पृशति वै वायु माकाशस्थं पुनः पुनः॥ तत्रस्थं गंधं तथा घ्राति ज्योतिः पश्यति चक्षुषा॥ तमो रश्मिगणं चैव मेघजालं तथैवच॥ वर्षं तारागणं चैव नाकाशं दृश्यते पुनः॥ आकाशस्याप्यथा काशं सद्रूप मिति निश्चितं॥ सदर्थे कल्पितं सर्वं तत्सत्यं विष्णुरेवच॥ यानि नामानि गौणानि त्युपचारात्परात्मनि॥ नचक्षुषा न मनसा नचान्येन स्परो विभुः॥ चिंत्यते सूक्ष्मया बुध्या वाचा वक्तुं नशक्यते॥ एतत्प्रपंच मखिलं

तस्मिन्नेव प्रतिष्ठितं-" आकाशांत राहणारा जो वायु त्याचा त्वचेनें स्पर्श प्रत्यक्ष होतो. आकाशांतील तेजाचें- तमाचें सूर्य किरणांच्या समुदायाचें, तारागणाचें, दृष्टीनें चक्षूनें प्रत्यक्ष होतें. हे पदार्थ निराळे करून त्याशिवाय आकाशाचें प्रत्यक्ष होत नाहीं आणि आकाशावर रूप आणि स्पर्श नाहींत यामुळें-त्याचें कोणतेंही इंद्रियानें प्रत्यक्ष होतच नाहीं त्याचें शब्दरूप विशेष गुणानें-अनुमान मात्र होतें असेंच तार्किकादिक मानतात. लौकिक आकाशाची ही-गति मग आकाशापेक्षांही सूक्ष्म जें अरूप अशब्द अस्पर्श सद्रूप ब्रह्मात्मवस्तु तें चक्षुरादिक इंद्रियांनीं कसें प्रत्यक्ष होईल. त्या सत्‌रूप ब्रह्माचे ठायीं हें सर्व विश्व कल्पिलेलें आहे तेंच सद्वस्तु सत्य आणि सर्वव्यापक आहे त्याचें शुद्ध सूक्ष्म बुद्धीनें चिंतन होतें. वाणीनें तें बोलण्यास शक्य नाहीं. जीं कल्पित गुणाचे योगानें परमात्म्याचे ठायीं नामें आहेत तीं लाक्षणिक आहेत. त्याची मुख्य वृत्ति म्हणजे वाच्यता असंग निर्धर्मक आत्मस्वरूपाचे ठायीं नाहीं असें-श्वेतकेतूनें उत्तर दिलें. या प्रश्नोत्तर परंपरेंत-"मृन्मयो हि घटाभासं तादृक्‌भासइहेष्यते-" येणें करून वाचारंभण श्रुत्यर्थ जो येथें लिहिला तो स्पष्ट केला आहे. सद्रूपं येणें करून अहमर्थाहून भिन्न आत्मा कोण असा ज्या विषयीं प्रश्न केला त्या आत्मस्वरूपास सद्रूप ब्रह्मता सांगितली. येणें करून श्वेतकेतूस जो-तूं सद्रूप आत्मस्वरूप ब्रह्म आहेस-असा महावाक्यानें उपदेश केला तो ब्रह्मात्मैक्य रूप महावाक्यार्थ स्पष्ट केला आणि" सदर्थे कल्पितं सर्वं तत्सर्वं विष्णुरेवच-" येणें करून ब्रह्मात्मैक्यरूप महावाक्यार्थ बोधास अनुकूल हें जग ऐतदात्म्यच आहे तें सद्रूपच सत्य आणि आत्मा आहे. असा जो सद्विद्येंत सांगितलेला अर्थ तो स्पष्ट करून दाखविला. या उपबृंहणात्मक व्याख्यानरूप सद्विद्येचे व्याख्यानानें सद्विद्येंतील उपक्रम आणि उपसंहार अद्वितीय निष्प्रपंच ब्रह्म आणि जीव यांचें ऐक्य प्रतिपादना विषयींचेच आहेत. असें सिद्ध होतें अथवा " अथातो ब्रह्मजिज्ञासा " यास आरंभ करून " अनावृत्तिः शब्दादनावृत्तिः शब्दात् " एतदंत जी चतुरध्यायी उत्तर मिमांसा जीस ब्रह्ममीमांसा असें ही म्हणतात. ती सूत्रात्मक आहे. तीं सूत्रें ब्रह्म प्रतिपादन करितात. म्हणून त्या सूत्रांस ब्रह्मसूत्रें म्हणतात. तद्रूप म्हणजे त्या सूत्रात्मक जीं पदें म्हणजे जगाच्या उत्पत्ति स्थिति लयांस कारण जें अद्वितीय परब्रह्म तेंच वेदांत प्रतिपाद्य आहे अशा प्रकारानें परब्रह्म प्रतिपादन करणारीं अशा ब्रह्मसूत्रात्मक पदानीं जें-क्षेत्र क्षेत्रज्ञ स्वरूप उत्तम विचारात्मक मीमांसेनें प्रतिपादिलें आहे तीं पदें कशीं आहेत तें सांगतात. हेतुमद्भिः-पूर्वोक्त प्रकाराचीं प्रतिपादन करण्यास जे हेतु तद्वाचक पंचम्यादि विभक्तीनीं युक्त आणि विनिश्चितैः- संशय पूर्वपक्ष सिद्धां-

त दाखवून विवक्षित (इष्ट) पूर्वोक्त अर्थाचा निश्चय करून देणारीं अशीं आहेत. ते हेतु कसे त्यांचें स्वरूप समजण्या साठीं " ईक्षतेर्नाशब्दं " या सूत्रांतील हेतूचें निरूपण येथें संक्षेपानें लिहितों "अथातो ब्रह्मजिज्ञासा" या प्रथमसूत्रें करून शमदमादिसाधन संपन्न जो मुमुक्षु त्याणें मोक्ष साधनभूत जें ब्रह्मात्मापरोक्ष ज्ञान त्याचे प्राप्ती विषयीं वेदांत वाक्यांनीं ब्रह्मात्म विचार करावा असें सांगून नंतर ब्रह्म लक्षण समजल्या शिवाय ब्रह्मविचार होणार नाहीं या साठीं "जन्माद्यस्य यतः" या द्वितीय सूत्रानें ज्या सत्य ज्ञानानंदात्मक ब्रह्मा पासून या जगाची उत्पत्ति स्थिति प्रलय होतात. तें ब्रह्म असें जगदुत्पत्ति स्थिति लय कारण स्वरूप तटस्थ लक्षण आणि सत्यज्ञानानंदात्मक ब्रह्म असें स्वरूपलक्षण सांगितलें या दोन लक्षणांचा विचार विस्तरानें पूर्वीं लिहिलाच आहे. लक्षण सांगितल्या नंतर ब्रह्म जगाचे उत्पत्ति स्थिति लयांस कारण सच्चिदानंदात्म स्वरूप आहे याविषयीं शास्त्र म्हणजे वेदच प्रमाण आहेत. असें "शास्त्र योनित्वात्" या सूत्रानें सांगितलें नंतर जगदुत्पत्ति स्थिति लयांस कारण सत्य ज्ञानानंदात्मक जसें ब्रह्म वेदांतांत सांगतात तशा ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान ज्यास आहे तो अग्निहोत्रादिक वैदिक कर्म करण्यास प्रशस्त अधिकारी असें कर्मांगत्वें करून किंवा वेदांतांतील ज्या उपासना आहेत त्यांचें उपास्य ब्रह्म या लक्षणाचें आहे असें उपासनांचे अंगत्वें करूनच ब्रह्माचें निरूपण केलें आहे. प्राधान्यें करून निरूपण केलें नाहीं असें मीमांसादिक म्हणतात. त्यांचे मताचें निराकरण करण्या साठीं- "तत्तु समन्वयात्" या चतुर्थ सूत्रानें ब्रह्म वेदांतांत स्वप्राधान्यें करून सांगितलें आहे. कर्मशेषत्वें करून म्हणजे कर्मांगत्वें करून किंवा उपासनांगत्वें करून सांगितलें नाहीं. कारण उपक्रम उपसंहारादिक जीं तात्पर्य निर्णयाला कारण लिंगें आहेत त्या वरून स्व प्राधान्ये करूनच सर्व वेदांत ब्रह्म प्रतिपादन करतात. असें निश्चित आहे असें सांगितलें. नंतर सद्विद्या जगत्कारणत्वें करून सृष्टि पूर्वकालीन साम्यावस्था युक्त गुणत्रय रूप प्रधान स्वरूपाचेंच प्रतिपादन करते तेव्हां सर्व वेदांत कारणत्वें करून ब्रह्मप्रतिपादन करतात. हें संभवत नाहीं अशी सांख्याचे मतानें शंका आली तीचें निराकरण करण्या साठीं "ईक्षतेर्नाशब्दं" असें सूत्र केलें त्या सूत्रांत पूर्वोक्त - "तत्तु समन्वायात्" या सूत्रांतील तत् या शब्दाची अनुवृत्ति करावी. प्रधानं या शब्दाचा अध्याहार करावा म्हणजे तें पद बाहेरचें घ्यावें म्हणजे प्रधान- तत्- म्हणजे जगत्कारणत्वें करून सद्विद्या प्रतिपाद्य नव्हे यास हेतु अशब्दं म्हणजे सद्विद्येंतील जगत्कारणाचा वाचक जो तत् हा शब्द तत् प्रतिपाद्यत्व प्रधानास नाहीं यावरून प्रधानास तत् शब्द प्रतिपाद्यत्व कां नाहीं असें म्हणाल तर

त्या विषयीं हेतु - ईक्षतेः - म्हणजे तत् या शब्दाला "तत् ऐक्षत" असा ईक्ष-धातूचा योग आहे यास्तव जगाचें कारणाचा वाचक तत् या शब्दाचा जर प्रधान अर्थ होईल तर ईक्ष धातूच्या जो आलोचन किंवा संकल्परूप अर्थ त्याचा अन्वय त्यावरच होईल आलोचन किंवा संकल्प हे चेतनाचे धर्म आहेत हे जड प्रधानावर संभवत नाहींत यास्तव तत् या शब्दाचा अर्थ प्रधान नव्हे तर चेतन ब्रह्मच आहे असा हेतु या सूत्रांत सांगितला आहे. असें पुढें ही प्रति सूत्रीं हेतू दाखवून सर्व वेदांतांत जगत्कारणत्वें करून सच्चिदानंदाद्वय ब्रह्मच प्रतिपाद्य आहे. जीव किंवा जड प्रकृति प्रधानादिक प्रतिपाद्य नाहींत असें त्या सूत्रानीं निश्चित केलें आहे. ॥४॥

**महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ॥ इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः॥५॥ ॥**

याप्रमाणें श्रवणेच्छा उत्पन्न करून अर्जुनास क्षेत्रस्वरूप सांगतात. महाभूतानि - म्हणजे पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हीं पंच महाभूतें अहंकार पंचमहाभूतांस कारणभूत अभिमान स्वरूप बुद्धि अहंकारास कारणभूत अध्यवसाय म्हणजे निश्चय त्यास तत्त्व महत्तत्त्व असें म्हणतात. अव्यक्त एव बुद्धीस कारण भूत सत्व रज तमोगुणात्मक प्रधान सर्व जगाचें कारण तें कोणाचें ही कार्य नव्हे एव कारानें हे आठ पदार्थच प्रकृती अशी सांख्य मतानें यांची व्याख्या ही वेदांत्यास मान्य नाहीं. सांख्यमतसिद्ध सांगितलेले स्वरूपाचें अव्यक्त महत्तत्त्व अहंकार हे पदार्थ वेदप्रतिपाद्य नाहींत असें वेदांती म्हणतात. यास्तव वेदांत्यांचे मतानें यांची व्याख्या अशी करावी. प्रकृतीस माया- असें म्हणावें. मायोपाधिक जो त्यास ईश्वर असें जाणावें अशा अर्थाच्या श्रुतींत जी माया सांगितली आहे ती अव्याकृत अनिर्वचनीय माया एथील अव्यक्त शब्दाचा अर्थ तीच "मम माया दुरत्यया" येणें करून भगवंतानीं गीतेंत ही सांगितली आहे. सृष्टीचे आरंभीं त्या माये विषयीचें जें ईक्षण-म्हणजे पाहणें जें सद्विद्येंत "तत् ऐक्षत" म्हणजे तें सद्रूप ब्रह्म ईक्षण करतें झालें असें सांगीतलें तें बुद्धि-या शब्दाचा अर्थ- अहंकार- ईक्षणानंतर मी बहुतरूपानें उत्पन्न होईन असा-जो जगाचें कारणभूत सद्ब्रह्माचा बहुभवन संकल्प तो अहंकार शब्दाचा अर्थ त्या संकल्पानंतर पृथिव्यादिक पंचमहाभूतांची आकाशादि क्रमें करून उत्पत्ति इंद्रियाणि दशैकंच- श्रोत्र, त्वक्, चक्षु, रसनं, घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें-आणि वाक्, पाणि, पाद, पायू, उपस्थ हीं पांच कर्मेंद्रियें अशी दहा इंद्रियें आणि एक एक संकल्प विकल्पात्मक मन आणि - पंचच इंद्रिय गोचराः शब्द, स्पर्श, रूप-

रस, गंध असे पांच पांच ज्ञानेंद्रियांचे विषय यांसच सांख्य चतुर्विंशति तत्वें असें म्हणतात. ॥ ५ ॥

इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः॥
एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम्॥ ६॥

इच्छा म्हणजे सुखाविषयीं किंवा सुखाचे साधनाविषयीं मला हें असावें अशी स्पृहारूप चित्ताची वृत्ति तिलाच काम किंवा राग असें म्हणतात. द्वेषः म्हणजे दुःखाविषयीं किंवा त्याचे साधनाविषयीं हें मला नसावें अशी पूर्वोक्त स्पृहेला विरोधी चित्ताची वृत्ति जीस क्रोध किंवा ईर्ष्या म्हणतात. सुखं म्हणजे पुण्याख्य धर्मच मुख्य कारण जीस आहे आणि सुखासाठीं दुसऱ्याची इच्छा होते सुखाविषयींची इच्छा सुखार्थच होते अशी निरुपाधिकच इच्छा जी विषयीं आहे अशी ज्या सुखाकार वृत्तींत परमात्मरूप प्रतिबिंबित होतें अथवा ज्या वृत्तीनें परमात्मस्वरूप सुखाची अभिव्यक्ति होते ती वृत्ति दुःख म्हणजे निरुपाधिक द्वेषांत विषय आणि पापस्वरूप अधर्मच जीचे उत्पत्तीस मुख्य कारण आहे अशी चित्ताची-वृत्ति संघातः- म्हणजे पंचमहाभूतांचा जो परिणाम म्हणजे इंद्रियें आणि शरीर यांचा विलक्षण संबंधरूप समुदाय चेतना म्हणजे ब्रह्मस्वरूप ज्ञानाची जींत अभिव्यक्ति होते अशी जी इंद्रियादिक प्रमाणांचे द्वारा होणारी विषयाकार अंतःकरण वृत्ति जीस तार्किकादिक जन्यज्ञान असें म्हणतात. धृतिः- म्हणजे मरणादि समयीं भूमीवर पडावया जोगीं झालेलीं जीं देहेंद्रियादिक त्यांचें स्तंभन करून धरण्याचा जो प्रयत्न तो. हें काम, संकल्प, विचिकित्सा, श्रद्धा, अश्रद्धा, धृति अधृति ह्री धी भी हें सर्व मनाचे वृत्तिरूप धर्म मनोरूपच आहेत या अर्थाच्या श्रुतींत सांगितलेल्या सर्व धर्मांचें उपलक्षण आहे. एतत्क्षेत्रं समासेन उदाहृतं- म्हणजे हें परिदृश्यमान महाभूतादिक धृत्यंत जड क्षेत्र ज्ञानात्मक साक्षिस्वरूपानें प्रकाश पावणारें आहे यामुळें साक्षिस्वरूप जो क्षेत्रज्ञ त्याहून भिन्न अचेतन असें संक्षेपानें तुला सांगितलें. शरीरेंद्रियांचा जो संघात तोच क्षेत्रज्ञ आत्मा असें लोकायत बोलतात. क्षणिक चैतन्य ज्यास विज्ञान असें म्हणतात तो आत्मा असें सुगत बोलतात. इच्छा द्वेष प्रयत्न सुखदुःख ज्ञान हे आत्म्याचे गुण आहेत यांचे योगानें आत्म्याचें प्रत्यक्ष होतें असें तार्किकादिक बोलतात. असें असून हें सर्व क्षेत्रच आहे असें कसें सांगतां अशी शंका होईल तर तिचें निराकरण करण्याकरितां-सांगतात. सविकारं म्हणजे जायते वर्धते परिणमते क्षीयते नश्यति- म्हणजे उत्पन्न होतें वाढतें बाल्य तारुण्यादिक परिणामात्मक अवस्थांप्रत पावतें. क्षीण होतें अस्तंत नाश पावतें असे जे निरुक्तांत यास्कानीं (सूत्रकारानीं) विकार सांगितले-

आहेत. त्यां विकारानीं युक्त हें महाभूतादि धृत्यंत पदार्थात्मक क्षेत्र आहे. तात्पर्य हे विकार प्रत्यक्ष सिद्ध आहेत. देहेंद्रियांचा संघातच आत्मा म्हटलातर आपली उत्पत्ति किंवा नाशादिक विकार आपणास प्रत्यक्ष नाहींत आणि दुसरे ही आपले वरील धर्म आपल्या दर्शना वांचून जाणले जाणार नाहींत. आपणास आपणाच पाहतो असें म्हटलें तर एकासच ज्ञान कर्तृत्व आणि ज्ञान कर्मत्व विरुद्ध आहे यास्तव या भूतादिक धृत्यंतांना आणि त्यांचे जे पूर्वोक्त विकार त्यांचा प्रकाशक स्वयंप्रकाश साक्षी या क्षेत्राहून निराळा आहे. ॥६॥

**अमानित्वमदंभित्व महिंसा क्षान्तिरार्जवम् ॥**
**आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥७॥**

या प्रमाणें क्षेत्राचें प्रतिपादन करून त्याचा साक्षी म्हणून आणि त्याहून भिन्न जो क्षेत्रज्ञ त्याचें सविस्तर निरूपण करण्यासाठीं त्याच्या ज्ञानाची योग्यता येण्या करितां तत्साधनभूत जे अमानित्वादिक धर्म ते सांगतात:- अमानित्वं म्हणजे विद्यमान किंवा अविद्यमान अशा गुणानीं आपली श्लाघा (स्तुति) करणें असें जें मानित्व तें नसणें. अदंभित्वं- म्हणजे आपणास द्रव्यादिकाचा लाभ व्हावा किंवा लोकांनीं वस्त्रादिकानें आपली पूजा करावी किंवा हा मोठा धार्मिक आहे अशी लोकांत आपली ख्याती व्हावी या हेतूनें आपले धर्माची प्रसिद्धि करणें असा जो दंभ तो न करणें. अहिंसा- म्हणजे शरीरानें किंवा वाणीनें किंवा मनानें दुसऱ्यास पीडा न करणें. क्षांति- म्हणजे चित्तास विकार होण्यास साधन जो अपकार तो दुसऱ्यानें केला तरी त्याचा प्रतीकार त्यास करण्याचें सामर्थ्य असतांही मनास विकार न होणें. आर्जव म्हणजे व्यवहारांत दुसऱ्या बरोबर प्रतारणा न करणें किंवा कुटिल भाव नसणें. आचार्योपासनं- म्हणजे मोक्षसाधनाचा किंवा अध्यात्म शास्त्राचा उपदेश करणारा जो गुरु त्याची शुश्रूषा करणें, त्यास नमस्कार करणें इत्यादिक त्याचें सेवन. शौच- म्हणजे शरीरावरील मलाची जलमृत्तिका दिकानीं शुद्धि आणि विषयाभिलाषादिक मनो मलाची विषयांचे ठायीं दोष दृष्टीनें निवृत्ति करणें. स्थैर्यं- म्हणजे मोक्ष साधन श्रवणादिकां विषयीं प्रवृत्त झाल्यावर अनेक प्रकारचीं विघ्नें प्राप्त झालीं तरी त्यांचा परित्याग न करतां श्रवणादिकां विषयीं पुनः पुनः अधिकाधिक प्रयत्न करणें. आत्मविनिग्रहः- म्हणजे देहेंद्रिय समुदायाची विषयां कडे प्रवृत्ति स्वाभाविकच आहे ती मोक्षसाधनास प्रतिकूल आहे यास्तव तिचा निरोध करून त्यांस मोक्ष साधना विषयींच लावणें. ॥७॥

**इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ॥ जन्म-**

## मृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥ ॥

इंद्रियार्थेषु वैराग्यं— म्हणजे शब्दादिक जे दृष्ट किंवा श्रुत इंद्रियांचे विषय किंवा भोग त्यांचे ठायीं स्पृहा नसणें. अनहंकारः— म्हणजे तोंडानें आत्मश्लाघा न केली तरी मनांत मी सर्वोत्कृष्ट आहें असा गर्व न करणें. जन्ममृत्युजराव्याधि दुःख दोषानु दर्शनं ॥ म्हणजे गर्भवास होऊन योनीचे द्वारा बाहेर येणें एतद्रूप जें जन्म— सर्व वियोगरूप जो मृत्यु— प्रजोत्पादन शक्तीचा प्रतिबंध होणें— आणि सर्वांनीं वृद्ध म्हणून परिभव करणें अशी जी जरा म्हणजे वार्धक्यावस्था— ज्वरातिसारादिक ज्या व्याधि — इष्टवियोगापासून झालेलीं नशींच अनिष्ट प्राप्तीनें झालेलीं जी आध्यात्मिक, आधिभौतिक, अधिदैविक निमित्तानें झालेलीं दुःखें— वातपित्त श्लेष्मा किंवा मलमूत्र यानीं परिपूर्ण असल्यामुळें जें शरीराचें जुगुप्सितत्वरूप दोषाच्या स्वरूपाचें निरंतर अनुसंधान करणें अथवा जन्मादि दुःखांत जे पदार्थ त्यांचे ठायीं दोष दृष्टी करणें अथवा जन्मादि व्याध्यंत पदार्थांचे ठायीं दुःखरूप दोष दृष्टीनें पाहणें. ॥ ८ ॥

## असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ॥ नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥ ॥

पुत्रदार गृहादिषु असक्तिः अभिष्वंगः— म्हणजे पुत्र, स्त्री, भृत्य गृहादिकांचे ठायीं हें माझें अशी जी प्रीति ती न करणें— आणि पुत्रादिक हे मीच आहें अशी जी अनन्य भावानें अतिशयित प्रीति किंवा पुत्रादिक सुखी झाला तर मीच सुखी किंवा दुःखी झाला तर मीच दुःखी असा अभिमान न करणें आणि इष्टानिष्टोपपत्तिषु नित्यं समचित्तत्वं— म्हणजे इष्टप्राप्ती झाली असतां हर्ष न होणें.— आणि अनिष्टप्राप्ति झाली असतां विषाद न पावणें असें निरंतर समान चित्त असणें. ॥ ९ ॥

## मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ॥ विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥

आणि मयि अनन्य योगेन अव्यभिचारिणी भक्तिः म्हणजे मी जो भगवान् वासुदेव परमेश्वर याचे ठायीं वासुदेवाहून दुसरा उत्कृष्ट कोणी नाहीं— यास्तव तोच माझी गती आहे अशा निश्चयानें कोणतेही प्रतिबंधानें निवारण केली जात नाहीं अशी आमरण पर्यंत भक्ति.— विविक्त देश सेवित्वं म्हणजे स्वभावें करून किंवा उदक गोमयादिकांचे प्रोक्षणें करून शुद्ध आणि अशक्ती जे-

व्याघ्रादिक त्यानीं रहित असा जो भागीरथी तटादिक चित्तास आल्हादकारक-देश त्याचे ठायीं वास करणें आणि जन संसदि अरतिः - म्हणजे आत्मज्ञान विमुख आणि विषय लंपट असे विषयभोगाविषयीं ज्या गोष्ठी करणारे जे लोक त्यांची जी तत्त्व ज्ञानास प्रतिकूल सभा तिचे ठायीं प्रीति नसणें. तत्त्वज्ञानास अनुकूल जी साधूंची सभा तींत बसण्याविषयीं प्रीति योग्य आहे यास प्रमाण "संगः सर्वात्मना हेयः सचेत् त्यक्तुं नशक्यते ॥ संसद्भिः सह कर्तव्यः सतः संगोहि भेषजं - सर्व संगाचा सर्व प्रकारानीं परित्यागच करावा तो परित्याग करण्यास अशक्य-असेल तर साधूंशीं संग करावा. साधूंचा संग हितकारक आहे असें वाक्य आहे. ॥१०

## अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ॥
## एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥११॥

अध्यात्म ज्ञाननित्यत्वं - म्हणजे आत्मानात्म विवेक ज्ञान जें अध्यात्मज्ञान तद्रूप निरंतर राहणें - तत्त्वज्ञानार्थदर्शनं - म्हणजे वेदांतांतील महावाक्यापासून झालेलें आणि अमानित्वादिक जीं साधनें त्यांचे परिपाका पासून झालेलें जें मी ब्रह्मच आहें असें अपरोक्ष ज्ञान तें तत्त्वज्ञान त्याचा जो अर्थ म्हणजे अज्ञान आणि त्याचें कार्य सकल दुःखादिकाची निवृत्ति होऊन परमपद प्राप्ति रूप मोक्ष-स्वरूप प्रयोजन त्याचें आलोचन तत्त्वज्ञानाच्या फलाचे आलोचनानें त्याचे साधना विषयीं प्रवृत्ति होते. एतत् म्हणजे हीं अमानित्वाला आरंभ करून तत्त्व-ज्ञानार्थ दर्शनांत विंशति (वीस) संख्याक साधनें ज्ञानास साधन आहेत यास्तव त्यांस ज्ञान असें म्हटलें आहे. यत् अतः अन्यथा तत् अज्ञानं - म्हणजे जें यांहून विपरीत मानित्व दांभिकत्वादिक तें अज्ञानास साधन आहे यामुळें तें अज्ञानच असें म्हटलें आहे. ॥११॥

## ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ॥
## अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥१२॥

हीं जीं अमानित्वादिक साधनें ज्यांस ज्ञान म्हणतात त्यानीं काय जाणावयाचें तें सांगतात. यत् ज्ञेयं तत् प्रवक्ष्यामि - म्हणजे मुमुक्षूनीं जें ज्ञेय वस्तु तें तुला स्पष्टतेनें सांगतों. श्रोत्यास अभिमुख करण्यास फल कथनानें ज्ञानाची स्तुती करून बोलतात यत् ज्ञात्वा अमृतं अश्नुते म्हणजे जें पुढें सांगावयाचें ज्ञेय वस्तु त्याचे ज्ञानें करून संसारा पासून मुक्त होऊन मोक्षाचे सुखाप्रत अनुभवितो तें कोणतें तें सांगतात. अनादि मत्परं ब्रह्म अनादिमत् म्हणजे उत्पत्ती-

तें युक्त जें नव्हे आणि जें परं म्हणजे निरतिशय सर्वोत्कृष्ट तीन प्रकारच्या परिच्छेदानीं रहित वस्तु तें परमात्मवस्तु असें जाण. येथें अनादि अशा पदानेंही-ज्यास उत्पत्ति नाहीं अशा अर्थाचा बोध होत असतां अनादिमत् असा मतुप् प्रत्ययाचा प्रयोग छांदस म्हणजे श्लोकाच्या छंदासाठीं केला असें जाणावें अथवा अनादि-मत्परं असा पदच्छेद करावा. अनादिशब्दाचा पूर्वोक्तच अर्थ मत्परं म्हणजे मी जो विष्णु याहून पर म्हणजे निर्विशेष रूप तें ब्रह्म असा त्याचा अर्थ जाणावा. तें निर्विशेषत्वच ब्रह्माला सांगतात. विधिमुखानें जो प्रमाणास विषय भाव म्हणजे भावत्वाश्रय (असणारा) पदार्थ तो सत् या शब्दानें बोलतात. ब्रह्म तर भावत्व धर्माचा आश्रय नव्हे यास्तव तें सत्य म्हणजे सत्यत्वाश्रय आहे ज्ञान-आहे आनंद आहे. म्हणजे ज्ञानत्वाश्रय आनंदत्वाश्रय आहे असें विधिमुखानें त्या शब्दांनीं मुख्य वृत्तीनें प्रतिपादन करतां येत नाहीं आणि निषेध मुखानें प्रमाणास विषय जो अभावत्व धर्माचा आश्रय अभाव पदार्थ तो अभाव म्हणजे नाहीं या शब्दानें बोलतात ब्रह्म तर अभावत्व धर्माचाही आश्रय नाहीं यास्तव तें स्थूल नव्हे, अणु नव्हे, दीर्घ नव्हे, ह्रस्व नव्हे, दृश्य नव्हे म्हणजे स्थूलत्वाभावत्वादिकाचा आश्रय असें निषेध मुखानें मुख्य वृत्तीनें त्या अस्थूलादि शब्दानीं प्रतिपादन करतां येत नाहीं. हें उपलक्षण करून ज्यापासून सर्व वाणी मनासुद्धां निवृत्त होतात या अर्थाच्या श्रुतीवरून सर्व शब्दानीं अवाच्यच तें ब्रह्म आहे यास्तव कोणत्याही शब्दानीं त्याचें प्रतिपादन करतां येत नाहीं. तात्पर्य-- शब्दांची प्रवृत्ति जाति म्हणजे धर्म मात्राचें उपलक्षण करून जातिबोधाविषयीं क्रियाबोधाविषयीं गुण बोधाविषयीं संबंध बोधाविषयीं अशी चार प्रकारानीं आहे-यास्तव जातिशब्द, क्रियाशब्द, गुणशब्द, संबंधशब्द, असा चार प्रकारचा शब्द आहे. गाय, अश्व, मनुष्य, देव, पक्षी हा जातीचा बोध करतो यास्तव यास जातिशब्द असें म्हणतात. पाककरतो, पढतो जातो येतो खातो बोलतो हा शब्द क्रियेचा बोध करतो म्हणून यास क्रिया शब्द म्हणतात. पांढरा काळा बरा वाईट हा शब्द गुणाचा बोध करतो यामुळें यास गुणशब्द म्हणतात. धनवान् गोमान् राजसेवक हा शब्द धन गाई सेवक यांचा आणि पुरुषांचा स्वस्वामि भाव संबंधाचा बोध करतो यास्तव यांस संबंध शब्द म्हणतात. डित्थ इत्यादिक जे संज्ञाशब्द आहेत ते संज्ञारूप धर्मानें त्या अर्थावर बोधन करतात यामुळें ते जातिशब्दच आहेत तसेंच शब्दाश्रयत्वादिक रूप धर्मानें बोधन करणारे आकाशादिक शब्द-तेही जातिशब्दच आहेत यास्तव चार प्रकारचेच शब्द आहेत. सृष्टीचे पूर्वीं जगास जें कारण ब्रह्म तें सत् नव्हे तें असत् नव्हतें इत्यादिक श्रुतीनें सत्व असत्व रूप धर्माचा निषेध केला यामुळें जाति शब्दाची प्रवृत्ति ब्रह्मावर नाहीं तें-

ब्रह्म निर्गुण निष्क्रिय आहे अशा श्रुतीनीं गुण आणि क्रियेचा ब्रह्माचे ठायीं निषेध-केल्यामुळें त्यावर क्रिया शब्द गुणशब्द यांची ही प्रवृत्ति नाहीं. हा आत्मा असंग आहे जो असंग आत्मा त्याचा कोणाशीं संबंध नाहीं अशा श्रुतीनीं सर्वसंबंधाचा निषेध-केल्यामुळें ब्रह्माचे ठायीं संबंध शब्दाची ही प्रवृत्ति नाहीं.॥१२॥

**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम्॥**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति॥१३॥**

असें जर सर्व शब्दांनीं ब्रह्म प्रतिपादन करतां येत नाहीं तर ज्ञेय ब्रह्म तुला सांगतों असें तुम्हीं कसें बोललां आणि तें ब्रह्म वेदांतरूपशास्त्र रूप प्रमाणां-पासून जाणावयास योग्य आहे असें शास्त्रयोनित्वात्-या सूत्रांत वेदव्यासानीं कसें सांगितलें आणि वेदांतांत तटस्थ स्वरूप लक्षण वाक्यानें त्यानें प्रतिपादन-कसें केलें अशी शंका होईल तर ब्रह्माचे ठायीं वास्तविक जाति धर्म, क्रिया गुणसं-बंध नसले तरी अचिंत्य परमेश्वर शक्तिरूप मायेनें कल्पिलेले जे जात्यादिक-त्यांचे संबंधानें लक्षणें करून शब्द प्रवृत्त होऊन माया कल्पित जें विश्व किंवा प्रा-णि शरीरें इंद्रियादिक त्याचे द्वारा निर्विशेष ब्रह्म प्रतिपादन करतात या अभिप्राया-नें परब्रह्म बोधास द्वारभूत मायिक रूप सांगून ब्रह्म असत् नव्हे असें सांगित-ल्यानें त्याच्या असत्वाची शंका गेली. तरी सविस्तर त्या शंकेचे निराकरणार्थ-मायिक रूप द्वारा चेतन क्षेत्रज्ञस्वरूपत्वें करून त्या ब्रह्माची सत्ता आहे असें-प्रतिपादन करीत असतां बोलतात. तत् सर्वतः पाणिपादं- सर्व देहाचे ठायीं ह-स्त पाद रूप अचेतन अवयव आपापले व्यापाराचे ठायीं प्रवृत्ति होण्यास योग्य ज्या चेतन क्षेत्रज्ञाचे किंवा जेणें करून आहेत तत्स्वरूप जें आहे. तसेंच सर्वतोक्षि-शिरोमुखं-म्हणजे सर्व देहाचे ठायीं नेत्रमुख मस्तक हे अचेतन अवयव आ-पापले व्यापाराचे ठायीं प्रवृत्ति होण्यास योग्य ज्याचे किंवा ज्या क्षेत्रज्ञ चेतनानीं होतात किंवा आहेत तत्स्वरूप जें आहेत तसेंच सर्वतः श्रुतिमत् -म्हणजे सर्वदे-हांचे ठायीं श्रोत्रेंद्रियोपलक्षित सर्व इंद्रियें आपापले व्यापाराचे ठायीं प्रवृत्त होण्या-स योग्य ज्याचीं किंवा ज्या चेतन क्षेत्रज्ञानें आहेत असें जें आहे यावरून अचेत-नाची जी स्वस्व व्यापारा विषयीं प्रवृत्ति होते ती चेतन पूर्वकच म्हणजे चेतन सत्ते-नेंच होतें असा नियम आहे यास्तव शरीराचे ठायीं जी हस्तपादादिक अवयव इं-द्रियें यांची प्रवृत्ति करणारा चेतन आत्मा असल्या शिवाय तीत्याची अनुभवसिद्ध प्रवृत्ति होणार नाहीं यास्तव क्षेत्रज्ञ चेतनात्म स्वरूप ब्रह्मसत्ता नाहीं असें संभव-त नाहीं असें तात्पर्य- सर्वं आवृत्य तिष्ठति- तें क्षेत्रज्ञ रूप सर्व प्राणि देहांचे ठा-यीं राहिलेलें विभु नित्य एक ब्रह्म सर्व अचेतन समुदायास व्यापून म्हणजे आप-

ले ठायीं त्याच्या कल्पित संबंधानें स्वस्वरूप सत्तेनें, स्वस्वरूपस्फूर्तीनें- अस्ति भाति - या व्यवहारास योग्य करून आपण निर्विकार स्वरूपानेंच स्थित आहे. ॥१३॥

**सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम्॥ असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४॥**

"अध्यारोपापवादाभ्यां निष्प्रपंचं प्रपञ्च्यते" - यान्यायानें म्हणजे सर्वांस सद्रूप ब्रह्म संबंधानें प्रतीतीस येतो असा जो हा दृश्य प्रपंच याचा निषेध जर ब्रह्माचेठायीं प्रथमच केला तर जसा वायूवर रूप नाहीं असा जरी निषेध केला तरी रूप पृथ्वी जल आदिकांवर आहे यामुळें रूप अगदीं कोठें नाहीं असें रूपास अगदीं असत्व आहे असा बोध होत नाहीं त्याप्रमाणें प्रपंच ब्रह्माचे ठायीं नसला तरी अन्यत्र प्रधान परमाणु आदिक जीं सांख्य तार्किकादि मत सिद्ध करणें त्याचे ठायीं असेल अशी संभावना होऊन प्रपंचास अगदीं असत्वच आहे असा निश्चित बोध होणार नाहीं यामुळें अद्वैतात्म बोध जो श्रुतीस विवक्षित (इष्ट) आहे त्याची सिद्धि होणार नाहीं याकरितां जगाची उत्पत्ति स्थिति लय सर्व परब्रह्मा पासूनच होतात जड प्रधान परमाणु आदिकां पासून होत नाहींत असा ब्रह्माचे ठायींच जगाचा आरोप करून त्याचा तेथेंच कालत्रयीं निषेध केला म्हणजे जग अत्यंत असत् कोठेंच नाहीं असा निष्प्रपंच अद्वैत ब्रह्मबोध निश्चित होतो या न्यायानें निष्प्रपंच ब्रह्म निरूपण श्रुतीत करतात. त्या प्रमाणें सर्व मायिक प्रपंचाचा ब्रह्माचे ठायीं आरोप करून - अनादिमत्परं ब्रह्म - याचें व्याख्यान करून आतां त्या जगाचा अपवाद म्हणजे निषेध ब्रह्माचे ठायीं सांगून "नसत्तन्नासदुच्यते" असें जें सांगितलें त्याचे व्याख्यानास निरुपाधिक अद्वय परब्रह्म स्वरूपाचे ज्ञाना साठीं आरंभ करतात. सर्वेंद्रियगुणाभासं - म्हणजे सर्व जीं श्रोत्रादिक इंद्रियें हें ग्राहक तें ब्रह्म मायारूप किंवा मायेनें कल्पिलेलें उपाधि धर्मांनीं युक्त होऊन त्या योगानें मात्राचें उपलक्षण-करून आंतर मन बुद्धि अहंकार चित्ताख्य आंतर ग्राहक आणि सर्व जे त्याचे गुण म्हणजे शब्दादिक ग्राह्य विषय त्या ग्राहक ग्राह्यां प्रमाणें विचित्र भासतें- जसा जलरूप उपाधीनें सूर्य अधस्था प्रमाणें कंपिता साररवा भासतो परमार्थतः सूर्य जसा जलस्थ नाहीं कंपित नाहीं तसें तें ब्रह्म आहे. सर्वेंद्रियविवर्जितं - म्हणजे सर्व इंद्रियें आणि त्यांचे जे विषय त्यांहीं करून रहित आहे यास्तव ग्राह्य ग्राहक रूप-नाहीं म्हणजे त्याचे विकारानें ग्राहकत्व ग्राह्यत्व स्वरूपानें युक्त नाहीं यास प्रमाण तो-परमात्मा पाणि पाद रहित असतां ही जवन म्हणजे वेगानें धांवल्या प्रमाणें दिसतो त्यास चक्षु नसतां ही पाहतो श्रोत्र नसतां ही ऐकतो पाहणाच्या ऐकणाच्या प्रमाणें भासतो. प्राणरहित मनोरहित असतां ही बुद्धि ध्यान करीत असतां ध्यात्या प्रमा-

णें चलन पावली म्हणजे चंचल झाल्याप्रमाणें भासतो अशा अर्थाच्या श्रुति आहेत. यावरून ब्रह्म परमार्थतः प्रपंच संबंध रहित निष्प्रपंच आहे असें आहे तर हें सर्व जग ब्रह्मच आहे असें शास्त्र ब्रह्मास सर्वजगाचें तादात्म्य किंवा आधारत्व कसें सांगतें असें म्हणाल तर त्याविषयीं सांगतात. असक्तं सर्वभृच्चैव — म्हणजे परमार्थतः सर्व संबंधरहित असतांही सर्वभृत् म्हणजे सत्स्वरूपानें आपले ठायीं मायेनें कल्पिलेले सर्व जगाचें धारण करणारें आहे. जशी उखर भूमी मरुमरीचिका ( मारवाड देशांतील सूर्य किरण ) त्यावर भासलेल्या मृगजल रूप उदकानें असंबद्ध असतांही अज्ञान कल्पित त्या मरुमरीचिक उदकाचे आधारत्वें करून भासते त्याप्रमाणें ब्रह्म असंग असतांही सर्वाधारत्वें करून भासते. आणि परमार्थतः ग्राहक ग्राह्य रहित किंवा सत्व रज तमोगुणानीं रहित असतांही ते गुण शब्दादि विषय द्वारा सुखदुःख मोह रूपानें परिणाम पावलें असतां त्याचें भोक्तृत्व म्हणजे प्रकाशक निर्विकार बोधात्मक आहे असें जाणावें ॥१४

## बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ॥ सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १५ ॥ ॥

भूतानां बहिः अंतश्च — म्हणजे उत्पन्न होणाऱ्या माया कल्पित सर्व कार्यांचे बाहेर आणि आंत अधिष्ठान रूपानें राहिलेलें म्हणजे व्यापक एकच तें ब्रह्म आहे असें जाणावें याच कारणानें चराचर विश्वात्मक तेंच आहे. कल्पित पदार्थांची अधिष्ठान सत्ते शिवाय निराळी सत्तानाहीं अथवा भूतांची म्हणजे प्राण्यांची बहिः म्हणजे मनासुद्धां एकादश इंद्रियें आणि स्थूल शरीरादिक हीं केवळ विकार स्वरूप आहेत यास्तव पुरुषास दूर त्यामुळें बहिः अशीं म्हटलीं आणि महत् अहंकार पंचभूत तन्मात्रा अव्यक्त हीं प्रकृति स्वरूपत्वास्तव सन्निहित आहेत म्हणून अंतः या शब्दानीं घ्यावीं. चराचरो पाधीनीं उपलक्षित किंवा तदुपाधिक बहिः अंतः यांचे अवधिभूत पुरुष चराचर शब्दानें घ्यावे तें ब्रह्म चराचर असें जाणावें. येणें करून पुरुषांस ज्ञेय ब्रह्मस्वरूपत्व सांगितलें तें बहिः अंतः ज्ञेयं — असें सांगितल्या वरून बहिः शब्दार्थ जे षोडश विकार आणि अंतः शब्दार्थ ज्या अष्टो प्रकृति यांचे ठायीं ज्ञेय ब्रह्माचा संबंध सांगितला तो संबंध जसा यक्ष तसा बळी या न्यायानें पूर्वोक्त प्रकृति आणि विकार हेच मुळीं कल्पित आहेत यास्तव तो मिथ्याभूत कल्पितच आहे यावरून केवळ उपलब्धि म्हणजे बोधस्वरूप जो पुरुष त्याचा आणि गुणांचा कल्पित किंवा आध्यासिक संबंध आहे, यामुळें त्याचें म्हणजे गुणांचें प्रकाशकत्व पुरुषास उत्पन्न झालें. जसें प्रकाशमात्र स्वरूप जो सूर्य त्यास प्रकाश्य जे पदार्थ त्यांचे संबंधानेंच प्रकाशयितृत्व येतें.

त्या प्रमाणें पुरुषतर आत्मस्वरूपत्वास्तव नित्य अपरोक्ष स्वरूपच आहे आणि-त्याचा प्रकृति आणि विकार याशीं किंवा बाहेर आंत सर्वत्र संबंध असतां त्याचें-प्रत्यक्ष सर्वांस सर्वत्र कां होत नाहीं अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात. तत् सूक्ष्मत्वात् अविज्ञेयं- म्हणजे ब्रह्म सर्वात्मक सर्व संबंधी असतांही प्रत्यक्ष-दिसावयास कारण भूत रूपादिकांनीं रहित आहे यामुळें हें ब्रह्म असें स्पष्टत्वें क-रून प्रत्यक्ष होण्यास योग्य नाहीं- अथवा जपाकुसुम (जास्वंदीचें फूल) सन्नि-हित स्फटिकाचें शुद्ध शुभ्र स्वरूप समीप असतां ही उपाधि रूपानें तिरोहित-झाल्यामुळें जसें प्रत्यक्ष दिसत नाहीं तसें नित्यापरोक्ष असंग आत्म स्वरूप पर-ब्रह्म सर्वत्र सन्निहित असतां ही उपाधि स्वरूपानें तिरोहित म्हणजे आच्छादि-त झाल्यामुळें उपाधि विविक्तत्वें करून शुद्ध स्वरूपानें सर्वांस प्रत्यक्ष दिसत नाहीं-आणि उपाधि धर्मांनीं युक्तच लोहितस्फटिका प्रमाणेंच अज्ञान्यास दिसतें जे विद्वा-न् आहेत त्यांस उपाधीचा विलय समाधीनें किंवा विचारानें करून तें शुद्ध ब्रह्म स-र्वत्र जाणण्यास योग्य आहे हेंच स्पष्ट करून दाखवितात. दूरस्थं म्हणजे आत्मज्ञा-न साधनरहित जे अविद्वान् आहेत त्यांस सहस्त्र लक्ष कोट्यावधि वर्षांनीं ही प्रा-प्त व्हावयाचें नाहीं यास्तव त्यांस लक्ष कोट्यावधि योजनांनीं दूर देशस्थिता प्रमा-णेंच आहे. अंतिकेच तत् - आणि आत्मज्ञान साधन संपन्न जे आहेत त्यांस आ-त्म स्वरूप त्या स्तव अगदीं जवळच आहे. आपला आत्मा कोणास ही आपणास सोडून दूर नाहीं. अथवा अज्ञानी भूमिस्थ असून जलस्थ सूर्यास आकाशस्थ सूर्यापेक्षां फार दूर मानितो पुरुष अधोमुख असतां त्याचे नेत्ररश्मि जलांत जाऊ-न उलटे सूर्याकडे फिरून पूर्वीच अधोमुख होऊन खालीं पाहण्याचे संस्कारानें आ-काशस्थ सूर्यासच जलस्थत्वें करून ग्रहण करतात. याच कितीएक प्रतिबिंब भ्रम म्हणतात. अपूर्व प्रतिबिंब उत्पन्न होतो असें ते म्हणत नाहींत. हें प्रतिबिंब तत्त्व-जाणणारा विद्वान् पुरुष बिंबदेशींच म्हणजे आकाशस्थ सूर्य स्वरूपाचे ठायींच प्र-ति बिंब स्वरूपत्वें करून मानिलेल्या जलस्थ सूर्यास पाहतो त्यापासून दूर पाहत ना-हीं याप्रमाणें अज्ञानी बिंबभूत परब्रह्म स्वरूपास प्रतिबिंब भूत जीवापेक्षां फार दू-रच पाहतात. ज्ञानीतर विपरीत धर्मांनें ग्रहण केलेलें ब्रह्मच जीवाचें स्वरूप आहे. त्याहून निराळें नाहीं यास्तव जीव स्वरूपास जवळच म्हणजे उपाधि सोडून तद्रू-पच पाहतात. ॥१५॥

**अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ॥**
**भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥१६**

सर्व प्राणी देहांचे ठायीं एक विभु नित्य असून सर्वांस व्यापून राहतें असें

जें "सर्वमावृत्यतिष्ठति" असें सांगितलें तेंच स्पष्ट करून दाखवितात. भूतेषु अविभक्तंच विभक्तमिवस्थितं– म्हणजे आकाशाप्रमाणें सर्व व्यापक स्वरूपत्वास्तव सर्व कार्य कारण संघातात्मक सर्व प्राण्यांचे देहाचे ठायीं तें ब्रह्म एकच आहे. प्रति शरीरीं भिन्न भिन्न नाहीं तथापि देहेंद्रियांचे तादात्म्यानें प्रतीतीस येतें यामुळें प्रति शरीरीं भिन्न भिन्न प्रमाणें भासतें. जसें आकाश एकच असतांही घटमठरूप उपाधींचे संबंधानें उपाधिकृत भेदानें घटाकाश मठाकाश या भेदानें भासतें. यास भूतान्या भूतां भूतांचे ठायीं एकरूपच स्थित असतां एकरूपानें किंवा बहुत रूपानें जलांतील चंद्राप्रमाणें भासतो अशा अर्थाची श्रुती प्रमाण आहे. असें आहे तर क्षेत्र शब्दाचा जो अर्थ शरीर त्याचे ठायीं क्षेत्रज्ञ व्यापक एक असें जगाचें कारण जें ब्रह्म तें त्यांहून निरालेंच आहे अशी शंका होईल तर त्याविषयीं तसें नाहीं असें सांगतात. भूतभर्तृच– म्हणजे सर्व भूतांचे स्थितिकालीं जें धारण किंवा पोषण करतें आणि प्रभविष्णु– म्हणजे उत्पत्तिकालीं उत्पन्न करणाऱ्या स्वभावाचें आणि ग्रसिष्णु– म्हणजे संहारकालीं संहार करणाऱ्या स्वभावाचें असें जें ब्रह्म तें क्षेत्रज्ञच आहे त्याहून भिन्न नाहीं. जशी रज्जूच रज्जूचे ठायीं सर्पाचे उत्पत्ति आणि स्थिति आणि प्रलय कारणत्वें करून कल्पिलेली सर्पाचें स्वरूप आहे तसें सर्व प्राण्याचे उत्पत्ति स्थिति लय कारणत्वें करून कल्पिलेलें ब्रह्मच सर्व प्राण्यांचें स्वरूप आहे, त्याहून भिन्न नाहीं असें तात्पर्य ॥१६॥

**ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ॥**
**ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥१७॥**

याप्रमाणें ज्ञेय ब्रह्माचें तटस्थ लक्षण सांगून त्याचें स्वरूप लक्षण सांगतात. ज्योतिषां अपि तत् ज्योतिः– म्हणजे तें ज्ञेय ब्रह्म दुसऱ्यांस प्रकाश करणारीं जीं बाह्य जड सूर्य अग्न्यादिक तेजें आणि आभ्यंतरजीं प्रकाशक जड बुद्ध्यादिक त्यांचें ही प्रकाशक चैतन्य रूप आहे. यास प्रमाण ज्या ब्रह्म चैतन्यात्मक तेजानें युक्त सूर्य सर्वांस प्रकाश करतो ज्या ब्रह्मस्वरूपाचा प्रकाश करण्यास सूर्य समर्थ होत नाहीं आणि हा चंद्र या तारा विद्युल्लता ही समर्थ होत नाहींत मग अग्नी कोठून समर्थ होईल हें सर्व जग ब्रह्मात्मक प्रकाशानें भासतें अशा अर्थाची श्रुती आणि "यदादित्यगतं तेजः जगद्भासयतेऽखिलं ॥ यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकं" असें गीतेंतील पंचदशाध्यायस्थ भगवंताचें वाक्यही प्रमाण आहे. याचे अर्थाचें निरूपण तेथेंच करूं. तें ब्रह्म स्वतः जड नाहींत तथापि जड संबंधानें जड होईल असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात. तमसः परमुच्यते– म्हणजे अपारमार्थिक जी जड अविद्या आणि तिचीं कार्यें त्याशीं असंस्पृष्ट तें पारमार्थिक ब्रह्म आहे. पारमार्थिक

सत् आणि असत् यांचा संबंध वास्तविक संभवत नाहीं. असें ब्रह्मवेत्ते आणि श्रुती बोलतात. आपल्या प्रकाशा विषयीं दुसऱ्या लौकिक प्रकाशाची त्यास अपेक्षा नाहीं असा आदित्या सारखा ज्याचा वर्ण म्हणजे प्रकाश आहे आणि तमाहून पलीकडे तें आहे अशा अर्थाची श्रुती आहे आणि तेंच ब्रह्म ज्ञानं म्हणजे बाह्य विषय-जे घट आणि त्यावरील रूपादिक तदाकार जी चक्षुरादिक इंद्रियादिक प्रमाणाचे द्वारा होणारी अंतःकरण वृत्ति तिचे ठायीं प्रतिबिंबित म्हणजे अभिव्यक्त जें त्यांचें अधिष्ठान भूत चैतन्य तद्रूप आहे त्या वृत्तींत अभिव्यक्त झालेल्या अधिष्ठान चैतन्यास तार्किकादिक घट ज्ञान रूप ज्ञान म्हणतात. आणि त्यावृत्तीचे उत्पत्तीनें तें ज्ञान उत्पन्न झालें वृत्तीचे नाशानें नाश पावलें असा व्यवहार करतात. त्या देशीं वृत्तीचे पूर्वीं अज्ञान कृतावरणानें अज्ञान जें ब्रह्म तें त्या आवरणाचा नाश करणारी घट रूपाद्या कार वृत्ति होऊन त्या वृत्तींत अभिव्यक्त (प्रगट) होऊन घटाच्या रूपादिकाचे स्वरूपानें जाणण्यास योग्य होतें. अथवा वेदांत महावाक्या पासून अखंड ब्रह्माकार अंतःकरण वृत्तीनें मूलभूत अज्ञान नाश पावून तें अभिव्यक्त होऊन-जाणलें अशा विद्वानांचे व्यवहारास योग्य होतें. यास्तव त्यास ज्ञेय असें म्हणतात. जडावर अज्ञातत्व किंवा ज्ञातत्व नाहीं. जो घट अज्ञात किंवा ज्ञात असा व्यवहार होतो तो घटोपाधिक घटाधिष्ठान ब्रह्म विषयींचा आहे असें जाणावें. याच कारणास्तव -ज्ञानगम्यं- म्हणजे पूर्वोक्त जीं ज्ञान साधन भूत अमानित्वादिक ज्ञानशब्द वाच्य साधनानें त्यानीं प्राप्य, जरतें साधनींनीं प्राप्य आहे तरतें अश्वादिक साधनांनीं प्राप्य ग्राम देशादिका प्रमाणें व्यवहित म्हणजे दूर किंवा बाल्य यौवन वृद्धत्वावस्था प्रमाणें काल विलंबानें प्राप्य आहे किंकाय असें म्हणेल तर तसें नाहीं असें सांगतात. सर्वस्यहृदिधिष्ठितं- म्हणजे सर्वत्र व्यापक असतांही प्राणिमात्रांचे बुद्धीचे ठायींच अंतर्दृष्टीस जीव स्वरूपानें किंवा अंतर्यामि स्वरूपानें अभिव्यक्त होतें. जसें सूर्याचें तेज सर्वत्र असतांही आदर्श किंवा सूर्य कांत मणि याचे ठायीं विशेषें करून अभिव्यक्त होतें तसें. ॥१७॥.

## इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ॥- मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावा योपपद्यते ॥ १८॥

केलेले क्षेत्रादिकांचे निरूपणाची त्याचे ज्ञानाचा अधिकारी सांगून समाप्ति करतात. इतिक्षेत्रं-म्हणजे या पूर्वोक्त प्रकारानीं महाभूतादि धृत्यंत क्षेत्र- तथा ज्ञानं-म्हणजे तसेंच अमानित्वादिक तत्त्व ज्ञानार्थ दर्शनांत ज्ञान- ज्ञेयं-च-म्हणजे आणि अनादिमत्परं ब्रह्म इत्यादि- हृदिसर्वस्यधिष्ठितं-इत्यंत ज्ञेय-हें त्रितय सर्व श्रुति आणि स्मृति यांचें मथन करून त्यांतून काढून जे मंद बुद्धि

आहेत त्यांचेवर अनुग्रह करण्या साठीं तो समासतः उक्तं - म्हणजे संक्षेपानें सांगितलें इतकाच मुख्य सर्व वेदार्थ आणि गीतार्थ आहे याचे ज्ञाना विषयीं पूर्वाध्यायीं सांगितलेला माझा भक्तच अधिकारी आहे. तो मद्भक्तः एतद्विज्ञाय - म्हणजे मी जो वासुदेव परमात्मा परम गुरु याचे ठायीं ज्याणें सर्वात्मभाव समर्पण केला आहे आणि मीच तारणारा अशी ज्याची बुद्धि आहे असा मदेक शरण होत्साता- क्षेत्र, ज्ञान आणि ज्ञेय यांप्रत विवेकानें म्हणजे त्याचे यथोक्त लक्षण स्वरूपानें - जाणून - मद्भावाय उपपद्यते - म्हणजे सर्वानर्थ शून्य परमानंद प्राप्तिरूप मोक्षास जाण्यास योग्य होतो. यास्तव तुच्छ विषय भोगेच्छा टाकून मदेक शरण होत्साता परम पुरुषार्थ मोक्षेच्छु होऊन आत्मज्ञान साधनाचेंच अनुष्ठान करावें असा अभिप्राय. ॥१८॥

## प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ॥ विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृति संभवान् ॥१९॥

या प्रमाणें - "तत् क्षेत्रं यच्च यादृक्च " यांचें निरूपण केलें आतां "यद्विकारी यतश्च यत् " "सचयोयत्प्रभावश्च " येणें करून ज्याचे निरूपणाची प्रतिज्ञा केली आहे. त्यांचें निरूपण करावयाचें शेष राहिलें आहे तें निरूपण प्रकृति- आणि पुरुष यांस संसाराचें हेतुत्व सांगून - प्रकृतिं पुरुषं चैव - येथून दोन श्लोकानीं - यद्विकारी यतश्च यत् - त्यांचें निरूपण आणि - पुरुषः प्रकृतिस्थोहि - एथून दोन श्लोकांनीं "सचयोयत्प्रभावश्च " यांचें निरूपण करतात. सप्तम्याध्यायीं क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ एतद्रूप अपर आणि पर अशा ईश्वराच्या दोन प्रकृति- सांगून "एतद्योनी विभूतानि " येणें करून हीं सर्व भूतें त्या दोन प्रकृति पासून- उत्पन्न होतात असें सांगितलें तेंच भूतांचें दोन प्रकारचें प्रकृति योनित्व क्षेत्ररूप अपर प्रकृति आणि क्षेत्रज्ञ रूप परम प्रकृति या दोहींस ही अनादित्व सांगून- स्पष्ट करतात. प्रकृतिं पुरुषंच - म्हणजे मायाख्य जी त्रिगुणात्मक परमेश्वर शक्तिरूप क्षेत्र स्वरूपापर प्रकृति आणि जीवाख्य जी परप्रकृति पूर्वी सांगितली ती उभौ अपि - म्हणजे या दोन्हीही - अनादी विद्धि - म्हणजे ज्यांस आदि - म्हणजे उत्पत्ति नाहीं असें तूं जाण. सर्व जगास प्रकृति मूल कारण आहे यास्तव ती अनादि आहे तिची जर उत्पत्ति मानावी तर तिचें ही कारण दुसरें त्याचें ही कारण तिसरें असें मानावें लागून अनवस्था होईल. सर्व जगजीवरूप धर्माधर्म फल जीवास प्राप्त व्हावें एतन्निमित्त कईश्वरानें निर्मित आहे यामुळें जगाचे अनादित्वास्तव त्यास निमित्तभूत धर्माधर्म अनादि आहेत त्याचे अनादित्वास्तव त्यांचा कर्ता जीव ही अनादि आहे असें मानलें पाहिजे. नाहींतर जीवाची उत्पत्ति मानली तर त्याणें पूर्वीं धर्मा-

धर्म केले नसतां ही उत्पत्तीनंतर सुखदुःखानुभवरूप फल जें होतें तें केलेले धर्माधर्मावांचून ही होतें असा अकृताभ्यागमरूप दोष येईल आणि जीवाची उत्पत्ति मानली तर त्याचा नाश ही होईल. तेव्हां जीवानें केलेले धर्माधर्मांचा फलभोक्ता च नाहीं यामुळें तें फल दिल्याशिवाय ही नाश पावतील असा कृतनाश दोष येईल असे कृतनाश अकृताभ्यागमन दोष न यावे यास्तव जीव ही अनादि असें मानावें. त्याकारणास्तव प्रकृति अनादि आहे यास्तव - विकारान् गुणान् चैव - म्हणजे पृथिव्यादिक पंचमहाभूतें आणि श्रोत्रादिक पांच ज्ञानेंद्रियें वागादिक पांच कर्मेंद्रियें आणि मन हे षोडशविकार आणि सत्व रज तमोगुणांचे स्वभावा प्रमाणें त्यां पासून क्रमानें होणारे जे सुखदुःख मोह किंवा त्यांस साधनभूत जे गुण ते प्रकृतिसंभवान् विद्धि - म्हणजे प्रकृतिरूप मूलकारणापासून उत्पन्न होणारे आहेत असें तूं जाण. ॥ १९ ॥

कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ॥ पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥ ॥

विकार आणि गुण प्रकृतिसंभव म्हणजे प्रकृतीपासून उत्पन्न होतात. यांनें विवेचन करून पुरुषास संसार हेतुत्व कसें तें दाखवितात. कार्य कारण कर्तृत्वे हेतुः प्रकृतिः उच्यते - म्हणजे कार्य शब्दानें शरीर आणि शरीराला उत्पन्न करणारीं पृथिव्यादिक पंचमहाभूतें आणि त्यांचे गुण जे रूप, रस, गंध, स्पर्श, शब्दरूप पांच विषय हे घ्यावे. करण किंवा कारण या शब्दानें शरीरस्थ पांच श्रोत्रादिक ज्ञानेंद्रियें - वागादिक पांच कर्मेंद्रियें चित्त, बुद्धि, अहंकार, हीं करणें आणि तदाश्रित सुखदुःख मोहात्मक प्रकृतिसंभव गुण हे सर्व घ्यावे. हीं जीं कार्य कारणें यांच्या कर्तृत्वा विषयीं म्हणजे कार्य कारणात्मक किंवा तदाकार प्रकृतीचा अवस्थांतर रूप परिणाम होण्याविषयीं हेतु म्हणजे उत्पन्न करणारें उपादान कारण प्रकृति आहे. हे - कार्य कारणात्मक पदार्थ प्रकृतीचेच अवस्थांतर रूप परिणाम आहेत असें कपिल महामुनि प्रभृति महर्षी बोलतात. या प्रमाणें कार्यकारण कर्तृत्वें करून प्रकृतीस संसाराचें कारणत्व सांगून पुरुषास ही सुखदुःख भोक्तृत्वें करून संसाराचें कारणत्व आहे. असें सांगतात. पुरुषः म्हणजे पर प्रकृतिस्वरूप जो क्षेत्रज्ञ जीव पूर्वी सांगितला तो - सुखदुःखानां भोक्तृत्वे - म्हणजे सुखदुःख मोहात्मक जें अंतःकरण परिणामात्मक वृत्तिस्वरूप भोग्य पदार्थ त्यांचें जें भोक्तृत्व - म्हणजे त्या अंतःकरण वृत्तींत अभिव्यक्त (प्रगट) झालेलें स्वप्रकाश ज्ञानात्मक चेतन पुरुषस्वरूप तद्रूप जो भोग्य सुखदुःखादिकांचा अनुभव त्याविषयीं हेतु म्हणजे निमित्त कारण आहे असें तेंच कपिल महामुन्यादिक महर्षी बो-

रुनात. या सांख्यमताची परिभाषा अशी आहे. सृष्टिपूर्वकालीं परस्परांचा परस्पर उपमर्द न करतां समान अवस्थेनें राहिलेले जे सत्त्व रज तमो गुण यांस त्रिगुणात्मक प्रकृति असें म्हणतात. ती प्रकृती अचेतन जड स्वरूप आहे. पुरुष म्हणजे जीव असंग चिद्रूप पुष्कर पत्रा (कमलपत्रा) प्रमाणें प्रतिशरीरीं भिन्न भिन्न अलिप्त स्वभावाचा आहे. ईश्वर मुळींच नाहीं. अचेतन प्रकृतीस स्वतः कर्तृत्व संभवत नाहीं. आणि असंग चिन्मात्र स्वरूप पुरुषास भोक्तृत्वही संभवत नाहीं. तथापि कर्तृत्व म्हणजे क्रियेचें उत्पादकत्व तें अचेतनास ही चेतनाचे अदृष्ट योगानें किंवा चेतनाचे सन्निधानानें संभवतें. जसें वन्हीस ऊर्ध्वज्वलन. वायूस तिर्यग्गमन किंवा चेतन वत्साचे जीवना दृष्टानें स्तनांतील अचेतन दुग्धाचें क्षरण म्हणजे अधः निःसरण होतें तसें अचेतन प्रकृतीस ही चेतन जीवाचे सन्निधानानें त्याचे अदृष्ट योगानें कर्तृत्व संभवतें. भोक्तृत्व म्हणजे सुख दुःखाकार अंतःकरण वृत्तींत अभिव्यक्त झालेलें जें पुरुषाचें बोधरूप प्रतिबिंब तद्रूप जो अनुभव त्याचें आश्रयत्व तें असंग पुरुषास जरी संभवत नाहीं तथापि प्रकृतीचें कार्य जें अंतःकरण बुद्ध्यादिक त्यांवर तें आहे तद्द्वारा प्रकृतीवर ही आहे तें प्रकृतीशीं आणि प्रकृतीचें कार्य जें अंतःकरण बुद्ध्यादिक त्याशीं आपले स्वरूपाशीं भेद असतां ही त्याचें ज्ञान नसल्यामुळें त्यावर आपण आपलें तादात्म्य मानून तें आपलेवर जीव मानून घेतो. यासच प्रकृती पुरुषाचा अविवेक म्हणतात. येथें पुरुष आणि प्रकृति यांचा जो अविवेक रूप संबंध तोच पुरुषाचे संसारास कारण आहे इतकेंच विवक्षित (इष्ट) आहे. ईश्वर नाहीं पुरुष प्रतिशरीरीं भिन्न आहे असें विवक्षित नाहीं तसें विवक्षित असेल तर "क्षेत्रज्ञंचापि मां विद्धि सर्व क्षेत्रेषु" येणें करून सर्व शरीरांचे ठायीं क्षेत्रज्ञ जो जीव तो मीच आहें असें जीव आणि ईश्वर यांचे निरुपाधिक स्वरूपानें ऐक्य जें सांगितलें त्याशीं विरोध येईल आणि प्रधानास जगत् कर्तृत्व नाहीं. परमेश्वरासच प्रकृतिद्वारा जगाचें कारणत्व कर्तृत्व आहे असें जें वेदांत शास्त्रांत सांगितलें तेंही विरुद्ध होईल. पूर्वोक्त कार्य कारण सुख दुःख स्वरूप जीं साधनें आणि फलें यांचे स्वरूपानें जर प्रकृति परिणाम न पावेल तर पुरुषास कोणते फलाचा पूर्वोक्त अनुभव होईल. जर अनुभव न होईल तर पुरुष संसारी कसा होईल. सुख दुःख फलाचा जो अनुभव तद्रूप भोगासच संसार असें म्हणतात. सुख दुःख रूप फलाचे स्वरूपानें परिणाम पावलेली जी प्रकृति तिचा स्वप्रकाश चैतन्य रूप पुरुषाचे प्रतिबिंबानें युक्त होऊन प्रकाश म्हणजे उपलब्धी न होईल तर त्या अज्ञान सुखदुःखात्मक प्रकृतीचे परिणामाचा कोणता उपयोग आहे. यास्तव चेतन पुरुषाचे संबंधानें उपलब्धीस येणारी जी जड प्रकृति आणि उपलब्धीस आणणारा जो चेतन

स्वप्रकाश पुरुष यांचा परस्पर जो अविवेकाख्य संबंध त्यासच अन्योन्य तादात्म्याध्यास म्हणतात. तोच पुरुषाचे संसारास कारण आहे. तेणेंकरूनच पुरुष मी संसारी असें मानितो त्या संबंधानें पुरुषाच्या तादात्म्याप्रत पावलेली प्रकृतीच वन्हीचे तादात्म्याप्रत पावलेलें लोह जसें वन्हीच त्रुष्कोणाद्याकार प्राप्त होण्यास कारण होतें त्याप्रमाणें पुरुषास कार्यभूत शरीरात्मकत्व कारणभूत इंद्रियाद्यात्मकत्व तसेंच मन बुद्ध्याद्यात्मकत्व येण्यास कारण होऊन तद्द्वारा आपलीं कार्यें जीं देहेंद्रियादिक त्यांवरील जे गौरत्व, मनुष्यत्व, काणत्व बधिरत्व कर्तृत्व भोक्तृत्व सुखित्व दुःखित्वादिक धर्म ते मी गौर आहें, मी मनुष्य आहें, मी काणा आहें, मी बधिर आहें, मी हें करतों, किंवा मी हें करीन, मी सुखी, मी दुःखी, असें आपलेवर आरोपानें पुरुष मानून घेतो. त्या अभिमानात्मक मानण्यास कारण होते. पुरुष ही प्रकृति कार्य ज्या पूर्वोक्त सुख ज्ञानेच्छादि स्वरूप-अंतःकरण परिणामात्मक वृत्ति त्यांचे ठायीं आपलें प्रतिबिंब समर्पण करण्यानें वन्ही जसा आपले छायेचे म्हणजे शक्तीचे समर्पणानें लोहास दाहकर्तृत्व येण्यास कारण होतो त्या प्रमाणें प्रकृतीस सुखदुःखाचे भोक्तृत्वा विषयीं कारण होऊन त्याचे द्वारा बुद्धि म्हणजे बुद्धीवर तादात्म्याभिमान ज्याणें ठेविला आहे. असा बुद्धि अंतःकरणोपाधिक जीव-मी चेतवितों-मी इच्छितों-मी सुख दुःखें अनुभवितों-असें जें मानितो त्या अभिमानिक मानण्यास कारण होतो. असा-जो हा प्रकृति आणि पुरुष यांचा अन्योन्य तादात्म्याभिमान मूलक अन्योन्य धर्माध्यास तोच जीवास बुद्धीचे तादात्म्याभिमानानें संसारास कारण आहे असें येथें विवक्षित (इष्ट) आहे. सांख्य मता प्रमाणें प्रकृतीस कर्तृत्व आणि पुरुषास भोक्तृत्व मानलें तर कर्तृत्व एकाला भोक्तृत्व एकाला असें वैयधिकरण्य-प्राप्त होईल. आणि पुरुषास भोक्तृत्व मानलें तर त्यास विकारित्व येईल आणि-त्यास अभोक्ता अविकारी जो परमात्मा त्याशीं जें ऐक्य सांगितलें तें संभवणार नाहीं या दूषणाचा या व्याख्येंत संभव नाहीं. ॥२०॥

## पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान्॥
## कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु॥२१॥

पुरुषास सुखदुःख भोक्तृत्वें करून जें संसाराचें कारणत्व सांगितलें त्याचें निमित्त काय तें सांगतात. अथवा जसें बुद्धीवरील कर्तृत्व पुरुषावर तादात्म्याभिमानानें भासतें तसें पुरुषावरील भोक्तृत्व बुद्धीवर भासतें असें कां न म्हणावें असा भ्रम होईल तर त्याचें निराकरण करतात. प्रकृतिस्थः पुरुषः प्रकृतिजान् गुणान् भुंक्ते हि-म्हणजे देहेंद्रिय मन बुद्धिरूप प्रकृति कार्याचे स-

मुदायावर हें मी किंवा ही माझी असा मिथ्यातादात्म्याभिमान धरून राहिलेला च पुरुष प्रकृति कार्यावरील गौरत्व, मनुष्यत्व, काणत्व, बधिरत्व, सुख दुःखादि स्वरूप गुणाप्रत अनुभवितो असें प्रसिद्ध आहे. जेव्हां सुषुप्तींत समाधींत मूर्च्छेंत शरीरादिकांवर तादात्म्याभिमान नाहीं तेव्हां पूर्वोक्त धर्माचा अनुभव होत नाहीं यास्तव देहेंद्रियादिक जे उपाधी त्यांवरीलच त्या धर्माचा अनुभव असें प्रसिद्ध आहे. आणि शरीर इंद्रियें मन यांहीं करून जो युक्त आत्मा त्यासच मनीषी विवेकी भोक्ता असें म्हणतात. अशी श्रुती ही देहेंद्रिय मन आदिकांचे अभिमानिक तादात्म्यानेंच आत्म्यास भोक्तृत्व आहे. शुद्धात्म स्वरूपाला भोक्तृत्व नाहीं असें स्पष्टच सांगते. येणें करून सुख दुःखानुभव रूप जो संसार त्यास प्रकृति पुरुषाचा अविवेक मूलक जो तादात्म्याभिमान तोच निमित्त असें ही सूचविलें. तेंच स्पष्ट करून सांगतात. ज्या कारणास्तव पुरुष प्रकृतिस्थ होत्सातोच प्रकृती पासून उत्पन्न होणाऱ्या सुख दुःखादिक गुणांप्रत अनुभवितो त्या कारणास्तव त्या गुणांचा अनुभव होण्यास कारणभूत ज्या सदसद्योनि म्हणजे सत् देवादियोनि आणि असत् पशुपक्ष्यादिक योनि आणि सदसत् मनुष्यादिक योनि यांचे ठायीं देवयोनींत जें सात्विक इष्टफल सुख त्याचाच अनुभव होतो. पशुपक्षी यांचा ज्या योनी त्यांचे ठायीं तामस अनिष्टफल जें दुःख त्याचा अनुभव होतो. सदसत् ज्या मनुष्यादिक योनी त्यांचे ठायीं राजस जें धर्माधर्मानें मिश्र सुख दुःखानुभव रूप फल त्याचा अनुभव होतो. त्यास कारण सत्व, रज, तम या गुणांतून प्रत्येकाच्या प्राधान्यें करून त्रिगुणात्मक प्रकृती शीं जो पुरुषाचा तादात्म्याभिमान तोच कारण आहे. म्हणजे जे सात्विक ते देव होतात, राजस मनुष्य होतात. आणि तामस पशुपक्षी स्थावर होतात. स्वतः पुरुषास या संबंधा वांचून संसार नाहींच. अथवा विद्वान् किंवा अविद्वान् सर्वही प्रकृतिस्थ म्हणजे देहेंद्रियादिकें करून युक्त असतां सुख दुःखात्मक प्रकृतीचे गुणांचा अनुभव करितात. जर अविद्वान् आणि विद्वान् भोग करण्या विषयीं समानच आहेत तर विद्वानां प्रमाणें अविद्वान् कां मुक्त होत नाहींत किंवा अविद्वाना प्रमाणें विद्वान् बद्ध कां होत नाहींत असें म्हणाल तर त्या विषयीं सांगतात. गुण जे देहेंद्रियादिक त्यांचे ठायीं जो हे मीच किंवा हे माझे असा अभिमान रूप संबंध तोच सदसद्योनींचे ठायीं जन्म होण्यास कारण आहे. विद्वानास तो अभिमान नाहीं यास्तव ते बद्ध होत नाहींत. अविद्वान त्यामुळें जन्मास जाऊन बद्ध होतात. जसा देहसंबंध समान असतां ही देहावर हा मी किंवा माझा हा असा अभिमान ठेवणारा यक्ष देहाचे पीडेनें पीडित होतो त्या सन्निध राहिलेला त्या देहांतील जीव ते वेळेस देहावर त्याचा अभिमान नसल्यामुळें पीडित होत नाहीं. जेव्हां-

जीव देहावर अभिमान ठेवितो तेव्हां देहाचे पीडेनें जीवच पीडित होतो त्यावेळे-स अभिमान ठेवणारा यक्ष पीडित होत नाहीं असें प्रसिद्ध आहे. यास्तव सान्नि-ध्य मात्र बंध होण्यास कारण नाहीं तर पूर्वोक्त संगालाच बंध कारणत्व आहे या-मुळें विद्वानांस आणि अविद्वानांस देहसंबंध सारखा असला तरी विद्वानास ता-दात्म्याभिमान रूप संग नाहीं आणि अविद्वानास तद्रूप संग आहे हेंच मोठें त्याचें वैलक्षण्य ( भिन्न लक्षण ) आहे. ॥ २१ ॥

## उपद्रष्टानुमंताच भर्ता भोक्ता महेश्वरः ॥ पर-मात्मेति चाप्युक्तो देहेस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥

या प्रमाणें मिथ्या प्रकृति तादात्म्याभिमानें करून पुरुषास संसार आहे. स्वरूपतः पुरुषास संसार नाहीं असें सांगितलें तें पुरुषाचे प्रकृतीहून भिन्न असं-सारी स्वरूप कोणतें तें सांगतात. प्रकृति परिणाम भूत जो देह त्याचे ठायीं जीवस्व-रूपानें वर्तमान ही परपुरुष प्रकृतीचे गुणानें असंसर्गयुक्त स्वरूपें करून असंसा-रीच आहे कारण तो उपद्रष्टा-म्हणजे जसे यज्ञांत ऋत्विज यजमान हे आपापला व्यापार करण्या विषयीं व्यापार युक्त असतां ही त्यांचे समीप राहणारा स्वतः कांहीं य-ज्ञसंबंधी व्यापार न करणारा असून यज्ञविद्येंत कुशल असल्यामुळें ऋत्विज यज-मान जे व्यापार करतात त्यांचे गुणदोषांचा पाहणारा ज्यास सर्वोपद्रष्टा म्हणतात तो द्रष्टा ( अवलोकन कर्ता ) मात्र असतो कर्ता नव्हे तसा हा परपुरुष देहेंद्रियादिक आपापले व्यापार करीत असतां स्वतः कांहीं व्यापार न करणारा तत्समीप राहणारा त्याहून विलक्षण त्यांचा द्रष्टा आहे परंतु कर्ता नाहीं. त्या त्या अवस्थेंत जें पाहतो-त्याशीं संगी होत नाहीं. ह्यापुरुष असंग आहे अशा अर्थाची श्रुती ह्याविषयीं प्र-माण आहे. अथवा उपशब्दाचा अव्यवधान रहित सामीप्य अर्थ घ्यावा. देह, चक्षु, मन बुद्धि आत्मा हे सर्व द्रष्टे ( अवलोकनकरणारे ) आहेत त्यांत बाह्य देहादिकापे-क्षां आंतर द्रष्टा मन त्यापेक्षां आंतर द्रष्टा आत्मा त्यापेक्षां दुसरा जवळचा आंतर द्रष्टा नाहीं असा उपद्रष्टा याचा अर्थ जाणावा. आणि तो परपुरुष - अनुमंता- म्ह-णजे कार्य कारण जे देहेंद्रियादिक त्यांचे व्यापारा विषयीं आपण प्रवृत्त नसतां ही-त्यांचे समीपस्थित असल्यामुळें प्रवृत्ता प्रमाणें अनुकूल त्यास्तव अनुमोदन दे-णारा आहे. अथवा आपले व्यापारा विषयीं प्रवृत्त झालेल्या देहेंद्रियां प्रत तत्सा-क्षि भूत होऊन त्याचें निवारण न करणारा, तो परमात्मा साक्षी चेता आहे अशी श्रुती यास प्रमाण आहे आणि तो परपुरुष भर्ता-म्हणजे समुदाय रूपानें-स्थित जीं देहेंद्रिय मन बुद्ध्यादिक त्यांस चैतन्या भासानें आणि स्वसत्तेनें युक्त-करून त्यांस- अस्ति- भाति - अशा व्यवहाराचे योग्यतेस आणणें एतद्रूप त्याचें

धारण किंवा पोषण करणारा आणि भोक्ता-म्हणजे बुद्धि वृत्तिरूप जें सुख दुः-
ख मोहात्मक परिणाम त्यांचा बुद्धिस्थलें करून स्वस्वरूप प्रकाशानें भासविणा-
रा त्या वृत्तींत अभिव्यक्त (प्रगट) उपलब्धिस्वरूप अनुभवात्मा आणि महेश्वरः
म्हणजे सर्वात्मत्वास्तव स्वतंत्र त्यास्तव मोठा आणि ईश्वर आणि तो परपुरुष पर-
मात्मा-म्हणजे देहादिक बुद्ध्यंत जे अविद्या कल्पित पदार्थ त्यांचा अधिष्ठानभू-
त उत्कृष्ट उपद्रष्टत्वादि धर्म विशिष्ट आत्मा आहे तो श्रुतींत परमात्मा अशा श-
ब्दानें ही निरूपिला आहे.॥२२॥

## य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ॥ सर्व-
## था वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥२३

या प्रमाणें-सच योयात्म भावस्थ-अशी ज्याचे निरूपणाची प्रतिज्ञा
केली होती त्याचें एथवर निरूपण केलें. आतां-"यज्ज्ञात्वामृतमश्नुते"-ये-
थें करून ज्या ज्ञेय ब्रह्माचे ज्ञानानें मोक्ष प्राप्त होतो असें पूर्वीं सांगितलें त्याची
समाप्ति करतात. यः एवं पुरुषं वेत्ति-म्हणजे जो सांगितल्या प्रकारानीं पुरुष
प्रत तो मीच आहें. असें साक्षात्कारात्मक ज्ञानानें जाणतो. आणि गुणैः सह प्र-
कृतिं च वेत्ति-म्हणजें विकारां सुद्धां प्रकृतीस मिथ्यात्वें करून किंवा माझी अवि-
द्या ज्ञानें करून नष्ट झाली असें जाणतो. सः म्हणजे तो-सर्वथा वर्तमानोपि-
म्हणजे प्रारब्ध कर्मवशें करून विधिशास्त्राचें अतिक्रमण करून स्थित अस-
ला तरी-भूयः न जायते-म्हणजे हें शरीर पडल्यावर पुनः देहाचें ग्रहण करीत
नाहीं, पुनः जन्मास येत नाहीं. अविद्येचा ब्रह्मात्म साक्षात्कारानें नाश झाल्यावर
तिचें कार्य होण्याचा असंभवच आहे आणि तत्वविद्येनंतर पुढें होणाऱ्या पुण्य-
पापादिकांचा विद्वानास संश्लेषच नाहीं पूर्व संचितांचा ज्ञानाग्नीनें नाश होतो.
प्रारब्ध कर्मांच्या भोगानें क्षय झालात आहे, तेव्हां जन्म होण्यास कारणच ना-
हीं यामुळें जन्मास पुनः येत नाहीं मुक्तच होतो. अपिशब्दानें विधिशास्त्राचें अ-
तिक्रमण न करून सदाचरणानें राहणारा ज्ञानी पुनः जन्मास येत नाहीं म्हणून
काय सांगावयाचें आहे असें सूचविलें.॥२३॥

## ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना॥
## अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे॥२४

या जगांत उत्तम मध्यम, मंद मंद तर असें चार प्रकारचे अधिकारी आ-
हेत त्यांच्या तारतम्यानें आत्म दर्शना विषयीं साधनाचे विकल्प सांगतात. प्रथ-
म उत्तमाधिकाऱ्यास ब्रह्मात्म साक्षात्काराचें साधन सांगतात. केचित् ध्यानेन आ-

त्मानं आत्मना पश्यंति-म्हणजे विजातीय अनात्माकार अंतःकरण वृत्ति ज्यांत नाहींत असा ब्रह्मात्माकार अंतःकरण वृत्तीचा अविच्छिन्न निरंतर प्रवाह त्यास ध्यान किंवा निदिध्यासन म्हणतात. तेणें करून संस्कृत जें अंतःकरण तेणें करून बुद्धीचे ठायीं आत्म्याप्रत ब्रह्मत्वें करून कोणी उत्तम योगी प्रत्यक्षात्मक ज्ञानानें अनुभवितात. मध्यमाधिकाऱ्यांस आत्मज्ञान साधन सांगतात. अन्ये सांख्येन योगेन म्हणजे कोणी मध्यमाधिकारी पूर्वोक्त निदिध्यासनात्मक ज्ञानाचे पूर्वी अनुष्ठान केलेला जो नित्यानित्य वस्तु विवेक तत्पूर्वक हे सर्व दृश्य पदार्थ अनात्मे त्रिगुणात्मक प्रकृति परिणाम रूप मिथ्याच आहेत त्यांचा साक्षिभूत नित्यविभु निर्विकार सत्यसमस्त जड दृश्यात्मक बंध शून्य परम आत्मा मीच आहें असा जो वेदांत श्रवण मनन रूप सांख्य योग तेणें करून पूर्वोक्त निदिध्यासन द्वारा श्रवण मनन निदिध्यासन सह कृत जें अंतःकरण त्याची जी वेदांत महावाक्यापासून झालेली अपरोक्ष ब्रह्मात्माकार वृत्ति तद्रूप अनुभवानें बुद्धीचे ठायीं अनुभवितात. मंदाधिकाऱ्यांस ज्ञान साधन सांगतात. अपरे कर्मयोगेन-म्हणजे कोणी मंदाधिकारी ईश्वरार्पण बुद्धीनें फलेच्छा सोडून केलेला जो वर्णाश्रमोचित वेद विहित निष्काम कर्मयोग तेणें करून चित्तशुद्धीचे द्वारा नंतर झालेलें जें श्रवण मनन निदिध्यासन तद्द्वारा पूर्वी सांगितले प्रमाणें बुद्धीचे ठायीं मनानें आत्म्याप्रत पाहतात. ॥२४॥

## अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वाऽन्येभ्य उपासते ॥
## तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥२५॥

आतां जे मंदतर म्हणजे फारमंद जे अधिकारी आहेत त्यांस आत्मज्ञान साधन सांगतात. अन्येतु एवं अजानंतः म्हणजे जे अत्यंत मंद अधिकारी आहेत ते पूर्वोक्त तीन प्रकारच्या अधिकाऱ्यांचीं जीं ज्ञान साधनें त्यांतून कोणते ही साधनानें आत्म्याप्रत न जाणतां अन्येभ्यः श्रुत्वा-म्हणजे कारुणिक जे गुरू त्यांपासून आत्मस्वरूपाचें असें चिंतन करावें आत्मा असा आहे असें श्रवण करून-श्रद्धेनें करून युक्त होऊन-उपासते-म्हणजे गुरूपदिष्ट प्रकारानें आत्म्याचें उपासन म्हणजे चिंतन करतात. तेपि श्रुति परायणाः संतः मृत्युं अतितरंति-म्हणजे ते स्वतः विचार करण्यास असमर्थ असले तरी अत्यंत श्रद्धेनें युक्त होऊन गुरूपासून उपदेशानें श्रवण करावें असे तत्पर होत्साते संसाराप्रत तरतात. मग विचारसमर्थ जे आहेत ते संसाराप्रत तरतील म्हणून काय सांगावें असें अपिशब्दानें-सूचविलें असें तात्पर्य. ॥२५॥

यावत्संजायते किंचित्सत्वं स्थावरजंगमम्॥ क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ॥२६॥

.संसार अविद्येनें कल्पिलेला आहे यास्तव त्याची विद्येनें म्हणजे आत्मतत्व ज्ञानानें निवृत्ति होऊन मोक्ष होतो या अर्थाचा निश्चय होण्या साठीं मिथ्याभूत संसारास अविद्या कल्पितत्व सांगून त्याचें स्वरूप आणि त्याचें निवर्तक जें ज्ञान त्याचें स्वरूपाचें येथून अध्याय समाप्ति पर्यंत सविस्तर निरूपण करतात त्यांत प्रथम सदसद्योनीचे ठायीं जन्म होण्यास या पुरुषास गुण संगच कारण आहे असें जें सांगितलें तेंच स्पष्ट करून दाखवितात. यावत् किंचित् स्थावर जंगमं सत्वं जायते- म्हणजे जें कांहीं स्थावर किंवा जंगम भूत उत्पन्न होतें तें सर्व हे भरतर्षभ- क्षेत्र क्षेत्रज्ञ संयोगात् इति विद्धि -म्हणजे हे भरत वंशांतील श्रेष्ठा अर्जुना अविद्या आणि तिचें कार्य जें जड अनिर्वचनीय सर्व दृश्यात्मक क्षेत्र - आणि त्यांहून विलक्षण जो त्या क्षेत्राला भासविणारा परमार्थत: स्वप्रकाश चैतन्य स्वरूप सत्य असंग उदासीन निर्धर्मक अद्वितीयात्म स्वरूप क्षेत्रज्ञ यांचा मायाशक्तीचे सामर्थ्यानें झालेला जो परस्पराचा भेदाग्रहरूप अविवेक तन्निमित्तक- ज्यांत सत्य आत्मा आणि मिथ्याभूत दृश्य देहादिक एकरूपानेंच भासलीं आहेत असा मिथ्याभूत तादात्म्याध्यास रूप संबंध त्यापासूनचं उत्पन्न झालें आहे असें तूं जाण. येणें करून जागृदवस्थेंतील आपले स्वरूपाचे अज्ञानामुळें स्वप्नांत झालेला जो अनेक प्रकारचा भ्रम त्याची जागृत होऊन स्वकीय स्वरूपाचे ज्ञानानें जशी निवृत्ति होते त्याप्रमाणें पूर्वोक्त स्वस्व रूपाचे अज्ञाना मुळें झालेला जो संसार तो स्वस्व रूपाचे यथार्थ ज्ञानानें निवृत्त होण्यास योग्य आहे असें सुचविलें॥२६

समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम्॥ विनश्यत्स्व विनश्यंतं यः पश्यति स पश्यति॥२७॥ ॥

या प्रमाणें संसाराला अज्ञान कल्पितत्वरूप मिथ्यात्व सांगून त्याचें निवर्तक ज्ञान सांगण्या साठीं-"य एवं वेत्ति पुरुषं"- येणें करून जें सांगितलें त्याचें स्पष्टी करण करतात. सर्वेषु भूतेषु समं तिष्ठंतं - म्हणजे उत्पन्न होणारे जे स्थावर जंगमात्मक सर्व प्राणी ते जन्मास येणें बाल्यादि दशेनें वाढणें क्षीण होणें- इत्यादिक अनेक विकार युक्त असत्यामुळें गंधर्व नगरा प्रमाणें दृष्ट नष्ट स्वभावत्वा स्तव अस्थिर त्यामुळें नाश पावत असतां ही त्या सर्वांचे ठायीं सर्वदैव बाध- झाला तरी त्याच्या बाध साक्षीचे स्वरूपानें समान रूपानें आणि त्यांस सत्ता स्फूर्ति प्रद सच्चिद्रूपानें राहणारा- विनश्यत्सु अविनश्यंतं- म्हणजे ज्यांचे नाश मु-

णें किंवा उत्पत्तीनें ज्यास जन्ममरण नाहीं अशा परमेश्वरं यः पश्यति - म्हणजे परमेश्वरास जड प्रपंच (भिन्न) त्वें करून विवेक रूप ज्ञानचक्षूनें जो स्वात्मत्वें करून पाहतो. सः पश्यति - म्हणजे तोच आत्म्याप्रत उत्तम पाहतो. जसा जागृत होऊन वास्तविक आपले स्वरूपाला स्वप्नांतील भ्रमाचा बाध करून जो पाहतो तोच खरें पाहणारा, आपले स्वरूपाचा अज्ञाना भ्रांतीनें विपरीत पाहत असतांही तो स्वप्नभ्रम यथार्थस्वरूपाचे अदर्शनात्मकच आहे म्हणून तो न पाहणाऱ्याप्रमाणेंच आहे म्हणून तो पाहत नाहीं. या प्रमाणें प्रपंचरहित शुद्धात्म दर्शनें करून तदज्ञान रूप जी अविद्या तिची निवृत्ति होऊन नंतर तिचा कार्यभूत जो प्रपंच त्याची निवृत्ति होते असा अभिप्राय. ॥२७॥.

**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ॥**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥२८॥**

त्या आत्मज्ञानानें फल दाखवून त्याची स्तुति करतात. सर्वत्र समं समवस्थितं ईश्वरं - म्हणजे सर्वत्र उत्पत्त्यादिक नाशांत जे पूर्वोक्त विकार तद्रहित स्वरूपानें उत्तम प्रकारें करून पूर्वोक्त एकरूपानें समान राहिलेला जो पूर्वोक्त सकल विशेषणानीं युक्त ईश्वर त्या प्रत तो मीच आहें असें शास्त्र दृष्टीनें - पश्यन् - म्हणजे साक्षात्कारात्मक ज्ञानानें पाहणारा पुरुष आत्मना आत्मानं न हिनस्ति - म्हणजे आपणच आपली हिंसा करीत नाहीं. तात्पर्य - सर्वही अज्ञानीजीव परमार्थतः एक अद्वितीय अकर्ता अभोक्ता आनंद स्वरूप आत्मा असतांही अविद्येनें तसा आत्मा नाहीं आणि तसें आत्मस्वरूप भासत ही नाहीं असा त्या आत्म्याच्या स्वरूपाचा अपलाप (आच्छादन) करून पूर्वींचा जो वास्तविक आत्मा त्याचा परित्याग करून अविद्येनें ज्या देहेंद्रियादिकांवर आत्मत्व भ्रम झाला आहे त्या देहेंद्रियादिक मनबुद्धि समुदाय रूप नवीन आत्म्याचें ग्रहण करतो. नंतर त्यावर कर्तृत्व भोक्तृत्व मानून धर्माधर्माचरण करून त्याचे निमित्तानें त्याचाही त्याग करून दुसऱ्या देहेंद्रिय मनोबुद्धींच्या समुदायात्मक आत्म्याचें ग्रहण करतो त्याचाही पूर्वी प्रमाणें त्याग करून तिसऱ्याचें ग्रहण करतो आणि अनेक योनींत जन्म घेऊन आत्म्यास पीडा देतो याप्रमाणें पूर्वपूर्व आत्म्याचा त्याग करून नवीन नवीन आत्म्यानें ग्रहण करणारा अज्ञानी आत्महा म्हणजे आत्मस्वरूपाची हिंसा करणाराच आहे. यास प्रमाण "किं तेन न कृतं पापं चोरेणात्मापहारिणा ॥ योऽन्यथा संतमात्मानमन्यथा प्रतिपद्यते" असें आत्मा पूर्वोक्त परमार्थ रूपी असतां ही जो त्यास तद्विपरीत पाहतो असा आत्म्याचा अपहार करणारा जो तो चोर त्याणें अन्य कोय पाप केलें नाहींतर आत्महत्येमुळें सर्व पाप त्याणें केलें या-

अर्थाचें भारतस्थ स्मृतिवाक्य आहे. तसेंच अंधतम म्हणजे अंधकारानें व्याप्त किंवा तन्नामक नरकानें व्याप्त जे लोक ते आसूर्या नाम लोक अथवा आसुर संपत्ति पुढें सांगावयाची आहे त्या संपत्तीनें जे पावावयाचे लोक त्यांप्रत जे आत्महनन करणारे म्हणजे अनात्म देहादिकांस आत्मा असें मानणारे जे जीव ते पावतात अशा अर्थाची श्रुतीही आहे. जो वास्तविक पूर्वोक्त आत्मस्वरूप जाणणारा आहे तो ज्ञानी शुद्धात्म दर्शनामुळें अनात्म्यावर आत्मबुद्धि करून आत्म्यास जन्ममरण प्रवाहांत पूर्वोक्त अज्ञान्या प्रमाणें घालीत नाहीं म्हणून तो आपली आपण हिंसा करीत नाहीं आणि आत्मस्वरूपाचें यथार्थज्ञान त्यास झाल्यामुळें – ततः परांगतिं याति – म्हणजे नंतर मोक्षरूप उत्कृष्टगतीप्रत तो पावतो. ॥२८.

**प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ॥ यः पश्यति तथात्मानमकर्तारं सपश्यति ॥ २९ ॥ ॥**

प्रति देहीं विचित्र शुभाशुभ कर्मांचें फलभोगणारे आणि विचित्र शुभाशुभ कर्म करणारे भिन्न भिन्न आत्मे प्रत्यक्ष दिसतात. असें असून सर्व भूतांचे ठायीं अकर्ता अभोक्ता आत्मा समान आहे असें पाहणारा आपली आपण हिंसा करीत नाहीं असें कसें सांगतां. असें म्हणेल तर त्याविषयीं सांगतात. सर्वशः कर्माणि प्रकृत्यैव क्रियमाणानि यः पश्यति – म्हणजे शरीरानें वाणीनें आणि मनानें केलेलीं जीं कायिक, वाचिक, मानसिक सर्व प्रकारचीं कर्में तीं देहेंद्रिय समुदायरूपानें परिणाम पावलेली जी भगवन्माया स्वरूप त्रिगुणात्मक प्रकृति तिणेंच केलेलीं आहेत. सर्व विकारशून्य जो निर्विकार स्वरूप आत्मा त्यानें केलेलीं नाहींत असें जो विवेकी पाहतो तथा आत्मानं अकर्तारं पश्यति म्हणजे आणि क्षेत्रात्मक प्रकृतीनें सर्व केलीं असतां ही त्याहून विलक्षण जो पूर्वोक्त क्षेत्रज्ञ आत्मा त्यासहा अकर्ताच आहे अशा प्रत जो पाहतो. सः पश्यति – म्हणजे तोच परमार्थदर्शी. सविकार क्षेत्राचा विचित्र कर्म कर्तृत्वें करून प्रतिदेहीं भेद असून विषम भाव असला तरी निर्विशेष पृथिव्यादि महत्तत्त्वांत विशेष रहित आत्मस्वरूपाचा भेद नाहीं. जसा घरमठाद्युपाधि भेद असला तरीं उपाधि रहित आकाशस्वरूपाचा भेद नाहीं तसा असें तात्पर्य. ॥२९॥

**यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ॥ तत एव च विस्तारं ब्रह्मसंपद्यते तदा ॥ ३० ॥ ॥**

या प्रमाणें उत्तम विचार न करून क्षेत्रांचे भिन्नत्वें करून दर्शन स्वीकारून क्षेत्रज्ञांचें भिन्नत्वें करून जें दर्शन होतें तें वास्तविक नव्हे असें निराकरण केलें.

आतां क्षेत्रें ही मायिक मिथ्यात्व आहेत यामुळें ही त्यांचा वास्तवीक भेद नाहीं असें क्षेत्र भेद दर्शनाचें निराकरण करतात. यदा भूत पृथक् भावं एकस्थं अनुपश्यति- म्हणजे ज्याकाळीं स्थावर जंगमात्मक जीं जड भूतें त्यांचें परस्पर जें भिन्नत्व भासतें तें एक परमात्मा जो सर्व भ्रमाधिष्ठान त्याचे ठायींच कल्पिलेलें असें पाहतो- म्हणजे शास्त्राचार्योपदेशांनीं कल्पिताची अधिष्ठान सत्तेशिवाय दुसरी सत्ता नाहीं हें सर्व आत्मस्वरूपच आहे असें उत्तम दर्शनानें पाहतो. असें असतां ही माया शक्तीचे सामर्थ्यानें- तत एवच विस्तारं पश्यति- म्हणजे त्या एके ब्रह्मा पासून भूतांचा विस्तार म्हणजे भिन्न भिन्न सत्तेनें भूतें भासतात. असें पाहतो. तदाब्रह्म संपद्यते- म्हणजे ते समयीं ब्रह्मात्मैक्य दर्शनें करून सजातीय विजातीय भेददर्शन त्यास नसल्यामुळें तो ब्रह्मस्वरूपच होतो यास प्रमाण ज्याकालीं ज्ञात्यांस सर्वभूतें आत्माच आहे असें ज्ञान झालें तेव्हां सर्वत्र एकेच आत्मसत्तेस पाहणारा जो त्यास शोक आणि मोह कोठून होतील अशा अर्थाची श्रुती आहे. प्रकृत्यैवच कर्माणि या श्लोकांत परमार्थतः आत्मभेद नाहीं असें आत्म भेदाचें निराकरण केलें आणि या श्लोकांत अनात्म्याचाही परमार्थतः भेद नाहीं असें सांगून अनात्म्याचे वास्तविक भेदाचें निराकरण केलें असा विशेष जाणावा. ॥३०॥

## अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः॥
## शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते॥३१॥

आत्म्यास स्वरूपतः कर्तृत्व नसलें तरी शरीर संबंध निमित्तक औपाधिक कर्तृत्व त्यास येईल अशी शंका आली असतां त्याविषयीं- अकर्तारं आत्मानं यः पश्यति - याचें स्पष्टीकरण करून सांगतात. अयंपरमात्मा अव्ययः- म्हणजे हा अपरोक्ष ईश्वराभिन्न आत्मा सर्व विकार रूप व्यय रहित आहे विकार स्वरूप व्यय दोन प्रकारचा आहे, एक स्वरूपाचे उत्पत्त्यादिकामुळें आणि एक स्वरूप उत्पन्न न झालें तरी त्यावरील धर्माचे उत्पत्त्यादिकें करून जो स्वरूपास औपाधिक विकार होतो तो त्यांतील पहिल्याचें निराकरण करतात. अनादित्वात्-म्हणजे पूर्वी जी अभावावस्था तीस आदि म्हणतात तो आदि सर्वदा सत्ता असल्यामुळें त्यास नाहीं यास्तव उत्पत्ति कारण प्रागभावावस्था नाहीं म्हणून आत्म्यास जन्म नाहीं. जो अनादि त्यास जन्म संभवतच नाहीं तें न झाल्यामुळें तत्पूर्वक पुढें होणारे जे वृद्धिपावणें क्षीण होणें इत्यादिक विकार ते त्यास नाहींत. यास्तव पहिला व्यय त्यास नाहीं. आतां दुसऱ्या व्ययाचें निराकरण करतात. निर्गुणत्वात्- म्हणजे तो आत्मा निर्धर्मक आहे. धर्म आणि धर्मी यांचें तादात्म्य आहे- या मुळें धर्मि स्वरूपाला विकार युक्त केल्या वांचून कोणताही धर्म उत्पन्न होत ना-

हीं आणि नाशही पावत नाहीं. हा आत्मा निर्धर्मक आहे यामुळें धर्माच्या उत्पत्तीचे किंवा नाशाचे द्वारा ही उत्पत्ति नाशरूप दुसराविकार रूप व्यय आत्म्यास नाहीं. हा आत्मा अविनाशी आहे नाश धर्मक नाहीं अशा अर्थाची श्रुती ही असेंच सांगते. ज्या कारणास्तव उत्पन्न होतो, सत्ता पावतो, वृद्धि पावतो, बाल्य तारुण्यादिक अवस्थांप्रत पावतो, क्षीण होतो, नाशपावतो. असे जे षड्भाव विकार त्यानीं हा आत्मा रहित आहे यास्तव शरीरस्थोपि - म्हणजे शरीरांत याची उपलब्धी होते म्हणून शरीरस्थ असला तरी इच्छा द्वेष सुख दुःख इत्यादिक धर्म क्षेत्राचेच आहेत. सर्वकार्यें प्रकृतीनें केलेलींच आहेत यास्तव हा आत्मा - नकरोति न लिप्यते - म्हणजे कोणतें ही कर्म करीत नाहीं यामुळें त्याचे फलानें ही लिप्त होत नाहीं. आत्म्याला निर्धर्मकत्व सांगितल्यानें धर्म धर्मी भेद स्वरूप स्वगत भेदाचा ही निषेध केला " प्रकृत्यैवच कर्माणि " येणें करून सजातीय भेदाचें निराकरण केलें " यदाभूत पृथक् भावं " येणें करून विजातीय भेदाचें निराकरण केलें. या प्रमाणें सजातीय भेद विजातीय भेद स्वगत भेद यांचें निराकरण केल्यामुळें एक अद्वितीयच ब्रह्म तें श्रुतींत सांगितलें तेंच येथें सांगितलें असें जाणावें. ॥३१॥

**यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ॥**
**सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥३२॥**

शरीरस्थ असतांही आत्मा शरीरानें केलेले कर्मानें असंगत्वास्तव लिप्त होत नाहीं असें सांगितलें त्याविषयीं दृष्टांत सांगतात. सौक्ष्म्यात् सर्वगतं आकाशं यथा न उपलिप्यते - म्हणजे आकाश सर्वत्र असतांही असंग स्वभावास्तव पंकादिकानें जसें लिप्त होत नाहीं. सर्वत्र देहे अवस्थितोपि आत्मा तथा न उपलिप्यते - म्हणजे तसा आत्मा सर्व देहांत असला तरी असंग स्वरूपास्तव देहकृत कर्मानें लिप्त होत नाहीं. ॥३२॥

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ॥**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥३३॥**

केवळ असंग स्वरूपत्वास्तव आत्मा लिप्त होत नाहीं असें नाहीं आत्मा प्रकाश स्वरूप सर्वांचा प्रकाशक आहे यामुळें ही प्रकाश पावणारे जे दृश्य पदार्थ त्यांचे धर्मानें लिप्त होत नाहीं असें सदृष्टांत सांगतात. यथा एकः रविः इमं कृत्स्नं लोकं प्रकाशयति - म्हणजे जसा एकच सूर्य या सर्व लोकांप्रत किंवा देहेंद्रियादिक रूप युक्त सर्व समुदायाप्रत प्रकाशित करतो तथापि प्रका-

शित केलेले पदार्थांच्या धर्मांनें लिप्त होत नाहीं किंवा त्यांचे भेदानें भिन्न होत नाहीं तथा हे भारत क्षेत्री कृत्स्नं क्षेत्रं प्रकाशयति- म्हणजे त्याप्रमाणें क्षेत्रज्ञ एकच आत्मा सर्व क्षेत्रांप्रत प्रकाशित करतो तथापि हे भारता, अर्जुना तो त्याच्या धर्मांनें लिप्त होत नाहीं आणि त्याच्या भेदानें भिन्न ही होत नाहीं. ॥ ३३ ॥

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा ॥ भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ॥ ३४ ॥ ॥ इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

आतां अध्यायांत सांगितलेले अर्थाचीं त्याच्या ज्ञानानें फल सांगून समाप्ति करतात. पूर्वी ज्यांचीं स्वरूपें सविस्तर सांगितलीं अशा- क्षेत्र क्षेत्रज्ञ योः- म्हणजे क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांचें- एवं- म्हणजे सांगितले प्रकारानें अंतरं- म्हणजे क्षेत्र जडविकारी आहे. क्षेत्रज्ञ चेतन अविकारी आहे असें वैलक्षण्य (भिन्नत्व) ज्ञान चक्षुषा ये विदुः- म्हणजे शास्त्र आणि गुरु यांचे उपदेशापासून झालेले ब्रह्मात्म ज्ञानरूप चक्षूनें जाणतात. आणि- भूत प्रकृतिंमोक्षंच ये विदुः- म्हणजे भूतांची मूलकारण भूत जी प्रकृति म्हणजे अविद्या तिचा आत्मज्ञानानें जो मोक्ष म्हणजे नाश त्याप्रत पूर्वोक्त ज्ञानचक्षूनें जे जाणतात- ते परं यांति- म्हणजे ते परमार्थ वस्तु स्वरूप जें कैवल्य मोक्षाख्य पद त्याप्रत पावतात. पुनः जन्म मरण प्रवाहांत येत नाहींत. येणें करून अमानित्वादिक ज्ञान साधन संपन्नास क्षेत्रक्षेत्रज्ञांचें विवेक ज्ञान होऊन तेणें करून त्यांचे अज्ञानाचा नाश होऊन त्यास परपुरुषार्थ भूत मोक्ष प्राप्ति होते असें या अध्यायांत सांगितलें असें जाणावें. ३४

इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथ शास्त्रिकृत भाषाविवृत्तौ त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

## अध्याय १४ वा.

श्रीभगवानुवाच ॥ ॥ परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ॥ यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १ ॥

पूर्वाध्यायीं- "यावत्संजायते किंचित्सत्वं स्थावर जंगमं ॥ क्षेत्र क्षेत्रज्ञ

संयोगात् तद्विद्धि भरतर्षभ-" येणें करून हें जें स्थावर जंगमात्मक विश्व उत्पन्न होतें तें क्षेत्र म्हणजे प्रकृति आणि क्षेत्रज्ञ म्हणजे पुरुष यांचे संबंधा पासून उत्पन्न होतें असें सांगितलें तें निरीश्वर वादी सांख्य मता प्रमाणें स्वतंत्र प्रकृतिपुरुषांचे संबंधा पासून उत्पन्न होतें असें नाहीं. प्रकृति पुरुष यांचा जो संबंध होतो तो ईश्वरेच्छाधीन आहे. कर्तृत्व भोक्तृत्वा विषयीं प्रकृतीस किंवा पुरुषास स्वातंत्र्य नाहीं. ईश्वरपरतंत्रता आहे. असें सांख्यमत निराकरण करून सांगण्या साठीं आणि-"कारणं गुण संगोस्य सदसद्योनि जन्मसु" जेणें करून जीवांस सत् असत् इत्यादिक योनीचे ठायीं जें जन्म होतें त्यास गुणांशीं संग कारण आहे असें सांगितलें त्या विषयीं गुण कोणते कोणते गुणाशीं कसा संबंध होतो कोणता गुण जीवास कसा बंधक होतो याचें निरूपण करण्या विषयीं आणि "भूत प्रकृतिमोक्षंच ये विदुः-" असें जें सांगितलें तेथें भूत प्रकृति मोक्ष तो कोणता तो कसा होतो तें सांख्य मता पेक्षां निराळें वेदांति मत सिद्ध भूत प्रकृति मोक्षाचें-स्वरूप सांगण्या साठीं आणि मुक्ताचें लक्षण काय तें सांगण्या साठीं चतुर्दशाध्यायाचा आरंभ करतात. यांत प्रथम पुढें जो अर्थ सांगावयाचा त्याचे श्रवणा विषयीं श्रोत्यांची अभिरुची उत्पन्न होण्या साठीं त्या अर्थाची दोन श्लोकांनीं स्तुति करून श्री भगवान् बोलतात.-ज्ञानानां उत्तमं परंज्ञानं भूयः प्रवक्ष्यामि-म्हणजे जेणें करून ज्ञान होतें अशीं जीं बहिरंग यज्ञादिक ज्ञान साधनें त्यां मध्यें उत्तम जें ज्ञान-साधन सर्वोत्कृष्ट आणि उत्तम फलसाधन ब्रह्म तें पूर्वाध्यायीं वारंवार सांगितलें आहे तरी पुनः सांगतों. ब्रह्माकार अंतःकरण वृत्यात्मक ज्ञान होण्यास विषय स्वरूपानें ब्रह्म कारण आहे. यास्तव ब्रह्मज्ञान साधन आहे. अमानित्वादिक उत्तम ज्ञानरूप फलास साधनें अंतरंग आहेत तथापि तीं पर म्हणजे सर्वोत्कृष्ट नाहींत त्यापेक्षां ब्रह्म उत्कृष्ट आहे अथवा जाणिजेतात. तें ज्ञान म्हणजे सर्व ज्ञेय पदार्थ त्यांमध्यें अतिशयित जें उत्तम ज्ञेय ब्रह्मवस्तु तें तुला पुनः सांगतों.-यत् ज्ञात्वा-म्हणजे ज्या ज्ञान साधनाचें अनुष्ठान करून किंवा जें ब्रह्म वस्तु वेदांत वाक्या पासून झालेलीं अपरोक्ष अखंड ब्रह्मात्माकारांतःकरण वृत्ति तीणें करून स्वात्मत्वें करून अनुभवून-सर्वे मुनयः-म्हणजे सर्व संन्यासी किंवा मननशील-इतः सिद्धिं गताः-म्हणजे देह बंधरूप जो हा संसार या पासून मुक्त होऊन सिद्धीप्रत पावले म्हणजे मुक्त झाले. ॥१॥

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः॥**
**सर्गेऽपि नोपजायंते प्रलयेन व्यथंति च ॥२॥**

त्या सिद्धीचा कधीं ही कोणास व्यभिचार नाहीं असें सांगतात ॥ इदंज्ञा-

नं उपाश्रित्य- म्हणजे या ज्ञानसाधनाचें उत्तम प्रकारानें अनुष्ठान करून किंवा वि-
षय विषयीं भावरूप विकल्प ज्यांत भासत नाहीं अशा या ज्ञानानें युक्त होऊन-मम
साधर्म्य आगताः-म्हणजे मी जो परमेश्वर त्याचें सादृश्याप्रत म्हणजे ब्रह्म रूपानें-
सर्वात्मत्व सर्व नियंतृत्व सर्वभावाधिष्ठातृत्वादि जे धर्म त्यांहीं करून मद्रूपते प्रत पा-
वतात. किंवा पावलेले होत्साते ज्ञान बळें करून त काक भृशुंडी प्रभृती पुराण सिद्ध-
ज्ञानी-सर्गेऽपि नोपजायंते-म्हणजे हिरण्य गर्भ प्रभृती उत्पन्न होत असतां ही उ-
त्पन्न होत नाहींत.-प्रलयेऽपि न व्यथंति- आणि ब्रह्मदेवाचे प्रलय काळीं ही नाश-
किंवा लयाप्रत पावत नाहींत जो मी ब्रह्म आहें असें जाणतो तो हें सर्व होतो म्हण-
जे सर्वात्मक होतो. सर्वांचा वश कर्ता सर्वांचा ईशान सर्वांचा अधिपति होतो तो साधु-
कर्मानें मोठा होत नाहीं. असाधु कर्मानें लहान होत नाहीं असें ज्ञान फळ ईश्वराचें
साम्य प्राप्त होतें म्हणून श्रुतींत ही सांगितलें आहे. काक भृशुंडी प्रभृती ब्रह्मदे-
वाचे प्रलयीं ही नाश पावले नाहींत असें महाभारतांत सविस्तर उपाख्यान सांगि-
तलें आहे. ॥२॥

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम्॥**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥३॥**

या प्रमाणें ज्ञानाचे प्रशंसेनें श्रोत्यांस सावधान करून परमेश्वराधीन जे
प्रकृति पुरुष त्यांसच सर्वभूतोत्पत्तीचें हेतुत्व आहे स्वतंत्रता जी सांख्य मानतात
ती नाहीं असा जो विवक्षित अर्थ तो दोन श्लोकांनीं सांगतात. महत् ब्रह्म- म्हण-
जे सर्व कारणत्वास्तव सर्व कार्यापेक्षां मोठें आणि कार्यांची वृद्धि होणें असें जें बृं-
हण त्यास कारण आहे म्हणून ज्यास ब्रह्म म्हणतात असें जें त्रिगुणात्मक माया
स्वरूप अव्याकृत प्रकृति स्वरूप महत् ब्रह्म त्यास अव्यक्त असें ही म्हणतात.
तें-मम योनिः-म्हणजे तें महत् ब्रह्म मी जो शुद्ध चिन्मात्र रूप परमात्मा याचें यो-
नी म्हणजे गर्भाधान स्थान किंवा कार्य ब्रह्मस्वरूपानें प्रवेश करण्याचें स्थान आहे
-तस्मिन् अहं गर्भं दधामि- म्हणजे त्याचे ठायीं मी सर्व भूतोत्पत्तीस कारण भूत
जो सर्वजीव समष्टि रूप कार्य ब्रह्मरूप हिरण्य गर्भ तद्रूप आपल्या प्रति बिंबाचें
स्थापन करतों किंवा सर्व भूतोत्पत्तीस कारण भूत मी बहुतरूप होईन असा जो श्रु-
त्युक्त बहु भवने क्षण (बहुत होण्याविषयींचें जें अवलोकन) रूप संकल्प त्या-
प्रत धारण करतों म्हणजे प्रथम मायेचा त्या संकल्पात्मक वृत्तिरूप परिणाम हो-
तो त्यासच महत्तत्त्व म्हणतात. आणि त्या उपाधीनें युक्त जो परमेश्वर त्यास हि
रण्य गर्भ किंवा कार्यब्रह्म असें म्हणतात. जसा लोकांतील प्रसिद्ध पिता पर्जन्या
दि द्वारा ब्रह्मादिकांत प्रथम लीन झालेला नंतर मातापितरांनीं भक्षण केलेल्या-

अन्न द्वारा आपले शरीरांत (रेतांत) लीन झालेला जो पुत्रारब्ध जीव त्याचा शरीराशीं योग व्हावा या हेतूनें योनीचे ठायीं रेताचें सिंचन करून गर्भाचें स्थापन करतों. त्या गर्भाचे स्थापना नंतर शरीर उत्पन्न होईतों पर्यंत मध्यवर्ती अवस्थेंत त्या रेतास कललादिक म्हणजे रक्त, मांस, अस्थि, मज्जा इत्यादिक अवस्था होऊन नंतर चैतन्य युक्त शरीर उत्पन्न होतें. त्या प्रमाणें अविद्या काम कर्माचे वासनानीं युक्त माझे ठायीं लीन झालेला जो क्षेत्र रूप जीव त्यास पुनः त्या कर्माचे फलोपभोगार्थं कार्य कारणात्मक संघात शरीरानें युक्त करण्या साठीं चिदाभास म्हणजे चैतन्य प्रति बिंब तद्रूप रेताचें मायेचे ठायीं सिंचन करून तत्पूर्वक पूर्वोक्त मायावृत्ति रूप गर्भाचें स्थापन करतों. नंतर तें व्यक्त भोगायतन शरीर उत्पन्न होण्या साठीं मध्यें आकाश, वायु तेज, जल, पृथ्वी या पांच महाभूतांच्या उत्पत्तिरूप अवस्था मजपासूनच होतात. – ततः सर्वभूतानां संभवः भवति – म्हणजे त्या गर्भाधाना नंतर मध्यवर्ती आकाशादिकांच्या उत्पत्तिरूप अवस्था झाल्यानंतर हे भारता अर्जुना, सर्व हिरण्य गर्भादिक भूतांचा शरीर द्वारा संभव म्हणजे उत्पत्ती होते ईश्वरानें केलेले पूर्वोक्त गर्भाधाना वांचून स्वतंत्र प्रकृति पुरुषा पासून भूतांची उत्पत्ति होत नाहीं असें सांख्य मताचें निराकरण करण्या विषयीं तात्पर्य आहे. ॥ ३॥

## सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवंति याः॥ तासां ब्रह्म महद्योनि रहंबीज प्रदः पिता ॥ ४॥ ॥

देवादिकांचे जे अयोनिज देह प्रसिद्ध आहेत त्यांस दुसरीं कारणें आहेत. मग सर्व भूतांची उत्पत्ती परमेश्वराचे पूर्वोक्त गर्भाधाना पासूनच होते असें कसें सांगतां अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात. हे कौंतेय, हे कुंतीपुत्रा अर्जुना, सर्व योनिषु याः मूर्तयः संभवंति – म्हणजे सर्व देव, पितर, मनुष्य, पशु, पक्षी, वृक्ष इत्यादिक योनीच्या ठायीं जरायुज, अंडज, स्वेदज, उद्भिजादिक भेदें करून ज्या अनेक प्रकारच्या मूर्ति म्हणजे शरीरें उत्पन्न होतात. तासां महत् ब्रह्म योनिः – म्हणजे त्या सर्व शरीरांस कारण भूत पूर्वोक्त महत् ब्रह्म स्वरूप माया तीच योनी म्हणजे मातृस्थानीं आहे आणि अहं बीज प्रदः पिता – म्हणजे मी परमेश्वर गर्भाचें स्थापन करणाऱ्या पित्याचे स्थानीं आहें. अयोनिज देवादिकांचे जे देह उत्पन्न झाले ते हिरण्यगर्भाचे संकल्पापासून मानस उत्पन्न झाले त्यांस अयोनिज असें पुराणादिकांत म्हटलें आहे. ते जरायुजादिकां प्रमाणें प्रसिद्ध योनि संभव नसले तरी परमेश्वर शक्ति रूप मायाख्य योनीचे परिणामात्मक संकल्पा पासूनच झाले आहेत यामुळें त्यांचाही संभव पूर्वोक्त मायेचे ठायीं जें परमेश्वरानें केलें गर्भाधान त्यापासूनच आहे यामुळें – संभवः सर्वभूतानां ततो भवति – अ-

सें जें सांगितलें तें विरुद्ध नाहीं. ॥४॥

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ॥**
**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥५॥**

या प्रमाणें ईश्वराचे आश्रयामुळें प्रकृति सर्व भूतांची सृष्टी करते असें सांगितल्यानें क्षेत्रक्षेत्रज्ञ संयोग ही ईश्वराधीनच आहे असें सिद्ध झालें त्यावरून निरीश्वर सांख्य मताचें निराकरण झालें. आतां ती प्रकृति आपले गुणाचे द्वारा पुरुषास बंध करते हें सांगण्यासाठीं कोणते गुणाशीं कसा संबंध जीवास होतो आणि त्या संगानें कोणता गुण जीवास कसा बंध करतो तें सांगतात. सत्त्वं रजः तम इति गुणाः — म्हणजे सत्त्व, रज, तम, या नांवाचे गुण ते — प्रकृति संभवाः — म्हणजे त्रिगुणात्मक जी माया शक्तिरूप प्रकृति ती पासून उत्पन्न होणारे आहेत. तार्किक जसे रूपरसादिक गुणांस द्रव्याश्रितत्व मानून गुणाश्रय जें द्रव्य आणि द्रव्याश्रित जे गुण यांचा परस्पर अत्यंत भेद मानतात. तसें येथें विवक्षित (इष्ट) नाहीं. प्रकृति आणि गुण यांचें ऐक्यच आहे म्हणजे प्रकृति गुणात्मकच असतां जेव्हां तीन्ही ही गुणांची समान अवस्था असते तेव्हां त्या साम्यावस्थायुक्त तीन गुणांसच प्रकृति म्हणतात. तेच गुण एक प्रधान एक अंग अशा सुख दुःख मोह किंवा त्यांचीं सांधनें अशा विषम स्वभावानें परिणाम पावून साम्यावस्थेपासून विषमावस्थेनें निरनिराळे सृष्टिसमयीं झाले म्हणजे त्यांस प्रकृती पासून उत्पन्न झालेले प्रकृति संभव असें म्हणतात. ते प्रकृति संभव तीन गुण हे महाबाहो अर्जुना, देहे अव्ययं देहिनं निबध्नंति — म्हणजे प्रकृति कार्यभूत देहेंद्रिय मनोबुद्धींचा जो संघात (समुदाय) तत्स्वरूप भोगायतन जें शरीर त्याचे ठायीं परमार्थतः सर्व विकारशून्य अव्यय असतां ही अज्ञानानें देहादिकांवर हें मीच किंवा हें माझें अशा अभिमानानें युक्त होऊन मी कर्ता, मी भोक्ता, मी संसारी, मी सुखी, मी दुःखी आहें असें मानणारा जो जीव त्याप्रत रज्जू जसे वत्साप्रत स्तंभाचे ठायीं बांधतात त्या प्रमाणें बंधन करतात. म्हणजे जलपात्रें आपले ठायीं स्थित जलाचे चांचल्यादि विकारांप्रत आकाशस्थ अचल सूर्याचे ठायीं जशीं भ्रांतीनें भासवितात. त्या प्रमाणें जीव स्वरूप निर्विकार असतां हीं त्याचे ठायीं आपले वरील जे कर्तृत्व, भोक्तृत्व, सुख दुःख, मोहात्मक विकार त्यांप्रत भासवितात. परमार्थतः जीवस्वरूपास बंध नाहींच असें — शरीरस्थोपि कौंतेय न करोति न लिप्यते — येथें करून पूर्वीं सांगितलेंच आहे. ॥५॥

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात् प्रकाशकमनामयम् ॥**

## सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ ६॥

त्या बंध करणाऱ्या तीन गुणांचीं लक्षणें सांगून त्यांत कोणता गुण कोणाने संगानें बंधन करतो तें सांगतात. -निर्मलत्वात् प्रकाशकं- म्हणजे स्वच्छ त्वा स्तव-म्हणजे चैतन्य प्रति बिंब ग्रहण करण्याचे योग्यते स्तव तमो गुणानें केलेलें-जें स्वरूप चैतन्याचें आवरण त्याचे नाश करून चैतन्य स्वरूपाचें किंवा सर्वार्थांनें प्रकाशक- सत्वं- म्हणजे सत्वगुण आहे आणि तो अनामय म्हणजे रजो गुणाचें कार्य जें दुःख त्याचे विरोधी सुखस्वरूपाचें ही अभिव्यंजक (प्रगट करणारा) आहे. हे अनघ- सुख संगेन ज्ञान संगेनच देहिनं बध्नाति- म्हणजे हे निष्पापा अर्जुना, तो सत्वगुण अविद्येनें ज्याचे असंगा द्वितीय सच्चिदानंदात्मक स्वरूप तिरोहित झालें आहे असा देही जो जीव त्याप्रत सुख संगें करून आणि ज्ञान संगें-करून देहाचे ठायीं बंधन करतो-म्हणजे अंतःकरण वृत्ति स्वरूप जें ज्ञान आणि सुखाचा अभिव्यंजक जो अंतःकरण धर्म त्यांचा जीव स्वरूपावर आरोप करून मी सुखी, मी ज्ञानी अशा अध्यासानें युक्त करतो. ॥ ६॥

## रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ॥-
## तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥ ७॥

आतां रजोगुणाचें लक्षण सांगून तो जीवास बंध कसा करतो तो प्रकार सांगतात. -रजः रागात्मकं विद्धि- म्हणजे विषयांचे ठायीं पुरुष अनुरक्त जेणें करून-होतात. असा जो कामादिकांचा रंजनात्मक वर्ग तत्स्वरूपजो रजोगुण तो. तृष्णासंग समुद्भवं- म्हणजे जें प्राप्त न झालें त्या विषयींचा जो अभिलाष किंवा प्राप्त होत असतां ही तृप्ती न होणें यास तृष्णा म्हणतात. प्राप्त झालेले अर्थांचा नाश झाला तरी त्यावर जी प्रीति किंवा त्याचा वियोग न व्हावा अशी इच्छा त्यास संग म्हणतात. त्या तृष्णा आणि संग यांची उत्पत्ती ज्या पासून होते असा म्हणजे तृष्णा संगास उत्पन्न करणारा आहे असें जाण. तो रजोगुण हे कौंतेया अर्जुना, देही जो जीव त्या प्रत-कर्म संगेन बध्नाति- म्हणजे रजोगुण प्रवृत्तीला कारण आहे यास्तव परमार्थतः जीव स्वरूप कर्तृत्व भोक्तृत्व धर्म रहित असतां ही जीव स्वरूपावर त्याचा आरोप करून दृष्ट किंवा अदृष्ट जे कृषि वाणिज्य यज्ञादिक कर्मांचें फलभूत ऐहिक सुख आणि स्वर्गादिक अर्थ त्यां विषयींचा जो मी हें करतों किंवा करीन याचें फल मी भोगतों किंवा भोगीन असा अभिमान तेणें करून युक्त करतो. ॥ ७॥

## तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ॥ प्र-

**मादालस्यनिद्राभिस्तं निबध्नाति भारत ॥ ८ ॥**

आतां तमोगुणाचें लक्षण आणि तो बंधन कसें करतो तो प्रकार सांगतात. तमस्त्वज्ञानजं सर्वदेहिनां मोहनंविद्धि-म्हणजे रज आणि सत्व, या गुणाहून विलक्षण जो तमोगुण तो आवरणशक्तिस्वरूप जें अज्ञान त्यापासून उत्पन्न-झालेला आणि तो अविवेकरूप आहे यामुळें सर्व प्राण्यांस भ्रांतीला उत्पन्न करणारा आहे. तत्-प्रमादालस्यनिद्राभिः देहिनं निबध्नाति-म्हणजे हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, तो तमोगुण देही जो जीव त्याप्रत प्रमाद, आलस्य आणि निद्रा यांहीं करून देहाचे ठायीं बंधन करतो. सत्वगुणाचें कार्य जो अर्थप्रकाश त्यास विरोधि जें मनाचें अनवधान किंवा विवेकाविषयींचें असामर्थ्य त्यास प्रमाद म्हणतात. रजोगुणाचें कार्य जी कर्माविषयीं प्रवृत्ती तीस विरोधी जें प्रवृत्ती विषयींचें असामर्थ्य त्यास आलस्य म्हणतात. पूर्वोक्त जें सत्वगुणाचें कार्य आणि रजोगुणाचें कार्य या दोघांस विरोधी जी तमोगुणाला अवलंब करणारी वृत्ती तीस निद्रा म्हणतात. हीं प्रमादालस्यनिद्रांचीं स्वरूपें जाणावीं. ॥ ८ ॥

**सत्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ॥ ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९ ॥**

या तीन गुणांमध्यें कोणते कार्याचे ठायीं कोणाचा उत्कर्ष आहे तें सांगतात. हे भारता, सत्वं सुखे संजयति-हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, उत्कर्षाप्रत पावलेला म्हणजे सर्वांहून वृद्धीप्रत पावलेला जो सत्वगुण तो दुःखकारणाचा पराभव करून जीवांप्रत सुखाचे संबंधानें युक्त करतो. रजः कर्मणि संजयति-उत्कर्षपावलेला रजोगुण सुखकारणाचा पराभव करून जीवाप्रत दृष्टादृष्टार्थक पूर्वोक्त कर्मांविषयींचे प्रवृत्तीनें युक्त करतो. तमः-उत्कर्ष पावलेला तमोगुण-ज्ञानंआवृत्य-म्हणजे इंद्रियादिक प्रमाणांनीं उत्पन्न झालेले हि सर्व कार्यविषयक ज्ञानाचें आच्छादन करून जीवाप्रत प्राप्त झालेले किंवा जाणलेले जे पदार्थ त्यांविषयींचे अज्ञानानें किंवा अवश्य जें करावयाचें तें न करणें अशा अनवधानानें युक्त करतो. उत-म्हणजे आणि पूर्वीं ज्यांचीं स्वरूपें सांगितलीं आहेत. अशा आलस्य व निद्रा यांहीं करून युक्त करतो. ॥ ९ ॥

**रजस्तमश्चाभिभूय सत्वं भवति भारत ॥ रजः सत्वं तमश्चैव तमः सत्वं रजस्तथा ॥ १० ॥**

पूर्वोक्त आपापलें कार्य करण्याविषयीं केव्हां सत्वादिक गुण समर्थ हो-

तात तें सांगतात. हे भारत रजः तमश्च अभिभूय – म्हणजे हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, रज आणि तम या दोहों गुणांचा पराभव करून जेव्हां सत्वगुण वृद्धीप्रत पावतो तेव्हां पूर्वोक्त आपलें कार्य करण्यास समर्थ होतो. याच प्रमाणें – रजः सत्वं तमश्च अभिभूयभवति – म्हणजे रजोगुण सत्व आणि तम या दोहो गुणांचा पराभव करून वृद्धीप्रत जेव्हां पावतो तेव्हां पूर्वोक्त आपलें कार्य करण्यास समर्थ होतो. या प्रमाणेंच – तमः सत्वं रजश्चाभिभूय भवति – म्हणजे तमोगुण सत्व आणि रज या दोन गुणांचा पराभव करून जेव्हां वृद्धीप्रत पावतो तेव्हां पूर्वोक्त आपलें कार्य करण्यास समर्थ होतो. ॥१०॥

## सर्व द्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाश उपजायते ॥–
## ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥११

आतां त्या त्या गुणांची वृद्धि शरीरांत झाली हें समजण्या विषयीं त्यांचीं लिंगें (लक्षणें) सांगतात. अस्मिन् देहे – म्हणजे सुखदुःखानुभवात्मक भोग होण्याचें स्थान जें शरीर याचे ठायीं – सर्वद्वारेषु – म्हणजे शब्दादिक विषयांस ग्रहण करणाऱ्या विषय ज्ञान होण्यास साधन जीं श्रोत्रादिक बाह्येंद्रियरूप-कारणें त्यांचे ठायीं – यदा ज्ञानं प्रकाशः – म्हणजे जेव्हां आपापले विषयां विषयींचें जें आवरण त्याचा नाश करणारा त्या त्या इंद्रियांचे द्वारा त्या त्या विषयाकार वृत्तिरूप जो बुद्धीचा परिणाम तेंच जें शब्दादिविषयक ज्ञान किंवा त्या वृत्तीचे ठायीं अभिव्यक्त (प्रगट) झालेलें जें त्या त्या विषयाचें अधिष्ठानभूत चैतन्य तद्रूप जो विषय प्रकाश तद्रूप शब्दादि विषयाचें ज्ञान उत्पन्न होतें त्या ज्ञानरूप प्रकाशात्मक लिंगानें – उत – म्हणजे आणि जेव्हां सुख होतें त्या लिंगानें – सत्वं विवृद्धं इति विद्यात् – म्हणजे श्रोत्रादिक सर्व इंद्रियें जेव्हां आपापल्या शब्दादिक विषयांचें ग्रहण करतात तेव्हां शरीरांत सत्वगुण वृद्धीप्रत पावला असें जाणावें. ॥११

## लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ॥
## रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ ॥१२॥

लोभः – बहुत द्रव्यादिकाचा लाभ झाला तरी प्रति क्षणीं याहून अधिक मिळावें अशी जी विषय प्राप्तीनें निवृत्त न होणारी इच्छा तद्रूप अभिलाष – प्रवृत्तिः – निरंतर प्रयत्न करण्याचा स्वभाव किंवा नित्य अग्निहोत्रादिक कर्मां विषयीं प्रवृत्तिः – आरंभः – ज्यांत बहुत द्रव्य व्यय होतो आणि आयास ही फार होतो अशीं जीं काम्य निषिद्ध वैदिक कर्में तशींच लौकिक मोठें घर बांधावें मोठें कृषि वाणिज्य करावें इत्यादिक व्यापारा विषयींचा उद्योग तो – कर्मणां अशमः – हें करून

हें करीन तें झाल्यावर दुसरें तिसरें करीन अशा संकल्पाचा उपरम न होणें-स्पृहा- लहान मोठे दुसऱ्यानें द्रव्य, पशु, स्त्री आदिक पदार्थ पाहिले असतां ते पदार्थ कोणते ही साधनानें मी आपले से करीन अशी त्या पदार्थांची घेण्याची इच्छा-एतानि- हीं कार्ये, हे कुरुनंदन, रजसि विवृद्धे जायंते हे अर्जुना, रजोगुण वृद्धीप्रत पावला असतां उत्पन्न होतात. या कार्यरूप लिंगानीं रजोगुण वृद्धीप्रत-पावला असें जाणावें. ॥१२॥

## अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ॥-
## तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन ॥१३॥

अप्रकाशः- बोध होण्यासाठीं गुरु आदिक उपदेश करीत असतां-ही बोध होण्याची अयोग्यता किंवा बोधन होणें- अप्रवृत्तिश्च- आणि कोणते-ही कर्मा विषयीं प्रवृत्ति होण्यास निमित्त असतां ही प्रवृत्ति न होणें-प्रमादः-ज्या-कालीं जें अवश्य करावयानें त्या कालीं त्याचें करण्यानें अनुसंधान नसणें-मोह-म्हणजे विपरीत ज्ञान-च शब्दानें पूर्वोक्त आलस्य. हे कुरुनंदन-तमस्येव प्रवृद्धे एतानि जायंते- हे कुरुनंदना अर्जुना, हीं कार्ये तमोगुणाची वृद्धी झाली असतांच उत्पन्न होतात. या कार्य स्वरूप लिंगानीं (लक्षणानीं) तमोगुण शरीरांत वृद्धीप्रत पावला असें जाणावें. ॥१३॥

## यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ॥ त-
## दोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥१४॥

आतां मरण कालीं सत्त्वादि गुण वृद्धीप्रत पावले असतां त्यांचे फल-भेद सांगतात. सत्त्वे प्रवृद्धे यदा देहभृत् प्रलयं याति-म्हणजे सत्त्व गुणाची-वृद्धी झाली असतां जेव्हां देह धारी जीव मरण पावतो- तदा उत्तमविदां अमलान् प्रतिपद्यते-म्हणजे तेव्हां उत्तम जे हिरण्य गर्भादिक त्यांचे जे उपासक त्यांस प्राप्त होणारे जे रज आणि तमोरूप मलरहित लोक म्हणजे देवांच्या सुख भोगांचीं स्थानें त्यांप्रत पावतो. ॥१४॥

## रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते ॥ तथा-
## प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥१५॥ ॥

रजसि प्रलयं गत्वा- म्हणजे रजोगुण वृद्धीप्रत पावून जेव्हां मरण पावतो तेव्हां-कर्म संगिषु जायते-म्हणजे श्रौत स्मार्त कर्मानुष्ठान करणारे जे-मनुष्य त्यांचे योनींत जन्म पावतो.-तथा तमसि प्रलीनः-म्हणजे तसाच तमो-

गुण वृद्धीगत पावून मरण पावलेला मूढयोनिषु जायते- म्हणजे पशु पक्षी इत्यादिक ज्या मूढ योनी त्यांचे ठायीं जन्म पावतो. ॥१५॥

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्विकं निर्मलं फलम्॥ रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम्॥१६॥**

आतां सत्वादिक गुणांस त्याचे त्याचे उचित कर्मद्वारा विचित्र फलाचें कारणत्व सांगतात. - सुकृतस्य कर्मणः सात्विकं निर्मलं फलं आहुः - म्हणजे सत्वगुणा पासून उत्पन्न झालेलें जें सात्विक शुद्ध पुण्यात्मक कर्म त्याचें- दुःखाज्ञान रूप मल रहित ज्ञान वैराग्य सुखादिक सत्वगुणा पासून होणारें- फल होतें असें महर्षी बोलतात. रजसस्तु फलं दुःखं- म्हणजे रजो गुणापासून उत्पन्न होणारें जें राजस पाप मिश्रित पुण्य स्वरूप कर्म ज्यांत दुःख फार- आणि सुख अल्प असें मिश्रित फल होतें. - तमसः अज्ञानं फलं - म्हणजे तमो- गुणा पासून उत्पन्न होणारें जें तामस धर्म स्वरूप कर्म त्याचें अविवेक ज्यामध्यें बहुत आहे असें दुःखस्वरूप फल होतें. ॥ सात्विक, राजस आणि तामस या कर्मांचीं लक्षणें- नियतं संगरहितं- इत्यादिकें करून अष्टादशाध्यायांत सांगतील असें तात्पर्य. ॥१६॥

**सत्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च॥ प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च॥१७॥ ॥**

हें पूर्वोक्त फल वैचित्र्य होण्यास पूर्वीं सांगितलेलाच हेतु सांगतात. - सत्वात् ज्ञानं संजायते- म्हणजे सर्व इंद्रिय द्वारा विषयाकार बुद्धीचा वृत्ति रूप परिणाम जो होतो तद्रूप किंवा तीचे ठायीं अभिव्यक्त झालेलें जें विषयाधिष्ठान चैतन्य तद्रूप विषय प्रकाश रूप ज्ञान सत्वगुणा पासून उत्पन्न होतें यास्तव तदनुरूप सात्विक कर्माचें ज्यांत प्रकाश फार आहे असें सुखरूप फल होतें. रजसः लोभ एव च - म्हणजे रजोगुणापासून कोट्यावधी विषयांची प्राप्ति झाली तरी- ज्याची निवृत्ती होणें अशक्य असा अभिलाष उत्पन्न होतो. तो निरंतर बुद्धीपावणाराच आहे त्याची पूर्तता कधीं ही होत नाहीं. यास्तव तो दुःखालाच हेतु- आहे म्हणून तत्पूर्वक केलेलें राजस कर्माचें दुःख रूपच फल आहे. ॥ तमसः प्रमद मोहौ भवतः अज्ञानंच भवति - म्हणजे तमोगुणा पासून पूर्वोक्त प्रमाद- आणि मोह उत्पन्न होतात. आणि अज्ञान ही उत्पन्न होतें. एवकारें करून प्रकाश किंवा प्रवृत्ति तमोगुणापासून होत नाहीं असें सांगितलें यास्तव तामस कर्माचें तामस अज्ञान, मोह, प्रमाद रूपच फल होतें. ॥१७.

**ऊर्ध्वं गच्छंति सत्त्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः॥**
**जघन्य गुणवृत्तिस्था अधो गच्छंति तामसाः॥१८**

आतां सत्वादिक गुण वृत्तस्थ म्हणजे सत्वादिक गुणाचा जो स्वभाव त्याचे ठायीं स्थित जे सात्विक, राजस, तामस, त्यांस पूर्वोक्त फलच ऊर्ध्व मध्य अधोलोक गमनरूप सांगतात. सत्त्वस्थाः ऊर्ध्वं गच्छंति - जघन्य गुण वृत्तस्था - येथें तमोगुण वृत्त शब्दाचा प्रयोग केला आहे यास्तव पहिले दोन ठिकाणीं सत्वस्थ या शब्दाचा सत्वगुण वृत्तस्थ राजस या शब्दाचा रजोगुणवृत्तस्थ असा अर्थ करावा. सत्व गुणाचे जे वृत्त म्हणजे शास्त्रीय ज्ञान किंवा शास्त्र विहित कर्म करणें त्याचे ठायीं जे रत किंवा तत्पर होऊन त्याचें अनुष्ठान करणारे ते ऊर्ध्व म्हणजे सत्यलोक पर्यंत जे देव लोक त्यांप्रत ज्ञान उपासना कर्म स्वरूपाचे तारतम्या प्रमाणें मरणोत्तर जातात किंवा देवादिक योनींत उत्पन्न होतात. राजसाः मध्ये तिष्ठंति - रजोगुणाचे जे वृत्त म्हणजे लोभादि पूर्वक राजस कर्मा विषयीं प्रवृत्ती तीचे ठायीं राहणारे तत्पर ते मध्य म्हणजे पुण्य पाप फल मिश्र जो मनुष्य लोक त्याचे ठायीं राहतात किंवा उत्पन्न होतात. जघन्यगुण वृत्तस्थाः तामसाः अधः गच्छंति - जघन्य म्हणजे सत्व आणि रज या गुणांहून पलीकडील निकृष्ट जो तमो गुण त्याचें जें निद्रालस्य प्रमाद रूप वृत्त त्याचे ठायीं राहणारे, तामस म्हणजे तमः प्रधान मनुष्य अधः म्हणजे पशु पक्षी यांच्या ज्या मूढ योनी त्यांचे ठायीं जातात म्हणजे उत्पन्न होतात. ॥१८॥

**नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति॥ गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोधिगच्छति॥१९॥**

पुरुषास सद्सद्योनींचे ठायीं जन्म होणें आणि तेथें सुख दुःखानुभव करणें असा जो संसार त्यास स्वतंत्र प्रकृति पुरुषांचा संग कारण आहे असें निरीश्वर सांख्य मताचें निराकरण करण्यासाठीं तो प्रकृति पुरुष संग ईश्वराधीन आहे असें निरूपण केलें आणि त्रिगुणात्मक प्रकृति संभव गुणाचा संबंध कोणता कसा तो होतो आणि त्या गुणामध्यें कोणता गुण कसें जीवास बंधन करतो त्याचें सविस्तर निरूपण केलें. आतां क्षेत्र क्षेत्रज्ञाचें अंतर जे ज्ञानचक्षूनें जाणतात आणि भूत प्रकृति मोक्षाप्रत जें जाणतात ते मोक्षाप्रत जातात. असें जें सांगितलें ते पुरुष प्रकृतीहून भिन्न असंग चैतन्य रूप आहेत. अशा ज्ञानानें पुरुष संसार बंधापासून मुक्त होतो असें जें सांख्यमत आहे त्या प्रमाणें सांगितलें नाहीं तर अनादि अनिर्वचनीय मिथ्यास्वरूप जी अविद्या तत्कृत असंग - सच्चिदानंदाद्वय - अकर्तृ - अभोक्तृ - स्वस्व रूपाचे आवरणामुळें आत्म स्वरूपाचे ठायीं अविद्या कल्पि-

त मिथ्या भूत भासमान जो विषयादिक भूत भौतिक देहेंद्रिय मनोबुद्धि आदिक जड, सुख, दुःख मोह किंवा तत्साधनात्मक सर्व दृश्य द्वैत प्रपंच त्याचे ठायीं झालेला जो तादात्म्याभिमान तन्मूलक जो मी सुखी, दुःखी, कर्ता, भोक्ता, संसारी असा अभिमानात्मक बंध त्याची मूलभूत अज्ञाननिवृत्ति अद्वितीया संग सच्चिदानंदात्मक ब्रह्म स्वरूपच मी आहें अशा ब्रह्मात्मैक्यापरोक्ष ज्ञानापासूनच होऊन जीवास स्वस्वरूप ब्रह्मरूपानें स्थितिरूप मोक्ष होतो अशा वेदांत सिद्धांताचे अभिप्रायाप्रमाणें सांगितलें. सांख्य प्रकृतीहून भिन्न पुरुष असंग चिद्रूप आहे अशा ज्ञानास संसार बंध निवृत्ति रूप मोक्षाचें जें कारणत्व मानतात तें त्यांचेच मतानें संभवत नाहीं. सांख्य प्रकृति स्वतंत्र मानतात तिला नियंता कोणी नाहीं ती व्यापक आणि सत्य एकच आहे. पुरुष असंग चिद्रूप प्रति शरीरीं भिन्नभिन्न आहे. प्रकृतीचीं जीं कार्यें भूतें आणि भौतिकें देहेंद्रियादिक तीं सत्यच आहेत. असें मानतात. त्यांचे मतें प्रकृती स्वतंत्र आहे आणि तिचीं कार्यें देहेंद्रियादिक सत्यच आहेत. तर तिनें स्वतंत्रपणानें जो देहेंद्रिय मनोबुद्धीशीं पुरुषाचा संग केला तो ती प्रकृति आणि देहेंद्रियादिक निरंतर सत्यच असतां त्यांची निवृत्ति होऊन पुरुषास असंगत्व ज्ञान संभवणारच नाहीं किंवा देहेंद्रियादिक नष्ट झालीं तरी पुनः त्यांचें कारण प्रकृती आहे यामुळें तीं पुनः दुसरीं जशीं उत्पन्न होतात त्या प्रमाणें उत्पन्न होतील त्यामुळें एकवार प्रकृतीशीं भिन्न आपलें स्वरूप असंग आहे असें ज्ञान होऊन पुरुष मुक्त झाला तरी स्वतंत्र प्रकृति आहेच आणि तिचीं कार्यें देहेंद्रियादिक सत्यच आहेत त्यामुळें तीं पुनः आपले स्वतंत्रपणानें पुरुषास संग उत्पन्न करीलच तेव्हां पुनः मुक्तांस ही संसार होईल. तसें झालें तर मुक्त झाल्यावर पुनः जीवास संसार नाहीं असें जें सर्व श्रुति स्मृतींत सांगितलें आहे त्याशीं विरोध येईल. पुरुषास जो बंध होतो तो प्रकृति आणि पुरुष यांचे अविवेकात्मक कारणानें होतो तो अविवेक प्रकृति पुरुषांचे विवेक ज्ञानानें नष्ट झाला म्हणजे कारणच नाहीं यामुळें पुरुषास बंधरूप संसार पुनः होत नाहीं असें जर सांख्य म्हणतील तर त्यांस पुसावें कीं, अविवेक, प्रकृति पुरुषां प्रमाणें अनादिच आहे किंवा स्वतंत्र प्रकृतीनें जीवाचे बंधार्थ उत्पन्न केला आहे. पहिल्या अनादित्व पक्षीं प्रकृतीस पुरुषाला बंध करण्या विषयींचें स्वातंत्र्य नाहीं तेव्हां अपसिद्धांत त्यास मानावा लागेल. दुसऱ्या पक्षीं विवेकानें एकवार अविवेक नष्ट झाला तरी प्रकृति स्वतंत्र आहे ती पुनः अविवेक उत्पन्न करील यामुळें मुक्तांस पुनः बंध होईल आणि अविवेक जो बंधास कारण म्हणतां तो विवेकाभाव किंवा विवेक भिन्न किंवा विवेक विरोधी यांतून कोणते स्वरूपाचा आहे. केवळ अभावाला चेतन पदार्थाचे सहाया शिवाय भाव कार्याचें कारणत्व संभवत नाहीं आणि दृष्ट ही नाहीं यामुळें पहिला पक्ष

संभवत नाहीं, दुसरा पक्ष मानला तर विवेकभिन्न घटपटादिक पदार्थ प्रवाहानें सर्वदा आहेत, त्यांपासून ही पुरुषास बंध होईल यामुळें कधीं ही मोक्ष होणार नाहीं, तिसरे पक्षीं विवेक विरोधी अज्ञान तें बंधाला कारण असें झालें तें कारण मानलें तर अज्ञानामुळें झालेला जो बंध तो मिथ्याच आहे. तेव्हां वेदांति संमत माया वादच सांख्यांनीं मानिला असें झालें यामुळें स्वपक्षाची हानि झाली आणि एक बद्ध एक मुक्त अशी व्यवस्था सिद्ध होण्यासाठीं सांख्यांनीं प्रति शरीरीं जीवस्वरूप निरनिराळें मानून जीवाचें अनेकत्व मानिलें तें ही निरर्थक होईल. असंग आत्मस्वरूप सर्वदां मुक्त असतां ही त्यास बंध मोक्ष अज्ञानानें जसें मानिलें तसें आत्मस्वरूप एक नित्यमुक्त असतां ही अज्ञानानें कोणी बद्ध कोणी मुक्त इत्यादिक जीवाचा भेद ही अज्ञानानेंच भासविला, आहे, तो मिथ्याच आहे. अशारीतीनें ती ही व्यवस्था वेदांती यांणीं केलीच आहे आणि ती व्यवस्था- जीवास विरोध म्हणजे नाश नाहीं उत्पत्ति म्हणजे देह संबंध नाहीं जीव बद्ध नाहीं साधक नाहीं मुक्त नाहीं हा परमार्थ सत्य अर्थ आहे अशा अर्थाच्या जीवास वास्तव जन्म, नाश, बंध, मोक्ष नाहींत असें सांगणाऱ्या श्रुतीस संमत आहे असें सांख्यमत निराकरण करण्यासाठीं स्वाभिमत वेदांतप्रति सिद्ध मिथ्या अज्ञान रूप बंध- निवृत्तीचें साधन भूत जें अज्ञान निवर्तक ब्रह्मात्म स्वरूप ज्ञान त्याचें स्वरूप आणि त्या ज्ञानानें होणारी जी अविद्या आणि तत्कार्य सर्व देहेंद्रिया दिक भूत भौतिक- दृश्य प्रपंच मिथ्या आहे यास अधिष्ठान भूत आत्मसत्ते वांचून अन्य सत्ता स्वरूप नाहीं अशी जी सर्व अविद्या तत्कार्य भूत बंधाविषयीं निःस्वरूप तेची प्रतीति तद्रूप जो पूर्वोक्त भूत प्रकृति मोक्ष त्याचें स्वरूप सांगतात. आणि मुक्ताचें ही लक्षण सांगतात. ॥ यदा द्रष्टा गुणेभ्यः अन्यं कर्तारं नानुपश्यति - म्हणजे जेव्हां द्रष्टा जीव विचार कुशल होत्साता देहेंद्रियमन बुद्धि विषयरूप जें कार्य कारण- विषय तदाकारानें परिणाम पावलेले जे गुण त्यांहून अन्य कर्त्याप्रत विचारानंतर पाहत नाहीं तर गुणच श्रोत्रादिक बाह्य ज्ञान करणें (साधनें) मन बुद्धि आदिक आंतर विषयक ज्ञान करणें आणि शरीर विषय स्वरूप झालेले सर्व कार्याचे- कर्ते आहेत असें विचारानंतर पाहतो. ॥ गुणेभ्यश्च परं वेत्ति - म्हणजे आणि त्यात्या शरीरेंद्रिय मन बुध्यादिकांचे स्वरूपानें परिणाम पावलेले जे गुण त्यांहून पात्रस्थ जल किंवा त्यांचे चांचल्या दिक कर्मानें असंस्पृष्ट (स्पर्शरहित) पात्रस्थ जलाचा प्रकाशक जसा सूर्य त्या प्रमाणें गुण किंवा त्यांचीं जीं कर्तृत्व भोक्तृत्व सुख- दुःखादिक कार्यें त्यांहीं करून असंस्पृष्ट आणि त्यांचा भासक निर्विकार सर्व साक्षी सर्व क्षेत्राचे ठायीं एक आणि समान अशा क्षेत्रज्ञाप्रत ब्रह्मत्वें करून जो जाणतो. सः मद्भावं अधिगच्छति - म्हणजे तो द्रष्टा मत्स्वरूपतेप्रत पावतो - म्हण-

जे ब्रह्मस्वरूपच होतो. ॥१९॥

## गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ॥ जन्ममृत्युजरा दुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥२०॥

कसा मद्रूपतेप्रत पावतो तें सांगतात. ॥ देही देहसमुद्भवान् एतान् त्रीन् गुणान् अतीत्य — म्हणजे देहाभिमानी जीव देहादिकांची जी उत्पत्ति आहे त्यांपासून असे हे मायामय तीन सत्व रज तमोगुण यांप्रत ब्रह्मात्म तत्व ज्ञानी हे मिथ्या निःस्वरूप आहेत. असें जिवंत असतांच जाणून — जन्ममृत्युजरा दुःखैःविमुक्तः — म्हणजे मिथ्याभूत जी जन्म, मृत्यु, जरा आणि आधिभौतिक आध्यात्मिक आदिदैविक दुःखें यांहीं करून जीवंत असतांच त्यावरनिःस्वरूपतात्मक मिथ्याच ज्ञानें करून पारमार्थिक संबंध रहित होताता तो ज्ञानी ॥ अमृतं अश्नुते म्हणजे जन्म मरण वर्जित मत्स्वरूप मोक्षाप्रत स्वात्मखें करून अनुभवितो. ॥२०॥

## अर्जुन उवाच ॥ ॥ कैर्लिंगैस्त्रीन् गुणानेतानतीतो भवति प्रभो ॥ किमाचारः कथं चैतांस्त्रीन् गुणानतिवर्तते ॥२१॥ ॥ ॥

गुणातीत जीवंत असतांच मोक्ष पावतो असें ऐकून गुणातीताचें लक्षण, आचरण आणि गुणातीत होण्याचें साधन समजावें या इच्छेनें अर्जुन प्रश्न करतो ॥ हे प्रभो एतान् त्रीन् गुणान् अतीतः यः — म्हणजे हे कृष्णा, यातीन गुणांचा अतिक्रम करून राहिलेला जो गुणातीत तो ॥ कैर्लिंगैः युक्तो भवति म्हणजे कोणते लिंगानीं युक्त होतो म्हणजे कोणते लिंगानीं (लक्षणानीं) तो गुणातीत असें जाणावयास योग्य होतो तें मला सांग. असा एक प्रश्न प्रभो या संबोधनानें भक्ताचे मनोरथ प्रभूनेंच पुरविले पाहिजेत असें सूचविलें - किमाचारः — म्हणजे त्या गुणातीताचा आचार कसा काय यथेष्टाचार किंवा शास्त्रनियमित आचार हा दुसरा प्रश्न - च एतान् त्रीन् गुणान् कथं अतिवर्तते — म्हणजे आणि या तीन गुणां पासून अतीत कसा होतो. हा गुणातीत होण्याचें साधन काय असा तिसरा प्रश्न. ॥२१॥

## श्रीभगवानुवाच ॥ ॥ प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ॥ न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२॥ ॥ ॥

हे स्थितप्रज्ञाचें लक्षणादिकाविषयींचे प्रश्न द्वितीयाध्यायांत - "

स्थितप्रज्ञस्य का भाषा"-इत्यादिक अर्जुनानें केल्यावरून- प्रजहाति यदा कामान्-इत्यादिकें करून त्यांचीं उत्तरें त्याच अध्यायांत भगवंतांनीं सांगितलींच आहेत — तथापि पूर्वींपेक्षां कांहीं अधिक विशेष समजावा या इच्छेनें अर्जुन पुनः प्रश्न करतो असा अर्जुनाचा अभिप्राय जाणून श्रीकृष्ण भगवान् पूर्वीं गुणातीताच्या लक्षणादिकाविषयींचीं जीं उत्तरें सांगितलीं त्यापेक्षां दुसरे प्रकारानीं त्यांचे लक्षणादिकाविषयींचीं उत्तरें पांच श्लोकानीं सांगतात. कोणते लिंगानें (लक्षणानें) गुणातीत असें जाणावें या प्रश्नाचें उत्तर सांगतात. हे पांडव हे पंडुपुत्रा अर्जुना,-प्रकाशं- सत्वगुणाचें कार्य. चप्रवृत्तिं- आणि रजोगुणाचें कार्य. च मोहं- तमोगुणाचें कार्य.-हें उपलक्षण करून सर्व जीं प्रत्येक प्रत्येक तीन गुणांचीं कार्यें संप्रवृत्तानि- आपापले सामग्रीनें प्रादुर्भूत (प्रगट) झालेलीं असतां तीं दुःखरूप किंवा दुःखास साधन आहेत म्हणून त्यांचा- न द्वेष्टि- द्वेष करीत नाहीं आणि निवृत्तानि न कांक्षति- आणि तींच सुखरूप किंवा सुखसाधनरूप त्या गुणाचीं कार्यें आहेत तीं आपले नाशाचे सामग्रीनें नाश पावलीं तरी त्याचे ठायीं स्वप्नाप्रमाणें मिथ्यात्व निश्चय झाल्यामुळें त्यांची इच्छा करीत नाहीं असा जो राग द्वेष शून्य त्यास गुणातीत म्हणावें असा याचे पुढें चवथे श्लोकांत अन्वय आहे असें तात्पर्य.॥२२॥

## उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ॥-
## गुणा वर्तंत इत्येव योऽवतिष्ठति नेंगते ॥ २३॥

हें गुणातीताचें लक्षण स्वार्थच आहे तें गुणातीत जो आहे त्याणेंच जाणण्यास योग्य आहे परार्थ नाहीं कारण रागद्वेष आहे किंवा नाहींत हें दुसऱ्याचे दुसऱ्यास समजत नाहीं तें समजणें स्ववेद्यच आहे या साठीं हा गुणातीत आहे असें दुसऱ्यास समजण्याचें जें लिंग तें त्याचा आचार कसा या दुसरे प्रश्नाचे उत्तरांत सांगतात.॥ उदासीनवत् आसीनः- म्हणजे जसा उदासीन पुरुष दोघे विवाद करीत असतां एकाचा पक्ष घेऊन त्यांत सक्त होत नाहीं त्याप्रमाणें राहिलेला तत्ववेत्ता गुणातीत-गुणैः न विचाल्यते- सुखदुःख विषयाकारानीं परिणाम पावलेले जे गुण त्याहीं करून जो विवेक दर्शनावस्थे पासून झालेले स्वरूप स्थिती पासून चलन पावत नाहीं तेंच स्पष्ट करतात.॥ गुणाः एव वर्ततेे इतिय: अवतिष्ठति- म्हणजे देहेंद्रियाकारादिकानीं परिणाम पावलेले हे गुणच परस्पर आपापले कार्यांचे ठायीं परस्पर राहतात हा सर्व भ्रमानें आत्मस्वरूपाचे ठायीं भासणारा प्रपंच जड दृश्य स्वप्नाप्रमाणें मिथ्याच आहे आणि याचा आत्म्याचा वास्तविक संबंध नाहीं स्वयंप्रकाशस्वरूप मी परमार्थतः सत्यच निर्विकार द्वैत शून्य आ-

हें अशा निश्चयानें युक्त होत्साता तो आपले स्वरूपाचे च ठायीं राहतो- तदंग-ते - कोठें ही व्यापार युक्त होत नाहीं - योवतिष्ठते - असें येथें क्रियापद आत्मने पदीं असावें परंतु छंदोभंग होईल यास्तव - अवतिष्ठति असें परस्मै पदीं - क्रियापद केलें. अथवा योनुतिष्ठति - असा पाठ करावा. त्यांत - यः नुतिष्ठति - असा पदच्छेद करावा. अर्थ पूर्वी प्रमाणेंच आहे. ॥२३॥

समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ॥ तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्म संस्तुतिः ॥ २४ ॥ ॥ ॥ ॥

समदुःख सुखः - म्हणजे सुख दुःखें मिथ्या अंतात्याजें अंतःकरणादिक त्यांचे धर्म आहेत. आत्म्याचे धर्म नाहींत. अशा निश्चयानें सुख प्राप्त झालें तर प्रीति नाहीं दुःख झालें तरी द्वेषनाहीं अशीं सुखदुःखें ज्यास समानच आहेत. आणि ज्या कारणास्तव - स्वस्थः - म्हणजे द्वैत दर्शन नसल्या मुळें आत्मस्वरूपाचे ठायीं जो राहिलेला आहे आणि - समलोष्टाश्म कांचनः - म्हणजे याच कारणास्तव लोष्ठ म्हणजे मृत्तिकेचा गोळा अश्म म्हणजे पाषाण, कांचन - म्हणजे सुवर्ण हीं समान म्हणजे लोष्ठ पाषाण अग्राह्य सुवर्ण ग्राह्य अशी विषम बुद्धि ज्यांवर नाहीं अशीं ज्यांस आहेत. याच कारणास्तव - तुल्यप्रियाप्रियः - म्हणजे सुख साधन रूप प्रिय किंवा दुःख साधन रूप अप्रिय ज्यास तुल्यच म्हणजे हें हित करणारें आणि हें अहित करणारें अशी त्यांवर बुद्धि नसल्यामुळें ती उपेक्षा करण्यासच ज्यास पात्र आहेत असा आणि धीरः - म्हणजे शमादि- साधन संपन्न किंवा धैर्यवान् याच कारणानें - तुल्यनिंदात्म संस्तुतिः - म्हणजे लोकांनीं आपलें गुण कीर्तन करणें अशी जी स्तुति आणि आपले दोषाचें वर्णन करणें अशीजो निंदा त्या ज्यास स्तुतीनें हर्ष, निंदेनें विषाद न झाल्या मुळें निर्विकारत्वास्तव समानच आहेत. त्यास गुणातीत म्हणावें किंवा या लिंगानीं (लक्षणानीं) हा गुणातीत आहे असें जाणावें. ॥ २४ ॥

मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ॥ सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥

मानापमानयोः तुल्यः - म्हणजे लोकांनीं केलेला जो आपला सत्कार तो मान आणि लोकांनीं केलेला जो आपला असत्कार तो अपमान त्यांहीं करून- हर्ष विषाद नसल्या मुळें ते ज्यास समानच आहेत. पूर्वोक्त स्तुति निंदा शब्दानीं केलेले व्यापार आणि मानापमान हे कायिक किंवा मानसिक व्यापार असा विशेष-

जाणावा. असा जो तो – तुल्यो मित्रारिपक्षयोः – म्हणजे मित्रा प्रमाणें शत्रूंसही द्वेष करण्यास पात्र होत नाहीं अथवा मित्रपक्ष किंवा अरिपक्ष ज्यास तुल्य म्हणजे मित्रपक्षावर अनुग्रह करावा, शत्रुपक्षावर क्रोध किंवा द्वेष करावा. अशा विषम बुद्धीस पात्र ज्यास नाहींत असा आणि – सर्वारंभपरित्यागी – म्हणजे देहनिर्वाहोपयोगी मात्र जे व्यापार त्यांहून सर्व कर्मों विषयींचे व्यापाराचा त्याग करण्याचा ज्याचा स्वभाव आहे. असा – उदासीनवदासीनः – एथून एथवर पर्यंत सांगितलेला आचार ज्याचा आहे त्यास गुणातीत असें म्हणावें किंवा त्या आचारानें हा गुणातीत आहे असें जाणावें. ॥ २५ ॥

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते॥**
**स गुणान् समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते २६**

आतां कोणते साधनानीं गुणातीत होतो अशा तृतीय प्रश्नाचें उत्तर सांगतात. यः मां च अव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते – म्हणजे च – हा – तु याच्या अर्थीं अथवा – एव – याच्या अर्थीं आहे. जो नर सर्वांतरयामी मायेनें क्षेत्रज्ञ स्वरूपतें प्रत आणिलेला किंवा क्षेत्रज्ञ स्वरूपानें भासविलेला परमानंदघन वासुदेव नारायण ईश्वर मी याचें द्वादशाध्यायांत सांगितलेला निरतिशय प्रेम लक्षण जो भक्तियोग तेणें करून सर्व काल स्वात्मत्वें करून चिंतन करतो. सः एतान् गुणान् समतीत्य – म्हणजे तो माझा भक्त यागुणाचा अतिक्रम करून द्वैत दर्शनाचा ज्ञानानें बाध झाल्यामुळें – ब्रह्मभूयाय कल्पते – म्हणजे ब्रह्म स्वरूपानें स्थिती होणें अशा मोक्षास योग्य होतो. गुणातीत होण्यास सर्वदा भगवच्चिंतनच साधन असें या उत्तराचें तात्पर्य. ॥ २६ ॥

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ॥**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च**
**॥ २७ ॥ ॥ इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु**
**ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन संवादे गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥**

याविषयीं हेतु सांगतात. ॥ हि अहं ब्रह्मणः प्रतिष्ठा – म्हणजे ज्या कारणास्तव तत्पद वाच्यार्थ जगदुत्पत्ति स्थिति लय कारण सगुण सोपाधिक ब्रह्माची प्रतिष्ठा म्हणजे निर्गुण निरुपाधिक निर्विकल्प सच्चिदानंदात्मक तत्पद लक्ष्यार्थ पारमार्थिक स्वरूप मी वासुदेवच आहें यास्तव निरुपाधिक ब्रह्मस्वरूप जो मी वासु-

देव त्याचें स्वात्मत्वें करून जो चिंतन करतो तो ब्रह्म स्वरूप मोक्ष प्राप्तीस योग्य होतो असें जें सांगितलें तें यथार्थच आहे. ज्याची प्रतिष्ठा मी असें सांगितलें तें ब्रह्म कसें तें विशेषणांनीं सांगतात. अमृतस्य - म्हणजे नाशरहित. च - अव्ययस्य - म्हणजे आणि उत्पत्ति वृद्धि इत्यादिक परिणाम रहित. च - म्हणजे - आणि शाश्वतस्य - क्षीणता रूप परिणाम रहित आणि धर्मस्य - म्हणजे ज्ञाननिष्ठा लक्षण जो धर्म त्याचा प्रापक आणि सुखस्य एकांतिकस्य - म्हणजे दुःख संबंध रहित नित्यानंदात्मक सुखरूप आणि ऐकांतिक - म्हणजे सर्व देशाचे ठायीं सर्वकालाचे ठायीं एक रूपानें राहणार अशा सगुण ब्रह्माचें मी वास्तविक मी निरुपाधिक स्वरूप आहें यास्तव माझा भक्त माझे चिंतनानें मद्रूप होऊन संसारापासून मुक्त होऊन मद्रूप मोक्षास पावतो. म्हणजे मद्रूपच होतो असा भाव ब्रह्मदेवानीं ही भगवान् कृष्णाप्रत "एकस्त्व मात्मा पुरुषः पुराणः सत्यः स्वयंज्योतिरनंत आद्यः॥ नित्यो ऽक्षरो जस्त्र सुखो निरंजनः पूर्णो द्वयो मुक्त उपाधितो मृतः॥" - येणें करून सर्वोपाधि रहित ब्रह्मात्म स्वरूप तूंच आहेस असें स्तुतींत वर्णिलें आहे स्तुती वांचून ही "सर्वेषा मेव वस्तूनां भावार्थो भवति स्थितः॥ तस्यापि भगवान् कृष्णः किमतद्वस्तु रूप्यतां॥" सर्व जीं कार्य वस्तू त्यांचा सत्तारूप जो परमार्थ तो कार्य रूपानें होणारें जें सोपाधिक ब्रह्म त्याचे ठाईंच राहिला आहे. कारण सत्ते शिवाय कार्य सत्ता नाहीं यास्तव कार्यसत्ता सोपाधिक कारण ब्रह्म रूपच आहे, सोपाधिक ब्रह्मकल्पना निरुपाधिक परब्रह्माचे ठायींच झाली आहे या कारणास्तव कारण स्वरूप सोपाधिक ब्रह्म रूप जो तूं याचा ही पारमार्थिक सत्ता स्वरूप भगवान् निरुपाधिक कृष्ण आहे अधिष्ठान सत्ते पेक्षां त्यावर कल्पिलेले पदार्थांची भिन्न सत्ता नाहीं यास्तव सोपाधिक ब्रह्मासुद्धां सर्व जगाचे कल्पनाधिष्ठानभूत निरुपाधिक कृष्ण स्वरूपा पेक्षां दुसरें कोणतें वस्तु आहे म्हणून सांगावें तें कृष्ण स्वरूपच पारमार्थिक आहे त्याशिवाय दुसरें पारमार्थिक सद्वस्तु नाहीं असें श्री शुकानीं कृष्णास्वरूपाचें वर्णन केलें आहे. तसेंच येथें भगवंतांनीं - ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहं - येणें करून अर्जुनास सांगितलें अथवा तुझा जो भक्त तो तुझ्या निरंतर चिंतनानें तुझ्या स्वरूपाप्रत पावो परंतु ब्रह्मा पेक्षां भिन्न जो तूं याचे चिंतनानें ब्रह्म भाव रूप मोक्ष कसा प्राप्त होईल अशी शंका होईल तरतिचें निराकरण करण्या करितां मी ब्रह्मच आहें ब्रह्माहून भिन्न नाहीं असें - ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहं - येणें करून सांगतात. - ब्रह्मणः - परब्रह्माची प्रतिष्ठा स्वरूप सत्ता मीच आहें माझे हून ब्रह्म भिन्न नाहीं आणि - अव्ययस्य अमृतत्वस्य प्रतिष्ठा अहमेव - म्हणजे - ज्यांचा नाश नाहीं असा जो मोक्ष त्याची प्रतिष्ठा पर्यवसान मीच आहें माझी-

माझीच मोक्ष आहे आणि-शाश्वतस्य धर्मस्य प्रतिष्ठा अहमेव-ह्मणजे नाशरहित नित्य जो मोक्ष तें ज्याचें फल आहे असा जो ज्ञाननिष्ठा स्वरूप धर्म त्याची प्रतिष्ठा म्हणजे पर्यवसान मीच आहें त्या धर्मानें पावावयाचें वस्तु मीच आहें माझे हून दुसरें नाहीं आणि एकांतिकस्य सुखस्यच प्रतिष्ठा अहमेव-म्हणजे दुःख रहित परमानंद स्वरूप सुखाचें पर्यवसान मीच आहें मजवांचून दुसरें मुमुक्षूस पावावयाचें दुसरें सुख नाहीं यास्तव माझा भक्त ब्रह्मभाव रूप मोक्षास योग्य होतो असें जें सांगितलें तें विरुद्ध नाहीं युक्तच आहे.॥२७॥

इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथ शास्त्रिकृत भाषा विवृत्तौ चतुर्दशोऽध्यायः समाप्तः॥१४॥

## अध्याय १५वा.

**श्रीभगवानुवाच॥ ॥ऊर्ध्वमूलमधः शाखमश्वत्थं प्राहुरव्ययम्॥ छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित्॥१॥ ॥**

पूर्वाध्यायीं भगवंतांनीं संसारास कारणभूत प्रकृति संभव गुणांचें सविस्तर निरूपण करून त्यागुणानें जो अतीत झाला त्यास अव्यभिचारी भक्तीचे योगानें म्हणजे माझे भजनानें ब्रह्मभाव लक्षण मोक्ष लाभ होतो असें-"मां च यो व्यभिचारेण भक्तियोगेन सेवते-" या श्लोकानें सांगून मनुष्य रूपी जो तूं याचे भजनानें ब्रह्म प्राप्ति रूप मोक्ष कसा प्राप्त होईल अशा शंकेचें निराकरण करण्या साठीं-" ब्रह्मणोहि प्रतिष्ठाह ममृतस्या व्ययस्यच-" या सूत्र भूत श्लोकानें आपणास अनैकांतिक सुख रूप पर ब्रह्मस्वरूपत्व सांगितलें. त्या सूत्रभूत श्लोकाचें तें सुखस्वरूप ब्रह्म कोणते लक्षणाचें आणि कोणत्या स्वरूपाचें आहे आणि तें संसार कालीं कशानें आवृत झालें आहे त्या आवरणाचा कोणते साधनानें नाश होतो आणि तें कोणत्या अधिकाऱ्यास प्राप्त होतें याचें सविस्तर निरूपण करून व्याख्यान करण्या साठीं या पंचदशाध्यायाचा आरंभ करतात. त्यांत प्रथम-"ब्रह्मणोहि प्रतिष्ठाहं-" असें भगवंताचें वाक्य ऐकून-माझे सारखा मनुष्यच हा दिसत असून असें कसें बोलतो अशा विस्मयानें-युक्त झालेला आणि भयें करून व लज्जेनें कांहीं पुढें प्रश्न करीत नाहीं अशा अर्जुनास पाहून कृपें करून आपलें स्वरूप सांगण्याची ज्यास इच्छा झाली आहे असा भगवान् श्रीकृष्ण चिरकालाच भगवत्तत्त्व ज्ञान होण्यास अधिकार-

आहे यास्तव गुणातीतत्व होण्यास साधनभूत या संसारावर वैराग्य उत्पन्न होण्या साठीं संसाराचें नश्वर वृक्षरूपानें वर्णन करीत असतां बोलतात. अश्वत्थ वृक्षाचा विस्तार मोठा असतो आणि तो फार दिवस राहतो तसाच हा प्रपंच किंवा संसार याचा विस्तार फार मोठा असून अनादि काला पासून प्रवाह रूपानें स्थित आहे यास्तव त्यानें अश्वत्थरूपानेंच वर्णन करतात. -ऊर्ध्वमूलं- म्हणजे परब्रह्म स्वरूपाचा अतिशय मोठेपणा वर्णन करण्या करितां परब्रह्म स्वरूपास चार पादांची कल्पना करून हें चतुर्दश भुवनात्मक ब्रह्मांड कळूं त्यांत राहणारें सर्व विश्व परब्रह्म स्वरूपाचा एक पाद आहे आणि अवशिष्ट त्रिपाद परब्रह्माचें अमृतस्वरूप ब्रह्मांडाचे ही वर प्रकाशमान स्वस्वरूपात्मक ऊर्ध्व लोकाचे ठायीं ब्रह्म विष्णु महेश्वर स्वरूपात्मक आहे असें पुरुष सूक्तांत वर्णन केलें आहे. त्या प्रमाणावरून ब्रह्मविष्णु महेश्वराचे स्वरूपानें ऊर्ध्व लोकीं राहणारें जें परब्रह्माचे मायोपाधिक परमेश्वरात्मक स्वरूप तें आहे. मूल म्हणजे मूला प्रमाणें उत्पत्ति स्थिति लयांस कारण ज्या प्रपंच किंवा संसार वृक्षाचें असें तात्पर्य- मायोपाधिक जें परब्रह्म तेंच परमेश्वर स्वरूप जगदुत्पत्ति स्थिति लयांस कारण आहे. परब्रह्म शक्ति रूप जी माया ती परमेश्वराहून भिन्न नाहीं. ती सत्वगुण, रजोगुण आणि तमोगुण अशी त्रिगुणात्मक आहे. रजोगुणात्मक शक्त्यंशोपाधि युक्त कार्य ब्रह्माख्य परमेश्वर जगाचे सृष्टीस कारण आहे, सत्वगुणात्मक शक्त्यंशोपाधि युक्त विष्ण्वाख्य परमेश्वर जगाचे स्थितीस कारण आहे, तमोगुणात्मक शक्त्यंशोपाधियुक्त महेश्वर किंवा रुद्राख्य परमेश्वर जगाचे संहारात्मक प्रलयास कारण आहे, हे ब्रह्मविष्णु महेश्वर रूपी तीन शक्त्युपाधिक परमेश्वराचे अंश-शक्तीचेच अंशभूत असून शक्तीहून अनन्य परमेश्वराशीं अनन्य आहेत. तेच सांगितले प्रमाणें जगाचे उत्पत्ति स्थिति आणि प्रलय यांस कारण आहेत असें विष्णुपुराण, कूर्मपुराण, स्कंद पुराण यांत स्पष्ट सांगितलें आहे. विष्णु पुराणांत प्रथम अंशांतील तृतीयाध्यायांत- "निर्गुणस्या प्रमेयस्य शुद्धस्याप्य मलात्मनः॥ कथं सर्गादिकर्तृत्वं ब्रह्मणो ऽप्युपपद्यते॥-" इति मैत्रेय प्रश्नें- म्हणजे सत्वादि गुणरहित आणि देश काल वस्तु परिच्छेदांनीं रहित आणि याच कारणास्तव देहेंद्रियादिक जीं साधनें त्यांहीं करून रहित जो असंग शुद्ध स्वरूप रागादिक म्हणजे इच्छा क्रोधादिक मल रहित परमात्मा त्यास सृष्टि स्थिति संहार कर्तृत्व कसें संभवतें असा मैत्रेयानें प्रश्न केला असतां "पराशराः शक्तयः सर्व भावाना मचिंत्य ज्ञान गोचराः॥ यतो तो ब्रह्मणस्तास्तु सर्गाद्या भाव शक्तयः॥" -म्हणजे अग्नि मणि मंत्रादिक जे सर्व भाव पदार्थ. त्यांच्या कुलकोनीं ज्याचें स्वरूप नाहीं असें म्हणतां येत नाहीं त्याचे दाह किंवा त्यांचा प्रतिबंध होणें इत्यादि-

क जें कार्य अनुभवास येतें तेणें करून ज्या आहेत अशा अनुमानात्मक ज्ञाना-
नें त्या आहेत असा निश्चय होतो अशा जशा शक्ती आहेत त्याप्रमाणें ब्रह्मा-
च्याही सृष्टि स्थिति लयरूप कार्यास उत्पन्न करणाऱ्या शक्ती आहेत. येणें क-
रून परब्रह्म स्वरूपाहून अन्य जी शक्ती तदुपाधिक त्वास्तव ती वरील कर्तृत्व-
ब्रह्माचे ठायीं भासतें असें पराशरांनीं उत्तर दिलें. त्या शक्ती कोणत्या त्यांचें स्व-
रूप कूर्म पुराणांत उत्तर भागांत-"सर्वासा मेव शक्तीनां ब्रह्मविष्णु शिवात्मका:॥
प्रधाना: संस्मृता देवा: शक्तय: परमात्मन:॥ आभ्य: परस्तात् भगवान् परमात्मा-
सनातन:-" म्हणजे परमात्म्याच्या सर्व शक्ती मध्यें प्रधानभूत शक्तिस्वरूप ब्र-
ह्म विष्णु शिवात्मक देव आहेत असें महर्षींनीं सांगितलें आहे. या ब्रह्मविष्णु-
महेश्वरात्मक ज्या शक्ती त्यां पेक्षां ही परस्तात् म्हणजे त्यांहीं करून असंस्पृष्ट
किंवा त्यांहून निराळा निरुपाधिक परमात्मा त्याचा ही अधिष्ठान भूत सनातन
आहे असें सांगितलें आहे असाच अर्थ शिव पुराणांत सांगितला आहे."सृ-
ष्टे: प्रवर्तको ब्रह्मास्थितेर्विष्णुर्विमोहन:॥ संहरस्य ततोरुद्रस्तयोर्नित्यं नियामक:
॥ तस्मात् त्रयस्ते कथ्यंते जगत: कारणं त्रयं॥ कारण त्रय हेतुश्च शिव:परम कारणं"
म्हणजे सृष्टीचा प्रवर्तक ब्रह्मा आणि स्थितीचा प्रवर्तक विष्णु आहे परंतु संहारा-
चा प्रवर्तक रुद्र हा मोह शक्ती मुळें ब्रह्म विष्णूंचा ही नियामक आहे. याकारणास्त-
व ते ब्रह्म विष्णु रुद्र तिघे सृष्टिस्थिति लयांस क्रमानीं प्रत्येक प्रत्येक तीन कारणें
आहेत. कारण भूत जे ते तीन यांचा ही मूळ कारण कल्याण स्वरूप निरुपाधिक प-
रमात्मा आहे. स्कंद पुराणांत ही-"ब्रह्माविष्णुश्च रुद्रश्च परतत्व विभूतय:॥ एषां-
त्रयाणा मधिक: सर्व कारण मीश्वर:-" म्हणजे ब्रह्माविष्णु आणि रुद्र हे परमात्म-
तत्व जें परम ब्रह्म याच्या विभूति म्हणजे माया द्वारा अंश आहेत. यातिघां पेक्षां-
ही सर्वांचें कारण निरुपाधिक परमेश्वर आहे अथवा जशा शिडीच्या किंवा-
जिन्याच्या पायऱ्या एकीवर एकीवर एक असतात, त्याप्रमाणें पूर्वीं सांगितल्याप्र-
माणें मनुष्यांतील मुख्य राजाच्या आनंदा पेक्षां मनुष्य गंधर्वांचा आनंद शतगु-
णित अधिक वर आहे. त्यापेक्षां देव गंधर्वांचा आनंद शतगुणित अधिक आहे या-
क्रमानें पितर, अजान देव, कर्म देव, मुख्यदेव, इंद्र, बृहस्पती, प्रजापती-सूत्रात्मा
यांचे उत्तरोत्तर शतगुणित अधिक आनंद आहेत. त्यापेक्षां ही निरतिशय जो-
ब्रह्मानंद वाणीला मनाला अगोचर ज्यापासून हीं सर्वभूतें उत्पन्न होतातआ-
णि उत्पन्न झालेलीं जेणें करून स्थितीप्रत पावतात आणि लय पावत असतां
ज्याचे ठायींच लय पावतात असा जो श्रुतींत सांगितलेला सर्वांहून वर राहणा-
रा ब्रह्म रूप आनंद किंवा सर्वांहून उत्कृष्ट जें ब्रह्म तें ऊर्ध्व अथवा सर्व संसारा
चा तत्वज्ञानानें बाध झाला तरी ज्या स्वरूपाचा बाध होत नाहीं. सर्व बाधानेंसा-

क्षिभूत जें सर्वांवर राहतें तें सर्व संसाराचे भ्रमास अधिष्ठान भूत पर ब्रह्म अथवा या अध्यायांत क्षर आणि अक्षर सांगावयाचे आहेत. त्यांहून उत्तर किंवा उत्कृष्ट पुरुषोत्तम तो ऊर्ध्व तें आहे मायेचे योगानें मूळ ज्यांचें असा मूलशब्दाचा पूर्वींचाच अर्थ सर्वव्याख्येंत जाणावा. आणि अधः शाखं- अधः म्हणजे- निरतिशयित आनंद सर्वोत्कृष्ट पुरुषोत्तमादि रूप ऊर्ध्व पदार्थापेक्षां खालीं राहणारे पूर्वोक्त जे ब्रह्मविष्णुमहेश्वर किंवा त्यांहून अर्वाचीन म्हणजे आलीकडील कार्योपाधि हिरण्यगर्भादिक विराट, प्रजापति, असुर, सुर, गंधर्व, अप्सरा, नर, तिर्यक्, पशु, पक्षी, स्थावर रूप जे सर्व विकार ते सर्व दिशांचे ठायीं पसरले आहेत यामुळें शाखा प्रमाणें विस्तार करणारे ज्या संसार वृक्षाचे आहेत. वेदांत जेथें सृष्टि सांगितली तेथें परब्रह्मास माया शक्तीचे योगानें सृष्टि करण्याचा संकल्प उत्पन्न होऊन परब्रह्मानें अपंचीकृत भूतें आणि भौतिकें, इंद्रिय, प्राण, मन इत्यादिकांची सूक्ष्म सृष्टि उत्पन्न केली. नंतर महाभूतांचें पंचीकरण करून स्थूल सृष्टि उत्पन्न करून त्या दोन प्रकारच्या सृष्टींत जीव रूपानें आपण प्रवेश करून त्यांचे द्वारा नामरूपांचें व्याकरण करण्याचा संकल्प करून- याचें अमुक नाम अमुक रूप असा विस्तार करण्याचा संकल्प होता त्याप्रमाणें या- प्रपंच रूप जगाचा विस्तार केला, असें प्रतिपादन केलें आहे. या प्रमाणा वरून जसा प्रसिद्ध अश्वत्थ वृक्ष किंवा दुसरा वृक्ष याचे उत्पत्ति स्थिति आदिकांस त्याचें बीजभूत सूक्ष्म मूलच कारण आहे त्या प्रमाणें या प्रपंच वृक्षाचे उत्पत्त्यादिकांस मायोपाधिक परमेश्वराचें माया शक्तिस्वरूप ब्रह्मविष्णुमहेश्वरात्मक सूक्ष्म रूपच कारण आहे आणि प्रसिद्ध अश्वत्थ वृक्षाचे मोठे विस्तारास त्याच्या स्थूल शाखाच कारण- आहेत. त्याप्रमाणें या प्रपंच वृक्षास मायोपाधिक परमेश्वर रूप सूक्ष्म कारणा पेक्षां स्थूल रूप जें महत्तत्वोपाधिक हिरण्यगर्भ विराटादिक तेंच नामरूपांचे व्याकरणानें (पृथक् स्पष्टी करण) विस्तार होण्यास कारण आहे असा हा जो प्रपंच वृक्ष- त्यास अश्वत्थं प्राहुः- हा मायामय मिथ्या स्वरूप प्रपंच वृक्ष नश्वर आहे यामुळें- श्वः म्हणजे उद्यां ही प्रातः काल पर्यंत राहील असा विश्वास करण्यास योग्य नाहीं- असा अश्वत्थ शब्दा पासून अर्थ निष्पन्न होतो याकारणानें हा प्रपंच अश्वत्थ आहे तथापि मूढांस त्या त्या देहेंद्रिय प्रवाह रूपानें हा निरंतर स्थित आहे म्हणून- अव्ययं- तत्वज्ञाना वांचून छेद होण्यास दुर्घट आहे असें प्राहुः म्हणजे श्रुति- आणि स्मृति बोलतात. ऊर्ध्वमूल अधःशाख म्हणजे अर्वाक् शाख हा अश्वत्थ सनातन म्हणजे प्रवाहें करून अनादि अनंत आहे, असें कठवल्ली श्रुतींत सांगितलें आहे. "अव्यक्त मूल प्रभवस्तस्यैवानुग्रहोत्थितः॥ बुद्धि स्कंध मयश्चैव इंद्रियांतर कोटरः॥ महाभूत विशाखश्च विषयैः पत्रवांस्तथा॥ धर्माधर्म सुपुष्प-

श्च सुखदुःख फलोदयः ॥ आजीव्यः सर्वभूतानां ब्रह्मवृक्षः सनातनः ॥ एतत् ब्रह्म वनंचैव ब्रह्माचरति साक्षिवत् ॥ एतत् छित्वाच भित्वाच ज्ञानेन परमासिना ॥ ततश्चात्मगतिं प्राप्य तस्मान्ना वर्तते पुनः ॥" अर्थ अव्यक्त म्हणजे मायोपाधिक अव्याकृत ब्रह्मरूप मूल कारणा पासून आहे. प्रभव म्हणजे उत्पत्ति ज्याची आणि त्या मूल कारणाचे अनुग्रहें करून म्हणजे स्थूल स्वरूपात्मक दृढत्वामुळें उत्थित म्हणजे उत्तम प्रकारें करून वृद्धीप्रत पावलेला वृक्षाच्या शाखा त्याच्या स्कंधा पासून होतात. संसार वृक्षास स्कंधस्थानीं बुद्धि तिचे जे नाना प्रकारचे परिणाम तेच विस्तार करणारे शाखा रूप आहेत यास्तव तो तन्मय म्हणजे त्यानीं व्याप्त आहे. आणि इंद्रियांचीं जीं अंतरें म्हणजे छिद्रें तींच ज्याचीं कोठे आहेत. आणि पृथिव्यादिक पंच महाभूतें ज्यास उपशाखा आहेत अथवा विशाख म्हणजे स्तंभ ज्यास खुंट म्हणतात. तो ज्यास महाभूतें आहेत. आणि शब्दादि विषय ज्याचीं पत्रें आहेत त्यानीं युक्त आणि पुण्य पाप रूप पुष्पांनीं जो युक्त आणि सुख दुःख रूप फलें ज्यास उत्पन्न झालीं आहेत त्या फलांनीं जो युक्त आणि सर्व भूतांचा जो उपजीव्य म्हणजे स्थितीस किंवा सेवन करण्यास स्थानभूत प्रसिद्ध वृक्ष जसा पक्ष्यां दिकांचे स्थितीस कारण तसा ब्रह्म वृक्ष म्हणजे परमात्मा जो याणें अधिष्ठिलेला वृक्ष तो सनातन म्हणजे तत्त्व ज्ञाना वांचून छेद करण्यास दुर्घट आणि एतत् ब्रह्म वनं म्हणजे या जीवरूप ब्रह्माचें वन म्हणजे भोग्य असा हा प्रपंच वृक्ष आहे. याप्रत परब्रह्म साक्षी प्रमाणें आहे. त्याचे धर्मानें लिप्त न होतां त्याचें प्रकाशक आहे. या संसार वृक्ष रूप ब्रह्मवनां प्रत मी ब्रह्मच आहें अशा ब्रह्मात्म ज्ञान रूप उत्कृष्ट खड्गानें समूल नाश करून मोक्षाख्य जी आत्म प्राप्ति रूप गति तीप्रत पावून त्या मोक्षापासून पुनः जीव जन्मास येत नाहीं असें स्मृतीत ही सांगितलें आहे. येथें अश्वत्थ वृक्षाची जी उपमा दिली ती गंगेचे तरंगांनीं ज्याचे मूलांतील मृत्तिका जाऊन वायूनें ज्याचीं अर्धीं मूळें उपटून अर्धीं भूमींत राहून खालीं शाखा होऊन वर मूळें होऊन अर्धा पडलेला जो अश्वत्थ वृक्ष त्याची दिली त्यामुळें ऊर्ध्व-मूल, अधःशाख हीं विशेषणें विशेष्य रूप अश्वत्थ वृक्षास उत्पन्न झालीं असें जाणावें. ॥ छंदांसि यस्य पर्णानि- म्हणजे अद्वैत ब्रह्मात्म तत्त्वाचें आच्छादन करतात. यामुळें किंवा संसार रूप वृक्षाचें रक्षण करतात. यामुळें ज्यांस छंद असें म्हणतात असे जे ऋक् यजुः सामवेदांतील कर्म कांड भाग ते ज्यास पर्णा प्रमाणें आहेत. प्रसिद्ध वृक्षांचीं पर्णें जशीं त्याचे रक्षणार्थ किंवा शोभार्थ होतात तसे कर्मकांडात्मक वेद यज्ञादिक धर्माधर्म प्रतिपादन करतात. त्याचीं फलें ही सांगतात. त्याचें अनुष्ठान जीव करून त्यांचे फल भोगा साठीं

नाना प्रकारचे देव मनुष्यादिक देह धारण करतात यामुळें प्रपंच वृक्षास शोभा येते तीस धर्माधर्म प्रतिपादन करण्याचे द्वारानें कर्म कांडात्मक वेदच कारण आहेत आणि प्रळयोत्तर ही जीवानीं केलेले धर्माधर्माचें फल त्यांस देण्या करितां ईश्वर वारं वार सृष्टि करतो. याप्रमाणें प्रपंच वृक्ष निरंतर प्रवाह रूपानें सुरक्षित राहतो. त्यास धर्माधर्माचे प्रतिपादन द्वारा ते कर्म कांड रूप वेदच कारण आहेत. अथवा प्रसिद्ध अश्वत्थादिक वृक्षास पर्णे बहुत असलीं म्हणजे त्यायोगानें त्याची छाया दाट होते तेणें करून तो वृक्ष सर्व जीवांस त्याखालीं बसून विश्रांती घेण्यास योग्य होतो. याप्रमाणें कर्मकांड रूप वेदांत सांगितलेलीं जीं नित्य नैमित्तिक कर्मे त्यांचें अनुष्ठान जीवांनीं केलें म्हणजे त्या कर्मांचीं जीं सुखादिक फलें तीं जीवांस छाये प्रमाणें होऊन त्यायोगानें हा प्रपंच वृक्ष जीवांस आश्रय करण्यास योग्य होतो म्हणून कर्म प्रतिपादन द्वारा ते कर्मकांड रूप वेद या प्रपंच वृक्षास कर्मफल भूत जी छाया ती प्राप्त होण्यास पर्णा प्रमाणें आहेत. यः तं-वेद-म्हणजे अशा प्रकारच्या या संसार रूप मायामय अश्वत्थ वृक्षास जो जाणतो- सः वेदवित्-म्हणजे तोच कर्म ब्रह्म रूप वेदार्थ वेत्ता. संसार वृक्षाचें मूळ कारण मायोपाधिक परब्रह्म हिरण्य गर्भादिक जे जीव ते याचे शाखास्थानीं आहेत. तो संसार वृक्ष स्वरूपानें नाशवंत आहे, प्रवाह रूपानें अनंत आहे त्याचें वेदोक्त कर्मांनीं सेवन जीव करतात. तो ब्रह्मात्म तत्व ज्ञानानें नाश पावतो. इतकाच सकल वेद प्रतिपाद्य अर्थ आहे, जो वेदार्थ वेत्ता तो वेदवित् अशी पूर्वोक्त वृक्ष ज्ञात्याची स्तुती केली. ॥१॥

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः॥ अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ॥२॥ ॥**

पूर्वश्लोकांत कार्योपाधि जे हिरण्य गर्भादिक जीव ते या प्रपंच वृक्षाचे शाखा स्थानीं सांगितले आतां त्यांवरील विशेष सांगतात. अधश्चोर्ध्वं प्रसृताः तस्य शाखाः म्हणजे त्या कार्योपाधिक हिरण्य गर्भादिक जीवां मध्यें जे कुत्सित आचरणारे पापी जीव ते अधः-म्हणजे मनुष्य पश्वादिक योनीचे ठायीं आपले संततीचे द्वारानें प्रसृताः-म्हणजे विस्तारा प्रत पावले आहेत आणि जे रमणीय म्हणजे उत्तमाचरण करणारे पुण्यवंत जीव ते- ऊर्ध्वं प्रसृताः-म्हणजे देवादिक योनींचे ठायीं संततीचे द्वारा विस्ताराप्रत पावले आहेत ते मनुष्य लोका पासून सत्यलोक पर्यंत विस्तार पावलेले जीव-गुण प्रवृद्धाः विषय-प्रवालाः शाखाः- म्हणजे जशा प्रसिद्ध अश्वत्थादिक वृक्षांच्या शाखा जल से-

चनानें विस्तार पावतात. तशा देहेंद्रिय मन विषयादिका कारानीं परिणाम पावलेले सत्वादिक गुण त्यानीं विस्तारा प्रत पावलेल्या आणि शब्दादिक जे विषय तेच तदाकार इंद्रिय द्वारा झालेल्या अंतःकरण वृत्तीनीं रंजकत्वा स्तव (रंजविण्यास्तव) आहेत. शाखांस संलग्न कोंवळे पालवी प्रमाणें ज्यास अशाच्या संसार वृक्षाच्या शाखा आहेत आणि ब्रह्म विष्णु महेश्वरात्मक मायोपाधिक परमेश्वर स्वरूप ऊर्ध्व मुख्य मूळ या प्रपंच वृक्षाचें जसें आहे त्या प्रमाणें दुसरीं ही या प्रपंच वृक्षाचीं- अधः मनुष्य लोके- म्हणजे खालचा जो हा मनुष्य लोक त्याचे ठायीं मूलानि म्हणजे त्यात्या विषयाच्या भोगा पासून उत्पन्न झालेल्या ज्या रागद्वेषादिक धर्माधर्म प्रवृत्तीस उत्पन्न करणाऱ्या वासना तत्स्वरूप अवांतर मूळें किंवा मूळें अनुसंततानि- म्हणजे अखंड प्रवाह रूपानें नित्य आहेत. तीं कर्मानुबंधीनि- म्हणजे धर्माधर्माख्य कर्मच आहेत. अनुबंध- म्हणजे पाठीमागून होणारें ज्यांच्या अशीं तीं अवांतर मूळें आहेत. तात्पर्य- ऊर्ध्व भागीं किंवा अधो भागीं स्थित जे लोक त्यांचे ठायीं केलेले जे भोग त्यांनीं कर्मक्षय झाला असतां त्या भोगाच्या वासनानीं युक्त जे जीव ते मनुष्य लोकीं किंवा ब्राह्मण्यादिक जातीनीं युक्त जो मनुष्य देह तद्रूप जो लोक त्याचे ठायीं जन्मास येऊन त्या वासनानुरूप कर्मे करण्या विषयीं प्रवृत्त होऊन कर्मे करतात. यास्तव कर्मे वासनानंतर होणारीं आहेत. हें उपलक्षण करून प्रपंच अनादि बीजांकुर न्यायानें आहे यास्तव वासना ही कर्मजन्य भोगानंतर आहे कर्मे वासनानंतर आहेत. असा हा अविच्छिन्न प्रवाहरूप संसार वृक्ष आहे. बहुत करून मनुष्यांसच कर्माधिकार आहे यास्तव मनुष्य लोकीं असें म्हटलें. ॥२॥

**न रूपमस्येह तथोपलभ्यते नांतो न चादिर्न च संप्रतिष्ठा ॥ अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्वा ॥३॥ ॥**

जसें या संसार वृक्षाचें वर्णन केलें त्या प्रमाणें- इह अस्य तथा रूपं न उपलभ्यते- म्हणजे या संसारांत राहणारे प्राणी स्वप्न मृग तृष्णोदक ऐंद्रजाल विद्येनें (गारुडी विद्येनें) निर्माण करून दाखविलेले गंधर्व नगरा प्रमाणें मिथ्या- स्वरूपास्तव दृष्ट नश्वर स्वरूप आहे यामुळें म्हणजे पाहत असतां नाहींसें होतें- स्थिर नाहीं यामुळें या संसार वृक्षाचें तसें ऊर्ध्वमूलं अधःशाखं असें जें वर्णिलेलें रूप पाहत नाहींत किंवा जाणावयास समर्थ होत नाहींत याच कारणानें- नांतः- म्हणजे याचा अज्ञ दृष्टीनें अंत म्हणजे नाश किंवा शेवट नाहीं. यामुळें हा रनकेका-

त्यानें नाश पावेल असा अंत ही पहात नाहींत किंवा जाणण्यास समर्थ होत नाहींत -न आदिर्न- म्हणजे आणि अनादित्वास्तव येथून हा प्रवृत्त झाला आहे असा-आदि पहात नाहींत किंवा जाणावयास समर्थ होत नाहींत. - नच संप्रतिष्ठा- म्हणजे आणि ज्याचे आदि आणि अंत समजतात किंवा प्रत्यक्ष दिसतात त्यांचा हा मध्य असें पहावयास किंवा जाणावयास शक्य आहे या प्रपंच वृक्षाचे आद्यंतच समजत नाहींत. यास्तव याची प्रतिष्ठा म्हणजे मध्य पहात नाहींत किंवा जाणावयास समर्थ होत नाहींत. अथवा या प्रपंच वृक्षास अनादित्व आहे यामुळें पूर्वोक्त ऊर्ध्वमूल इत्यादिकाचें प्रत्यक्ष होत नाहीं आणि याचें अंताचें म्हणजे शेवटाचें ही प्रत्यक्ष होत नाहीं कारण याचा शेवट म्हणजे अगदीं अंत तो ज्या कालीं सर्व जीवांस मुक्ति होते त्यास महा प्रलय असें म्हणतात. तदुत्तर संसार नाहीं म्हणून ज्या कालीं होईल असें कोणी तार्किकादिक म्हणतात. कोणी मीमांसकादिक याचा जसा-आदि नाहीं तसा अंत ही नाहीं. यथा पूर्व प्रवाहानें हा निरंतर असाच अनंत राहणारा आहे असें म्हणतात. तेव्हां याचा अंत नाहीं अशा मतें याचा शेवटच नाहीं. तेव्हां त्याचें प्रत्यक्ष कोणास नाहींच. महा प्रलयीं शेवट आहे असें जे मानतात त्यांचे मतें महा प्रलयीं सर्व जीवांस मुक्तीच होते तेव्हां याचा शेवट असल्या तरी सर्व जीवांस मुक्ति झाली म्हणजे त्यांस देहेंद्रियादिकच मुक्तिकालीं नाहींत यास्तव प्रत्यक्ष होण्यास साधनच नाहीं मग कोणते साधनानें याचा तो शेवट पाहतील तेव्हां ही याचें प्रत्यक्ष कोणास नाहीं. आद्यंत प्रत्यक्ष नाहींत यामुळें मध्याचें ही प्रत्यक्ष नाहीं हें पूर्वी प्रमाणेंच, असेंही कोणी व्याख्यान करतात. आदि, मध्य आणि अंत हे समजले म्हणजे जसा प्रसिद्ध वृक्ष मूलांत किंवा मध्यांत किंवा शेवटांत प्रसिद्ध शस्त्रानें छेदून टाकण्यास शक्य आहे तसा आदि मध्यांताचें ज्ञान नसल्यामुळें हा-प्रपंच वृक्ष प्रसिद्ध शस्त्रादिकानें छेदून टाकावयास शक्य नाहीं आणि छेदून न टाकला तर जन्म मरण प्रवाहांत अनेक प्रकारचे दुःखानुभवरूप मोठा अनर्थ करणारा आहे यास्तव-अश्वत्थं एनं सुविरूढ मूलं- म्हणजे अनादि अविद्येनें ज्याचीं फार दृढ मूलें झालीं आहेत अशा या पूर्वोक्त संसार रूप अश्वत्थ वृक्षाप्रत-असंग शस्त्रेण दृढेन छित्वा- म्हणजे ब्रह्मात्म तत्त्व ज्ञाना विषयींचें जें औत्सुक्य म्हणजे-केव्हां मला प्राप्त होईल अशी उत्कंठा तिनें करून दृढ केलेलें आणि पुनः पुनः आत्मा नात्म वस्तु विवेक, सत्यानृत वस्तु विवेक आणि नित्यानित्य वस्तु विवेक यांच्या अभ्यासानें तीक्ष्ण त्याची धारा झाली आहे असा आणि पुत्रेषणा, वित्तेषणा, दारेषणा व लोकेषणा यांचा त्याग करणें असा जो असंग तद्रूप जें रागद्वेष मय संसाराचें विरोधि शस्त्र तेणें करून समूल छेदून किंवा उपटून टाकून शमदमादि साधन संपन्न होऊन सर्व त्याग करून असें तात्पर्य :- अथवा हा प्रपंच रूप अश्वत्थ वृ-

क्ष उद्यां ही प्रातःकाल पर्यंत राहील असा विश्वास करण्यास योग्य नाहीं आणि अव्यय म्हणजे प्रवाह रूपानें विच्छिन्न न होणारा आहे असें आहे तर क्षणिक विज्ञान वादि मता प्रमाणें प्रतिक्षणीं विनाश पावणारें आणि नाश पावणाऱ्या पूर्व स्वरूपापासून उत्पन्न होणारें दुसरें त्या सारखें स्वरूप उत्पन्न होतें अशा विज्ञान संपत्ती प्रमाणें किंवा बीजा पासून अंकुर होतो, अंकुरा पासून बीज होतें अशा बीजांकुर न्याया प्रमाणें कर्म फलोपभोगाच्या वासना पासून कर्मे होतात. कर्मा पासून फलोपभोग होतात. असें परस्पर कारणत्व सर्वदा आहेच तेव्हां सर्वदा अशा प्रवाहानें हा संसार वृक्ष आहेच तेव्हां याचा नाश होऊन मोक्ष होणें दुर्घट आहे अशा शंकेचें हा प्रपंच वृक्ष सद्रूपानें किंवा असद्रूपानें अनिर्वचनीय मिथ्यारूपच आहे याची मुळींच सत्ता नाहीं असें सांगून निराकरण करतात. ॥ नरूपं अस्य इह तथा उपलभ्यते- म्हणजे हा देह जिवंत असतांच या देहांत झालेलें असंग अद्वितीय ब्रह्मात्म तत्त्व-ज्ञान रूप दृष्टीनें पाहिलें म्हणजे रज्जूचे अज्ञान दशेंत जसें सर्पस्वरूप निराळें-दिसत होतें तसें रज्जु स्वरूपाचे यथार्थ ज्ञानानंतर दिसत नाहीं. त्या प्रमाणें अज्ञान दशेंत जसें या देहादि प्रपंचाचें रूप आत्म सत्ते पेक्षां निराळें दिसत होतें त्या प्रमाणें ज्ञान्यास दिसत नाहीं यावरून या प्रपंचाचें स्वरूप मिथ्या असें ज्ञान्याचे-अनुभवानेंच सिद्ध आहे. यास्तव अज्ञान दृष्टीनें भासणारें बीजांकुरांचें सादृश्य यास नाहीं तथापि हा प्रपंच वृक्ष शशशृंगा (सशाचे शिंगा) प्रमाणें असत् नाहीं असें-सांगतात. ॥ नांतो नचादिः- म्हणजे अज्ञान दशेंत याचें कारण भूत जें अज्ञान-तें अज्ञान दृष्टीनें अनादि अनंत आहे यामुळें हा अनादि अनंत प्रवाह रूपानें-अविद्या कृत आवरणानें सत्या सारखा भासतो. तर याचा आत्म्या प्रमाणें कधींही नाश होणार नाहीं यामुळें मुक्ती होणारच नाहीं अशा शंकेचें निराकरण करतात.- नच संप्रतिष्ठा- म्हणजे विचार दृष्टीनें पाहिलें तर यास पृथक् सत्ता नाहीं. याचें कारण माया किंवा अविद्या परमार्थतः निःस्वरूप मिथ्याच आहे असें हें आत्मस्वरूप, तुच्छ जें अज्ञान त्याणें पिहित म्हणजे आच्छादित आहे. या प्रजा म्हणजे जीव प्रति दिवशीं सुषुप्ति कालीं देह अंतःकरणादिक उपाधींचा लय झाल्यामुळें ब्रह्म तादात्म्या प्रत पावून ब्रह्मभूत होत असतांही अनृत जें अज्ञान तेणें करून व्याप्त असल्यामुळें ब्रह्मापत स्वात्मत्वें करून जाणत नाहींत. अशा अर्थाच्या अनेक श्रुतीं वरून आणि अधिष्ठान ज्ञानानें ज्याची निवृत्ति म्हणजे यास अधिष्ठान सत्ते वांचून दुसरें स्वरूप नाहीं अशा निःस्वरूपता ज्ञानात्मक ज्याची निवृत्ति होते तें मिथ्या. जसें शुक्तीचें किंवा रज्जूचे अज्ञानानें भासणारें रजत सर्पादिक शुक्ति स्वरूप रज्जूचे स्वरूपाहून निराळें स्वरूपाचें नाहीं तें मिथ्याच आहे. त्या प्रमाणें ब्रह्मात्मत्व ज्ञानात्मक अधिष्ठान ज्ञानानें पूर्वोक्त निवृत्ति होणारें अज्ञान मिथ्या-

न आहे अशा प्रकारच्या बहुत अनुमानानें आणि विद्वानांचे अनुभवांनीं सिद्ध आहे, त्या अज्ञानासच मुळीं सत्ता नाहीं मग तेणें करून भ्रमानें भासलेला हा प्रपंच - यास कारण भूत जें अज्ञान त्याचे ठायीं स्थिति रूप सत्तात नाहीं हा प्रपंच परब्रह्माचाच परिणाम रूप विकार आहे त्याची सत्ता मृत परिणाम घटाची सत्ता जशी मृत्तिकेचे ठायीं आहे त्या प्रमाणें ब्रह्माचेच ठायीं आहे असें ही म्हणतां येत नाहीं-ब्रह्म परिणामी उपादान मानलें तर त्यास निर्विकारत्व श्रुतींत सांगितलें आहे तें विरुद्ध होईल. यास्तव पूर्वीं सांगितल्या प्रमाणें भ्रमाधिष्ठानत्व रूप विवर्तोपादानत्वच मानलें पाहिजे तेव्हां ब्रह्मावर ही याची स्थिति किंवा निराळी सत्ता नाहीं आणि ऐंद्रजालिकांनीं (गारुडीलोकांनीं) दाखविलेल्या गंधर्व नगरादिका प्रमाणें अज्ञानावस्थेंत भासतो तरखरा तस्मात् मायामय मिथ्याच आहे. आणि पूर्वीं सांगितल्या प्रमाणें वासनांचे दृढत्वामुळें छेद करण्यास दुर्घट आहे आणि छेद न केला तर अनर्थास कारण हा संसाररूप अश्वत्थ वृक्ष आहे यास्तव असाही असत्ता तरी देहात्म बुद्धि रूप जो संग त्याचें वर्जन म्हणजे परिपक्क देहात्मविवेक रूप असंग दृढ शस्त्र तेणें करून त्यास छेदून ॥ ततः तत्पदं परिमार्गितव्यं ॥ असा याचा पुढचे श्लोकांत अन्वय आहे. जरी स्थूल सूक्ष्म शरीरांचा तादात्म्याभिमाना भाव रूप असंग सुषुप्ति कालीं स्वतः होतो आणि त्या सुषुप्तींत झालेल्या असंगानुभवाच्या वासनानीं जागृत कालीं ही त्या असंगाचें स्मरण किंवा अनुमान होतें तथापि देहात्म तादात्म्याभिमान रूप जो संग त्याच्या वासनांस कारण भूत जें अज्ञान त्याचा सुषुप्ति कालीं नाश नाहीं यामुळें तो स्मरणात्मक किंवा अनुमानात्मक विवेक देहात्म तादात्म्याभिमाना प्रमाणें दृढ नाहीं. यास्तव त्या दृढ वासनानीं पुनः पुनः देहात्मतादात्म्याभिमान रूप संग उत्पन्न होतो यास्तव अज्ञानात्मक कारण शरीराशीं ही आत्म्याचा असंग सिद्ध होण्या साठीं निर्विकल्पक समाधीचा अभ्यास करून तेणें करून झालेला जो दृढ असंगता ज्ञान रूप विवेक तद्रूप शस्त्रानें या प्रपंचाचा प्रविलापन रूप म्हणजे जसें लवण आपलें नाम रूप टाकून उदकांत लीन होतें त्याची पृथक् सत्ता राहत नाहीं असा समूल म्हणजे अज्ञाना सहित छेद केला-पाहिजे. देहेंद्रियादिक प्रकृतीचीं कार्यें प्रकृती सहित पृथक् सत्तेनें विद्यमान असतां त्यांहून आपलें स्वरूप असंग भिन्न आहे असें तें ज्ञान यासच संसार नाश करणारें विवेकात्मक तत्त्व ज्ञान असें सांख्य म्हणतात. तसें असंगत्व ज्ञान उपयोगी नाहीं कारण पूर्वीं सांगितल्या प्रमाणें देहेंद्रियमन आदिक पृथक् सत्तेनें जर असलें तर पुनः संग होण्याचें कारण प्रकृत्यादिक आहेत त्यांचा समूल नाश न झाल्यामुळें नष्ट झालेला ही संग पुनः होईलच असें तात्पर्य. ॥ ३ ॥

**ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्तंति भूयः ॥ तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥**

केवल निर्विकल्पक समाधीच्या अभ्यासानें पूर्वोक्त देहादिकांशीं आत्म्याचा असंग सिद्ध झाला तरी तितक्यानेंच कृतार्थता आहे असें नाहीं तर त्या असंग शस्त्रानें या संसार वृक्षाचा पूर्वोक्त छेद करून ॥ ततः तत्पदं परिमार्गितव्यं ॥ तदनंतर ब्रह्मात्म बोध होण्यासाठीं गुरूस शरण जाऊन त्या अश्वत्थ वृक्षाहून ऊर्ध्व राहिलेलें म्हणजे त्या अश्वत्थ वृक्षाचे कल्पनेस अधिष्ठान परमार्थतः तत्संग रहित असें मुमुक्षूंनीं पावावयाचें जें अद्वितीय असंग सच्चिदानंदात्मक परब्रह्म स्वरूप तें श्रुति प्रसिद्ध गुरूपदेशानेंच प्राप्त व्हावयाचें पद, वेदांत श्रवण रूप विचार, श्रवणानंतर युक्त्यनुसंधानात्मक मनन, त्यापासून झालेलें- मी अद्वितीय ब्रह्मच आहें अशा ब्रह्मात्म साक्षात्कारानें जाणावें. त्या आत्म्याच्या विज्ञानासाठीं ब्रह्मनिष्ठ गुरूपाशीं जावें तो आत्मा अन्वेष्टव्यः म्हणजे जाणावा. जिज्ञासितव्यः- म्हणजे त्याचा वेदांत वाक्यानीं विचार करावा. असें विधि सांगणाऱ्या श्रुती याविषयीं प्रमाण आहेत. कोणतें तें पद सांगतात. ॥ यस्मिन् गताः भूयः न निवर्तंति - म्हणजे ज्या निरूपाधिक ब्रह्मपदाप्रत गेलेले पुनः संसारांत परत येत नाहींत. ॥ च तमेव आद्यं पुरुषं प्रपद्ये - म्हणजे पद शब्देंकरून सांगितला जो आद्य ज्याणें हें सर्व विश्व पूर्ण म्हणजे व्यापलें आहे किंवा सर्व शरीर रूप पुरांचे ठायीं जो शयान म्हणजे अंतर्यामी रूपानें स्थित प्रत्यगानंद स्वरूप आत्मा त्याप्रत मी शरणागत झालों आहें - इति भावयेत्- असा बाहेरील पदाचा अन्वय करावा असें भावन म्हणजे चिंतन करावें अथवा मला कांहीं कर्तव्य नसतां ही " वर्त एव च कर्मणि- " म्हणजे मी कर्माचे ठायीं वर्ततों असें लोकांनीं कर्म करावें अशा उपदेशासाठीं भगवंताचें जसें वाक्य तसें, त्या आद्य पुरुषास मी शरण आहें असें लोकांनीं त्या पुरुषास शरण जावें असा लोकांस उपदेश करण्यासाठीं हें भगवंताचेंच वाक्य आहे. मग बाहेरील पदाचा पूर्वीप्रमाणें अन्वय नको अथवा त्या आद्य पुरुषास मी शरण गेलों आहें या प्रमाणें तदेक शरण होऊन त्या पदाचा शोध करावा असा पूर्वीचे पदार्थांत अन्वय करावा. कोणता तो पुरुष तें सांगतात. ॥ यतः पुराणी प्रवृत्तिः प्रसृता - म्हणजे ज्या पुरुषापासून ही अनादि चिरंतन मायामय संसार वृक्षाची प्रवृत्ति ऐंद्रजालिका ( मायावी ) पासून मायामय गज अश्वादिकांची प्रवृत्ति जशी पसरते त्याप्रमाणें पसरली आहे अथवा मी प्रजारूपानें उत्पन्न होऊन बहुत होईन असा प्रथम बहुभवन ( बहुत होणें ) संकल्प करून,

सृष्टि करण्याची जी आद्य पुरातन प्रवृत्ति ज्यापासून उत्पन्न झाली तीच आमचे ठायीं ही प्रसार पावली आहे म्हणजे त्याच्या त्या आद्य प्रवृत्ति प्रमाणेंच आम्हीं जीवही प्रथम आह्मी मोठे धनवंत होऊन संततीचे द्वारा विस्तार पावूं असा संकल्प करून मग त्याचे सिद्धी साठीं प्रयत्न करून त्या संकल्पित अर्थाची निष्पत्ति करतों ॥ ४॥

**निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ॥ द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५॥ ॥**

ज्ञान पूर्वक त्या पदाप्रत जाणारांस दुसरीं अंगें म्हणजे साधनें आणि त्या पदाचें स्वरूप दोन श्लोकांनीं सांगतात. अथवा एकांतिक सुखाचें आच्छादन करणारा संसार रूप अश्वत्थ वृक्ष आणि त्याचें छेदन करणारें असंग शस्त्र सांगून त्या सुखाचे प्राप्ती विषयीं अधिकारी आणि त्या ब्रह्म सुखाचें स्वरूप दोन श्लोकांनीं सांगतात. ॥ निर्मान मोहाः – म्हणजे अहंकार किंवा गर्व यांस दर्प असें ही म्हणतात तो मान अविवेक किंवा विपरीत ज्ञान तो मोह त्यांहीं करून रहित असे आणि – जितसंग दोषाः – म्हणजे प्रिय वस्तूचे सन्निधीनें जो प्रीति स्वरूप राग, अप्रियवस्तूचे सन्निधीनें जो द्वेष तद्रूप जे संगदोष तद्विवर्जित अथवा मी कर्ता, मी भोक्ता असा अभिमान संग आणि राग द्वेषादिक दोष त्यांनीं रहित आणि अध्यात्म नित्याः – म्हणजे आत्म स्वरूपाचा जो विचार किंवा ध्यान चिंतन यां विषयीं तत्पर आणि – विनिवृत्त कामाः – म्हणजे विशेषें करून म्हणजे निःशेष गेले आहेत काम म्हणजे विषय भोग किंवा भोगेच्छा ज्यांची. विवेक वैराग्य द्वारा निवृत्त म्हणजे त्यक्त आहेत सर्व कर्मे ज्यांणीं असे ॥ सुख दुःखसंज्ञै द्वंद्वैः विमुक्ताः – म्हणजे सुख दुःखस्वरूपत्वारत्व किंवा त्यांचे साधन त्वास्तव सुख दुःख अशीं नामें ज्यांस आहेत अशीं जीं सुख दुःख, शीत उष्ण, क्षुधा तृषात्मक द्वंद्वें ॥ सुखदुःखसंगैः – अशा पाठांतरीं सुख दुःखाशीं आहे संबंध ज्यांस अशीं जीं पूर्वोक्त द्वंद्वें तीं हीं करून रहित म्हणजे त्या द्वंद्वांचें सहन करणारे आणि अमूढाः – म्हणजे प्रमाणभूत वेदांत वाक्या पासून झालेला जो ब्रह्मात्मैक्य साक्षात्कार तेणें करून नाश पावलें आहे अज्ञान ज्यांचें असेजे अधिकारी ते – तत् अव्ययं पदं गच्छंति – म्हणजे त्या पूर्वोक्त नाश रहित किंवा जेथें जाऊन पुनः संसारांत येत नाहींत अशा वैष्णवाख्य ब्रह्मपदाप्रत जातात म्हणजे परब्रह्म स्वरूपच होतात. ॥ ५

**न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ॥ यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥**

आतां त्या प्राप्त होणाऱ्या पदाच्या स्वरूपाचें वर्णन करतात. ॥ यत् गत्वा ननिवर्तन्ते– म्हणजे ज्या ब्रह्म पदाप्रत जाऊन ज्ञानी संसारांत येत नाहींत. तत्–म्हणजे तें पद–सूर्यः नभासयते–म्हणजे सर्वांचा प्रकाशक सूर्य ही प्रकाशित करीत नाहीं असेंच पुढें ही आणावें. सूर्याचा अस्त झाल्यावर चंद्र ही प्रकाशक आहे तोही प्रकाश करील अशी शंका होईल तर तिची निवृत्ति होण्या साठीं सांगतात. न शशांकः–म्हणजे चंद्रही त्याचा प्रकाश करण्यास समर्थ होत नाहीं. चंद्र सूर्य दोघे नसले तरी अग्नीही प्रकाशक आहे तो प्रकाश करील अशा शंकेंचें निवृत्ति साठीं सांगतात. न पावकः–म्हणजे अग्नीही त्या पदांत प्रकाश करण्यास समर्थ होत नाहीं. सूर्य, चंद्र, अग्नि यांस त्या पदाचा प्रकाश करण्या विषयीं सामर्थ्य कां नाहीं अशा शंकेच्या निवृत्यर्थ सांगतात. ॥ तत् धाम परमं मम–म्हणजे, सकल आदित्यादि जड ज्योतींचें प्रकाश करणारें सर्वोत्कृष्ट स्वप्रकाश चैतन्यात्मक ज्योति रूप–माझें म्हणजे निरुपाधिक मत्स्वरूप तें पद आहे. माझें पद असा प्रयोग राहूचें शिर घटाचें स्वरूप या प्रमाणें अभेदा विषयीं आहे असें पूर्वीं सांगितलेंच आहे अथवा तत् पदं सूर्यो न भासयते– जें रूपवंत द्रव्य किंवा तदाश्रित रूपादिक गुण आणि–क्रियादिक तेंच चक्षुरिंद्रियांशीं संयुक्त झालें असतां चक्षूवर अनुग्रह करणारी–म्हणजे चक्षुरिंद्रियास ज्याचें प्रत्यक्ष करण्याची शक्ति देणारी सूर्य रूप देवता प्रकाशित करते ब्रह्म रूपादि रहित आहे यास्तव चक्षूनीं प्रत्यक्ष होण्या जोगें नाहीं यामुळें त्याचा अनुग्रह चक्षूवर करून तें चक्षु ब्रह्माचा प्रकाश करण्यास समर्थ होत नाहीं. हें उपलक्षण करून ब्रह्मावर रूपा प्रमाणें स्पर्शादिक गुण ही नाहीं यास्तव ब्रह्म सर्व बाह्येंद्रियांस अगोचर असें येणें करून सांगितलें– न शशांकः– जें मनानें चिंतन करण्यास किंवा प्रत्यक्ष होण्यास योग्य वस्तु त्याचा मनावर पूर्वोक्त अनुग्रह करणारी मनाची देवता चंद्र प्रकाश करतो ब्रह्म मनास अगोचर आहे असें श्रुतींत सांगितलें आहे, यास्तव मनाचे द्वारा त्यावर अनुग्रह करून ब्रह्माचा प्रकाश करण्यास चंद्र समर्थ नाहीं. येणें करून ब्रह्मास मनाचें अगोचरत्व सांगितलें. नपावकः– जें वाणीस गोचर आहे त्याचा वाणीची देवता अग्नि वाणीवर पूर्वोक्त अनुग्रह करून तिचे द्वारा प्रकाश करण्यास समर्थ होतो. ब्रह्म वाणीनें प्रतिपादन करण्यास अशक्य आहे असें श्रुतींत सांगितलें आहे यास्तव अग्नीही त्याचा प्रकाश करण्यास समर्थ नाहीं. येणें करून वाणीस गोचर ब्रह्म नाहीं असें सांगितलें– ज्या कारणास्तव चक्षुरादिक इंद्रियें, मन, वाणी यांस अगम्य आहे म्हणून स्थूल सूक्ष्म कारण स्वरूप जो देहादि प्रपंच त्याहून अतीत म्हणजे परमार्थतः तद्रहित प्रत्यक् आत्मस्वरूप अद्वय अंतः प्रज्ञ नव्हे बहिः प्रज्ञ नव्हे स्थूल नव्हे, अणु नव्हे, ह्रस्व नव्हे, दीर्घ नव्हे, अशा अर्थाच्या श्रुतीनीं सांगितलेलें सर्व विशेष रहित निर्ध-

र्मक वृत्ति रूप, अपर जन्य ज्ञानाहून भिन्न, उत्कृष्टचिद्रूप, स्वयं प्रकाश मद्रूप ज्योति आहे या कारणास्तव – यत्गत्वा – ज्याप्रत जाणून – ननिवर्तंते – जन्म मरण प्रवाह रूप संसार प्राप्त होण्यास कारण भूत अज्ञानाचा नाश झाल्यामुळें पुनः जन्म मरण रूप संसारांत येत नाहींत हें व्याख्यान जेव्हां हा जीव अदृश्य, अनात्म्य, अनिरुक्त, अनिलयन अशा या निरूपण करण्यास आरंभिलेल्या ब्रह्मस्वरूपाचे ठायीं अभय म्हणजे भयास कारण द्वैत दर्शन टाकून स्वात्मा भेदें करून प्रतिष्ठेप्रत पावतो म्हणजे स्वात्मत्वें करून त्या ब्रह्माप्रत जाणतो. नंतर तो जें प्राप्त झाल्यावर संसार भय नाहीं अशा मोक्षाप्रत जातो. ब्रह्मच होतो अशा अर्थाच्या ब्रह्म विदोपनिषदांतील श्रुत्यनुसारी आहे. त्या श्रुतींत अदृश्य या पदाचा दृष्टीला अगोचर आहे यामुळें पूर्वीं सांगितल्या प्रमाणें सूर्यानें प्रकाश होण्या जोगें नाहीं असा अर्थ आहे. अनात्म्य या पदाचा आत्मा म्हणजे मन त्यास गोचर तें आत्म्य आणि मनास गोचर नव्हे तें अनात्म्य असा अर्थ आहे. या प्रमाणें चंद्रानें ही प्रकाश होण्या जोगें नाहीं असें सिद्ध होतें. अनिलयन या पदाचा अर्थ ज्याचे ठायीं स्थूल सूक्ष्माचा लय होतो तें निलयन म्हणजे अज्ञान रूप कारण त्याहून भिन्न जें स्थूल-सूक्ष्म कारणात्मक सर्व प्रपंचातीत निर्विशेष स्वरूप ब्रह्म तें अनिलयन असा अर्थ होतो आणि असें आहे म्हणून अमुक प्रकारचें आहे असें निरूपण करण्यास अयोग्य वाणीला अगोचर असा अनिरुक्त पदाचा अर्थ आहे. यास्तव पूर्वोक्त रीतीनें अग्नीनें ही प्रकाश करण्यास अयोग्य असें सिद्ध होतें. सूर्यादिकांनीं प्रकाश करण्यास योग्य म्हणजे अर्चिरादि मार्गांनीं प्राप्त होणारें जें सत्यलोकादिपद त्याहून भिन्न जें सत्य लोकादिकांवर राहणारें जेथें सूर्यादिकांचा प्रकाश नाहीं असें अप्राकृत वैष्णव पद ज्यास वैकुंठ म्हणतात त्या पदाप्रत पावून पुनः जन्म-मरण प्रवाह रूप संसारांत येत नाहींत असें कोणी व्याख्यान करतात. त्या व्याख्यानांत "नरूपमस्येह तथोपलभ्यते" याचे व्याख्यानांत सांगितल्या प्रमाणें त्या पदास दृश्यत्वा मुळें (परिच्छिन्नत्वा मुळें) तुच्छत्व रूप मिथ्यात्व येईल अशा त्या पदाप्रत गेल्यावर मोक्ष होणार नाहीं. यास्तव पूर्वोक्त व्याख्यानच चांगलें.॥६॥

**ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः॥**
**मनः षष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति॥७**

"सर्वे क्षयांता निचयाः पतनांताः समुच्छ्रयाः॥" "संयोगा विप्रयोगांता मरणांतं हि जीवितं॥" संपादन केलेले जे अर्थांचे समुदाय किंवा अर्थांचे राशी ते सर्व क्षयांत आहेत म्हणजे त्यांचा नाश शेवटीं आहेच वरचे वरचे स्थानावर चढणें असे जे समुच्छ्रय ते पतनांत आहेत म्हणजे फार वर जरी आरोहण-

केलेले आहेत तरी ते शेवटीं खालीं पडतात. किंवा फार वर जे चढले ते लौकर पतन पावतात. आणि स्त्री पुत्र मित्रादिकांचे संबंध सर्व विप्रयोगांत आहेत. म्हणजे आपले मरणानें त्यांस आपला वियोग त्यांचे मरणानें आपणांस त्यांचा वियोग असा शेवटीं त्यां पासून वियोग होतोच. आणि जीवित मरणांत आहे म्हणजे प्राण धारण झाले म्हणजे प्राण वियोग रूप मरण शेवटीं आहेच. जन्मास येणारास मरण अवश्य शेवटीं आहेच असें शास्त्र आणि लोकानुभव आहे यावरून आणि जे स्वर्गास गमन करतात. ते पुनः परत येतात. या युक्तीवरून त्या ऊर्ध्वपदाप्रत जर जातात तर स्वर्गास गेलेले परत जसे येतात तसे तेही कधीं तरी परत येतीलच. जर परत येत नाहींत तर जातच नाहींत तेव्हां त्या पदाप्रत जाऊन परत येत नाहींत हें विरुद्ध दिसतें॥ जें शास्त्र वाक्य अनुमानादिक सांगितलें तें अनात्म्याप्रत गमन करण्या विषयींचें आहे परब्रह्म स्वरूप आत्म्याप्रत जे जातात म्हणजे त्या आत्म्याची प्राप्ति ज्यांस होते ते श्रुत्यादिकांचे प्रमाणा वरून परत येत नाहींत असें ही संभवत नाहीं. सुषुप्ति कालीं स्थूल सूक्ष्म देहादिक उपाधि परित्याग करून परब्रह्म स्वरूपाचे ठायीं लीन होऊन परब्रह्माप्रत गेलेले जीव पुनः संसारांत येतात. आणि जीव परमार्थतः परब्रह्म स्वरूपच जर आहे तर तो परब्रह्माप्रत जाऊन तेथून परत येत नाहीं हें ही संभवत नाहीं तद्रूपच असून त्याप्रत जातो हें कसें संभवेल अशी शंका करूं नये. गमन करणारा जीव ब्रह्मस्वरूपच आहे तो जातो असें जें सांगितलें तें ब्रह्मच असून ब्रह्माप्रत ही येतो. ब्रह्म वेत्ता ब्रह्मच होतो तूं ब्रह्मच आहेस अशा अनेक श्रुतींच्या आणि सर्व वेदांतील जीव ब्रह्मात्म्यैक्य सांगणाऱ्या सर्व महावाक्यांच्या तात्पर्यावरून राधेय होता तो कुंतीच्या उपदेशानें कौंतेय झाला किंवा कौंतेय स्वरूपाप्रत पावला. कंठमणी मला आज प्राप्त झाला या लौकिकांतील व्यवहारा प्रमाणें प्राप्त्यर्थक किंवा गमनार्थक धातूचा लाक्षणिक अर्थ घेऊन सांगितलें जसा कर्ण वस्तुतः कुंतीचा पुत्र असतां ही आपले त्या कौंतेय स्वरूपाचे अज्ञानानें राधेनें पालन पोषण केलें यावरून मी राधा पुत्र राधेयच आहें मी कौंतेय नव्हे अशा भेदभ्रमानें तदनुगुण सर्व पांडव द्वेषादिक व्यवहार करीत असतां ही तूं राधेय नव्हेस कौंतेय आहेस अशा कुंतीच्या उपदेशानें आपलें कौंतेय स्वरूपाचें यथार्थ ज्ञानानें भ्रम कारण अज्ञान निवृत्ति पूर्वक भेद भ्रम निवृत्ति त्याची झाली. या अर्थाची विवक्षा करून राधेय होता तो कौंतेय झाला किंवा कौंतेय स्वरूपाप्रत पावला असा लाक्षणिक प्रयोग लोकांत करतात तसाच कोणा पुरुषाचे गळ्यांतील रत्नमणि कंठांत आहे असें असतां ही अज्ञान कृत त्याचे विस्मृतीनें तो नष्ट झाला असा त्यास भ्रम होऊन तत्प्रयुक्त दुःख शोकादिक करणें तो कोठें आहे त्याची आपल्यास प्राप्ती व्हावी याविषयीं

त्याचा शोध करणें इत्यादिक व्यवहार करीत असतां कोणी आप्तानें तो मणी तुझे कंठांत आहे असा उपदेश केल्यावरून मणीनष्ट झाला अशा त्याच्या अज्ञानाचा नाश होऊन मला माझा मणी आज मिळाला असें बोलतो. त्या प्रमाणें अनादि, अज्ञानानें आपलें सच्चिदानंदाद्वयासंग प्रत्यग् स्वरूपाचे विस्मृतीनें देहादिकांवर तादात्म्य भ्रम होऊन मी कर्ता, मी भोक्ता, मी संसारी, मी सुखी, मी दुःखी, ब्रह्म नव्हे असा जो जीवास अनादि सिद्ध भ्रम आहे त्याची वेदांत वाक्योपदेशापासून ब्रह्मात्मत्व साक्षात्कारानें अनादि अज्ञाना सहित निवृत्ति होते याला क्षणि क्रार्थाच्या तात्पर्यानें त्या पदाप्रत जीव जातो तें पद त्यास प्राप्त होतें असें श्रुतींत आणि येथें म्हटलें ब्रह्मात्म तत्त्व वेत्ता ब्रह्माप्रत जातो, ब्रह्मरूप पदाप्रत जातो. अशा त्या म्हणण्याचा ब्रह्मच होतो किंवा मी ब्रह्म नाहें जीव आहें अशा भ्रमाची निवृत्ति होते असा अर्थ विवक्षित आहे. श्रुतींतील गमनार्थक धातूंचा तत्स्वरूपता प्राप्त होणें असा अर्थ श्रुतीचे व्याख्यान भूत जें ब्राह्मण त्यांत स्पष्ट लिहिला आहे. त्याचें उदाहरण लिहितों:- असता पासून मला सता प्रत-गमय-म्हणजे पोंचीव, तमा पासून मला ज्योती प्रत-गमय-म्हणजे पोंचीव. मृत्यूपासून मला अमृता प्रत-गमय-म्हणजे पोंचीव, अशा अर्थाची श्रुति आहे तिचा तोजें असता पासून सता प्रत मला पोंचीव असें बोलला. तें असत् म्हणजे मृत्यु सत् म्हणजे अमृत मृत्युपासून अमृता प्रत मला पोंचीव. म्हणजे अमृत परब्रह्मात्मक मला कर असें बोलला. तो जें तमा पासून मला ज्योती प्रत पोंचीव असें बोलला तें तम म्हणजे मृत्यु, ज्योति म्हणजे अमृत ब्रह्म त्याप्रत मला पोंचीव म्हणजे अमृत ब्रह्मस्वरूप मलाकर असें बोलला. तिसऱ्या बोलण्यांत अर्थ स्पष्टच म्हणजे पूर्वी प्रमाणें पोंचीव म्हणजे कर असा आहे. असा त्या श्रुतीचें व्याख्यान करणाऱ्या ब्राह्मणांत केला आहे. यावरून अविद्येचे ठायीं झालेला-ब्रह्माचा प्रतिबिंब रूप जीव अशामतें जलाचे ठायीं जो सूर्याचा प्रतिबिंब होतो त्याचें जसें जल नाहींसें झालें म्हणजे बिंबभूत सूर्याचे ठायीं हा आकाशस्थ-सूर्य, हा जलस्थ सूर्य अशा भेद भ्रमाची जी निवृत्ति तद्रूप गमन आणि पुनः पूर्वोक्त भ्रम न होणें एतद्रूप त्या पासून त्या जलांत पुनः परत येणें होत नाहीं त्या प्रमाणें किंवा अंतःकरण बुद्ध्याद्युपाधिक ब्रह्म चैतन्य जीव अशा मतीं-घटरूप उपाधीचा नाश झाला म्हणजे घटाकाशाचें जसें हा घटाकाश हा महाकाश अशा भेदभ्रमाची निवृत्ति होणें एतद्रूप महाकाशांत गमन आणि पुनः तो पूर्वोक्त भ्रम न होणें एतद्रूप पुनः त्या महाकाशा पासून परत न येणें-त्या प्रमाणें पूर्वोक्त मत भेदें करून जीव स्वरूपाचें अज्ञान किंवा मन बुद्ध्युपाधींचा नाश ज्ञानानें होऊन मी कर्ता, मी भोक्ता, मी दुःखी, मी सुखी, मी संसारी ब्रह्माहून भिन्न अशा भ्र-

माची जी निवृत्ति होणें तद्रूपनिरूपाधिक असंग अद्वितीय सच्चिदानंदात्मक ब्रह्मस्वरूप मोक्षपदाप्रत गमन आणि पुनः त्या भ्रमाची उत्पत्ति न होणें एतद्रूप त्या पदापासून पुनः अज्ञान कृत संसारांत न येणें असें जें सांगितलें तें विरुद्ध नाहीं सुषुप्ति कालीं स्थूल सूक्ष्म शरीरांचा लय होऊन पूर्वोक्त भ्रमनिवृत्तिरूप परब्रह्म प्राप्ति स्वरूप परब्रह्माप्रत गमन असलें तरी पूर्वोक्त भ्रमास कारण अज्ञान-आणि सूक्ष्म रूपानें मन बुद्ध्यादिक उपाधि यांचा नाश न झाल्यामुळें पूर्वोक्त भ्रम रूप अविद्या तत्कार्य मन बुध्यादि कृत संसारांत पुनः परत येणें होतें यास्तव कोणताही विरोध नाहीं हें सर्व पुढील श्लोकांत सविस्तर सांगतात तें असें " ममैवांशो-जीव लोके-" या श्लोकाचे अर्धानें ब्रह्मस्वरूपाच्या अज्ञाननिवृत्तीनें पूर्वोक्त भ्रम निवृत्ति होऊन ब्रह्म स्वरूपाप्रत पावलेला जो जीव त्याची पुनः त्या स्वरूपापासून निवृत्ति होत नाहीं असें सांगतात. सुषुप्तिकालीं सर्व कार्याचें सूक्ष्मरूप जें अज्ञान तें आहे यामुळें सुषुप्तींत जीवास ब्रह्मप्राप्ति झाली तरी पुनः त्यापासून संसारांत परावृत्ति होते असें- मनःषष्ठानींद्रियाणि - येथून दीड श्लोकानें सांगतात. तो जीव वस्तुतः देह संबंध रूप संसार रहित हे तरी अज्ञान्यानीं मायाकृत देहादि संसाराप्रत पावून देहाशीं तादात्म्याप्रत पावविला आहे त्याचा देहाहून भेद -" शरीरं यदवाप्नोति" या श्लोकाचे अर्धानें सांगतात. "श्रोत्रं चक्षुः स्पर्शनंच" इत्यादिकें करून त्या त्या - शब्द रूपादि विषयां कडे त्यात्या श्रोत्र चक्षुरादिक इंद्रियांस मन बुद्धीचे द्वारानें प्रेरक जो जीव त्याचा आणि त्यात्या इंद्रियांचा भेद सांगतात. अशा देहेंद्रिया दिकांहून भिन्न स्वात्म स्वरूप जीवाप्रत प्राणोत्क्रमण समयीं सर्व कां पहात नाहींत अशी शंका होईल तर तिचे निवृत्ती साठीं देहेंद्रिया दिकां हून भिन्नत्वें करून जाणावयास-योग्य जीव स्वरूप आहे तथापि विषयांचे ठायीं ज्यांचें चित्त विक्षिप्त झालें आहे असें अज्ञानानें मरण समयीं त्याप्रत पहात नाहींत असें-" उत्क्रामंतं स्थितं वापि-" या श्लोकानें सांगतात. त्यांत जे ज्ञानचक्षू आहेत ते पहातात. असें जें सांगितलें त्याचेंच स्पष्टीकरण-" यतंतो योगिनश्चैनं-" या श्लोकार्धानें केलें. अज्ञानी पहात नाहीं असें जें सांगितलें त्याचेंच स्पष्टीकरण-"यतंतो प्यकृतात्मानः-" या श्लोकार्धानें केलें. अशी " ममैवांशो जीव लोके "- येथून पांच श्लोकांची संगति आहे. त्या श्लोकांच्या पदांचा अर्थ लिहितों. " ममैवांशो जीव लोके जीवभूतः सनातनः- म्हणजे जल आदिक उपाधीचे योगानें जलांतील सूर्य, आदर्शांतील सूर्य अशा मिथ्या भेदानें युक्त आकाशांतील बिंब भूत सूर्याचे अंशा प्रमाणें जल प्रतिबिंबित, आदर्श प्रतिबिंबित सूर्य जसा आहे. घटरूप उपाधीनें घटाकाश. महाकाश या मिथ्या भेदानें युक्त घटाकाश महाकाशाच्या अंशा प्रमाणें जसा आहे त्याप्रमाणें अनादि अविद्येच्या आवरणामुळें देहादिक-

उपाधीच्या तादात्म्याला पावून परमार्थतः असंगाद्वितीय, अकर्ता, अभोक्ता, सच्चिदानंद स्वरूप असतांही प्राण धारणारूप उपाधीनें जीवांच्या लोकीं म्हणजे संसाराचे ठायीं किंवा देहाचे ठायीं कर्ता, भोक्ता, संसारी अशा मिथ्या भूत परमेश्वर भिन्नत्वामुळें प्रसिद्धी पावलेला उपाधीनीं परिच्छिन्न झालेला असला तरी वस्तुतः परमात्मस्वरूपत्वास्तव सनातन म्हणजे नित्य निरंश जो मी परमात्मा त्याचा अंश म्हणजे अंश नसतांही अंशा प्रमाणें भासणारा आहे. अंश असें अवयवाला, भागाला, एकदेशाला म्हणतात. हा अंशांशिभाव निरंश निरवयव परब्रह्मास वास्तविक संभवत नाहीं; कल्पित उपाधीनें परब्रह्मास जीव स्वरूपाहून पृथक् केल्यामुळें संभवतो. या उपाधीचा नाश झाला म्हणजे पूर्वीं सांगितल्या प्रमाणें ज्ञानानें भेद भ्रमाची निवृत्ति होऊन स्वस्वरूप ब्रह्मा मत पावून पुनः तेथून परत येत नाहीं. तो जीव सुषुप्तींत परब्रह्म स्वरूप पावून पुनः संसारांत कसा येतो तें सांगतात. ॥ मनः षष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति- म्हणजे मन आहे सहावें ज्यामध्यें अशी जागृदवस्था व स्वप्नावस्था या दोन अवस्थांचे ठायीं भोग देणाऱ्या कर्माचा क्षय झाला असतां अज्ञान रूप प्रकृतीचे ठायीं सूक्ष्म रूपानें स्थित झालेलीं जीं श्रोत्र, त्वक्, चक्षु, रसन, घ्राण एतन्नामक पांच ज्ञानेंद्रियांस पुनः जागृदवस्थेंत भोग देणारें कर्म उदयास आलें म्हणजे सुखदुःखानुभव रूप त्याचे फलाचा भोग करण्यासाठीं जीव आकर्षण करतो व तो लीन झालेला विषय भोग करण्यास योग्य रूपांनीं पुनः संसारांत प्रगट होतो. यास्तव ज्ञानानें अज्ञान नाशामुळें संसाराचे ठायीं पूर्वोक्त अनावृत्ति असली तरी सुषुप्तिकालीं अज्ञान आहे यास्तव पूर्वोक्त पुनरावृत्ति संभवते. हें उपलक्षण करून कर्मेंद्रियें, प्राण यांस ही आकर्षण करतो. ॥ ७॥

## शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ॥
## गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥ ८

कोणते कालीं आकर्षण करतो तें सांगतात. ईश्वरः यत् शरीरं उत्क्रामति- म्हणजे देहेंद्रिय संघाताचा स्वामी जीव ज्या कालीं शरीर टाकून बाहेर गमन करतो. च यत् शरीरं अवाप्नोति- आणि जेव्हां पूर्व शरीराचा त्याग करून दुसरें शरीर पावतो. तेव्हां- एतानि गृहीत्वा संयाति- या पूर्वोक्त मना सुद्धां सकल इंद्रियें आणि प्राण यांस घेऊन उत्तम प्रकारानें म्हणजे पुनः त्या शरीरांत परत न येतां गमन करतो. शरीर ठेवून त्यांतील मन आणि इंद्रियें यांस घेऊन जातो याविषयीं दृष्टांत सांगतात. ॥ वायुः आशयात् गंधानिव- जसा वायू जेथें गंध राहतो अशा पुष्पादिका पासून पुष्प ठेवून त्यावरील जे गंध युक्त अवयव त्यांस घेऊन दुसरे ठिकाणीं गमन करतो तद्वत्. ॥ ८ ॥

**श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ॥ अधिष्ठाय मनश्चाऽयं विषयानुपसेवते ॥ ९॥**

ज्यांस घेऊन जातो तीं इंद्रियें कोणतीं आणि त्यांस कशा करितां घेऊन जातो तें सांगतात. श्रोत्रं-चक्षुः-स्पर्शनं म्हणजे स्पर्श घेणारें किंवा समजणारें त्वगिंद्रिय, रसन, घ्राण आणि मन यांचा अधिष्ठाय अयं विषयान् उपसेवते-म्हणजे आश्रय करून किंवा त्यांप्रत व्यापार करून शब्दादिक जे विषय त्यांप्रत हा जीव अनुभवितो किंवा विषयांचा प्रकाश स्वरूप चैतन्यानें करतो. ॥ ९॥

**उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितं ॥ विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः ॥१०॥**

असें जर आहे तर देहेंद्रिया दिकांच्या समुदाया हून भिन्न असा जो शरीरा पासून मरण कालीं निघून जाणारा जीव त्याला सर्व कां पहात नाहींत असें म्हणेल तर त्या विषयीं सांगतात. म्हणजे स्वतः गमनागमन क्रिया रहित असतां ही घटाचे गमनानें गमन करणाऱ्या घटाकाशा प्रमाणें पूर्व देहा पासून दुसरे देहांत गमन करणाऱ्या लिंग देहात्मक प्राण बुद्धि मन इंद्रियांच्या गमनें करून त्यावरील तादात्म्याभिमान वासनेनें गमन करणारा स्थितं वापि- आणि पूर्व देहाचे ठायीं घटाचे स्थितीनें राहणाऱ्या घटाकाशाप्रमाणें त्या प्राण — बुद्धि मन इंद्रियांच्या स्थितीनें राहणारा, वा भुंजानं- आणि त्याच देहाचे ठायीं त्या प्राणा दिकानें केलेले विषयांच्या भोगानें शब्दादिक विषयांचे द्वारा सुख दुःखानुभवात्मक भोग करणारा- गुणान्वितं- घट गुणानें किंवा जलादिगत गुणानें युक्त होऊन भासणार घटाकाश जल सूर्या प्रमाणें प्राण मन बुद्धि इंद्रियांवरील सुख दुःख मोहात्मक सत्व, रज, तम - या गुणानीं युक्त होऊन भासणारा या प्रमाणें सर्वावस्थांचे ठायीं दर्शन योग्य असतां ही या जीवाप्रत- विमूढा नानुपश्यंति- दृष्टा दृष्ट विषयांचे भोगाकडे ज्यांचें चित्त आसक्त झालें आहे असें आत्मानात्म विवेक रहित ते मरण समयीं जीव शरीर सोडून जातो असें पाहात नाहींत अथवा स्वतः गमनागमन रहित असतां ही प्राण मन इंद्रियांचीं गमनागमनें देह सोडून जाणारा किंवा देहांत येणारा आहे अशा त्याचें वास्तविक स्वरूपाप्रत पाहात नाहींत. पश्यंति ज्ञानचक्षुषः- वेदांत प्रमाणा पासून आत्मानात्म विवेक ज्ञान रूप चक्षु ज्यांस प्राप्त झालें आहे असे विवेकी जीव मरण कालीं शरीर सोडून जातो असें पाहातात किंवा उपाधि जे प्राणादिक तेच जातात. उपहित (उपाधि युक्त) जें जीव स्वरूप तें जात नाहीं असें पाहातात असें तात्पर्य. ॥ १०॥

यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितं॥
यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः॥११

ज्ञानचक्षूनीं पाहातात असें जें सांगितलें तें स्पष्ट करतात. ॥ यतंतः योगिनश्च आत्मनि अवस्थितं एनं पश्यंति-म्हणजे बुद्धिरूप उपाधीचे ठायीं प्रतिबिंब पावलेला किंवा बुद्धिरूप उपाधीनें असंग ब्रह्माहून कर्ता भोक्ता संसारी असा पृथक् त्वें करून भासविलेला असा जो वस्तुतः असंग ब्रह्म स्वरूप जीव त्यास ध्यानादिकें करून आत्मदर्शनार्थ प्रयत्न करणारे योगीच उपाधितादात्म्याभिमानानें मरण काळीं देह सोडून गमन करतो असें पाहातात. किंवा गमनागमन क्रिया रहित असंग स्वरूप आहे असें पाहातात. आतां विमूढ पाहात नाहींत असें जें सांगितलें तेंच स्पष्ट करतात. यतंतः आणि अकृतात्मानः अचेतसः एनं न पश्यंति -म्हणजे कर्मादिकांनीं ज्यांचें चित्त शुद्ध झालें नाहीं याच कारणास्तव ज्यांस चित्ताचा जय नाहीं. असे पाषाणतुल्य विवेक रहित या आत्म्याप्रत पूर्वोक्त प्रमाणें पाहात नाहींत. अथवा-"क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि-" येणें करून सर्व क्षेत्रांचे ठायीं क्षेत्रज्ञ म्हणजे जीव मीच आहें असें पूर्वी तूं सांगून आतां आपलें स्वरूप सूर्यादिकांस ही प्रकाश करण्यास योग्य नाहीं असें स्वप्रकाश ज्योतिस्वरूप आहे असें सांगतोस असें आहे तर-क्षेत्रज्ञ जीव स्वरूप जो तूं यास घटादिकांचे प्रकाशा विषयीं सूर्यादिकांचे प्रकाशाविषयींची कां अपेक्षा आहे सूर्य दीपरूप ज्योतीला आपले विषय प्रकाशित करण्या विषयीं दुसरे ज्योतीची अपेक्षा जशी दिसत नाहीं त्याप्रमाणें स्वयंप्रकाश ज्योति क्षेत्रज्ञ रूप जो तूं त्यास घटादि विषय प्रकाश होण्या साठीं सूर्यादिकांची अपेक्षा असूं नये अशा शंकेची निवृत्ति होण्या साठीं-"ममैवांशो जीव लोके-" इत्यादिक तीन श्लोकांनीं सांगतात ॥ यत् ईश्वरः शरीरं अवाप्नोति - तो परमात्मा या सर्व शरीराचे ठायीं नखाग्रा पासून व्याप्त झालेला आहे. परमात्मा या शरीरादिक प्रपंच किंवा जगाची सृष्टी करून त्या सृष्टीप्रत प्रवेश करता झाला. त्या माझ्या जीव स्वरूपानें मी या जगाचे नामरूपानें व्याकरण करीन म्हणजे याचें नाम हें स्वरूप हें अशा व्यवहारास योग्य हें जग करीन अशा अर्थाच्या अनेक श्रुतींचे प्रमाणा वरून - यत् यस्मात् कारणात् ज्या कारणास्तव जगाचा स्रष्टा ईश्वरच शरीर पावतो म्हणजे शरीरधारी आहे. आणि- यत् च अपि उत्क्रामति - अपि शब्द एव या अर्थी च शब्द समुच्चयार्थी - आणि ज्या कारणास्तव या शरीरांतून कोण गेला असतां मी गमन करीन. कोण या शरीरांत स्थित असतां स्थिती पावेन असें आलोचन करून तो परमात्मा प्राणास उत्पन्न करता झाला अशा

अर्थान्‍च्या श्रुतीचे प्रमाणावरून प्राण धारण रूप उपाधीनें मरण कालीं या शरीरा पासून ईश्वरच गमन करतो या दोहों कारणानीं- जीवलोके- या देहादि स्वरूप संसाराचे ठायीं - जीव भूतः - प्राणरूप उपाधीनें युक्त प्राणी ज्यास म्हणतात असा-सनातनः - सर्वदा अविकारी एकरूपानें राहिलेला - ममैव अंशः - माझाच अंश म्हणजे अंशा प्रमाणें आहे, तो मीच आहें असें न सांगतां तो माझाच अंश आहे असें जें सांगितलें आणि जीव जर ईश्वरच आहे तर जीवाच्या संसारानें ईश्वर ही संसारी जीवाच्या सुख दुःखानें ईश्वरास ही सुख दुःख किंवा सुख दुःखानुभव होईल आणि सर्व शरीरांत जीव रूप परमेश्वरच एक आहे तर ऋतुकालीं स्वस्त्रीशीं गमन करावें, परस्त्रीशीं गुरुस्त्री स्त्रीशीं गमन करूंनये यज्ञार्थ पशूंची हिंसा करावी. यज्ञार्थी शिवाय दुसरे प्राण्यांची हिंसा करूंनये असे वैदिक विधिनिषेध नसेच मित्राशीं स्नेह संबंध करून त्याचें सेवन करावें. शत्रूशीं स्नेह संबंध करूंनये, शत्रूचें अन्न भक्षूंनये असे लौकिक विधिनिषेध आहेत यांची उपपत्ती कशी होईल आणि जीवांनीं परमात्म्याचा शोध करावा. त्याच्या ज्ञानाविषयीं विचार करावा. ईश्वर सर्वांतर्यामी सर्व जीवांचा शास्ता नियंता आहे. शरीर रूप वृक्षाचे ठायीं जीव आणि ईश्वर हे दोन परस्परांचे सखे पक्षी आहेत. त्यांतील एक जीव कर्म फलोपभोग करतो आणि एक कर्म फल न भोगणारा त्याचा साक्षिभूत राहतो- अशा अर्थाच्या श्रुतींनीं जो भेद जीवाचा आणि ईश्वराचा सांगितला आहे त्याची उपपत्ति कशी होईल किंवा उपपत्ति होणार नाहीं. अशा शंकेचे निराकरणार्थ सांगितलें त्याचें तात्पर्य - जसा सूर्याचा किंवा चंद्राचा प्रकाश आकाशाला व्यापून निर्विकार स्वरूपानें वस्तुतः विद्यमान असतां ही वक्र किंवा सरळ किंवा वाटोळे, दीर्घ, ऱ्हस्व, गुल्म, वृक्ष, लता, वल्लींचे संबंधानें वक्रता, सरलता, वर्तुलता, दीर्घता, ऱ्हस्वता, अशा स्वरूपाला पावून हा वक्र, सरळ, वर्तुल, प्रकाश अशा भेदानें किंवा भेद व्यवहारानें युक्त होतो. किंवा घर, शराव, रांजण यांतील जलाचे ठायीं प्रतिबिंबित सूर्य वस्तुतः चलनादि क्रियादिकांनीं रहित एक असतां ही उपाधि भूत जलाचे चांचल्य स्थिरत्वादि धर्मानीं युक्त होऊन हा सूर्य कंपित किंवा हा सूर्य स्थिर अशा चांचल्यादि धर्मानीं आणि चंचल स्थिर या भेदानें किंवा भेद व्यवहारानें युक्त होतो तथापि वस्तुतः सूर्यादिकाचा प्रकाश वक्रतादि धर्मरहित एकच आहे. सूर्य चांचल्यादि क्रियारहित एकच आहे ते धर्म आणि भेद उपाधी वरील आहेत त्यांचा संबंध त्या प्रकाश सूर्यादिकांवर नाहीं. या प्रमाणें परमात्मा असंग अद्वितीय सच्चिदानंदाद्वय स्वरूप एकच असतां ही स्वरूपाज्ञानस्वरूप मूला विद्या कल्पित देहेंद्रियादिकांचे ठायीं अविद्या रूढ स्वस्वरूपाचे विस्मृतीनें झालेल्या अविवेकानें तादात्म्याभिमान धरून अविद्या कल्पित देहेंद्रिया वरील संसार

कर्तृत्व भोक्तृत्व सुख दुःखादि धर्म आपलेवर मानून मी ईश्वर नव्हे अस्वतंत्र संसारी सुखी आहें अशा अभिमानानें त्या धर्मांनीं आणि ईश्वर भेदानें युक्त किंवा व्यवहारानें युक्त होतो. आणि देहेंद्रिया दिकांवरील सुख दुःखांप्रत त्यांवर तादात्म्याभिमाना मुळें अनुभवितो. या प्रमाणें पुत्र मित्रा दिकां विषयींचे किंवा त्यांस होणारे सुख दुःखा दिकांप्रत पुत्रमित्रादिक मीच आहें किंवा माझे आहेत. असा त्यांवरील जो स्वकीय त्वाभिमान त्याचे भ्रांति मुळेंच पुत्रमित्रादिक सकल विकल झाले असतां मीच संपन्न किंवा आपत्तिग्रस्त आहें असें अनुभवितो आणि पुत्रमित्रादि मंत बहुत. बसले असतां पुत्र किंवा मित्र मरण पावला असा कोणी घोष केला तर माझा पुत्र आहे, माझा मित्र आहे असा ज्यांस अभिमान आहे त्यांसच तन्निमित्तक दुःख उत्पन्न होतें. हा अन्वय तो अभिमान ज्यांस नाहीं असे जे विरक्त परिव्राजक संन्यासी त्यांस उत्पन्न होत नाहीं हा व्यतिरेक असा अन्वय आणि व्यतिरेक निश्चित आहेत यामुळें मिथ्याभिमान भ्रम निमित्तकच सुख दुःखानुभव आहे असें निश्चित आहे यास्तव अविद्या कल्पित देहादिको पाधीनें ईश्वराहून कल्पित अंशांशि भावानें भिन्नत्वा प्रत पावलेला जो जीव त्याचे संसारानें किंवा सुख दुःख संबंधानें ईश्वर संसारी किंवा दुःखी सुखी होत नाहीं. श्रुत्युक्त विधि किंवा निषेध आणि ईश्वर नियंता जीव नियम्य अशा भेदाची उपपत्ती ही अविद्या कल्पित भिन्न भिन्न देहादिक उपाधिकृत परस्पर जीव भेद आणि जीवेश्वर भेद मूलक आहे. ती अशी:– सर्व शक्ति व्यापक मायारूप उत्कृष्टोपाधिक चैतन्य रूप परमेश्वर जीवांचा नियंता, मायोपाधीहून निकृष्ट परिच्छिन्न अल्प बुध्यादिक उपाधीनें युक्त चैतन्य रूपजीव नियम्य. विवाहित स्त्रीरूप शरीरोपाधीनें क्षेत्रज्ञ परमेश्वराहून भिन्न जी स्वस्त्री ती विषयीं ऋतुकालीं गमन करावें असा विधि, परस्त्री गुरुपत्नी रूप क्षेत्रज्ञ ईश्वराहून निराळ्या परस्त्रिया त्याशीं गमन करूं नये अशा निषेधास विषय आणि परस्पर देहेंद्रियादिक संघात रूप उपाधि भिन्न आहेत यामुळें तदुपाधिक जीव स्वरूपें ही भिन्न भिन्नच आहेत यामुळें ही पूर्वोक्त विधिनिषेध आणि यज्ञांत पशूची हिंसा करावी दुसऱ्या प्राण्याची हिंसा करूं नये अशा विधि निषेधांची उपपत्ति होते. भिन्न भिन्न देहादि संघात संबंधोपाधि कृत परस्पर जीवांचा भेद आणि उत्कृष्टोपाधि निकृष्टोपाधिकृत जो जीव आणि ईश्वर यांचा भेद आणि ईश्वराचा अंश जीव असा जो अंशांशि भाव तो सर्व अग्नी पासून जसे क्षुद्र म्हणजे अल्प परिमाणाचे स्फुलिंग म्हणजे ठिणग्या निष्पन्न होतात त्याप्रमाणें या परमात्म्या पासून सर्व जे जीव निष्पन्न होतात किंवा निघतात अशा अर्थाच्या श्रुतींत सांगितलेलें अग्नि आणि त्याचे स्फुलिंगांचे भेदा प्रमाणें किंवा अंशांशि भावा प्रमाणें आहे. जसा वन्हि एकच असून त्यावरील भेद किंवा परिमाण प्रत्यक्ष दिसत नसलें तरी लोह काष्ठा दि-

यांचे अंगारादिक रूप उपाधी वरील हा अग्नि याहून भिन्न हा याचा अंश स्फुलिंग याहून अल्प परिमाण असा भेद आणि अंशांशिभाव त्या पूर्वोक्त उपाधीनें युक्त अग्नीवर कल्पित आहे त्या प्रमाणें स्थूल नव्हे, अणु नव्हे, दीर्घ नव्हे, न्हस्व नव्हे अशा अर्थाच्या श्रुतीचे प्रमाणा वरून च्यार प्रकारच्या परिमाण शून्य ब्रह्माचा अल्पपरिमाण जीव अंश असा अंशांशि भावरूप भेद आणि परमात्मा मोठा जीव अल्प अशीं महत्व अल्पत्वें माया, बुद्धि, मन आदिक उपाधीं वरील त्यांवर कल्पिलेलीं आहेत. वास्तविक नाहींत. परमार्थतः जीव ब्रह्मच आहे यास प्रमाण हा परमात्मा बुद्धीवरील आरेच्या अग्रभागा प्रमाणें अल्पपरिमाण रूप जो गुण तेणें करून जीव रूपानें अल्पपरिमाण हा अनुभवास येतो. या परमेश्वराहून द्रष्टा, श्रोता, मंता जीव अन्य नाहीं. दश म्हणजे कैवर्तक त्यास कोळी म्हणतात. कितव म्हणजे द्यूतक्रीडा करणारे हे सर्व ब्रह्मच आहेत. येणें करून असे हीन जंतू ही ब्रह्मस्वरूप आहेत अशी सर्व जीवांस ब्रह्म भावाची सीमा केली अशा अर्थाच्या श्रुती आणि महावाक्यें प्रमाण आहेत. आणि निरवयव परमात्म्यास वास्तविक अंश आहे अशी कल्पनाही संभवत नाहीं जर वास्तविक अंश परमात्म्याचा जीव आहे तर देहावयव हस्त पादादिकांस सुख दुःख झाल्यानें देहास सुख दुःख जसें होतें तसें जीवांस दुःख सुखादिक झाल्यामुळें ईश्वरास सुख दुःख होईल या कारणास्तव जीव परमेश्वराचा मुख्य अंश नसतांही अंशाप्रमाणें उपाधि संबंधानें भासला आहे. जसा घटाकाश महाकाशाचा अंश जल सूर्य सूर्याचा अंश प्रकृतिस्थानी निरंतर विषय ग्रहण करणें असें जें विषया सक्तत्व तद्रूप जी प्रकृति म्हणजे विषयांचा स्वभाव त्याचे ठायीं स्थित अशीं जीं - मनःषष्ठानींद्रियाणि - मनासहित पूर्वोक्त पंच ज्ञानेंद्रियें त्यांप्रत - कर्षति - सुषुप्ती प्रळय समाधि काळीं आवरतो. यास दृष्टांत - वायुर्गंधानिवाशयात् - याचा पूर्वोक्तच अर्थ - कोणतीं तीं इंद्रियें आणि तीं आकर्षण करून घेऊन काय करतो तें सांगतात. श्रोत्र, चक्षु स्पर्शन म्हणजे त्वगिंद्रिय, रसन, घ्राण, यांप्रत - गृहीत्वा - म्हणजे व्यापारयुक्त करून - विषयान् उपसेवते - म्हणजे शब्दादिक विषयांचा प्रकाश करतो असा दीप आपले स्थिती साठीं तैल वात यांची अपेक्षा करीत असतां आपले गोचर झालेले जे विषय त्यांचा प्रकाश करण्या विषयीं आपणच प्रधान आहे या प्रमाणें मदंश जीवास चक्षुरादि इंद्रिय द्वारा अंतःकरणाची विषयाकारजी वृत्ति तद्रूप विषय संबंध आपल्याशीं होण्या साठीं मन इंद्रियें सूर्यादिकांची अपेक्षा असली तरी घटादिकांचा प्रकाश आपले स्वप्रकाश ज्योति स्वरूपानेंच करतो. तदर्थ सूर्यादिकांची त्यास अपेक्षा नाहीं असें तात्पर्य पुढील दोन श्लोकांनें व्याख्यात पूर्वी केलेलेंच आहे. ॥११॥

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ॥-**
**यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥१२॥**

आतां जें पद दुसऱ्या प्रकाशानें प्रकाश पावणारें नसून अपरोक्ष असें जें स्वप्रकाश ज्योतिस्वरूप सर्वांस प्रकाश करणारें आदित्यचंद्र आदिक ते ज्याचा प्रकाश करण्यास समर्थ होत नाहींत. मुमुक्षु ज्या पदाप्रत पावून पुनः संसारांत येत नाहींत. घटाकाशादिक जसे महाकाशाचे अंश त्या प्रमाणें देहादिक उपाधि निमित्तक ज्याच्या मिथ्या अंशांशिभाव भेदानें युक्त झालेले जीव संसाराप्रत अनुभवितात. त्या परम ब्रह्मस्वरूप पदाला सर्वात्मत्व सर्व व्यवहारानें आस्पदत्व दाखवून "ब्रह्मणोहि प्रतिष्ठाहं-" येथें करून सांगितलेला जो अर्थ त्याचें चार श्लोकांनीं व्याख्यान करून आपल्या विभूति संक्षेपानें भगवान् सांगतात- यत्-आदित्य गतं तेजः-म्हणजे जें आदित्याचे ठायीं स्थित पूर्वोक्त स्वप्रकाश ज्योतिरूप चैतन्य-यच्चंद्रमसि यच्च अग्नौ-म्हणजे जें चंद्राचे ठायीं व अग्नीचे ठायीं स्थित पूर्वोक्त चैतन्य-अखिलं जगत् भासयते-म्हणजे सर्व जगाचा प्रकाश करतें अथवा आदित्यादि पदानें चक्षुरादिक इंद्रियांच्या सूर्यादिक देवता आणि चक्षुरादिक इंद्रियें घ्यावीं. चक्षुरादिक बाह्य करणाच्या देवता आणि चक्षुरादिक जीं इंद्रियें त्यांचे ठायीं आणि मन आणि त्याची देवता चंद्र याचे ठायीं बाह्यरूपादिक विषय आणि आंतर विषय सुखदुःखादिक यांचे प्रकाशन सामर्थ्य जें आहे तें-मामकं- मत्स्वरूपच आहे. स्थावर जंगमात्मक सर्व जगाचे ठायीं स्वयंज्योति ब्रह्म चैतन्य जरी समानच आहे तथापि मुख सन्निधीस असणाऱ्या काष्ठ पाषाणादिकांचे ठायीं मुखाचा प्रतिबिंब होत नाहीं. आदर्शाचे ठायीं प्रतिबिंब होतो. आदर्शांत ही स्वच्छ मलिनता तारतम्यानें स्वच्छ मलिन प्रतिबिंब होतो. याप्रमाणें आदित्यादिकांचे ठायीं दुसऱ्या पेक्षां प्रकाशक सत्वगुणाचे उत्कर्षामुळें त्याचे ठायीं विशेषें करून प्रकाशक स्वयंज्योति चैतन्याची अभिव्यक्ति आहे यास्तव- यदादित्यगतं तेजः यच्चंद्रमसि यच्चाग्नौ- असें म्हटलें. जें आदित्यादिस्थित तेज तें-मामकं- म्हणजे माझें इतक्यानेंच निर्वाह होत असतां पुनः-मामकं तेजः- असें जें म्हटलें त्यावरून जें आदित्यस्थ तेज म्हणजे परप्रकाशन समर्थ सितभास्वर रूप सर्व रूपवंत वस्तूंचें प्रकाश करतें तसेंच चंद्राचे ठायीं, अग्नीचे ठायीं जें पूर्वोक्त सर्व जगाला प्रकाश करणारें तेज आहे तें माझें असें जाण अशा आपले विभूतींचें कथन रूप दुसराही अर्थ येथें करावा. ॥१२

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ॥**

## पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः॥१३

केवल आदित्यादिगत पूर्वोक्त तेज किंवा प्रकाशन सामर्थ्यच माझें असें नाहीं. पृथिव्यादि स्थित सर्वभूत धारण करण्याचें ओषधींनें आप्यायन करण्याचें इत्यादिक जें सामर्थ्य तेंही माझेंच असें सांगतात.–च गां आविश्य–म्हणजे पृथ्वींत पृथिव्यभिमानी देवता स्वरूपानें प्रवेश करून–ओजसा अहं भूतानि धारयामि–म्हणजे आपले बलें करून पृथिवी मत दृढ करून पृथ्वीवर राहणाऱ्या भूतां मत मी धारण करतों. मी जर पृथ्वीप्रत आपले बलानें दृढ न करीन तर पृथिवी शिथिलावयव होऊन मुठींत धरलेले वाळूप्रमाणें विशीर्ण होईल. म्हणजे खालीं गळून पडेल किंवा अधो भागीं बुडेल. यास प्रमाण ज्या परमेश्वराचे योगानें द्यौः म्हणजे अंतरिक्ष आणि पृथ्वी हीं दृढ झालीं आहेत अशा अर्थाचा वेदांत मंत्र आहे. रसात्मकः सोमो भूत्वा ओषधीः पुष्णामि–म्हणजे आणि मीच जलमय किंवा सर्व रसमय सोम म्हणजे चंद्र होऊन व्रीहि यवादिक सर्व ओषधींप्रत पुष्ट करतों किंवा स्वादुरस युक्त करतों. अमृतमय किरणांचे योगानें चंद्रापासून सर्व ओषधी पुष्ट होतात. असें लोकशास्त्र प्रसिद्ध आहे.

## अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः॥
## प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम्॥१४

अहं वैश्वानरो भूत्वा–म्हणजे जो पुरुषाचे शरीरांत जाठराग्नी आहे. तो वैश्वानर परमेश्वर आहे तेणें करून भक्षण केलेल्या अन्नाचें पचन होतें अशा अर्थाच्या श्रुतींत प्रतिपादन केलेला मी परमेश्वरच वैश्वानर म्हणजे जाठराग्नी होऊन–प्राणिनां देहं आश्रितः प्राणापान समायुक्तः सन्–म्हणजे सर्व प्राण्यांचे देहांत स्थित होऊन आणि प्राण आणि अपान वायु यानीं उद्दीपन पावलेला–असा होऊन–चतुर्विधं अन्नं पचामि–म्हणजे प्राण्यानीं भक्षण केलेल्या भक्ष्य, भोज्य, लेह्य, चोष्य या भेदानें चारप्रकारचे अन्नाचें पचन करतों. जें दंतानींच तुकडे तुकडे करून चावून खातात अपूपादिक तें भक्ष्य त्यासच चर्व्य असेंही म्हणतात. जें केवल जिव्हेनेंच तोंडांत फिरवून गिळतात. वरणभात इत्यादिक तें भोज्य. जें जिव्हेवर ठेवून रसाचा स्वाद घेऊन गिळतात असें जें कांहीं पातळ पायस शिकरण इत्यादिक तें लेह्य. जें दंतांनीं चावून त्यांतील रस गिळून चोथा अवशिष्ट टाकितात असे जे उंसाचे करवे इत्यादिक ते चोष्य. येणें करून सर्वत्र जी जी शक्ति दिसते ती माझीच आहे आणि भोक्ता जो तो वैश्वानर अग्नि–जें भोज्य अन्न तें सोम. हे भोक्ता आणि भोज्य मिळून अग्नीषोम आहेत अशा ध्यान-

करणारास अन्य दोषांचा लेप होत नाहीं असें जाणावें. ॥१४

**सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञान-मपोहनंच ॥ वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदांत-कृद्वेदविदेव चाहं ॥१५॥ ॥ ॥ ॥**

सर्वस्य च अहं हृदि सन्निविष्टः—म्हणजे ब्रह्मादि स्थावरांत सर्व प्राण्यांचा मी आत्मा होत्साता हृदि म्हणजे बुद्धीचे ठायीं स्थित आहें.—मत्तः स्मृतिः—म्हणजे मी जो आत्मा त्यापासून जे योगी नव्हेत त्यांस या जन्मीं ज्यांचा पूर्वी अनुभव झाला आहे त्याचें स्मरण जे योगी आहेत त्यांस पूर्वजन्मीं हा ज्यांना अनुभव झाला असतो त्याचें या जन्मीं ही स्मरण आणि ज्ञानं म्हणजे जे योगी नव्हेत त्यांस विषय आणि इंद्रियें यांचा जो संबंध त्यापासून होणारें अनुभवात्मक ज्ञान. योग्यास दूर देशीं जे पदार्थ आहेत किंवा भूतकालचे किंवा पुढें होणारे जे पदार्थ त्यांचे अनुभवात्मक ज्ञान—अपोहनंच—आणि कामक्रोधादिकें करून आणि शोकमोहादिकें करून ज्याचें चित्त व्याकुळ आहे त्यास अज्ञान किंवा पूर्वोक्त स्मृति आणि ज्ञान यांचा नाश मी जो आत्मा त्यापासूनच होतो. या प्रमाणें आपणास जीव रूपता सांगून ब्रह्मरूपता सांगतात.—वेदैश्च सर्वैः अहमेव वेद्यः—म्हणजे कर्मकांड, उपासना कांड ज्ञान कांडात्मक जे सर्ववेद तींहीं करून मीच ज्ञेय (जाणण्यास योग्य) आहें. उपासना कांड तर सगुण ब्रह्म प्रतिपादन करतें. ज्ञानकांड निर्विशेष अद्वितीय जीवस्वरूप ब्रह्म प्रतिपादन करतें कर्मकांडही ब्रह्म सर्वात्मक आहे यास्तव त्या परमात्म्यास इंद्र, मित्र म्हणजे सूर्य, वरुण अग्नि असें म्हणतात आणि दिव्य सुपर्ण पक्षी जो गरुड तो परमात्माच आहे तो एक असतांही त्यास अग्नि, यम, मातरिश्वा म्हणजे वायु असें म्हणतात. या अर्थाच्या मंत्रांत इंद्रादि देवता स्वरूपानें परमेश्वराचेंच प्रतिपादन केलें आहे. वेदांतकृत्—म्हणजे वेदांतार्थ संप्रदाय प्रवर्तक वेदव्यासादि स्वरूप मीच आहें. आणि—वेदविदेव च अहं—म्हणजे कर्म उपासना ज्ञान कांडात्मक सर्व मंत्र ब्राह्मणात्मक वेदार्थ वेत्ता मीच आहें. यास्तव—"ब्रह्मणोहि प्रतिष्ठाहं—" या श्लोकानें जें सांगितलें तें उत्तमच आहे. ॥१५॥

**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ॥ क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥१६॥**

या प्रमाणें सोपाधिक परमेश्वराचें स्वरूप सांगून क्षराक्षर शब्द वाच्य कार्य कारणोपाधि रहित निरुपाधिक शुद्ध परमात्म स्वरूप भगवान् कृष्ण अर्जु-

नास सांगतात. ॥ क्षरः च अक्षरः इमौ द्वौ पुरुषौ लोके स्तः – म्हणजे प्रज्ञान घ-
नच हा नित्य आत्मा देहेंद्रियादिक भूत कार्यां पासून उठून कर्म नाश झाला म्ह-
णजे कर्म जें त्याचे नाशानें नाश पावतो म्हणजे देहाचे मरणानें मरण पावला
अशा अज्ञान लोकांच्या व्यवहारास पात्र होतो अशा अर्थाच्या श्रुतीचे प्रमाणा-
वरून नाश पावणार जो देहादिक तदुपाधिक जलाकाशासारखा जो हा जीव-
समुदाय आणि कर्मजन्य नव्हे असा जो अविनाशी म्हणजे तत्वज्ञाना वांचून-
नाश न पावणारा अनादि आणि पूर्वोक्त क्षराचे उत्पत्तीस बीज भूत मायारूप-
उपाधि त्याचें नाशामुळें नाश न पावणारा आणि त्या उपाधीचे स्वाधीन न झाले-
ला जो मायोपाधिक तो अक्षर असे हे क्षर आणि अक्षर उपाधीनीं परस्पर भि-
न्न झालेले पुरुषोपाधित्वें करून ज्यांस लोकांत पुरुष असें म्हणतात. असे
या संसारांत आहेत तें कोणते तें स्पष्ट करून भगवान् दाखवितात. क्षरः स-
र्वाणि भूतानि – म्हणजे सर्व प्राणवंत देहेंद्रियादिक समस्त कार्य तें म्हणजे तदुपा-
धिक जो तो क्षर. कूटस्थः अक्षरः उच्यते – म्हणजे कूट म्हणजे यथार्थ वस्तूचें आ-
च्छादन करून खोटें वस्तूचें प्रकाशन करणें असें जें वंचन त्यासच माया म्हणता-
त. आवरण करणें नंतर विक्षेप म्हणजे भ्रम करणें अशा दोन शक्तींचे स्वरूपानें-
राहणारा जो मायारूप उपाधि तो अक्षर म्हणजे मायोपाधिक ईश्वर अनाद्यनंत
संसारबीज यास्तव अनाद्यंत स्वरूप आहे म्हणून त्यास अक्षर असें म्हणतात.
क्षर शब्दें करून अचेतन वर्ग सांगून – कूटस्थोक्षर उच्यते – येणें करून चेतन जी-
व सांगितला असें कोणी व्याख्यान केलें आहे. तें उपक्रमोप संहारांशीं विरुद्ध-
आहे यास्तव चांगलें नाहीं. "क्षेत्रज्ञंचापि मां विद्धि –" येणें करून परब्रह्म स्वरू-
पत्वें करून जो क्षेत्रज्ञ आरंभीं सांगितला तोच क्षराक्षरांहून अन्य उत्तम पुरुष
आहे असें प्रतिपादन करून प्रकरण समाप्ति करण्या विषयीं इष्ट आहे यास्त-
व उपक्रमोप संहारांस एकरूपता येण्या साठीं पूर्वोक्त व्याख्यानच चांगलें अ-
सें जाणावें. ॥ १६ ॥

**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः॥ यो**
**लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः॥१७॥**

उत्तमः पुरुषः अन्यः – म्हणजे पूर्वोक्त जे कार्योपाधि कारणोपाधि-
सोपाधिक जीव परमेश्वर त्यांहून अन्य निरुपाधिक तृतीय उत्तम सर्वोत्कृष्ट पु-
रुष. परमात्मा इति उदाहृतः – म्हणजे तो कार्य कारणोपाधींचा प्रकाशक अ-
सून त्यांहीं करून असंस्पृष्ट आहे. अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानम-
य, आनंदमयरूप जे अविद्याकल्पित असुख्य आत्मे त्याहून उत्कृष्ट पुच्छ

ब्रह्म- म्हणजे सर्वाधिष्ठान ब्रह्म सर्वजीवांचा आत्मा स्वरूप आहे असें वेदांतांत म्हणजे उपनिषत् रूप शास्त्रांत प्रतिपादन केलें आहे. यः ईश्वरः भूत्वा लोकत्रयं आविश्य बिभर्ति- म्हणजे जो परमात्मा मायोपाधीनें ईश्वर होऊन भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक या लोकत्रयाप्रत हें उपलक्षण करून सर्व जगाप्रत आपले-माया शक्तीनें अधिष्ठून स्वकीय सत्ता स्फूर्तीचें प्रदान करून धारण करतो किंवा पोषण करतो. आपलें अधिष्ठान स्वरूप सत्ता स्फूर्तीनें आपले ठायीं अविद्याख्य माया शक्तीनें भ्रमानें भासविलेल्या सर्व जगास- अस्ति भाति- आहे भासतें- अशा भिन्न सत्तेनें व्यवहारास पात्र करतो तथापि मी- अव्ययः- आपले ठायीं भासणार जगाचे विकारानें रहित निर्विकार स्वरूप आहे. अथवा जो परमात्मा उत्तम मध्यमाधम रूप जे लोक शब्द वाच्य शरीर त्रितयं यांप्रत प्रवेश करून त्यांचें धारण करतो म्हणजे त्या शरीरांत आपणच शरीरा प्रमाणें- अविद्येनें भासतो तथापि सर्वज्ञत्व रूप ईश्वर धर्म अल्पज्ञत्व रूप जीव धर्मानें वृद्धि किंवा क्षयरूप विकार पावत नाहीं. नव्येति- म्हणजे विकार पावत नाहीं तो अव्यय असा अव्यय शब्दाचा अर्थ या व्याख्यानांत आहे. ॥१७॥

**यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ॥ अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥**

आपले प्रसिद्ध पुरुषोत्तम या नांवाचा अर्थ सांगून तो परमात्मा मीच आहें असें "ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहं-" "तद्धाम परमंमम" असें जें पूर्वी आपलें महिमान सांगितलें त्याचा निश्चय होण्या करितां भगवान् कृष्ण सांगतात. यस्मात् क्षरं अतीतः अहं- म्हणजे ज्या कारणास्तव पूर्वोक्त क्षररूप कार्योपाधि किंवा कार्यत्वा स्तव नाश पावणारा मायामय अश्वत्थात्मक संसार वृक्ष याचा अतिक्रम करून राहिलेला म्हणजे तद्रहित हें उपलक्षण करून पूर्वोक्त- माया शक्ति रूप अक्षरोपाधीप्रत अतिक्रम करून राहिलेला म्हणजे तद्रहित मी- अक्षरात् अपि च उत्तमः- म्हणजे पूर्वी सांगितलेला जो सर्व संसार बीजभूत अव्याकृत माया शक्ति रूप अक्षरोपाधिक सर्व जगत्कारण भूत ईश्वर त्याहून अपि शब्दानें पूर्वी सांगितलेला जो देहादि कार्य स्वरूप क्षरोपाधिक जीव वर्ग त्याहून उत्तम म्हणजे उत्कृष्ट तम आहे. यास्तव- लोके वेदे च पुरुषोत्तमः प्रथितः- म्हणजे लोकांत आणि वेदांत पुरुषोत्तम असा प्रख्यात आहें. जड जो देहादिक क्षर रूपो पाधी त्याहून तदुपाधिक जीव चेतन त्वा स्तव उत्कृष्ट आहे. त्यापेक्षां ही- अक्षर मायोपाधिक चेतन ईश्वर स्वतंत्र त्वा स्तव जीवांचें नियमन करतो यास्तव उत्कृष्टतर आहे त्या पेक्षां ही जीवेश्वरां प्रमाणें ज्याचें सच्चिदानंदाद्वय स्वरूप आगं-

तुक नव्हे असा निरुपाधिक जीवेश्वरांचा ही आत्मा मी पुरुषोत्तम उत्कृष्ट तम आहें असें तात्पर्य.- तो परमात्मा उत्तम पुरुष अशा अर्थाच्या वेद वाक्यांतील प्रसिद्धि आणि "हरिर्यथैकः पुरुषोत्तमः स्मृतः" इत्यादिक वाक्यांतील प्रसिद्धि लौकिक प्रसिद्धि जाणावी. ॥१८॥

## यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ॥- स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥१९॥

अशा या माझ्या पुरुषोत्तम नांवाच्या अर्थ ज्ञानाचें फल तसें जाणणारास माझी भक्ति प्राप्त होते असें सांगतात. ॥ यः असंमूढः मां एवं पुरुषोत्तमं जानाति- म्हणजे हा कृष्ण मनुष्यच आहे अशा मोहानें वर्जित अथवा मी पूर्वोक्ता प्रमाणें पुरुषोत्तम आहें किंवा नाहीं अशा संशयानें किंवा मी पुरुषोत्तम नाहीं अशा विपरीत ज्ञानानें रहित जो मजप्रत पुरुषोत्तम या नामाचा जसा अर्थ मी सांगितला त्या प्रमाणें मजप्रत हा पुरुषोत्तमच आहे असें जाणतो.- सर्ववित् सः मां सर्व भावेन भजति- म्हणजे सर्वज्ञ किंवा सर्वात्मत्व स्वरूपलें करून मजप्रत जाणणारा तो- हे भारता अर्जुना, सर्व भावें करून म्हणजे प्रेमलक्षण जो भक्तियोग तेणें करून मजप्रत भजतो- म्हणजे सेवन करतो. ॥१९॥

## इतिगुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयाऽनघ ॥- एतद्बुध्वा बुद्धिमान् स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥२०॥ ॥ ओं तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे पुराणपुरुषोत्तमयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥१५॥ ॥ श्रीकृष्णार्प० ॥

या अध्यायांत ब्रह्मात्मैक्य स्वरूप भगवत्तत्व ज्ञान मोक्षास साधन आहे असें सांगून त्याची स्तुति करून अध्याय समाप्ति करतात. ॥ इति गुह्यतमं शास्त्रं- म्हणजे एतावत् पर्यंत या अध्यायांत सांगितल्या प्रमाणें मोठें गुप्त रहस्य संपूर्ण शास्त्रच संक्षेपानें या अध्यायाचे ठायीं किंवा एतदध्याय रूप- हे अनघ मयाउक्तं- म्हणजे हे निष्पापा किंवा व्यसन रहिता अर्जुना तुला मी सांगितलें जरी ही संपूर्ण अष्टादशाध्याय रूप गीताच शास्त्ररूप आहे तथापि या अध्यायांत सर्व शास्त्रांचा प्रधान भूत जो अर्थ तो सांगितला आहे यास्तव हा अध्याय ही शास्त्ररूपच आहे. या अध्यायांत कार्य कोणतें कारण कोणतें यांचा विभाग संसार-

रूप वृक्षास अनित्यत्व म्हणजे नश्वरत्व भगवंताच्या विभूति-" वेदैश्च सर्वै-रहमेव वेद्यः-" सर्व वेदानीं वेद्य म्हणजे प्रतिपाद्य किंवा ज्ञेय मीच आहें या अश्वत्थ रूप संसार वृक्षाप्रत जो जाणतो तो सकल वेदार्थ वेत्ता आहे असा सर्व शास्त्राचा अर्थ निरूपिला आहे. ॥ एतत् बुध्वा बुद्धिमान् स्यात्- म्हणजे हें तुला जें सांगितलें शास्त्र याप्रत दुसरा कोणी ही जाणून ब्रह्मात्म ज्ञानवान् होईल. हे भारत कृतकृत्यश्च स्यात्- आणि हे भारता सर्व जें करावयाचें तें केलें अतःपर कर्तव्य कोणतें राहिलें नाहीं असा तो कृतकृत्य होईल. हे भारत, या संबोधनानें- ब्राह्मणादिक मोठे कुळांत ज्यास जन्म प्राप्त झालें आहे त्यानें जन्मास येऊन ब्रह्मात्म तत्वरूप भगवत्तत्वाच्या ज्ञानाचें संपादन करावें हाच मुख्य पुरुषार्थ त्यास तें-झालें तर तो कृतकृत्यच आहे. तूंही मोठे कुलांत झाला आहेस आणि व्यसन रहित निष्पाप आहेस यास्तव हें शास्त्र जाणून तूं कृतकृत्य होशील म्हणून काय सांगावयाचें आहे असें सूचविलें." एतद्धि कृत कृत्यत्वं ब्राह्मणस्य विशेषतः ॥ प्राप्यैतत् कृतकृत्योहि द्विजो भवति नान्यथा ॥" असें मनूनें सांगितलें आहे. त्याचा अर्थ- आत्म तत्व ज्ञान होणें हेंच जन्माचें साफल्य आहे आणि विशेषें करून ब्राह्मणाचें आहे. याचे प्राप्तीनें द्विज कृतकृत्य होतो अन्यथा होत नाहीं. सर्व पुरुषार्थां मध्यें ब्रह्मात्म तत्व ज्ञानच सकलानर्थ कारण अज्ञान नाशक आहे तें प्राप्त झाल्या वर दुसरें कर्तव्य रहात नाहीं. ॥२०॥

इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथ शास्त्रिकृत भाषाविवृत्तौ पंचदशो ऽध्यायः समाप्तः ॥ १५॥

## अध्याय १६ वा.

**श्रीभगवानुवाच ॥ ॥ अभयं सत्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ॥ दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १॥ ॥ ॥ ॥**

पूर्वाध्यायीं-" अधश्च मूलान्यनु संततानि कर्मानुबंधीनि मनुष्य लोके-" या श्लोकांत मनुष्य देहाचे ठायीं पूर्वजन्मार्जित कर्मानुसारें करून अभिव्यक्त (प्रगट) होणाऱ्या वासना संसार वृक्षाचीं अवांतर मूलें असें सांगितलें- त्या वासनांसच प्रकृति असें म्हणतात. त्या वासनारूप प्रकृति दैवी, आसुरी, राक्षसी अशा तीन प्रकारच्या नवमाध्यायीं सांगितल्या त्यांत वेदांनीं सांगितलेलें जें कर्म आणि ज्ञान साधनांचें अनुष्ठान त्यां विषयीं प्रवृत्ति होण्यास कारण जी सात्विक शुभ वासना तीस दैवी प्रकृति म्हणतात. वेदोक्त निषेधाचा अति-

क्रम करून स्वभावसिद्ध जे रागद्वेष त्यांला अनुसरून होणारी सर्वानर्थास कारण जी निषिद्ध कर्माविषयीं प्रवृत्ति तीस कारण जी राजसी किंवा तामसी अशुभवासना तीस आसुरी आणि राक्षसी प्रकृती म्हणतात. हिलाच राग म्हणजे विषयाभिलाष त्याचे प्राबल्यामुळें विषय भोगाविषयीं प्राधान्य असलें म्हणजे आसुरी असें म्हणावें आणि द्वेषाचे प्राबल्यानें हिंसे विषयीं प्राधान्य असलें म्हणजे राक्षसी म्हणावें असा भेद आहे. परंतु येथें शास्त्राचे आज्ञे प्रमाणें शास्त्रांत ज्या विषयीं करावें असा विधि आहे अशा विहित कर्माविषयीं जी प्रवृत्ति तीस कारणभूत जी सात्विकी शुभवासना ती दैवी. संपत् म्हणजे संपत्ति आणि शास्त्राज्ञेचें उल्लंघन करून शास्त्रांत ज्या कर्माचा हें करूंनये असा निषेध केला आहे अशा निषिद्ध कर्मा विषयीं जी प्रवृत्ति होते तीस कारण जी राजसी किंवा तामसी अशुभवासना ती आसुरी संपत् असा राजसी जी आसुरी आणि तामसी जी राक्षसी-या दोहों प्रकृतींचा आसुरी संपत्तींतच समावेश करून शुभवासनांचें ग्रहण करावें अशुभ वासनांचा त्याग करावा. असें प्रतिपादन करण्या साठीं शुभवासना दैवी संपत् अशुभ वासना आसुरी संपत् अशा दोन भेदांनींच त्या प्रकृतींचें निरूपण करण्या साठीं या षोडशाध्यायाचा आरंभ करतात. त्यांत प्रथम तीन श्लोकांनीं ग्रहण करण्यास म्हणजे तिचें स्वरूप समजून अनुष्ठान करण्यास योग्य दैवी संपत्ति-श्रीभगवान् सांगतात. अथवा पूर्वाध्यायांतीं-"इदमुक्तंमया नघ" या श्लोकांत अर्जुनास अनघ असें संबोधन दिलें तें अनघत्व दैवी संपत्तीनें युक्त असणें आणि-तद्विरुद्ध ती आसुरी संपत्ती हें दाखविण्या साठीं भगवान् बोलतात. अभयं-म्हणजे शास्त्र विहित कर्माचे अनुष्ठाना विषयीं संशया वांचून प्रवृत्त होणें किंवा-स्त्री पुत्रादिक रूप जो परिग्रह त्याचा त्याग केला तर मी कसा वांचेन माझा नाश-होईल असें भय नसणें-सत्वसंशुद्धिः-म्हणजे अंतःकरणास भगवत्तत्व स्फूर्ति होण्याची जी योग्यता तद्रूप शुद्धि म्हणजे निर्मलता अथवा पर वंचन करणें, अनृत बोलणं, मनांत एक असून बाहेर दुसरा व्यवहार करणें एतद्रूप कपट यावें वर्जन.-ज्ञान योग व्यवस्थितिः-म्हणजे वेदांत शास्त्राच्या श्रवणानें झालेला-जो परोक्ष ब्रह्मात्मैक्य निश्चय तें ज्ञान. वेदांत श्रवणें करून परोक्षतेनें जाणलेला जो ब्रह्मात्मैक्य रूप अर्थ तो चित्ताचे एकाग्रतेनें अनुभवारूढ करणें तो योग म्हणजे निदिध्यासन त्या ज्ञानयोगाचे ठायीं निरंतर निष्ठा-म्हणजे तत्पर असणें. संन्याशाचे हे असाधारण धर्म सांगून गृहस्थाचे असाधारण धर्म सांगतात. दानं-म्हणजे शास्त्रांत सांगितले प्रमाणें आपलें ज्यावर स्वामित्व आहे-अशा अन्नादिकाचा अतिथि, दास इत्यादिकांस विभाग करून देणें-दमः म्हणजे स्वस्त्रीचे ठायीं ही शास्त्रोक्त विधीचें उल्लंघन करून ऋतुकालाशिवाय दुसरे-

कालीं गमन न करणें इत्यादिक स्वरूप बाह्येंद्रियांचा निग्रह, चकारानें दुसरे ही शास्त्रनिषिद्ध कर्मापासून निवृत्त होणें. यज्ञः म्हणजे अवश्य कर्तव्य अग्निहोत्रादि श्रौत आणि दर्शपौर्णमासादिक स्मार्त, देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ, या भेदानें च्यार प्रकारचा यज्ञ येथें घ्यावा. ब्रह्मयज्ञ पांचवा स्वाध्याय पदानें निराळा सांगितला आहे म्हणूनचकारें करून दुसरें ही शास्त्रविहित कर्मरूप धर्म घ्यावे. स्वाध्यायः- म्हणजे अदृष्टार्थ ऋग्वेदादिकांचें यथाशास्त्र विधीनें अध्ययन, यज्ञ शब्दानें स्वाध्यायांसह्यां पंचमहायज्ञांचे ग्रहण संभवत असतां ही पृथक् स्वाध्याय जो सांगितला तो वेदाध्ययन करणें हा ब्रह्मचाऱ्यास असाधारण मुख्य धर्म असें सांगण्यासाठीं सांगितला. तपः म्हणजे सत्तरशाध्यायांत शारीर, वाचिक, मानसिक. या भेदानें तीन प्रकारचें सांगावयाचें आहे तें. हा वानप्रस्थाचा असाधारण मुख्य धर्म याप्रमाणें चार आश्रमांचे पृथक् असाधारण धर्म सांगून- म्हणजे ब्राह्मणादिक च्यार वर्णांचे असाधारण धर्म सांगतात. आर्जवं- म्हणजे वक्र स्वभाव नसणें अथवा जे श्रद्धायुक्त आहेत त्यांचे ठायीं आपणास ज्या अर्थाचें ज्ञान आहे त्याचें गोपन न करणें असें तात्पर्य. ॥१॥

**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम्॥**
**दयाभूतेष्वलोलुप्त्वं मार्दवंह्रीरचापलम्॥२॥**

अहिंसा- म्हणजे प्राण्यांस पीडा न करणें किंवा त्यांचे वृत्तीचा म्हणजे- जीवन होण्याचे साधनाचा उच्छेद न करणें. सत्यं- म्हणजे यथार्थ भाषण करणें किंवा ज्या बोलण्यानें दुसऱ्यास पीडा होणार नाहीं असें यथार्थ बोलणें किंवा दुसऱ्यास अप्रिय अहित जें अनृत तें न बोलणें. अक्रोधः- म्हणजे दुसऱ्यानें तुला मारीन किंवा तुझा नाश करीन असें भाषण किंवा निंदादिरूप भाषण केलें- किंवा ताडनादि केलें असतां जो उत्पन्न होणारा क्रोध त्याचा तत्काल उपशम करणें. त्याग- म्हणजे सर्व कर्मांचा विधीनें त्याग करणें असा संन्यास, दान पूर्वीं सांगितलेंच आहे यास्तव येथें दानरूप त्याग या शब्दाचा अर्थ नाहीं. शांतिः- म्हणजे अंतःकरणाचा विषयचिंतनापासून उपशम करणें. अपैशुनं- म्हणजे दुसऱ्याचे पाठीमागें त्याचे दोषाचें कथनरूप पैशून्य तद्रहित असणें, भूतेषुदया- म्हणजे प्राण्यांचें दुःख पाहून त्यांवर हे दुःखीन सावे अशी दया करणें. अलोलुप्त्वं- म्हणजे विषयांचें सान्निध्य असलें तरी तें पाहून किंवा ऐकून इंद्रियांस विकार न होणें. मार्दवं- म्हणजे अप्रिय बोलणारे शत्रु, प्रिय बोलणारे मित्र यां सर्वां बरोबर ही प्रियच बोलणें. ह्रीः- म्हणजे वाईट कर्मांचे ठायीं प्रवृत्तीस आरंभ

झाला तर त्यास प्रतिबंध करणारी लोकांची लज्जा. अचापलं– म्हणजे प्रयोजना शिवाय वाणी, हात, पाय यांचा व्यापार न करणें. हे आर्जवादिक अचापलपर्यंत- ब्राह्मण वर्णाचे असाधारण धर्म आहेत. ॥ २ ॥

**तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ॥**
**भवंति संपदं दैवी मभिजातस्य भारत ॥ ३ ॥ ॥**

तेजः-म्हणजे स्त्री, बाल, मूढ यांकडून आपला पराभव किंवा अपमाना दिक न होण्या जोगी प्रगल्भता. क्षमा– म्हणजे दुसऱ्यानें पूर्वोक्त आक्रोश किंवा ताडन केलें असतां त्याचा पराभव करण्याचें सामर्थ्य असतांही क्रोध न येणें म्हणजे- मनास विकार न होणें. धृतिः–म्हणजे देहेंद्रियादिक भूमीवर पडण्या जोगें झालें तरी त्यांचें पतन न होण्या जोगा त्यांस उचलून धरण्या विषयींचा प्रयत्न विशेष मनाचा धर्म, हे क्षत्रिय वर्णाचे असाधारण धर्म. शौचं– म्हणजे बाह्य आंतर या दोन प्रकारचें आहे. मृत्तिका जलादिकानें शरीराची शुद्धी करणें हें बाह्य शौच, व्यवहारांत पूर्वोक्त माया कपट अनृत सोडणें किंवा राग द्वेष काम क्रोधादिकानें रहित होणें हें- आंतर शौच. येथें मनोवासनारूप दैवी संपत्ति सांगतात त्यांत आभ्यंतर शौचच घ्यावें. बाह्य शौच शारीर धर्म आहे तो मानस वासना रूप धर्म नाहीं यामुळें घेऊं नये. जर ते परंपरेनें किंवा दुसऱ्या प्रकारानें मनाचा वासना रूप धर्म होईल तर- तेही घ्यावे. अद्रोहः– म्हणजे दुसऱ्यास मारण्याचे इच्छेनें शस्त्रादिकाचें ग्रहण- करणें असा जो द्रोह तो न करणें किंवा तद्राहित्य हे वैश्याचे दोन असाधारण धर्म. नातिमानिता– म्हणजे मी पूज्य आहें अशी जी अतिशयित भावनात्मक अभिमानिता तद्राहित्य– म्हणजे आपले पेक्षां उत्कृष्ट जे वर्ण त्यांचे ठायीं नम्रता. हा शूद्र वर्णाचा असाधारण धर्म. हें उपलक्षण करून विविदिषा– म्हणजे आपणास आत्म तत्त्व ज्ञान व्हावें अशी इच्छा ती होण्या साठीं साधनभूत जें वेदानुवचन, यज्ञ, दान, अनाशक तप इत्यादिक असाधारण साधारण धर्म जे श्रुतिस्मृतींत सांगितले आहेत तेही दैवी संपत्तींत घ्यावे. अथवा दैवी संपत्ति फलभूत आणि साधन भूत अशी दोन प्रकारची आहे. त्यांतील फलभूत संपत्ति सांगतात. अभयं– सर्वभूतांस भय देणार नाहीं अशा संकल्पाचें पालन करणें. हें दुसरें ही परम हंसांचे धर्माचें उपलक्षण आहे. सत्त्वसंशुद्धिः– वेदांत श्रवणादिकाचे परिपाकानें असंभावना विपरीत भावनादिकरूप जो अंतःकरणाचा मल तद्राहित्य. ज्ञानं– ब्रह्मात्मैक्य साक्षात्कार. योग– मनांच्या वासनांच्या क्षयास अनुकूल पुरुषप्रयत्न. त्या ज्ञान योगानीं संसारी जीवा पेक्षां विलक्षण जीवन्मुक्त स्वरूपानें स्थिति ही फलभूत दैवी संपत्ति या संपत्तींत अंतःकरण शु-

द्धि करणारी भगवद्भक्ति ही घ्यावी. ताहींतर भगवद्भक्ती वांचून अंतःकरण शुद्धी होणार नाहीं आणि दैवी संपत्ती मध्यें नवमाध्यायांत दैवी प्रकृती प्रत आश्रय केलेले मला भजतात. अशा अर्थानें श्लोकांत ती घेतली ही आहे. भगवद्भक्ती सर्वापेक्षां उत्कृष्ट आहे. यास्तव येथें अभयादिकांमध्यें ती सांगितली नाहीं. महाभाग्यजे परम हंस यांची फलभूत दैवी संपत्ति सांगून. त्यापेक्षां न्यून जे ग्रहस्थादिक त्यांस साधन भूत दैवी संपत्ति दानं इत्यादिकें करून सांगतात. हे भारत दैवीं संपदं अभिजातस्य भवंति – हे भरत कुलोत्पन्ना अर्जुना, शुद्ध सत्वमय जी दैवी संपत्ति म्हणजे वासनांची संतति ती शरीरारंभ कालीं पुण्य कर्मानें अभिव्यक्त होऊन. नंतर उत्पन्न जो होतो त्याला हे पूर्वोक्त अभयादिक धर्म स्वाभाविक निष्पन्न होतात त्यास विद्या म्हणजे ज्ञान आणि कर्मे उत्पन्न होतात आणि प्रज्ञा उत्पन्न होते. पूर्वार्जित पुण्य कर्मानें पुण्य करणारे होतात पूर्वार्जित पाप कर्मानें पाप करणारे होतात. अशा अर्थानें श्रुतींत हाच अर्थ सांगितला आहे. भारत या संबोधनानें तूं पवित्र वंशांत उत्पन्न झालेला पवित्रच आहेस. यास्तव या धर्मास योग्य आहेस असें सूचविलें असें तात्पर्य. ॥ ३ ॥

**दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ॥**
**अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥**

आत्मतत्त्व ज्ञान होण्याचा अधिकार प्राप्त होण्यास साधनभूत आणि ग्रहण करण्यास योग्य जी दैवी संपत्ति ती सांगून आतां त्या अधिकारास विरोधीया कारणानें टाकण्यास योग्य जी आसुरी संपत्ति ती एका श्लोकांत संक्षेपानें सांगतात. दंभः – म्हणजे मी मोठा धार्मिक आहें असें लोकांत प्रसिद्ध करणें यासच धर्मध्वजित्व म्हणतात. दर्पः – म्हणजे धन आणि स्वजन निमित्तक माझ्या सारखा द्रव्य वान् आणि विस्तार पावलेल्या कुलाचा दुसरा कोण आहे असा दुसऱ्याचा तिरस्कार करण्यास कारणभूत गर्वाख्य मनाचा वृत्तिविशेष. अभिमानश्च – आणि आपल्यास सर्वापेक्षां पूज्यत्व आहे. असा अतिशयित अभिमान हा प्रजापती पासून देव आणि असुर दोन उत्पन्न झाले. ते देव असुर परस्पर आपापले मोठेपणा विषयीं स्पर्धा करीत असत. नंतर आसुर आपण सर्वांहून थोर आहों तेव्हां कोणाचे मुखांत होम करावा अशा अभिमानानें आपले मुखांतच होम करूं लागले. म्हणजे यज्ञादिकानें देवांस हविर्भाग न देऊन आत्मार्थेच पाक करून अन्नादिकांचें भक्षण करूं लागले ते या अतिमानानें पराभव पावले. तस्मात् अतिमान करूं नये. अतिमान करणें हें पराभव होण्याचें मुख म्हणजे आरंभ आहे. अशा अर्थाच्या शतपथ ब्राह्मणांतील वाक्यानें हें सां-

गितलें आहे. क्रोधः—म्हणजे आपल्यास आणि दुसऱ्यास अपकार होण्यास कारण-भूत जी प्रवृत्ति तीस साधन अभिज्वलनात्मक मनाचा वृत्तिविशेष. पारुष्य दोन प्रकारचें आहे, एक वाक्पारुष्य आणि एक दंडपारुष्य, दुसऱ्यास निष्ठुर बोलणें किंवा शिवी गाळ करणें हें वाक्पारुष्य, दुसऱ्यास काष्ठशस्त्रादिकानें मारहाण करणें हें दंडपारुष्य, चकारानें न सांगितलेले जे चापल्यादिक धर्म ते घ्यावे. अज्ञानं—म्हणजे कर्तव्य कोणतें अकर्तव्य कोणतें याचा विवेक नसणें किंवा देहादिकांवर हाच आत्मा असें मिथ्या ज्ञान. — हे पार्थ आसुरीं संपदं अभिजातस्य भवंति—म्हणजे हे अर्जुना असुरयोनींत जन्ममरण होण्यास कारण जी रजस्तमोमय अशुभवासनांची संतती ती पापकर्मानें शरीरारंभकालीं अभिव्यक्त ( प्रगट ) होऊन नंतर जो उत्पन्न होतो त्यास हे दंभदर्पादिक धर्म स्वाभाविक निष्पन्न होतात. हे पृथेच्या—म्हणजे कुंतीच्या पुत्रा अर्जुना, अशा संबंधानें तुझें भ्रातृकुल ही पितृकुला प्रमाणें शुद्ध आहे यास्तव तूं या आसुरी संपत्तीस योग्य नाहींस असें सुचविलें. ॥४॥

**दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरीमता ॥ मा-शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥ ॥**

सांगितलेल्या दोन्ही संपत्तींचा फलभेद सांगतात. ॥ दैवी संपत् विमोक्षाय—म्हणजे ज्या आश्रमास किंवा ज्या वर्णास जी फलाभिसंधि म्हणजे फलेच्छा तद्रहित जी शास्त्रविहित क्रिया ती त्याची दैवी संपत्ति. ती अंतःकरणशुद्धि भगवद्भक्ति ज्ञानयोग व्यवस्थिती पर्यंत निष्पन्न झाली असतां संसार बंधापासून जो मोक्ष म्हणजे त्या बंधाची निवृत्ति तीस कारण तद्द्वारा कैवल्य पदप्राप्तीस कारण होते. या साठीं जे कल्याणार्थी आहेत त्यांणीं त्या दैवी संपत्तीचाच आश्रय करावा. निबंधाय आसुरीमता—म्हणजे जी क्रिया ज्यास शास्त्रनिषिद्ध आहे ती—फलाभिसंधीनें आणि अहंकारानें युक्त राजसी किंवा तामसी सर्व क्रिया त्याची आसुरी संपत्, हीच राक्षसी संपत् ही संसाररूप जो बंध त्यास कारण होते असें शास्त्रास संमत आहे. यास्तव तिचा त्याग कल्याणार्थी मुमुक्षूनीं करावा. हे पांडव दैवी संपदं अभिजातोसि माशुचः—म्हणजे हे पांडवा अर्जुना, मी कोणते संपत्तीनें युक्त आहें अशा संशयांत पडलेल्या अर्जुनाचें आश्वासन भगवान् करतात. मी आसुरी संपत्तीस अनुलक्षून झालों आहें काय! अशा शोकानें तूं संताप करूं नको. तूं दैवी संपत्तीप्रत अनुलक्षून उत्पन्न झाला आहेस म्हणजे पूर्वजन्मीं तूं पुण्यकारक कल्याणरूप कर्म केलें आहे यास्तव पुढें ही तुला कल्याण होणार असा तूं आहेस. पांडवा अशा संबोधनानें दुसरे जे धर्मराजादिक पंडूचे पुत्र त्यांचे ठायीं ही ही दैवी संपत्ति आहे असें सूचविलें. ॥५॥

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन् दैव आसुर एव च ॥
दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६

•शास्त्र निषिद्ध कर्मा विषयीं प्रवृत्त होणें यास कारण या सामान्य धर्मानें आसुरी आणि राक्षसी या दोन प्रकृतीचा एक वर्ग किंवा एकच भेद करून राक्षसी प्रकृतीचा आसुरी प्रकृतीचे पोटांतच समावेश असो. कोठें आसुरी आणि राक्षसी असा निराळा भेद जो दाखविला तो त्या एका भेदासच कामोप भोगाचे-प्राधान्यें करून त्या प्रकृतीस आसुर प्रकृती म्हणतात हिंसा द्वेष प्राधान्यें करून त्या भेदासच राक्षसी प्रकृती म्हणतात अशी त्याची व्यवस्था जी केली तीही असो. परंतु प्राजापत्य म्हणजे प्रजापती पासून उत्पन्न झालेले देव, मनुष्य आणि आसुर हे प्रजापतीचे ठायीं ब्रह्मचार्यार्थ म्हणजे वेदाध्ययनार्थ वास करते झाले असें श्रुतीत सांगितलें आहे. या प्रमाणावरून मानुषी प्रकृति दैवी आणि आसुरी या दोन प्रकृतीहून निराळी तिसरी आहे असें सिद्ध होतें ती प्रकृति मुमुक्षूंस ग्राह्य किंवा त्याज्य आहे हें अवश्य सांगावयाचें असून कां सांगितलें नाहीं अशा शंकेचें निराकरण करण्या साठीं सांगतात. अस्मिन् लोके दैवः आसुर एव च द्वौ भूत सर्गौ भवतः - म्हणजे या संसार मार्गाचे ठायीं दैव आणि आसुर या भेदानें दोन प्रकारचे भूताचे म्हणजे मनुष्याचे सर्ग (सृष्टि) होतात. राक्षस किंवा मानुषसर्ग पृथक् नाहीं. तात्पर्य- जेव्हां जो मनुष्य शास्त्र संस्कार मानल्यानें रागद्वेषांचा जय करून धर्म परायण होतो तेव्हां तो देवच आहे. जेव्हां स्वाभाविक होणारे जे रागद्वेष त्यांच्या प्राबल्यें करून शास्त्र संस्कार टाकून अधर्म परायण होतो तेव्हां तो असुर आहे. त्यांतही परस्त्री गमनादिक अधर्म परायण झाला म्हणजे आसुर आणि प्राणि हिंसा रूप अधर्म परायण झाला म्हणजे राक्षस असा त्या वर्गांत अवांतर भेद आहे. धर्म आणि अधर्म याहून तृतीय कोटी नाहीं-यास्तव दैवी आणि आसुरी अशा दोन प्रकारची प्रकृति असें जें सांगितलें तें विरुद्ध नाहीं. यास प्रमाण प्राजापत्य म्हणजे प्रजापती पासून उत्पन्न झालेले देव-आणि असुर हे दोघे आहेत त्यांत देव कनिष्ठ आणि असुर अशा अर्थाची श्रुती आहे. पूर्वोक्त देव मनुष्य असुर प्रजापतीचे ठायीं ब्रह्मचर्यार्थ वास करते झाले या अर्थाचे श्रुतींत स्तनयित्नु ददद असें दैवी वाणी प्रत जो बोलतो ते दम, दान, दया यांस दकारात्मकत्वच बोलतो. या कारणास्तव दान, दम, दया या तिहींचा उपदेश आचार्यांनीं शिष्यांस करावा असें सांगितलें आहे याबरून दम, दान दया रहित जे मनुष्य त्यांस एकाच दया अक्षरानें दम दान दयेचा उपदेश-केला असें सिद्ध होतें यावरून दम दान दया यांनीं रहित मनुष्य ते पूर्वोक्त लक्ष-

णांनीं असुरत्व असतां त्यांवर कांहीं एके धर्माचे सादृश्यानें देव, मनुष्य, असुर असा लाक्षणिक गौण प्रयोग केला. जसा मनुष्य असतांही क्रौर्य गुणानें हा सिंह किंवा व्याघ्र आहे आणि सात्विक या गुणानें हा केवळ भोळा सांब आहे असा प्रयोग करतात. त्या प्रमाणें विजातीय देव, मनुष्य, असुर अशा तीन जाती तेथें विवक्षित नाहींत कारण मनुष्याधिकारकच उपदेश शास्त्र आहे म्हणजे वर्णाश्रमोचित धर्माचा उपदेश करण्यास मनुष्यासच अधिकार आहे यास्तव त्यास उपदेश त्या धर्माचा करावा या उद्देशानेंच शास्त्राची प्रवृत्ति नाहीं यास्तव राक्षसी आणि मानुषी प्रकृति आसुरी प्रकृतीचेच ठायीं अंतर्भूत आहेत यास्तव देव आणि आसुर असे दोनच सर्ग आहेत असें जें सांगितलें तें युक्तच आहे विरुद्ध नाहीं. दैवः विस्तरशः प्रोक्तः—म्हणजे त्यांतील दैव सर्ग म्हणजे दैवी प्रकृति किंवा संपत्ति विस्तारें करून द्वितीयाध्यायांत स्थितप्रज्ञ लक्षणांत द्वादशाध्यायीं भक्त लक्षणांत त्रयोदशाध्यायीं ज्ञानाचे लक्षणांत चतुर्दशाध्यीं गुणातीताचे लक्षणांत. आणि या अध्यायांत—अभयं सत्वसंशुद्धिः—येणें करून सविस्तर तुला मी सांगितला. हे पार्थ—आसुरं मे शृणु—म्हणजे हे अर्जुना आतां आसुर भूत सर्गाप्रत म्हणजे आसुर प्रकृतीप्रत मजपासून विस्तारें करून त्याचा त्याग करण्यासाठीं श्रवण कर. ज्याचें उत्तम प्रकारें करून स्वरूप समजतें त्याचेंच वर्जन करण्यास शक्य होतें. पार्थ या संबोधनें करून माझे पितृभगिनीचा पुत्र तूं आहेस यास्तव तुझी उपेक्षा मी करीत नाहीं हिताहितोपदेश तुला अवश्य करतों असें सूचविलें. ॥६॥

## प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ॥ न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥७॥ ॥

आसुर स्वभावाचे जे प्राणी त्यांचे ठायीं राहणारी जी वर्जन करण्यास योग्य आसुरी संपत्ति तिचें—"तानहं द्विषतः क्रूरान्"—या श्लोका पूर्वींचे प्रवृत्तींतच येथून बारा श्लोकांनीं स्पष्ट करून दाखवितात. प्रवृत्तिं च—म्हणजे शास्त्रविहित धर्मा विषयींची जी प्रवृत्ति चकारें करून त्या प्रवृत्ती विषयींचें जें शास्त्रांतील विधिवाक्य याप्रत—निवृत्तिं च—आणि अधर्मापासून जी निवृत्ति आणि च शब्दानें त्या निवृत्तीचे विधि विषयीं जो शास्त्रांतील निषेध त्याप्रत—आसुरा जनाः न विदुः म्हणजे आसुर स्वभावाचे प्राणी जाणत नाहींत या कारणास्तव—तेषु न शौचं विद्यते—म्हणजे त्या आसुर स्वभावाचे जनांचे ठायीं पूर्वोक्त बाह्य आभ्यंतर शौच राहात नाहीं. आणि—नापि च आचारः—म्हणजे मन्वादिक ऋषीनीं सांगितलेला जो आचार तोही राहात नाहीं.—तेषु सत्यं न विद्यते—आणि प्रिय आणि हित असें य-

थार्थ भाषण ही त्याचे ठायीं राहात नाहीं. ॥ ७॥.

**असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ॥ अप-**
**रस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८॥ ॥**

धर्मा विषयीं प्रवृत्ति व्हावी अधर्मा पासून निवृत्ति व्हावी असें प्रतिपादन करणारें भगवदाज्ञा रूप निर्दोष वेदरूप प्रमाण शास्त्र सर्व लोक प्रसिद्ध - आहे आणि त्याला अनुलक्षून वेदांतीलच अर्थाचें प्रतिपादन करणारी स्मृति इतिहास पुराणादिक हीं लोकांत प्रसिद्ध आहेत असें असतां धर्माधर्म विषयक प्रवृत्ति, निवृत्ति आणि तद्विषयक विधि निषेध यांचें ज्ञान कां नाहीं. ज्ञान आहे तर भगवदाज्ञेचें उल्लंघन करणाऱ्यांचा शासन कर्ता भगवान् परमेश्वर असतां भगवदाज्ञेचें उल्लंघन करून शौच आचारादि रहितत्व त्यांस कसें? अशा शंकेचें निराकरण करण्या साठीं सांगतात. असत्यं - म्हणजे सत्य म्हणजे ज्याचा काल त्रयीं बाध नाहीं असें यथार्थ धर्मा धर्मादिकां प्रत प्रतिपादन करणारें वेदाख्य प्रमाण आणि तदनुसारी स्मृति पुराणादिक तें ज्यांचे ठायीं नाहीं असें वेदस्मृति पुराणादिकांचें स्वरूप प्रत्यक्ष सिद्ध असून तें जगाचे ठायीं नाहीं असें म्हणण्याचें तात्पर्य तें वेदादिक प्रमाण नव्हे या अर्थावर आहे याच कारणास्तव - अप्रतिष्ठं म्हणजे धर्माधर्म रूप प्रतिष्ठा म्हणजे ईश्वरास हें विचित्र सुखदुःख मोह किंवा तत्साधनात्मक जग करण्यास जीवाचे धर्माधर्मच निमित्त कारण आहेत. अशी व्यवस्था ज्यास कारण नाहीं असें आणि - अनीश्वरं - म्हणजे शुभाशुभ कर्माचा फलदाता नियंता ईश्वर ज्याचे ठायीं नाहीं असें - जगत् आहुः - म्हणंजे हें जग आहे असें ते आसुर स्वभावाचे जन बोलतात. बलवत् पापरूप कर्मानें ते वेदांस प्रामाण्य मानीत नाहींत. त्या वरून वेद प्रतिपादित धर्म अधर्म नाहींत आणि ईश्वर ही नाहीं असें मानतात. आणि यथेष्टाचरण ते करतात यामुळें ते पुरुषार्थ भ्रष्ट आहेत असें तात्पर्य - वेद शास्त्रांनींच ज्यांचें स्वरूप समजावयाचें असे जे जीव कृत धर्माधर्म त्यांचे सहायानें त्यांचें फल जीवांस देण्या करितां या जगास उत्पन्न करणारा प्रकृतीचा अधिष्ठाता जो परमेश्वर तो जर या जगांत नाहीं असें ते मानितात. तर त्यांचे मतें कारणा वांचून या जगाची उत्पत्ति कशी होते या शंकेची निवृत्ति त्यांचें मत सांगून करतात. अपरस्पर संभूतं - म्हणजे कामानें प्रेरणा केलेले जे स्त्रीपुरुष त्यांच्या परस्पर संयोगा पासून हें जग उत्पन्न होतें तें - कामहैतुकं - म्हणजे स्त्रीपुरुषांचा कामाचा ज्यास हेतु आहे त्याशिवाय दुसरें कारण नाहीं असें कामहेतुक - आहे त्यासच हैतुक म्हणावें. धर्माधर्म ही यास कारण आहेत असें म्हणाल तर - ते नाहींत असें सांगतात. किमन्यत् - म्हणजे अन्यत् म्हणजे अदृष्ट कारण किम

पि नाहीं. अदृष्ट मानलें तरी कोठें कोठें कार्याचे ठायीं स्वभावावरच पर्यवसान आहे. जसा वह्नी उष्णस्पर्शच आहे, जल शीत स्पर्शच आहे यास्तव सर्व जगाचें स्वाभाविकच वैचित्र्य असो. दृष्टकारण संभवत असतां अदृष्टकारण कल्पना करणें योग्य नाहीं असा न्याय ही आहे. यास्तव प्राण्याचे उत्पत्तीस कामच दृष्ट कारण आहे त्या वांचून दुसरें अदृष्ट कारण ईश्वर अदृष्ट धर्माधर्मादिक नाहीं. हेंच मत लोकायतांचें आहे त्यासच नास्तिक म्हणतात. ॥ ८ ॥

## एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ॥ प्रभवंत्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥

एतां दृष्टिं – या लोकायतांचे मताप्रत – अवष्टभ्य – म्हणजे अवलंबून, नष्टात्मानः – परलोक साधन ज्यांचें भ्रष्ट झालें आहे असे – अल्पबुद्धयः – म्हणजे दृष्ट फलाचे ठायींच ज्यांची बुद्धि प्रवृत्त आहे असे, उग्रकर्माणः – म्हणजे प्राणि हिंसादिक कर्म करणारे, जगतः अहिताः – म्हणजे जगाचे शत्रू ते जगाचे, क्षयाय – म्हणजे नाशा साठीं व्याघ्र सर्पादिक स्वरूपानें, प्रभवंति – म्हणजे उत्पन्न होतात यास्तव अत्यंत अधोगतीस नेण्यास कारण अशा या मताचा अवलंब कल्याणार्थ्यानें न करून सर्वथा वर्जनच या मताचें करावें. ॥ ९ ॥.

## काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः ॥ मोहाद्गृहीत्वाऽसद्ग्राहान् प्रवर्तंतेऽशुचिव्रताः ॥ १० ॥

ते पूर्वोक्त जेव्हां कांहीं कर्मानें मनुष्य योनींत जन्मास येतात तेव्हां – दुःपूरं कामं आश्रित्य म्हणजे स्त्री द्रव्यादिक दृष्ट विषया विषयींचा जो दुःपूर म्हणजे ज्याची पूर्ती विषय भोगानें करण्यास अशक्य आहे अशा कामाचा आश्रय करून म्हणजे स्त्री द्रव्यादिका विषयीं साभिलाष होऊन – दंभमानमदान्विताः – म्हणजे धार्मिकत्व नसतां ही मी धार्मिक आहें अशी आपली प्रसिद्धी करणें अशा दंभानें आणि पूज्यत्व नसतां ही मी पूज्य आहें अशी आपली प्रसिद्धि करणें अशा मानानें आपले ठायीं उत्कर्ष मानून दुसऱ्याचा अपमान किंवा हेलनादिक असत्कार करणें अशा मदानें युक्त होत्सातें. ॥ मोहात् असद्ग्राहान् गृहीत्वा – म्हणजे या मंत्रानें या देवतेचें आराधन करून स्त्रियांचें आकर्षण किंवा वशीकरण करूं. या मंत्रानें या देवतेचें आराधन करून मोठ्या द्रव्यनिधीप्रत मिळवूं. अशा दुराग्रहाप्रत अविवेकानेंच धारण करून – अशुचिव्रताः – म्हणजे श्मशानांत प्रेतावर बसून जप करणें, निरंतर श्मशान वास करणें, निरंतर उच्छिष्टच राहणें अशा अवस्थांची ज्यांस अपेक्षा आहे अशी वामागमादिकांत सांगितलेलीं व्रतें ज्यांणीं स्वी-

कारलीं आहेत असे. प्रवर्तंते-म्हणजे ज्यांचें दृष्टच फल आहे अदृष्ट पुण्यादिक नाहीं आणि वेदविहित नव्हे असें जें क्षुद्र कोणतेही देवतादिकांचें आराधन त्याविषयीं प्रवृत्त होतात. अथवा जगाचे क्षया साठींच प्रवृत्त होतात असा पूर्वींशीं-अन्वय करावा. असे जे ते-पतंति नरकेऽशुचौ- असें पुढें सांगावयाचें आहे त्याशीं याचा अन्वय आहे. ॥१०॥

## चिन्तामपरिमेयां च प्रलयांतामुपाश्रिताः॥
## कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः॥११॥

त्याचेंच पुनः विशेषें करून निरूपण करतात. ॥ अपरिमेयां प्रलयांतां चितां उपाश्रिताः-म्हणजे चिंतन करण्याच्या अनंतत्वास्तव जिची इयत्ता नाहीं अशी आणि मरण पर्यंत-म्हणजे यावज्जीव जी राहणारी हें मला कसें मिळेल या मिळालें त्याचें संरक्षण कसें होईल अशी जी आपले योगक्षेमा विषयींची चिंता तीप्रत आश्रय केलेले त्याचिंतेनेंच सर्वदा युक्त कधींही पारलौकिक चिंता न करणारे आणि-कामोपभोग परमाः-म्हणजे शब्दादिक जे विषय त्यांचा किंवा स्त्री आदिकांचा जो उपभोग करणें हाच ज्यास पुरुषार्थ आहे. धर्माचरण करणें पुरुषार्थ ज्यांस नाहीं असे आणि-एतावदिति निश्चिताः-म्हणजे एतावत् याशरीरानें भोग ज्याचा होतो हेंच कायतें सुख याशरीराचा नाश झाला म्हणजे या देहाहून भिन्न परलोकीं जाणारा भोक्ता आत्माच नाहीं यास्तव परलोकीं जाऊन भोगावयाचें सुख नाहींच अशा निश्चयानें युक्त या प्रमाणें त्यांस निश्चय होण्यास कारण असुर मोहना साठीं लोकायतशास्त्र प्रवृत्त करणाऱ्या बृहस्पतीचीं-"चैतन्य विशिष्टकायः पुरुषः-" "अर्थकामौ पुरुषार्थौ-" इत्यादिक सूत्रें आहेत. त्यांचें विवरण तदनुयायीनीं सविस्तर केलें आहे त्यांचें दर्शनच आहे. त्याचा संक्षेप येथें लिहितों. ॥"आत्मास्ति देहाद्व्यतिरिक्तमूर्तिर्भोक्ता सलोकांतरितः फलानां॥ आशेयमाकाशतरोः प्रसूनात् प्रथीयसी स्वादुफलप्रसूतौ-" यास्थूल सूक्ष्म देहादिकांहून आत्म्याचें स्वरूप निराळें आहे तो आत्मा देह मरणानंतर लोकांतरास जाऊन यालोकीं केलेले कर्माच्या फलाचा उपभोग करतो. अशी जी मूढ लोकांची आशा आहे ती आकाश तरूचे पुष्पा पासून मधुरफल उत्पन्न होईल अशा मोठे आशे प्रमाणें अत्यंत तुच्छ आहे. पारमार्थिक विचार-करून परलोकादिक आहे इत्यादिक आपले कल्पनेनें कल्पून दुष्ट बुद्धीनें आपण आस्तिक आहों असें प्रख्यात करून या सर्वजगाची वंचना केली आहे ती अशी:-"यन्नास्त्येव तदस्ति वस्त्विति मृषा जल्पद्भिरेवास्तिकैर्वाचालैर्बहुभिस्तत्सत्यवचसो निंद्याः कृता नास्तिकाः॥ हं होपश्यत तत्वतो यदिपुनश्छिन्नादतो यर्म-

णो दृष्टः किंपरिणामरूपितन्त्रि निर्जीवः पृथक्कैरपि-" जें देहातिरिक्त आत्म वस्तु प्रत्यक्ष प्रमाणानें दिसत नाहीं तें आहे असें मिथ्या बोलणारे जे वाचाळ आस्तिक ते आपणच नास्तिक असतां खरें बोलणारे जे लोकायतिक (लोकांचे विरुद्ध-भाषण करणारे) त्यांस नास्तिक असें नांव ठेवून ते निंद्य ठरविले. पहा हें केवढें तरी आश्चर्य आहे. या शरीराचा छेद करून पाहिला तर या देहांत राहणारा देहाहून निराळा आत्मा आहे असें कोणी तरी पाहिलें आहे काय? यास्तव स्फारी-पान, चूर्ण, काथ हे एकत्र झाले म्हणजे जसा तांबडा रंग उत्पन्न होतो त्या प्रमाणें पृथिवी, जल, तेज, वायू हीं भूतें एकत्र होऊन यांचा स्थूल देहाकार परिणाम झाला म्हणजे या देहासच चैतन्य उत्पन्न होतें. त्या चैतन्यानें युक्त जो देह तोच आत्मा असा त्या बृहस्पतीचे सूत्रांचा अर्थ आहे असें वास्तव तत्त्व असून देहाहून आत्मा निराळा आहे तो परलोकीं केलेले कर्मांचे फलाचा अनुभव घेण्या करितां जातो असें-प्रतिपादन करून ते या जगाचीच वंचना करतात असें नाहीं तर आपली ही वंचना करतात. ती अशी-"तुल्यत्वे वपुषां मुखाद्यवयवैर्वर्णक्रमः कीदृशः ॥ स्त्रीचेयं व स्त्वा परस्य यदमुं भेदं न विद्मो वयं ॥ हिंसायामथवा यथेष्टगमने स्त्रीणां परस्व ग्रहे कार्याकार्य कथा स्तथापि यदमी निःपौरुषाः कुर्वते ॥". ते आस्तिक आपले शास्त्रादिकांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, चार वर्ण त्यांचे निरनिराळे धर्म आणि आश्रम त्यांचे ही धर्म निरनिराळे असें प्रतिपादन करतात. आणि परस्त्रीशीं गमन करूं नये दुसऱ्याचे द्रव्याचें चौर्य करूं नये हिंसा निरर्थक करूं नये असे साधारण सर्वांचे धर्म आहेत त्यांचे आचरणानें जीवास उत्तम लोक प्राप्त होतो निषिद्ध धर्माचरणानें नरक प्राप्त होतो असें प्रतिपादन करतात आणि धर्माचरणामुळें आपले दृष्ट सुखास मात्र मुकतात आणि जगास ही मुकवितात. परंतु विचार करून पाहा. सर्व ब्राह्मणादिकांचे शरीरास मुखादिक हस्तपादादिक अवयव समान असतां हाच ब्राह्मण, हाच क्षत्रिय असा वर्णक्रम कशानें झाला म्हणजे त्यांचे धर्माधर्म भिन्न भिन्न कशानें झाले याविषयीं प्रत्यक्ष प्रमाण तर नाहींच प्रत्यक्षाशिवाय दुसरें प्रमाणच नाहीं यास्तव हे धर्म दुसऱ्याचे ही स्त्री दुसऱ्याची त्यांचा अभिलाष करूं नये असा जो आस्तिकांनीं आपले बुद्धीनें कल्पिलेला भेद किंवा धर्म त्यास आम्हीं जाणत नाहीं. आणि हिंसा करूं नये दुसऱ्याचे द्रव्याचा अपहार करूं नये, पर्वकालीं स्त्रीशीं गमन करूं नये, परस्त्रीशीं गमन करूं नये स्वस्त्रीशींच यथायोग्य कालीं गमन करावें असा कर्तव्याकर्तव्य विचार आस्तिकांनीं कल्पिलेला आणि स्त्रीपुरुषभेद, वर्णाश्रमभेद त्यांचे धर्माचा भेद निरर्थक आणि अप्रमाण असून पुरुषार्थहीन आस्तिक करतात. अर्थ काम हे दोन पुरुषार्थ धर्म आणि मोक्ष यांविषयीं प्रमाण नाहीं यास्तव ते पुरुषार्थ नाहींत. मृत्यूच मोक्ष, पृथिवी, आप, तेज, वायू हीं चारच तत्त्वें-

तींच संयोगानें देहास चैतन्य उत्पन्न करतात. परलोक नाहीं, धर्माधर्माविषयीं प्रमाण भूत वेद असें आस्तिकांनीं मानिलें आहे परंतु त्यांनीं मानल्याप्रमाणें वेद ईश्वरा पासून उत्पन्न झाले असें ईश्वरच नाहीं यामुळें संभवत नाहीं. जे प्रत्यक्ष वेद दिसतात ते कोणी वंचकानें उत्पन्न केले आहेत यास्तव ते धर्माधर्मा विषयीं प्रमाण नाहींत. जर प्रमाण मानावे तर युक्तीशीं विरुद्ध आहेत ते असे-"स्वर्गः कर्तृक्रियाद्रव्यविनाशे यदि यज्वनां ॥ तर्हि दावाग्निदग्धानां फलं स्यात् भूरि भूरुहां-" जर वेदांत सांगितले प्रमाणें ऋत्विज्, त्यांच्या होमादिक क्रिया आणि पुरोडाशादिक द्रव्य यांच्या नाशानंतर यज्ञ करणार यजमानास स्वर्ग होईल तर दावाग्नीनें दहन पावलेले वृक्षांस पुष्कळ फळें येतील. कारणाचा अभाव दोहों ठिकाणीं तुल्य आहे-"निहतस्य पशोर्यज्ञे स्वर्गप्राप्तिर्यदीष्यते ॥ स्वपिता यजमानेन किन्न तस्मान्निहन्यते-" आणि सामान्य हिंसा निषिद्ध आहे तरी यज्ञांतील पशुहिंसा निषिद्ध नाहीं त्या पशूस स्वर्गप्राप्ती होते असें वेदांत सांगितलें आहे त्या प्रमाणें खरें मानावें तर यजमान आपला पिताच यज्ञांत कां मारीत नाहीं. तसें केल्यानें त्यासही स्वर्ग होईल." मृतानामपि जंतूनां श्राद्धं चेत्तृप्तिकारणं ॥ निर्वाणस्य प्रदीपस्य दीपः संवर्धयेत् शिखां-" वेदांत सांगितलेले प्रमाणें मरण पावलेले प्राण्यांस पुत्रादिकानें केलेले श्राद्धानें जर तृप्ति होईल तर नष्ट झालेले दीपांत तेल वाती घातल्या म्हणजे त्याची ज्योती वृद्धी पतकां पावत नाहीं. असें युक्ति विरुद्ध सर्व धर्म असतांही खावें प्यावें स्त्रियांचा उपभोग करावा अशा दृष्टसुखात्मक पुरुषार्थांचा त्याग करून धूर्त वंचकांनीं उत्पन्न केलेले शास्त्रांतील फलश्रुतिरूप आशामोदकांनीं म्हणजे मानसिकमोदकांनीं मूर्खलोकांची तृप्ति होऊन मोठे मोठे घोरतपाचरणानें या देहास ताप देतात-" क्वालिंगनं भुजनिपीडितबाहुमूलभग्नोन्नतस्तनमनोहरमायताक्ष्याः ॥ भिक्षोपवासनियमार्कमरीचिदाहैर्देहोपशोषणविधिः कुधियां क्वचैषः-" जिची कमलपत्रा सारखीं विस्तृत नयनें आहेत तीणें आपले दोनीं हात उचलून आपले कंठांत घालून आलिंगन केल्यामुळें तिचे स्तनांचें उच्चत्व नाहीसें ज्यांत झालें आहे असें अंतःकरणास आनंद करणारें स्त्रीनें केलेलें आलिंगन कोठें आणि संन्यास करून भिक्षा मागणें एकादश्यादिक व्रतांचे ठायीं अहोरात्र उपोषण नियमानें करणें, कृच्छ्र चांद्रायण मासोपवासादिक प्रायश्चित्ताचरणरूप तप करणें-सूर्य संमुख उभे राहून त्याचें अवलोकन करणें इत्यादिक साधनानीं अज्ञलोक जो देहाचा शोष करतात. तो कोठें. याचें तारतम्य पहावें. सांसारिक विषयसुख सर्व त्याचे अस्थिरत्वामुळें नाशामुळें आणि विषयांचे वियोगामुळें होणारे दुःखानें मिश्रितच आहे. यास्तव त्याचा-

त्याग करून या प्रमाणें देहाचा शोष करतात. असें म्हणावें तर." त्याज्यं सुखंविषय संगमजन्म पुंसांदुःखोपसृष्ट मितिमूर्ख विचारणैषा ॥ व्रीहीन् जिहासतिसितोत्तम तंडुलाढ्यान् कोनाम भोस्तुष कणोपहितान् हितार्थी-" विषय संयोगा पासून उत्पन्न होणारें सुख दुःख मिश्रित आहे यास्तव पुरुषानें टाकावें. असा विचार अज्ञान्याचा आहे. उत्तम शुभ्र तांदूळ ज्यांत आहेत अशा व्रीहीप्रत म्हणजे साळीप्रत त्यांवर कोंडा आहे किंवा ते कोंड्या नें आच्छादिले आहेत म्हणून जो आपलें हित व्हावें असें इच्छिणारा आहे तो कोणी टाकील कीं काय. यास्तव "अग्नि होत्रंच यो वेदा स्त्रिदंडं भस्म गुंठनं ॥ प्रज्ञा पौरुष हीनानां जीविकेति बृहस्पतिः-" अग्नि होत्रादिक सर्व कर्म ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद हे यज्ञादिकांस उपयोगी तीन वेद तसाच संन्यास अंगास भस्मोद्धूलन करणें इत्यादिक जे आहेत ते ज्यास पोट भरण्यास ज्ञान नाहीं किंवा पराक्रम नाहीं त्यास पोट भरण्याचें साधन आहे यांत दुसरा पुरुषार्थ नाहीं असें बृहस्पतीनें सांगितलें आहे. ॥११॥

**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः॥**
**ईहंते कामभोगार्थमन्यायेनाऽर्थसंचयान्॥१२**

असे ते असुर-आशापाशशतैर्बद्धाः-म्हणजे जे विषय उपायानें मिळणें अशक्य आहेत किंवा ज्या विषय प्राप्तीचीं साधनें मिळण्यास किंवा समजण्यास अशक्य आहेत ते विषय किंवा तीं साधनें आपणास मिळावीं किंवा समजावीं. यां विषयींच्या ज्या प्रार्थनात्मक मनो वृत्तिस्वरूप शतावधि आशा तद्रूप जें बंधन होण्यास कारण त्यामुळें पाशा प्रमाणें पाश त्यांहीं करून जे बद्ध म्हणजे कल्याणा पासून भ्रष्ट करून हिकडे तिकडे विषयां कडेच ओढून घेतलेले आणि-कामक्रोधपरायणाः-म्हणजे काम आणि क्रोध हेच आहेत, मुख्य आश्रय ज्यांस असे म्हणजे परस्त्री गमन करावें, दुसऱ्यानें अनिष्ट करावें अशा अभिलाषानें सर्वदा युक्त- कामभोगार्थं अन्यायेन अर्थ संचयान् ईहंते-म्हणजे असे ते असुर विषय भोगार्थच दुसऱ्याचे स्त्रीचें किंवा द्रव्याचें हरण करणें इत्यादिक जो अन्याय म्हणजे अधर्म तेणें करून द्रव्यादिक अर्थाचे राशी मिळवावे याविषयीं इच्छा पूर्वक कायिकादिक व्यापार करतात. संचयं-याएकवचनानेंच धनादिकांचा समुदाय रूप अर्थ त्या पदानें निष्पन्न होत असतां-संचयान्-असें बहुवचन धन प्राप्त झालें तरी अधिक अधिक धन मिळावें अशी तृष्णा सतत प्रवृत्त आहेच तद्रूप लोभही त्यांस बहुत आहे असें दाखविण्यां साठीं आहे. ॥१२॥

**इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम्॥ इ-**

## द मस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥१३॥

तोच लोभ मनो राज्यानें दाखवितात. इदं अद्य मया लब्धं-म्हणजे हें धन आज म्या उपायानें मी मिळविलें- इमं मनोरथं प्राप्स्ये- म्हणजे यापेक्षां दुसरें मनाला संतोष करणारें मिळवीन- इदं अस्ति-म्हणजे हें पूर्वींच माझे घरांत संचय केलेलें आहे-इदमपि मे धनं पुनर्भविष्यति- म्हणजे हें ही घरांतील धन पुढील संवत्सरांत वृद्धीनें पुष्कळ होईल. या प्रमाणें धन तृष्णा लोभानें, व्याप्त झालेले पतंनिनरके ऽशुचौ- असा पुढें अन्वय. ॥१३॥

## असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ॥ ईश्वरो ऽहमहं भोगी सिद्धोहं बलवान्सुखी ॥१४

या प्रमाणें लोभाचें निरूपण करून त्यांच्या अभिप्रायाचे वर्णनानें त्यांच्या क्रोधाचें वर्णन करतात. ॥ असौ शत्रुःमया हतः-म्हणजे हा अमुक दुर्जय शत्रु मीं मारला. ॥ अपरान् अपि हनिष्ये- म्हणजे दुसरेही शत्रू मी अनायासें करून मारीन, माझेमारपून कोणी ही शत्रु जगणार नाहीं. चकारानें केवल त्यांस मारीन इतकेंच नाहीं त्यांच्या स्त्रिया त्यांचें धन यांचें ही हरण करीन. तुला इतकें सामर्थ्य कोठून त्या विषयीं सांगतात. अहं ईश्वरः- म्हणजे मला मनुष्य समजूं नये मी ईश्वरत्व आहें यास्तव माझे बरोबरीचा किंवा अधिक शत्रू नाहींच. आपलें ईश्वरत्वच स्पष्ट करतो. ॥ अहं भोगी अहं बलवान् अहंसिद्धः अहं सुखी-म्हणजे ज्या कारणास्तव सर्व भोगोपकारणानें मी युक्त आहें आणि मी भृत्य पुत्रादिक जे सहाय्य त्यांनींयुक्त आहें आणि स्वतः बलवान् आहें आणि सुखी म्हणजे निरोगी आहें. ॥१४॥

## आढ्यो ऽभिजनवानस्मि को ऽन्योस्ति सदृशो मया ॥ यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञान विमोहिताः ॥१५॥

आणि धनानें किंवा कुलानें माझ्या सारखा दुसरा कोणी नाहीं असें सांगतात. ॥ आढ्यः अभिजनवान् अस्मि -म्हणजे मी धनाढ्य किंवा धन धान्य पशू यांनीं संपन्न आणि मोठ्या विस्तार पावलेले कुळाचा आहें ॥ मया सदृशः कः-अन्यः अस्ति-म्हणजे यास्तव माझे बरोबरीचा दुसरा कोण आहे. यक्ष्ये- मी याग करीन किंवा यागें करून ही दुसऱ्याचा पराभव करीन आणि दास्यामि-म्हणजे नट नर्तक स्तुति पाठक यांस पुष्कळ द्रव्य देईन आणि त्यांनीं केलेले स्तुति आदिकानें

संतोष किंवा हर्ष पावेन ॥ इति अज्ञानेन विमोहिताः – म्हणजे या अशा अविवेकानें अनेक प्रकारच्या भ्रम परंपरा प्रत पावविलेले . ॥ १५॥

**अनेकचित्तविभ्रांता मोहजालसमावृताः ॥ प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेऽशुचौ ॥ १६॥**

अनेकचित्तविभ्रांताः – म्हणजे पूर्वोक्त प्रकारचे अनेक जे ते ते चित्तांतील दुष्ट संकल्प, त्यांनीं नाना प्रकारच्या भ्रमांत पडलेले – मोहजालसमावृताः – म्हणजे ज्या कारणास्तव हित कोणतें अहित कोणतें याविषयींच्या विवेकाविषयीं चें जें असामर्थ्य तद्रूप मोहच बंध करणारें जाळें त्यानें सूत्रमय जाळ्यानें मत्स्याप्रमाणें उत्तम प्रकारानें वेष्टिलेले म्हणजे परवश झालेले आणि कामभोगेषुप्रसक्ताः – म्हणजे आपलें हित ज्यांत नाहीं अशा कामभोगाविषयीं प्रसन्न झालेले सर्वदाविषय भोग परायण ते असुर ॥ अशुचौ नरके पतंति – म्हणजे ज्यांत मूत्रपुरीषादिक बहुत आहे . अशा वैतरण्यादिक अशुद्ध नरकाचे ठायीं पतन पावतात. ॥ १६॥

**आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ॥ यजंते नामयज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥ १७॥**

त्या असुरांमध्यें हीं कितीएक वेद प्रतिपादित यज्ञ यागादिकाचें अनुष्ठान करण्यास प्रवृत्त होतात असें पाहण्यांत आहे तेव्हां त्यास नरकपतन कसें होईल - अशा शंकेचें निराकरण करतात ॥ आत्मसंभाविताः – म्हणजे आह्मीं सर्वगुणसंपन्न असें आपणच आपणास पूज्यत्व मानणारे आणि स्तब्धाः – म्हणजे नम्र नव्हेत कारण – धनमानमदान्विताः – म्हणजे धननिमित्तक जो आपले ठायीं अतिशयित पूज्यत्वाभिमान आणि तन्निमित्तक जो गुरु आदिकाचे ठायीं अपूज्यत्वाभिमानरूप मद, त्यांनीं युक्त असे जे ते ते असुर ते नामयज्ञैः – म्हणजे सात्विक नव्हेत केवल नांवाचे मात्र यज्ञ अथवा हे सोमयाजी हे दीक्षित असें नाम मात्र मिळण्याचे उपयोगी जे यज्ञ ते नामयज्ञ त्यांनीं अविधिपूर्वकं दंभेन यजंते – म्हणजे ज्यांत विहित अंगाचें अनुष्ठान नाहीं आणि आपली पत्नीची ऋत्विजांचीं शुद्धि ज्यांत नाहीं असे अविधीनेंच केवल दंभानें आपलें धर्मध्वजित्व लोकांत प्रसिद्ध व्हावें या हेतूनें यजन करतात. श्रद्धेनें करीत नाहींत. यास्तव त्यांचें फल त्यांस प्राप्त होत नाहीं असें तात्पर्य. ॥ १७॥

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ॥ मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ॥ १८॥**

यक्ष्ये दास्यामि इत्यादिक दंभाहंकारादि प्रधान संकल्पानें यागादिकां विषयीं प्रवृत्त झालेले जे असुर त्यांचे याग दानादिक बहिरंग साधन भूत जें कर्मादिक तें ही सिद्ध होत नाहीं मग ज्ञान वैराग्य भगवद्भक्ति रूप अंतरंग-साधन कोठून सिद्ध होईल असें सांगतात. अहंकारं-म्हणजे मीच श्रेष्ठ असा आरोपित गुणानें अभिमान. बलं-म्हणजे दुसऱ्याचा पराभव करणारें शारीर सामर्थ्य रूप बल किंवा धन अभिजन म्हणजे बांधवादिक तन्निमित्तक बलं, दर्प-म्हणजे गुरु राजादिकांचा अतिक्रम करण्यास कारणभूत मनाचा दोष-कामं क्रोधंच संश्रिताः-म्हणजे इष्टविषयाभिलाषरूप काम अनिष्ट विषयक द्वेष रूप क्रोधच कारें करून परगुणाचें सहन करणें असें मात्सर्य इत्यादिक दोषांप्रत आश्रय केलेले म्हणजे त्या दोषांनीं युक्त असें जरी पतित आहेत तरी ते तुझ्या भक्तीनें पूत होऊन तरतील असें म्हणाल तर त्या विषयीं सांगतात.-मां आत्मपर देहेषु प्रद्विषंतः अभ्यसूयकाः-म्हणजे त्या असुरांचे आणि त्यांचे जे स्त्रीपुत्रादिकांचे प्रेमास्पद देह त्यांचे ठायीं त्यांच्या साक्षित्वें करून राहणारा जो मी-याचा दुर्दैवामुळें द्वेष करणारे माझी ईश्वराची जी आज्ञा तद्रूप जे वेद स्मृति पुराणादिक शास्त्र आणि तदुक्तानुष्ठान यांस पराङ्मुख होऊन त्यांचें उल्लंघन करणें तद्रूप द्वेष करणारे राजादिकांच्या आज्ञेचें उल्लंघन करणें हाच राजादिकांचा द्वेष-असें लोक प्रसिद्ध आहे आणि अभ्यसूयकाः-म्हणजे जे वैदिक मार्गस्थ आहेत असे जे गुरु आदिक कोणी ते जर वेदशास्त्रांचें उल्लंघन करूं नये कामक्रोधादिक टाकून शमादि संपन्न असावें असा उपदेश करूं लागले तर हे परस्त्री परद्रव्य हरण करण्या विषयीं अशक्त असून किंवा विषयोपभोग करण्या विषयीं असमर्थ असून "अशक्तास्तत्पदं गंतुं ततो निंदां प्रकुर्वते-" या न्यायानें आमची प्रतारणा किंवा वंचना करतात असा त्यांवर दोषारोप करणें अशी जी त्यांची अभ्यसूया ती करणारे अथवा स्व देहाचे ठायीं आणि परदेहाचे ठायीं चित्स्वरूपानें स्थित जो मी याचा द्वेष करीत असतां दंभानें अविधि पूर्वक नामयज्ञानें याग-करतात. दंभानें केलेले यज्ञादिकांचे ठायीं श्रद्धा नसल्यामुळें दीक्षादिक घेण्यामुळें आत्म्यास व्यर्थ पीडा मात्र होते आणि पश्वादिकांचीही अविधीनें हिंसा झाल्यामुळें चैतन्य द्रोह मात्र अवशिष्ट राहतो असें तात्पर्य. अथवा भगवल्लीला विग्रह रूप जो वासुदेवाख्य देह तो आत्म देह त्याचे ठायीं मनुष्यत्व भ्रमानें माझा द्वेष करणारे आणि प्रल्हादादिक जे परदेह त्यांचे ठायीं सर्वदा आविर्भूत जो मी याचा द्वेष करणारे असे ते आहेत यास्तव ते भक्तीनें पूत होत नाहींत. ॥१८॥

**तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान्॥-**

क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु॥१९

ते जरी तुझा द्वेष करतात तथापि तूं त्यांवर कृपा करून त्यांस तारशील असें म्हणेल तर नाहीं असें सांगतात.॥ तान् द्विषतः क्रूरान् नराधमान्–म्हणजे सन्मार्गाचे शत्रुभूत आणि माझा आणि साधूंचा द्वेष करणारे आणि हिंसात्मक क्रूर कर्म करणारे यास्तव मनुष्यांमध्यें अति निंदित असे जे–अजस्रं अशुभान् म्हणजे निरंतर अशुभ कर्म करणारे असुर त्यांप्रत॥ अहं संसारेषु आसुरीषु योनिषु एव क्षिपामि–म्हणजे सर्वकर्म फलदाता मी ईश्वर नरकांत जाण्यास जे मार्ग त्यांचे ठायीं घालतों. नरकांत गेल्यानंतर त्यांप्रत असुर योनीचे ठायीं म्हणजे सर्पव्याघ्रादिक ज्या हिंसा करणाऱ्या योनी त्यांच्या ठायीं त्यांच्या कर्मवासनानुसार घालतों. असे द्रोह करणारे जे आहेत त्यांचे ठायीं माझी कृपा नाहीं त्यांस त्यांचे कर्मानुसार मी फल देतों यामुळें द्वेष ही नाहीं यामुळें ईश्वरास मला कोणावर वैषम्य किंवा निर्दयत्व नाहीं. हाच अर्थ जे कुत्सिताचरण करणारे आहेत ते लौकरच श्वयोनी किंवा सूकर योनी किंवा चांडाल योनी प्रत पावतात अशा अर्थाची श्रुती सांगते. यावरून जे पापकर्माचरणी निरंतर आहेत त्यांचे ठायीं त्यांचे बीज सर्वदा आहे. यामुळें त्यां पासून ईश्वर त्यांचे कर्मानुसार पापच करवितो परमेश्वर कारुणिक असला तरी त्यांच्या त्या पापकर्म वासनात्मक बीजाचा नाश करणारा पुण्योपचय (पुण्यवृद्धि) नाहीं यामुळें नाश करीत नाहीं आणि ते अयोग्य आहेत यास्तव समर्थ असला तरी पुण्योपचय त्यांकडून करवीत नाहीं ईश्वर स्वतंत्र सर्वशक्तीनें युक्त असला तरी पाषाणाचे ठायीं व्रीहि यवादिकांच्या अंकुराप्रत जसा उत्पन्न करीत नाहीं त्याप्रमाणें तर तसें करण्यास समर्थच ईश्वर नाहीं असें समजूं नये. सत्यसंकल्प यास्तव जर संकल्प करील तर समर्थ आहे परंतु वेदशास्त्रादिरूप आपल्या आज्ञांचें उल्लंघन करणारे आणि साधूंचा द्रोह करणारे असे जे दुष्ट यांचे ठायीं यांचा पुण्योपचय व्हावा असा अयोग्य संकल्प ईश्वर यास्तवच ईश्वर करीत नाहीं त्यांचे ठायीं अप्रसन्नच राहतो. जे आपल्या वेदशास्त्ररूप आज्ञेचें पालन करतात त्यांचे ठायीं प्रसन्न होऊन त्यांकडून पुण्योपचय करवितो मग ईश्वरास वैषम्य किंवा निर्दयत्व कोठून असें याचें तात्पर्य– यास प्रमाण ईश्वर कर्मसापेक्ष आहे म्हणजे इच्छावान आहे. यामुळें ईश्वर विषम सृष्टी करीत असतांही त्यास वैषम्य किंवा निर्दयत्व नाहीं ईश्वर कर्मसापेक्ष आहे असें हा ईश्वरच ज्यास ऊर्ध्वलोकीं नेण्यास इच्छितो त्याकडून पुण्यकर्म करवितो ज्यास अधोलोकास न्यावयास इच्छितो त्याकडून पापकर्म करवितो अशा अर्थाची श्रुती सांगते. असें श्रीवेदव्यासानीं ब्रह्ममीमांसेंत द्वितीयाध्यायीं सविस्तर कर्मास अनादित्व सांगून निरू-

पिलें आहे. ॥१९॥

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ॥**
**मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिम् ॥२०॥**

त्यांस क्रमानें बहुत जन्मांचे अंतीं ही कल्याण होत नाहीं असें सांगतात. ॥आसुरीं योनिं आपन्नाः– म्हणजे जे कदाचित् आसुरी योनी प्रत पावले ते–जन्मनि जन्मनि मूढाः – म्हणजे जन्मजन्माचे ठायीं तमो गुणाचे बाहुल्यास्तव अविवेकी होत्साते – हे कौंतेय मां अप्राप्यैव अधमां गतिं यांति – म्हणजे हे कुंतीपुत्रा अर्जुना त्यांस माझी प्राप्ती होण्याची शंकाच नाहीं. मी सांगितला जो वेदमार्ग त्याप्रत न पावून म्हणजे त्याचें अनुष्ठान न करून त्यापेक्षां ही निकृष्ट गतीप्रत पावतात. एवकारानें स्थावरादिक योनींचे ठायीं वेदमार्गाचे अनुष्ठानाची योग्यताच नाहीं असें सूचविलें. त्यावरून तमोगुणाचे बाहुल्यास्तव ते असुर वेदमार्गानुष्ठान करण्यास अयोग्य स्थावर पशु आदिक होऊन पूर्व पूर्वीच्या योनीपेक्षां अत्यंत निकृष्ट नरकरूप योनी प्रत जातात. असा अर्थ सूचविला. कौंतेय या संबोधनानें या संकटापासून तूं तरलास असें सूचविलें. आणि ज्या कारणास्तव एकदा कदाचित् आसुरी योनी प्रत जे पावले त्यास तमो गुणाचे प्राबल्यानें उत्तरोत्तर निकृष्ट निकृष्ट तर निकृष्ट तम योनींत जन्म होऊन तमोगुणाचे बाहुल्यास्तव त्याचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य राहात नाहीं यास्तव जों पर्यंत मनुष्य देहाचा लाभ आहे तों पावेतों मोठ्या प्रयत्नानें महा कष्ट देणारी जी आसुरी संपत्ति तीचा परिहार होण्या साठीं त्वरेनें यथाशक्ति दैवी संपत्तीचें अनुष्ठान च कल्याणार्थ्यांनीं करावें. नाहींतर तिर्यगादिक योनी प्राप्त झाली म्हणजे ती त्याचें अनुष्ठान करण्यास अयोग्य आहे या मुळें उत्तरोत्तर निकृष्ट योनींत जन्म होण्याचा परिहार अशक्य होऊन मोठें संकट प्राप्त होईल असें ही या सर्व प्रकरणानें सूचविलें हाच अर्थ–" इहैव नरकव्याधेश्चिकित्सां न करोतियः ॥ गत्वा निरौषधं स्थानं स रुजः किं करिष्यति– " या मनुष्य देहाचे ठायींच नरकरूप व्याधीची चिकित्सा करीत नाहीं तो जेथें औषध मिळत नाहीं त्या स्थानीं जाऊन त्या रोगाची चिकित्सा काय करील अशा अर्थाच्या वाक्यांत सांगितला आहे. ॥२०॥

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ॥ कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥२१॥**

आसुरी संपत्तीचे अनंत भेद आहेत त्यांचा परिहार पुरुषायुष्यांत कसा होईल तें तर स्वल्प आहे अशी शंका होईल तिचे निवृत्ती साठीं त्या असुर सं-

पत्तीचा संक्षेप सांगतात. ॥ काम क्रोध लोभ इदं त्रिविधं - म्हणजे एतद्रूप हें - तीन प्रकारचें ॥ नरकस्य द्वारं आत्मनः नाशनं - म्हणजे सर्व आसुर संपत्तीस मूलभूत आणि नरक प्राप्तीस साधन आणि आत्म्याचा नाश करणारें म्हणजे सर्व पुरुषार्थ प्राप्त होण्यास अयोग्यता संपादन करून अधम योनी प्रत पाववणारें असें आहे. तस्मात् एतत् त्रयं त्यजेत् - म्हणजे ज्या कारणास्तव हे काम, क्रोध, लोभ तीनच सर्वानर्थांस कारण आहेत यास्तव या तिघांचा त्याग करावा. यांच्या त्यागानें सर्व आसुरी संपत्तीचा त्याग होतो. यांचा त्याग हे उत्पन्न झाले तरीं त्यांचें कार्य विवेकानें न होऊं देणें विवेकानें तर त्यांची उत्पत्ति न होणें असें तात्पर्य. ॥ २१ ॥

## एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ॥ आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥

या तिघांचा त्याग करणारास काय फल होतें तें सांगतात. हे कौंतेय तमो द्वारैः एतैः विमुक्तः - म्हणजे हे कुंती पुत्रा अर्जुना नरकास साधन भूत जे हे काम, क्रोध, लोभ त्यांनीं रहित जो मनुष्य तो - आत्मनः श्रेयः आचरति - म्हणजे कामादिकांचे प्रतिबंधामुळें पूर्वी आपलें कल्याण करणारें जें वेदोक्त धर्मांचें अनुष्ठान त्याचें आचरण करीत नव्हता तो प्रतिबंध गेल्यामुळें त्याचें अनुष्ठान करतो. - ततः परां गतिं याति - म्हणजे तदनंतर चित्त शुद्धीस कारण वेदोक्त धर्मांचें अनुष्ठान केल्या मुळें शुद्ध चित्त होत्साता ज्ञान द्वारा मोक्षाख्य परगती प्रत पावतो असें तात्पर्य. ॥ २२ ॥

## यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ॥ न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥

आपल्यास श्रेयस्कर धर्मानुष्ठान कोणतें आणि अश्रेयस्कर कोणतें हें केवल वेदशास्त्रा वरून समजण्याचें आहे यास्तव - यः शास्त्र विधिं उत्सृज्य - म्हणजे हा धर्म हा अधर्म अशा अपूर्व म्हणजे शास्त्रा शिवाय न समजला जो अर्थ त्याचा उपदेश करणारें जें शास्त्र - म्हणजे वेद किंवा तदनुसारी स्मृति पुराणादिक त्यांत सांगितलेला जो, हें कर्म करावें हें कर्म करूं नये असा विधि म्हणजे कर्मादिकांचे ठायीं पुरुषास प्रवृत्त किंवा निवृत्त करणारे विधिनिषेध त्यां प्रत अश्रद्धेनें टाकून - काम कारतः वर्तते - म्हणजे आपले इच्छे प्रमाणें वर्ततो - म्हणजे जें विहित आहे त्याचें आचरण करीत नाहीं आणि जें निषिद्ध आहे त्याचें आचरण करतो. - सः सिद्धिं न अवाप्नोति - म्हणजे तो पुरुषार्थ प्राप्तीस योग्य जी अंतःकरण शुद्धि ती प्रत पावत नाहीं. - न सुखं - म्हणजे आणि ऐहिक

सुखाप्रत ही पावत नाहीं,- न परांगतिं- म्हणजे आणि मोक्षाख्य उत्कृष्ट गती प्रत ही पावत नाहीं. ॥२३॥

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ॥ ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥ ॥ इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

तस्मात् ते-कार्याकार्यव्यवस्थितौ शास्त्रं प्रमाणं- म्हणजे ज्या कारणास्तव शास्त्रविमुख होऊन कामक्रोधादिकांच्या स्वाधीन होऊन आपले इच्छे प्रमाणें कर्माविषयींची प्रवृत्ति इहलोकींच्या आणि परलोकींच्या पुरुषार्थाचा नाश करणारी आहे याकारणास्तव-श्रेयोर्थी- म्हणजे कल्याणार्थी जो तूं यास कोणतें करावें कोणतें न करावें अशा व्यवस्थिति विषयीं म्हणजे निश्चया विषयीं वेद आणि तदनुसारी स्मृतिपुराणादिकच प्रमाण म्हणजे बोध करून देणारें आहे. यास्तव- शास्त्रविधानोक्तं ज्ञात्वा इह कर्म कर्तुं अर्हसि- म्हणजे या कर्माधिकार भूमीचे ठायीं हें कर्म करावें हें कर्म न करावें अग्निहोत्रादिक न केलें तर हा दोष आहे. त्याचे परिहारार्थ हें कृच्छ्रादिक प्रायश्चित्त आहे. ब्रह्महत्यादिक केलें असतां हा दोष आहे त्याचे परिहारार्थ अश्वमेधादिक करावें किंवा दुसरें द्वादशाब्दादिक करावें असा जो शास्त्रांतील विधि त्याणें विहित किंवा निषिद्ध असें सांगितलेलें कर्म स्वरूप जाणून जें निषिद्ध असेल त्याचें वर्जन करून क्षत्रियास विहित जें युद्धादिक कर्म तें अंतःकरणशुद्धि होई तों पर्यंत करण्यास तूं योग्य आहेस. यावरून जो शास्त्रानुसरण करून राहतो त्यासच चित्तशुद्ध्यादिक प्राप्त होतें दुसऱ्यांस होत नाहीं असें सिद्ध झालें. या अध्यायांत याप्रमाणें सर्व आसुर संपत्तीस मूलभूत आणि सर्व अकल्याणरूप अनर्थाप्रत पावविणारे आणि सर्व कल्याणाचे प्राप्तीस प्रतिबंध करणारे मोठे काम क्रोध लोभ रूप जे दोष त्यांप्रत टाकून कल्याणार्थ्यांनीं श्रद्धायुक्त होऊन शास्त्रावर प्रामाण्य बुद्धि करून वद्युक्त धर्मानुष्ठान करण्यास तत्पर असावें असा अर्थ दैवी आणि आसुरी या संपत्तींच्या विभागानें दाखविला असें जाणावें. ॥२४॥

इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथशास्त्रिकृत भाषाविवृत्तौ षोडशोऽध्यायः समाप्तः ॥१६॥

अध्याय १७ वा.

अर्जुन उवाच ॥ ॥ ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयाऽन्विताः ॥ तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥ ॥ ॥

कोणी शास्त्रविधी जाणून ही अश्रद्धेमुळें त्याचा त्याग करून आपले इच्छे प्रमाणेंच कर्म करतात. ते सर्व पुरुषार्थ प्राप्तीस अयोग्य असुर, कोणी शास्त्रविधी जाणून त्यावर श्रद्धा ठेवून तदनुसार निषिद्धाचें वर्जन करून विहिताचें अनुष्ठान करतात. ते सर्व पुरुषार्थ प्राप्तीस योग्य देव असें पूर्वाध्यायांत सांगितलें. जे शास्त्रीय विधीचा त्याग क्लेश आलस्यादि कारणामुळें करून श्रद्धायुक्त होत्साते विगीत (विशेषें करून गाइलेले) लोकांतील वृद्ध व्यवहार मात्राकडे लक्ष्य देऊन गतानुगतिकत्वें करून म्हणजे पूर्वींचे लोक करीत आले म्हणून आपण ही करावें. अशा न्यायानें निषिद्धाचें वर्जन करून जें शास्त्रविहित नाहीं असें देवपूजादिक म्हणजे माझे बापानें किंवा गुरूनें केलेला हा कूप किंवा दुसरें कांहीं गंगेपेक्षां ही शंभरपट अधिक आहे याचे ठायींच स्नान पानादिक करून त्याचीच पूजा प्रदक्षिणादिक करून मी सर्व पुरुषार्थ पावेन अशा श्रद्धेनें पूर्वींचे लोक करीत आल्या प्रमाणें त्या कूपादिकाचें पूजादि कर्म करतात या प्रमाणें त्रिविध कर्म कर्ते लोकांत आहेत. त्यांत तिसरे जे सांगितले त्यांवर शास्त्रीय विधीचा त्याग करणें असें असुराचें सादृश्य आहे आणि श्रद्धा पूर्वक पूजनादिक करतात. हें देवांचें ही सादृश्य आहे यास्तव याचा अंतर्भाव म्हणजे समावेश पूर्वाध्यायोक्त देवांत आहे. किंवा असुरांत आहे त्यांवर दोघांचें ही सादृश्य आहे आणि विशेषतर दोघांपेक्षां दिसत नाहीं यामुळें यांस देव किंवा असुर यांतील अमुकच म्हणावें असा निश्चय होत नाहीं या संशयानें युक्त अर्जुन प्रश्न करतो. ॥ ये शास्त्रविधिं उत्सृज्य- म्हणजे जे पूर्वीं सांगितलेले देवा प्रमाणें शास्त्रानुसारी नसून श्रुतिस्मृति विधीचा त्याग करून म्हणजे जाणून ही आलस्यादि कारणानें त्याचा अनादर करून असुरां प्रमाणें अश्रद्धालू नसून- यजंते श्रद्धयान्विताः- म्हणजे श्रद्धें करून युक्त होत्साते केवल लोकव्यवहार मात्रा कडे लक्ष्य देऊन गतानुगतिक न्यायानें पूर्वोक्त देव पूजादिक कर्मानुष्ठान करतात.- तेषां निष्ठा तु का कृष्ण- म्हणजे शास्त्रविधीचा त्याग आणि श्रद्धा या दोन धर्मांनीं युक्त असल्यामुळें पूर्वोक्त देव आणि असुर यांहून विलक्षण असे जे ते पूर्वोक्त देवपूजादिक करणारे त्यांची जी निष्ठा म्हणजे शास्त्रविधीची उपेक्षा आणि श्रद्धा एतत्पूर्वक त्या देवपूजादिक कर्माविषयींची व्यवस्थिति- हे कृष्णा का कोणती- सत्वं आहो रजः तमः- म्हणजे काय सात्विकी,

राजसी किंवा तामसी म्हणावी. सत्व ही एक कोटी किंवा वर्ग. रज, तम ही एक कोटी किंवा वर्ग; असा दोन प्रकारचा विभाग दाखविण्या करतां आहो असें पद आहे. सात्विकी म्हटली तर ते देवच होतील राजसी तामसी म्हटली तर ते असुर होतील असा प्रश्नाभिप्राय. या प्रश्नाभिप्रायांत जो लौकिक व्यवहार सांगितला तो विगीत म्हणजे शिष्टानीं ज्याचा स्वीकार(अंगिकार) केला नाहीं. तो जाणावा ज्याचा शिष्टानीं स्वीकार केला आहे त्यास सदाचारत्वच आहे तो श्रुति स्मृती प्रमाणें धर्माधर्म विधिरूप प्रमाणच आहे यामुळें त्या आचारा प्रमाणें कर्म केलें असतां त्यांस शास्त्रविधीचा त्याग होत नाहीं हें कर्म केलें असतां त्या पासून फल होईल किंवा नाहीं अशी ज्यांस भ्रांति नाहीं त्यांस शिष्ट म्हणावें. ॥१॥.

**श्रीभगवानुवाच॥ ॥त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा॥ सात्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥२॥**

सात्विक, राजस, तामस या भेदानें श्रद्धा भिन्न भिन्न आहे. जे सात्विक श्रद्धेनें युक्त ते देव ते शास्त्रोक्त साधनानुष्ठाना विषयीं अधिकारी होतात आणि त्यां पासून त्यांस फल ही होतें. जे राजस किंवा तामस श्रद्धेनें युक्त ते असुर ते शास्त्रोक्त साधना विषयीं अधिकारी नाहींत आणि त्यांचे अनुष्ठानानें शास्त्रोक्त फलही त्यांस होत नाहीं असें आहे यास्तव पूर्वोक्त पूजादिक करणारे जे त्यांवर पूर्वोक्त देवांचें आणि असुरांचें सादृश्य असलें तरी ते देवा पेक्षां निराळे देवांचे वर्गांत किंवा कोटींत नाहींत असुरांचेच वर्गांत किंवा कोटींत आहेत असा निश्चय होण्यास देवांच्या सात्विक श्रद्धे पेक्षां त्यांची राजसी किंवा तामसी श्रद्धा निराळी आहे हा विशेष दिसत आहे असा विवेक सांगून पूर्वोक्त अर्जुनाचा संशय दूर करीत असतां अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर श्री कृष्णभगवान् सांगतात. सात्विकी राजसी तामसी चेति देहिनां त्रिविधा श्रद्धा भवति - सा स्वभावजा अस्ति - म्हणजे देहाभिमान युक्त जे प्राणी त्यांचीं धर्माधर्मादिक जीं प्राक्जन्मार्जित शुभाशुभ कर्में त्यांचा मरण कालीं अभिव्यक्त झालेला वर्तमान देहाला उत्पन्न करणारा जो संस्कार तो स्वभाव तो सात्विक राजस तामस असा तीन प्रकारचा आहे. त्या पासून उत्पन्न झालेली श्रद्धा सात्विकी, राजसी तामसी या भेदानें तीन प्रकारची आहे पूर्व जन्मीं सात्विक देवपूजादिक धर्माचें अनुष्ठान ज्यांणीं केलें आहे त्यांस सात्विकीच श्रद्धा होते. पूर्व जन्मीं राजस यक्षादि पूजारूप धर्माचें अनुष्ठान ज्यांणीं केलें आहे त्यांस राजसी श्रद्धा उत्पन्न होते. तामस भूत प्रेतादिकांचे पूजादिक रूप धर्माचें अनुष्ठान ज्यांणीं केलें आहे त्यांस तामस श्रद्धा उत्पन्न होते असें तात्पर्य अथवा ज्या-

श्रद्धेनें युक्त होत्साते शास्त्रविधीचा त्याग करून जे पूजादिक करतात त्या प्राण्यांची पूर्वोक्त तीन प्रकारच्या स्वभावापासून उत्पन्न झालेली श्रद्धा कार्यकारणानुरूप होते यामुळें ती सात्विकी, राजसी, तामसी या भेदानें तीन प्रकारची आहे. आरंभ झालेल्या वर्तमान जन्माचे ठायीं शास्त्रार्थ तत्त्व जाणणारे जे विद्वान् त्यांस शास्त्रार्थाच्या यथार्थ तत्त्वज्ञानाचे संस्कारामुळें झालेली जी देवपूजादिक शास्त्रविहित कर्मादिकाविषयीं ची श्रद्धा तीस उत्पन्न करणारें सात्विक शास्त्रार्थ तत्त्वज्ञानरूप कारण एकरूपत्व आहे यास्तव ती केवल सात्विकीच आहे राजसी किंवा तामसी नाहीं असा प्रथम चकाराचा अर्थ जी श्रद्धा उत्पन्न होण्यास शास्त्राची अपेक्षा नाहीं प्राणिमात्रांस जी पूर्वोक्त स्वभावापासूनच होते तीच स्वभावाचे त्रिविध (तीन प्रकार) त्यास्तव तीन प्रकारची असा एवकाराचा अर्थ केवल सात्विक श्रद्धा आणि त्रिविध स्वभावापासून उत्पन्न झालेली त्रिविध श्रद्धा यांचा समुच्चय शेवटचे चकाराचा अर्थ-असें ही व्याख्यान कोणी करतात. तां शृणु - त्या त्रिविध श्रद्धेप्रत मी तुला सांगतों-ती एक अथवा दुसरे व्याख्येनें ज्या कारणास्तव पूर्व जन्मीय पूर्वोक्त वासनाख्य स्वभावास दूर करणारें शास्त्रार्थाचें यथार्थ ज्ञान ज्यांणीं शास्त्राचा अनादर केला आहे अशा प्राण्यास नाहीं यास्तव त्यांची त्यांच्या तीन प्रकारच्या स्वभावाप्रमाणें जी त्रिविध (तीन प्रकारची) श्रद्धा ती तुला सांगतों ती ऐक आणि देव कोण व असुर कोण यांचा तूंच आपले मनांत विचार करून निश्चय कर. ॥२॥

## सत्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत॥ श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः॥ ३॥

श्रद्धेनें युक्त होत्सातां बुद्धीनेंच ठायीं आत्म्याप्रत पाहावें. अशा अर्थाचे श्रुतींत आत्मदर्शनाचे साधनांत श्रद्धा अंतरंग साधन असें सांगितलें आहे यावरून शमदमादिकाप्रमाणें श्रद्धा सात्विकीच आहे. राजसी किंवा तामसी-नाहीं आणि शम, दम, तितिक्षा, विचार, तप, सत्य, दया, स्मृति, तुष्टी, त्याग, अस्पृहा, श्रद्धा, ह्रीः-म्हणजे दुष्ट कर्माचरणाविषयीं लोकलज्जा, दया, सुख, या सत्वगुणाच्या वृत्ती आहेत. असें तुह्मींच कृष्णा उद्धवास सांगितलें आहे यावरून ही सत्वगुणाचें कार्य अशी जी श्रद्धा ती सात्विकच आहे असें होतें असें असून येथें श्रद्धा सात्विक, राजस, तामस, अशा भेदानें तीन प्रकारची कशी सांगतां या शंकेचें निराकरण करण्या करतां अंतःकरण कार्यभूत श्रद्धेस त्रिविधत्व (त्रिप्रकारत्व) येण्यास तिचे कारणभूत अंतःकरणास त्रिविधत्व सांगतात.॥ हे भारत सर्वस्य श्रद्धा सत्वानुरूपा भवति- म्हणजे हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, सर्व प्राणिमात्राची श्रद्धा सत्व म्हणजे अंतःकरण तदनुरूप होते. तात्पर्य-

सत्वगुण प्रधान जो त्रिगुणात्मक अपंची कृत पंच महाभूतें त्यां पासून उत्पन्न झालेलें म्हणजे अपंची कृत भूतांचे जे प्रत्येक सत्वांश त्यां सर्वा पासून उत्पन्न झालेलें सत्व म्हणजे प्रकाश करण्याच्या स्वभावाचें अंतःकरण तें कोठें सत्वगुणाचे उत्कर्षानेंच युक्त असतें जसें देवांचे अंतःकरण- कोठें रजोगुणानें पराभव केलेल्या सत्वगुणानें युक्त असतें जसें यक्षादिकांचें- कोठें तमोगुणानें पराभव केलेल्या सत्वगुणानें युक्त असतें जसें प्रेत भूतादिकांचें ज्ञो गुण दुसऱ्या गुणाचा पराभव करतो त्याचा तेथें उत्कर्ष समजावा. मनुष्याचें अंतःकरण प्रायशः सत्वरजतमो गुणानीं भिन्नभिन्न आहे त्यास शास्त्रीय विवेक ज्ञान रज आणि तम यांचा पराभव करून सत्व गुणाच्या उत्कर्षानें युक्त करतें त्या विवेक ज्ञानानें ज्यांचा पूर्वोक्त धर्माधर्म स्वभाव नाश पावून शास्त्रीय विवेक ज्ञानानें सत्व गुणाचा उत्कर्ष ज्याचा झाला आहे अशा अंतःकरणा पासून झालेली त्याची श्रद्धा केवल सात्विकच आहे. शास्त्रीय विवेक ज्ञान जन्मांतरीय संस्कार रूप स्वभावाचा नाश करणारें ज्यांस नाहीं अशा प्राणिमात्रांस पूर्वोक्त अंतःकरण वैचित्र्या मुळें पूर्वजन्मीं अंतःकरण सत्वगुणाच्या उत्कर्षानें युक्त असलें तर त्या संस्कारानें या जन्मीं श्रद्धा सात्विकी होते रजोगुणाचे उत्कर्षानें युक्त असलें तर श्रद्धा राजसी होते. तमोगुणाचे उत्कर्षानें युक्त असलें तर श्रद्धा तामसी होते. आतां- तेषां निष्ठा तु का कृष्ण- असा जो प्रश्न तूं केलास त्याचें उत्तर ऐक- अयं श्रद्धामयः पुरुषः- शास्त्रीय विवेक ज्ञान शून्य हा कर्माधिकारी त्रिगुणांतःकरण युक्त पुरुष श्रद्धामय आहे म्हणजे बाहुल्यें करून प्रस्तुत श्रद्धेनें युक्त आहे. कसा श्रद्धामय आहे तें सांगतात. ॥ यः यच्छ्रद्धः सः स एव- म्हणजे जो ज्या सात्विकी, राजसी किंवा तामसी अशा श्रद्धेनें युक्त आहे तो श्रद्धानुरूपच म्हणजे सात्विक, राजस किंवा तामसच आहे. यामुळें श्रद्धा जरी सात्विक आहे तथापि त्या श्रद्धामय पुरुषाचे संबंधानें राहणाऱ्या श्रद्धेस त्रिविधत्व येण्यास जन्मांतरीय पूर्वोक्त स्वभाव रूप श्रद्धेचें निमित्त कारण, उपादान कारण व अंतःकरण यांचें वैचित्र्यच कारण आहे. यावरून सात्विक श्रद्धेनें देव पूजादिक करणाऱ्याची निष्ठा सात्विकी राजस श्रद्धेनें देव पूजादिक करणाऱ्याची निष्ठा राजसी, तामस श्रद्धेनें देव पूजादिक करणाऱ्याची निष्ठा तामसी असें प्रश्नाचें उत्तर सूचविलें आणि जर जन्मांतरीं पूर्वी सांगितले प्रमाणें पितृ कूप भक्त पुरुष वर्तमान जन्मीं पूर्व संस्कार बलानें तात कूपा प्रतच देवता मानून त्याचें पूजनादिकच करतो त्यावर सात्विक पुंडरीका प्रमाणें देव अनुग्रह करीत नाहींत. आणि त्याणीं शास्त्रीय नित्य कर्म विधीचा त्याग केल्यामुळें झालें तें पाप त्याचें ही निराकरण करीत नाहींत. जर जन्मांतरीय मंत्र तंत्रादिक वासना मुळें वर्तमान जन्मीं यक्षादिकांस मानून पूजादिक करतो तर त्यास यक्षादिक संपत्ती देऊ-

न अनुग्रह त्यावर करतात परंतु आपले इच्छेनें जो नित्य कर्म रूप शास्त्र विधी-
चा त्याग केला त्या पापा पासून मुक्त करण्यास यक्षादिक समर्थ होत नाहींत नित्य-
कर्म त्यागानें जो देवांचा अपराध झाला त्या पासून रक्षण करण्यास यक्षादिक सम-
र्थ नाहींत जर जन्मांतरीय संस्कारानें प्रेत पितरादिकांसच ते माझे कुटुंबांत आतां-
आले आहेत असें मानून त्यांचीच सर्व शास्त्र विहित नित्य कर्मादिकाचा त्याग क-
रून कूपादिकाचे ठायीं ते आहेत अशा बुद्धीनें पूजा करतो त्याची प्रेतत्व बुद्धि क-
रण्यास योग्य जी त्याचे ठायीं विपरीत बुद्धि झाली या कारणामुळें तो जो तामस त्या-
प्रत प्रेतक्षुद्र भोग देऊन अनुग्रह करतात शास्त्रविहित कर्म त्यागामुळें देव त्यास
नरकांत घालतात. असें फल शास्त्र विधि सोडून श्रद्धेनें युक्त होत्साता जे देवादि-
कांची पूजा करतात त्या सात्विक, राजस, तामस, श्रद्धेनें युक्त जे सात्विक, राजस, ता-
मस त्यांस होतें असें ही सूचविलें. ॥३॥

यजन्ते सात्विका देवान् यक्षरक्षांसि राजसाः॥
प्रेतान् भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः॥४॥

अशी कल्पना करण्यास त्यांचें आचरण लिंग (अनुमान) प्रमाण आहे असें सां-
गतात. ॥सात्विकाः जनाः देवान् यजंते- म्हणजे सात्विक स्वभावाचे जे लोक आहेत ते सा-
त्विक स्वभावाचे जे देव त्यांचें पूजनादिक यजन करतात. ॥राजसाः यक्षरक्षांसि यजंते-
म्हणजे रजोगुण स्वभावाचे जे राजस जन ते कुबेरादिक जे यक्ष आणि निर्ऋति प्र-
भृति जे राक्षस यांचें पूजादिक यजन करतात ॥ अन्ये प्रेतान् च भूत गणान् य-
जंते-म्हणजे दुसरे तमोगुण स्वभावाचे तामस जन ते ब्राह्मणादिक वर्ण स्वधर्मा
पासून च्युत झाले तर देह मरणानंतर वायुस्वरूप देहाप्रत पावून उल्कामुख, को-
टर, पूतना इत्यादि नांवाचे प्रेत होतात असें मनुस्मृतींत सांगितलेले जे पिशाच आ-
णि सप्त मातृकादिक भूत गण त्यांचें पूजनादि स्वरूप यजन करतात. याप्रमाणें-
त्यांचे सात्विकादिक पूजांचे आचारावरून त्यांची श्रद्धा सात्विकादिक आहे त्या श्र-
द्धेनें युक्त जे ते सात्विकादिक आहेत असें जाणावें. अन्ये- या पदानें ते प्रत्येक भि-
न्न स्वभावाचे भिन्न आहेत असें सूचविलें त्या पदाचा प्रत्येकाशीं अन्वय आहे. ॥४॥

अशास्त्रविहितं घोरं तप्यंते ये तपो जनाः॥
दम्भाहंकार संयुक्ताः कामराग बलान्विताः॥५॥
कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः॥ मां चै-
वांतः शरीरस्थं तान् विद्ध्यासुरनिश्चयान्॥६

या प्रमाणें जे शास्त्राचा अनादर करतात त्यांची निष्ठा त्रिविध आचाररूप कार्यांमुळें तीन प्रकारची आहे. असें सांगितलें आतां कोणी राजस किंवा तामस असतां ही पूर्व जन्मार्जित सुकृत कर्म संस्कार परिपाक वशें करून सात्विक होतात ते शास्त्रोक्त साधनानुष्ठान करण्यास अधिकारी होतात जे दुराग्रहामुळें किंवा दुर्दैवें करून प्राप्त झालेल्या दुर्जनांचे संगतीमुळें राजस किंवा तामस स्वभावा प्रत सोडितच नाहींत ते शास्त्रीय मार्गा पासून भ्रष्ट होत्साते असन्मार्गांत शिरून यालोकीं आणि परलोकीं दुःखच अनुभवितात. असें दोन श्लोकांनीं सांगतात. ॥ यंदंभाहंकारसंयुक्ताः-म्हणजे हा धार्मिक आहे अशी आपली प्रसिद्धी करणें असा जो दंभ मीच श्रेष्ठ असा जो दुरभिमान तद्रूप अहंकार यानीं चांगले युक्त आणि- कामरागबलान्विताः- म्हणजे इच्छित विषया विषयीं जो अभिलाषात्मक राग तन्निमित्तक जें अत्युग्र दुःख सहन करण्याचें सामर्थ्य तेणें करून युक्त अथवा कामस्त्री इत्यादिकांची इच्छा- राग - सर्वदा तन्मय असणें बल हें मी अवश्य साधीन असा आग्रह त्यानीं युक्त आणि- शरीरस्थं भूत ग्रामं कर्षयंतः-म्हणजे या करण्यांत मोठें दुःख आहे असें पहात असतां त्या करण्या पासून निवृत्त न होऊन शरीराचे ठायीं राहणारा जो देहेंद्रियादिकाचे रूपानें परिणाम म्हणजे अवस्थे प्रत पावलेला जो पृथिव्यादिक पंच महाभूतांचा समुदाय त्याप्रत उपवासा दिकें करून कृश करणारे आणि- अचेतसः- म्हणजे विवेक ज्ञान शून्य आणि- अंतःशरीरस्थं मां कर्षयंतः- म्हणजे भोक्ता जो जीव त्याचे रूपानें शरीरांत राहणारा जो मी याप्रत भोगायतन म्हणजे भोग करण्याचें स्थानभूत जें शरीर त्याचें कृशत्व करून कृश करणारे अथवा अंतर्यामीं रूपानें शरीरांत राहणारा जो मी याप्रत वेद शास्त्ररूप माझे आज्ञेचें उल्लंघन करणें अशा कृशत्वाप्रत मला पावविणारे- येजनाः- म्हणजे जे प्राणी- अशास्त्र विहितं- म्हणजे वेदस्मृति रूप जें प्रत्यक्ष शास्त्र आणि अविगीत (अनिंद्य) शिष्टाचारादिका वरून अनुमान केलेलें जें शास्त्र त्यांत ज्यांचा विधी नाहीं असें किंवा जें शास्त्र नव्हे असें जे पाखंड आगमादिक कल्पित तें अशास्त्र त्यांत ज्याचा विधी आहे अशा- घोरं तपः तप्यंते- म्हणजे दुसऱ्यास आणि आपल्यास पीडा करणाऱ्या तापलेले शिळेवर उभें राहावें इत्यादिक तपाप्रत आचरतात- तान् आसुर निश्चयान् विद्धि- म्हणजे इहलोकचे सर्व सुखास जे विमुख झाले आणि परलोकीं अधम गती प्रत पावणारे असे जे सर्व पुरुषार्थां पासून भ्रष्ट त्या तपाचें आचरण करणारे जन ते वेदार्थ विरुद्ध विपरीत निश्चयात्मक आसुर निश्चयानें युक्त आहेत अशांप्रत तूं जाण. ते आसुर आहेत असें न सांगून ते आसुर निश्चय आहेत असें सांगितल्यानें त्यांच्या त्या निश्चयाचा त्याग करावा असें सूचविलें किंवा आसुरत्व जाती ज्यांस नाहीं ते मनुष्य कर्मा-

नींच असुर जानीनें नव्हेत असें स्त्रविलें. ॥५॥६॥

आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ॥
यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥७॥

जे सात्विक ते देव, जे राजस किंवा तामस ते विपरीत ज्ञानानें युक्त असल्यामुळें आसुर असें सिद्ध झालें आतां सात्विकांची जी श्रद्धा आणि जे आहार यज्ञ तप दानादिक त्यांचेंच ग्रहण करावें आणि राजस तामसाचें तें वर्जावें हें सांगण्या साठीं त्यांचें प्रत्येकाचें त्रिविधत्व (तीन प्रकार) सांगतात. ॥ सर्वस्य आहारः अपि त्रिविधः प्रियः भवति – म्हणजे केवल श्रद्धाच त्रिविध आहे असें नाहीं आहार ही सर्वांस प्रिय आहे तो सर्व पदार्थ मात्र त्रिगुणात्मक आहेत यास्तव तो सात्विकादि भेदानें तीन प्रकारचा आहे. जसा दृष्टफल तृप्त्यादिक ज्याचें आहे असा आहार म्हणजे भोजन तीन प्रकारचें आहे तसें ज्यांचें फल अदृष्ट स्वर्गादिक आहे अशीं यज्ञ, तप, दानें हीं तीन प्रकारचीं आहेत– तेषां इमं भेदं शृणु– म्हणजे त्यांचा हा भेद पंधरा श्लोकांनीं सांगतों याप्रत ऐक. देवतांचे उद्देशानें द्रव्यत्याग करणें हें सामान्य यज्ञाचें लक्षण आहे तो यज्ञ, याग आणि होम या भेदानें दोन प्रकारचा आहे. वषट्काराचा प्रयोग ज्याचे अंतीं आहे आणि याज्य पुरोनुवाक्यानें ज्याची समाप्ति होते असे उभें राहून करावयाचे होम त्यांस याग म्हणतात. स्वाहाकार ज्याच्या अंतीं आहे आणि ज्यांत देवतेला आवाहनार्थ जो मंत्र ती पुरोनुवाक्या आणि त्या हविर्भागाच्या दानार्थ जी मंत्ररूप ऋचा ती याज्या पुरोनुवाक्य नाहीं असा जो बसून करावयाचा होम त्यास होम म्हणतात. असें यज्ञाचें स्वरूप आणि भेद हे कल्पसूत्रांत सांगितले आहेत. तो यज्ञ, तप म्हणजे कृच्छ्र चांद्रायण, मासोपवासादिक दान म्हणजे जें दुसऱ्याचें स्वामित्व उत्पन्न होण्या साठीं आपले सत्वाचा त्याग करणें. ॥७॥

आयुःसत्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ॥
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्विकप्रियाः ॥८॥

आहाराचा भेद तीन श्लोकांनीं सांगतात. ॥ आयुःसत्वबलारोग्य सुखप्रीति विवर्धनाः– म्हणजे आयु म्हणजे चिरकाल जगणें – सत्व म्हणजे मोठें दुःख झालें तरी मनाला विकार न होऊं देणारें चित्ताचें स्थैर्य – बल – म्हणजे आपल्यास करण्यास उचित जें कार्य तें करण्यास श्रम नव्हावा यास साधन शरीराचें सामर्थ्य आरोग्य म्हणजे व्याधी न होणें – सुख म्हणजे भोजनानंतर तृप्तीनें होणारा

आल्हाद - प्रीति म्हणजे अभिरुची होऊन पुनःपुनः तो करावा अशी उत्कंठा त्याची वृद्धी करणारे किंवा त्यांची वृद्धि होण्यास कारण आणि रस्य म्हणजे मधुररस प्रधान रस ग्रहण करण्यास योग्य - आणि स्निग्ध म्हणजे स्वाभाविक ज्यांत स्नेह आहे किंवा घृतादिकानें ज्यांस स्नेह प्राप्त झाला आहे असें, आणि स्थिर म्हणजे भोजना नंतर ही रसादिकांच्या अंशांनीं शरीरांत चिरकाल राहणारे आणि हृद्य म्हणजे दुर्गंध अशुचित्वादिक दोष ज्यांस नाहींत या कारणानें पाहिल्यानेंच मनाचा संतोष करणारे असे जे आहार पूर्वोक्त चर्व्य चोष्य लेह्य पेयरूप अन्नादिकनें - सात्विकप्रियाः - म्हणजे सात्विकांस प्रिय आहेत, या आहारावरून हा सात्विक आहे असें जाणावें आणि आपणास सात्विकत्व असावें असें इच्छिणारानें या आहाराचा स्वीकार करावा. ॥८॥

**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः॥ आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः॥९**

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः - म्हणजे यांत अति या शब्दाचा कटु आदिक सर्वांशीं अन्वय करावा - अति कटु म्हणजे फार कडू निंबादिक हा अर्थ प्राकृत प्रसिद्धीनें जाणावा. संस्कृतांत कटु म्हणजे तिखट आणि तीक्ष्ण म्हणजे कडू असें आहे, फार आंबट, फार खारट, फार उष्ण, फार तिखट मिरच्या दिक, अति रूक्ष म्हणजे स्नेह शून्य कांग, कोद्रु इत्यादिक, अति विदाही मोहऱ्या इत्यादिक आणि - दुःखशोकामयप्रदाः - दुःख म्हणजे भक्षण करतांच तत्काल होणारी पीडा, - शोक म्हणजे भोजना नंतर होणारी मनाची अप्रसन्नता, आमय - म्हणजे धातु, वैषम्याचे द्वारा होणारा रोग यांप्रत करणारे, हे आहार राजसास इष्ट म्हणजे प्रिय आहेत. या आहारावरून हे राजस असें जाणावें आणि सात्विकानें हे आहार वर्जावे. ॥९॥

**यातयामं गतरसं पूति पर्युषितं चयत्॥ उच्छिष्टमपिचामेध्यं भोजनं तामसप्रियम्॥१०॥ ॥**

यातयामं - म्हणजे ज्या ओदनादिकांस पक्क झाल्यापासून एक प्रहर गेला आहे असें म्हणजे थंड झालेलें अथवा अर्ध पक्क - गतरसं - म्हणजे ज्यांतील रस गेला आहे असें शुष्क झालेलें अथवा ज्यांतील मंथनानें लोणी काढून घेतलें आहे असें दुग्धादिक. पूति - म्हणजे दुर्गंध ज्यास आहे असें - पर्युषितं - म्हणजे पक्क होऊन त्यास मध्यें एक रात्री गेली आहे असें - आणि उच्छिष्टं - म्हणजे भोजन करून अवशिष्ट राहिलेलें, अमेध्यं - म्हणजे यज्ञार्ह जें नव्हे असें -

अशुचि मांसादिक, अपिच - या शब्दानें वैद्य शास्त्रांत जें अपथ्य म्हणून सांगितलें तें घ्यावें. भोजनं तामसप्रियं - म्हणजे असें जें भोजन म्हणजे भोजन-साधन पूर्वोक्त अन्न तें तामसांस प्रिय आहे. या भोजनानें हा तामस आहे असें जाणावें आणि हें भोजन सात्विकानें सर्वथा वर्जावें. येथें क्रमानें रस्यादि वर्ग सात्विक कट्वादि वर्ग राजस यातयामादि वर्ग तामस असे आहार तीन प्रकारचे-सांगितले. त्यांत राजस तामस वर्ग सात्विक वर्गास विरोधी आहेत ते असे - अति कटु आदिक रस घेण्यास योग्य नाहीं यामुळें ते रस्यादिकांला विरोधी, रूक्ष-स्निग्धाला विरोधी तीक्ष्ण, विदाही धातु पोषण किंवा वृद्धि यांस विरोधी आहेत, यामुळं स्थिरत्वास ही विरोधी आहेत. अति उष्ण हृद्यास विरोधी - आमय पद्त्व आयुः सत्व बला रोग्यांस विरोधी दुःख शोक प्रद सुख प्रीतीस विरोधी, या प्रमाणें राजस वर्गाला सात्विक वर्गाचें विरोधित्व स्पष्टच आहे. याप्रमाणें तामस वर्गांत-गतरस, यातयाम, पर्युषित - हे संभवा प्रमाणें रस्य स्निग्ध स्थिर यांस विरोधी - आहेत. पूति, उच्छिष्ट, अमेध्य हे हृद्याला विरोधी, आयुः सत्व यांचें विरोधित्व स्पष्टच आहे. राजसवर्गास दृष्ट फलाचा मात्र विरोध आहे. तामस वर्गाला दृष्ट आणि-अदृष्ट या दोहों फलांचा ही विरोध आहे. ॥१०॥

## अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते॥ यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्विकः॥११॥

आतां क्रम प्राप्त यज्ञाचें त्रिविधत्व सांगतात. ॥ विधि दृष्टः यः यज्ञः कर्तव्य इव इति मनः समाधाय अफला कांक्षिभिः इज्यते - अग्नि होत्र, दर्शपूर्ण मास, चातुर्मास्य, पशु बंध ज्योतिष्टोमादिक यज्ञ काम्य आणि नित्य असा दोन प्रकारचा आहे. ज्यांस इंद्रिय कामना आहे त्याणें दधि द्रव्यानें अग्नि होत्र होम करावा. पशु पुत्रादिक सर्व फलां साठीं दर्शपूर्ण मास करावे. स्वर्गाची इच्छा ज्यास आहे त्याणें ज्योतिष्टोम करावा. असा फलसंबंध युक्त विधीनें सांगितलेला आणि जित कीं अंगें त्याचीं शास्त्रांत सांगितलीं आहेत त्यांचा प्रतिनिधी न करतां त्या सर्वांगांचे अनुष्ठानानें निष्पन्न होणारा जो अग्नि होत्रादिक यज्ञ तो काम्य आणि अमुक फलार्थ करावा अशा फल संबंधाशिवाय जों पर्यंत जीवन आहे तों पर्यंत करावा अशा जीवन संबंध आदिक निमित्तानें करावा अशा विधीनें सांगितलेला आणि सर्वांगांनें अनुष्ठान करण्यास अशक्य असेल किंवा मुख्य अंगांचा असंभव असेल तर यथा शक्ति जितकीं अंगें करण्याची शक्ति असेल तितक्या अंगानुष्ठानानें निष्पन्न होणारा आणि मुख्य अंगादिक करण्याचा असंभव असल्यास जो त्याचे स्थानीं प्रतिनिधि शास्त्रोक्त असेल तो घेऊन किंवा त्याचे अनुष्ठानानें जो निष्पन्न होतो असा जो

अग्निहोत्रादिक यज्ञ तो नित्य त्यांतील जीवन पर्यंत अग्निहोत्र करावें असा शास्त्रा-चा विधी आहे यास्तव जीवन असतांना न केला तर प्रत्यवाय लागेल. या करतां मु-ख्य सर्वांगांचें अनुष्ठान न झालें तरीं यथाशक्ति प्रतिनिधी घेऊन अवश्य अनुष्ठान क-रावें असा मनाचा निश्चय करून फलाची ज्यांस इच्छा नाहीं आणि अंतःकरण शु-द्धीचीच इच्छा आहे यास्तव काम्य कर्मा विषयीं जे विमुख ते जो शास्त्र विहित-अग्निहोत्रादिक यज्ञ करतात तो यज्ञ सात्विक. ॥ ११ ॥

## अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ॥ इ-ज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसं ॥ १२ ॥ ॥

राजस यज्ञ सांगतात. फलं अभिसंधाय - म्हणजे काम्य स्वर्गादिक-फलाचा उद्देश करून - दंभार्थमपिच - म्हणजे आणि लोकार्थ आपण धार्मिक-आहों अशी प्रसिद्धि होण्या साठीं येथें या शब्दानें विकल्प आणि च शब्दाने स-मुच्चय (संग्रह) सूचविला. एव शब्दानें अवधारण (निश्चय) सूचविलें याव-रून तीन पक्ष होतात. ते असे - पारलौकिक फलाचा उद्देश करून १ पारलौकिक-फलाचा उद्देश नसला तरी दंभा साठींच २ पारलौकिक फला साठीं आणि दंभा-साठीं ३ या प्रमाणें अंतःकरण शुद्धीचा उद्देश न करून दृष्ट आणि अदृष्ट या फ-लाचे इच्छेनें - यत् इज्यते - म्हणजे जो यज्ञ करतात - भरतश्रेष्ठ तं यज्ञं राजसं वि-द्धि - हे भरत वंशांत श्रेष्ठा अर्जुना. त्या यज्ञाचें वर्जन करण्या साठीं तो यज्ञ राजस असें तूं जाण. भरत श्रेष्ठ या संबोधनानें तूं त्याचें वर्जन करण्यास योग्य आहेस-असें सूचविलें. ॥ १२ ॥

## विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ॥ श्र-द्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥ ॥

तामस यज्ञ सांगतात. विधिहीनं - म्हणजे ज्या यज्ञाविषयीं शास्त्रांत वि-धीच नाहीं किंवा ज्याचें अनुष्ठान शास्त्रोक्त विधी प्रमाणें नसून तद्विपरीत आहे असा. आणि असृष्टान्नं - म्हणजे ज्या यज्ञांत अन्नदान नाहीं असा आणि मंत्रहीनं - म्हणजे स्वरतः वर्णतः मंत्र हीन जो आहे आणि अदक्षिणं - म्हणजे ज्या यज्ञां-त ऋत्विजांस शास्त्रोक्त दक्षिणा देत नाहीं असा - श्रद्धाविरहितं - म्हणजे ऋत्वि-जां वरील द्वेषादिकानें जो श्रद्धा रहित आहे. यज्ञं तामसं परिचक्षते - म्हणजे त्या-यज्ञास शिष्ट तामस यज्ञ असें बोलतात. या तामस यज्ञाचें विधिहीन त्वादिक ए-केक विशेषण नसल्यामुळें पांच प्रकारचा पांची विशेषणं नसल्यामुळें साहा प्र-कारचा दोन तीन किंवा चार विशेषणं नसल्या मुळें अनेक प्रकारचा असे भेद जा-

णावे. राजस यज्ञापासून चित्तशुद्धि रूप फल न झालें तरी यथाशास्त्र विधी-
नें अनुष्ठान झाल्यामुळें स्वर्गादि फळ देणारें अपूर्व म्हणजे पुण्य आहे. तामस
यज्ञांत यथा शास्त्र विधि अनुष्ठान न झाल्यामुळें कोणतेंही अपूर्व म्हणजे पु-
ण्य नाहीं यास्तव यांनें सर्वथा वर्जन करावें असें तात्पर्य.॥१३॥.

**देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम्॥ब्रह्म-
चर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते॥१४॥ ॥**

आतां क्रम प्राप्त तपाचे सात्विकादि भेद सांगण्या साठीं तीन श्लोकांनीं
कायिक वाचिक मानसिक असें तीन प्रकारचें तप सांगतात. देवद्विजगुरुप्राज्ञ पू-
जनं म्हणजे ब्रह्मा, विष्णु, महेश, सूर्य, अग्नि, दुर्गादिक, द्विजोत्तम, ब्राह्मण, पिता, मा-
ता, आचार्यादिक, गुरु, देव, वेदार्थ वेत्ते पंडित प्राज्ञ, यांचें पूजन, यथाशास्त्र प्र-
माण शुश्रूषादिक, शौचं म्हणजे बाह्य मृज्जलादिकानें शरीर शुद्धि आर्जवं-
म्हणजे कुटिलता रहितत्व ब्रह्मचर्य निषिद्ध मैथुना पासून निवृत्ति - अहिंसा - म्ह-
णजे अशास्त्रीय प्राणि पीडा न करणें च शब्दानें अस्तेय अपरिग्रह हे ही शारीर
पदानें घ्यावे. शारीर म्हणजे शरीर प्रधान जे कर्ते त्याणीं केलेलें ते ही शरीर, केव-
ळ शरीरानें केलेलें तेंच शारीर नव्हे. यास शारीर तप असें म्हणतात.॥१४॥

**अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत्॥-
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते॥१५॥**

अनुद्वेग करं - म्हणजे कोणाला दुःख न होण्या जोगें - सत्यं - यथार्थ - च प्रि-
यहितं - आणि श्रोत्यास तत्काळ कर्ण सुख देणारें आणि परिणामी ही सुख देणारें या
चार विशेषणांनीं युक्त जें वाक्य म्हणजे बोलणें. जसे वत्सा शांत हो वेदाध्ययन आणि
योगानुष्ठान कर म्हणजे तुझें कल्याण होईल असें बोलणें त्यास वाङ्मय तप म्हण-
तात. आणि - स्वाध्याया भ्यसनं च वाङ्मयं तपः उच्यते - आणि वेदाभ्यासास ही वा-
ङ्मय तप असें म्हणतात.॥१५॥

**मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः॥भा-
वसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते॥१६॥ ॥**

मनःप्रसादः - म्हणजे विषय चिंतना विषयीं व्याकुलता नसणें अशी
मनाची स्वस्थता किंवा राग द्वेषादि रहित्व - सौम्यत्वं - म्हणजे सर्व लोकांचें हिते-
च्छुत्व किंवा निषिद्धानें चिंतन न करणें - मौनं - म्हणजे एकाग्रतेनें आत्म चिंतन-
करणें किंवा वाणीचा निग्रह होण्यास कारण भूत मनाचा निग्रह. आत्मविनिग्रहः-

म्हणजे मनाच्या सर्व वृत्तींचा निग्रह करणें असा जो निरोधाख्य असं प्रज्ञानः समाधितो भाव संशुद्धिः - म्हणजे हृदयाची कामक्रोध पुनः उत्पन्न नव्हावे अशी काम क्रोध लोभांची निवृत्ति रूप शुद्धि किंवा व्यवहार कालीं परांशीं कपट माया न करणें- इति एतत् मानसं तपः उच्यते- म्हणजे या प्रकारचें जें तप त्यास मानस तप असें म्हणतात. ॥१६॥

श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः॥ अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्विकं परिचक्षते ॥१७॥

आतां शरीरादिक तीन प्रकारच्या तपाचें सात्विकादि भेदानें तीन प्रकार सांगतात. ॥ श्रद्धया परया अफला कांक्षिभिः युक्तैः नरैः यत् तप्तं - म्हणजे श्रद्धेनें म्हणजे या पासून फल अवश्य प्राप्त होईल अशा कधींही जीवर अप्रामाण्य शंका नाही अशा उत्कृष्ट आस्तिक्य बुद्धीनें फलाचा उद्देश ज्याच्या मनांत नाहीं आणि सिद्धीनें किंवा असिद्धीनें ज्यांचे मनास विकार नाहीं अशा नरांनीं अनुष्ठान केलेलें जें शरीर, वाचिक, मानसिक, या भेदानें तीन प्रकारचें पूर्वोक्त तप त्यास सात्विक तप असें म्हणतात. ॥१७॥

सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत्॥ क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम्॥ १८॥ ॥

सत्कार मान पूजार्थं - म्हणजे हा फार चांगला तपस्वी ब्राह्मण आहे: अशी अज्ञानी लोकांनीं केलेली स्तुति आणि लोकांनीं आपणास प्रत्युत्थान करणें नमस्कार करणें असा मान आणि पाद प्रक्षालन करणें अर्चन करणें - धन वस्त्रादिक देणें अशी पूजा यासाठीं आणि दंभेनच एव यत्- म्हणजे केवल आपली लोकांत ख्याति व्हावी या साठींच - क्रियते - म्हणजे जें तप करतात तें राजस तप असें शिष्ट म्हणतात. तें चलं अध्रुवं इह - याच लोकांतें शरीं- फल देणारें आहे परलोकीं फल देणारें नव्हे आणि थोडे दिवस राहणारें आणि या लोकचें फल त्या पासून होईल. असा नियम ज्याचे अनुष्ठानांत नाहीं असें आहे. ॥१८॥

मूढग्राहेणात्मनो यत् पीडया क्रियते तपः॥ परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम्॥ १९॥

मूढग्राहेण आत्मनः पीडया यत् तपः क्रियते - म्हणजे अतिशयित अविवेका मुळें झालेला जो दुराग्रह तेणें करून देहेंद्रियांस पीडा देऊन जें त-

प करतात-परस्योत्सादनार्थंवा-म्हणजे अथवा दुसऱ्याचे नाशासाठीं जें अभिचार कर्मरूपतप करतात तें तप तामस असें शिष्टांनीं म्हटलें आहे.॥१९

दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे॥ देशे काले च पात्रे च तद्दानं सात्विकं स्मृतम्॥२०॥

आतां क्रमप्राप्त दानाचे तीन भेद सांगतात.॥ दातव्यं इति यत् दानं अनुपकारिणे देशे काले पात्रे च दीयते-म्हणजे दानकरावें असा शास्त्रांत-विधि आहे म्हणून अवश्य केलें पाहिजे अशा बुद्धीनें फलाचा उद्देश न करतां हा-आपल्यावर प्रत्युपकार करील अशी ज्यावर बुद्धि नाहीं असा दानास पात्रभू-त विद्या तपानें युक्त अथवा नरका पासून रक्षण करणारा ब्राह्मण त्यास देतात. यास प्रमाण विद्या आणि तप यानीं जो आपल्यास आणि दात्यास तारण्यास समर्थ आहे त्याणेंच प्रतिग्रह करावा. दान घ्यावें असें शास्त्र आहे कुरुक्षेत्रा दिक जो पुण्य देश सूर्यग्रहणा दिक जो पुण्य काल त्याचे ठायीं जें तुला पुरुषादि-क दान देतात त्यास सात्विक दान असें शिष्टांनीं म्हटलें आहे.॥२०॥

यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः॥ दी-यते च परिक्लिष्टं तद्राजसमुदाहृतम्॥२१॥ ॥

यत्तु प्रत्युपकारार्थं-म्हणजे यास दान दिलें असतां हा कालांतरीं मज-वर प्रत्युपकार करील यादृष्ट फलार्थ किंवा फलमुद्दिश्य-म्हणजे स्वर्गादिक-फल व्हावें असा उद्देश मनांत धरून पुनः परिक्लिष्टं दीयते च-म्हणजे सात्वि-क दानाचें लक्षण ज्यास नाहीं असें आणि या दानानें इतका अर्थ व्यय झाला अशा पश्चात्तापानें जें दान देतात तें दान राजस असें शिष्टांनीं म्हटलें आहे.॥२१

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते॥ अस-त्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम्॥२२॥ ॥

अदेशकाले म्हणजे स्वतः किंवा दुर्जन संसर्गानें पाप जनक असा जो-अशुचि देश आणि जो काल पुण्य कारक अशी शास्त्राची प्रसिद्धी नाहीं असा किं-वा ज्यांत आपणास कर्मानधिकार रूप आशौच आहे असा जो काल त्याचे-ठायीं आणि अपात्रेभ्यश्च दीयते म्हणजे जे दान देण्यास पात्र नाहींत असे जे-नट नर्तक किंवा विद्या तपानीं रहित ब्राह्मण त्यांस जें दान देतात. देश काल प-वित्र आहेत पात्रभूत ब्राह्मण ही दान देण्यास मिळाला आहे परंतु असत्कृतं अवज्ञातं-म्हणजे त्या पात्रभूत ब्राह्मणाचा त्याशीं प्रिय भाषण करणें त्याचें-

पाद प्रक्षालन करणें त्याची पूजा करणें इत्यादि सत्कार ज्यांत नाहीं आणि त्याची अवज्ञा जांत आहे असें जें दान करतात तें तामस दान असें शिष्टांनीं म्हटलें आहे. २२

**ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः॥**
**ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा॥ २३॥**

या प्रमाणें सात्विक आहार, यज्ञ, तप, दान यांचा स्वीकार करावा राजस, तामस जे त्यांचें वर्जन करावें यासाठीं आहार, यज्ञ, तप, दान यांस त्रिविधत्व सांगितलें त्यांत आहार हा तृप्ति स्वरूप दृष्टफलार्थच आहे यास्तव त्याचे अंग वैगुण्या मुळें फल होणार नाहीं अशी शंका नाहीं. यज्ञ, दान, तप हीं अदृष्ट फलार्थच आहेत आणि त्यांचा पूर्वीं सांगितल्या प्रमाणें विचार केला असतां अनुष्ठान त्यास प्रमादादिक दोष बहुत होतात आहेत यामुळें सांगितल्या प्रमाणें सर्वांगांचे अनुष्ठानाचा बहुत करून असंभवच आहे यामुळें प्रायशः तीं सर्व लोकांचीं यज्ञादि कर्में राजस तामस प्रायच आहेत. तेव्हां अंगवैगुण्यामुळें फल उत्पन्न न झालें तर त्या विषयींचा लोकांचा प्रयास व्यर्थच होईल, अशा शंकेच्या निवृत्यर्थ त्यांचे वैगुण्य रूप दोषाचे परिहारार्थ ओं तत् सत् या भगवन्नामोच्चारण रूप, सर्व कर्मांचे ठायीं सामान्य प्रायश्चित्त सांगतात ॥ ओं तत् सत् इति ब्रह्मणः त्रिविधः निर्देशः स्मृतः- म्हणजे ओं तत् सत् असें तीन प्रकारचा ब्रह्माचा बोधक शब्द आहे म्हणजे तीन ब्रह्माचीं नावें किंवा सहस्रनाम पाठ प्रमाणें नामत्रयात्मक पाठ आहे. ओं कारास अकार, उकार, मकार असे अवयव आहेत. आणि सहस्र नाम, पाठास जशीं सहस्रनामें अवयव आहेत तशीं या त्रिनामात्मक पाठास प्रत्येक ओं, तत्, सत् हीं तीन ब्रह्माचीं नामें आहेत: याचें स्मरण महर्षींनीं कर्मवैगुण्य दोष परिहारार्थ कर्मांत केलें आहे यास्तव आतांचे लोकांनीं ही तदर्थ स्मरण करावें असा येथें विधि कल्पावा. अशी कल्पना करण्यास दग्धाश्व रथ न्याय प्रमाण आहे. एकाचे रथाचे घोडे नाहींसे झाले आहेत, एकाचा रथ जळाला आहे त्या परस्परांस जशी एकाला घोड्याची अपेक्षा एकाला रथाची अपेक्षा आहे. या प्रमाणें ओं तत् सत् हा त्रिनाम पाठ भगवंतांनीं अपूर्व सांगितला यास याचें प्रयोजन काय अशी प्रयोजनाची अपेक्षा आहे आणि याच प्रकरणीं सांगितलें जें यज्ञ, तप, दानादिक त्यांस त्यांचें अंगवैगुण्य न होतां अनुष्ठान सांगतेला कोणते साधनाची अपेक्षा आहे याप्रमाणें एके प्रकरणातील परस्परांचा या परस्पर अपेक्षा संबंध आहे, यामुळें यज्ञ, तप, दानादिकांस अंग वैगुण्या मुळें व्यर्थत्व न येऊन त्यांस सफलत्व येण्या साठीं यज्ञा दिकांत या ब्रह्माचे त्रिनामात्मक पाठाचें स्मरण करावें असा येथें विधि प्रत्यक्ष सांगितला नाहीं तरी तसा पूर्वोक्त न्या-

यानें विधि कल्पावा. याचीं उदाहरणें मीमांसेंत पुष्कळ आहेत. आणि याविधी-चे कल्पनेस-" यस्यस्मृत्याचनामोक्त्या तपो यज्ञक्रियादिषु ॥ न्यूनं संपूर्णतां याति सद्योवंदे तमच्युतं ॥ प्रमादात् कुर्वतां कर्म प्रच्यवेताध्वरेषुयत् ॥ स्मरणादेव तद्विष्णोः संपूर्णं स्यादितिश्रुतिः ॥" ज्याच्या स्मृतीनें आणि नामोच्चारणानें किंवा नामोच्चार द्वारा तदर्थ स्मरणानें तप यज्ञादिक कर्मांचे ठायीं जें न्यून होईल तें संपूर्णते मत पावतें-म्हणून संपूर्ण किंवा सांग होतें त्या अच्युतास नमस्कार करतों. यज्ञादिकाचे ठायीं प्रमादानें कर्म करणारानें जें विगुण कर्म होतें तें विष्णुस्मरणानें संपूर्ण होतें, असें श्रुतींत सांगितलें आहे अशा अर्थाच्या स्मृति आहेत.यास्मृतींत कर्म वैगुण्य झाऊन संपूर्ण होण्या करितां जें नामोच्चारण किंवा तद्द्वारा स्मरण करण्यास सांगितलें तें पूर्वोक्त न्याय सिद्ध विधानें आणि- ओं तत् सत्ब्रह्मार्पण मस्तु - असा सर्व कर्मांत या त्रिनाम पाठ करण्याचा शिष्टाचार आहे आणि येथें या विषयींच विशेष सांगितला आहे यावरून या त्रिनाम पाठात्मक नामोच्चारण किंवा तद्द्वारा परब्रह्म स्वरूपाचेंच स्मरण विहित आहे. सामान्य नामस्मरण नाहीं असें जाणावें. त्या त्रिनाम पाठात्मक ब्रह्माचे निर्देशास कर्म वैगुण्य परिहार करण्याचें सामर्थ्य आहे असें सांगण्या करितां त्याची स्तुती करतात. ॥ तेन पुरा ब्राह्मणाः वेदाः यज्ञाश्च विहिताः॥- त्या ब्रह्माच्या त्रिनामात्मक निर्देशें करून म्हणजे त्याचे उच्चारण सामर्थ्यानें ब्राह्मण हें उपलक्षण करून यज्ञादिकांचे कर्ते ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे तीन वर्ण यज्ञादिकांस साधनभूत वेद आणि यज्ञरूप कर्मे हीं पूर्वी उत्पन्न केलीं किंवा प्रकाशित केलीं हीं तीन नामें ब्रह्माचीं वाचक आहेत. या विषयीं ओं असें हें एकाक्षर ब्रह्म म्हणजे ब्रह्माचें वाचक आहे. त्याम-हद्भूत परमेश्वराचें निश्वसित म्हणजे श्वासोच्छ्वासरूप ऋग्वेद यजुर्वेद सामवेदादिक आहेत म्हणजे निश्वसिता प्रमाणें अनायासानें या ब्रह्मापासून उत्पन्न झाले आहेत सृष्टि पूर्वी हें जग सद्रूप ब्रह्मच होतें अशा अर्थाच्या श्रुति प्रमाण आहेत. अथवा अकार हा वासुदेवाचा वाचक आहे, उकार ब्रह्म देवाचा वाचक आहे, मकार महेश्वराचा (शंकराचा) वाचक आहे या प्रमाणावरून अकार, उकार मकार या वर्णत्रयात्मक ओंकाराचा ब्रह्म विष्णु महेश्वर रूप त्रिगुणात्मक-मायोपाधिक परमेश्वर अर्थ आहे आणि त्रिमात्रात्मक ओं काराचीजी अर्धमात्रा तिचा प्रतिपाद्य त्रिगुणातीत निर्गुण परब्रह्म स्वरूप अर्थ आहे यावरून-ओं हें ब्रह्माचें नाम आहे आणि जें अतिप्रसिद्ध आहे किंवा इंद्रियागोचर परोक्ष आहे त्यास तत् म्हणजे तें असें लोकांत म्हणतात. वास्तव जगाचे कारणत्वानें अति प्रसिद्ध ब्रह्म आहे आणि इंद्रियांस अगोचर आणि अज्ञान्यांस परोक्षही आहे यास्तव तत् हें ब्रह्माचें नांव आहे आणि जें वस्तु सत्य म्हणजे अबा-

धिन आणि उत्तम आहे त्यास सत् असें लोकांत म्हणतात. ब्रह्म परमार्थ सत्य आणि अनृत दुःख अचेतन प्रपंचाहून विलक्षण सच्चिदानंदात्मक उत्तम आहे यास्तव सत् हें ब्रह्माचें नांव आहे. ॥२३॥

तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः॥ प्रवर्त्तंते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम्॥२४॥

आतां अकार, उकार, मकारांचे व्याख्यानें करून जसें तत्समुदायात्मक ओंकाराचें व्याख्यान करितात त्याप्रमाणें ओंकार तत् सत् यांच्या व्याख्यानें त्या नामत्रयात्मक ब्रह्मनिर्देशाचें व्याख्यान चार श्लोकांनीं करण्याचा आरंभ करितात. त्यांत प्रथम ओंकाराचें व्याख्यान करितात. तस्मात् ओं इत्युदाहृत्य ब्रह्मवादिनां विधानोक्ताः यज्ञ दान तपःक्रियाः सततं प्रवर्तंते- म्हणजे ज्या कारणास्तव एतन्नाम पूर्वकच ब्राह्मण वेद यज्ञांचा प्रकाश सृष्टीचे आरंभीं आहे किंवा ओंकार हें ब्रह्माचें नांव श्रुतींत प्रसिद्ध आहे यास्तव त्रिनामात्मक ब्रह्मनिर्देशांत शब्दाचें व्याख्यान करितात. ओं काराचे उच्चारणानंतरच विधिशास्त्रोक्त वेदवादींच्या यज्ञ दान तप रूप क्रिया अंगवैगुण्य रूप जो उत्कर्ष तेणें करून युक्त निरंतर प्रवृत्त होतात ज्याच्या एकावयवाच्या उच्चारणानें कर्म वैगुण्य परिहार होतो मग त्या सर्व नाम पाठाच्या उच्चारणानें होईल म्हणून कार्य सांगावें असा स्तुतीचा अतिशय सूचविला. ॥२४॥

तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः॥ दानक्रियाश्चविविधाः क्रियंते मोक्षकांक्षिभिः॥२५॥

तत् इति उदाहृत्य फलं अनभिसंधाय- म्हणजे महावाक्यांत ब्रह्मनामत्वें करून प्रसिद्ध असें जें तत् हें नाम त्याचा उच्चार करून फलाचा उद्देश न करून- मोक्षकांक्षिभिः- म्हणजे मोक्षेच्छु मुमुक्षु आहेत ते चित्तशुद्ध्यर्थ- यज्ञदानतपःक्रियाः क्रियंते- म्हणजे यज्ञ, दान, तप या क्रिया करितात. यास्तव तत् हें नाम अति प्रशस्त आहे अथवा ओं या नांवाचा काम्य अकाम्य यावत् यज्ञादिकाचे ठायीं साधारण विनियोग सांगून तत् या नांवाचा निष्काम मुमुक्षूंनीं कर्तव्य जीं कर्में त्यांचे ठायीं विनियोग सांगतात. ॥ मुमुक्षु फलाचा उद्देश न करून यज्ञ दान तप क्रिया करितात जर फलोद्देश त्यांस नाहीं तर ते यज्ञादिक क्रिया कशा करितां करितात याविषयीं सांगतात. तदिति- फलाचा उद्देश न करून तत् म्हणजे सर्व यज्ञादिक क्रिया ब्रह्मच आहेत असें ब्रह्माचें अनुसंधान करून मुमुक्षु सर्व यज्ञादिक क्रिया करितात. जसें ब्रह्मवेत्ते जीवन्मुक्त "ब्रह्मार्पणं ब्रह्महविः" यांत

सांगितल्या प्रमाणें सर्व ब्रह्मच आहे अशा बुद्धीनें करतात तसे मुमुक्षु ही त्याच बुद्धीनें करतात. जें मुक्तांचें स्वाभाविक आचरण त्यांचें साधनत्वें करून अनुष्ठान मुमुक्षूंस शास्त्र विधि सांगतो असा सिद्धांत आहे. ॥२५॥

**सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ॥ प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥२६॥**

सत् शब्दाचें व्याख्यान करतात. किंवा विनियोग सांगतात. सद्भावे-म्हणजे लोकांत या पुरुषास पुत्र आहे वेदांत जगत्कारण ब्रह्म आहे अशी जी सत्ता तीचे ठायीं-साधुभावे-म्हणजे आणि हा उत्तम आहे या अर्थाचे ठायीं सत् या शब्दाचा प्रयोग करतात. यास्तव वैगुण्य दोषाचा परिहार करून यज्ञादिकाला उत्तमत्व आणण्यास आणि त्याचे फलाची सत्ता संपादन करण्यास हें नाम समर्थ आहे.- तथा प्रशस्ते कर्मणि हे पार्थ सच्छब्दः युज्यते- म्हणजे हे अर्जुना, प्रतिबंध न होतां शीघ्र फल देणारें जें मांगलिक कर्म त्याचे ठायीं या सच्छब्दाचा योग आहे म्हणजे प्रयोग आहे. यास्तव वैगुण्याचा परिहार करून प्रतिबंध न होतां शीघ्र फल देण्याचें यज्ञास सामर्थ्य उत्पन्न करणारें हें नाम अति प्रशस्त आहे. ॥२६॥

**यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ॥ कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥२७॥**

यज्ञे तपसि दाने च स्थितिः सत् इति च उच्यते- म्हणजे यज्ञ, तप दानांचे ठायीं जी निष्ठा तिला ही सत् असें विद्वान् बोलतात.- तदर्थीयं कर्म च सत् इत्येव अभिधीयते- म्हणजे ते जे यज्ञ तप दानादि रूप अर्थ त्यांस अनुकूल किंवा त्यांचें हें नाम त्रय प्रस्तुत आहे त्या परब्रह्मार्थ म्हणजे तदुद्देशानें जें पूजा बलीचें समर्पण, देवां गणांचें संमार्जन, लेपन आणि तेथें रंगवल्ली काढणें इत्यादिक जें कर्म आणि पूजादिकांची सिद्धि व्हावी या साठीं दुसरे जे बागलावणें शेतकरणें धन मिळवणें इत्यादिक कर्म करतात. त्यास सत् असें म्हणतात. यास्तव सत् हे नाम प्रशस्त आहे असें तात्पर्य. ॥२७॥

**अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ॥ असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥२८॥**

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रद्धात्र-**

यविभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः ॥१७॥

आलस्य क्लेश बुध्यादिकें करून शास्त्रविधीचा परित्याग करून श्रद्धेनें लौकिक विगीत (निंद्य) वृद्ध व्यवहार मात्रा पासून तप, यज्ञ, दान करणारांस प्रमादामुळें त्या यज्ञादिकांचें वैगुण्य प्राप्त झालें असतां ॐ तत् सत् या नाम पाठाचे उच्चारणानें त्याचा परिहार होतो असें आहे तर श्रद्धा नसल्यामुळें शास्त्रीय विधीचा त्याग करून आपले इच्छेनें कांहीं यज्ञादिक करणारे जे असुर त्यांचे ही त्या यज्ञादिकाचे वैगुण्याचा परिहार त्या नाम पाठोच्चारणानें होईल मग सात्विकत्व येण्यास कारण जी श्रद्धा ती कशास पाहिजे अशा शंकेची निवृत्ति करण्या साठीं सांगतात. - अश्रद्धया हुतं - म्हणजे अश्रद्धेनें जो होम केला. - दत्तं - म्हणजे अश्रद्धेनें जें दान केलें. - तपस्तप्तं - म्हणजे अश्रद्धेनें जें तपाचरण केलें - कृतंच यत् - म्हणजे आणि जें अश्रद्धेनें दुसरें कांहीं स्तुति नमस्काररूप कर्म केलें - हे पार्थ तत् असत् इति उच्यते - म्हणजे त्यासर्वांस असत् असें म्हणतात. यास्तव पूर्वोक्त त्रिनामपाठानें - साधु होण्यास अयोग्यच आहे. त्यांस असत् कां म्हणतात. त्याविषयीं कारण सांगतातः तत् प्रेत्य न इह च न - म्हणजे हे अर्जुना, ते अश्रद्धेनें केलेले यज्ञादिक विगुणत्वास्तव स्वर्ग देण्यास कारणभूत जें अदृष्ट म्हणजे पुण्य त्यास उत्पन्न करीत नाहीं त्यापासून परलोक फल होत नाहीं या लोकीं त्याची साधु निंदा करतात. यामुळें या लोकचें कीर्त्यादिक फल ही त्यापासून उत्पन्न होत नाहीं. अश्रद्धेनें केलेलें सर्व ऐहिक पारलौकिक फल देणारें नाहीं निष्फल आहे यास्तव सात्विक श्रद्धेनेंच सात्विक यज्ञादिक अंतःकरण शुद्धी साठीं करावें. त्यास जर दैवें करून वैगुण्य आलें तर पूर्वोक्त त्रिनाम पाठोच्चारणानें त्याचा परिहार होतो किंवा श्रद्धापूर्वक केलेलें असात्विक ही ब्रह्माचे नामनिर्देशानें सगुण सात्विक होतें असें या प्रकरणाचें तात्पर्य आहे. राजस तामस श्रद्धापूर्वक राजस तामस यज्ञादिक करणारे असुर ते शास्त्रीय ज्ञान साधनानधिकारी सात्विक श्रद्धापूर्वक सात्विक यज्ञादिक करणारे देव शास्त्रीय ज्ञान साधनाधिकारी असा श्रद्धांचे सात्विकादिक तीन भेद आहारादिकांचे तीन भेद सांगून अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तरानें भगवंतानीं या अध्यायांत निर्णय केला. ॥२८॥

इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथ शास्त्रिकृत भाषाविवृत्तौ सप्तदशोध्यायः समाप्तः ॥१७॥

अध्याय १८ वा.

## अर्जुन उवाच ॥ ॥ संन्यासस्य महाबाहो

**तत्त्वमिच्छामि वेदितुम्॥ त्यागस्य च हृषी-केश पृथक्केशिनिषूदन॥१॥ ॥श्रीगोपाल०॥**

या गीताशास्त्राचे आरंभीं ज्यांची प्रस्तावना केली आणि पुढें सूत्रभूत सांगून ज्यांचें उपपादन केलें त्या सांगितलेले सर्व अर्थांचा उपसंहार करण्या करितां या अष्टादशाध्यायाचा आरंभ करितात. पूर्वाध्यायीं श्रद्धेचे तीन प्रकारानें आणि आहार, यज्ञ, दान, तप, यांचे तीन प्रकारानीं सात्विकादि भेदांनीं कर्माचे तीन भेद सात्विक कर्माचें अनुष्ठान करावें. राजस, तामस कर्माचें वर्जन करावें हा अर्थ सांगण्यासाठीं सांगीतलें. त्या प्रमाणें सात्विक कर्म संन्यास करण्यास योग्य आहे राजस, तामस संन्यास वर्ज करण्यास योग्य आहेत असे संन्यासाचे ही तीन भेद आहेत. असा भगवंताचा अभिप्राय आहे असें दिसतें नाहींतर-"सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखंवशी॥" "संन्यासयोगयुक्तात्मा"-इत्यादि श्लोकांचे ठायीं कर्माचा संन्यास करावा असें सांगितलें आणि-"त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः॥ सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान्-" इत्यादि श्लोकांचे ठायीं फलाचा मात्र त्याग करावा कर्माचा त्याग म्हणजे संन्यास करूं नये कर्में करावींच असें जें भगवंतानीं सांगितलें तें विरुद्ध होईल. यास्तव कर्म संन्यास करूं नये असें जें सांगितलें तें राजस, तामस संन्यासा विषयीं सांगितलें आणि संन्यास करावा असें जें सांगितलें तें सात्विक संन्यासा विषयीं सांगितलें असा भगवंताचा अभिप्राय दिसतो. यावरून संन्यास ही सात्विकादिक भेदानें तीन प्रकारचा आहे असें या अध्यायांत निरूपिलें पाहिजे. त्यांत ब्रह्मात्मतत्त्व बोध झाल्यानंतर जीवन्मुक्ति सुखार्थ करावयाचा जो फलभूत संन्यास ज्यास विद्वत्संन्यास म्हणतात तो चतुर्दशाध्यायाचे ठायीं गुणातीताचे लक्षणत्वें करून सांगितला आहे. यास्तव तो गुणातीतच आहे यामुळें त्याचे सात्विकादि भेदानें तीन प्रकार संभवतच नाहींत जो तत्त्व बोधाचे पूर्वीं तत्त्व बोधाची इच्छा झाल्यानंतर बोधार्थ कर्तव्य जीं वेदांत श्रवण मनन निदिध्यासनादिक त्यांस प्रतिबंध न व्हावा या साठीं कर्तव्य जो कर्म संन्यास ज्यास विविदिषा (ज्ञान संपादनेच्छा) संन्यास म्हणतात. त्याचें-"त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन"-येणें करून सत्वादि गुण रहित पुरुष कर्तृकत्व (पुरुषानें केलेले तद्रूप) निर्गुणत्वें करून च निरूपण केलें आहे. यास्तव त्यासही सात्विकादिक भेदानें त्रिगुणत्व संभवत नाहीं परंतु ज्यांस तत्त्व बोध उत्पन्न झाला नाहीं आणि तत्त्वबोध व्हावा अशी इच्छा रूप विविदिषा ही चित्तशुद्धि नसल्यामुळें ज्यांस उत्पन्न झाली नाहीं असे जे कर्माधिकारी त्यांचा जो-"अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोतियः॥ स संन्यासी-

च योगीच-" या श्लोकांत सांगितलेला गौण संन्यास त्यासच त्या कर्माधिकारी पुरुषांचे सात्त्विकादिक तीन भेद आहेत यामुळें सात्त्विकादिक भेदांनीं तीन प्रकार संभवतात. त्या संन्यासाविषयींचा विशेष आपणास समजावा या इच्छेनें अर्जुन प्रश्न करतो. हे हृषीकेश, सर्व मनासुद्धां इंद्रियांचें नियमन किंवा प्रेरणा करणाऱ्या-हे-केशिनिषूदन-म्हणजे मोठ्या अश्वाचें स्वरूप धारण करून आपणास मारण्या करितां मुख पसरून आलेला जो केशी या नांवाचा दैत्य त्याच्या पसरलेल्या मोठ्या-मुखांत वाम बाहू घालून तो मोठा लांब करून त्याचे मुखाचें विदारण करून त्यास मारणाऱ्या- अत एव हे महाबाहो- म्हणजे दुष्टनाशार्थ ज्याचे मोठे लांब हस्त आहेत अशा कृष्णा, हृषीकेश या संबोधनानें मानस आंतर कामक्रोधादिक उपद्रवनाश करण्याचें आणि केशिनिषूदन महाबाहो या दोन संबोधनांनीं बाह्योपद्रव नाश करण्याचें सामर्थ्य सूचविलें किंवा बहुत संबोधनांनीं ज्याविषयीं प्रश्न करावयाचा आहे त्या अर्थाचे ज्ञानाविषयीं फार आपली उत्कंठा आहे असें सूचविलें:-संन्यासस्य तत्त्वं वेदितुं इच्छामि-म्हणजे जे अविद्वान् आहेत आणि आत्मतत्त्व ज्ञानाविषयींची ज्यांस इच्छा झाली नाहीं, कर्म करण्याविषयींचाच ज्यांस अधिकार आहे त्यांनीं कांहीं कर्मांचा स्वीकार करून कांहीं कर्मांचा केलेला जो त्याग त्यासच त्याग या सामान्य गुणाचे संबंधानें गौण व्यवहारानें संन्यास असें म्हणतात. असा जो आत्मतत्त्व ज्ञान रहित कर्माधिकारी त्यानें चित्तशुद्ध्यर्थ कांहीं स्वरूपानें केलेला कर्म त्याग रूप संन्यास त्याचें जें तत्त्व म्हणजे पृथक् सात्त्विक, राजस, तामस या भेदानें स्वरूप तें जाणण्यास मी इच्छितो आणि त्यागाचें ही तत्त्व म्हणजे पृथक् स्वरूप जाणण्यास मी इच्छितो तें असें:- गौः अश्वः- या शब्दाचें गाय आणि अश्व हे अर्थ जसे अत्यंत निराळे भिन्न जातीचे आहेत त्या प्रमाणें संन्यास आणि त्याग या शब्दांचे अर्थ अगदीं परस्पर भिन्न विजातीय स्वरूपच आहेत किंवा - ब्राह्मण आणि परिव्राजक या दोन शब्दांचा ब्राह्मणत्व जातीनें युक्त ब्राह्मणच एक अर्थ असून त्यासच परिव्राजकत्व म्हणजे संन्यास हा विशेष धर्म मात्र परिव्राजक हा शब्द बोधितो त्या प्रमाणें संन्यास आणि त्याग या शब्दांचा अर्थ एकच असून त्यांचा सामान्य आणि विशेष रूप धर्म मात्र भिन्न आहे. जर त्यांचे अर्थ अगदीं भिन्न आहेत तर संन्यासाचें स्वरूप काय आणि त्यागाचें स्वरूप-काय हें निरनिराळें समजण्यास मी इच्छितो. जर त्यांचा अर्थ एकच आहे तर त्यांचा सामान्य विशेषभाव कसा हा विशेष जाणण्यास इच्छितो. ॥१॥

**श्रीभगवानुवाच॥ ॥ काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः॥ सर्वकर्मफलत्यागं**

प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥

या दोन प्रश्नांतील दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर भगवान् सूचिकटाह न्यायानें "सूचीकटाह न्याय असा कीं; एकाची सुई करावयाची एकाची कढई करावयाची अशीं दोन्हीं कार्यें एक कालीं करावयास आलीं असतां सुई करण्यास काल थोडा लागतो म्हणून सुई प्रथम करून पश्चात् कढई करतो." प्रथम सांगतात.- काम्यानां कर्मणां न्यासं कवयः संन्यासं विदुः- म्हणजे अंतःकरण शुद्ध्यर्थ अनुपयोगी अशीं जीं काम्य कर्में म्हणजे ज्यांस पुत्र व्हावा अशी कामना ( इच्छा ) आहे त्यांणीं पुत्रेष्टीनें यजन करावें ज्यांस पर्जन्य कामना आहे त्यांणीं पर्जन्येष्टी किंवा कारीरी नामक इष्टीनें यजन करावें. ज्यास स्वर्ग कामना आहे त्याणें ज्योतिष्टोम यज्ञानें यजन करावें. अक्षय स्वर्ग फल कामना ज्यास आहे त्याणें चातुर्मास्य कर्मानें यजन करावें अशीं प्रत्येक फला साठीं शास्त्र विधीनें विहित जी इष्टि, पशु, सोम इत्यादिक कर्में त्यांचा जो न्यास म्हणजे त्याग त्यास कोणी सूक्ष्म दर्शी संन्यास म्हणतात. त्याचें असें तात्पर्य- त्या परमात्म्याप्रत वेदाध्ययनानें, यज्ञानें, दानानें, अनाशक तपानें ब्राह्मण जाणण्यास इच्छितात अशा अर्थाच्या श्रुतींत वेदाध्ययन हें उपलक्षण करून सांगितला जो ब्रह्मचारीचा नित्य कर्म रूप धर्म त्यांत दान हें उपलक्षण करून सांगितला जो गृहस्थाश्रमाचा नित्य कर्म रूप धर्म अनाशक तप हें उपलक्षण करून सांगितला जो वानप्रस्थाचा नित्य कर्म रूप धर्म तोच त्या पूर्वोक्त श्रुतीचें प्रमाण करून पापक्षय द्वारा विविदिषा ( ज्ञानेच्छा ) उत्पन्न होण्यास कारण आहे यास्तव विविदिषा पूर्वक आत्म तत्त्व ज्ञानार्थी जो आहे त्याणें नित्य कर्मेंच भगवदर्पण बुद्धीनें करावीं पूर्वोक्त सर्व काम्य कर्में फलां सुद्धां वर्जावीं किंवा त्यांचा त्याग करावा.- विचक्षणाः सर्व कर्म फल त्यागं प्राहुः- म्हणजे दुसरे विचार शील पूर्वीं सांगितलीं जीं काम्य कर्में आणि नित्य कर्में त्या सर्वांचा जो फलत्याग करणें म्हणजे कर्मानुष्ठान कालीं फलाचा उद्देश न करणें असा जो त्याग त्यासच कर्म त्याग असें म्हणतात. अगदीं कर्म न करणें असा जो कर्म स्वरूपाचा त्याग त्यास तें कर्म त्याग म्हणत नाहींत. नित्य जीं संध्यावंदन, वेदाध्ययन यज्ञादिक कर्में त्यांच्या विधींत अमुक फल त्यांचे अनुष्ठानानें होतें असें सांगितलें नाहीं यास्तव त्यांचें फलच नाहीं यामुळें त्यांचे फलांचा त्याग करावा असें संभवत नाहीं. वंध्या आपल्या पुत्राचा त्याग करते असें संभवेल काय? तेव्हां सर्व नित्य काम्यांचा फल त्याग कसा संभवेल. अशी शंका येथे येते. तथापि जरी नित्य संध्या वंदन करावें यावज्जीवन पर्यंत अग्निहोत्र होम करावा. ग्रहणादिक निमित्त मात्र झालें असतां स्नान करावें अशा नित्य नैमित्तिक कर्मांचे विधींत पूर्वोक्त पुत्रेष्ट्यादिक-

काम्य कर्माचे विधींत जशीं पुत्रादिक विशेष फलें स्पष्ट सांगितलीं आहेत त्या प्रमा- णें स्पष्ट विशेष फल कोणतें ही सांगितलें नाहीं तथापि कर्मा विषयींचा जो विधि त्याचें कार्य पुरुषास त्या कर्मा विषयीं प्रवृत्त करावें हेंच आहे. त्या व्यापारांत फल कोणतें ना- हीं आणि कोणता ही धर्मार्थ कामादिक पुरुषार्थ नाहीं त्या व्यापाराचे ठायीं हें केलें असतां काय फल होईल किंवा होणार नाहीं असा विचार करणारा जो पुरुष त्या- स प्रवृत्त करण्यास त्या व्यापार रूप कर्मा विषयींचा विधि समर्थ न होतां आपले पुरुष प्रवृत्ति रूप कार्य करण्या साठीं त्या व्यापाराचें सामान्यतः कांहीं तरी फल - आहे असें सूचवितो. जसा विश्वजिन्नामक यज्ञानें यजन करावें अशा काम्य- विश्वजिन्नामक य ज्ञाचे विधींत अमुक फलासाठीं हा काम्य यज्ञ करावा असें वि- शेष फल जरी सांगितलें नाहीं तथापि त्या यज्ञाचे ठायीं विचार वंताची प्रवृत्ति हो- ण्या साठीं त्याचें सर्वांस साधारण जें स्वर्ग रूप फल तें आहे असें तो विधि सूच- वितो. यास्तव नित्य कर्माचे विधींत त्याचें अमुक फल असें विशेष फल स्पष्ट जरी सांगितलें नाहीं तथापि कर्में करून पितृ लोक प्राप्त होतो धर्मानुष्ठान करणारे स- र्व हे पुण्य लोका प्रत जाणारे होतात, धर्में करून पापाचा नाश होतो असें जें सा- मान्यतः कर्माचें फल सांगितलें आहे त्या फलाचा तो नित्य कर्माचा विधि आक्षेप करतो म्हणजे पुरुषास नित्य कर्माचे ठायीं प्रवृत्त करण्यास त्याचें तें सामान्य फल - आहे असें जाणवितो. त्या नित्य कर्माचे फलांचा त्याग संभवेल जरत्या सामान्य फलाचाही त्याग केला तर तें नित्य कर्म पुनः निष्फलच झालें तेव्हां त्या निष्फल कर्माचा विधि विचार वंत पुरुषांस नित्य कर्माचे ठायीं प्रवृत्त करण्यास कसा समर्थ होईल अशी शंका करूंनये. कारण सर्व ही नित्य कर्में संयोग पृथक् न्यायानें का- म्य आणि नित्य अशीं उभय स्वरूप आहेत. संयोग पृथक्त्व न्याय म्हणजे एकास- च दोन धर्म येणें किंवा दोन धर्मानीं एकच उभय स्वरूप होणें. त्यास उदाहरण-जसें अग्नि होत्र होम रूप कर्म नित्य असतां ही ज्यास इंद्रिय रूप फलाची इच्छा आहे- त्याणें दधि रूप होम द्रव्यानें अग्निहोत्र होम करावा अशा विधीनें त्यास काम्यत्व ही येतें. तशी संध्यावंदनादिक जीं सर्व नित्य कर्में आहेत त्यांचा पूर्वोक्त श्रुतीनें आ- त्म तत्त्व ज्ञानेच्छा रूप विविदिषा होणें या फला विषयीं विनियोग केला आहे या- वरून तीं नित्य कर्में काम्य ही होतात. नित्य कर्माचा विविदिषे विषयीं विनियोग नसेल तर नित्य कर्माचे अनुष्ठानानें आत्मतत्त्व ज्ञान होईल कीं नाहीं असा संशय होईल विनियोग केल्यामुळें नित्य कर्माचें अनुष्ठान केल्यानें चित्त शुद्धीचे द्वारा- आत्म तत्त्व ज्ञानेच्छा रूप विविदिषा (ज्ञानेच्छा) होऊन वेदांत विचारानें आत्मत- त्त्व ज्ञान अवश्य होईल. असा नियम झाला यास्तव प्रतिकर्माचें तें सामान्य किंवा- विशेष फल प्रति बंधक आहे, या कारणानें त्याचा त्याग करून विविदिषे साठीं म्ह-

णजे चित्त शुद्धीचे द्वारानें आत्मतत्त्व ज्ञानेच्छा होण्या साठीं नित्य कर्माचे ठायीं विचार वंत पुरुषाची प्रवृत्ति संभवते यास्तव आत्म स्वरूपच नित्य आहे त्याहून भिन्न अनात्मभूत देहादिक सर्व प्रपंच अनित्य आहे असा नित्यानित्य वस्तु विवेक होऊन आत्म स्वरूप जाणण्याची इच्छा दृढ होई तों पर्यंत अंतःकरणाची शुद्धि होण्यासाठीं ज्ञानास जें विरुद्ध नाहीं असें अवश्य करावयाचें जें नित्य नैमित्तिक कर्म त्याचें अनुष्ठान करण्याचा अधिकारी जो त्याणें केलेला जो सर्व काम्य नित्य कर्मांचा विशेष किंवा सामान्य फलांचा त्याग संभवतो. ज्यांस आत्मतत्त्व ज्ञान नाहीं असे जे अविद्वान् त्यांनीं चित्तशुद्धि द्वारा विविदिषा उत्पन्न होऊन वेदांत श्रवण मननादि द्वारा आत्मतत्त्व ज्ञान होण्यासाठीं नित्यनैमित्तिक काम्यादि सर्व कर्मेंच फलोद्देश न करून करावीं कर्मांचा त्याग करूं नये याविषयीं– या लोकीं किंवा या देहांत कर्मेंच करीत असतां शंभर वर्षें पर्यंत जगावें अशी इच्छा करी म्हणजे यावज्जीव विहित कर्में करावीं अशा अर्थाची श्रुति प्रमाण आहे. आणि नित्य नैमित्तिक कर्मानुष्ठानानें चित्त शुद्धी होऊन आत्मतत्त्व विचारा विषयीं ची बुद्धीची प्रवणता (आसक्ति) झाल्या नंतर सर्व कर्म निवृत्ति स्वतः म्हणजे आपो आप होते असें नैष्कर्म्य सिद्धी या नांवाचे ग्रंथांत सांगितलें आहे, तें असें– नित्य नैमित्तिक कर्में चित्ताची शुद्धी करून बुद्धीस आत्म विचाराकडे लावितात. आणि आपण आपलें कार्य करून कृतार्थ होऊन मेघ जसे वृष्टीनें धान्य आणि उदक यांची पृथ्वीवर समृद्धि करून वर्षा कालाचे अंतीं आपो आप जातात त्याप्रमाणें निवृत्त होतात. असेंच– "यस्त्वात्म रति रेव स्यात्" या श्लोकांत भगवद्गीतेंत ही पूर्वी सांगितलें आहे. योग वासिष्ठांत ही योगी कर्मांचा त्याग करीत नाहीं कर्मेंच त्याचा त्याग करितात. कारण आत्मविचार परायण जो योगी त्याच्या संकल्पाचाच नाश झाल्यामुळें कर्मांनें मूळच नाहीं; पर्णें गळून पडावयाचा समय किंवा ऋतु प्राप्त झाला म्हणजे वृक्ष जसा गलित पर्ण होतो तसा आत्म विचार करणारा योगी आत्मतत्त्वा प्रत पावून गलत् कर्म म्हणजे कर्म रहित होतो असें वसिष्ठांनीं रामास सांगितलें आहे. आणि श्रीमद्भागवतांत ही विविदिषा उत्पन्न होऊन बुद्धि आत्म विचार परायण झाली म्हणजे कर्मानुष्ठान ज्ञाननिष्ठेच्या विक्षेपास कारण होतें यास्तव विधिपूर्वक संन्यासाश्रम घेऊन सर्व कर्मांचा त्याग करावा असें सांगितलें आहे, तें असें– जों पर्यंत या संसारावर वैरस्य होऊन वैराग्य प्राप्त झालें नाहीं अथवा माझे गुणादिकाचे श्रवणादिका विषयीं श्रद्धा जोंवर झाली नाहीं तावत्काल पर्यंत कर्में करावीं. जो ज्ञाननिष्ठ आहे अथवा जो विरक्त आहे किंवा माझा भक्त आहे अथवा जो निरिच्छ आहे त्याणें अमुक आश्रमांत हा आहे असें समजण्यासाठीं लिंगभूत जे त्या त्या ब्राह्मणादिक वर्णांस, आणि ब्रह्मचारी गृहस्था दिक आश्रमांत शास्त्र विहित धर्म आहेत त्यां प्रत टाकून विधिनिषेधातीत होऊन संचार करा-

वा. नित्य कर्मेंच विविदिषे साठीं करावीं, असा वेदांत त्याचा विनियोग केला आहे. यास्तव त्यांचें अनुष्ठान करून काम्य कर्मांच्या फलां सह्वां जो स्वरूपत: त्याग तो संन्यास असें एकमत या श्लोकाचे पूर्वार्धानें सांगितलें. पूर्वोक्त संयोग पृथक्त्व न्यायानें पूर्वीं सांगितले प्रमाणें सर्व नित्य काम्य कर्मांस विविदिषार्थत्व आहे यामुळें-विविदिषे साठीं त्या सर्वांचें अनुष्ठान करून त्यांचीं जीं प्रत्येक फलें त्यांचा जो त्याग तोच त्याग असें दुसरें मत उत्तरार्धानें सांगितलें. या वरून सकल काम्य कर्म त्याग संन्यास शब्दाचा अर्थ सर्व काम्य नित्य कर्मांच्या फलांचा त्याग —— शब्दाचा अर्थ आहे. यास्तव गौ:-अश्व: या शब्दाच्या अर्था प्रमाणें संन्यास आणि त्याग शब्दांचे अर्थ अगदीं विजानीय अत्यंत भिन्न नाहींत तर अंत:करण शुद्ध्यर्थ कर्मानुष्ठान करून त्यांचे फलांचा मात्र त्याग करणें असा एकच या दोन शब्दांचा अर्थ आहे असें एका प्रश्नाचें उत्तर सांगितलें. ॥२॥

**त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिण:॥ यज्ञदान तप:कर्म न त्याज्यमिति चापरे॥३॥ ॥**

आतां अर्जुनाच्या दुसरे प्रश्नाचें उत्तर सांगण्या करितां संन्यास आणि त्याग. या शब्दांचे अर्थांस सात्विकादिक भेदानें त्रिगुणत्व सांगण्या साठीं कर्म-त्यागाविषयीं मतांचा जो विवाद आहे तो दाखवितात.-दोषवत् कर्म त्याज्यं इति एके मनीषिण: आहु: - म्हणजे सर्व यज्ञादिकर्म दोषवत् म्हणजे हिंसादिक दोषानें युक्त आहे या मुळें बंधास कारण आहे म्हणून ज्यांस आत्मज्ञान झालें नाहीं आणि आत्म ज्ञानेच्छा रूप विविदिषा ही झाली नाहीं असे जे कर्माधिकारी अविद्वान् आहेत त्यांनीं ही त्यांचा त्यागच करावा-अथवा दोषवत् म्हणजे-बंधास कारण आहेत. मनोधर्म रागद्वेषादिक दोषांचा जसा त्याग करतात त्याप्रमाणें सर्व कर्म बंधक आहे. यामुळें त्यांचा त्याग करावा, असें विचारवंत सांख्य म्हणतात. त्यांचा असा अभिप्राय आहे. जसें काम्य कर्म जन्ममरणात्मक संसाररूप बंध हेतु वास्तव दोषयुक्त आहे त्याप्रमाणें दर्शपूर्ण मास, पशु, चातुर्मास्य, ज्योतिष्टोमादिक सर्व नित्यकर्म व्रीहि आदिक सर्व औषधी, उदुंबर, अश्व त्यादिक यज्ञिय वृक्ष, पशु आदिक जीव यांच्या हिंसेनें म्हणजे साक्षात् किंवा परंपरेनें जीवाच्या पीडेनें-मिश्रित किंवा युक्तच आहे आणि सर्व भूतांची हिंसा करूंनये असा जो शास्त्रांत निषेध सांगितला आहे त्याचा सर्व प्राण्यांची ही हिंसा पापाला जनक आहे असा अर्थ आहे या वरून यज्ञांत जी हिंसा होते ती ही पापाला उत्पन्न करणारी आहे यामुळें पाप जनकत्वास्तव तें सर्व नित्यकर्म ही प्रति बंधक होईल यास्तव त्याचा ही त्याग करावा. सर्वभूतांची हिंसा करूंनये असा जो शास्त्रांत निषेध सांगितला आहे तो

सामान्य आहे त्याचा बाधक व्रीहीनें कंडण करावें, दर्भ वनस्पतींचा यज्ञार्थ छेद-करावा, अग्नि आणि सोम या देवतांच्या यागासाठीं पशूंची हिंसा करावी, असा विशेष विधि शास्त्रांत सांगितला आहे. त्याचा पशु आदिकाचे हिंसेनें निष्पन्न होतो-जो याग तो इष्ट फलास साधन आहे, असा अर्थ आहे. यावरून हिंसा करूं नये अ-सें जें सामान्य शास्त्र आहे तें ज्या हिंसे विषयीं विशेष विधि शास्त्रांत सांगितला नाहीं अशा निरर्थक हिंसे विषयींचें आहे यास्तव तें सामान्यशास्त्र विहित हिंसेस पापजनकत्व सांगून त्याविहित हिंसे विषयीं प्रवृत्त होत नाहीं तेव्हां यज्ञादिक नित्य कर्म बंधकरणारें नाहीं मगतें कां टाकावें अशा शंकेचें ते सांख्य असें निराकरण करतात. जेथें सामान्य शास्त्राचा आणि विशेष शास्त्राचा विषय एक असून परस्पर विरुद्ध विधि आणि निषेध त्या एकावर राहत नाहींत तेथें विशेष शास्त्रानें सामान्य शास्त्राचा बाध होतो म्हणजे विशेष शास्त्राचा जो विषय त्यावर सामान्य शास्त्र प्रवृत्त न होऊन त्याचा विषय सोडून दुसरे ठायीं सामान्य शास्त्र प्रवृत्त होतें. भूत हिंसे विषयींचीं जीं सांगितलेलीं पूर्वोक्त सामान्य आणि विशेष शास्त्रें त्यांचे विषय-भिन्न आहेत यास्तव विशेष शास्त्र विधीनें सामान्य निषेध शास्त्राचा बाध न होऊन विशेष शास्त्राचा विषय विधि आणि सामान्य शास्त्राचा विषय जो निषेध त्या-दोहोंचा ही परस्पर बाध न होतां समावेश प्राणि हिंसात्मक एके कर्मा वर होतो. तो-असा- सर्व भूतांची हिंसा करूं नये अशा निषेध विधीनें हिंसा पुरुषास अनर्थ हेतू आहे असें जाणिवलें हिंसा अक्रत्वर्थ म्हणजे याग निष्पन्न करणारी नव्हे असें-जाणिवलें नाहीं विधीनें पशु आदिकांची हिंसा क्रत्वर्थ म्हणजे याग निष्पन्न करणारी आहे असें जाणविलें तें पुरुषास अनर्थ हेतु नाहीं असें जाणविलें नाहीं. यास्तव विधि शास्त्रोक्त किंवा विहित यागनिष्पादकत्व आणि निषेध शास्त्रोक्त पुरुषानर्थ हेतुत्व या दोहोंचाही पशु हिंसेवर समावेश झाला. शास्त्र विहिताला ही निषिद्धत्व-आणि शास्त्र निषिद्धाला ही विहितत्व अभिचार कर्मरूप श्येन यागा प्रमाणें संभवतें. अभिचार कर्म करणाऱ्यानें शत्रु मरणार्थ श्येन यागानें यजन करावें असा श्येन-यागा विषयीं विधि आहे तरी सर्व भूतांची हिंसा करूं नये या शास्त्रानें त्याचा निषेध-केला यास्तव तो श्येन याग मोठे अनर्थास म्हणजे पापास उत्पन्न करणाराच असा आहे. राग द्वेषाचे स्वाधीन झाल्यामुळें त्या अनर्थाचें सहन करणाऱ्या पुरुषा विषयीं चाच तो श्येन यागाचा विधि आहे या प्रमाणेंच दर्शपूर्ण मास, पशु ज्योतिष्टोमादिक नित्यकर्मांचा विधि पूर्वोक्त सामान्य शास्त्रानें निषिद्ध केलेल्या हिंसा पूर्वक याग विषयींचाच आहे. असेंच भारतांत ही सांगितलें आहे. तें असें- "जपस्तु सर्व धर्मेभ्यः परमो धर्म उच्यते॥ अहिंसयाहि भूतानां जपयज्ञः प्रवर्तते॥" - ज्यांत हिंसा आहे अशा दर्श पूर्ण मास, चातुर्मास्य, पशु, सोमादिक धर्मांपेक्षां गायत्र्या दिक महामंत्रादिकांचा जप-

करणें हा श्रेष्ठ धर्म आहे, कारण त्या जपधर्मांत कोणाची हिंसा न होतां तो निष्पन्न होतो. मनुस्मृतींत ही- "जप्येनैव तु संसिद्ध्येत् ब्राह्मणो नात्र संशयः॥ कुर्यादन्यन्नवा कुर्यान्मैत्रो ब्राह्मण उच्यते-" ब्राह्मण जपानेंच सिद्धी प्रत पावेल तो जपाशिवाय दुसरें कर्म करो किंवा न करो ज्यास सर्व भूतांची मैत्री आहे म्हणजे सर्वभूतांची हिंसा जो करीत नाहीं त्यासच ब्राह्मण म्हणावें असें सांगितलें आहे. यास्तव हिंसा दोषानें दुष्ट नित्य कर्माचा त्याग श्येनादिक अभिचार कर्मा प्रमाणें कर्माधिकाऱ्यानें ही करावा. यज्ञ दान तपः कर्म न त्याज्यं इति अपरे प्राहुः- अंतःकरण शुद्धीचे द्वारा विविदिषा उत्पन्न करणारें यज्ञ, दान, तप एतद्रूप जें कर्म त्याचा त्याग करूं नये. असें दुसरे विचारवंत मीमांसकादिक बोलतात. त्यांचा असा अभिप्राय आहे. सर्व भूतांची हिंसा करूं नये अशा सामान्य निषेध शास्त्रानें सर्व हिंसेला अनिष्ट साधनत्वाचा, म्हणजे पाप जनकत्वाचा बोध होत नाहीं तर पुरुषार्थ जी हिंसा म्हणजे पुरुषास उपकार करणारी जी हिंसा ती पापाला जनक असा बोध होतो. तो असा- त्या निषेध वाक्यांत कर्तृ वाचक आख्यात (तिङंत) आहे त्यास विधि प्रत्यय आणि कर्तृ प्रत्यय अशीं दोन नांवें आहेत आणि हिंसा बोधक धातु आहे आणि अनिष्ट साधनत्व रूप निषेधार्थक न- किंवा मा असें पद आहे आणि सर्व भूतांचें वाचक सर्व भूतानि असें पद आहे, त्यांतील विधि प्रत्ययाचा इष्ट साधनत्व अर्थ धातूचा हिंसा अर्थ या दोन पदांनीं इष्ट साधनत्वें करून प्रसिद्ध जी हिंसा तिचा अनुवाद (सिद्ध कथन) करून तो अनिष्टाला साधन आहे असा निषेधानें बोध होतो त्या बोधांत इष्ट कोणाचें आणि अनिष्ट कोणाचें अशी आकांक्षा राहिली तिचें निवारण कर्तृ प्रत्ययानें जो पुरुषरूप कर्ता बोधविला आहे त्याचा त्या इष्टावर आणि अनिष्टावर अन्वय किंवा संबंध होऊन पुरुष संबंधी किंवा पुरुषांचें जें हित त्यास साधनत्वें करून प्रसिद्ध जी सर्व भूतांची म्हणजे कोणत्याही जीवाची हिंसा पुरुष संबंधी किंवा पुरुषाचें जें अनिष्ट म्हणजे पाप त्यास साधन आहे. असा त्या सामान्य निषेध शास्त्रा पासून बोध होतो. असा बोध मानला म्हणजे त्याचा अनुवाद करून निषेध करावयाचा तो निषेध्य आणि निषेध यादोहोंला समान विषयकत्व म्हणजे त्या दोहोंचा एक विषय असावा असा जो शास्त्रांत नियम किंवा न्याय औत्सर्गिक म्हणजे बाधक नसतांना तो टाकूं नये असा आहे त्याचें ही कर्तृ प्रत्ययानें पुरुषाची उपस्थिति होऊन त्याचा पूर्वोक्त रीतीनें इष्ट आणि अनिष्टावर अन्वय होऊन पुरुष संबंधीं अनिष्ट साधनत्वें करून प्रसिद्ध जी हिंसा पुरुषसंबंधी अनिष्ट साधन असा बोध झाल्यामुळें दोघांचा विषय एकच झाला या कारणानें रक्षण झालें. यास उदाहरण- क्रतु प्रकरणीं अनृत बोलूं नये अशा अर्थानें जें निषेध शास्त्र आहे तें क्रतूपकारकत्व रूप क्रत्वर्थत्वें करून प्रसिद्ध जें अनृत बोलणें त्याचा निषेध करतें म्हणजे प्रकरणानें क्रतूची उपस्थिति होऊन क्रतु संबंधी जें फलितार्थानि-

रूप इष्ट तत्साधनत्वें प्रसिद्ध अनृत भाषण तें क्रतु संबंधी जें वैगुण्य रूप अनिष्ट तत्साधन आहे असें बोधवितें या कारणास्तव त्या निषेधास क्रत्वर्थत्वच आहे पुरुषार्थ अनृत निषेध प्रकरणा बाहेरील अनृत बोलूं नये अशा सामान्य निषेधानेंच-सिद्ध आहे म्हणून पुरुषार्थ हा प्राकरणीक निषेध नाहीं असा सिद्धांत आहे. ऋत्विगानति- म्हणजे तूं माझा ऋत्विज हो तुला दुसऱ्या यजमानापेक्षां दक्षणा मी अधिक देईन अशी मिथ्योक्ती- यावरून सर्व भूत हिंसा करूं नये या निषेधशास्त्रानें पुरुषार्थ हिंसेलाच पुरुषाचें जें अनिष्ट पाप त्याचें साधनत्व सांगितलें, पश्वादिकाचें आलंभन रूप क्रत्वर्थ हिंसेला पापजनकत्व सांगितलें नाहीं अथवा यागीय पश्वालंभ जर हिंसा होईल तर भूतहिंसा करूं नये या शास्त्रानें तीस पाप जनकत्व येईल तो आलंभ हिंसाच नव्हे. यास प्रमाण.- पशु प्रकरणीं तो पशु सुवर्णशृंग होऊन स्वर्ग लोकास जातो आणि त्याच प्रकरणीं अरे पशू तूं मरत नाहींस तुझी हिंसा होत नाहीं अशा अर्थाच्या श्रुती आहेत. यावरून ज्याची हिंसा करावयाची तो हिंसनीय त्या हिंसनीय जीवास उपकार न करणारा जो त्याचे प्राण वियोग होण्याचा व्यापार तोच हिंसा शब्दाचा त्या शास्त्रांत अर्थ आहे, यास्तव यागीय पशूचें जें-आलंभन तें पापजनक नव्हे असें जर आहे तर तीर्था शिवाय अन्यत्र म्हणजे जेथें-हिंसा विहित आहे त्या स्थला शिवाय दुसरे ठिकाणीं हिंसा करूं नये असा जो हिंसा-बोधक पद ज्यांत आहे असा निषेध आहे त्यांत तीर्था शिवाय अन्यत्र असें जें म्हटलें तें व्यर्थ होईल. तुमचे मता प्रमाणें विहित स्थलीय हिंसा हिंसाच नव्हे असें जर सांख्य बोलतील तर त्यांचेच बोलण्या वरून यागीय विहित हिंसा पापजनक नव्हे असें झालें. अथवा हा धर्म म्हणजे इष्ट साधन हा अधर्म म्हणजे अनिष्ट साधन याविषयीं शास्त्रच प्रमाण आहे यास्तव विधिशास्त्रानें ज्यास इष्ट साधनत्व रूप धर्मत्व बोधविलें आहे त्यावर निषेध शास्त्र अनिष्ट साधनत्व बोधन करीत नाहीं. विधि-शास्त्राला वैध पशु हिंसे शिवाय दुसरा विषय मिळत नाहीं. निषेध शास्त्राला यागीय हिंसे शिवाय दुसरी राग प्राप्त म्हणजे ज्या विषयीं विधि नाहीं अशी अवैध हिंसा-विषय आहे यास्तव विशेष विधिशास्त्र निषेधरूप सामान्य शास्त्रापेक्षां प्रबल आहे म्हणून त्याचें बाधक म्हणजे अपवाद करणारें आहे यास्तव विशेष शास्त्राचा विषय सोडून तें प्रवृत्त होतें असें जर आहे तर श्येन यागरूप अभिचार कर्माचे विधीनें ज्या शत्रु मरणादिकास इष्ट साधनत्व बोधविलें आहे त्यास अनिष्ट साधनत्व बोधन करण्यास निषेध शास्त्र पूर्वोक्त युक्तीनें समर्थ होत नाहीं. यास्तव निषेध शास्त्र त्याचा विषय सोडून दुसरे विषयाचे ठायींच प्रवृत्त होईल. श्येन यागरूप विहित कर्मा विषयीं प्रवृत्त होणार नाहीं यामुळें श्येनादिकास ही पापजनकत्व येणार नाहीं. अशी शंका करूं नये. श्येनादिकाची निंदा श्रुतींतच केली आहे आणि त्या विषयीं प्रा-

यश्चित्त ही सांगितलें आहे आणि शिष्टांनीं त्याचा स्वीकार केला नाहीं या कारणामुळें त्यांस विधीनें इष्ट शत्रु मरण साधनत्वाचा बोध केला तरी निषेध विधी पापजनकत्व रूप बलवत्तर अनिष्ट साधनत्वाचा बोध करतो यामुळें त्यास पापजनकत्व आहे. विधि शास्त्राच्या विषयाचे ठायीं निषेध शास्त्र प्रवृत्त होत नाहीं असा जो नियम सांगितला तो ज्या विषयीं प्रायश्चित्त सांगितलें नाहीं आणि जो शिष्ट स्वीकृत नाहीं अशा विधि विषयाचे ठायीं निषेध शास्त्राची प्रवृत्ति होत नाहीं अशा विवक्षेचा आहे. श्येनादिकांस निषेध शास्त्रानें पापजनकत्व बोध केला तर त्याविषयीं प्रवृत्ति कशी होईल अशी शंका करूंनये. जशी आस्तिक कामुक पुरुषाची परस्त्री गमनाचा शास्त्रीय निषेध असतां ही त्या निषेधाचें कामाचे वश होऊन अत्युत्कंठेनें उल्लंघन करून परस्त्री गमना विषयींची प्रवृत्ति जशी होते त्या प्रमाणें शत्रूचे द्वेषामुळें त्याचे मरणा विषयीं अत्यंत उत्कंठा होऊन श्येनादिकाच्या निषेधाचें उल्लंघन करून ही पुरुषाची श्येना विषयीं प्रवृत्ति होते. यांत इतकाच विशेष आहे. कामुक पुरुषास परस्त्री संगाचे ठायीं आपलें इष्ट जें सुख त्याच्या साधनत्वाचें ज्ञान शास्त्रावरून होतें. दुसरे प्रमाणावरून होतें आणि श्येन यागावर शत्रुमरण रूप स्वेष्ट साधनत्वाचें ज्ञान शास्त्राचे प्रमाणावरून होतें तो विशेष येथें उपयोगीं नाहीं. पूर्वोक्त भारतांतील वाक्य आणि मनुस्मृती बलवत्तर वैदिक प्रमाणावरून जप प्रकरणीं सांगितलेला जो जपविधि त्याचें स्तावक आहे त्याचें यज्ञिय हिंसा करूंनये याविषयीं तात्पर्य नाहीं. यास्तव यज्ञादिक नित्य कर्म हिंसादिक दोषानें दुष्ट म्हणजे पापाला उत्पन्न करणारें नाहीं. असो हा विचार मोठाच आहे दिक्प्रदर्शनार्थ येथें संक्षेपानें लिहिला आहे यांतील गुण दोष विचार निर्मत्सर पंडितांनीं करावा. ॥ ३ ॥

## निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ॥ त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥ ॥

या प्रमाणें कर्माचा त्याग आणि अत्याग यांविषयीं विप्रतिपत्ति म्हणजे विवाद असतां ॥ हे भरत सत्तम तत्र मे निश्चयं शृणु — म्हणजे हे भरत कुलांतील श्रेष्ठा अर्जुना, तूं ज्याविषयीं प्रश्न केलास असा जो कर्माधिकाऱ्यानीं केलेला फलाभिसंधि (फलेच्छा) पूर्वक कर्म त्याग ज्यास संन्यास आणि त्याग अशीं दोन नावें आहेत. त्या विषयीं पूर्वाचार्यांनीं केलेला जो निश्चय त्याप्रत माझे वाक्यानें श्रवण कर त्याग लोक प्रसिद्धच आहे त्यांत दुर्ज्ञेयत्व काय आहे अशी शंका होईल तर त्या विषयीं सांगतात. हे पुरुषव्याघ्र हि त्यागस्त्रिविधः परिकीर्तितः — म्हणजे हे पुरुष श्रेष्ठा अर्जुना, ज्या कारणास्तव कर्माधिकाऱ्यांनीं केलेला फलाभिसंधि पूर्वक त्याग सात्विक, राजस, तामस याभेदानें तीन प्रकारचा आहे असें पूर्वाचार्यांनीं सांगितलें आहे

अथवा फलाभिसंधि रूप विशेषणानें युक्त जें कर्म त्यास फलाभिसंधि विशिष्टकर्म म्हणावें त्याचा त्याग एक कर्म असतां ही फलाभिसंधिरूप विशेषणाचे त्यागामुळें झालेला फलाभिसंधि असतांही कर्मरूप विशेष्याच्या त्यागामुळें झालेला एक फलाभिसंधि आणि कर्म या विशेषण आणि विशेष्य या दोघांचे त्यागामुळें झालेला एक असा तीन प्रकारचा आहे. त्यांतील प्रथम सात्विक आहे यामुळें तो ग्राह्य आहे. दुसरा दुःख बुद्धीनें केलेला राजस अज्ञानानें किंवा विपरीत बुद्धीनें केलेला तामस असा दोन प्रकारचा आहे. तो दोन्ही प्रकारचा ही त्याज्यच आहे म्हणजे तसा त्याग कर्माधिकाऱ्यानें करण्यास अयोग्य आहे इतकाच अर्जुनाचे प्रश्नांतील विषय त्याग आहे म्हणजे त्या त्यागा विषयींचाच अर्जुनाचा प्रश्न आहे तिसरा त्याग नैर्गुण्यरूप आहे तो जे कर्मानधिकारी आहेत त्यांणीं करावयाचा आहे. त्या विषयीं अर्जुनाचा प्रश्न नाहीं. तो त्याग साधनभूत आणि फलभूत या भेदानें दोन प्रकारचा आहे. त्यांत फलो देशं न करतां कर्मानुष्ठान करणें असा जो सात्विक पूर्वोक्त त्याग तेणें करून ज्याची चित्तशुद्धि होऊन आत्मज्ञानेच्छारूप विविदिषा ज्यास उत्पन्न झाली आणि आत्मज्ञान होण्यास साधनभूत जें वेदांत श्रवण मननादिक त्याचें अनुष्ठान करण्या करितां चित्त शुद्धि झाल्यामुळें तीस साधनभूत कर्मा विषयीं विमुख होऊन जो त्यानें केलेला कर्मत्याग तो साधनभूत कर्मत्याग त्यासच विविदिषा संन्यास म्हणतात. तो "नैष्कर्म्य सिद्धिं परमां-" येणें करून भगवान् पुढें सांगतील. जन्मांतरीं केलेल्या साधनाभ्यासाचे परिपाकानें त्याचे संस्कारामुळें या जन्माचे ठायीं आत्मबोध ज्यांस झाला आहे त्यांनीं केलेला जो फलाभिसंधि आणि कर्म या दोहोंचाही त्याग तो फलभूत त्याग त्यासच विद्वत्संन्यास म्हणतात. त्याचें निरूपण-"यस्त्वात्मरति रेवस्यात्-" या श्लोकाचे व्याख्यानांत आणि स्थितप्रज्ञाच्या लक्षणाचे निरूपणांत सविस्तर केलें आहे. असें हें त्यागाचें तत्व दुर्ज्ञेय आहे आणि तें तत्व जाणावयास मी इच्छितों असें तूंही म्हटलें. स याकरितां सर्वज्ञ मीजो परमेश्वर त्याचे वाक्या पासून त्याचा निश्चय तूं करून घे असा अभिप्राय दोन संबोधनानीं कुलनिमित्तक उत्कर्ष आणि पौरुषनिमित्तक उत्कर्ष यामुळें तुला तो निश्चय करून घेण्यास योग्यता आहे असें सूचविलें. ॥४॥

**यज्ञदानतपः कर्म न त्याज्यं कार्यमेव तत्॥ यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम्॥५॥**

तो निश्चय पूर्वोक्त मतांतील द्वितीय पक्षाचा अवलंब करून सांगतात. यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणां - च हा हेत्वर्थी आहे- ज्या कारणास्तव यज्ञ दान तपहीं ज्यांस फलाभिसंधि नाहीं असे जे विचारवंत त्यास पावन म्हणजे ज्ञानोत्पत्तीला प्रतिबंधक जें पापादिक त्यांचीं नाश करणारीं आणि ज्ञानोत्पत्ति होण्याची योग्य

ता आणणारें जें पुण्य त्याला उत्पन्न करणारीं आहेत यास्तव अंतःकरण शुद्धि होण्याची ज्यांस इच्छा आहे असे जे कर्माधिकारी अज्ञ त्यांनीं अंतःकरण शुद्ध्यर्थ फलाभिसंधि टाकून यज्ञ, दान, तप एतद्रूप जें कर्म तें करावेंच त्यांचा त्याग करूं नये येणें करूनच में करावें असें लब्ध झालें असतां करावें असें जें पुनः सांगितलें तें-कर्म करण्या विषयीं आदर सुचविण्या करितां असें जाणावें. ॥५॥

## एतान्यपितु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ॥ कर्तव्यानीति मे पार्थनिश्चितं मतमुत्तमम् ॥६॥

जर यज्ञ, दान, तप या कर्मांस अंतःकरण शुद्धि करण्याचें आणि ज्ञानोत्पत्ति होण्याची योग्यता आणण्याचें सामर्थ्य आहे तर तीं फलाभिसंधीनें केलीं तरी अंतःकरण शुद्ध्यादिक कार्य करतीलच मग फलाभिसंधीचा त्याग कशास पाहिजे या शंकेचें निवारणार्थ सांगतात. ॥ एतानि अपितु कर्माणि- तु शब्द शंका-निवारणार्थ, यज्ञादिक कर्में जरी स्वभावानें चित्त शुद्धि करणारीं आहेत. तथापि तीं ज्ञानोत्पत्ति योग्यता संपादन करणारी जी शुद्धि ती पन करीत नाहींत. फल भोगोपयोगी जी अंतःकरण शुद्धि ती मतच करतात. " काम्येपि शुद्धिरस्त्येव भोग-सिद्ध्यर्थ मे वसा ॥ विट्वराहादि देहेन नत्द्यैंद्रं भुज्यते फलं ॥ " काम्य कर्मानं ही शुद्धि आहे परंतु ती भोग सिद्ध्यर्थ शरीरांतःकरण शुद्धीच होते. विट्वराहादिक देहानें उत्तम इंद्रादिक लोकचे फलांचा भोग होत नाहीं असें वार्तिकांत सांगितलें आहे यास्तव यज्ञादिक कर्में ही- संगं त्यक्त्वा फलानि च कर्तव्यानि - फलाभिसंधि पूर्वक केलीं असतां बंधन करणारीं आहेत तथापि जे मुमुक्षु आहेत त्यांनीं मीं यांचा कर्ता हें कर्म फलाचे उद्देशानें मी करीन असा कर्तृत्वाभिमान रूप जो संग आणि फलांचा उद्देश यांस टाकून केवळ अंतःकरण शुद्ध्यर्थच करावीं.- इति-या हेतूस्तव, जे कर्माधिकारी आहेत त्यांनीं कर्में टाकावीं नटाकावीं या दोन मतांत-टाकूं नये असें ॥ हे पार्थ मे निश्चितं उत्तमं मतं - अर्जुना माझें निश्चित उत्तम मत आहे असें तात्पर्य. ॥ ६॥

## नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ॥ मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७॥

या प्रमाणें - " निश्चयं शृणु मे " - येणें करून त्यागा विषयीं जो निश्चय सांगावयाची प्रतिज्ञा केली होती तो निश्चय सांगून - " यज्ञ दान तपः कर्म न त्याज्यं- " असा जो पक्ष तोच आपणास इष्ट पक्ष असें स्थापन करून - त्याज्यं दोषवदित्ये-के- येणें करून जो पक्ष सांख्यांचा सांगितला होता त्याचें निराकरण करण्या साठीं

पूर्वोक्त त्यागाचे सात्विकादि भेदें करून तीन प्रकार सांगण्याचा प्रारंभ करतात.॥ नियतस्य कर्मणः संन्यासः न उपपद्यते- म्हणजे काम्य कर्मे अंतःकरण शुद्धी स-कारण नाहींत आणि जन्म मरण रूप बंधास कारण आहेत यास्तव तीं दोषयुक्त आ-हेत. या कारणानें बंधाला दूर करणारा जो आत्मबोध तो आपणास व्हावा अशी ज्या-स इच्छा आहे त्यानें काम्य कर्मांचा त्याग करावा. हें योग्य आहे परंतु नित्य कर्मानें अनुष्ठान मुमुक्षूस अवश्य अपेक्षित जी अंतःकरणाची शुद्धि तीस कारण आहे आणि त्याचें अनुष्ठान न केलें तर प्रत्यवाय ही उत्पन्न होतो यास्तव नित्य कर्मांचा त्याग शास्त्र आणि युक्ति यांवरून कर्माधिकारी मुमुक्षूस योग्य नाहीं त्याचें अनु-ष्ठान अवश्य त्यांनीं केलें पाहिजे असें-" आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते" येथें करून सांगितलेंच आहे ॥ यास्तव पूर्वोक्त युक्तीनें शास्त्रविहित जें यज्ञार्थ पशु हिंसादिक कर्म त्याचे ठायीं निषिद्धत्व ज्ञान आणि अनर्थास म्हणजे पापास हेतु नव्हे अशा कर्माचे ठायीं हें पापाला हेतु आहे असें दुष्टत्व ज्ञान सांख्यादि-कांनीं जें आहे तें विपरीत ज्ञानात्मक मोह रूपच आहे त्या मोहें करून जो यज्ञादि-क नित्य कर्मांचा त्याग तो त्याग तमोरूप मोहनिमित्तक तामस आहे असें पूर्वो-क्त महर्षींनीं सांगितलें आहे.॥७॥

दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत्॥
स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत्॥८॥

आतां राजस त्याग सांगतात. पूर्वोक्त मोह नसला तरी- दुःखं इत्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् सः राजसं त्यागं कृत्वा- म्हणजे नित्य कर्म दुः-ख रूप किंवा दुःख साधन आहे तें केल्यानें शरीरास क्लेश होईल या भयानें जो नित्य कर्मांचा कर्माधिकाऱ्यांनीं केलेला त्याग तो दुःखरूप रजोगुण निमित्तक राजस त्याग आहे. कर्माधिकारी पुरुष त्या राजस त्याग प्रत करून- त्यागफलं नैव लभेत- म्हणजे सात्विक त्यागाचें जें चित्त शुद्धि पूर्व ज्ञान निष्ठा रूप फल त्या प्रत पावत नाहीं.॥८॥

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन॥ सं-
गं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्विको मतः॥९॥

आतां सात्विक त्याग मुमुक्षूनीं कर्तव्य तो सांगतात.- हे अर्जुन नियतं क-र्म कार्यमेव इति संगं फलं च त्यक्त्वा यत्क्रियते सः त्यागः सात्विकः मतः- म्हण-जे नित्य कर्माचे विधीत हें कर्म अमुक फलासाठीं करावें असें फल सांगितलें नाहीं तरी शास्त्रविहित आहे यास्तव केलेंच पाहिजे अशा निश्चयात्मक बुद्धीनें त्या कर्मो-

चा कर्ता मी असा अभिमान टाकून आणि फलाचा उद्देश टाकून नित्य कर्माचें अनुष्ठान अंतःकरणशुद्धि होई पावेतों जें करतात तो फलाभिसंधिरूप विशेषणाभाव प्रयुक्त फलाभिसंधिपूर्वक कर्मत्याग मलगुण प्रयुक्त होणारा सात्त्विक आहे. तो पूर्वऋषींस कर्तव्यत्वें करून मान्य आहे नित्य कर्मास ही सामान्य फल आहे असें पूर्वी सांगितलेंच आहे. आणि या भगवद्वचना वरून ही नित्य कर्मांचें ही कांहीं फल आहे असें सिद्ध होतें. तें जसा आम्रवृक्ष फलार्थ लाविला तरी छाया,गंध हीं फलें अनुषंगिक त्या पासून उत्पन्न होतात त्याप्रमाणें आवश्यक धर्मानुष्ठान केलें असतां ही आनुषंगिक अर्थ म्हणजे फलें त्यापासून उत्पन्न होतात. असें आपस्तंब सूत्रांत सांगितलें आहे. या प्रमाणा वरून आणि धर्मानें पापक्षय होतो असें श्रुतींत सांगितलें आहे आणि नित्यकर्मांचें अनुष्ठान न केलें तर प्रत्यवाय उत्पन्न होतो असें स्मृतींत सांगितलें आहे या प्रमाणा वरून ज्ञानप्रतिबंधक पापक्षयरूप आणि ज्ञान उत्पन्न होण्याची योग्यता आणणार पुण्यरूप आत्मसंस्कारात्मक सामान्य फल असें जाणावें.- त्याचा अभिसंधि टाकून नित्य कर्मांचें अनुष्ठान करावें हें कर्म अनुष्ठान नाहीं. संन्यास आणि त्याग या दोन शब्दांचे अर्थ गोःअश्वः या शब्दांचे अर्थां प्रमाणें अत्यंत भिन्न विजातीय नाहींत तर कर्माचें अनुष्ठान करून त्याचे फलाचा त्याग करणें असा जो फलाभिसंधिरूप विशेषणाच्या अभावामुळें फलाभिसंधियुक्त कर्मत्यागरूप विशिष्टाभाव तद्रूप एकच त्यांचा अर्थ आहे असें पूर्वी सांगितल्या प्रमाणें सात्त्विक कर्मत्याग रूपच आहे यास्तव-"त्यागोहि पुरुषव्याघ्र त्रिविधः परिकीर्तितः" अशी तीन प्रकारचा कर्मत्याग सांगण्याची भगवंतानीं प्रतिज्ञा करून तामस आणि राजस असे दोन प्रकारचे कर्मत्याग सांगून तिसरा प्रकार कर्मानुष्ठान लक्षण सांगितला हें तीन ब्राह्मणास भोजन द्यावें अशी प्रतिज्ञा करून कौंडिन्य गोत्रांतील दोन ब्राह्मणांस भोजन द्यावें आणि एका क्षत्रियास भोजन द्यावें अशा सांगण्या प्रमाणें पूर्वापरानुसंधान न करून आहे अशी कोणाची शंका येथें आहे तिचें निराकरण झालें. ॥९॥

## न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ॥ त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥

या सात्त्विक त्यागाचा स्वीकार करण्यासाठीं अंतःकरण शुद्धीचे द्वारा त्याचें ज्ञाननिष्ठारूप फल सांगतात ॥ त्यागी-म्हणजे पूर्वोक्त सात्त्विक त्यागानें युक्त म्हणजे कर्तृत्वाभिमान आणि फलोद्देशाचा त्याग करून अंतःकरणशुद्ध्यर्थ-विहित नित्य कर्माचरण करणारा जेव्हां-सत्त्वसमाविष्टः-म्हणजे आत्मानात्म विवेकास कारणभूत जो ज्ञानप्रतिबंधक रजतमोरूप मलाचा नाश होऊन आलेला

अव्यभिचरित ज्ञानोत्पत्ति होण्या विषयींचा अंतःकरणास योग्यतारूप अतिशय तेणें करून युक्त होतो म्हणजे त्यानें अंतःकरण जेव्हां नित्य कर्माचें अनुष्ठान करून त्यानें भगवंतास अर्पण केल्यामुळें पापरूप मलाचें क्षालन होऊन ज्ञानोत्पत्ति-योग्यता आणि पुण्यरूप गुण यांचे संबंधानें संस्कृत होतें तेव्हां-मेधावी,-म्हणजे शम, दम, सर्व कर्मोपरम गुरूप सदनादिक जीं सामयिक म्हणजे श्रवणाचे पूर्वीचीं अंगें तीं हीं करून युक्त आणि मनन निदध्यासन रूप जीं श्रवणोत्तर होणारीं आत्मसाक्षात्कार रूप फल उत्पन्न करण्यास सहायभूत अंगें तीं हीं करून ही युक्त जो श्रवणात्मक वेदांत वाक्य विचार तत्सहित वेदांत महावाक्य प्रमाणा पासून उत्पन्न झालेलें असंभावना विपरीत भावना अप्रामाण्य शंकादिकांनीं रहित जें ब्रह्मात्म मात्र विषयक मी ब्रह्मच आहें असें अपरोक्षानुभव रूप ज्ञान त्यास मेधा म्हणतात; त्या मेधेनें युक्त म्हणजे स्थित प्रज्ञ होतो तेव्हां-छिन्न संशयः-म्हणजे पूर्वोक्त मेधेनें अविद्येचा नाश होऊन अविद्येनें होणारे जे संशय किंवा विपरीत निश्चयात्मक ज्ञानें त्यांनीं रहित होतो. तेव्हांच सकल कर्मांचा क्षय झाल्यामुळें- अकुशलं कर्म न द्वेष्टि-म्हणजे अशोभन किंवा काम्य निषिद्ध जें कर्म त्याचा द्वेष करीत नाहीं म्हणजे हें आपल्यास प्रतिकूल आहे असें मानीत नाहीं-कुशलेन अनुषज्जते-म्हणजे शोभन किंवा नित्य अशा कर्माचे ठायीं कर्तृत्वाभिमान जाऊन कृतकृत्य झाल्यामुळें हें आपणास अनुकूल-आहे अशी प्रीति करीत नाहीं. ह्याच अर्थे परम्हणजे हिरण्यगर्भ ही ज्यापेक्षां अवर म्हणजे आली कडील किंवा कनिष्ठ ज्यापेक्षां आहे अशा निरुपाधिक परमात्म्याचा साक्षात्कार आत्मत्वें करून झाला असतां त्या ज्ञान्याचे सर्व कर्मांचा क्षय होतो. आणि हृदय ग्रंथीचा म्हणजे अनात्म स्वरूप जें अंतःकरण त्याचा आणि आत्मा यांचा जो तादात्म्याभिमान स्वरूप ग्रंथि त्याचा भेद म्हणजे नाश होतो. आणि तन्मूलक जे सर्व संशय त्यांचा नाश होतो. अशा अर्थाच्या श्रुतींत सांगितला आहे असें हें सात्विक कर्म त्यागाचें फल आहे. यास्तव त्याचें अनुष्ठान मोठे प्रयत्नानें मुमुक्षूनीं करावें. ॥१०॥

**नहि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ॥ यस्तु कर्मफलत्यागी स त्यागी त्यभिधीयते ॥११॥**

या प्रमाणें जो आत्म तत्त्व ज्ञानी आहे त्यासच कर्म प्रवृत्तीस कारण भूत जे रागद्वेषादिक ते नसल्यामुळें कर्म त्याग संभवतो असें सांगून जो आत्मज्ञ नव्हे असा जो अज्ञानी त्यास कर्म त्याग संभवत नाहीं. याविषयीं हेतु सांगतात. देहभृता अशेषतः कर्माणि त्यक्तुं नहि शक्यं-देहात्म विवेक ज्ञानानें ज्याचा बाध झाला नाहीं असा जो स्थूल शरीरावर मी ब्राह्मण मी मनुष्य मी गृहस्थाश्रमी इत्यादिक तादात्म्याभिमान नसात सूक्ष्म शरीर भूत मन बुद्धि आदिकांवर झालेला जो मी कर्ता, भोक्ता,

सुखी, दुःखी असा अभिमान तेणें करून कर्माधिकार हेतुभूत वर्णाश्रमादिरूप स्थूल देह आणि कर्तृत्व भोक्तृत्वाद्याश्रय सूक्ष्म देह यांप्रत धारण करणारा म्हणजे स्थूल सूक्ष्म देह अनादि अविद्येचे वासनेनें हा व्यवहार योग्य असा कल्पिलेला आणि मिथ्या आणि आत्म्याहून भिन्न असतां ही आपले स्वरूपानें किंवा तादात्म्यानें पाहणारा जो देहभृत् म्हणजे देहात्म विवेक ज्ञानशून्य रागद्वेषादिक कारणामुळें निरंतर कर्माचे ठायीं प्रवृत्त झालेला अज्ञानी तो सर्व कर्माचा त्याग करण्यास समर्थ होत नाहीं. जर त्याचा सर्व कर्म त्याग होईल तर त्याचे देहाची यात्रा म्हणजे जीवनच होणार नाहीं यास्तव- यः तु कर्मफल त्यागी सः त्यागी इति अभिधीयते- म्हणजे चित्तशुद्धि नसल्यामुळें कर्म करण्याचाच ज्यास अधिकार आहे तो चित्त शुद्ध्यर्थ कर्माचरण करीत असतां ही भगवत् कृपेनें त्याचे फलाचा त्याग करील तर त्यास फल त्याग रूप सामान्य गुणानें गौण व्यवहारानें त्यागी असें म्हणावें. तुशब्दानें असा दुर्लभ आहे असें सुचविलें. तो मुख्य त्यागी नसतांही त्याची ही स्तुति. जो पूर्वी सांगितल्या प्रमाणें देहभृत् नव्हे असा जो परमार्थ दर्शी ज्ञानी तोच सर्व कर्माचा त्याग करण्यास समर्थ आहे यास्तव मुख्य त्यागी तोच आहे असा अभिप्राय.॥११॥

**अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम्॥**
**भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित्॥१२॥**

देहाभिमानी अज्ञानी आणि देहाभिमान शून्य ज्ञानी या दोघांचा कर्मफल त्याग समान असतां कोणते त्यागाचे फलानें देहाभिमानी गौण त्यागी आणि देहाभिमान रहित ज्ञानी मुख्य त्यागी होतो अशी शंका होईल तिचे निराकरणार्थ त्या विषयीं त्यांचा दुसरा विशेष सांगतात.- अत्यागिनां प्रेत्य अनिष्टं इष्टं मिश्रं इति कर्मणः त्रिविधं फलं भवति- म्हणजे कर्म फलांचा त्याग जरी केला तथापि कर्मानुष्ठान करणारे जे अत्यागी म्हणजे पूर्वोक्त गौण त्यागी त्यास चित्तशुद्धि होऊन विविदिषा उत्पन्न न होता जर मरण प्राप्त झालें तर मरण पावल्या नंतर त्यास केलेल्या कर्मांचे त्रिविधत्वास्तव त्यांचें शरीर धारण रूप फल तीन प्रकारचें होतें. माया मयत्वास्तव जी फल्गुता म्हणजे तुच्छत्व त्यामुळें जें अदर्शनाप्रत पावतें म्हणजे लौकर नष्ट होतें तें फल अशी फल शब्दाची व्युत्पत्ति म्हणजे योग आहे. ते तीन प्रकार सांगतात.- अनिष्टं- पापकर्माचें प्रतिकूलत्वें करून जाणावयास योग्य जें नारकीय तिर्यगादिकाचें शरीर रूप फल तें,- इष्टं- अनुकूलत्वें करून जाणावयास योग्य जें पुण्याचें देवादिकांचें शरीर रूप फल तें,- मिश्रं- पुण्य आणि पाप या दोहोंचें जें इष्ट आणि अनिष्ट उभयरूप मनुष्य शरीर रूप फल तें, हीं तीन फलें ही त्याज्यच आहेत हें सुचविण्या करितां त्रिविध (तीन प्रकारचा) असा अनुवाद केला. जे

मुख्य त्यागी संन्यासी म्हणजे आत्मतत्त्व साक्षात्कार होऊन त्याच्या अविद्येचा आणि तिचे कार्याचा नाश झाला आहे त्यांस मरणानंतर विदेह कैवल्य रूप मोक्षच होतो असें सांगतात. – न तु संन्यासिनां क्वचित् – म्हणजे परब्रह्मात्मतत्त्वाचें अपरोक्ष ज्ञान ज्यांस झालें आहे असे जे परमहंस परिव्राजक मुख्य संन्यासी त्यांस त्या प्रत्येक त्रिविध कर्माचें जें प्रत्येक सांगितलेलें अनिष्ट, इष्ट, मिश्र व देह धारण रूप फल तें कोणते देशीं कोणते काळीं ही सकल शरीरांस उत्पन्न करणारें जें अज्ञान आणि त्याचीं कार्य भूत जीं अनंत जन्मार्जित अनंत संचित कर्मे आणि सकल क्रियमाण कर्मे त्यांचा ज्ञानानें उच्छेद झाल्यामुळें होतच नाहीं. तु हा शब्द एव काराचे अर्थी विपर्यांचा आहे. आत्मतत्त्वाचे अपरोक्ष ज्ञानानें सकल कर्म क्षय श्रुति आणि स्मृतींतें सांगितला आहे तो कसा त्याचें स्वरूप काय तें सविस्तर पूर्वीच लिहिलें आहे. येणें करून गौण त्याग्यांस अनंत जन्मार्जित जीं नाना प्रकारचीं संचित कर्मे आणि क्रियमाण कर्मे त्यांचा नाश न झाल्यामुळें पुनः संसार होतो मुख्य त्याग्यांस मोक्ष होतो असा त्यांच्या त्यागाचे फलांचा विशेष सांगितला. अत्यागी म्हणजे कर्म फलाचा त्याग न करणारे जे सकाम पुरुष त्यांस पूर्वोक्त त्रिविध कर्माचें त्रिविध फल मरणानंतर प्राप्त होतें. कारण सकामांस त्रिविध कर्माचा संभव आहे. संन्याशांस म्हणजे " अनाश्रितः कर्म फलं कार्यं कर्म करोति यः ॥ स संन्यासी च योगी च " – या श्लोकांत कर्मफल त्याग करणारा जो त्यास ही फलत्याग करणें या सामान्य गुणानें संन्यासी असें भगवंतांनीं म्हटलें आहे. यास्तव कर्मफलत्याग करून कर्म करणारे जे कर्मी त्यांस पूर्वोक्त त्रिविध फल मरणानंतर होत नाहीं. कारण सात्विकत्वास्तव नित्यकर्माचे अनुष्ठानानें आणि निषिद्ध काम्य कर्माचे वर्जनानें पापाचा संभव नाहीं म्हणून मरणानंतर पापाचें अनिष्ट फल होत नाहीं. काम्य कर्माचें अनुष्ठान न केल्यामुळें आणि ईश्वरार्पण बुद्धीनें त्या कर्माचे फलाचा त्याग केल्यामुळें इष्ट पुण्यफल ही होत नाहीं. याच कारणानें पापपुण्य उभयात्मक मिश्र कर्माचें मिश्रही फल होत नाहीं. याच अभिप्रायानें – "मोक्षार्थी न प्रवर्तेत तत्र काम्य निषिद्धयोः ॥ नित्यनैमित्तिके कुर्यात् प्रत्यवाय विवर्जितः ॥" जो मोक्षार्थी आहे त्याणें काम्य आणि निषिद्ध या कर्माचे ठायीं प्रवृत्त होऊं नये, प्रत्यवाय विवर्जित होऊन म्हणजे अनुष्ठान न केलें तर प्रत्यवाय प्राप्त होईल यास्तव त्याचे परिहारार्थ नित्य नैमित्तिक कर्मे त्याणें करावीं असें सांगितलें आहे. अशी येथें व्याख्या कोणी करतात. ती भाष्यादिकांस विरुद्ध आहे आणि या व्याख्येंत शब्द मर्यादेचें आणि अर्थ मर्यादेचें उल्लंघन होतें तें असें – "गौण मुख्ययोः मुख्ये कार्य संप्रत्ययः" अशी शब्द मर्यादा शास्त्रानुमत आहे म्हणजे शब्दाच्या मुख्यार्थाचा बाध नसेल तर मुख्य अर्थानेंच ग्रहण करावें. गौणार्थानें ग्रहण क-

रूनये असा शास्त्रसिद्ध नियम आहे त्यास उदाहरण- अमावास्येचे दिवशीं-अपराह्णकालीं पिंड पितृयज्ञें करून यजन करावें अशा अर्थाचे वाक्यांत अमावास्या शब्दाचा काल हा मुख्य अर्थ आहे आणि जो या प्रमाणें विद्वान् म्हणजे-जाणणारा अमावास्येचे ठायीं यजन करतो या अर्थाच्या दर्शेष्टि विधायक वाक्यांत अमावास्या शब्दाचा अमावास्या कालीं उत्पन्न होणारें कर्म हा गौण अर्थ आहे अशी स्थिति असतां दर्शपूर्णमास प्रकरणांत जो या प्रमाणें जाणणारा अमावास्येचे ठायीं याग करतो या अर्थाचें दर्शेष्टि विधायक वाक्य आहे त्यांतील अमावास्या शब्दानें कालरूप मुख्यार्थ घ्यावा किंवा अमावास्यारूप कालाचे ठायीं निष्पन्न होणारें कर्मरूप गौण अर्थ घ्यावा असा संशय प्राप्त झाला असतां दर्शेष्टि रूप कर्मविधायक वाक्यांत अमावास्या शब्दानें त्या कालीं उत्पन्न होणारें कर्मरूप गौणार्थच घ्यावा. म्हणजे पितृयज्ञ त्याचें अंग होईल यामुळें त्याचे फलाची कल्पना करण्यास नको असें विधीचें लाघव येईल असा- अंगंवा समभिव्याहारात्- या सूत्रानें कात्यायन मतें पूर्वपक्ष करून प्रथम मुख्यार्थाची उपस्थिति होऊनच नंतर गौणार्थाची उपस्थिति होते यास्तव प्रथम उपस्थित झाल्यामुळें मुख्यार्थच प्रबल आहे त्याचा येथें बाध्ही नाहीं यास्तव अमावास्या शब्दानें कालरूप मुख्यार्थच घ्यावा आणि हें वाक्य दर्शेष्टि रूप कर्मविधायक आहे पितृयज्ञ त्याचें अंग नाहीं याचा अमावास्येचे दिवशीं अपराह्णरूप स्वतंत्र काल सांगून त्याचें स्वतंत्र विधान केलें आहे यामुळें तें कर्म स्वतंत्रच आहे असें-प्रमाणबलानें सिद्ध झाल्यानंतर दर्शेष्टि रूप कर्माची फलकल्पना केली तरी फल मुख गौरवदोषावह नाहीं असा शास्त्र सिद्धांत आहे यामुळें बाधक नाहीं असा- "पितृयज्ञः स्वकालत्वादनंगंस्यादिति" या सूत्रांत जैमिनीनीं सिद्धांत केला आहे. असें असतां सर्व कर्म त्याग करणें हा मुख्य संन्यास शब्दाचा अर्थ आहे, त्याचें ग्रहण करण्यास येथें बाधक ही नाहीं. असें असून फलत्यागरूप गौणार्थ येथें घेतल्यानें पूर्वोक्त शब्दमर्यादेचें या व्याख्येंत उल्लंघन होतें. या प्रमाणें अर्थमर्यादेचें-ही उल्लंघन होतें तें असें- यावत् कारण सामग्री असली म्हणजे कार्य अवश्य-उत्पन्न होतें. या नियमास अर्थमर्यादा असें म्हणतात. ईश्वरार्पण बुद्धीनें सर्व कर्माचे फलांचा ज्यानें त्याग केला आहे आणि अंतःकरण शुद्ध्यर्थ नित्यकर्माचें अनुष्ठान जो करतो असा जो गौण संन्यासी तो ज्ञान होण्यापूर्वी जर मरण पावला तर-त्याचीं अनंत जन्मार्जित अनंत पूर्वोक्त त्रिविध संचित कर्माचा नाश न झाल्यामुळें तीं आपलें पूर्वोक्त त्रिविध फल त्यास उत्पन्न करतीलच आणि अंतःकरण शुद्धीचें फल जें आत्मज्ञान तें उत्पन्न होण्यासाठीं त्या गौण संन्याशास शरीर होणें अवश्यकच आहे याच कारणानें विविदिषा संन्यासी श्रवणादिक योग करीत असतां ज्ञान

प्राप्ति रूप योग सिद्धि झाल्या पूर्वी योगभ्रष्ट होऊन मरण पावला असतां तो शुची श्री मंताचे किंवा योग्याचे गृहांत उत्पन्न होतो असें सांगून त्यास ज्ञान प्राप्त्यर्थ-ज्ञानाधिकारी शरीर प्राप्ति अवश्य होते असा षष्ठां ध्यायांत भगवंतांनीं निर्णय केला आहे. यावरून सर्व कर्मपरित्याग करणारा जो योग भ्रष्ट अज्ञ त्यास ही शरीर प्राप्ति मरणानंतर अवश्य होते. मग कर्म करणारा जो अज्ञ त्यास संचित कर्मफल शरीर प्राप्ति मरणा नंतर होईल. म्हणून काय सांगावयाचें आहे. या अर्थ मर्यादेचें उल्लंघन झालें यास्तव प्रथम केलेलें व्याख्यानच उत्तम आहे. यांतील तारतम्याचा विचार निर्मत्सर पंडितांनीं करावा. आतां या प्रकरणाचा निर्गलितार्थ लिहितों. वेदांत वाक्याचे श्रवण मनन निदिध्यासनादिकें करून उत्पन्न झालेला आणि सकल असंभावना, विपरीत भावना अप्रामाण्य ज्ञान रहित जो अकर्तृ, अभोक्तृ, परमानंदाद्वितीय स्वप्रकाश सद्रूप ब्रह्याचा आत्मत्वें करून निर्विकल्पक साक्षात्कार तेणें करून कर्तृत्वादिकाचे अभिमानास कारण भूत अज्ञानाचा नाश झाल्यामुळें कर्तृत्वादिकाचे अभिमानानें रहित जो मुख्य संन्यासी तो मरणानंतर सर्व कर्माचा ज्ञानानें समूल नाश झाल्या मुळें अविद्या आणि तिचें कार्य कर्मादिक तन्मूलक पुनः शरीर ग्रहण रूप जन्मास न पावत नाहीं. जो कर्तृत्वादिकाचे अभिमानानें देह धारण करणारा अज्ञानी तो तीन प्रकारचा आहे. राग द्वेषादिक दोषांचे प्राबल्यास्तव काम्यनिषिद्ध कर्माचें यथेष्ट अनुष्ठान करणारा मोक्ष शास्त्रानधिकारी एक पूर्व जन्मार्जित पुण्यकर्मानें ज्याचे, रागद्वेषादिक कांहीं गेले आहेत आणि सर्व कर्मांचा परित्याग करण्यास समर्थ नसल्या मुळें काम्य आणि निषिद्ध या कर्माचा मात्र परित्याग करून अंतःकरण शुद्ध्यर्थ नित्यनैमित्तिक कर्माचे फलाभि संधीचा त्याग करून नित्यादिक कर्मानुष्ठान करणारा दुसरा, हा दुसराच नित्यनैमित्तिक कर्मानुष्ठानें करून अंतःकरण शुद्धि होऊन आत्म ज्ञानाची इच्छा उत्पन्न झाली आहे ज्यास असा आणि वेदांत श्रवणादिक जें आत्म ज्ञान साधन त्याचें अनुष्ठान करावें अशा इच्छेनें श्रवणादिकास विक्षेप करणाऱ्या कर्माचा त्याग करून श्रवणाद्यर्थ गुरुपाशीं जातो तो तिसरा यास विविदिषा संन्यासी म्हणतात. यांतिघांत पहिल्यास संसारित्व प्रसिद्धच आहे, दुसऱ्यास संसारित्व कसें आहे तें- अनिष्ट मिष्टं मिश्रंच- या श्लोकाचे व्याख्यानांत सांगितलेंच आहे. तिसऱ्यास संसारित्व कसें आहे तें-" अयतिःश्रद्धयोपेतः-" येणें करून अर्जुनाचा प्रश्न सांगून त्याचे उत्तरांत-" श्रीमतांगेहे योगभ्रष्टोभिजायते-" अथवा-" योगिनामेव कुलं भवति "- येणें, करून सहावे अध्यायांत सांगितलें आहे. या प्रमाणें तीन प्रकारचे अज्ञान्यास जन्मांतर होण्यास पूर्व जन्मार्जित संचित कर्मादि रूप सामग्री आहे यामुळें संसारित्व निश्चित आहे. परंतु तें कोणास ज्ञा-

नाला अनुगुण म्हणजे ज्ञानोत्पत्तीस साधन आहे कोणास ज्ञानाला अननुगुण-म्हणजे ज्ञानोत्पत्तीला अनुकूल नव्हे इतका विशेष आहे. जो ज्ञानी आहे त्याचे संसार कारणभूत अज्ञानाचा नाश झाल्यामुळें मरणानंतर स्वतः सिद्ध कैवल्य-आहे हे दोन पदार्थ याश्लोकांत सूत्रभूत सांगितले.॥१२॥

पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ॥-
सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम्॥१३॥

ज्यास आत्मज्ञान नाहीं त्यास संसारित्व प्राप्त होण्या विषयीं हेतुभूत कर्मत्यागाचा असंभव-" नहि देहभृताशक्यं कर्तुं कर्माण्यशेषतः-" यांणें करून सांगितला. आतां कर्मत्यागाच्या असंभवास हेतु कर्मास हेतुभूत जें पुढें सांगावयाचें अधिष्ठानादिक पंचक त्याचे ठायीं तादात्म्याभिमानच आहे असें चार श्लोकांनीं सांगतात. त्यांत प्रथम श्लोकांत अधिष्ठानादिक पांचांचा-त्याग करण्या साठीं अवश्य जाणलीं पाहिजेत असें सांगतात. ॥ हे महाबाहो एतानि पंच- म्हणजे हीं जीं पुढें सांगतों अधिष्ठानादिक पांच तीं-सर्व कर्मणां सिद्धये कारणानि मे निबोध- म्हणजे सर्व कर्मांची निष्पत्ति होण्या साठीं कारणें आहेत असें सर्वज्ञ परम आप्त जो मी याचे वचना वरून तूं जाणावयासी सावधान हो. हीं फार दुर्ज्ञेय आहेत यास्तव मनाचे एकाग्रते शिवाय जाणावयास हीं शक्य नाहींत यास्तव सावधान मना हो असें तात्पर्य॥ हीं जीं कारणें सांगतों तीं मीं आपले बुद्धीनें कल्पिलेलीं सांगतों असें मानूं नको. तीं सप्रमाण आहेत असें सांगतात.- सांख्ये कृतांते प्रोक्तानि- म्हणजे निरतिशय पुरुषार्थ भूत जो मोक्ष त्याचे प्राप्ती साठीं आणि सर्वानर्थास कारण भूत जें अज्ञान त्याचे निवृत्ती साठीं अवश्य जाणावयाचें जें जीव ब्रह्म आणि जीव ब्रह्मात्मैक्य आणि त्याचे ज्ञानास साधन जीं श्रवण मननादिक हे पदार्थ उत्तम प्रकारें-करून निरूपिले आहेत त्याचे ठायीं असें आणि कृत म्हणजे कर्म त्याचा अंत-म्हणजे ज्ञान द्वारा समाप्ति होते ज्या पासून असें जें आत्म वस्तूचें मात्र प्रतिपादन करणारें वेदांत शास्त्र त्याचे ठायीं प्रोक्त म्हणजे लोकांत प्रसिद्ध आहेत तथापि अनात्मभूत असतां ही मिथ्या परोक्ष ज्ञानानें आत्मत्वें करून लोकांनीं जाणलेलीं आहेत त्यांचा आत्मज्ञानें करून बाध व्हावा आणि त्यावरील आत्मत्व ज्ञान जावें यासाठीं त्याज्यत्वें करून निरूपिलीं आहेत. कर्म दुसऱ्याचा धर्म असतां ही तें-अविद्येनें आत्म्याचे ठायीं आरोपिलें आहे, त्याचा शब्द्जन्य ज्ञानें करून जेव्हां बाध होतो तेव्हां कर्माचा अंत होतो यासाठीं आत्म्यास कर्माचा संबंध नाहीं असें प्रतिपादन करण्यास अनात्मभूत जीं अधिष्ठानादिक पांच कर्मांचीं कारणें त्यांचे-

दांत शास्त्रांत मायाकल्पित मिथ्यात्व तीं आहेत, असा अनुवाद केला त्याचें प्रतिपादन करण्याविषयीं वेदांत शास्त्राचें तात्पर्य नाहीं यास्तव वेदांत शास्त्र आत्मवस्तूचें मात्र प्रतिपादन करतें याचा विरोध नाहीं आणि या गीता शास्त्राचे ठायीं ही ज्ञानास् सर्व कर्मांतत्त्व-" सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञानेपरिसमाप्यते-" येणें करून सांगितलें आहे, यास्तव ज्ञानशास्त्रास कर्मांतत्त्व उपपन्न आहे. ॥१३॥

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ॥
विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥१४॥

आत्मवस्तूला अकर्तृत्व सिद्ध होण्यासाठीं कर्मास कारणभूत पांच वेदांत शास्त्रांत सांगितलीं आहेत. तीं कोणतीं त्यांचें स्वरूप काय तें या दुसऱ्या श्लोकांत सांगतात. ॥ अधिष्ठानं-म्हणजे इच्छा, द्वेष, सुख, दुःख, चेतना इत्यादिकांची अभिव्यक्ति होण्यास आश्रयभूत शरीर- तथा कर्ता- म्हणजे जसें मायेनें कल्पिलेलें अभौतिक स्वप्नांतील गृहस्थादिक अधिष्ठान तसा मी कर्ता, मी भोक्ता इत्यादिक अभिमानानें युक्त ज्ञानशक्तिप्रधान आणि अपंचीकृत भूतांचा कार्यभूत ज्यास अंतःकरण बुद्धि विज्ञान असें ही म्हणतात आणि तादात्म्याध्यासानें आपले वरील कर्तृत्वादिक धर्मांचा आत्म्यावर भास होण्यास हेतुभूत जो आहे असा भौतिक अहंकार मायेनें कल्पिलेला तात्पर्य- जसें स्वाप्न गृहस्थादिक मिथ्यालें करून जाणावयास सुकर आहे किंवा लोकायतिकांनीं आत्मस्वरूपत्वें करून मानिलेला जो स्थूल देह तो त्यांहून भिन्न जे परीक्षक त्यांणीं अनात्मत्वें करून निश्चय सुकर आहे असें तथा या पदानें सुचविलें पृथक् विधं करणं च - म्हणजे तथा याचे अर्थाविषयींच शब्द त्याच प्रमाणें नानाप्रकारचे म्हणजे भिन्न भिन्न शब्द, रूप, रस, स्पर्श, गंध यांचे ज्ञानास आणि देणें घेणें चालणें बोलणें इत्यादिक व्यापारास साधनभूत श्रोत्रादिक पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, मन, बुद्धि असे बाराप्रकारचे या कारणांचे वर्गांत मन, बुद्धि हे चित्ताच्या वृत्तीचे भेद जाणावे त्या वृत्तीनीं युक्त जो अहंकार तो कर्ता चिदाभास यांत सर्वांत सारखाच आहे यासच त्या वृत्तीचे तादात्म्याध्यासानें कर्ता, मंता, प्रमाता, अहंकार असें म्हणतात.- विविधाश्च पृथक्चेष्टाः- म्हणजे नाना प्रकारच्या म्हणजे परस्पर भिन्न भिन्न पांच प्रकारच्या किंवा दहा प्रकारच्या क्रियाशक्तिप्रधान पंचीकृत भूत कार्य जें प्राणापान व्यानोदान समान असे मुख्यप्राण आणि नाग, कूर्म, कृकल, देवदत्त, धनंजयरूप उपप्राण असे दशविध प्राण त्यांचे प्राणापानादिक पूर्वीं लिहिलेले व्यापार या दशविध प्राणांत प्राणापानादिक पांच प्राणांचा नाग कूर्मादिक या पांचांतच समावेश करावा असें कोणी म्हणतात. यावरून पांच प्रकारचे किंवा दहा प्रकारचे

असें लिहिलें. हा प्राण एकच आहे. तथापि स्थान भेदानें किंवा वृत्तिभेदानें पांच प्रकारचा किंवा द हा प्रकारचा असा त्या विषयीं व्यवहार होतो तो अंतःकरणाहून अगदीं भिन्नच आहे. कारण सुषुप्ति समयीं अंतःकरणाचा लय झाला तरी शरीरांत प्राणवायूचा संचार आणि प्राणापानादिक त्याचें व्यापार होतात याव- रून असें कोणी म्हणतात, अपंचीकृत भूतांचें कार्य अंतःकरण ज्ञानशक्ति आणि क्रियाशक्ति. या दोन शक्तींनीं युक्त आहे तेंच जीवत्वास उपाधि भूत आहे त्यासच क्रियाशक्तीचे प्राधान्यें करून प्राण असें म्हणतात आणि ज्ञानशक्तीचे प्राधान्यें करून अंतःकरण असें म्हणतात सुषुप्ति समयीं ज्ञानशक्तीचा लोप झाला तरी क्रियाशक्तीचा लोप होत नाहीं. यामुळें प्राणापानादिक व्यापार होतात. आणि असेंच मानिलें पाहिजे नाहींतर मरण समयीं शरीरांतून जीवाची जी उत्क्रांति (गमन) होते ती प्राणाचे उत्क्रांतीनें होते, असें श्रुतींत सांगितलें आहे, आणि बुद्धीचे उत्क्रांतीनें होते असें ही श्रुतींत सांगितलें आहे, जीवाचे उत्क्रांतीस प्राणोत्क्रांती आणि बुद्ध्युत्क्रांति असे दोन परस्पर भिन्न उपाधि मानलेतर एकेच शरीरांत दोन जीव आहेत. असें होईल यास्तव बुद्धि आणि प्राण या उपाधींचें ऐक्य मानलें पाहिजे, आणि भिन्नत्वें करून व्यवहार पूर्वोक्त शक्तींचे भेदानेंच मानला पाहिजे. या शरीरांतून कोणाचे उत्क्रमणानें म्हणजे गमनानें मी उत्क्रांत होईन आणि कोणाचे स्थितीनें मी स्थितीमत पावेन असा त्या आत्म्यानें विचार करून त्यानें प्राण उत्पन्न केला या अर्थाची श्रुति प्राणोत्क्रमणी पाधिकत्व जीवाचे उत्क्रमणास सांगते आणि तो- आत्माधीःस्वप्न- म्हणजे बुद्धि स्वप्न होऊन या लोकाचें किंवा या शरीराचें उत्क्रमण करतो. बुद्धि मृत्यूचे रूपाप्रत ध्यान करीत असतां ध्यानकरणाऱ्या प्रमाणें होतो किंवा भासतो बुद्धि चंचळ झाली म्हणजे चंचल झाल्या प्रमाणें होतो किंवा भासतो या अर्थाच्या श्रुतींत बुद्धीचे उत्क्रमणानें औपाधिक- जीवाचें उत्क्रमणादिक सांगितलें आहे असें कोणी म्हणतात.—दैवं चैवात्र पंचमं— म्हणजे या कारण वर्गानें ठायीं शरीर इंद्रियां दिकांस भोगज्ञान उत्पन्न करण्याची शक्ति देणें असा अनुग्रह करणाऱ्या ज्या इंद्रियादि कांच्या देवता त्यांचा समुदाय- पांचवा आहे, च शब्दानें तो समुदाय शरीरादिका प्रमाणें अनात्मा आणि भौतिक आणि माया कल्पितच आहे असा अर्थ सूचविला. या पांच कारणांत कर्ता, करण, क्रिया, यांचें अधिष्ठान जें शरीर याची देवता पृथ्वी आहे. याविषयीं प्रमाण- जेव्हां हा पुरुष मरण पावतो तेव्हां याची वाणी म्हणजे वागिंद्रिय अग्नीप्रत जातें, प्राण वायूप्रत जातो, चक्षु सूर्याप्रत जातें, मन चंद्राप्रत जातें, श्रोत्रेंद्रिय दिशांप्रत जातें, शरीर पृथ्वीप्रत जातें, अशा अर्थाच्या श्रुतींत वागादिक इंद्रियांच्या अधिष्ठान भूत ज्या अग्न्यादिक देवता त्यांमध्यें शरीराधिष्ठात्री पृथ्वी-

देवता सांगितली आहे, कर्ता जो अहंकार त्याची देवता रुद्र असें पुराणांत सांगितलें आहे. श्रोत्राची दिशा देवता, त्वचेची वायु देवता, चक्षूची सूर्य देवता, रसनेची वरुण देवता, घ्राणाची अश्विनी कुमार देवता, वाणीची अग्नि देवता, पाणी म्हणजे हस्त यांची इंद्र देवता, पादांची उपेंद्र देवता, उपेंद्र म्हणजे इंद्राचा कनिष्ठ बंधु-त्यास वामन म्हणतात. पायु म्हणजे गुद याची मित्र देवता, उपस्थाची प्रजापति देवता, मनाची इंद्र देवता, बुद्धीची बृहस्पति देवता, प्राणाची सद्योजात देवता, अपानाची वामदेव देवता, व्यानाची अघोर देवता, उदानाची तत्पुरुष देवता, समानाची ईशान देवता असें पुराणांत प्रसिद्ध आहे. ॥१४॥

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ॥ न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥ ॥**

या प्रमाणें अधिष्ठानादिक पांचांचें स्वरूप सांगून त्यांस कर्माचें हेतुत्व सांगतात. ॥ नरः शरीरवाङ्मनोभिः यत् न्याय्यं वा विपरीतं कर्म प्रारभते - म्हणजे मनुष्य न्याय्य म्हणजे शास्त्रविहित अथवा विपरीत म्हणजे शास्त्र निषिद्ध अथवा शरीराचें जीवन होण्यास हेतुभूत असें जे मेषोन्मेषादिक चेष्टारूप-शारीर किंवा वाचिक किंवा मानस असें तीन प्रकारचें विहित निषिद्धात्मक उदासीन अशा ज्या कर्माचा आरंभ करतो किंवा आरंभ करून सिद्ध करतो त्या सर्व कर्माचे हे अधिष्ठानादिक पांच हेतु म्हणजे कारणें आहेत. पूर्वोक्त न्याय्य आणि विपरीत यांहून जें शरीर जीवनास हेतुभूत निमेषोन्मेषादिक कर्म किंवा दुसरें विहित निषिद्धासारखें कर्म तें सर्व जन्मांतर कृत धर्म किंवा अधर्म यांचेंच कार्य आहे यास्तव त्याचा न्याय्य किंवा विपरीत कर्मांतच समावेश आहे. येथें मनुष्य ज्या कर्माचा शरीर, वाणी आणि मन यांनीं आरंभ करतो किंवा कर्म करतो त्याचे हे पांच हेतु हें विरुद्ध दिसतें तथापि शरीर पदानें अधिष्ठानाचें आणि नर या पदानें कर्त्याचें - वाक्, मन या दोहों पदांनीं सर्व करणांचें - आरभते या पदानें चेष्टांचें - न्याय्य आणि विपरीत या पदानीं धर्माधर्मरूप दैवाचें ग्रहण करावें. सर्व कर्माचे ठायीं यापांचांचा समान उपयोग आहे तथापि शास्त्रांत विधि आणि निषेध रूप जें शारीर वाचिक मानसिक त्रिविध कर्म तेंच प्रसिद्ध आहे. यास्तव हें शारीर, हें वाचिक, हें मानसिक असा लोकांत त्रिविधत्व प्राधान्यें करून व्यवहार आहे यास्तव विरोध नाहीं असें जाणावें. विधि निषेध शास्त्राचे मनुष्यच अधिकारी आहेत यास्तव असें म्हटलें. ॥१५॥

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ॥ पश्यत्य-**

कृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥१६॥ ॥

आतां त्या अधिष्ठानादिक पांचांसच कर्म कर्तृत्व आहे यास्तव आत्म्यास कर्तृत्व नाहीं हेंच या पांचांचें निरूपणाचें फल या अभिप्रायानें सांगतात. ॥- तत्र एवं सति- म्हणजे कर्मा विषयींचे अधिष्ठानादिक पांचांसच हेतुत्व आहे यामुळें सर्व कर्म प्रपंच कर्तृक असतां- यः केवलं आत्मानं कर्तारं पश्यति- म्हणजे जो पुरुष सर्व जड दृश्य प्रपंचाचा भासक सत्ता स्फूर्ति स्वरूप स्वप्रकाश परमानंद स्वरूप कालत्रयी बाध रहित आणि असंग उदासीन परमार्थतः विक्रिया रहित अद्वितीय आत्मा असतांही अविद्येंकरून अधिष्ठानादिकाचे ठायीं प्रति बिंबित स्वरूपानें त्याशीं अनन्यत्वेंकरून कल्पून जलांत प्रतिबिंबित जलाचा भासक जो सूर्य त्यास जलादि जें त्याशीं अनन्यत्वें करून कल्पून जलरूप उपाधीवरील चांचल्यादि क्रियांचा संबंध जसा त्यावर आरोपितात. त्या प्रमाणें साक्षीभूत आत्म्यावर अधिष्ठानादिकावरील कर्म कर्तृत्वाचा आरोप करून मी कर्ता आहें असें कर्माचें कर्तृत्वाश्रयत्वें करून आत्म्याप्रत पाहतो म्हणजे रज्जु असतांही हा भुजंग आहे याप्रमाणें आत्मा कर्ता आहे असें कल्पितो. सः नपश्यति- म्हणजे तो असें पहात असतां हीअविद्येनें अभ्यास झाल्यामुळें तत्वें करून पाहत नाहीं. तो भ्रांतीनें विपरीतत्व पाहतो तत्वें करून पाहात नाहीं याविषयीं हेतु सांगतात. अकृत बुद्धित्वात् दुर्मतिः- म्हणजे शास्त्र आणि आचार्य यांचे उपदेशां पासून आत्मानात्म विवेक रूप बुद्धि त्यास उत्पन्न झाली नाहीं यास्तव रज्जु तत्व ज्ञानाशिवाय सर्प भ्रमाचा बाध जसा होत नाहीं या प्रमाणें शास्त्र गुरूंच्या उपदेशा पासून मी सच्चिदानंद अकर्ता अभोक्ता अद्वितीय ब्रह्मच आहें अशा तत्व साक्षात्कारा वांचून अज्ञानानें झालेले मिथ्या भ्रमाचा नाश होत नाहीं तर तो पुरुष अशा तत्व साक्षात्कारार्थ गुरूप्रत जाऊन तत्वज्ञ कां होत नाहीं याविषयीं सांगतात. दुर्मतिः- म्हणजे विवेक उत्पन्न होण्यास प्रतिबंधक पापानें दुष्ट म्हणजे मलिन आहे बुद्धि ज्याची असा आहे. यास्तव चित्तशुद्धि न झाल्यामुळें तत्वज्ञानास अयोग्य होऊन आत्मा अकर्ता असतां हीत्यास अविद्येनें ह्या कर्ता आहे असें कल्पून कर्म कर्त्यांचे ठायीं तादात्म्याध्यासा स्तव कर्मत्यागाविषयीं असमर्थ होऊन सर्वदा जन्ममरण प्रवाह रूप संसारांत इष्ट अनिष्ट मिश्र या त्रिविध कर्माच्या फलाचा अनुभव करतो असें तात्पर्य- येणें करून तार्किक देहाहून आत्मा भिन्न आहे तोच केवल कर्ता आहे असें जें मानितात तेंही अकृत बुद्धित आहेत असें सूचविलें. आणि दुर्मति पदानें आत्मा केवल कर्ता नव्हे परंतु देहादिक संघाताचे संबंधानें त्यास कर्तृत्व आहे असें असून केवल एकट्या आत्म्यास कर्ता असा जो पाहतो तो तत्वें करून पाहात नाहीं असें जे कोणी म्हणतात तेंही बोलणें-त-

गलें नाहीं. परमार्थतः असंग अद्वितीय सर्वविकाररहित आत्मस्वरूप श्रुतींत सांगितलें आहे आणि देहादिक ही अविद्येनें कल्पिलेले मिथ्याच आहेत यास्तव त्यास देहादिकांचा वास्तविक संबंधच संभवत नाहीं. केवल शब्द आत्म्यास स्वाभाविक असंगत्व आहे याचा अनुवाद त्यास कर्तृत्व पाहणारास दुर्मतित्व सांगण्यासाठीं हेतुत्वें करून करतो असें सूचविलें.॥१६॥

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ॥ हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥ १७॥

या प्रमाणे चार श्लोकांनीं– अनिष्टमिष्टं मिश्रंच त्रिविधं कर्मणः फलं॥ भवत्यत्यागिनां प्रेत्य– या श्लोकाचे तीन चरणाचे व्याख्यानानें आत्म्यावर कर्तृत्व आरोपित आहे असें सांगून आतां आत्म्यास कर्तृत्व स्वाभाविक नाहीं. अकर्तृत्व स्वाभाविक आहे असें सांगण्यासाठीं– नतु संन्यासिनां क्वचित्– या चतुर्थ चरणाचें व्याख्यान एक श्लोकानें करतात.॥ यस्य अहंकृतः भावः न– म्हणजे पुण्यकर्माचरणें करून ज्याच्या आत्मानात्मविवेकास प्रतिबंधक पापाचा नाश झाला आहे असा आणि चित्तशुद्धि होऊन नित्यानित्य वस्तुविवेक लोकांतील किंवा परलोकांतील विषयभोगविषयीं चें वैराग्य आणि शमदमादिक मुमुक्षुत्व म्हणजे मोक्षेच्छा या साधनचतुष्टयानें जो संपन्न आहे आणि शास्त्र आणि गुरूचे उपदेशापासून अकर्ता अभोक्ता स्वप्रकाश परमानंदाद्वितीय परब्रह्मचा स्वात्मत्वें करून ज्यास साक्षात्कार झाला आहे अशा ज्या पूर्वींच्याहून विलक्षण पुरुषास कार्यासुद्धां अज्ञानाचा बाध झाल्यामुळें मी कर्ता असा प्रत्यय होत नाहीं अथवा अहंकाराचा बाध होऊन शुद्धात्म स्वरूपानें स्थिति झाल्यामुळें ज्याचा भाव म्हणजे स्थिति अहं अशा व्यवहारास योग्य होत नाहीं. अथवा आत्मानात्म विवेक ज्ञान झाल्यामुळें ज्यास अहंकृत भाव म्हणजे अहंकारानें तादात्म्य नाहीं आणि–यस्य बुद्धिर्न लिप्यते– म्हणजे हा पुरुष असंग आहे. आत्मा साक्षी आणि केवल निर्गुण आहे आत्मा अप्रमाण म्हणजे प्राणरहित आहे आणि मनानें रहित आहे आणि शुभ्र म्हणजे मलरहित स्वच्छ आहे. पंधरावे अध्यायांत जो कार्योपाधि क्षर सांगितला त्याहून पर जो मायोपाधिक अक्षर ईश्वर त्याहून पर म्हणजे कार्यकारणोपाधिरहित असा आत्मा आहे आणि आत्मा अज म्हणजे उत्पत्तिरहित, ध्रुव म्हणजे शाश्वत आणि सलिल- एक द्रष्टा अद्वैत नित्य शाश्वत पुराण आहे. ब्रह्मात्मतत्त्व निष्क्रिय निरवयव शांत निरवद्य म्हणजे दोषरहित निरंजन म्हणजे तमोगुणरहित अशा अर्थाच्या अनेक श्रुतींचे प्रमाणावरून आणि अविकार्योयमुच्यते– प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः॥ "अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते॥ तत्त्ववित्तु महाबा-

हो गुण कर्म विभागयोः॥ गुणा गुणेषु वर्तंत इतिमत्वा नसज्जते॥ शरीरस्थोपि-कौंतेय नकरोतिं नलिप्यते॥" इत्यादिक ज्या भगवद्गीतेंतील भगवद्वाक्य रूप स्मृ-ति यांचा अर्थ पूर्वी लिहिलाच आहे त्याचें प्रमाणावरून दग्ध पटा प्रमाणें तत्वज्ञा-नानें बाध होऊन अनुवृत्ति असली तरी माझे ठायीं मायेनें कल्पिलेले हे अधिष्ठा-नादिक पांचच सर्व कर्मांचे कर्ते आहेत. आणि हे असंग स्वप्रकाश चैतन्य रूप जो-मी याच्या माया कल्पित संबंधानेंच प्रकाश पावले आहेत मीतर कर्ता नाहीं.कर्ते आणि त्याचें जे सर्व पूर्वोक्त व्यापार त्यांचा प्रकाशक साक्षी आहें आणि क्रियाश-क्ति आणि ज्ञान शक्ति यानीं युक्त जे प्राण आणि अंतःकरण रूप दोन उपाधि त्यां-नीं रहित शुद्ध सर्व कार्य कारणाचे संबंधानें रहित कूटस्थ निर्विकार द्वैत रहित आहे यास्तव कर्ता मी नाहीं अशी पारमार्थिक बुद्धि झाल्यांमुळें ज्याची बुद्धि म्ह-णजे अंतःकरण कर्तृत्व वासना निमित्तक. तें हें मी करीन किंवा केलें याचें फळ मी भोगीन किंवा भोगलें अशा अनुसंधानात्मक लेपानें युक्त होत नाहीं या अनु-संधानास अनुशय असें म्हणतात. तो अनुशय पुण्य कर्म केल्यानें मी पुण्यवान् आहें असा हर्ष जो होतो तो तद्रूप आहे आणि पापकर्म केल्यानें हें पाप कशास मी केलें किंवा हें दुःख मला पापानें झालें असा जो पश्चात्ताप होतो तो तद्रूप आहे. क-र्तृत्वाभिमान गेल्यामुळें दोन्ही प्रकारचा जो अनुशय तेणें करून ज्याची बुद्धि लि-प्त होत नाहीं असें तात्पर्य- यास प्रमाण- तैत्तिरीयोपनिषदांत ब्रह्मवेत्ता ब्रह्मप्र-त पावतो (ब्रह्मच होतो) असें उपक्रमांत सांगून तें ब्रह्म आनंदस्वरूप आहे त्या-चा ज्ञानानें स्वात्मत्वें करून लाभ झाला म्हणजे पुरुष आनंद युक्त होतो अन्यथा होत नाहीं तो ब्रह्मानंद या पुरुषाचे ठायीं आणि या आदित्याचे ठायीं आत्म स्वरू-प एकच आहे असें सांगून अशा ब्रह्मानंदाप्रत जो स्वात्मत्वें करून पाहतो तो ऐ-हिक भयाला कारण जे व्याघ्रादिक त्या कोणा पासून ही भय पावत नाहीं आणि-पारलौकिक भयास हेतुभूत जें पापादिक त्या पासून ही भय पावत नाहीं असें सांगून त्यांची उपपत्ति करण्या साठीं या पूर्वोक्त ज्ञान्यास मी पुण्य कां केलें नाहीं आ-णि मी पाप कां केलें अशीं पुण्य आणि पापें संताप करीत नाहींत न केल्यामुळें पु-ण्य, केल्यामुळें पाप त्याचे संतापास कारण होत नाहींत असें सांगून पुण्य पापें सं-तापास कारण होत नाहींत याविषयीं पूर्वोक्त प्रकारें करून ब्रह्मानंदाप्रत जाण-णारा पुण्य आणि पाप या दोघांप्रत टाकून आत्म्याप्रत ब्रह्माभिन्नत्वें करून स्मरतो येणें करून ज्या कारणास्तव पुण्यपापांचा मिथ्यात्वानुसंधानें करून त्याग केला-या कारणास्तव त्याचें न करणें आणि करणें एतन्निमित्तक ताप त्यास होत नाहीं-असा हेतु सांगितला. त्याचें तात्पर्य तो विद्वान देहेंद्रियादिकाचे प्रवृत्ति पासून उ-त्पन्न झालेलीं पुण्य पापें स्वात्मस्वरूपत्वें करूनच पाहतो आत्म सत्ते वांचून दु-

सरी सत्ता पाहीतच नाहीं. यास्तव तीं पुण्य पापें त्यांस ताप देत नाहींत. याप्रमाणें च श्रुत्यंतरांत विद्वानास केलेलें पाप आणि न केलेलें पुण्य हीं दोन्हीं ताप देत नाहींत असें सांगून हें ऋचानींही सांगितलें आहे असें त्याविषयीं दुसऱ्या श्रुतीनें प्रमाण दाखवून हा ब्रह्मवेत्ता जो ब्राह्मण त्याचा नित्य महिमा आहे कर्मे करून तो वृद्धी-मत पावत नाहीं आणि लहानही होत नाहीं, पाप हें उपलक्षण करून पाप आणि पुण्य यांच्यानें तो लिप्त होत नाहीं अशा अर्थाची श्रुति दाखविली त्यांत वृद्धि पावत नाहीं येणें करून पुण्यानें संतोष पावत नाहीं. लहान होत नाहीं येणें करून ताप पावत नाहीं असें सांगितलें याप्रमाणें - यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न-लिप्यते - येणें करून सांगितलेला पूर्वोक्त दुर्मतीहून विलक्षण परमार्थदर्शी सन्मती कर्तृत्वाभिमान गेल्यामुळें अनिष्ट, इष्ट, मिश्र अशा त्रिविध फलाचा भोग-करणारा होत नाहीं अशा शास्त्रार्था विषयीं अहंकाराचा अभाव आणि बुद्धीचे लेपाचा अभाव यांची स्तुती करून सांगतात. सः इमान् लोकान् हत्वापि न हंति न निबध्यते - म्हणजे अकर्ता जो आत्मा त्याचा साक्षात्कार झाल्यामुळें तो या सर्व प्राण्याप्रत मारून ही मरणारा किंवा हिंसात्मक हनन कर्ता तद्विषयक रागद्वेष नसल्यामुळें होत नाहीं आणि त्या हिंसा रूप अधर्म फलानें बंध ही पावत नाहीं. - येथें यस्य नाहंकृतः भावः - याचें फल - न हंति - हें सांगितलें - बुद्धिर्यस्य नलिप्यते - याचें फल - ननिबध्यते - हें सांगितलें. सर्व प्राण्यांची हिंसा करून ही त्या-कर्माचा लेप होत नाहीं अशा सांगितल्यानें अतिशय सांगितला सर्व प्राण्यांचें हिंसन असंभावितच आहे आणि हत्वापि - ही प्राणी हनन कर्तृत्वाची अभ्यनुज्ञा बाधितानुवृत्ति (बाधानंतर ही अनुवृत्ति) रूप कर्तृत्वा विषयींचे लौकिक दृष्टीनें सांगितली आणि, नहंति - हा कर्तृत्व निषेध शास्त्रीय परमार्थ दृष्टीनें-सांगितला यास्तव - हत्वापि आणि नहंति हें विरुद्ध नाहीं. ननिबध्यते - येणें करून कर्मफल सुखदुःख संबंध रूप होत नाहीं असें सांगितल्यानें भोक्तृत्वनिषेध ही शास्त्र दृष्टीनें सांगीतला. या गीता शास्त्राचे आरंभीं - नायं हंति न हन्यते - येणें करून आत्म्यास सर्व कर्मांचा संबंध नाहीं. अशी प्रतिज्ञा करून - "न जायते म्रियते वा कदाचित् -" इत्यादिक हेतु सांगणाऱ्या वचनानीं त्याची - "वेदाविनाशिनं नित्यं" - येणें करून विद्वानास सर्व कर्माधिकाराची निवृत्ति संक्षेपानें-सांगितली. मध्यें मध्यें त्या त्या प्रसंग संगतीनें तिचें सविस्तर निरूपण करून - या अध्यायांत इतकाच शास्त्रार्थ असा तिचा - नहंति ननिबध्यते - असा उपसंहार केला यावरून अविद्येनें कल्पिलेले जे अधिष्ठानादिक पांच कर्माचे कर्ते त्यांतून कोणे एकानें ही केलेले कर्माचा ब्रह्मात्म साक्षात्कारानें उच्छेद होतो यास्तव जे परमार्थ संन्यासी आहेत त्यांस पूर्वोक्त अनिष्ट, इष्ट, मिश्र रूप त्रिविध क-

र्म फल होत नाहीं हें सिद्ध झालें. आत्मा कर्ता, भोक्ता नव्हे. असंग सच्चिदानंदा द्वय ब्रह्मच आहे असा जो साक्षात्कार तोच परमार्थ संन्यास. हा परमार्थ संन्यास जनकादिकांस जरी होता तथापि त्यांचे बलवत् प्रारब्ध कर्माचे योगानें झालेल्या बाधितानुवृत्तीनें किंवा अविद्वान् लोकांनीं कल्पिल्या मुळें ते कर्म करीत होते असें दर्शन विरुद्ध नाहीं. जसें परमार्थ संन्यासी जे परमहंसादिक त्यांचें भिक्षाटनादिक विरुद्ध नाहीं त्या प्रमाणें, यास्तवच विद्वत्संन्यास ज्ञानाचा फलभूत असें म्हणतात. आणि ज्ञानास साधन जो संन्यास त्यास विविदिषा संन्यास असें म्हणतात. असा जो नव्हे तो ही ज्ञानोत्पत्ति पूर्वीं केलेला किंवा जो केल्यानंतर ज्ञानोत्पत्ति झाली तर तो साधन किंवा फलभूत होतो असें पुढें सांगतील. ॥१७॥

## ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ॥ करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

अधिष्ठानादिक जे पांच त्यांसच कर्मांचें हेतुत्व आहे यास्तव आत्म्यास सर्व कर्मांचा संबंध नाहीं आणि त्या कर्म फलानें बंध ही आत्मा पावत नाहीं असें जें सांगितलें त्याचेंच सविस्तर प्रतिपादन करण्याकरितां ज्ञान, ज्ञेय, ज्ञाता इत्यादि परिभाषेचे रचनेनें त्यास त्रिगुणात्मकत्व आहे यास्तव त्यांचा निर्गुण आत्म्याचे ठायीं संबंध नाहीं असें सांगण्यास आरंभ करतात. ज्ञानं, ज्ञेयं, परिज्ञाता- म्हणजे जेणें करून वस्तुतत्वाचा प्रकाश होतो अशी जी इंद्रियादिक स्वरूप प्रत्यक्ष आणि अनुमान शब्दादिक प्रमाणांचे द्वारा झालेली अंतःकरणाची विषयाकार विषयाधिष्ठान चैतन्य प्रति बिंब रूप चिदाभास युक्त वृत्ति तीसच विषय प्रकाश म्हणतात. तें ज्ञान, त्या ज्ञानानें प्रकाश पावणारा म्हणजे आहे भासतो अशा व्यवहारास योग्य होणारा जो त्या प्रकाश रूप ज्ञानाचें कर्म किंवा ज्ञानाचा विषय वर्तमान किंवा अतीत घटपटादिक तो ज्ञेय, त्या ज्ञानादिकाचा आश्रय अंतःकरणोपाधिक भोक्ता असा कल्पिलेला जो तो ज्ञाता, मला जें इष्ट आहे त्याचें साधन हें आहे असें जें ज्ञान तें ज्ञान, ज्यावर असें ज्ञान होतें तें ज्ञेय, त्या ज्ञानाचा जो आश्रय तो परिज्ञाता अशीही कोणी व्याख्या करतात.- त्रिविधा कर्म चोदना- म्हणजे या तीन प्रकारांनीं युक्त म्हणजे या तिघांचा समुदाय कर्माची चोदना म्हणजे टाकणें किंवा ग्रहण करणें ज्यास हान उपादान म्हणतात. अशा सर्व कर्मांस प्रवर्तक आहे, कारण कोणतेही कर्माच्या आरंभास हीं तीन पाहिजेत. यांतून एक किंवा दोन नसतील तर कर्माचा प्रारंभ होत नाहीं- "चोदनेति क्रियायाः प्रवर्तकं वचनं" -क्रियेचें प्रवर्तक जें वचन त्यास चोदना असें म्हणतात. असें शांबर भाष्यांत सांगितलें आहे:- "चोदना चोपदेशश्च विधिश्चैकार्थ वाचिनः- चोद-

ना- उपदेशश्च-विधि-हे शब्द एकार्थानेंच वाचक आहेत असें भाट्टानीं सांगि-तलें आहे या वरून प्रवर्तक जें वचन हा चोदना शब्दाचा मुख्यार्थ आहे तथापि ज्ञानादिकावर वचनत्व नाहीं यास्तव येथें वचन या अंशाचा त्याग करून लक्षणे नें प्रवर्तक इतकाच अर्थ विवक्षित आहे, असें जाणावें. येणें करून या प्रवर्तकाचे योगानें कर्माविषयीं अनात्म्याचीच प्रवृत्ती होते आत्म्याची प्रवृत्ति होत नाहीं अ-सें सूचविलें - करणं कर्म कर्ता इति त्रिविधः - म्हणजे बाह्य जे शब्दादिक विषय-त्यांचे ज्ञानास साधन जीं श्रोत्रादिक इंद्रियें आणि आंतर सुखदुःखादिकांच्या-ज्ञानास साधन जे बुद्ध्यादिक हें करण. कर्तृनिष्ठ (कर्तृसंबंधि) क्रियेनें व्याप्त हो-ऊन फलसंबंधाचे उत्पत्तीनें उत्पन्न होणारें किंवा प्राप्त होणारें किंवा विकारयुक्त होणारें किंवा घर्षणादिक संस्कारानें युक्त होणारें कर्त्यास ईप्सित जें तें कर्म, ज्या-चे स्वरूप निष्पत्तीस इतर कारकें म्हणजे क्रियेचे आश्रय प्रयोजक नाहींत आणि सर्व कारकांस क्रियायुक्त करण्यास जो प्रयोजक होतो तो कर्ता, याप्रमाणें तीन प्र-कारचा-कर्मसंग्रहः - म्हणजे कर्म ज्यावर समवेत होतें म्हणजे राहतें असा म्हण-जे क्रियेचा आश्रय ज्यास कारक असें म्हणतात. कर्ता कर्म करण संप्रदान अपा-दान अधिकरण या भेदानें कारकें जरी सहा प्रकारचीं आहेत तथापि संप्रदानादि-क जीं तीन कारकें तीं परंपरेनें क्रियेस जनक होतात. साक्षात् क्रियेस आश्रय ना-हींत यास्तव किंवा करण कर्म कर्ता या तीन कारकांतच संप्रदानादिक तीन कारकां-चा समावेश करून - करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः - असें सांगितलें या-वरून हें षड्विध (सहाप्रकारचें) किंवा त्रिविध (तीनप्रकारचें) कारकच क्रियेचा आ-श्रय आहे. निर्विकार कूटस्थ आत्मा क्रियेचा आश्रय नाहीं असें सूचविलें. ॥१८॥

## ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ॥ प्रोच्य-ते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥

आतां ज्ञान ज्ञेय ज्ञाता आणि करण कर्म, कर्ता या दोन त्रिकांस त्रिगुणत्व सविस्तर सांगण्या साठीं तीं दोन त्रिकें त्रिगुणात्मक आहेत अशी संक्षेपानें प्रतिज्ञा करतात. ज्ञानं कर्म च कर्ता च - ज्ञानाचें स्वरूप पूर्वी सांगितलें आहे. ज्ञानोपाधिक-त्वास्तव ज्ञेयाचा ज्ञानामध्येंच अंतर्भाव, कर्म म्हणजे - त्रिविधः कर्मसंग्रहः - येथें सांगितलेली क्रिया क्रियोपाधिकत्वास्तव कर्म आणि करण यांचा या क्रियेंतच अं-तर्भाव, क्रियेला उत्पन्न करणारा कर्ता. ज्ञाता आणि कर्ता एकच आहेत. कर्त्याला-क्रियोपाधिकत्व असलें तरी त्यास पृथक्त्वें करून त्रिगुणत्व जें येथें सांगितलें कु-तार्किकानें जें कर्त्यास आत्मत्व मानिलें आहे त्याचें निराकरण करण्या करितां सांगी-तलें. गुणसंख्याने गुणभेदतः त्रिधैव - गुण म्हणजे सत्व रज तम हे तीन गुण.

सम्यक् म्हणजे कार्यभेदानें निरूपिले आहेत. त्याचे ठायीं असें जें सांख्यशास्त्र त्याचे ठायीं हें ज्ञान कर्म कर्ते प्रत्येक सत्वरज तम या भेदानें तीन तीन प्रकारचे, प्रोच्यते हे कपिल मुन्यादिकांनीं सांगितले आहेत. कपिलमुनी प्रणीत सांख्यशास्त्र पारमार्थिक ब्रह्मात्मैक्या विषयीं जरी प्रमाण नाहीं तथापि अपारमार्थिक जो गुणानीं केलेला गौण भेद त्याचें निरूपणा विषयीं व्यावहारिक प्रामाण्य त्यास आहे यास्तव ज्ञानादिकाचा जो सत्व रज तमो गुणामुळें सात्विकादि भेद सांगावयाचा अहे तो या शास्त्रांतच सांगतो असें नाहीं शास्त्रांतरीं ही सांगितला आहे. अशा सांगण्याविषयीं गुण संख्यानें प्रोच्यते- असें म्हटलें हें एवंकारानें सूचविलें अथवा गुणत्रयरूप उपाधीला सोडून स्वत: आत्म्याला कर्मादिकांचा संबंध नाहीं त्या उपाधीचेच योगानें आहे असें एवकारानें सूचविलें. यथावच्छृणु तान्यपि- म्हणजे तीं ज्ञानकर्मादिक आणि त्यांचा जो गुणामुळें झालेला सात्विकादिक भेद त्याप्रत माझे वाक्यापासून श्रवण करण्यास सावधान तूं हो. चतुर्दशाध्यायाचे ठायीं- "तत्रसत्वं निर्मलत्वात्"- इत्यादिकें करून सत्वादिक गुण जीवस्वरूपाशीं संबंध कसा करतात, त्याचें निरूपण केलें. सत्राचे अध्यायांत- "यजंतेसात्विका देवान्"- इत्यादिकें करून गुणकृत सात्विकादिक स्वभावाचें निरूपण करून रज आणि तम या गुणानीं केलेला जो स्वभाव त्याचा त्याग करून सात्विक-आहारादिकाचे सेवनानें सत्वगुणानें केलेल्या सात्विक स्वभावाचेंच सेवन करावें असें सांगितलें या अध्यायांत स्वभावें करून गुणातीत जो आत्मा त्यास क्रियाकारक फलाचा संबंध पारमार्थिक नाहीं गुणकृतच आहे असें दाखविण्याकरितां क्रिया कारक फलांचें त्रिगुणात्मकच स्वरूप आहे दुसरें स्वरूपच नाहीं यास्तव त्याचा आत्म्याशीं संबंध नाहीं असें सांगतात हा विशेष आहे यास्तव पौनरुक्त्य नाहीं. ॥१९॥

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ॥ अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धिसात्विकम् ॥२०॥**

या प्रमाणे ज्ञानाचें, कर्माचें आणि कर्त्याचें प्रत्येक सात्विकादिक भेदानें त्रिविधत्व सांगण्याची प्रतिज्ञा करून प्रथम तीन श्लोकांनीं ज्ञानाचें त्रिविधत्व सांगतात.- विभक्तेषु सर्वभूतेषु- म्हणजे परस्पर भिन्न भिन्न असें जे उत्पत्ति नाशवंत अव्याकृत हिरण्यगर्भ विराट संज्ञक बीज सूक्ष्म स्थूल रूप समष्टि व्यष्ट्यात्मक दृश्यवर्ग त्याचे ठायीं- अव्ययं अविभक्तं एकं भावं येन ईक्षते- म्हणजे उत्पत्ति विनाशादिक सर्व विकारशून्य अदृश्य आणि अधिष्ठानत्वें करून आणि बाधाचे अवधित्वें करून किंवा बाधाचे साक्षित्वें करून सर्वत्र भेदरहित आणि अद्वि-

तीय असा जो परमार्थ सत्तास्वरूप स्वप्रकाश आनंदरूप आत्मा त्याप्रत वेदांत वाक्याचे श्रवण मननादिकानें उत्पन्न झालेलें जें ब्रह्मात्माकार अंतःकरण परिणामात्मक वृत्तिरूप ज्ञान तेणें करून साक्षात्कारानें पाहतो – तत् ज्ञानं सात्विकं विद्धि – म्हणजे तें मिथ्या प्रपंचाचा बाध करणारें अद्वैत ब्रह्मात्मतत्त्व दर्शन रूप ज्ञान सात्विक असें तूं जाण. संसार कारण जें राजस तामस ज्ञान तें सात्विक नव्हे असा अभिप्राय आहे. ॥ २० ॥

## पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान् पृथग्विधान्॥ वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम्॥ २१॥

आतां राजस ज्ञान सांगतात. – पृथक्त्वेन स्थितेषु सर्वभूतेषु – म्हणजे भिन्न भिन्नत्वें करून राहिलेले जे देहादिक त्यांचे ठायीं – पृथक् विधान् नानाभावान् – म्हणजे सुखित्व दुःखित्वादिकें करून परस्पर विलक्षण असे जे प्रतिदेहाचे ठायीं – भिन्नभिन्न क्षेत्रज्ञ जीव त्यांप्रत – यज्ज्ञानं वेत्ति – म्हणजे ज्या ज्ञानें करून जाणतो. येथें – येन ज्ञानेन वेत्ति – असा प्रयोग असावा, परंतु करणावरच कर्तृत्वाचा आरोप करून – काष्ठानि पचंति – म्हणजे काष्ठें पाक करतात, असा जसा लोकांत प्रयोग आहे तसा – यत् ज्ञानं वेत्ति – हा प्रयोग करणावर कर्तृत्वाचा आरोप करून केला. अथवा अहंकार रूप कर्त्याचा आणि अंतःकरण वृत्ति रूप ज्ञानाचा अभेदच आहे या अभिप्रायानें तसा प्रयोग केला, असें जाणावें. तत् ज्ञानं विद्धि राजसं – म्हणजे तें ज्ञान राजस असें तूं जाण. पुनः ज्ञानपदानें आत्म्यांचा परस्पर भेद त्यांचा ईश्वराशीं भेद त्या आत्म्याहून आणि ईश्वराहून आणि परस्पर अचेतनाचा भेद या प्रकारचें अनौपाधिक प्रपंच भेद ज्ञान सर्वही कुतार्किकाचें राजसच आहे असें सूचविलें. ॥ २१ ॥

## यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहेतुकम् ॥ अतत्त्वार्थवदल्पंच तत्तामसमुदाहृतम्॥ २२॥

आतां तामस ज्ञान सांगतात. – यत्तु एकस्मिन् कार्ये अहेतुकं कृत्स्नवत् सक्तं – म्हणजे पूर्वोक्त राजसाहून भिन्न – तु शब्दाचा अर्थ भूत कार्यें बहुत विद्यमान असतां एकच भूतविकार रूप देहादिक कार्याचे ठायीं किंवा प्रतिमादिकाचे ठायीं – अहेतुक म्हणजे उपपत्ति रहित दुसरे भूतकार्यास आत्मत्व किंवा ईश्वरत्व नाहीं तर याच भूत कार्यास आत्मत्व कसें किंवा ईश्वरत्व कसें असें ज्यांत अनुसंधान नाहीं या प्रकारचें जें कृत्स्नवत् सक्तं – म्हणजे परिपूर्णा प्रमाणें म्हणजे हाच किंवा यापरिमाणाचाच आत्मा किंवा ईश्वर आहे याहून भिन्न नाहीं अशा अभिनिवेशानें युक्त जसें दिगंबराचे मतीं सावयव देहपरिमाणाचा आत्मा किंवा चार्वाकाचे मतीं देहच –

आत्मा असें ज्ञान किंवा पाषाण काष्ठ प्रतिमाच किंवा प्रतिमेतच तितके परिमाणाचा ईश्वर असें याच कारणास्तव- अतत्त्वार्थवत्- म्हणजे तत्त्वार्थाचा अवलंबन करणारें आणि अल्पंच- म्हणजे आत्म्यानें किंवा ईश्वरानें नित्यत्व किंवा सर्वव्यापकत्व- ज्यांत भासलें नाहीं यास्तव अल्प असें जें नित्य विभु देहातिरिक्त जो आत्मा तद्भिन्न ईश्वर ही नित्य विभु सर्वव्यापक अशा तार्किकादिकांच्या ज्ञानाहून विलक्षण अनित्य परिच्छिन्न देहात्माभिमान रूप ज्ञान किंवा प्राकृत मूढ लोकांचे परिच्छिन्न प्रतिमादि परिमाण प्रतिमात्मक ईश्वर ज्ञान- तत् तामसमुदाहृतं- म्हणजे तें ज्ञान तामस असें शिष्टांनीं म्हटलें आहे. ॥२२॥

## नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ॥ अफल- प्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥ ॥

या प्रमाणें वेदांत मतानें जें अद्वैतात्म दर्शन रूप सात्त्विक ज्ञान त्याचा- मुमुक्षूनीं स्वीकार करावा. आणि द्वैत दर्शीनें जें आत्मा नित्यविभु प्रति शरीरीं- भिन्नभिन्न असें पूर्वोक्त राजस भेदज्ञान आणि आत्मा अनित्य परिच्छिन्न परिमाणाचा किंवा देहच आत्मा इत्यादिक तामस ज्ञान त्यांचा त्याग करावा. असें- सांगून आतां त्रिविध कर्म सांगतात. - नियतं- म्हणजे शास्त्रोक्त यावत् अंगांचें अनुष्ठान करण्यास जे असमर्थ आहेत त्यांस ही यथाशक्ति अंगानुष्ठान करून अवश्यकर्तव्य असें म्हणजे नित्य आणि संग रहितं- म्हणजे मी- असा मोठा याज्ञिक आहें इत्यादिक अभिमान रूप जो राजस अहंकार तेणें- करून रहित आणि- अराग द्वेषतः अफल प्रेप्सुना कृतं- म्हणजे या कर्मानें राजादिकां पासून सन्मान पावेन असा मनांतील जो अभिप्राय तो राग- या- कर्मानें शत्रूचा पराजय करीन असा जो अभिप्राय तो द्वेष- त्यानें केलेलें आणि ज्यास फलाची इच्छा नाहीं अशा कर्त्यानें केलेलें- यत् कर्म तत् सात्त्विकमुच्यते- म्हणजे जें होमदान यागादि रूप कर्म त्यास सात्त्विक असें शिष्ट म्हणतात.२३

## यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ॥ क्रि- यते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

आतां राजस कर्म सांगतात. - यत्तु कामेप्सुना वा साहंकारेण बहुलायासं क्रियते- तु शब्दानें सात्त्विका पेक्षां भेद सांगितला. फलाची इच्छा करणारा जो कर्ता किंवा पूर्वोक्त संगात्मक गर्वानें युक्त जो कर्ता किंवा वा शब्दानें समुच्चय करून फलेच्छा करणारा आणि अहंकारानें ही युक्त असा कर्ता त्यांनीं केलेलें जें- बहुलायासं- सर्वांगांचे अनुष्ठानानें क्लेश देणारें काम्य कर्म- तत् राजसमुदाहृत-

नम् - म्हणजे तें राजस कर्म असें शिष्ट म्हणतात. येथें सर्व विशेषणांनीं सात्विक कर्माचीं जीं विशेषणें त्यांचा अभाव सांगितला. ॥२४॥

अनुबंधं क्षयं हिंसामनवेक्ष्य च पौरुषम् ॥ मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुदाहृतम् ॥२५॥

आतां तामस कर्म सांगतात. - अनुबंधं - म्हणजे पश्चात् होणारें अशुभ - क्षयं - म्हणजे शरीर सामर्थ्याचा किंवा धनाचा किंवा सेनेचा जो नाश तो - हिंसा - म्हणजे प्राण्यास होणारी पीडा - पौरुषं - म्हणजे आपलें सामर्थ्य याचें - अनपेक्ष्य - म्हणजे आलोचन न करून - मोहात् आरभ्यते कर्म - म्हणजे केवल अविवेकानें च ज्या कर्माचा आरंभ करतात - तत् तामसं उदाहृतं - म्हणजे त्यास तामस कर्म असें शिष्ट म्हणतात. ॥२५॥

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ॥ सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्विक उच्यते ॥२६॥

आतां त्रिविध कर्त्याचें निरूपण करीत असतां सात्विक कर्ता सांगतात. -मुक्तसंगः - म्हणजे फलाची इच्छा ज्याणें टाकली आहे असा आणि - अनहंवादी - म्हणजे मी कर्ता असें जो बोलत नाहीं किंवा आपल्या गुणाची श्लाघा करीत नाहीं आणि धृत्युत्साहसमन्वितः - म्हणजे विघ्न उपस्थित झालें तरी प्रारंभ केलेले कर्माचा त्याग न करण्यास कारणभूत जो अंतःकरणाचा वृत्तिविशेष तो धृति म्हणजे धैर्य - हें मी करीनच अशी निश्चयात्मक जी बुद्धि तो उत्साह - त्यांनीं युक्त आणि - सिद्ध्यसिद्ध्योः निर्विकारः - म्हणजे कर्माचे सिद्धीनें झालेल्या हर्षामुळें मुख प्रसन्न होणें आणि कर्माचे असिद्धीनें झालेल्या शोकानें मुख म्लान होणें अशा विकारानें रहित - कर्ता सात्विकः उच्यते - म्हणजे कर्ता म्हणजे शास्त्र प्रमाणावरून कर्म करणारा फलाचे प्रीतीनें करणारा नव्हे असा जो कर्ता त्यास सात्विक कर्ता असें शिष्ट बोलतात. ॥२६॥

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ॥ हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥२७॥

आतां राजस कर्ता सांगतात. - रागी - म्हणजे कामादिकानें व्याकुल चित्त आणि फलप्रेप्सुः - म्हणजे फलाची इच्छा करणारा आणि लुब्धः - म्हणजे परद्रव्याचा अभिलाष करणारा किंवा द्रव्य असतां ही त्याचा धर्मकार्यादिकार्थ व्यय न करणारा आणि - हिंसात्मकः - म्हणजे आपला अभिप्राय प्रगट करून दुसऱ्या-

चे वृत्तीचा छेद करणें अशी जो हिंसा ती करण्या विषयीं ज्याचा स्वभाव आहे-असा आपला अभिप्राय प्रकट न करून पूर्वोक्त हिंसा करणाऱ्या स्वभावाच्या पुरुषास नैष्कृतिक असें म्हणतात. आणि- अशुचिः-म्हणजे शास्त्रोक्त शौच-रहित- हर्षशोकान्वितः-म्हणजे कर्मसिद्धीनें जो हर्ष आणि असिद्धीनें जो-शोक त्यानीं युक्त- कर्ता राजसः परिकीर्तितः-म्हणजे असा जो कर्ता तो राजस कर्ता असें शिष्टांनीं म्हटलें आहे. ॥२७॥

**अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः॥
विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते॥२८॥**

आतां तामस कर्ता सांगतात.-अयुक्तः-म्हणजे सर्व काळ विषयानें आपले कडे चित्त ओढून घेतल्या मुळें जें कर्तव्य त्या विषयीं जो सावधान नाहीं असा आणि प्राकृतः-म्हणजे बाला प्रमाणें ज्याचे बुद्धीस शास्त्र संस्कार नाहीं असा आणि- स्तब्धः-म्हणजे गुरु देवता यांसही जो नम्र होत नाहीं आणि-शठः-म्हणजे दुसऱ्याची वंचना करण्या साठीं एक जाणत असतांही अन्यथा बोलणारा- नैष्कृतिकः-म्हणजे आपण परोपकार करणारा आहे असा दुसऱ्यास भ्रम उत्पन्न करून त्याचे वृत्तीचा छेद करून स्वार्थ संपादना विषयीं तत्पर-अलसः- म्हणजे जें अवश्य करावयाचें आहे तें करण्या विषयीं ही ज्याची प्रवृत्ति होत नाहीं.-विषादी-म्हणजे निरंतर असंतोष स्वभावा मुळें शोक करण्याचे स्वभावाचा-दीर्घसूत्री- म्हणजे निरंतर हजारों शंकांनीं युक्त अंतःकरण असल्यामुळें ज्याची फार हळू हळू प्रवृत्ति होते किंवा आज जें करावयाचें तें महिन्यानें करण्याचे स्वभावाचा असा जो कर्ता त्यास तामस कर्ता असें शिष्ट म्हणतात. ॥२८॥

**बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु॥ प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय॥२९॥ ॥**

या प्रमाणें "ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः-" याचें व्याख्यान केलें. आतां- धृत्युत्साह समन्वितः- या श्लोकांत सूचविलेले जे धृति आणि उत्साह म्हणजे बुद्धि यांचें गुणभेदानें त्रिविधत्व सांगण्याची प्रतिज्ञा करतात. बुद्धेः धृतेश्च गुणतः अशेषेण पृथक्त्वेन प्रोच्यमानं त्रिविधं भेदं शृणु- म्हणजे हे धनंजया अर्जुना. पूर्वोक्त अध्यवसायात्मक म्हणजे निश्चयात्मक वृत्तीनें युक्त जो बुद्धि आणि धृति यांचा सत्वादिक गुणानीं केलेला जो त्रिविध (तीन प्रकारचा) भेद तो मी तुला सांगतों. तो निःशेष आणि कोणता भेद ग्राह्य कोणता त्याज्य अशा विवे-

पें करून सांगतों त्या प्रत तूं श्रवण कर. येथें बुद्धि शब्दानें वृत्तीचें ग्रहण करावें किंवा वृत्तियुक्त अंतःकरणाचें ग्रहण करावें. प्रथम पक्षीं ज्ञान पृथक् सांगावें दुसरे पक्षीं कर्ता पृथक् सांगूं नये कारण वृत्तियुक्त अंतःकरणालाच कर्तृत्व आहे आणि ज्ञान धृतीचें पृथक् कथन करण्यास नको. इच्छादिकांची व्यावृत्ति करण्यासाठीं त्यांचें पृथक् कथन केलें असें संभवत नाहीं. वृत्तियुक्त अंतःकरणाला त्रिविधत्व सांगितलें म्हणजे सर्वांतःकरण वृत्तींस त्रिविधत्व विवक्षित आहे यामुळें इच्छादिकांची व्यावृत्ति विवक्षित नाहीं अशी शंका येते तथापि अंतःकरण वृत्त्युपाधीनें युक्त जो चिदाभास तो कर्ता. येथें त्या उपाधियुक्तापासून उपाधि निराळा करून वृत्तिरूप उपाधिच करणत्वें करून विवक्षित आहे सर्वत्र करणोपहितच कर्ता आहे. जरी काम, संकल्प, विचिकित्सा, श्रद्धा, अश्रद्धा, धृति, अधृति, ह्री: भी: या सर्व मनोवृत्ति मनोरूपच आहेत अशा अर्थाच्या श्रुतींत सांगितलेल्या कामादिक सर्व अंतःकरण वृत्तींस अंतःकरणाचे सत्वादिकाच्या भेदानें त्रिविधत्व असल्यामुळें त्रिविधत्व आहे तथापि बुद्धि आणि धृति यांचें येथेंच कथन ज्ञानशक्ति आणि क्रिया शक्ति यांचे उपलक्षणार्थ केलें, इच्छादिकांचे व्यावृत्ती साठीं केलें नाहीं असें जाणावें. ॥२९॥

**प्रवृत्तिंच निवृत्तिंच कार्याकार्ये भयाभये॥ बंधं मोक्षंच या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्विकी ॥३०॥**

बुद्धीचें त्रैविध्य सांगत असतां प्रथम सात्विक बुद्धि सांगतात.-प्रवृत्ति-म्हणजे प्रवृत्तिमार्ग,-निवृत्तिंच-आणि-निवृत्ति मार्ग-म्हणजे संन्यास,-कार्याकार्ये- आणि प्रवृत्ति मार्गाचे ठायीं कर्मानुष्ठान करणें असें जें तें कार्य आणि निवृत्ति मार्गाचे ठायीं कर्मानुष्ठान न करणें असें जें तें अकार्य. भयंच अभयं एव च-म्हणजे प्रवृत्ति मार्गाचे ठायीं गर्भवासादिक दुःख आणि अभय म्हणजे निवृत्ति मार्गाचे ठायीं गर्भवासादिक दुःखाचा अभाव. बंधंमोक्षंच योवेत्ति-म्हणजे आणि बंध म्हणजे प्रवृत्ति मार्गाचे ठायीं मिथ्या ज्ञानानें केलेला जो कर्तृत्वादिकाचा अभिमान आणि मोक्ष म्हणजे निवृत्ति मार्गाचे ठायीं तत्वज्ञानानें केलेलें जें अज्ञान आणि त्यांच्या कार्याचा अभाव यांप्रत जी बुद्धि म्हणजे पूर्वीं सांगितल्या प्रमाणें करणावर कर्तृत्वाचा आरोप करून ज्या बुद्धीनें जाणतो.-पार्थ साबुद्धिःसात्विकी-म्हणजे हे अर्जुना, ती बुद्धि सात्विकी म्हणावी. ॥३०॥

**यया धर्ममधर्मंच कार्यंचाकार्यमेवच॥ अयथावत् प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी॥३१॥**

आतां राजस बुद्धि सांगतात.-धर्म अधर्मंच-शास्त्रविहित आणि शास्त्रनिषिद्ध असें जें अदृष्टार्थ उभय-कार्यंच अकार्यं एवच-म्हणजे कर्तव्य आणि अकर्तव्य दृष्टार्थ उभय, यांपत-अयथावत् यया प्रजानाति-म्हणजे ज्या बुद्धीनें यथावत्-म्हणजे यथार्थरूपानें जाणत नाहीं किंवा हा धर्म आहे किंवा नाहीं हें कर्तव्य आहे किंवा नाहीं. हें अकर्तव्य आहे किंवा नाहीं असें संशययुक्त ज्या बुद्धीनें पाहतो:-पार्थ सा बुद्धिः राजसी- म्हणजे हे पार्था, ती बुद्धि राजसी म्हणावी.॥३१॥

**अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ॥ सर्वार्थान् विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी॥३२॥**

आतां तामस बुद्धि सांगतात:- तमसा आवृता या बुद्धिः-म्हणजे विशेष दर्शनाला विरोधी जो तमोगुणरूप दोष तेणें करून आवृत झालेली जी बुद्धि, अधर्मं धर्म इति मन्यते-म्हणजे अधर्माला धर्म असें मानिते. ज्या बुद्धीनें युक्त पुरुष अधर्माला धर्म असें मानितो हें उपलक्षण करून धर्माला अधर्म असें मानितो असें समजावें. आणि सर्वार्थान् विपरीतान् मन्यते-आणि या प्रमाणें सर्व ज्ञेय पदार्थ दृष्टार्थ किंवा अदृष्टार्थ त्यां पत विपरीत म्हणजे उलटें पाहतो किंवा मानितो. पार्थ सा बुद्धिः तामसी-म्हणजे हे अर्जुना, ती बुद्धि तामसी म्हणावी.॥३२॥

**धृत्या यया धारयते मनःप्राणेंद्रियक्रियाः ॥ योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्विकी॥३३॥**

आतां तीन श्लोकांनीं धृतीचें त्रिविधत्व सांगत असतां सात्विक धृति सांगतात. योगेन अव्यभिचारिण्या यया धृत्या-म्हणजे चित्तैकाग्रता त्मक समाधि रूप जो योग त्याला सोडून न राहणारी अशी जी धृति म्हणजे प्रयत्न तेणें करून-मनःप्राणेंद्रियक्रियाः धारयते-म्हणजे मन, प्राण, इंद्रियें यांचे जे चेष्टात्मक व्यापार त्यांपत धारण करतो म्हणजे शास्त्रविरुद्ध प्रवृत्ती पासून आवरून घेतो. जो प्रयत्न झाला म्हणजे मन, प्राण, इंद्रियांचे व्यापार शास्त्रविरुद्ध विषयां कडे होत नाहीं किंवा समाधीन होतो असें तात्पर्य- पार्थ सा धृतिः सात्विकी- म्हणजे हे अर्जुना, ती धृति सात्विक म्हणावी.॥३३॥

**यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन॥ प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी॥३४॥**

आतां राजस धृति सांगतात.- प्रसंगेन फलाकांक्षी सन्-म्हणजे कर्मकर्तृत्वाच्या अभिमानानें फलेच्छा करणारा होत्साता-यया धर्मकामार्थान् धारयते-म्ह-

णजे ज्या धृतीनें धर्म, अर्थ, काम यांप्रत धारण करतो-म्हणजे यांचें अनुष्ठान निरंतर करावें असें मनांत आणतो. तु शब्दानें मोक्षाच्या साधनाचें अनुष्ठान करावें-असें मनांत आणित नाहीं असें सूचविलें.-पार्थ सा धृतिः राजसी-म्हणजे हे अर्जुना, ती धृति राजसी म्हणावी. ॥३४॥

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेवच ॥ न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५॥**

आतां तामसी धृति सांगतात.-यया- ज्या धृतीनें, स्वप्नं- निद्रेप्रत, भयं- त्रासाप्रत, शोकं- इष्ट वियोग झाल्यामुळें होणाऱ्या संतापाप्रत, विषादं- खिन्नतेप्रत, मदमेवच - आणि शास्त्रनिषिद्ध विषयांचे सेवनानें विवशचित्ततेप्रत, दुर्मेधाः नमुंचति-.म्हणजे विवेका समर्थ ज्याची कुत्सित बुद्धि आहे असा पुरुष सोडीत नाहीं. सर्व काल पूर्वोक्त स्वप्नादिकांप्रत कर्तव्यत्वें करूनच मानितो. पार्थ सा धृतिः तामसी-म्हणजे हे अर्जुना, ती धृति तामस म्हणावी. ॥३५॥

**सुखंत्विदानीं त्रिविधं शृणुमे भरतर्षभ ॥ अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतंच निगच्छति ॥ ३६॥**

या प्रमाणें क्रियांचे आणि कारकांचे सत्वादिक गुणांच्या योगानें त्रिविधत्व सांगून त्यांचें फलजें सुख त्याचें त्रिविधत्व सांगण्याची प्रतिज्ञा श्लोकाच्या अर्धानें करतात. हे भरतर्षभ,-इदानीं त्रिविधं सुखं मे शृणु-म्हणजे हे भरतवंशांत श्रेष्ठ अर्जुना आतां माझे वाक्यें करून त्रिविध सुखाप्रत ग्राह्य कोणतें त्याज्य कोणतें याविषयींचा विवेक होण्या करतां श्रवण कर. श्रवण करण्यास विषयांतराकडील मन काढून सावधान चित्त हो. दीड श्लोकानें सात्त्विक सुख सांगतात.-यत्र अभ्यासात् रमते-म्हणजे ज्या समाधि सुखाचे ठायीं अतिपरिचय रूप जो-अभ्यास तेणें करून तृप्त होतो. विषयसुखा प्रमाणें तत्काल तृप्त होत नाहीं. आणि-दुःखांतंच निगच्छति-म्हणजे ज्या सुखाचे ठायीं रममाण झाला होत्साता सर्व दुःखांचा जो नाश त्यांप्रत पावतो किंवा अनुभवितो विषय सुखा प्रमाणें अंतीं म्हणजे शेवटीं मोठ्या सुखा प्रत अनुभवीत नाहीं. ॥३६॥

**यत्तदग्रे विषमिवपरिणामेऽमृतोपमम् ॥ तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥३७॥**

तेंच स्पष्ट करून दाखवितात.-यत् अग्रे विषमिव-म्हणजे जें सुख-ज्ञान वैराग्य समाधींच्या साधनानुष्ठानाचे आरंभीं फार आयास होऊन होतें या-

मुळें विषा प्रमाणें दुःखरूप वाटतें परंतु- परिणामे अमृतो पमं- म्हणजे ज्ञान-वैराग्य समाधीचा परिपाक झाला म्हणजे अमृता प्रमाणें निरतिशय प्रीतीचें आ-स्पद होतें आणि- आत्मबुद्धि प्रसादजं- म्हणजे आत्माकार जी अंतःकरणाची वृत्ति तिचा जो प्रसाद म्हणजे निद्रालस्यादिकाचे रहित तत्ता मुळें स्वच्छत्वें करून स्थिति ती पासून उत्पन्न झालेलें राजस सुखा प्रमाणें विषयांचे आणि इंद्रियांचे संबंधा पासून जें झालेलें नव्हे आणि जें निद्रा किंवा आलस्या पासून झालेलें न-व्हे- तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तं- म्हणजे असें जें अनात्म्या कडील मनाची वृत्ति ना-हींशी होऊन सुखस्वरूप आत्माकार अंतःकरण वृत्तीचे प्रसादा पासून झाले-लें सुख तें सात्त्विक सुख असें योग्यांनीं म्हटलें आहे. आवृत्ति करून ज्या सुखा-चे ठायीं रममाण होतो ज्याचे ठायीं दुःखाचे अवसाना प्रत पावतो तें गुणभेदा-नें त्रिविध सुख माझे वाक्या वरून ऐक असा- अभ्यासा द्रमते- याचा अन्व-य- यत्तदग्रे- या श्लोकानें सात्त्विक सुखाचें लक्षण सांगितलें अशी कोणी व्या-ख्या करतात असें तात्पर्य. ॥ ३७॥

## विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ॥ परि-णामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥

आतां राजस सुख सांगतात.- विषयेंद्रिय संयोगात् जातं यत्- म्हणजे जें विषय आणि इंद्रियांचे संयोगानें उत्पन्न होतें असें जें अतिप्रसिद्ध स्त्री, चंदन, पुष्पमालादिक विषयांच्या आणि इंद्रियांच्या संबंधा पासून उत्पन्न होणारें- अग्रे अमृतोपमं- म्हणजे मनाचा निग्रह करणें इत्यादिक क्लेश नसल्यामुळें आरंभीं-मात्र अमृता प्रमाणें गोड परंतु- परिणामे विषमिव- म्हणजे शेवटीं विषय वियो-ग किंवा नाश अवश्य होणारा आहे यामुळें ऐहिक किंवा पारलौकिक दुःख देणा-ऱ्या विषया प्रमाणेंच आहे, असें जें सुख- तत्सुखं राजसं प्रोक्तं- म्हणजे तें रा-जस सुख असें योग्यांनीं म्हटलें आहे. ॥ ३८॥

## यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः ॥ निद्रा-लस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

आतां तामस सुख सांगतात.- यत् अग्रे च अनुबंधे आत्मनः मोहनं- म्हणजे आरंभीं आणि परिणामीं आत्म्यास मोह करणारें आणि- निद्रालस्य प्र-मादोत्थं- म्हणजे निद्रा, आलस्य आणि प्रमाद म्हणजे कर्तव्याचा निश्चय न हो-तां केवल मनोराज्य मात्र त्या पासून उत्पन्न होतें. सात्त्विक सुखा प्रमाणें बुद्धीचे प्रमादा पासून उत्पन्न होत नाहीं आणि राजस सुखा प्रमाणें विषयेंद्रिय संयोगा

पासून उत्पन्न होत नाहीं असें जें सुख तें तामस सुख असें यांम्यांनीं म्हटलें-आहे असें तात्पर्य. ॥ ३९॥

**न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः॥ सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः॥ ४०॥**

आतां न सांगितलेल्याचा संग्रह करून भगवान् प्रकरणाची समाप्ति करतात. - प्रकृतिजैः एभिः त्रिभिः गुणैः मुक्तं - म्हणजे सत्त्वादिक गुणांची जी साम्यावस्था ती प्रकृति ती पासून उत्पन्न झालेले म्हणजे विषमावस्थेप्रत पावले जे हे तीन सत्त्व, रज, तमोगुण. प्रकृति गुणत्रय रूपच आहे यामुळें गुण प्रकृती पासून उत्पन्न झाले असा मुख्यार्थ संभवत नाहीं यास्तव गुणाची विषमावस्था उत्पन्न होते यावरून त्या अवस्थेनें युक्त गुण प्रकृती पासून उत्पन्न होतात. असा गौण-अर्थ येथें केला अथवा प्रकृति म्हणजे माया ती पासून झालेले म्हणजे त्यामायेनें कल्पिलेले जे हे बंध करणारे तीन सत्त्व, रज, तमोगुण यांनीं मुक्त म्हणजे गुणत्रय रहित - यत् स्यात् तत् - म्हणजे जें होईल असें तें - सत्त्वं - म्हणजे प्राणि किंवा अप्राणि असें अनात्म वस्तु - पृथिव्यां वा दिवि पुनः देवेषु नास्ति - म्हणजे पृथ्वीचे ठायीं मनुष्यादिकांत आणि स्वर्गाचे ठायीं आणि देवादिकांत कोठेंही नाहीं असें तात्पर्य. ॥ ४०॥

**ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप॥ कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः॥ ४१॥**

या प्रमाणें सत्त्वरजतमोगुणात्मक क्रिया कारक फलरूप संसार सर्वही मिथ्या अज्ञानें करून कल्पिलेला अनर्थास हेतू आहे म्हणून चतुर्दशाध्यायांत सांगितलेल्याचे निरूपणाची समाप्ति केली. पंचदशाध्यायाचे ठायीं त्या संसारास वृक्षरूपाची कल्पना करून तो वृक्षरूपानें वर्णन-" अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्वा॥ ततः पदं तत् परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्तंति भूयः॥ " - या श्लोकानें विषय वैराग्यरूप दृढ असंग शस्त्रानें त्या संसार वृक्षाचा छेद करून परमात्म्याचा शोध करावा असें सांगितलें. सर्व त्रिगुणात्मक असलें तरी त्रिगुणात्मक वृक्षाचा छेद कसा होईल असंग शस्त्राचा असंभवच-आहे, अशी शंका आली तर तिचें निराकरण करण्यासाठीं आपापले अधिकारा प्रमाणें शास्त्रविहित जे वर्णाश्रमधर्म त्यांचे अनुष्ठानानें संतोषाप्रत पावविलेला जो परमेश्वर त्याचे प्रसादा पासून असंग शस्त्राचा लाभ होतो असें सांगण्या साठीं इतकाच वेदार्थ आहे. त्याचें अनुष्ठान परम पुरुषार्थ जो मोक्ष त्याची इच्छा करणारा-

नीं करावें असें सांगून गीता शास्त्रार्थाची समाप्ति करावी. या साठीं पुढील ग्रंथाचा आरंभ करतात. त्या विषयीं हा श्लोक सूत्रभूत सांगतात. हे परंतप, ब्राह्मणां क्षत्रिय विशां– हे शत्रूंस तापदेणाऱ्या अर्जुना, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्राणां– म्हणजे शूद्र या वर्णांचीं कर्मणि म्हणजे पुढें सांगावयाचीं कर्में, स्वभाव प्रभवैः गुणैः विभक्तानि म्हणजे ब्राह्मण्यादिक स्वभाव प्राप्त होण्यास कारण भूत जे सत्वादिक गुण त्यांहीं करून परस्पर विभागानें म्हणजे ब्राह्मणांचें हें कर्म, क्षत्रियांचें हें कर्म, वैश्यांचें हें कर्म, शूद्रांचें हें कर्म अशा व्यवस्थेनें युक्त आहेत. तें असें– ब्राह्मण स्वभावाला शांतत्वास्तव सत्वगुणच कारण आहे, क्षत्रिय स्वभावाला प्रभुत्व शक्तित्वास्तव किंवा शासन शक्तित्वास्तव सत्वगुण अंगभूत आहे ज्यास असा रजोगुण तोच हेतु आहे. वैश्य स्वभाला इच्छास्वभावत्वास्तव तमोगुण आहे. अंग भूत ज्याला असा रजोगुणच कारण आहे. शूद्र स्वभावास मूढत्वास्तव रजोगुण आहे अंगभूत ज्याला असा तमोगुणच कारण आहे येथें-ब्राह्मण क्षत्रियविशां– या एका समास युक्त पदांत ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य या तिघांचें ग्रहण जें केलें तें तिघांस द्विजत्वामुळें वेदाध्ययनादिक धर्म तुल्य आहेत असें सूचविण्या करितां केलें. शूद्राचें पृथक् निराळ्या पदानें जें ग्रहण केलें तें शूद्रास एक जातित्वामुळें वेदाध्ययनाचा अधिकार नाहीं असें सूचन करण्या करितां केलें यास प्रमाण– ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण त्यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे तीन वर्ण द्विजाति– म्हणजे त्यांचें माते पासून एक जन्म होतें आणि दुसरें मौंजी बंधनानें होतें. दुसरें जें जन्म होतें त्यास माता सावित्री म्हणजे गायत्री आहे– आणि पिता गायत्रीचा उपदेश करणारा आचार्य आहे. परमेश्वरानें गायत्री छंदानें ब्राह्मणाची उत्पत्ति केली, त्रिष्टुप् छंदानें क्षत्रियांची उत्पत्ति केली, जगती छंदानें वैश्यांची उत्पत्ति केली, शूद्रांची कोणतेही छंदानें उत्पत्ति केली नाहीं यास्तव शूद्रांस संस्कार नाहीं. शूद्र चवथा वर्ण एक जाति आहे. अशा अर्थाच्या वसिष्ठ गौतमादिकांच्या स्मृति आणि द्विजाति पदांचा अर्थ सांगणारें निरुक्त आहे. अथवा स्वभाव प्रभवैः गुणैः कर्माणि प्रविभक्तानि– यांची दुसरी व्याख्या अशी आहे. स्वभाव म्हणजे मायाख्य प्रकृतिरूप उपादान कारण त्या पासून आहे प्रभव म्हणजे उत्पत्ति ज्यांची किंवा प्राक् जन्मीं केलेले कर्मांचा जो याजन्मीं फल देण्या साठीं अभिव्यक्त झालेला संस्कार तो स्वभाव तो आहे ज्याचे उत्पत्तीस निमित्त कारण असे जे गुण त्यांनीं ब्राह्मणादिक चार वर्णांची कर्में प्रविभक्त आहेत असा पूर्वोक्तच अर्थ. कर्मांची पूर्वोक्त व्यवस्था करणारें शास्त्र ही व्यवस्था करण्यास स्वभावाची अपेक्षा करतें– यास्तव शास्त्रानें व्यवस्था केलेलीं कर्में हीं गुणांनीं व्यवस्था केलेलीं असें म्ह-

रखें अर्थ बोधन करणारे जे शब्द त्यांस अर्थ बोधन करण्यास अधिकारी शक्ति सहकारी आहे असा न्याय याविषयीं प्रमाण आहे. ती व्यवस्था कशी शास्त्रांत केली आहे तिचें ज्ञान होण्यासाठीं संक्षेपानें येथें लिहितों. गौतमस्मृतींत द्विजातींस म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तीन वर्णांस वेदाध्ययन करणें, यज्ञ करणें, दान करणें, हीं तीन कर्में ब्राह्मणास अध्यापन करणें म्हणजे पढविणें, याजन म्हणजे दुसऱ्याचे यज्ञांत ऋत्विक् होऊन त्यापासून यज्ञ करविणें, प्रतिग्रह करणें म्हणजे दान घेणें हीं तीन कर्में क्षत्रिय वैश्यापेक्षां अधिक आहेत. या सहां कर्मांतील पहिलीं अध्ययन यज्ञ दान हीं तीन कर्में ब्राह्मणानीं अवश्य केलीं पाहिजेत. अध्यापन याजन प्रतिग्रह हीं तीन कर्में ब्राह्मणांस उपजीवनार्थ आहेत; हीं केलींच पाहिजेत असा नियम नाहीं. क्षत्रियांस प्रजेचें किंवा सर्व भूतांचें रक्षण करणें आणि यथान्याय दंड करणें हें ब्राह्मण वैश्यापेक्षां अधिक कर्म आहे. वैश्यांस कृषिकर्म करणें, वाणिज्य म्हणजे धन वृद्धीसाठीं व्यापार करणें, पशूंचें पालन करणें हें ब्राह्मण क्षत्रियांपेक्षां अधिक कर्म आहे, चवथा वर्ण शूद्र तो एकजाति त्यास सत्य, अक्रोध, शौच, आचमन करण्यासाठीं हस्तपादाचें मात्र प्रक्षालन, श्राद्धकर्म भृत्याचें भरण म्हणजे पोषण करणें आपले विवाहित स्त्रीशीं रत असणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यातीन वर्णांची सेवा करणें हें साधारण आणि असाधारण धर्म असें सांगितलें आहे. वसिष्ठस्मृतींत हीं याप्रमाणेंच ब्राह्मणास वेदाध्ययनादिक साहा कर्में, क्षत्रिय वैश्यांस प्रथम तीन कर्में ब्राह्मणांस अध्यापनादिक पुढील तीन कर्में उपजीवनार्थ आहेत क्षत्रियास शस्त्रानें प्रजापालन करून जीवन करणें वैश्यांस कृषि वाणिज्य पशु पालन करून जीवन करणें. शूद्रांस ब्राह्मणादिक तीन वर्णांची सेवा करणें अशी कर्मांची व्यवस्था सांगितली आहे. आपस्तंबस्मृतींत ही ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण यांत पहिला पहिल्या जन्में करूनच दुसऱ्यापेक्षां श्रेष्ठ आहे वेदाध्ययनादिक साहा कर्में ब्राह्मणाचीं, क्षत्रियांचीं अध्यापनादिक तीन सोडून वेदाध्ययनादिक तीन आणि दंड, युद्धादिक हीं कर्में, वैश्यास दंड युद्धादिक सोडून वेदाध्ययनादिक तीन कर्में आणि कृषि गायी आदिक पशूंचें रक्षण आणि वाणिज्य हीं कर्में, ब्राह्मणादिक तीन वर्णांची सेवा करणें हें शूद्राचें कर्म असें सांगितलें आहे याप्रमाणेंच मनुस्मृति आदिकांत सांगितलें आहे. ॥४१॥

शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ॥
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥४२॥

आतां ब्राह्मणाचीं स्वाभाविक गुणांकृन कर्मे सांगतात. शमः- अंतः-करणाचा उपरम, दमः- बाह्येंद्रियांचा उपरम, तपः- " देव, द्विज, गुरु, प्राज्ञ" इत्यादिक श्लोकांनीं सांगितलेलें शारीरादिक तप, शौच- बाह्य आंतर असें दोन प्रकारचें पूर्वी सांगितलेंच आहे, क्षांति- क्षमा पूर्वी सांगितलेली, आर्जवं- कुटिल भाव नसणें, ज्ञानं- सांग वेदार्थाचें ज्ञान, विज्ञान- कर्मकांडाचे ठायीं यज्ञादिकांचे अनुष्ठाना विषयींचें कुशलत्व, ब्रह्म,कांडाचे ठायीं ब्रह्मात्मैक्यानुभव, आस्तिक्यं- सात्विकी श्रद्धा, हे शमादिक नऊ, ब्रह्मकर्म,स्वभावजं- सत्वगुणाचे स्वभावानें केलेलें ब्राह्मण जातीचें कर्म, जरी हे नऊ शमादिक धर्म चार वर्णांसही सात्विकावस्थेचे ठायीं संभवतात तथापि बहुत करून हे धर्म ब्राह्मण जातीचे ठायीं असतात. कारण ब्राह्मणांचा सत्व स्वभाव आहे म्हणून सत्वाचा- उद्रेक म्हणजे सत्वगुण जेव्हां वृद्धीप्रत पावतो तेव्हां दुसरे वर्णाचे ठायीं ही हे संभवतात परंतु कदाचित् संभवतात. याच तात्पर्यानें शास्त्रांतराचे ठायीं हे धर्म साधारण आहेत. असें सांगितलें आहे. ते असें- विष्णुस्मृतींत- " क्षमा सत्यं दमः शौचं दानमिंद्रिय संयमः ॥ अहिंसा गुरु शुश्रूषा तीर्थानु सरणं दया ॥ आर्जवं लोभशून्यत्वं देव ब्राह्मण पूजनं॥ अनभ्य सूयान्य तथा धर्मः सामान्य उच्यते ॥"- हे धर्म सामान्य म्हणजे चारी वर्णांचे प्रायः चार आश्रमांचे साधारण आहेत असें सांगितलें- आहे. बृहस्पतिस्मृतींत ही- " दयाक्षमानसूयाच शौचा नायास मंगलं॥ अकार्पण्य मस्पृहत्वं सर्व साधारणानिच ॥" येणें करून दयादिक सर्व साधारण धर्म असें सांगितलें आहे. या दयादिकांचीं लक्षणें सांगितलीं आहेत तीं येथें लिहितों. पर किंवा बंधु वर्ग किंवा मित्र किंवा द्वेष करणारा आपत्तीनें युक्त झाला असतां त्याचें रक्षण करणें यास दया असें म्हणतात. बाह्य किंवा आध्यात्मिक (देह मना पासून होणारें) दुःख उत्पन्न झालें असतां कोप करीत नाहीं किंवा मारीत नाहीं तीस क्षमा असें म्हणतात. जो गुणी आहे त्याचे गुणांचा अपलाप करीत नाहीं अल्प गुणी असला तरी त्याचे गुणाची स्तुति करतो दुसऱ्याचे दोषाकडे प्रीति नाहीं तिला अनसूया म्हणतात. अभक्ष्यांचें भक्षण न करणें. जे निर्गुण आहेत त्यांशीं संसर्ग न करणें- स्वधर्माचे ठायीं राहणें यास शौच असें म्हणतात. जें चांगलें आहे परंतु ज्याचे अनुष्ठानानें शरीरास फार पीडा होते त्या कर्माचें अनुष्ठान न करणें त्यास अनायास म्हणतात. जें प्रशस्त असेल त्याचें आचरण करणें, जें प्रशस्त नसेल त्याचें वर्जन करणें त्यास तत्वदर्शी मुनींनीं मंगल असें म्हटलें आहे. आपलेपाशीं स्वल्प जरी असलें तरी दीनाचें मनन करून त्यांतून ही कांहीं थोडेंसें तरी प्रत्यहीं दान करणें यास अकार्पण्य म्हणतात. जें मिळेल त्या वस्तूनीं संतोष पावणें आणि दुसऱ्याचे अर्थावर इच्छा न ठेवणें त्यास अस्पृहा म्हणावें. हेच आठ आत्म्याचे गुण असें गौतम-

स्मृतींत सांगितलें आहे. महाभारतांत ही-"सत्यं दमः तपः शौचं संतोषो न्हीः क्षमार्जवं ॥ ज्ञानं शमोदया ध्यान मेषधर्मः सनातनः ॥"-सर्व भूतांचें हित करणें त्यास सत्य म्हणावें. मनाचा निग्रह करणें त्यास दम म्हणावें. स्वधर्म करण्यास तत्पर असणें यास तप म्हणावें. संकर न करणें त्यास शौच म्हणावें. विषयांचा त्याग करणें यास संतोष म्हणावें. अधर्मापासून निवृत्त होणें त्यास न्हीः असें म्हणावें. शीतोष्णादिक द्वंद्वांचें सहन करणें यास क्षमा म्हणावें. समचित्तता असणें त्यास आर्जव म्हणावें. तत्वार्थाचा उत्तम जो बोध त्यास ज्ञान म्हणावें. चित्ताची जी शांति तीस शम म्हणावें. भूतांचें हित करण्याची जी इच्छा तीस दया म्हणावें. मन निर्विषय करणें यास ध्यान म्हणावें. देवलस्मृतींत ही-"शौचं दानं तपः श्रद्धा गुरुसेवा दयाक्षमा ॥ विज्ञानं विनयः सत्यं मिति धर्म समुच्चयः" व्रत उपवास नियमानीं शरीरास ताप करणें तें तप. धर्म कार्याचे ठायीं जी बुद्धि ती श्रद्धा. ज्यास श्रद्धा नाहीं त्याचें कर्म निष्फळ आहे. लोकांतील किंवा वेदशास्त्रांतील सकळ विद्यांचें धारण करणें तें विज्ञान. निरंतर जे शम आणि दम यांस विनय असें म्हटलें आहे. याज्ञवल्क्य स्मृतींत ही-इज्या-म्हणजे यज्ञ. आचार-दम-अहिंसा-दान-वेदाध्ययन या कर्मामध्यें योगाभ्यासानें आत्म साक्षात्कार होणें हा उत्कृष्ट धर्म आहे. ही सर्व दैवी संपत्ति ब्राह्मणास स्वाभाविक आणि दुसऱ्यांस नैमित्तिक आहे यास्तव विरोध नाहीं. ॥ ४२ ॥

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धेचाप्यपलायनम् ॥**
**दानमीश्वर भावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥**
**कृषिगोरक्ष्य वाणिज्यं वैश्य कर्म स्वभावजम् ॥**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥**

शौर्य-म्हणजे जे फार बलिष्ठ आहेत त्यांस ही मारण्याची प्रवृत्ति जीस विक्रम असें ही म्हणतात. तेजः-म्हणजे दुसऱ्याचे कडून अवमान होऊं नये अशी प्रगल्भता. धृतिः-म्हणजे मोठी विपत्ति प्राप्त झाली तरी शरीर इंद्रियें यांचें पतन न होण्याचा प्रयत्न. दाक्ष्यं-म्हणजे अकस्मात् उपस्थित झालेल्या कार्याचे ठायीं व्यामोह न होतां प्रवृत्ति होणें. युद्धेच अपलायनं-म्हणजे युद्धाचे ठायीं पराङ्मुख न होणें. दानं-म्हणजे संकोचन करतां द्रव्याचें दान करणें. ईश्वरभावः-म्हणजे प्रजापालन करण्यासाठीं ज्यांचें नियमन करावयाचें आहे त्या विषयींची प्रभुशक्ति. क्षात्रं-कर्म स्वभावजं-म्हणजे हे क्षत्रिय जातीस विहित कर्म पूर्वोक्त क्षत्रिय स्वभावापासून उत्पन्न होणारें आहे. अन्न किंवा धान्य उत्पन्न होण्यासाठीं भूमि नांगरणें, पेरणें इत्यादिक कर्म कृषि. गायी आदिक पशूंचें पालन हें गोरक्ष्यं. वाणिज्यं-म्हण-

जें द्रव्य ग्रहण्यर्थ व्यापार करणें, क्रयविक्रयादिक करणें, हें वैश्य जातीचें पूर्वोक्त वैश्य स्वभावा पासून होणारें कर्म आहे.- परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्य स्वभाजनं- म्हणजे ब्राह्मणादिक तीन वर्णांची सेवा करणें हें शूद्रजातीचें पूर्वोक्त शूद्रस्वभावा पासून उत्पन्न होणारें कर्म आहे. या प्रमाणे हे चार वर्णांचे गौण म्हणजे सत्वादिक गुणासुळें होणारे धर्म सांगितले. याशिवाय ही यांचे दुसरे धर्मशास्त्रांत सांगितले आहेत. भविष्यपुराणांत— श्रेय म्हणजे कल्याणास साधन आणि पापाला उत्पन्न करणारा जो त्यास धर्म म्हणावें. तो अभ्युदय फल आहे. म्हणजे- स्वर्गादिलोकीं सुखानुभव होण्यास साधन आहे. त्या धर्मास मूल वेद आहे, आणि तो शाश्वत आहे. वर्णधर्म१ आश्रमधर्म२ वर्णाश्रमधर्म३ गौणधर्म४ नैमित्तिक धर्म ५ या भेदानीं तो धर्म पांच प्रकारचा आहे. एका वर्णाल मात्राचा आश्रय करून जो धर्म प्रवृत्त होतो तो वर्ण धर्म जसें उपनयन, जो आश्रमाचा आश्रय करून धर्म प्रवृत्त होतो तो आश्रम धर्म जसा भिक्षा, मेखला, दंडधारण इत्यादि वर्ण आणि- आश्रम या दोहोंचे आश्रयानें जो धर्म प्रवृत्त होतो तो वर्णाश्रमधर्म जसा मौंजी- मेखला म्हणजे मुंज या नावाच्या तृणाची मेखला ब्राह्मणास बांधावी धनुर्ज्या- क्षत्रियांस बांधावी- मौर्वी वैश्यांस बांधावी- ब्राह्मणास वेळूचा किंवा पलाशाचा (पळसाचा), क्षत्रियांस वडाचा किंवा खदिराचा (खैराचा), वैश्यांस पिंपळाचा किंवा उंबराचा दंड, ब्राह्मणास एण मृगाचें, क्षत्रियांस रुरु मृगाचें, वैश्यांस बोकडाचें अजिन म्हणजे चर्म इत्यादिक ज्या गुणाचें योगानें प्रवृत्त होतो तो गौण धर्म जसा जो मूर्धाभिषिक्त आहे म्हणजे ज्यास राज्याभिषेक झाला आहे- त्या गुणानें त्याणें प्रजापालन करणें हा धर्म, पापरूप निमित्त झाल्यामुळें जें प्रायश्चित्त करणें हा नैमित्तिक धर्म. महाभारतांत-" अनृशंस्य महिंसाच प्रमादः संविभागिता॥ श्राद्ध कर्मातिथेयंच सत्यम क्रोध एवच॥ स्वेषु दारेषु संतोषः शौचं नित्या नुसूयता॥ आत्मज्ञानं तितिक्षाच धर्मः साधारणो नृप॥" असा हा सर्व ब्राह्मणादिक चार वर्णांचा साधारण धर्म सांगितला आहे. ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यास असे हे चार आश्रम यांचे साधारण धर्म पूर्वी भविष्य पुराणांत सांगितलेले लिहिलेच आहेत आणि प्रत्येक वर्णाचे आणि आश्रमांचे असाधारण धर्म षोडशाध्यायांत-" अभयं सत्व संशुद्धिः "- यास आरंभ करून- नातिमानिता- येथ पर्यंत अडीच श्लोकानीं सांगितलेच आहेत. त्यांचे सविस्तरें करून व्याख्यान त्या श्लोकांचे व्याख्यानांत केलेंच आहे. वसिष्ठ, आपस्तंब, गौतम, मनु आदिकांचे स्मृतींत ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, परिव्राजक म्हणजे संन्यासी हे चार आश्रम त्यां मध्यें ब्रह्मचारिव्रताचा त्याग न करतां एक वेद किंवा दोन वेद किंवा बहुत वेदांचें अध्ययन करून नंतर दुसऱ्या ज्या आश्रमांत जाण्याची इच्छा असेल त्या आ-

श्रमाचा स्वीकार करावा. असें सांगून चारी आश्रमांचे पृथक् पृथक् पूर्वोक्तच धर्म सांगितले आहेत आणि हारितादिक स्मृतींत नैष्ठिक ब्रह्मचारी असा एक ब्रह्मचाऱ्यांत भेद सांगितला आहे. तसाच यायावर म्हणून एक गृहस्थाश्रमांत भेद सांगितला आहे. तसाच अनुज्ञापिक म्हणून एक वानप्रस्थाश्रमांत भेद सांगितला आहे. तसाच चातुराश्रम्यसिद्ध म्हणून एक संन्यासाश्रमांत भेद सांगितला आहे आणि त्या विशेष आश्रमांचे विशेष धर्म ही सांगितले आहेत. आणि पूर्वोक्त वर्णाश्रमोचित सांगितलेले धर्मानुष्ठानांचीं फलें ही स्मृतींत सांगितलीं आहेत त्याचा संक्षेप लिहितों. श्रुति आणि स्मृति यांत सांगितलेले धर्माचें अनुष्ठान करणारा मनुष्य या लोकीं कीर्तीप्रत पावतो आणि मरणोत्तर उत्कृष्ट सुखाप्रत पावतो असें मनुस्मृतींत सांगितलें आहे. सर्व वर्णांस स्वधर्मानुष्ठानानें अपरिमित उत्कृष्ट सुख स्वर्गलोकीं होतें तें भोगल्यावर तेथून शेष कर्मानें या लोकीं जन्म होऊन त्यांत जाति, रूप, वर्ण, बल, वृत्त, मेधा, प्रज्ञा, द्रव्यें, धर्मानुष्ठान हीं फलें प्राप्त होतात. असें आपस्तंब स्मृतींत सांगितलें आहे. वर्ण आणि आश्रम स्वकर्मनिष्ठ होत्सातां मरणानंतर कर्मफलाचा अनुभव स्वर्गलोकीं करून नंतर शेष कर्मानें चांगले देशीं, चांगले जातींत, चांगले कुळांत चांगलें रूप, चांगलें आयुष्य, चांगलें अध्ययन, चांगलें आचरण, चांगलें वित्त म्हणजे द्रव्य, चांगलें सुख, चांगली मेधा ज्यांस आहे अशा जन्मास येतात. जे विष्वंच म्हणजे स्वधर्मानुष्ठान सोडून यथेष्ट व्यापार करणारे पूर्वोक्ताहून विपरीत ते नरकाचे ठायीं कृमिकीटादिकांचे जन्मास येऊन सर्व पुरुषार्थापासून भ्रष्ट होतात. असें गौतम स्मृतींत सांगितलें आहे. ब्रह्मसूत्रांत तृतीयाध्यायाचे ठायीं प्रथम पादांत श्रीवेदव्यासानीं प्राणोपाधिक जीव मरणानंतर या लोकीं केलेले कर्माचें फलोपभोगासाठीं परलोकीं गमन करते वेळेस परलोकीं उपभोगासाठीं उत्पन्न होणाऱ्या शरीरास बीजभूत जीं भूत सूक्ष्में तीहीं करून वेष्टित होऊन गमन करतो असें सांगून स्वर्गास कर्मफलोपभोगासाठीं गेलेला जीव स्वर्गफलार्थ केलेले कर्मांचा फलोपभोग करून ब्रह्मवर्चस कामानें सूर्य देवतो द्देशें करून चरूनें होम करावा. ज्यांस पशूंची इच्छा आहे त्यांणीं चित्रा यागाचे इष्टीनें यजन करावें. अशीं जीं प्रत्येक फलें या लोकचीं प्राप्त व्हावीं यासाठीं केलेलीं शुभ कर्में त्यांचे फलांच्या उपभोगासाठीं या लोकीं ब्राह्मण किंवा मनुष्य असें जन्म पावतात. तसेंच नरकप्रद दुष्ट कर्म करणारे यमाचे लोकीं जाऊन नरकादिक यातनांचा अनुभव करून ब्रह्महत्यादिक जीं नाना कीट पशू आदिक योनींत जन्म होण्यास साधनभूत कर्में त्यांचे फलोपभोगासाठीं या लोकीं त्या त्या योनींत जन्मास येतात असें प्रतिपादन केलें आहे. तीं कर्में पूर्वोक्त स्मृतींतील शेष शब्दानें घ्यावीं. कोणी काम्य जीं यज्ञ,

दान, तपें यानीं स्वर्गादिक लोकांप्रत पावून पुनः या लोकीं जन्मास येतात. जें काम्य कर्मानें रहित सत्य, यज्ञ, दानाहीं करून युक्त ते अक्षय लोकांप्रत जातात असा कामना आणि तिचा अभाव यामुळें फल भेद हारीत स्मृतींत सांगितला आहे. भविष्य पुराणांत फला शिवाय ही नित्य कर्माचें अनुष्ठान स्पष्ट आहे. काम्य कर्माचें अनुष्ठान इष्टस्वर्गादि फला साठीं किंवा या लोकचे उपद्रवादिक दोष निराकरणा साठीं आहे. नैमित्तिक कर्माचें अनुष्ठान त्रिविधफला साठीं आहे. कोणी त्याचें फल झालेले पापाचा क्षय असें म्हणतात. कोणी न केलें असतां जो प्रत्यवाय म्हणजे पाप होतें त्याची उत्पत्ति न होणें हें त्याचें फल असें मानतात. कोणी नित्य कर्मा सारखेंच निष्फल आहे परंतु जसा आम्र वृक्ष फला साठीं लाविला असतां ही छाया आणि गंध आनुषंगिक फलें होतात त्याप्रमाणें त्याचें आनुषंगिक फल स्वर्गादिक असें म्हणतात, असें सांगितलें आहे. श्रुतींत तीन धर्म स्कंध असें सांगून गृहस्थ, वानप्रस्थ, ब्रह्मचारी हीं त्यांचीं स्वरूपें असें प्रतिपादन करून हे तीन स्वधर्म निरत असतां पुण्यलोकांस जातात असें ज्ञाना पूर्वीं त्यांचे धर्मानुष्ठानाचें फल सांगून तेंच धर्मानुष्ठानानें शुद्धांतःकरण होऊन संन्यासाश्रम घेऊन वेदांत श्रवणादिकें करून ब्रह्मनिष्ठ होत्साते अमृतत्वाप्रत म्हणजे मोक्षाप्रत पावतात. असें सांगितलें आहे.॥४३॥४४॥

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः॥-**
**स्वकर्म निरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु॥४५॥**

या प्रमाणें ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, जो मुमुक्षु आहे तो फलाचा उद्देश न करतां भगवदर्पण बुद्धीनें - स्वे स्वे कर्मणि अभिरतः - म्हणजे आपापले वर्णास किंवा आश्रमास शास्त्रविहित जें कर्म त्याचे अनुष्ठानाचे ठायीं जो तत्पर-तो - संसिद्धिं लभते - म्हणजे देहेंद्रिय समुदायाची जी अशुद्धता तिची निवृत्ति होऊन उत्तम जें ब्रह्मात्मतत्त्व ज्ञान तें उत्पन्न होण्याचे योग्यतेला पावतो. - नरः स्वकर्म निरतः सन् सिद्धिं यथाविंदति - म्हणजे वर्णाश्रमाभिमानी मनुष्य कर्मबंधक असतां ही आपले वर्णाश्रम विहित कर्माचे ठायीं तत्पर मनुष्य पुढें सांगावयाची-जी सिद्धि तीप्रत जसा पावतो - तत् शृणु - म्हणजे तें माझे वाक्यें करून निश्चित करून घे. देवादिकांस वर्णाश्रमाभिमान नाहीं, यामुळें वर्णाश्रमाभिमान युक्त जे मनुष्य त्यांचे उद्देशानें प्रवृत्त झालेल्या कर्म कांडात्मक वेदोक्त कर्मानुष्ठाना विषयीं त्यांस अधिकार नाहीं. उपासना कांडोक्त उपासना करण्या विषयीं वर्णाश्रमाभिमानाची अपेक्षा नाहीं यास्तव त्या अभिमानानें रहित देवादिकांस उपासना विषयींचा अधिकार आहे असा ब्रह्मसूत्रांत देवताधिकरणीं वेदव्यासानीं निर्णय के-

ला आहे. त्या अभिप्रायानें येथें स्वकर्मनिरत मनुष्य असें म्हटलें. ॥४५॥

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ॥ स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ॥४६॥**

यतः प्रवृत्तिः भूतानां – म्हणजे उत्पन्न होणारीं भूतें ज्यापासून उत्पन्न होतात आणि आनंदापासूनच सर्व भूतें उत्पन्न होतात या अर्थाच्या श्रुतीचे प्रमाणावरून आणि प्रकृतीस माया म्हणावें आणि मायी म्हणजे मायोपाधिक जो त्यास परमेश्वर म्हणावें या अर्थाच्या श्रुतीचे प्रमाणावरून उत्पन्न होणाऱ्या आकाशादिक सर्व भूतांची मायामय उत्पत्ति ज्या मायोपाधिक चैतन्य घनानंदात्मक सर्व शक्तियुक्त उपादान आणि निमित्त कारणभूत सर्वांतर्यामि परमेश्वरापासून होते आणि – येन सर्वं इदं ततं – म्हणजे उत्पन्न झालेलीं भूतें ज्या सद्रूप चिद्रूप ब्रह्मसत्तेनें – अस्ति भाति – अशा व्यवहारात्मक स्थितीप्रत पावतात आणि लय पावत असतां कल्पित स्थूल नामरूपें टाकून प्रलयकालीं ज्याचे स्वरूपाचेच ठायीं लय पावतात म्हणजे तद्रूपानेंच राहतात. असें जें कल्पित सर्व जगाचें अधिष्ठानभूत ब्रह्म त्याचा स्वात्मत्वें करून विचार कर. अशा अर्थाच्या श्रुतिप्रमाणावरून ज्या सद्रूप चिद्रूप परमेश्वर सत्तेनें हे सर्व दृश्य जग तिन्हीं कालीं व्याप्त झालें आहे म्हणजे ज्या परमेश्वर सत्तेनेंच स्थित आहे त्यावांचून याची पृथक् सत्ता नाहीं. जशी रज्जूवर भासलेल्या सर्पाची रज्जू शिवाय दुसरी सत्ता कालत्रयीं नाहीं त्याप्रमाणें – स्वकर्मणा तं अभ्यर्च्य – म्हणजे त्या परमेश्वराप्रत आपले वर्णाश्रम विहित कर्माचरणानें संतुष्ट करून – मानवः सिद्धिं विंदति – म्हणजे कर्माधिकारी मनुष्य त्या भगवंताचे प्रसादें करून ब्रह्मात्मैक्य ज्ञान होण्यास योग्यता येणें अशा अंतःकरण शुद्धि स्वरूप सिद्धीप्रत पावतो. देवादिक उपासनेचे योगानेंच सिद्धीप्रत पावतात असें तात्पर्य. ॥४६॥

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ॥ स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥४७॥**

ज्या कारणास्तव स्वधर्माचरणच मनुष्यांस भगवत्प्रसाद होण्यास कारण आहे. यास्तव – स्वनुष्ठितात् परधर्मात् – म्हणजे उत्तम प्रकारें करून म्हणजे सर्वांगांचे अनुष्ठानानें आचरण केलेले परधर्मापेक्षां – विगुणः स्वधर्मः श्रेयान् – म्हणजे कांहीं अंगानुष्ठान वैगुण्य होऊन आचरण केलेला ही स्वधर्म श्रेयस्कर आहे. यास्तव तूं क्षत्रिय आहेस यामुळें युद्धात्मक स्वधर्मानुष्ठानच करावें परधर्म भिक्षाटनादिक करूं नये असें तात्पर्य. – जर स्वधर्मास्तव युद्ध करावें तर बंधुवधानें पाप लागेल अशा शंकेचें निवारण करतात – स्वभावनियतं कर्म कुर्वन् किल्बिषं नाप्नोति –

म्हणजे पूर्वोक्त जो- शमोदमः तपः शौचं- शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्य- इत्यादिक स्वभाव त्यापासून उत्पन्न होणारें कर्म करणारा पापास प्राप्त नाहीं. शास्त्रविधिविहित ज्योतिष्टोमांग भूत पशु हिंसानिमित्तक जसें पाप नाहीं त्याप्रमाणें क्षत्रियास शास्त्रविहित युद्धांतील बंधुवधनिमित्तक पाप नाहीं असें तात्पर्य. ॥ ४७ ॥

## सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ॥ सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥

त्या कारणास्तव शास्त्रविहित हिंसादिकांस पापसाधनत्व नाहीं; आणि परधर्म हा भयप्रद आहे; आणि कोणतेंही कर्म केलें तरी त्याचे ठायीं सामान्य कांहीं तरी दोष आहेच यास्तव हे कौंतेय हे अर्जुना, - सदोषं अपि सहजं कर्म न त्यजेत् - म्हणजे आपले शास्त्रविहित स्वभावज कर्म ज्योतिष्टोम युद्धादिक हिंसादि दोषयुक्त असलें तरी तें अंतःकरण शुद्धी पूर्वी वर्णाश्रमाभिमानें युक्त अज्ञान्यानीं टाकूं नये - हि सर्वारंभाः धूमेन अग्निरिव दोषेण आवृताः - म्हणजे ज्याकारणास्तव जो आत्मवेत्ता नव्हे तो क्षण मात्र ही कर्म केल्याशिवाय राहण्यास समर्थ नाहीं आणि परधर्मानुष्ठानानें पापापासून युक्त होत नाहीं कारण अग्नि जसा आपले बरोबर उत्पन्न झालेल्या धूमानें आवृत आहे त्याप्रमाणें सर्व स्वधर्म किंवा परधर्म त्रिगुणात्मक त्यास्तव सामान्य दोषानें आवृत आहेतच यास्तव विषांतील कीट विषास जसा न सोडून विषांतच राहतो त्याप्रमाणें - अगत्या म्हणजे जो आत्मज्ञ नाहीं त्याणीं हिंसादि दोषयुक्त जरी आपलें सहज कर्म असलें तरी सर्व कर्म त्यागास आपलें सामर्थ्य नाहीं या कारणामुळें त्याचा त्याग करूं नये. जो ज्ञानी सर्व कर्मत्याग करण्यास समर्थ आहे त्याणें त्याचा त्याग करावा असा अभिप्राय. ॥ ४८ ॥

## असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ॥ नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥

ब्रह्मात्म वस्तूच नित्य सत्य आहे अनात्म वस्तु सर्व मिथ्या अनित्य आहे. अशा नित्यानित्य वस्तु विवेकानें ज्यास या लोकचे उपभोगां विषयीं आणि परलोकचे उपभोगा विषयीं वैराग्य झालें आहे आणि कर्मानुष्ठानानें चित्ताचा मल जाऊन शमदमादि साधन संपन्न होऊन शुद्ध ब्रह्मात्मैक्य साक्षात्काराची इच्छा ज्यास झाली आहे असा जो गुरूपसत्ती करून (गुरूस शरण जाऊन) त्या पाशीं वेदांत वाक्य विचार समर्थ मुमुक्षु ज्याचे उद्देशानें वेदांत विचारात्मक - अथातो ब्रह्मजिज्ञासा - इत्यादिक चतुराध्यायी रूप ब्रह्म मिमांसा प्रवृत्त झाली आहे तोच सर्व कर्मत्याग समर्थ आहे. त्याणें आपलें इष्ट जें ब्रह्मात्मैक्य ज्ञान तत्साधन भूत वेदांत-

वाक्य विचार करण्यास विक्षेप करणार कर्मांच्या निवृत्ति साठीं श्रवणांगभूत कर्म संन्यास करावा असें श्रुति स्मृतींत सांगितलें आहे. त्याचें स्वरूप सांगतात. सर्वत्र-असक्त बुद्धिः-म्हणजे स्त्री पुत्रादिक जे आसक्ति करण्यास योग्य पदार्थ त्यासर्वांचे ठायीं हें माझें आणि मी यांचा अशी ज्याची बुद्धि सक्त नाहीं. कारण-जितात्मा-म्हणजे विषयां पासून आवरून वश ज्यांणें मन केलें आहे असा आणि-विगतस्पृहः-म्हणजे विषया कडे मन जाण्यास कारण भूत विषयेच्छा ज्याची गेली आहे. अथवा देह भोगी व जीवित या विषयीं ही जो निरिच्छ अथवा सर्व दृश्य पदार्थाचे ठायीं नश्वरत्व मिथ्यात्व रूप दोष दृष्टीनें आणि नित्य बोधानंद रूप मोक्ष सुखरूप आत्म दर्शनें करून जो सर्वत्र विरक्त आणि-" स्वकर्मणा तमभ्यर्च्य-" या-श्लोकांत सांगितलेल्या ज्ञान निष्ठा योग्यता रूप सिद्धीप्रत पावलेला जो तो-संन्यासेन-म्हणजे शिखा यज्ञोपवीतादि सर्व कर्म त्यागें करून म्हणजे तत्पूर्वक वेदांत विचार करून.-परमां-म्हणजे कर्मा पासून उत्पन्न होणारी जी चित्त शुद्धि द्वारा ज्ञान योग्यता रूप अपर सिद्धि तिची फलभूत जी-नैष्कर्म्य सिद्धि-म्हणजे निष्कर्म म्हणजे कर्म रहित जें ब्रह्मात्म तत्त्व तद्विषयक जें वेदांत वाक्य जन्य-ज्ञान तें नैष्कर्म्य तद्रूप सिद्धि तीप्रत-अधिगच्छति-म्हणजे साधन परिपाकानें पावतो. अथवा-संन्यासेन-म्हणजे " कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ॥ संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्विको मतः-" या श्लोकांत सांगितलेला सात्विक कर्म फल त्यागरूप संन्यास तेथें करून-सर्वत्र असक्त बुद्धिः-इत्यादिक सांगितलेले अर्थाच्या विशेषणानीं युक्त होऊन-परमां-पूर्वोक्त अमुख्य त्यागापेक्षां श्रेष्ठ अशी जी-नैष्कर्म्यसिद्धि-स्वरूपतः कर्म त्यागरूप सिद्धि जीस पारम हंस्य म्हणतात.-अशा ब्रह्मात्म तत्त्वज्ञान होण्यास योग्यता येणें एतद्रूप सिद्धीप्रत पावतो. ॥ ४९ ॥

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाऽऽप्नोति निबोध मे ॥**
**समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥**

" स्वकर्म निरतः सिद्धिं यथा विंदति तत् शृणु "-येणें करून जें सांगण्याची प्रतिज्ञा केली होती तें सांगून पूर्वोक्त साधन संपन्न सर्व कर्म संन्याशास ब्रह्मात्म ज्ञान होण्यास साधन क्रम सांगण्याची प्रतिज्ञा करतात.-हे कौंतेय सिद्धिं प्राप्तः-म्हणजे स्वकर्मानुष्ठानानें ईश्वराचे आराधनानें झालेल्या ईश्वर प्रसादा पासून स्वकर्म त्याग पर्यंत ज्ञानोत्पत्ति योग्यता रूप अंतःकरण शुद्धीप्रत पावलेला.-यथा ब्रह्म प्राप्नोति-म्हणजे ज्याकारणानें शुद्ध ब्रह्मात्म्याप्रत साक्षात्कारात्मक ज्ञानानें अनुभवितो.-तथा समासेन मे निबोध-म्हणजे त्या प्रकाराप्रत त्याचें अनुष्ठान करण्यासाठीं संक्षेपानें माझे वाक्यानें निश्चित कर किंवा जाण, तो प्रकार जाणल्यानें काय होतें-

तें सांगतात. निष्ठा ज्ञानस्य यापरा - म्हणजे जी ज्ञाननिष्ठा प्राप्त झाल्यानंतर दुसऱ्या साधनानुष्ठानाची अपेक्षा नाहीं अशी मोक्षास साक्षात् साधनभूत जी पूर्वोक्तसिद्धि प्रत पावलेल्याची ब्रह्मप्राप्ती रूप वेदांतविचार जन्य उत्कृष्ट ज्ञाननिष्ठा तीप्रत ही संक्षेपानें, माझे वाक्यानें, निश्चयात्मक ज्ञानानें जाण. ॥ ५० ॥

## बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्यच ॥
## शब्दादीन् विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्यच ॥ ५१ ॥

तीच ब्रह्मप्राप्तिरूप ज्ञाननिष्ठा प्रकारा करून सांगतात. - विशुद्धया युक्तः - म्हणजे संशय विपर्यय असंभावनादि दोष रहित अशीजी वेदांत विचारजन्य मी ब्रह्मच आहें अशी अंतःकरण वृत्ति रूप बुद्धि तिणें करून युक्त होत्साता - धृत्या आत्मानं नियम्यच - म्हणजे धैर्यें करून देहेंद्रिय संघात रूप आत्याप्रत विपरीत मार्गाचरणा पासून निवारणानें आत्मचिंतन परायण करून च शब्दानें योग शास्त्रोक्त चित्तैकाग्र्य साधन संपन्न होऊन - शब्दादीन् विषयान् त्यक्त्वा - म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंधादिक जे भोग द्वारा प्रतिबंधक विषय त्यांप्रत सकून म्हणजे शब्दादिक विषयां पासून श्रोत्रादिक इंद्रियांस आवरून किंवा फिरवून - रागद्वेषौ व्युदस्यच - म्हणजे शरीर निर्वाहार्थ अवश्य पाहिजेत अशा विषयांचे ठायीं ही लाभानें जी प्रीति आणि लाभ न झाल्यानें जो द्वेष त्यांप्रत टाकून चकारें करून याशिवाय ज्ञानास जें प्रतिबंधक असेल त्याचा त्याग करून - ब्रह्मभूयाय कल्पते - असा पुढें अन्वय आहे. ॥ ५१ ॥

## विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ॥
## ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥

कोणते साधनानें ब्रह्मभावरूप मोक्ष प्राप्त होण्यास योग्य होतो तें सांगतात. जो - विविक्तसेवी - म्हणजे चित्तविक्षेप करणार जनसंमर्द रहित पवित्र जें अरण्य गिरि गुहादिक त्यांचे ठायीं वास करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा, आणि - लघ्वाशी - म्हणजे निद्रा व आलस्यादिक न यावीं या साठीं परिमित आणि हितकारक आणि शुद्ध असें जें आहारादिक तें करण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा आणि यतवाक्कायमानसः - म्हणजे स्वाधीन आहेत वाणी, शरीर, मन ज्यास असा यम, नियम, आसन प्राणायामादिक योगांगानीं युक्त - ध्यान योगपरः नित्यं - म्हणजे मंत्र जप तीर्थ यात्रा तत्पर न सतां निरंतर आत्माकार अंतःकरण वृत्ति प्रवाह रूप ध्यान आणि अंतःकरणास वृत्तिरहित करणें असा योग तत्पर - वैराग्यं समुपाश्रितः - म्हणजे दृष्ट किंवा अदृष्ट विषयांचे ठायीं स्पृहा होण्या-

स विरोधी जो अंतःकरण वृत्ति विशेष त्याचा आश्रय केलेला म्हणजे तेणें करून निरंतर युक्त असें तात्पर्य आहे. ॥५२॥

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ॥ विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥**

अहंकारं- म्हणजे मी मोठ्या कुलांत उत्पन्न झालों आहें माझे सारखा दुसरा कोणी नाहीं असा अभिमान.- बलं- म्हणजे असत्पक्षा विषयींचा आग्रह. येथें बल शब्दानें शरीर बल घेता येत नाहीं कारण तें स्वाभाविक आहे यामुळें त्याचा त्याग करण्यास अशक्य आहे. दर्प- म्हणजे धर्माचें अतिक्रमण करण्यास कारण भूत मद. यास प्रमाण- जो हृष्ट आणि दर्प युक्त आहे तो धर्माचा अतिक्रम करतो अशी स्मृति आहे. कामं- म्हणजे विषयाभिलाष- वैराग्यं समुपाश्रितः- येणें करून कामत्याग सांगितला आहे तथापि पुनः त्याचा त्याग करावा असें जें सांगितलें तें काम त्यागाविषयीं मोठा यत्न करावा असें सूचविण्या करितां क्रोधं- म्हणजे द्वेष- परिग्रहं- म्हणजे स्वतः निःस्पृह असतां ही दुसऱ्यानें दिलेलीं जीं शरीर धारणोपयोगी उपसाधनें तीं यांप्रत- विमुच्य- म्हणजे टाकून शिखायज्ञोपवीतादिकांप्रत ही टाकून, शास्त्रोक्त दंड कमंडलु कौपीनाच्छादनादिक, शरीर निर्वाह मात्रोपयोगी जें आहे. त्याचें मात्र ग्रहण करून परम हंस परिव्राजक होऊन- निर्मम- म्हणजे जें देह निर्वाहोपयोगी दंड कमंडलु आदिक त्यांचे ठायीं ही माझीं- अशी ममत्व बुद्धि ज्याची गेली आहे असा अहंकार गेल्यामुळें हर्षविषाद नसून शांत चित्त विक्षेप रहित जो यति तो ज्ञान साधनाचे परिपाकानें- ब्रह्मभूयाय कल्पते- म्हणजे ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन ब्रह्मस्वरूपानें स्थिति होणें अशा मोक्ष प्राप्तीस योग्य होतो. ॥५३॥

**ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ॥ समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते परां ॥ ५४ ॥**

त्या विषयीं क्रम सांगतात.- ब्रह्मभूतः- म्हणजे श्रवण मननादिकाचे अभ्यासानें मी ब्रह्मच आहें अशा दृढनिश्चयानें युक्त आणि- प्रसन्नात्मा- म्हणजे शमदमादिकांच्या अभ्यासानें शुद्धचित्त याच कारणास्तव- न शोचति न कांक्षति- म्हणजे नष्ट झालेल्याचा शोक करीत नाहीं आणि प्राप्त न झालेल्याची इच्छा करीत नाहीं याच कारणास्तव रागद्वेष नसल्यामुळें- सर्वेषु भूतेषु समः- म्हणजे आपल्या प्रमाणें सर्वत्र सुखदुःख पाहणारा या प्रकारचा ज्ञाननिष्ठ- मद्भक्तिं लभते परां- म्हणजे मी जो शुद्धात्मस्वरूप परमेश्वर त्याचेठायीं जी उत्पन्न झाल्यानंतर दुसरे-

साधनाची अपेक्षा नसतां ब्रह्मात्म साक्षात्कार च होतो अशी जी मदाकार चित्त वृत्ति रूप उपासना श्रवण मनन फलभूत जीस परिपक्व निदध्यासन म्हणतात अशा भक्तीप्रत पावतो अथवा-"चतुर्विधा भजंते मां"- या श्लोकांत सांगितलेल्या चार भक्तींतील शेवटची जी ज्ञाननिष्ठा लक्षण भक्ति तीप्रत पावतो.॥५४॥

भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्व-तः॥ ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरं॥५५

तदनंतर - भक्त्या मां यावान् अस्मि यश्चास्मि तत् तत्त्वतः जानाति-म्हणजे निदध्यासनात्मक अथवा ज्ञाननिष्ठा लक्षण भक्ति करून मी परमेश्वर विभु नित्य परिपूर्ण सत्य ज्ञानानंद घन सर्वदा सर्वोपाधि रहित अखंडैकरस अद्वितीय प्रत्यगात्म स्वरूप आहे असें-तत्त्वतः म्हणजे साक्षात्कारात्मक ज्ञानानें मजप्रत जाणतो- ततः मां तत्त्वतो ज्ञात्वा - म्हणजे या प्रमाणें अखंडानंदाद्वितीय ब्रह्म मीच आहें असें मजप्रत साक्षात्कारात्मक ज्ञानानें जाणून तदनंतर-विशते म्हणजे ज्ञानानें अज्ञान आणि त्याचे कार्यांची निवृत्ति होऊन बलवत् प्रारब्ध योगानें देहपात झाल्यानंतर सर्वोपाधि रहित स्वरूपानें ब्रह्मरूपच होतो ज्ञानानंतर असा अर्थ झाला येथील त्या प्रत्ययानें च होतो यास्तव देहपाता नंतर असा येथें अर्थ आहे. येणें करून तत्त्व ज्ञान्यास विदेह कैवल्य प्राप्त होण्यास प्रारब्ध कर्मफलोपभोगानें जों पर्यंत देहपात झाला नाहीं तितकाच विलंब आहे देहपात झाल्यानंतर विदेह कैवल्य रूप मोक्षाप्रत पावतो अशा अर्थाच्या श्रुतीचा अर्थ येथें भगवंतांनीं सांगितला. ज्ञान अज्ञानास विरोधि आहे, यास्तव दीपानें जसा तमाचा नाश होतो त्या प्रमाणें ज्ञानानें अज्ञानाचा सर्वांशरूप नाश होतो तथापि प्रारब्ध कर्म भोग होऊन देहपात होई तों पर्यंत अज्ञान कार्य देहाहंकारादिक बाधितानुवृत्तीनें राहतें यास दृष्टांत- दशमाचे अज्ञानानें मृत झाला असा भ्रम होऊन जें शिर ताडन कृत व्रणादिक झालें तें दशम मी अशा आप्ताच्या उद्देशानें साक्षात्कारात्मक ज्ञान होऊन दशमा ज्ञान नाश झाला तरी तत्काल शांत होत नाहीं. पुढें औषध लेपानें हळू हळू शांत होतें. किंवा रज्जूचे अज्ञानानें भ्रमांत भासलेला सर्प पाहून जी हृदयांत धडकी बसते देह कंप होतो त्यांची रज्जूचे साक्षात्कारानें रज्जूचे अज्ञानाची आणि सर्प भ्रांतीची निवृत्ति झाली तरी तत्काल शांति न होतां नंतर कांहीं कालानें होते किंवा तार्किक मतीं उपादान कारणाचा नाश कार्याचे नाशास कारण आहे तो झाल्या नंतरं कार्य नाश होतो तें कार्य उपादान कारणा शिवाय एकक्षण पर्यंत उपादान नाश झाल्या नंतर जसें राहतें- यास्तव जों पर्यंत प्रतिबंधक आहे तों पर्यंत विरोधी उत्पन्न झाले तरी नाश होत

नाहीं. ज्ञानानें अज्ञान नाश झाला तरी तत्कार्य देहाहंकारादिकांचे नाशास-प्रारब्ध कर्म प्रतिबंधक आहे असें श्रुतीचे प्रमाणावरून आणि अनुभवावरून सिद्ध आहे, मुक्त झालेला मुक्त होतो. देहपाताचे अंतीं विश्वमायेची निवृत्ति पुनः होते. अशा अर्थाच्या श्रुति, आणि पूर्वोक्त श्रुति, आणि ज्ञान्याचा ज्ञानोत्तर तत्काल देहपात न होतां कांहीं काल पर्यंत पुढें ही राहतो. असा अनुभव सर्व संमत आहे, आणि ज्ञानोत्तर तत्काल देहपात होण्यास शिष्य सेवकादिकांचें अदृष्ट ही प्रतिबंधक आहे यास्तव ज्ञानानें झालेला अज्ञान नाशच पूर्वोक्त प्रतिबंधकांचा प्रारब्ध कर्म फलोपभोगानें नाश झाला म्हणजे देहांतःकरणादिक जें अज्ञानाचें कार्य त्याचा नाश करतो त्या साठीं पुनः ज्ञानाची अपेक्षा नाहीं. यास प्रमाण- "तीर्थे श्वपच गृहे वा नष्टस्मृतिरपि परित्यजन् देहं ॥ ज्ञान समकालमुक्तः कैवल्यं याति हत शोकः-" तीर्थाचे ठायीं अथवा चंडाल गृहाचे ठायीं स्मृति नष्ट झालेला ही देह त्याग करून शोकरहित होत्साता कैवल्य मोक्षाप्रत पावतो असें वाक्य आहे.॥५५॥

**सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ॥ मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६॥**

जो आत्मज्ञ नाहीं, आणि अंतःकरण शुद्धि न झाल्यामुळें कर्म करण्यासच अधिकारी आहे त्याणें कर्मत्याग करूं नये. जो शुद्धांतःकरण आहे तो कर्मसंन्यास करून नैष्कर्म्य सिद्धीप्रत पावतो असें सांगितलें. संन्यास करण्यास ब्राह्मणासच अधिकार आहे क्षत्रिय वैश्यांस अधिकार नाहीं असें तृतीयाध्यायांत "कर्मणैव हि संसिद्धि मास्थिता जनकादयः" येणें करून सांगितलें आहे. असें असतां जो क्षत्रिय शुद्धांतःकरण आहे त्याणें कर्मानुष्ठान करावें किंवा कर्मसंन्यास करावा. जर कर्मानुष्ठान करावें तर-" आरुरुक्षोर्मुने र्योगं कर्म कारणमुच्यते " योगारूढस्य तस्यैव शमः कारण मुच्यते-" येणें करून ज्याची अंतःकरण शुद्धि झाली आहे त्यास कर्मानुष्ठानाचा निषेध सांगितला आहे. जर कर्मसंन्यास करावा तर-"स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः-" येणें करून ब्राह्मणाचा जो धर्म संन्यास त्याचा क्षत्रियास निषेध सांगितला आहे, कर्मानुष्ठान किंवा कर्म संन्यास याहून तिसरा प्रकार तर नाहींच तेव्हां शुद्धांतःकरण क्षत्रियांस दोहोंतील एका निषेधाचें उल्लंघन करणें अगतीस्तव आवश्यक आहे त्यांत कर्म संन्यास ज्ञानास साधन आहे, आणि कर्मत्यागानें बंधुवधादिक होणार नाहींत यास्तव तोच श्रेयस्कर आपणास आहे. कर्मानुष्ठान चित्त विक्षेपास कारण असल्यामुळें ज्ञानास प्रतिबंधक आहे, आणि त्यांत बंधुवधादिक होतील यास्तव तें श्रेयस्कर नाहीं असा अर्जुनाचा अभिप्राय जाणून भगवान् बोलतात. जो क-

र्मानुष्ठानानें शुद्धांतःकरण आहे तो भगवदेकशरणता पर्यंत अंतःकरण शुद्धीचे स्वरूप आहे यास्तव भगवदेकशरणच आहे असा जो संन्यास प्रतिबंध रहित ब्राह्मण तो सर्व कर्मांचा संन्यास करो,परंतु त्याचा संसार विमोक्ष भगवत्प्रसादापासून च होतो असा क्षत्रियादिक-" सर्व कर्माण्यपि सदा कुर्वाणः-" म्हणजे सर्व कर्मानुष्ठान करणारा ही आहे आणि-मद्व्यपाश्रयः-म्हणजे मीच भगवान् वासुदेव आहें विशेषें करून आश्रय म्हणजे शरण ज्यास असा मदेकशरण झालेला सर्व भावांचें मला अर्पण केलेला संन्यासानधिकारास्तव सर्व वर्णाश्रम धर्मरूप किंवा लौकिक भोजन गमनादिक तशींच निषिद्ध सर्व कर्मानुष्ठान करणारा-मत्प्रसादात्-म्हणजे माझ्या परमेश्वराच्या प्रसादें करून-शाश्वतं अव्ययं पदं अवाप्नोति-म्हणजे ज्ञानोत्पत्ति होऊन हिरण्यगर्भा प्रमाणें शाश्वत नित्य परिणाम रहित वैष्णवपदाप्रत पावतो. असा भगवदेकशरण जो आहे तो निषिद्ध कर्माचरण करीतच नाहीं. जरी करील तथापि माझे प्रसादें करून त्यास त्यापासून प्रत्यवाय उत्पन्न न होतां तो माझ्या ज्ञानें करून मोक्ष भागी होतो अशी भगवदेकशरण तेची स्तुति करण्या साठीं-सर्व कर्मानुष्ठान करणाराही आहे असें म्हटलें. अथवा जसे काडी किंवा कापूस अग्नींत पडलेलें दग्ध होतें त्याप्रमाणें या ज्ञान्याचे सर्व पापपुण्य रूप धर्म दाह पावतात असा अर्थाच्या श्रुतीचे प्रमाणावरून प्रायश्चित्तानें जसा पूर्वीचे पापाचा नाश होतो त्या प्रमाणें ज्ञानानें पूर्व संचित सर्व कर्मांचा दाह होईल परंतु ज्ञानोत्तर जें कर्म त्याचा नाश झाल्यामुळें ज्ञानोत्तर देह धारण आहे त्या कारणानें झालेले स्वाभाविक कर्मानें ज्ञान्यास ही बंध होईल अशा शंकेच्या निराकरणार्थ हा श्लोक प्रवृत्त झाला. मीजो प्रज्ञानयन प्रत्यगात्मा तोच आहें, आश्रय ज्यास असा ज्ञानी विहित किंवा निषिद्ध सर्व करीत असतांही माझे अनुग्रहानें नित्य मोक्षाप्रत पावतो. ज्ञानोत्तर केलेले कर्मांनीं बंध पावत नाहीं. कमलपत्रास जसा उदकाचा लेप होत नाहीं त्याप्रमाणें ज्ञान्यांस पुण्यपाप लेप होत नाहीं. त्यांचीं शुभ कर्मे त्यांचे सुहृदां कडे जातात. अशुभ कर्मे त्यांच्या द्वेष्यांकडे जातात. असा ज्ञानोत्तर झालेल्या ज्ञान्याच्या कर्मांचा ज्ञान्यांस लेप होत नाहीं किंवा त्यांचें फल त्यांचे मित्र आणि शत्रू यांस होतें असा विनियोग श्रुतींत केला आहे.॥५६॥

**चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः॥ बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव॥ ५७॥-**

या प्रमाणें वर्णाश्रम धर्मानुष्ठान पूर्वक साधना सहित फलासहित ब्रह्मविद्येचें निरूपण करून भगवत्प्राप्ती साठीं साधनभूत भक्तियोगाला पुनः सांगतात. ज्या कारणास्तव मोक्षास साधन मला शरण होणें अशी मदेकशरणता-

च आहे कर्मानुष्ठान किंवा संन्यास नाहीं या कारणास्तव क्षत्रिय जाती तूं-चेतसा सर्व कर्माणि मयि संन्यस्य-म्हणजे विवेक बुद्धीनें दृष्टादृष्टार्थ फल साधनभूत सर्वकर्मांचें-"यत्करोषि यदश्नासि"-या श्लोकांत सांगितल्या प्रमाणें मीजो ईश्वर याचे गयीं अर्पण करून-मत्परः-म्हणजे मी भगवान् वासुदेवच आहें प्रियज्यास असा होत्साता,-बुद्धियोगं उपाश्रित्य सततं मच्चित्तः भव-म्हणजे कर्माचरणास मोक्ष हेतुत्व संपादन करणारा जो-"सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा-" येणें करून सांगितलेला बुद्धियोग त्याचा आश्रय करून सर्वदा माझेच गयीं आहे चित्त ज्याचें राज्य किंवा स्त्री पुत्रादिकांचे गयीं नाहीं असा मदेक शरण हो.॥५७॥

**मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ॥ अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥**

असा तूं-मच्चित्तः-मदेक शरण झालास म्हणजे-मत्प्रसादात् सर्व दुर्गाणि तरिष्यसि-म्हणजे माझे प्रसादानें काम क्रोधादिक अथवा आध्यात्मिकाधिभौतिक आधि दैविक जीं संसार दुःख साधन भूत दुस्तर संकटें त्यांपन तूं आपला आयास न करतां तरशील-अथ चेत् त्वं अहंकारात् न श्रोष्यसि-म्हणजे जर तूं माझे बोलण्यावर विश्वास न करून मी पंडित आहें अशा गर्वानें मी बोलल्या-अर्थाचें श्रवण न करशील म्हणजे अनुष्ठान न करशील, आणि आपले इच्छे प्रमाणें संन्यासच करशील तर-विनंक्ष्यसि-म्हणजे आपले पुरुषार्थापासून भ्रष्ट होशील असें तात्पर्य. ॥५८॥

**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ॥ मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥**

यत् अहंकारं आश्रित्य नयोत्स्ये इति मन्यसे-म्हणजे जर धार्मिक मी क्रूर कर्म करणार नाहीं अशा मिथ्या अभिमानाचा आश्रय करून मी युद्ध करणार नाहीं असें तूं मानशील तर-मिथ्या एषः व्यवसायः ते-म्हणजे हा तुझा निश्चय निष्फल होईल-प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति-म्हणजे कारण क्षत्रिय जातीय शरीरास उत्पन्न करणारा रजो गुणात्मक तुझा स्वभाव युद्ध करण्या विषयीं तुझी प्रेरणा करील असें तात्पर्य. ॥५९॥

**स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ॥ कर्तुं नेच्छसि यन्मोहात् करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥**

प्रकृतीचेंच व्याख्यान करतात. हे कौंतेय-हे कुंती पुत्रा अर्जुना,-स्वभा-

वजेन स्वेन कर्मणा निबद्धस्त्वं- म्हणजे पूर्वोक्त क्षत्रिय स्वभावापासून उत्पन्न- झालेल्या शौर्य तेजादिक कर्मानें वश केलेला तूं- यत् मोहात् कर्तुं नेच्छसि- म्हणजें बंधु वध होईल यामुळें ज्या युद्धादिकाप्रत मी स्वतंत्र आहें. जसें इच्छीन तसें- करीन अशा भ्रमानें करण्यास इच्छितोस- अवशोपि तत्करिष्यसि- म्हणजे न इच्छिणारा ही तूं कर्म परतंत्र आहेस; आणि ईश्वर परतंत्र आहेस यामुळें तें करशीलच असें तात्पर्य- ॥६०॥

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ॥ भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ६१ ॥

स्वभाव परतंत्रता सांगून ईश्वर परतंत्रता सांगतात.- हे अर्जुन ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशे तिष्ठति- म्हणजे हे अर्जुना, जो पृथिवी आदिकांचे ठायीं राहतो. पृथिव्यादिकांचा अंतरात्मा ज्यास पृथिव्यादिक जाणत नाहींत. पृथिव्यादिक ज्याचें शरीर आहे अशा अर्थाच्या अंतर्यामि ब्राह्मणांत आणि जें कांहीं हें दृश्य जग पाहण्यांत किंवा ऐकण्यांत येतें त्या सर्वांच्या आंत आणि बाहेर व्यापून नारायण स्थित आहे अशा अर्थाच्या नारायणोपनिषदांतील श्रुतींत आणि सर्व भूतांचे ठायीं एक देव म्हणजे प्रकाशस्वरूप परमात्मा गूढ म्हणजे सूक्ष्म जें आंतर्यामि स्वरूप तेणें करून राहिलेला आहे. तो सर्व जगांत कारण भूत सद्रूपानें व्याप्त आहे. आणि तो सर्व भूतांचा अंतरात्मा आणि कर्माध्यक्ष म्हणजे सर्व जीवांच्या कर्मांचा प्रवर्तक आणि फल देणारा आणि सर्वभूतांचे ठायीं अंतर्यामि स्वरूपानें राहत असतां सर्व जीवांच्या शुभाशुभ कर्मांचा केवल द्रष्टा म्हणजे साक्षी आणि त्या कर्म फलानें किंवा कर्मानें अलिप्त, असंग निर्गुण असा आहे अशा अर्थाच्या श्वेताश्वतरोपनिषदांत सर्वांतर्यामी, सर्व प्रेरक सर्वांचें नियमन करणारा, सर्वशक्ति असा परमेश्वर सांगितला आहे तो सर्व प्राण्यांच्या हृदय देशाचे ठायीं म्हणजे बुद्धीचे ठायीं स्थित आहे. सर्वव्यापक असतां ही त्या स्थळीं अभिव्यक्त होतो या कारणावरून हृदय देशाचे ठायीं राहतो असें म्हटलें, जसा श्रीराम सर्व सप्तद्वीपवती पृथिवीचा अधिपती असतां ही अयोध्येचे ठायीं त्याचें दर्शन आहे यामुळें त्यास अयोध्याधिपति असें लोक म्हणतात. त्याप्रमाणें अर्जुन या संबोधनानें तूं शुद्धांतःकरण आहेस यामुळें अशा परमेश्वरास जाणण्यास- योग्य आहेस असें सूचविलें. ईश्वर सर्व प्राण्यांचे हृदय देशीं काय करीत असतां राहतो तें सांगतात- मायया सर्वभूतानि भ्रामयन्- म्हणजे परतंत्र सर्व- प्राण्यांप्रत आपली शक्तिरूप जी माया तिचे योगानें प्रवृत्ति निवृत्ति रूप किंवा विहित निषिद्ध रूप कर्मांचे ठायीं भ्रमवित असतां म्हणजे प्रवृत्त करवीत अस-

नां राहतो. यास दृष्टांत सांगतात. – यंत्रारूढानीव – म्हणजे जसा मायावी पुरुष सूत्र संचार रूप यंत्रावर बसविलेल्या काष्ठ निर्मित स्त्री पुरुषादि रूप कृत्रिम बाहुल्यांप्रत आपले माया शक्तीनें नाचवितो त्याप्रमाणें अथवा देहादि स्वरूप जो पंजर तद्रूप यंत्रांचे ठायीं जीं आरूढ म्हणजे देहादिक मीच आहें किंवा माझें आहे अशा अभिमानाप्रत धारण करणारीं भूतें म्हणजे प्राणी त्यांप्रत शास्त्र विहित किंवा प्रतिषिद्ध कर्मांचे ठायीं प्रवृत्त करीत होत्साता अंतर्यामी जो मायोपाधिक परमेश्वर तो आपले शक्ति स्वरूप मायेच्या योगानें सर्व भूत शब्दानें सांगितलेले जे हृदय स्थित विज्ञान मय स्वरूप जीव त्यांचे रूपानें विकार पावतो म्हणजे तद्रूप होतो. तर ईश्वरच मायाशक्तीनें विज्ञान मय शब्द वाच्य जीव स्वरूपानें परिणाम पावून विहित निषिद्ध कर्मांचे ठायीं जीवांस प्रवृत्त करतो तर कोणतें ही कर्म करण्याचा जो प्रयत्न जीव करतात. तो व्यर्थ होईल अशी शंका करूंनये. आपले शक्तीनें परमेश्वर जसा विज्ञानमय स्वरूपानें विकार पावतो त्या प्रमाणें त्या त्या कर्मांचे ठायीं जो पुरुष प्रयत्न होतो तद्रूपानें ही परमेश्वरच माया शक्तीनें विकार पावतो असें आहे तर ईश्वर सर्व प्राण्यांस त्या त्या कर्मांचे ठायीं प्रवर्तवितो, भ्रमवितो असें अंतर्यामि ब्राह्मणादिकांत आणि या श्लोकांत आणि– "जानामि धर्मं नचमे प्रवृत्तिः॥ जानाम्यधर्मं नचमे निवृत्तिः – केनापिदेवेन हृदि स्थितेन यथा नियुक्तो – स्मि तथा करोमि –" मी धर्माप्रत जाणतों परंतु माझी त्याविषयीं प्रवृत्ति होत नाहीं मी अधर्माप्रत जाणतों परंतु त्यापासून माझी निवृत्ति होत नाहीं. हृदयाचे ठायीं स्थित जो कोणी देव तो जशी मला प्रेरणा करतो त्या प्रमाणें मी करतों अशा स्मृतींत कर्ता, भोक्ता असा जो भ्रम झाला आहे तो – सर्व करविणारा ईश्वरच आहे. कर्तृत्वादिका विषयीं आपलें स्वातंत्र्य नाहीं आपलें स्वरूप असंग आहे अशा दृढ बोधानें जावा हेंच आहे. आत्मा संगत्व बोधानें मोक्षफल होतें असें बहुल श्रुति स्मृतींत सांगितलें आहे यास्तव आत्मा संगत्व ज्ञान सफल आहे यास्तव तें जीवास अवश्य झालेंच पाहिजे. ॥ ६१॥

**तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत॥ तत्प्रसादात् परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम्॥ ६२॥**

हे भारत – तमेव सर्व भावेन शरणं गच्छ – म्हणजे हे भरत कुलोत्पन्ना अर्जुना, – मनानें, वाणीनें, कर्मानें सर्वात्मना त्या परमेश्वराप्रतच संसारोद्धरणासाठीं शरण जा म्हणजे त्याचाच आश्रय कर. – तत् प्रसादात् – म्हणजे तत्वज्ञानोत्पत्ति पर्यंत जो त्या परमेश्वराचा प्रसाद म्हणजे अनुग्रह तेणें करून – परां शांतिं शाश्वतं स्थानं च प्राप्स्यसि – म्हणजे कार्यासह अविद्येची जी निवृत्ति आणि अ-

द्वितीय स्वप्रकाश परमानंद रूपानें स्थिति होणें अशा नित्य मोक्षरूप स्थानाप्रत तूं पावशील. ॥ ६२॥

## इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ॥ विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३॥

सर्व गीतार्थाचा उपसंहार करून सांगतात- इति ते गुह्यात् गुह्यतरं ज्ञानं मया आख्यातं- म्हणजे याप्रकारानें माझा अतिप्रिय जो तूं यास सर्व रहस्यभूत जे मंत्र तंत्र रसायनादिकाहून ही रहस्य असें अथवा कर्म योग कर्मसंन्यास रूप जें रहस्य त्यापेक्षां ही त्यांचें फलभूत मोक्ष साधन आत्मविषयक ज्ञान सर्वज्ञ परम आप्त जो मी यापें सांगितलें - एतत् अशेषेण विमृश्य- म्हणजे या मी सांगितलेल्या गीता शास्त्र प्रतिपाद्यार्थाच्या साकल्यें करून किंवा पूर्वापर सर्व शास्त्रार्थाच्या एकवाक्यतेनें विचार करून - यथेच्छसि तथा कुरु - म्हणजे आपले अधिकाराप्रमाणें जसें करण्यास इच्छिशील तसें कर. ॥ ६३॥

## सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ॥ इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४॥

या गीता शास्त्रांत येथ पर्यंत अशुद्धांतःकरण मुमुक्षूंस मोक्ष साधन- ज्ञानोत्पत्ति योग्यता येण्यास प्रतिबंधक पापादिकांचे नाशार्थ फलाभिसंधि परित्याग करून भगवदर्पण बुद्धीनें वर्णाश्रम विहित धर्मानुष्ठान आवश्यक आहे त्या अनुष्ठानानें अंतःकरणशुद्धी होऊन विविदिषा उत्पन्न झाल्यानंतर ब्राह्मणानें गुरूस शरण जाऊन ज्ञान साधन वेदांत विचारार्थ सर्व कर्म संन्यास करावा. नंतर भगवदेक शरण होऊन ज्ञान साधन भूतविविक्त देश सेवित्वादिकाचा अभ्यास करावा नंतर वेदांत श्रवणादिक करावें म्हणजे त्यापासून ब्रह्मात्म साक्षात्कार होऊन सर्वानर्थ कारक अज्ञानाच्या कार्यासह नाशानें मोक्ष होतो संन्यासानधिकारी मुमुक्षु क्षत्रियांनीं अंतःकरण शुद्धी झाल्यानंतर ही भगवदाज्ञा पालन करण्या साठीं किंवा लोकसंग्रहा साठीं भगवदेक शरण होऊन कर्में करावीं म्हणजे त्यास पूर्व जन्म कृत संन्यास परिपाकानें किंवा हिरण्यगर्भास संन्यासा वांचून भगवत्प्रसादें करून जसें ज्ञान उत्पन्न झालें त्या प्रमाणें ज्ञान उत्पन्न होऊन अथवा पुढील जन्मीं ब्राह्मण जन्म येऊन संन्यास पूर्वक ज्ञान उत्पन्न होऊन मोक्ष होतो इतका शास्त्रार्थ सांगितला. या अति गंभीर शास्त्रार्थाचें साकल्यें करून पर्यालोचन करण्यास बहु क्लेश आहेत तो न व्हावा या साठीं कृपाळु भगवान् स्वतांच आपण गीता शास्त्रार्थाचा सारांश सांगतात- सर्व गुह्यतमं मे परमं वचः भूयः शृणु

म्हणजे पूर्वीं गुह्य जो कर्म योग सांगितला त्यापेक्षां ही गुह्य ज्ञान सांगितलें. आतां कर्म योग; आणि तत्फल भूत ज्ञानापेक्षां ही फार गुह्य पूर्वीं सांगितलेलें ही तुझ्यावर अनुग्रह करण्यासाठीं मी पुनः सांगतों त्या उत्कृष्ट माझ्या वाक्याप्रत ऐक. मी-तुला सांगतों तें आपले लाभासाठीं किंवा पूजे साठीं किंवा ख्याती साठीं सांगतों असें नाहीं तर-इष्टोसि मे दृढमिति-म्हणजे तूं मला फार प्रिय आहेस याकारणास्तव तूं प्रश्न केला नाहींस तथापि-ततः ते हितं वक्ष्यामि-म्हणजे तुझें श्रेयस्कर वाक्य मी बोलतों. अथवा मीझें तुझें हित बोलतों तें सर्व प्रमाणानें दृढ आहे. कोणी दृढमति असा पाठ कल्पून तुझा माझेवर दृढनिश्चय आहे यास्तव तुझें हित मी बोलतों असा अर्थ करतात. ॥ ६४॥

## मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ॥ मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५॥

तेंच सांगतात-मन्मना भव-म्हणजे मी जो वासुदेव त्याचे ठायींच आहे मन ज्याचें असा तूं हो. म्हणजे सर्वदा माझेंच चिंतन कर. कंस शिशुपालानें ही मन द्वेषानें तुझे ठायीं होतें तसें असावें कीं काय असें म्हणेल तर सांगतात.-मद्भक्तः-म्हणजे माझे ठायीं प्रेमानें अनुरक्त हो. प्रेमानें माझे ठायीं सर्वदा मनन कर. तुझे विषयीं अनुराग कसा होईल असें म्हणेल तर त्याचें साधन सांगतात.-मद्याजीभव-म्हणजे माझें यजन म्हणजे पूजनादिक करण्याचा स्वभाव ज्याचा आहे असा सर्वदा मत्पूजा तत्पर हो. जर पूजा सामग्री नसेल तर-मां नमस्कुरु-म्हणजे कायानें, मनानें, वाणीनें, नम्रभावानें माझें नमस्काररूप आराधन कर. हें अर्चन आणि वंदन-"श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं ॥ अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्म निवेदनं ॥ इति पुंसार्पिता विष्णौ भक्तिश्चेन्नवलक्षणा ॥ क्रियते भगवत्यद्धा तन्मन्ये धीत मुत्तमं ॥"-येणें करून श्रीमद्भागवतांत सांगितलेले श्रवण कीर्तनादिक भागवत धर्माचें उपलक्षण आहे. ही नवविध भक्ति विष्णूचे ठायीं पुरुष करील तर तें उत्तम अध्ययन असें मानितों असा त्याचा अर्थ आहे-मामेव एष्यसि-म्हणजे याप्रमाणें सर्वदा भागवत धर्मानुष्ठानानें माझे ठायीं अनुराग उत्पन्न होऊन-मन्मना होस्साता मी जो भगवान् वासुदेव त्या प्रतच वेदांत वाक्य विचारा पासून-ब्रह्मात्मैक्य बोध होऊन येशील म्हणजे मद्रूपच होशील. याविषयीं संशय करूं-नको-प्रतिजाने प्रियोऽसि-म्हणजे या विषयीं मी सत्य प्रतिज्ञा तुझेजवळ करतों कारण तूं माझा प्रिय आहेस. प्रियापाशीं प्रतारणा वंचना करणें योग्य नाहीं. अथवा-सत्यंते-म्हणजे सति अंते-असा पदच्छेद करून प्रारब्ध कर्माच्या भोगानें नाश झाला म्हणजे मजप्रतच येशील. ॥ ६५॥

# सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ॥-
# अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥

" यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततं ॥ स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः -" येणें करून जें पूर्वी सांगितलें त्याचें आख्यान केलें. आतां-" ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुनतिष्ठति ॥ तमेव शरणं गच्छ " असें जें सांगितलें त्याचें व्याख्यान करतात.- सर्वधर्मान् परित्यज्य - म्हणजे वर्णधर्म, आश्रमधर्म, साधारण धर्म, असे जे पूर्वोक्त, विद्यमान किंवा अविद्यमान सर्वधर्म त्यांप्रत टाकून म्हणजे हे मला तारतील यांचे आश्रयानें मी तरेन अशा बुद्धीचा त्याग करून - मां एकं शरणं व्रज - म्हणजे अद्वितीय सर्व धर्मांचा प्रवर्तक आणि फलदाता असा जो मी परमेश्वर - वासुदेव त्याप्रत शरण ये म्हणजे धर्म असोत किंवा नसोत दुसऱ्याची अपेक्षा करणाऱ्या पासून काय व्हावयाचें आहे. दुसऱ्याची अपेक्षा न करणारा जो भगवदनुग्रह तेणें करूनच मी कृतार्थ होईन अशा दृढ निश्चयानें परमानंद घनमूर्ति अनंत जो वासुदेव श्री भगवान् त्याचेंच क्षणोक्षणीं भजन कर. किंवा हा भगवान् वासुदेवच परम तत्त्व आहे यापेक्षां दुसरें अधिक नाहीं असें विचार पूर्वक प्रेमाचे आधिक्यानें अनात्म चिंता शून्य जी अविच्छिन्न मनोवृत्ति तिणें करून चिंतन कर. येथें एका मलाच शरण ये असें सांगितल्यानेंच सर्व धर्मांच्या पूर्वोक्त त्यागाचा लाभ झाला असतां सर्व धर्मांचा त्याग करून असें जें अनुवादानें सांगितलें तें सर्व धर्मांचे अनुष्ठानानें जें फल व्हावयाचें तें फल भगवंतास शरण जाण्यानें होतें असें सूचविण्या साठीं सांगितलें. यावरून सर्वधर्मानें जें फल व्हावयाचें तें मज पासूनच प्राप्त होतें यास्तव मला जो शरण आला त्यास धर्माचरणाची अपेक्षा नाहीं असें सिद्ध केलें. येथील धर्मपद अधर्मानें किंवा कर्म सामान्याचें उपलक्षण करून सर्व कर्म परित्याग करून सर्वात्मा सर्वभूतस्थ सम जो मी एक त्याप्रत शरण ये मजहून दुसरें कोणी नाहीं असा निश्चय कर. येथें नैष्कर्म्यच विवक्षित आहे असा अर्थ भाष्यकार करतात. ही व्याख्या उत्तम नाहीं; कारण येथें कर्मत्याग विवक्षित नाहीं. कर्मानुष्ठान करीत असतांही त्या विषयीं आदर नसून ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यासी या सर्वांनीं भगवदेक शरण व्हावें इतकेंच विवक्षित आहे. स्वधर्मा विषयीं सर्वांचा आदर आहे तो जाऊन भगवंताचे ठायीं आदर होण्यासाठीं हें वचन सफल आहे. अधर्मतर अनर्थास कारण आहे त्यामुळें त्याविषयीं आदर कोणाचाच नाहीं असें असून त्याचा आदर करूं नये असें जर सांगितलें तर हें वचन निष्फल होईल; आणि अधर्म परित्याग करावा हें दुसरें शास्त्रांतील वचनानें सिद्धच आहे त्याविषयीं येथें विधानें प्रयोजन नाहीं. वर्णाश्रम धर्मास स्वर्गादिक प्राप्तिरूप

अभ्युदयाचें हेतुत्व जसें आहे तसें मोक्ष हेतुत्वही आहे अशी शंका होईल तिचें निरा-करण करण्यासाठींच हें वचन असें म्हणावें. संन्यास विधीचे शास्त्रानें आणि अधर्म निषेध शास्त्रानेंच सर्व कर्म त्याग किंवा धर्माधर्म त्याग सिद्ध आहे यामुळें त्याविषयीं येथें अपूर्व विधीचें प्रयोजन नाहीं. संन्यास शास्त्राचाच येथें उपदेश केला असें संभवत नाहीं. येथें भगवदेक शरणते विषयींच विधि विवक्षित आहे कारण सर्व धर्म परित्याग करून भगवंतास शरण जा. असा उपदेश करून गीता शास्त्रार्थाची समाप्ति केली आणि भगवदेक शरणते शिवाय संन्यासास ही सफलत्व नाहीं आणि संन्यासानधिकारी जो अर्जुन त्यास संन्यासाच्या उपदेशानें प्रयोजन ही नाहीं. अर्जुन पुढें करून त्याचे निमित्तानें संन्यासाधिकाऱ्यांसच हा उपदेश, असें म्हणावें तर तुझें हित सांगतों. सर्व पापापासून तुला मुक्त करीन तूं शोक करूं नको असे उपक्रम उपसंव्हार अर्जुना विषयींचे संभवणार नाहींत. यास्तव संन्यास धर्माचे ठायीं ही अनादर करून भगवदेक शरण व्हावें अशा विधी विषयींच येथें भगवंताचें तात्पर्य आहे या कारणानें प्रथम व्याख्यान उत्तम, असें कोणी व्याख्याकार म्हणतात. यांचा अभिप्राय असा आहे:- या गीता शास्त्रांत साधन, आणि फलभूत कर्मनिष्ठा, ज्ञाननिष्ठा, भगवद्भक्तिनिष्ठा, अशा तीन निष्ठा विवक्षित आहेत. त्यांतील सर्व कर्म संन्यास पर्यंत कर्मनिष्ठेचा उपसंहार -"स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः-" येणें करून केला. संन्यास पूर्वक वेदांत श्रवणादि परिपाक सहित ज्ञान निष्ठेचा उपसंहार-" ततो मां तत्त्वतो-ज्ञात्वा विशते तदनंतरं-" येणें करून केला. भगवद्भक्तिनिष्ठा पूर्वोक्त दोहों निष्ठेस-साधन भूत आहे आणि त्या दोहों निष्ठेची फलभूत म्हणजे त्यापासून होणारी आहे, तिचा उपसंहार- सर्व धर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज-या श्लोकांत केला. भाष्यकाराचा अभिप्राय असा आहे कीं,-"मन्मना भव मद्भक्तः-" याश्लोकानें भगवंताचें सत्य प्रतिज्ञत्व जाणून भगवद्भक्तीचें फल मोक्ष आहे. असा निश्चय करून-भगवदेक शरण हो असें सांगितलें यावरून सर्व कर्म योगनिष्ठेचें रहस्य जें भगवत् शरणता रूप भगवद्भक्तिनिष्ठा तिचा उपसंहार करून तत्फलभूत वेदांत विहित ज्ञान सांगण्या साठीं ज्ञाननिष्ठेचा उपसंहार शास्त्रांतर सिद्ध सर्व कर्म संन्यासाचा अनुवाद करून येथें याश्लोकानें केला. तुझें हित सांगतों सर्व पापापासून तुला मुक्त करीन तूं शोक करूं नको इत्यादिक संवाद प्रस्तावनेंत लिहिल्या प्रमाणें उपनिषदांतील जनक याज्ञवल्क्यादिकांचे संवादा प्रमाणें विद्यास्तुत्यर्थ आहे असे हे मत भेद याश्लोकाचे व्याख्ये विषयींचे दाखविले आहेत. यांतून निर्मत्सर बुद्धीनें विचार करून जो चांगला वाटेल त्या अर्थाचा स्वीकार पंडितांनीं करावा. मतभेदानें त्या त्या श्लोकांत उपसंहार करून सांगितलेली भगवदेक शरणता स्वरूप भगवद्भक्तिनिष्ठा त्या भगवंताचाच मी आहें; तो भगवान् माझाच आहे; तो भगवा-

तू मीच आहें. अशा तीन प्रकारच्या भावना भेदानें क्रमेंकरून मृदु, मध्य अतिमात्र अशी तीन प्रकारची आहे. पूर्व पूर्व भावनेच्या अभ्यास परिपाकानें उत्तरोत्तर भावना रूप भगवद्भक्ति निष्ठा प्राप्त होते. त्यात्रिविध भगवद्भक्ति निष्ठेचीं उदाहरणें संक्षेपानें येथें लिहितों:" सत्यपिभेदापगमे नाथ तवाहं नमाम कीन स्त्वं ॥ सामुद्रोहि तरंगः क्वचन समुद्रोहि नारंगः ॥" हे नाथ भगवन्, तुझे आणि माझे स्वरूपाशीं भेद नसला तरी मी तुझा आहें तूं माझा नव्हेस जसा तरंग समुद्राचा आहे परंतु समुद्र तरंगाचा नाहीं अशी भावना मृदु भगवन्निष्ठा–" हस्तामुत्क्षिप्य यातोसि बलात्कृष्ण किमद्भुतं ॥ हृदयात् यदि निर्यासि पौरुषं गण्यामिते–" हे कृष्णा, हातास झटका देऊन बलानें गेलास यांत अद्भुत म्हणजे आश्चर्य तें काय. तूं माझ्याच म्हणोन मी तुला हृदयांत ठेवला आहे तो तूं जर माझे हृदया पासून जाशील तर तूं पराक्रमी असें मानीन. हें मध्यम भगवद्भक्तिनिष्ठेचें उदाहरण–" सकलमिदमहंच वासुदेवः परम पुमान् परमेश्वरः सएकः ॥ इति मतिरचला भवत्यनंतं हृदयगते व्रजतान् विहाय दूरात्–" हें सर्व जग वासुदेवच आहे परम पुरुष अद्वितीय परमेश्वर वासुदेव तो मीच आहें अशी ज्यांची सर्वांतर्यामी अनंताचे ठायीं बुद्धि झाली आहे त्यांप्रत टाकून तूं दूर जा असें यमानें आपले दूतांस भाषण आहे. हें अतिमात्र भगवद्भक्ति निष्ठेचें उदाहरण आहे. अहंत्वां सर्वपापेभ्यः मोक्षयिष्यामि– सर्व धर्मांचा अनादर करून–किंवा सर्व कर्मांचा त्याग करून तूं मदेक शरण झालास म्हणजे बंधुवधादि निमित्तक संसार हे तुझे सर्व पापा पासून मी तुला प्रायश्चित्ता वांचून ही मुक्त करीन–माशुचः– युद्धाविषयीं मी प्रवृत्त झालों तर बंधुवध निमित्तक प्रत्यवाया पासून माझा विस्तार (तरणें) कसा होईल असा तूं शोक करूं नको. धर्मा पासून पापाचा नाश होतो असें श्रुतीनें सांगितलें आहे मी परमेश्वर धर्मरूपच आहें असें ही श्रुति स्मृतींनं सांगितलें आहे. अथवा मला तूं स्वात्मत्वें करून जाणलेंस म्हणजे मी आपला स्वात्मभाव प्रकाशित करून ज्ञान दीपानें अज्ञान मूलक सर्व धर्माधर्म रूप तमाचा नाश करून तुला मुक्त करीन. ॥ ६६ ॥

## इदं तेना ऽतपस्काय नाभक्ताय कदाचन ॥ न चाशुश्रूषवे वाच्यं नच मां योभ्यसूयति ॥ ६७ ॥

गीता शास्त्रार्थ समाप्त झाला. आतां शास्त्र संप्रदाय विधि सांगतात. इदंतेऽतपस्काय–म्हणजे सर्व संसाराचें नाश करणारें तुला सांगितलेलें हें गीता शास्त्रार्थाचें रहस्य ज्यास इंद्रिय जय नाहीं असा जो अतपस्क किंवा तप म्हणजे आलोचन तें न करणारा किंवा या शास्त्रार्थाचे अनुष्ठानाविषयीं यत्न न करणारा जो त्यास तूं सांगूं नये. आणि तपस्वि आहे परंतु ज्याची गुरूचे ठायीं आणि देवाचे ठायीं भक्ति नाहीं.

त्यास सांगूं नये. आणि–नचाशुश्रूषवे–म्हणजे भक्तिमान् असून ही जो गुरूची देवाची शुश्रूषा म्हणजे पूजा करीत नाहीं किंवा गुरूनें सांगितलेल्याचें अनुष्ठान करीत नाहीं त्यास सांगूं नये. नचमांयोभ्यसूयति–म्हणजे मी जो वासुदेव त्या मत हा मनुष्य असर्वज्ञ आहे असें मानून मी आपली प्रशंसा करतों असा माझे ठायीं दोषारोप करून माझे ठायीं ईश्वरत्व न जाणून हास्य करतो किंवा माझे ठायीं ईश्वरत्वाचें सहन न करून माझा द्वेष करतो असा जो माझा उत्कर्ष न सहन करणारा तपस्वी भक्त शुश्रूषु जरी आहे तथापि त्यास कदापि सांगूं नये अर्थात जो तपस्वी भक्त शुश्रूषु कृष्णानुरक्त आहे त्यास सांगावें असें सिद्ध होतें. एक एक विशेषणानें ही जो रहित आहे तो हें रहस्य सांगण्यास अयोग्य आहे असें सुचविण्या करितां चार नकारांचा प्रयोग श्लोकांत केला. यावरून हें रहस्य ज्यास सांगावयाचें आहे त्यास अधिकार येण्यास तप, गुरुभक्ति, शुश्रूषा, भगवदनुरक्ति अवश्य पाहिजे व तप किंवा मेधा यांचा मात्र विकल्प आहे असें भाष्यकाराचें मत आहे. ॥६७॥

**य इमं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ॥ भक्तिं मयि परां कृत्वामामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥**

या प्रमाणें संप्रदाय विधि सांगून त्याचें अनुष्ठान करणारास फल सांगतात.–यः इमं परमं गुह्यं मद्भक्तेषु अभिधास्यति–म्हणजे जो संप्रदाय प्रवर्तक परंम पुरुषार्थ साधन त्वास्तव सर्वत्र प्रकाशित करण्यास अयोग्य अशा या कृष्णार्जुन संवाद रूप ग्रंथा प्रत माझे ठायीं अनुरक्त जे माझे वासुदेवाचे भक्त त्यांचे ठायीं ग्रंथस्वरूपानें किंवा अर्थ स्वरूपानें स्थापन करील. कसें स्थापन करावें तें सांगतात.–भक्तिं मयि परां कृत्वा–म्हणजे हीत ग्रंथ किंवा तदर्थ स्थापन रूप परम गुरु जो परमेश्वर त्याची शुश्रूषा च मी करतों असा दृढ निश्चय करून स्थापन करील–मामेवैष्यति असंशयः–म्हणजे तो जो मी वासुदेव याची भक्ति त्यास प्राप्त होऊन मजप्रत च लवकर येईल म्हणजे मुक्त होऊन मद्रूप च होईल या विषयीं संशय नाहीं येथें–मद्भक्तेषु–असें पुनः भक्तीचें ग्रहण केलें यावरून पूर्वोक्त तप आदिक तीन विशेषणें नसलीं तरी ज्यास भक्ति आहे तो हें गीताशास्त्राचें रहस्य सांगण्यास अधिकारी आहे असें सुचविलें. ६८

**न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मेप्रियकृत्तमः ॥ भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥**

तस्मात् मनुष्येषु कश्चित् मेप्रिय कृत्तमः–म्हणजे माझे भक्तांचे ठायीं या गीता शास्त्राची प्रवृत्ति करणारां पेक्षां दुसऱ्या मनुष्यांचे ठायीं माझें फार प्रिय करणारा नाहीं–न च भविता–म्हणजे पुढें ही होणार नाहीं. तस्मात्–अन्यः प्रियतरः–म्हण-

जे पूर्वीं ही त्याहून दुसरा फारमला प्रिय कोणी झाला नाहीं अथवा मद्विषयीं अतिशयित प्रीति ज्याची आहे असा कोणी सांप्रत नाहीं व पुढें ही होणार नाहीं आणि पूर्वीं ही झाला नाहीं. ॥ ६९॥

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवाद मावयोः ॥ ज्ञा-
नयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७०॥

अध्यापकाचें फल सांगून या गीताशास्त्राचें अध्ययन करणारास फल सांगतात.-यः आवयोः इमं धर्म्यं संवादं अध्येष्यते-म्हणजे जो तूं अर्जुन आणि मी कृष्ण याच्या धर्माला उत्पन्न करणारा किंवा धर्मा विरुद्ध किंवा धर्मरूप जो हा संवाद याचें जपरूपानें अध्ययन करील म्हणजे पठन करील- तेन ज्ञानयज्ञेन अहं इष्टः स्यां इति मे मतिः-म्हणजे त्यानें चतुर्थाध्यायांत सांगितलेला जो द्रव्ययज्ञादिकापेक्षां श्रेष्ठ ज्ञान यज्ञ तेणें करून माझें सर्वेश्वराचें यजन केलें किंवा पूजन केलें असा माझा निश्चय आहे. जरी केवल पठण करणारा गीतार्थ न जाणून जपरूप पठणच करील तथापि तें ऐकून माझें हा स्तवन करतो अशी बुद्धि मला उत्पन्न होऊन मी त्याजवळ उभा राहतों- जसा लोकांत यदृच्छेनें कोणी कोणाचें नाव घेऊन हांक मारिली तर ऐकणारास हा मलाच हांक मारतो अशी बुद्धि होऊन हा काय म्हणतो तें ऐकावयास तो त्याजवळ येऊन उभा राहतो त्याप्रमाणें यास्तव केवल याचे जपमात्रानें ही अंतःकरण शुद्धी होऊन ज्ञानोत्पत्ति द्वारा ज्ञान यज्ञाचें जें मोक्षरूप फल तें प्राप्त होतें मग अर्थानुसंधान पूर्वक पाठ करणारास तर तत्कालीन साक्षात् ज्ञानानें मोक्ष होतो. हें काय सांगावयाचें आहे, माझा निश्चय आहे असें सांगितल्यानें हा अर्थवाद नव्हे फल विधीच आहे असें जाणावें. ॥ ७०

श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ॥ सोऽ-
पि मुक्तः शुभाल्लोकान् प्राप्नुयात्पुण्य कर्मणाम् ॥ ७१॥

आतां या गीता शास्त्राचें श्रवण करणारांस फल सांगतात.-श्रद्धावान् अनसूयश्च यः नरः शृणुयादपि-म्हणजे दुसरा मोठ्या स्वरानें या गीताशास्त्राचें पठण करीत असतां श्रद्धें करून युक्त होत्साता आणि हा मोठ्या स्वरानें किमर्थ पठन करतो हें शुद्ध किंवा अशुद्ध कां पठन करतो अशा दोष दृष्टीनें रहित जो मनुष्य या गीता शास्त्राचें केवल श्रवण ही करील- सोपि मुक्तः पुण्य कर्मणां शुभान् लोकान् प्राप्नुयात्-म्हणजे केवल अक्षर मात्राचें श्रवण करणारा ही तो सर्व पापापासून मुक्त होत्साता अश्वमेधादिक शुभ कर्म करणारांस जे पुण्यलोक प्राप्त व्हावयाचे त्यां प्रत पावेल. अपि शब्दानें अर्थ जाणणारा शुभ लोकां प्रत पावेल म्हणून का-

य सांगावयाचें आहे असें सूचविलें. ॥ ७१ ॥

**कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ॥ कच्चि-दज्ञान संमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥ ॥**

शिष्यास ज्ञान होईतों पावेतों कारुणिक गुरूनें ज्ञान सांगण्याचा प्रयास करावा हें सूचविण्यास्तव सर्वज्ञ ही भगवान् अर्जुनास विचारतात. हे पार्थ त्वया एतत्-एकाग्रेण चेतसा श्रुतं-म्हणजे हे अर्जुना, मी सांगित केलेलं हें गीता शास्त्र तूं एकाग्रमनानें अर्थनिश्चय पूर्वक श्रवण केलेंस काय? हे धनंजय, ते अज्ञान संमोहः नष्टः कच्चित्-म्हणजे हे धनंजया अर्जुना, अज्ञानानें झालेला जो भ्रम तो तुझा या गीताशास्त्रार्थाचे ज्ञानानें गेला काय? जर भ्रम गेला नसेल तर पुनः उपदेश करीन. ॥ ७२ ॥

**अर्जुन उवाच ॥ ॥ नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाऽच्युत ॥ स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥ ॥ ॥ ॥**

असें भगवद्वाक्य ऐकून कृतार्थ झालेला अर्जुन पुनः उपदेशाची अपेक्षा नाहीं असें बोलतो.-हे अच्युत त्वत्प्रसादात् मोहः नष्टः स्मृतिः लब्धा-म्हणजे हे अच्युतस्वरूपा कृष्णा, अज्ञाना पासून झालेला विपरीत ज्ञानात्मक माझा मोह नष्ट झाला. मोहं नाश कशानें झाला तो सांगतो. तुझ्या प्रसादें करून तुझ्या उपदेशा पासून मला निःसंशय-आत्मज्ञान प्राप्त झालें. अच्युत या संबोधनानें तुझ्या आत्मत्वें करून निश्चय झाल्यानें तुझा वियोग नाहीं. तुझें आत्मरूपानें सर्वदा स्मरणच आतां आहे असें सूचविलें यास्तव-गत संदेहः स्थितोऽस्मि-म्हणजे सर्व संशय ज्याचे गेले आहेत असा मी युद्ध कर्तव्यता रूप तुझे आज्ञेचे ठायीं स्थित आहें आणि-करिष्ये वचनं तव-म्हणजे यावज्जीवन पर्यंत परम गुरू जो भगवान् वासुदेव तूं त्याचें वचन करीन तुझे आज्ञेचें परिपालन करीन. येणें-करून गुरु आज्ञेचें परिपालन शिष्यास आवश्यक आहे असें सूचविलें आणि केलेले प्रयासाचें साफल्य झालें असा भगवंताचा अर्जुनानें संतोष केला. येणें करून गीता शास्त्राचें अध्ययन करणाऱ्यास भगवत्प्रसादानें मोक्ष पर्यंत ज्ञान लाभ अवश्य होतो असा या शास्त्राचे फलाचा उपसंहार केला. ॥ ७३ ॥

**संजय उवाच ॥ ॥ इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ॥ संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥ ॥ ॥ ॥**

शास्त्रार्थ समाप्त झाला आतां कथा संबंधाचे अनुसंधानानें संजय धृतरा-

ष्ट्र म्हणत बोलतो.- इति अहं महात्मनः वासुदेवस्य पार्थस्यच- म्हणजे या प्रमाणें - मी महात्मा जो वासुदेव आणि अर्जुन यांच्या - अद्भुतं रोम हर्षणं इमं संवादं अश्रौषं- म्हणजे लोकांमध्यें असंभाव्य आहे यामुळें मनाला विस्मय करणारा आणि शरीरावर रोमांच उभे करणारा असा जो हा संवाद त्याप्रत ऐकता झालों. ॥७४॥

## व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् ॥ योगं योगेश्वरात् कृष्णात् साक्षात् कथयतः स्वयम् ॥७५॥

तूं दूर असतां कसा संवाद ऐकलास अशा शंकेचें निराकरणार्थ बोलतो:- व्यास प्रसादात्- म्हणजे व्यासानें मला दिलेलें जें दिव्य चक्षु आणि दिव्य श्रोत्र त्यांहीं करून दूरचें ही मी पाहात होतों आणि ऐकत होतों एतद्रूपं व्यासप्रसादानें -एतत्परं गुह्यं श्रुतवान्- म्हणजे अत्यंतगुह्य अशा या गीता शास्त्राप्रत मी ऐकलें तें गीताशास्त्र कसें तें सांगतो.-योगं-म्हणजे योगप्राप्ति होण्यास अव्यभिचारी कारण कृष्णार्जुन संवादरूप अशा शास्त्राप्रत - स्वयं योगेश्वरात् कृष्णात् साक्षात् कथयतः श्रुतं-म्हणजे आपले परमेश्वर स्वरूपानें कथन करणारा जो श्रीकृष्ण त्या पासून मी साक्षात् श्रवण केलें परंपरेनें केलें नाहीं. येणें करून भगवंतानें ब्रह्मदेवास सकल शास्त्राचा उपदेश स्वमुखानें केला. त्याचें श्रवण ब्रह्मदेवानें साक्षात्केलें तद्द्वारा परंपरेनें दुसऱ्यानीं केलें त्या प्रमाणें या शास्त्राचें मी साक्षात् भगवंताचे मुखापासून श्रवण केलें, मी मोठा ब्रह्मदेवा प्रमाणें भाग्यवान् आहें असें आपलें अभिनंदन संजयानें केलें. ॥७५॥

## राजन् संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ॥ केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥७६॥

हे राजन्- हे राजा धृतराष्ट्र, अद्भुतं पुण्यं केशवार्जुनयोः इमं संवादं -म्हणजे लोकोत्तर आणि श्रवणें करून पुण्य करणारा पापनाश करणारा जो केशवार्जुनाचा हा संवाद याचें - संस्मृत्य संस्मृत्य मुहुःमुहुः हृष्यामि च -म्हणजे वारंवार स्मरण करून मी हर्षाप्रत पावतों किंवा रोमांचित शरीर होतें असा द्विरुक्तीनें फार आदर सूचविला. ॥७६॥

## तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ॥ विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥७७॥

जें विश्वरूप अर्जुना कारणे भगवंतानें ध्यानार्थ दाखविलें त्याचें स्मरण करून बोलतो.- तच्च हरेः अत्यद्भुतं हरेः रूपं संस्मृत्य संस्मृत्य -म्हणजे हरीनें अर्जु-

नास जें दाखविलेलें अति अद्भुत विश्वरूप त्याचें स्मरण करून स्मरण करून-म
हाराज मे विस्मयः भवति पुनः पुनः हृष्यामि च-म्हणजे हे महाराजा धृतराष्ट्रा,
मला विस्मय होतो आणि वारंवार हर्ष होतो.॥७७॥

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः॥
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम॥७८
इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्या-
यां योगशास्त्रे श्रीकृष्णाऽर्जुनसंवादे मोक्षसं-
न्यासयोगो नामाष्टादशोऽध्यायः॥१८॥ ॥

या वरून आपले पुत्राचे विजयाची आशा तूं करूं नको असें सांगतो.
यत्र योगेश्वरः कृष्णः-म्हणजे ज्या युधिष्ठिर पक्षाचे ठायीं सर्व योगसिद्धींचा ईश्व-
र सर्वज्ञ सर्वशक्ति भक्त दुःखाचा नाश करणारा श्रीकृष्ण स्थित आहे.-यत्र पार्थः
धनुर्धरः-म्हणजे आणि ज्या धर्मराजाच्या पक्षाचे ठायीं गांडीव धनुष्याचें धार-
ण करणारा नर अर्जुन स्थित आहे.-तत्र श्रीः विजयः भूतिः-म्हणजे नरनारा-
यणांनीं अधिष्ठिलेल्या त्या धर्मराजाच्या पक्षाचे ठायीं राज्यलक्ष्मी शत्रूपराजया-
नें होणारा उत्कर्षरूप विजय उत्तरोत्तर अभिवृद्धी प्रत पावणारा राज्यलक्ष्मीरूप
भूति- ध्रुवा-म्हणजे अवश्य होणारा याचा सर्वत्र श्री आदिकांचे ठायीं अन्वय आहे.
आणि नीतिः- न्यायही अवश्य होणार आहे - मतिर्मम-या प्रमाणें माझा निश्चय आ-
हे यास्तव व्यर्थ पुत्रजयाशे प्रत टाकून भगवदनुग्रहयुक्त झाल्यामुळें लक्ष्म्यादि-
कानीं युक्त होणाऱ्या पांडवा बरोबर संधिच करावा हें योग्य आहे असें तात्पर्य.॥७८॥

गीताशास्त्रस्य गूढार्थप्रकाशार्थं मयाकृतः॥ भाषाविवृत्तिदीपोऽय
मज्ञानावृत्तिनाशनः॥ श्रीकृष्णायार्पितो भक्त्या नीराजनपुरःसरं॥
अनेन प्रीयतां देवो द्वीपतिः श्रीपतिः स्वराट्॥ मीमांसान्यायपंचास्य-
राघवाचार्यसूरिणां॥ शिष्यस्यैषा कृतिर्भूयात् रघुनाथस्य सन्मुदे॥

इति श्रीमद्भगवद्गीतायाः रघुनाथशास्त्रिकृत भाषाविवृत्तौ अष्टादशोऽ
ध्यायः समाप्तः॥१८॥ ॥शुभंभवतु॥ ॥श्रीकृष्णप्रसादात् भवभयोत्तारणमस्तु॥

